केसा श्री दत्ता । तुझा द्रोही ॥ २४ ॥ अपराधु क्षमा करणें । न बोले ईं पाप वचनें । आतां दंडूचि तो मजकारणें । प्रीयु आहे ॥ २५ ॥ भक्तीचा जो उपस्थापकु । तो दंडूचि प्रियु मतें एकु । परि अभक्तीचा पोषकु । येऊँ नेघे ॥ २६ ॥ अपराधु जेणें केला । तो मी वैरी आपुला । तयाचें वदन मजला । दाउचि नको ॥ २७ ॥ अपराधियाचा मतें सगु । तोचि नलगे देवा वियोगु । तयाचा जेणें योगु । तोचि कैसा ॥ २८ ॥ अपराधी मीं दंडावा । माझा द्वारीं धावा । म्या तो निःशेषु करावा । तुझे नि बळें ॥ २९ ॥ नाना मीं तुझा अन्याइ । तैसें मानूजाला द्रोही । अज्ञाना कळे काही । हेंचि ह्मणावें ॥ ३० ॥ देवा मी नेणें तूतें । आणि तूझियां भक्तियोगातें । आतां रक्षी मतें । ऐसेंचि ह्मणो ३१ तरि मी तूतें जाणों शकेन । ते श्रेष्ठ भक्त होइन । ऐसें कवणें सामर्थ्यें पावेन । स्वतंत्र जाणपण ॥ ३२ ॥ तूतें जाणें सर्वज्ञा । भक्ती योगु तुझी उपासना । ऐसें मानी तो गणा । माजी न शोभे ॥३३॥ नेणें ह्मणें तोचि श्रेष्ठु । नेणें चि विधी उत्कृष्टु । जाणें मनें तो धीटु । दंडावा की ॥ ३४ ॥ आतां नेणोंहेचि असावें । ते क्षमा करीं ह्मणावें । तें तुजसीं सर्वज्ञपण स्थापावें । आह्मी कायें ॥ ३५ ॥ जो तू जैं सणा जैसा । तो तूं तें सणा तैसा । इत तरा कळसी ऐसा । भाओचि न घडे ॥३६॥ सर्वज्ञा तुझा जाणू । जा सर्वज्ञ सर्वज्ञु । तो भक्तु कवणु । कैसा आहे ॥३७॥ आणि सर्वज्ञ ज्ञानी अभिमानु । धनी तो दासु अपुलक्षणु । तुजहूनि असाधारणु । भाव जयाचा ॥ ३८ ॥ तैसा मी का होईन ।परी सगु तयाचा लाहिन । तरि प्राण लयें घेइल। प्रायश्चित्त॥३९॥ तुजविपयीं जो अज्ञ । अज्ञानी धरी अभिमानु । तोचि सेवकु निजगुण । ऐसें अहे ॥ ४० ॥ तरि नेणें हें क्षमा करणें । ऐसें बोलता बोलणें ।श्रेष्ठ केलें जाणणें । ऐसें होइल ॥ ४१ ॥ मी जाणतो देवा तुतें । हे माने येका अभक्तातें । ह्मणोनि ऐसिये मतातें । आश्चर्यचि नये ॥ ४२ ॥ माझें तु सकल क्षेम । माझें भाग्य तु परम । मातें अवधूता ब्रह्म । तूचि साकार ॥ ४३ ॥ ऐसी करू विनवणी । ते श्रेष्ठ विचारूं तुजहूनि । जे येक थोर मानून । ते तू ह्मणों।॥४४॥ तुझेनि माझें क्षेम । तुझेनि तुं परब्रह्म । तुझे नव्हे तें परम । काहीचि नव्हे ॥ ४५ ॥ तुझेनि मी कृतकृत्यु । तुझेन मी समर्थु । तुझेन मी विख्यातु । पृथ्वी ॥ ४६ ॥ ऐसें बोलता दातारा । अपराधी होईन खरा । येथ तुझिये धारा । नाही भक्ती ॥ ४७ ॥ तुझें करितां स्मरण । नाईहीं करू मी अनुसंधान । तात्पर्य ठेउ समान । कैसिया परी ॥ ४८ ॥ वास्त्र देइ प्रेम दइ । तुझी प्राप्ति मातें देइं । पुडती वियोगु नाही । ऐसें कीजो ॥ ४९ ॥ ऐसें करिता प्रार्थन । किती करू स्वार्थचिंतन । जव्हीं मीं तुजवाचून । आणीक न मगें ॥ ५० ॥ जेण सुख जेणें तित । तेचि मागणें तुचित्त । येर नाशक समस्त ।

मार्गोनि काये ॥५१॥ सुरवरां जयाची सिराणी । साधिजे सर्वे योगें करूंनि । तें मातें देइं ह्मणोनि । किरीं स्वार्थु चितू ॥ ५२ ॥ देवा मी तुझा दूतु । ऐसा भाव जे भजतु । ते तेणेंचि अगें स्वार्थु । नव्हे काये ॥ ५३ ॥ आतां जे जे मी बोलेन । तेणें अभक्तुचि होइन । आतां मौनेंचि राहीन । ते भक्ति कायिसी ॥ ५४ ॥ काया वाचा मन तीन्ही । निरार्थकें जाली मोनी । असो मौन मुद्रा हे करणी । भक्ताची नव्हे ॥ ५५ ॥ आतां भक्ता आणि भाव । तयाचा केसा अभिप्राव । युक्ति स्वार्थु वाव । दोन्ही जेथें ॥ ५६ ॥ युक्ती संप्रदाव रचणें । स्वार्थे फल तेथ भजणें । ऐमें निज दासा नमनें । परम शुद्रातें ॥ ५७ ॥ निश्चयो प्रीति नामस्मरण । त्रिविध निर्मळ भजन । जयाचें तो ह्मणोन । शुद्द ह्मणितला ॥ ५८ ॥ आता निश्चयो तोचि केसा । सांगिजेल जैसा तैसा । जेणें पवित्र प्रकारु दासा । येइल कळों ॥ ५९ ॥ तुझा करितां आचारु । मोक्षु हो अथवा संचारु । तेथें नाहीं आदरु । मसया मना ॥ ६० ॥ येणें मान्यता हो अमान्यता । अर्थु अनर्थु हो भलेना । परंतु तुझा मार्गु तो सर्वथा । सांडणेंचि नाहीं ॥ ६१ ॥ तुजसीं समान का थोर । ऐसें आइकतांचि उत्तर । यया देहावरि धार । ह्मणेन खड्गाची ॥६२॥ तुझी प्रशंसा आइकेन । तेण भक्ती दृढ होईन । ऐसी वासना नीचा मन । विगाळु मानी ॥ ६३ ॥ तुं ईश्वरु अथवा नरु । परि सर्वथा न भजें इतरु । तुझा करूंनि विचारु । क्वणु धर्मु मातें ॥ ६४ ॥ च्यान्ही जोडनी पुरुषार्थ । अथवा जोडले समस्त । नाश तु सुसें परि चित्त । व्यय न करीं ॥ ६५ ॥ मेघ वर्षतु शिळा धारीं । तया आड कांहीं न करीं । तुझा नम्लें निर्धारीं । भक्ति योगाचा ॥ ६६ ॥ न धरि तरि न धरू मेदनी । सर्वांग पडो वन्हीं । परि हे न सडी करणी । तुझया दासत्वाची ॥६७॥ स्त्रीपुत्रादि पदार्थ । आतांचि नाशो हे समस्त । रोकडें शरीर येथा पडतां दिसो ॥६८॥ प्रलया ऐसा आघातु । वरि पडो मेरु प्रस्तुतु । सूर्या ऐसा दीप्तु । आंगी जडो॥६९॥ सागरी बुडतांही न सडीं । व्याघ्रामुखीं पडो उडीं । दृढु करिता कदर्डी । आंग देइन ॥७०॥ महादुःखें हीन चलणें । ऐसा तो निश्चयो ह्मणणें । आतां भाग्य प्रधानें विघ्ने । ते जे पडती ॥ ७१ ॥ सार्वभौम हो निर्वेर । श्रीची सप्राप्ति अपार । परतु तुजहूंनि इतर । तें मी न भजें ॥ ७२ ॥ देवलोकिचा मी इंद्र । जालों वरुणु सूर्याचंद्र । परंतु भक्तियोगु तोचि थोरु । सर्वदा भजें ॥ ७३ ॥ हिन जोडो तात्विक । तैंही परि ने घे आणीक । मानितीं सकल लोक । परि तें काये ॥ ७४ ॥ तुझा स्वरूपिं प्रवेशणें । ते जे जोडेल अभजनें । तें तें ही परि मनें । आश्रयींना ॥ ७५ ॥ भेटि घासील भजना । तरि तेचि तुझी मी मागेना । ऐक्य पावलयाही मना । निवडीन मी ॥ ७६ ॥ तुझिये भक्तीसाटीं । हिताहित न पाहें दृष्टी । नापेक्षी तुझी भेटि । जरि भक्ति सुटे ॥ ७७ ॥ घरेव न

अथवा वाइटें । निश्चयो भक्तीचा न तुटे । हाचि भाव याप्र प्रगटे । ऐसें बोलता ॥ ७८ ॥ अभिमानु दुणावे आगां । युक्ति स्वार्थु अंतरंगी । तरि निश्चय भाव प्रसंगी । बोले नामी ॥ ७९ युक्ती स्वार्थें वांचून । येसाणि या निर्धारा कारण। कायें तरि प्रेम गहन । येथें हेतु ॥ ८० ॥ निश्चयाची ऐसी रीति । अतां प्रीति कारण ये अर्थी । तेंचि बोलेन उक्ति । प्रेमामृतमयी ॥ ८१ ॥ प्रीति ह्मणिजे आवडी। न सुटे रूपाची गोडी । जीवाची चाड थोडी । देवाहून ॥ ८२ ॥ प्राणाची करीन वोवाळणी । गुंपलें नुगवे मन चरणी । अहंता ममहता दोन्ही । आदरे मुदलिया ॥ ८३ ॥ सुदलें तें मापासमान । प्रीतिचें ऐसें येकपण । अपुत्रका जैसें पुत्रधन । प्राप्त होये ॥ ८४ ॥ लोभिया जैसे धन । रोगिया अमृतपान । मुभक्ता प्रेम गहन । तैसें देवीं ॥ ८५ ॥ स्त्रीपुत्रांची असक्ति । साडिजे जयाचिये प्रिती । ते आपणु आपणा प्रति । प्रीयु कैसा ॥ ८६ ॥ तोही आत्मा परि जया । जगती अप्रीयु आतमया । योगिराजा दत्तात्रेया । सप्रीयातें ॥ ८७ ॥ प्रीतीचें हेंचि लक्षण । जे तेथूनि न सुटे वेगळें मन । तेणें योगें जीण मरण । भलपर्ते हों ॥ ८८ ॥ इद्रियें सांडिती स्वार्था । प्रीतीचा साठारु रोसडती । येका आत्मयां श्रीदत्ता । धर्मानयां ॥ ८९ ॥ विचारापासाव सुटे मन । युक्तायुक्त न करी ज्ञान । मग तें देही संचरोन । केंसं करी ॥ ९० ॥ उर्चे योगें प्रगर्जन । शरीरें करी नर्तन । तेणें आनदें मन । बुडोनि जाय ॥९१॥ लोकेशणा गेली पळोनि । नुगाचि प्रवर्ते गायनी । युक्तायुक्त न मनूनि । स्तुति करी ॥९२॥ देवा तुं माझी जननी । जनकु भ्राता निर्वाणी । तुज येका वांचुनि । न स्मरें मी ॥ ९३ ॥ देवा तु माझे प्राण धन । देवा तु माझें जीवन । देवा तु माझें ज्ञान । ज्ञेय तत्त्व ॥ ९४ ॥ देवा तु माझा योगु । बहिरंगु अंतरंगु । तुजसी माझें वियोगु । मरण होये ॥ ९५ ॥ देवा तु माझा विसावा । जीणचिया अंतर जीवा । तुझा फीटें ठेवावा । आठवु पाहा ॥९६॥ हृदयीं मालला न सटे । विश्वाकारें तोचि नुमटे । इंद्रियेंद्वारा प्रगटे । बाहेरि बोधु॥९७॥ नयन हे लोपलेपणें । निमिषोन्मेषांचें सांडणें । कडानि श्रा दत्तगुणें । तन्मय जाले ॥९८॥ प्रेमाचें स्वरूप ज्ञेय । कैसा तेही आनंदमया भक्ता भक्तिविषयक कार्य । करीत असतां॥ ९९ ॥ आनंदेंचि प्रनर्त्तन। आनंदेंचि प्रगर्जन। आनंदेंचि प्रवर्तन । सेवे ।। ठाईं ॥ १०० ॥ टेढ़ानि अर्पिता शिरकमल । दुःख ऐसें न दटे केवल । यया प्रेमानंदाचें बल । ऐसें आहे ॥ १ ॥ ब्रह्मानंदाची गोडी । भोगितां ययाहूनि थोडी । अद्वैत बोधु तो आवडी । मुरे जयाचिया ॥ २ ॥ आनंदें विस्पदे वदन । आनंदें द्रवती नयन । आनंदें स्पंदनी प्राण । मन उल्लासे ॥ ३ ॥ निर्गुण ब्रह्मानंदु स्फुरे । तो अवर्षोनि भेद विसरे । मन पुष्पोद्रिय भरे । स्वरूप स्थांनी ॥ ४ ॥ आतां हा प्रेमानंदु । सगुणु येरु ब्रह्मानंदु । ययाचा होतां उद्बोधु । केतो वाटे ॥५ ॥ गुणी गुण होती तन्मय ।

रूपीं रूप अभेदमय । देवभक्तपण हें होय । वेगळें न निवडे ॥६॥ येथ नलगे कांहीं विसर्जनें । गुणांचि आनंदु भोगणें । निर्गुण ब्रह्मानंदु येणें । पुरे होय ॥ ७ ॥ निरोधु तयाचें साधन । हा होवे निरोधेचिविण । कि उगोचि करणगण । येथ नियमती ॥ ८ ॥ शमदमाचा येथ वारा । नो येथ नाहीं अवधारा । बाह्यांतरीं वृत्तिविकारा । प्रेमाचि मासी ॥ ९ ॥ तेथें विसरोनि स्फुरवें । येथ आठवे चि विरावें । देखें आइके तें करावे । आनंदमय ॥ १० ॥ तृणतुल्य स्वर्गु जेणें । निर्गुणानंदाचें पुरे पारणें । मोक्षार्ते आणि उणें । हें सगुण प्रेम ॥ ११ ॥ शास्त्राचा नलगे विचारु । नलगे सांख्य योग आचारु । काय आता करावें गुरु । तद्विषइक जे॥१२॥ आसन मुद्रा आणि ध्यान । नलगे अवरोधु साधन ॥ १३ ॥ असतचि सकल गुण । ईश्वर मिळती। असो हा प्रेमस्पंदु । साकारु सगुणु ब्रह्मानंदु । ययाचा हृदयीं वेधु । जाला असतां ॥ १४ ॥ दुजे कांहीं भीय न वटे । थोरही थोरपणें सुटे । सगुण निर्गुण आटे । हेचि होये ॥ १५ ॥ ऐसा निश्चयीं निर्धारु । ऐसा प्रेमाचा विचारु । आतां ययाचा बाह्याकारु । साधन कैसे ॥ १६ ॥ प्रेमवंतें निश्चयपर्यंते । काय करणें निरुतें । का जेणें करूनि पुरुषातें । होये निश्चयी प्रेम ॥ १७ ॥ तरि तें असंड नामस्मरण । देसें तयाचें लक्षण तेंचि येक वचन । बोलिजेल ॥ १८ ॥ बुद्धि म्हणिजे ज्ञान । निश्चयो तो तेणेंकरून । श्रीदत्तें येकें वीण । येर न मनें ॥ १९ ॥ मनाचें हेंचि करणें । प्रेमयुक्त रूपीं रमणें । तियाचि प्रवृत्ती जाणें । इंद्रियद्वारा २० बुद्धी रूप निश्चित । मन सुप्रेमें तद्गत । तयाचि निष्ठा स्वस्थ । अमणें अभिमानाचें ॥ २१ ॥ निश्चयो प्रीति दोन्ही । अभिमानें धरिली कवळूनि । तोचि घोषु नाम स्मरणीं । बाहेरि करावा ॥ २२ ॥ क्षीरसागराचे तरंग । क्षीरचि तयाचें आंग । पाणियाचे लहरिया वेग । पाणि जैसे ॥ २३ ॥ तैसा निश्चयो हा समरसु । अभिमानें दाटला उल्हासु । तेथ अधिकाधिकु तोषु । पूरु चाले ॥ २४ ॥ तेथिचे तरंगाभास । तेचि होती नामघोष । लहरिया वेग विशेष । उल्लासा वेष तें ॥ २५ ॥ निश्चयें प्रेमेंकरून । जालें जें नामस्मरण । तयाचें अपूर्व लक्षण । तेंचि कैसें ॥ २६ ॥ नामाचा करितां घोषु । आठवे तो रूप विशेषु । तंव रूपीं निश्चयावासु । पूर्वीचि असे ॥२७॥आठवाचि सरिसें मन । प्रेमयुक्त रूपीं निमग्न । सभाग्याचें नामस्मरण । ऐसें आहे॥ २८ ॥निश्चयें प्रीतीनामघोषु । तेणें अंतरिचा आल्हादासु । बाहेरि पडे अशेषु । ब्रह्मानंदाचा ॥२९॥ मन ज्ञान अभिमानु । यां तीहींचा विषमु गुणु । तो समु होये सगुणु । परमात्मा जेथें ॥ ३० ॥ निश्चयो आधीं अंतरीं । मग होतु स्मरण करीं । तया प्रेमनामींचि शरीरीं । उपजे असंवर ॥ ३१ ॥ प्रेमवंता निश्चयहीना । निश्चयो उपजवी जाणा । नामस्मरण आगवणा । दोन्हीं करीं ॥ ३२ ॥ नित्य करितां नामस्मरण । रूपाचें न पडे विस्मरण । पडलया नामेंचि स्मरण । नित्य होये॥ ३३ ॥ नित्य रूपाचेनि अवि-

भद्गीता हे सन्मयी । अपार पै सुइचां ठाइं । जेथ अकुरलया नाहीं । संकट ज्ञाना ॥ ८७ ॥ गीता हे तुझीचि स्वानुभूती । आणि मत्प्रज्ञा तुझी होति । श्रीअवधूता स्वयज्योती । प्रकाशतासि ॥ ८८ ॥ येथ न सरे माझा अभिमानु । परतु तोही तुज अधीनु । आत्मा अव्ययो सनातनु । तु अधिष्टान तयां ॥ ८९ ॥ तरि आतां कार्ये बोलावें । कासया काहीं न बोलावें । तुजसी वेगळें न व्हावं । हेंचि पुरें ॥ ९० ॥ ऐसें कहुनि अभिवदन । श्री योगिराजाचें स्तवन । आत्माचें आत्मया स्मरण । अवधूताचें ॥ ९१ ॥ आर्तामले यथाकथन । श्री भगवद्गीतेचें व्याख्यान । यथामति विवरण । प्राकृता वाणी ॥ ९२ ॥ तरि सज्जना साधूतें । प्रार्थीन मी आदरें बहुतों स्वामी अवधान देई जो येथें । कृपा करुनि ॥ ९३ ॥ हें प्राकृत आरूप बोलणें । नव्हे विषया तुझा कारणें । परतु गीतेचे नि येणें । सर्वथें आइकावें ॥ ९४ ॥ स्वमतें चालिला आर्थु । न कलतु गीताभावार्थु । तथापि न चुके परमार्थु । ह्मणौनि आइकारें ॥ ९५ ॥ यथु केला अव्युत्पन्नें । परमार्था न मिळे बोलणें । तथापि आत्मान्वयें वचनें । घ्यावी तुह्मी ॥ ९६ ॥ आत्मान्वयो न दिसे । ऐसि वस्तु तव काहीं नसे । भावाभाव भावें आभासे । द्रष्टा दि जे ॥ ९७ ॥ येथें नेदितां अवधान । महत्वा लागेल दूषण । आतां तयाची जतन । कवणें करावी ॥ ९८ ॥ आत्ले नि स्वयंबोधें । न विचाराल अर्थरदें । तंतुमि परमानंदें । तया शब्दु तो कार्या ॥९९॥ तरि हें माझें वचन । व्यर्थचि जाले ह्मणौन । पार्थी तु असें अवधान । देऊ स्वामी ॥ २०० ॥ शक्रा शक्र सुगम । गायन जणें मानस । त्मेतें तया निद्रितास । देखौनि कीजे ॥ १ ॥ तें श्रमाचि श्रमाकारण । श्रम श्रमाचें साधन । तया श्रमाचें उपसहन । केसें करावें ॥ २ ॥ मार मारे रमणु । रमे समार्था विनयनु । तैं रमे ऐसीचा सीण । तो कवणें हरावा ॥ ३ ॥ नाकीं जन्मुनि आंधळा । तया सूर्यो देखौन शक्ला । तया प्रति त्याचिया कला । चालतीचिना ॥ ४ ॥ दर्पणीं पुरुषु दर्पणलाहीं । परि रिद्धीनु दर्पणीं काये । तथ प्रयोजनु तो नाहीं । दावावयाचा ॥ ५ ॥ षड्रस अन्न र्पचलें । रत्नें व्यों विगळिल । तें अवर्थचि विष जालें । काय कीजे ॥ ६ ॥ तैसा शास्त्रनहिर्मुखु । न रुचे तया हा विवेकु । तो सावधानु आसोनि मुखें । काये करावा ॥ ७ ॥ ह्मणोनि श्रोते जे सर्वज्ञ । तेहीं समर्थीचें काढूनि मन । येथ निरोपणी सावधान । नावेक करावें ॥ ८ ॥ हाजी समार्थाची असडता । भगे जे येणें कारणा । तें अवतरे तैंचि नम्रता । दोषु जाणावा ॥ ९ ॥ सर्वत्रा भेददर्शन । समार्थाचें उखरपण । सर्व ५ तें हें वचन । नाइकावें कां ॥ १० ॥ गुणमहिणु निर्विकारु समार्थीचा भाव निरतरु । चढे वोहंर ऐसा

# गीतार्णव.

॥ श्रीदत्तात्रयाय नमः ॥

जयजयाजी योगिराया, । पुर्णा, परब्रह्मा, अव्यया, । परमात्मा तू, आत्मया, । विश्वातीता. ॥ १ ॥ आनंदाचा तू सागर. । ज्ञानविज्ञानदिवाकर. । न कळे तुझिया पारु । स्वरूपाचा. ॥ २ ॥ अनादीची तू आदी. । सिद्धींची परम सिद्धी, । समाधीची समाधी । सार्वकाळ. ॥ ३ ॥ देवदेवाजी देवेंशा, । पुरुषोत्तमा, विश्वभासा, । परमात्मया, उदासा, । गुणातीता, ॥ ४ ॥ चैतन्यनाथा, सच्चिन्मया, । मायातीता, अद्वया, । आदिगुरु, दत्तात्रेया, । दीनोद्धारणा. ॥ ५ ॥ विश्वबीज तू सनातन. । विश्वाकारें ब्रह्म निर्गुण. । विश्वव्यापी परिपूर्ण । मायातीत. ॥६॥ भावाभाव भासों आले । ते देखोनि. जया आपुलें । नाम रूप विसरले, । तेंचि होती ? ॥७॥ तुझा करिता विचार । वेदा आत्ता श्रमु थोर. । एक तो सांगे सद्गुरु । तें रूप तुझें ॥८॥ तुझिया प्रेम पायाचें, । तेंचि तारु ससारिचें, । जया जोडे तयाचें । भाग्य परम. ॥ ९ ॥ तुझिया प्रेमाचा विसरु, । ऐसे भाग्य. मी काये करूं ? । यया नाशवताचा शेजार । पुरे जाला. ॥ १० ॥ न उपजे तुझी आठवण, । तें मुख्य त्याचें कारण. । अभक्ता दडालागून । आड करिती ॥ ११ ॥ विशिष्ट अधमासमान, । तुज हूनि एक आन, । गमे जेणें, तें ज्ञान । नरकतुल्य. ॥ १२ ॥ तुझें सगुण उपासिता । आगळी मानी निर्गुणता, । तरि ऐशिया अभक्ता । दंड न पुरती. ॥ १३ ॥ करिता तुझें पादपूजन । अभिलाषा धरी मन, । तें मी आतां वदन । कैसे अवलोकूं ? ॥ १४ ॥ हिताहितविचारणा । तुझा भजनीं आपणा । पाहिजे ह्मणें, तें दडना । योग्य जालों. ॥ १५ ॥ तुझिये जोडीवरी । जोडी पाहे तो दुसरी, । तया भक्ता शेजारीं । भक्त न बैसवे. ॥ १६ ॥ गुणाचा प्रताप आइकणें, । तेणें प्रेम पावैन, । श्रेय पाहोनि भजैन, । तें नव्हे मी दासु. ॥ १७ ॥ जोडूनिया करचरण । देवेंशीं बोले वचन, । ' अपराधी मी; मजलागून । क्षमा कीजो. ' ॥ १८ ॥ तरि मी अपराधी, मी अभक्तु, । वंचकु, स्वभावासक्तु, । अज्ञानु, अति अविरागी, स्वतंत्रु, । मर्यादे सुटला. ॥ १९ ॥ अपराधी मी हें साचार, । परि क्षमा करा ऐसें, उत्तर । बोलताचि पडले अंतर; । तुझें नव्हे ॥ २० ॥ मी

मातें तुजहूनि । प्रियु जाण जालों म्हणोनि । आतां प्रेम तें गेलें लाजोनि । पासाव मज. ॥ २१ ॥ "अपराधु क्षमा करणें" । हे तूतें आज्ञा देणें ।काये थोरपण येसणें । माझा अंगीं ? ॥ २२ ॥ अपराधु ऐसा जाणितला । जेणें भक्तियोग तुझा खंडिला, । तो मानूं मीं आपुला । मित्रु कीं वैरी ? ॥ २३ ॥मग तयाचा जो मी कर्तो। तो मातें प्रियु होता । भक्तु कैसा ? श्रीदत्ता, । तुझा द्रोही. ॥ २४ ॥ 'अपराधु क्षमा करणें,' । न बोलें हीं पापवचनें । आतां दंडुचि तो मजकारणें। प्रियु आहे. ॥ २५ ॥ भक्तीचा जो उपस्थापकु । तो दंडुचि प्रियु मातें एकु, । परि अभक्तीचा प्रेरकु । येरु नेघें. ॥ २६ ॥ अपराधु जेणें केला । तो मी वैरी आपुला; । तयाचें वदन मजला । दावूंचि नको. ॥ २७ ॥ अपराधियाचा मातें संगु । तोचि नलगो. देवा वियोगु. । तयाचा जेणें योगु । तोचि कैसा ? ॥ २८ ॥ अपराधी मी दडावा, । माझा हातीं यावा, । त्या तो नि शेषु करावा । तुझेनि बळें. ॥ २९ ॥ नाना मी तुझा अन्यायी । तैसे मनुजाला द्रोहीं । अज्ञा नाकळे काहीं । हेंचि ह्मणावें. ॥ ३० ॥ 'देवा, मी नेणें तूतें, । तुझिया भक्तियोगातें, । आता रक्षीं मनें,' । ऐसेंचि ह्मणों, ॥ ३१ ॥ तरि, मी तूतें जाणों शकेन, । तें श्रेष्ठु भक्तु होईन, । ऐसें कवणे सामर्थ्य पावैन । स्वतंत्र जाणपण ? ॥ ३२ ॥ तूतें जाणे सर्वज्ञा, । भक्तियोगु तुझी उपासना, । ऐसें मानीं, तो गणा— । माजी न शोभे. ॥ ३३ ॥ नेणें ह्मणे तोचि श्रेष्ठु,। नेणेंचि विधि उत्कृष्टु, । जाणे मनें तो धीटु, । दडावा कीं. ॥ ३४ ॥ आता नेणों मेचि असावें, । हे क्षमा करीं म्हणावें, । तें तुजशीं सर्वज्ञपण स्थापावें । आम्हीं काये ? ॥ ३५ ॥ जो तूं जेसणा जैसा, । तो तूं तेसणा तैसा. । इतराकळशीं ऐसा । भाजेचि न घडे. ॥ ३६ ॥ सर्वज्ञा तुझा जाणू । जो सर्वेश सर्वज्ञु । तो भक्तु कवणु ? । कैसा आहे ? ॥ ३७ ॥ आणि सर्वज्ञज्ञानीं अभिमानु । धरी, तो दासु अपलक्षणु, । तुजहूनि असाधारणु । भाव जयाचा. ॥ ३८ ॥ तैसा मीं का होईन ? । परी संगु तयाचा लाहेन, । तरि प्राणत्यें घेईन । प्रायश्चित्त. ॥ ३९ ॥ तुजविषयीं जो अज्ञु । अज्ञानीं धरी अभिमानु, । तोचि सेवकु निजगुणु । ऐसें आहे, ॥ ४० ॥ तरि नेणें हें क्षमा करणें, । ऐसें बोलता बोलेंगे, । श्रेष्ठ केलें जाणणें, । ऐसें होईल. ॥ ४१ ॥ मी जाणतों देवा तूतें । हें माने येका अभक्ताते, । ह्मणौनि ऐसिये मतातें । आश्रयूंचि नेघे. ॥ ४२ ॥ माझें तूं सकळ क्षेम, । माझें भाग्य तूं परम; ।

मातें, अवधूता, ब्रह्म । तूंचि साकार, ॥ ४३ ॥ ऐसी करूं विनवणी । तै श्रेष्ठ विचारूं तुजहूनि । जें येक थोर मानूनि । तें तूं ह्मणों ॥ ४४ ॥ 'तुझेनि माझें क्षेम । तुझेनि तूं परब्रह्म । तुझें नव्हे तें परम । कांहींचि नव्हे ॥ ४५ ॥ तुझेनि मी कृतकृत्यु, । तुझेनि मी समर्थु, । तुझेनि मी विख्यातु । पुरत्रयीं,' ॥ ४६ ॥ ऐसें बोलतां, दातारा, । अपराधी होईन खरा । येथ तुझिये थोरा । नाहीं भक्ती ॥ ४७ ॥ तुझें करितां स्मरण । माझें कांहीं करूं मी अनुसंधान, । तात्पर्य ठेवूं समान । कैशिया परी ! ॥ ४८ ॥ दास्य देईं, प्रेम देईं, । तुझी प्राप्ति मातें देईं, । पुढती वियोगु नाहीं, । ऐसें कीजो ॥ ४९ ॥ ऐसें करितां प्रार्थन । किती करूं स्वार्थचिंतन ! । जऱ्ही मी तुजवांचून । क्षणैक न मागों ॥ ५० ॥ जेणें सुख, जेणें हित, । तेंचि मागणें उचित; । येर नाशक समस्त । मागोनि काये ! ॥ ५१ ॥ सुरवरां जयाची शिराणी, । साधिजे तपें योगें करूनि, । तें मातें देईं, ह्मणौनि । किती स्वार्थु चिंतूं ! ॥ ५२ ॥ देवा, मी तुझा दूतु, । ऐसा भाव जें भजतु, । तें तेणेंचि अंगें स्वार्थु । नव्हे काये ! ॥ ५३ ॥ आतां जें जें मी बोलैन । तेणें अभक्तुचि होईन । आतां मौनेंचि राहीन, । ते भक्ति कायिशी ! ॥ ५४ ॥ काया वाचा मन तिन्ही । निरार्थकें जाली मौनी । असो मौनमुद्रा हे करणी । भक्ताची नव्हे ॥ ५५ ॥ आतां भक्ताआंगीं भाव । तयाचा कैसा अभिप्राय, । युक्ति स्वार्थु वाव । दोन्ही जेथें, ॥ ५६ ॥ युक्ति संप्रदाय रचणें, । स्वार्थें फळ तेथ भजणें, । ऐसें निज दासा न मनें । परम शुद्धातें ॥ ५७ ॥ निश्चयो प्रीति नामस्मरण । त्रिविध निर्मळ भजन । जयाचें, तो म्हणौन । शुद्ध म्हणितला ॥ ५८ ॥ आतां निश्चयो तोचि कैसा, । सांगिजैल जैसा तैसा; । जेणें पवित्र प्रकारु दासां । येईल कळों ॥ ५९ ॥ तुझा करितां आचारु । मोक्षु हो, अथवा संसारु, । तेथें नाहीं आदरु । माझिया मना ॥ ६० ॥ देणें मान्यता हो, अमान्यता; । अर्थु, अनर्थु हो भलता; । परंतु तुझा मार्गु तो सर्वथा । सांडणेंचि नाहीं ॥ ६१ ॥ तुजसीं समान कां थोर, । ऐसें आइकतांचि उत्तर, । यया देहावरि धार । हाणैन खड्गाची ॥ ६२ ॥ तुझी प्रशंसा आइकैन, । तेणें भक्तीं दृढ होईन, । ऐसी वासना; तीचा मन । विटाळु मानी ॥ ६३ ॥ तूं ईश्वरु अथवा नरु, । परि सर्वथा न भजें इतरु । तुझा करूनि विचारु । कवणु धर्मु मातें ! ॥ ६४ ॥ चाऱ्ही जोडती पुरुषार्थ, । अथवा जोडलें समस्त । नाशतु सुखें, परि चित्त । व्यग्र न करीं ॥ ६५ ॥ मेघ वर्षतु शिळाधारीं । तया आड कांहीं न करीं ।

तुझां न टळे निर्धारीं । भक्तियोगाचा. ॥ ६६ ॥ न धरी तरि न धरो मेदिनी, । सर्वांग पडो वन्ही, । परि हे न संडी करणी । तुझया दासत्वाची. ॥ ६७ ॥ स्त्रीपुत्रादि पदार्थ । आतांचि नाशो हें समस्त; । रोकडें शरीर येथ । पडतां दिसो. ॥ ६८ ॥ प्रलया ऐसा आघातु, । वरि पडो मेरु प्रख्यातु, । सूर्या ऐसा दीप्तु । आंगीं जळो. ॥ ६९ ॥ सागरीं बुडतांही न संडीं, । व्याघ्रामुखीं पडो उडी, । दंडु करितां कदंडी । आंग देईन. ॥ ७० ॥ महादुःखेंही न चळणें, । ऐसा तो निश्चयो म्हणणें. । आतां भाग्यप्रधानें, विघ्नें । तै जें पडती. ॥ ७१ ॥ सार्वभौम हो निर्वैर, । श्रीची संप्राप्ति अपार, । परंतु तुजहूनि इतर । तें मी न भजें. ॥ ७२ ॥ देवलोकींचा मी इंद्रु । जालों वरुणु सूर्यो चंद्रु, । परंतु भक्तियोगु तोचि थोरु । सर्वदा भजें ॥७३॥ हित जोडो तात्विक । तेंही परि नेघें; आणिक । मानिती सकल लोक, । परि ते कायि ? ॥ ७४ ॥ तुझां स्वरूपीं प्रवेशणें । तें जै जोडैल अभजनें, । तें तेंही परि मनें । आश्रयींना. ॥ ७५ ॥ भेटी प्राशील भजना । तरि तेचि तुझी मी मागेंना. । ऐक्य पावल्याही मना । भिवडीन मी. ॥ ७६ ॥ तुझिये भक्तीसाठीं । हिताहित न पाहें दृष्टी । नापेक्षीं तुझी भेटी । जरि भक्ति सुटे. ॥ ७७ ॥ बरवेंन अथवा वाइटें । निश्चयो भक्तीचा न तुटे । हाचि भाव बाह्य प्रगटे । ऐसें बोलतां ॥ ७८ ॥ अभिमानु दुणावे आंगीं । युक्ति स्वार्थ अंतरंगीं । तरी निश्चय मात्र प्रसंगीं । बोलेंना मी ॥७९॥ युक्तिस्वार्थेवांचून । येसाणिया निर्धारा कारण । कायि ? तरि प्रेम गहन । येथें हेतु. ॥८०॥ निश्चयाची ऐसी रीति । आतां प्रीति कारण ये अर्थी । तेचि बोलेन उक्ति । प्रेमामृतमयी ॥८१॥ प्रीति ह्मणजे आवडी । न सुटे रूपाची गोडी; । जीवाची चाड थोडी । देवाहून. ॥ ८२ ॥ प्राणाची करीन वोवाळणी; । गुंपलें नुगवे मन चरणीं; । अहंता ममता दोन्ही । आदरें सुटलिया. ॥ ८३ ॥ सुटणें तें मरणासमान, । प्रीतीचें ऐसें येकपण, । अपुत्रका जैसें पुत्रधन । प्राप्त होये. ॥ ८४ ॥ लोभिया जैसें धन, । रोगिया अमृतपान, । सुभक्ता प्रेम गहन । तैसें देवीं. ॥ ८५ ॥ स्त्रीपुत्रांची आसक्ति । सांडिजे जयाचिये प्रीती, । तो आपणु आपणाप्रति । प्रियु कैसा ? ॥ ८६ ॥ तोही आत्मा परि जया । जाणतां अप्रियु आत्मया । योगिराजा दत्तात्रेया । सप्रियात्वें. ॥ ८७ ॥ प्रीतीचें हेंचि लक्षण, । जें तेथूनि न सुटे वेगळें मन, । तेणें योगें जीण मरण । भलयतें हो. ॥ ८८ ॥ इंद्रियें सांडिती स्वार्था । प्रीतीचा सागरु वोसंडतां, । येका आत्मया श्रीदत्ता । धरूनियां ॥ ८९ ॥

विचारापासाव सुटे मन । युक्तायुक्त न करी ज्ञान, । मग तें देहीं संचरोन । कैसें करी ? ॥९०॥ उर्ध्वे घोर्ष प्रगर्जन, । शरीरें करी नर्तन, । तेणें आनंदें मन । बुडोनि जाय. ॥९१॥ लोकेषणा गेली पळोनि । उगाचि प्रवर्ते गायनीं, । युक्तायुक्त न मनूनि । स्तुति करी. ॥ ९२ ॥ देवा तूं माझी जननी; । जनकु; त्राता निर्वाणीं; । तुज येकावांचूनि । न स्मरें मी. ॥ ९३ ॥ देवा, तूं माझें प्राणधन; । देवा, तूं माझें जीवन; । देवा, तूं माझें ज्ञान; । ज्ञेयतत्व. ॥९४॥ देवा, तूं माझा योगु; । बाहिरंगु अंतरंगु; । तुजशीं मातें वियोगु । मरण होये. ॥९५॥ देवा, तूं माझा निसावा; । जिवाचिया अंतरजीवा, । तुझा कोठें ठेवावा । आठव पहा ? ॥९६॥ हृदयीं घातला न संटे; । विश्वाकारें तोचि उमटे; । इंद्रियद्वारा प्रगटे । बाहेर बोधु. ॥ ९७ ॥ नयन हे, लोधलेंपणें । निमिषोन्मेषांचें सांटणें । करूनि, श्रीदत्तगुणें । तन्मय झालें. ॥९८॥ प्रेमाचें स्वरूप होय; । क्लेश तेही आनंदमय । भक्ता; भक्तिविषयक कार्य । करीत असता. ॥ ९९ ॥ आनंदेंचि प्रनर्तन; । आनंदेंचि प्रगर्जन. । आनंदेंचि प्रवर्तन । सेवेचा ठायीं. ॥ १०० ॥ छेदूनि अर्पिता शिरकमल । दुःख ऐसें न वटे केवळ; । यया प्रेमानंदाचें बल । ऐसें आहे. ॥१॥ ब्रह्मानंदाची गोडी । भोगितां ययाहूनि थोडी । अद्वैतबोधु तो आवडी । सुटे जयाचिया. ॥ २ ॥ आनंदें विस्पंदे वदन, । आनंदें द्रवती नयन, । आनंदें स्पंदती प्राण, । मन उल्लसे. ॥ ३ ॥ निर्गुण ब्रह्मानंदु स्फुरे, । तो अवघेनि भेद विसरे, । मनबुद्धींद्रिय मरे । स्वरूपस्थिती. ॥ ४ ॥ आता हा प्रेमस्पंदु, । सगुणु केवळ ब्रह्मानंदु, । ययाचा होता उद्बोधु । कैसें वाटे ? ॥५॥ गुणीं गुण होती तन्मय । रूपीं रूप अभेदमय; । देवभक्तपण हें ज्ञेय । वेगळें न निवडे. ॥६॥ येथ नलगे कांहीं विसरणें; । गुणींचि आनंदु भोगणें; । निर्गुण ब्रह्मानंदु येणें । पुरे होय. ॥७॥ निरोधु तयाचें साधन, । हा होय निरोधेंचि क्षिण. । कीं, उगेचि करणगण । येथ नियमती. ॥ ८ ॥ शमदमाचा तेथ वारा, । तो येथ नाहीं अवधारा; । बाह्यांतरीं वृत्तिविकारा । प्रेमचि मारी. ॥ ९ ॥ तेथें, विसरोनि स्फुरावें, । येथ आठवेंचि विरावें । देखे आइके तें करावें । आनंदमय. ॥१०॥ तृणतुल्य स्वर्गु जेणें, । निर्गुणानंदाचें पुरे पारणें, । मोक्षातें आणी उणें । हें सगुण प्रेम. ॥ ११ ॥ शास्त्राचा नलगे विचारु, । नलगे सांख्ययोगआचारु । काय आता करावे गुरु । तद्विषयिक जे ? ॥ १२ ॥ आसन, मुद्रा आणि ध्यान, । नलगे अवरोधु साधन, । असतीच सकल गुण । ईश्वरीं मिळती. ॥ १३ ॥ असो. हा प्रेमस्पंदु । साकारु, ब्रह्मानंदु. । ययाचा हृदयीं

वेधु । जाला असतां, ॥ १४ ॥ दुर्जे कांहीं प्रिय न वटे, । थोरही थोरपणें सुटे, । सगुण निर्गुण आटे, । हेंचि होये. ॥ १५ ॥ ऐसा निश्चयो निर्धार, । ऐसा प्रेमाचा विचार । आतां ययाचा बाह्यात्कार । साधन कैसें ? ॥ १६ ॥ प्रेमवंतें निश्चयवंतें । काय करणें निरुतें ! । कां, जेणेंकरूनि पुरुषातें । होये निश्चयो प्रेम. ॥ १७ ॥ तरि तें अखंड नामस्मरण. । कैसें तयाचें लक्षण, । तेंचि येक वचन । बोलिजैल. ॥ १८ ॥ बुद्धी म्हणजे ज्ञान, । निश्चयो तो तेणें करून । श्रीदत्ते येकेवीण । येर नमने. ॥ १९ ॥ मनाचें हेंचि करणें. । प्रेमयुक्त रूपीं रमणें, तियाचि प्रवृत्ति जिणें । इंद्रियद्वारा. ॥ २० ॥ बुद्धी रूप निश्चित, । मन सुप्रेमें तद्गत, । तयाचि निष्ठा स्वस्थ । असणें अभिमानाचें. ॥ २१ ॥ निश्चयो प्रीति दोन्हीं । अभिमानें धरिलीं कवळूनि, । तोचि बोधु नामस्मरणीं । बाहेर करावा. ॥ २२ ॥ क्षीरसागराचें तरंग, । क्षीरचि तयाचें आंग, । पाणियाचे लहरिया वेग । पाणी जैसें; ॥ २३ ॥ तैसा निश्चयो प्रेम हा समरसु, । अभिमानें दाटला उल्हासु; । तेथ अधिकाधिकु तोषु । पुरु चाले. ॥ २४ ॥ तोयींचे तरंगाभास, । तेचि होती नामघोष; । लहरिया वेग विशेष । उल्हासविशेष ते. ॥ २५ ॥ निश्चयें प्रेमेंकरून । जालें जें नामस्मरण, । तयाचें अपूर्व लक्षण । तेंचि कैसें ? ॥ २६ ॥ नामाचा करितां घोषु । आठवे रूप तो विशेषु । तंव रूपीं निश्चय वासु । पूर्वीचि असे. ॥ २७ ॥ आठवाचि सरिसें मन । प्रेमयुक्त रूपीं निमग्न; । सभाग्याचें नामस्मरण । ऐसें आहे. ॥ २८ ॥ निश्चयें प्रीती नामघोषु, । तेणें अंतरींचा आत्मोल्हासु । बाहेरि पडे आवेशु । ब्रह्मानंदाचा. ॥ २९ ॥ मन, ज्ञान, अभिमानु, । या तिहींचा विषमु गुणु । तो समु होये सगुणु । परमात्मा जेथें. ॥ ३० ॥ निश्चयो आधीं अंतरीं; । प्रेमहीनु स्मरण करी, । तया प्रेम नामींचि शरीरीं । उपजे असंवर. ॥ ३१ ॥ प्रेमवंता, निश्चयहीना । निश्चयो उपजवी जाणा । नामस्मरण; आंगवणा । दोन्ही करी. ॥ ३२ ॥ नित्य करितां नामस्मरण । रूपाचें न पडे विस्मरण; । पडलया नामेंचि स्मरण । नित्य होये. ॥ ३३ ॥ नित्य रूपाचेनि स्मरणें । तेंचि आश्रयिजैल अभिमानें; । मग तो अभिमानुचि निश्चयाकारणें । कारण होईल. ॥ ३४ ॥ स्मरणीं निष्ठ अभिमानभाव, । रूपाची उठी जाणीव. । तेचि नित्यता अपूर्व । निश्चय करी. ॥ ३५ ॥ अभिमानयुक्त रमतां ज्ञान, । निश्चय होती उत्पन्न. । तेथेंचि रमवितां मन । प्रेमही उठे. ॥ ३६ ॥ ययालागीं नामस्मरण. । तें यया रूपाची आठवण; । निश्चयो प्रेम गहन । आठव-

णद्वारा. ॥३७॥ नाहीं तो निश्चयो करी, । प्रेम उपजवी शरीरीं, । नामघोषु ययापरी । श्रेष्ठु सर्वां ॥३८॥ मन. ज्ञान, अभिमानु । येकवाटूनि तिहींचा गुणु । स्मरण करी, तो सर्वज्ञु । पावे निश्चयो, प्रेम. ॥ ३९ ॥ विवेकांशु ज्ञानाचा, । प्रेमांशु मनाचा, । योगु करूनि दोहींचा । अभिमानु तो ॥ ४० ॥ प्रीती, निश्चयें नाम स्मरे, । तेणें रूप अंतरीं स्थारे. । प्रेम निश्चयो अंकुरे । क्रमेंक्रमें. ॥ ४१ ॥ उगेचि तऱ्ही स्मरण, । करावें मूर्खें साधन; । सगुण सुख सनातन । तया स्फुरे. ॥ ४२ ॥ ऐसें हें शुद्ध भजन । सहज होय जैं उत्पन्न, । तैं तें कांहीं येक प्रमाण । दासत्वमार्गें. ॥ ४३ ॥ श्रेष्ठ जाणोनि यया भजिजे; । नाहीं तो भाव आणिजे; । तैं येथेंही दोषु वाजे । सर्वथा कीं. ॥ ४४ ॥ सहज प्रेम, सहज स्मरण, । सहज निश्चयो, पावे ज्ञान, । तरि स्वार्थहीनाचें भजन । हें येक होये. ॥ ४५ ॥ आतां हें मातें न संभवे, । तरि य्यां काय, जी, करावें? । अगम्य तुझे नेणवे । भक्तांचें महिमान. ॥ ४६ ॥ तरि आता मी प्रेमहीनु, । निश्चयभावविहीनु, । नित्य नामस्मरणगुणु । नलगेचि हा. ॥ ४७ ॥ यया वेगळें कांहीं । बोलिजे तें शुद्ध नाहीं. । मौनही खोटें कहीं (?) । जें न मिळे संप्रदाया. ॥४८॥ आतां मी येक करीन, । साहूनि युक्तायुक्तपण । आलें वचन बोलैन, । भावाथिला. ॥ ४९ ॥ हृदयीं द्रष्टा सर्वज्ञु । माझिया भावाचा, जाणु; । बोलोनि नव्हे व्युत्पन्नु । बाळमतीचा. ॥ ५० ॥ भक्तिभावाचें बोलणें । असेचि आरयघाणें; । हें जाणता सर्वज्ञु जाणे । आत्मा दत्तु. ॥ ५१ ॥ जयजयाजी अमरद्रा, । जयजया स्वबोधचंद्रा, । जयजया अनिवारा, । संसारदहना. ॥ ५२ ॥ तुझिया नामाची आठवण । तें भवरोगिया अमृतपान; । सत्यें स्वरूपें अविनाशपण । प्रकटे रोकडेंची. ॥ ५३ ॥ आत्मया, पुरपती, रामा, । निजदासहृदयविश्रामा, । तुझिया गुणाची सीमा । ते कवण जाणे? ॥ ५४ ॥ सत्यानंदमया, अनंता, । दत्ता, अवधूता, अच्युता, । विश्वोदया, विश्वभरिता, । विश्वसाक्षी. ॥ ५५ ॥ विश्वंभरा तुझें सार । नाममाहात्म्य अपार, । जेणें विसावले सुरवर, । आत्मविश्रामा. ॥ ५६ ॥ देवा, तूं सुखाचें कारण; । ज्ञानबीज सनातन; । सत्यस्वरूप निर्गुण । गुणा आलें. ॥ ५७ ॥ मुक्तिहस्ता, भुक्तिपादा, । अवधूता, परमानंदा, । गुरुमूर्ति, अगाधा, । गगनोपमा. ॥ ५८ ॥ गायन तुझिया गुणांचें । साधन तें भोगामोक्षांचें; । परंतु विहित कार्य आमुचें । स्वाभाविक. ॥ ५९ ॥ लक्षितां गुणबुद्धिपारु । न पविजे नामरूप-

निर्धारु; । आत्मा तूं गुणीं अगोचरु । प्रकाशसीचिना. ॥ ६० ॥ असंगपणा-चेनि अंगें । गगनाचिया आंगा नलगे; । भावाभाव हे अवघे । भावेंचि खोटती. ॥६१॥ सेवनें चिरे भेदु, । जयाचा ऐसा बोधु. । संबंधाचरि संबंधु । संपादेचिना. ॥ ६२ ॥ तुझी माया हे उल्लंघिता, । अवधारीं, तव प्रिया भक्ता । मोपान; येरा सर्वथा । मोही अज्ञानें. ॥ ६३ ॥ मायानिवर्तका, मापती, । माझी अवधारावी विनति, । आर्ती पुरविता आर्ती । भुकेली जी. ॥ ६४ ॥ जाणत जाणत जाणणें, । जाणों जाणों जाणों म्हणे, । जाणिवेचेनि विशुद्ध-पणें । वारोचिना. ॥ ६५ ॥ जागृती जागृती जागणें, । जालें तें नपडे उणें, । देवा, फिटो पारणें । डोळ्यांचें. ॥६६॥ डोळां भरलें रूपस; । रूप तें बुद्धी उदास; । जाणतां जाणीव निःशेष । पागुळ करी, ॥ ६७ ॥ ऐसा कैं मी पाहीन ? । जेथ न पुरतो हे नयन, । हारपे गगनीं गगन । गुणातीती ॥६८॥ लागलया आंगा आंगें । नुरे नुरवी रूप अवघें; । योगा वियोगा जोगें । नव्हे रूप. ॥६९॥ पाहतां पाहणें आटे, । भेटतां भेटी न भेटे; । न भेटत भेटणें घटे, । आत्मया, तुझें. ॥७०॥ ऐसा तूं आत्मा, परमात्मा, । ब्रह्म, अरूपा, अनामा । श्रीअवधूता, शुद्ध श्यामा, । कृपालुवा. ॥७१॥ तुझिया रूपाचें दर्शन । तेंचि आत्म-तत्वसंवेदन, । सगुणनिर्गुणब्रह्मज्ञान । गुणातीता. ॥७२॥ तुझेनि श्रीपादसेवनें । निश्चा मानिली मनें, । जेथ भेदबुद्धीचीं किरणें । पावतीचिना. ॥ ७३ ॥ प्रेम अंकुरलें हृदयीं । तयानें माझा देहीं । पैसु न पुरे मग पायीं । ठेविलें तें ॥ ७४ ॥ आत्मया, हृदयस्था, गोपति । सन्मया, तुझी जे दीप्ति । चिन्मयी कळा ज्योति, । प्रकाशली. ॥ ७५ ॥ ते प्रकाश्यानें नुरवीत, । प्रकाशु प्रकाशें खात, । प्रकाशली अद्भुत । अधिष्ठानाकारें. ॥ ७६ ॥ तिया मी असतां प्रकाशला, । मी तूं हा भाव विसरला, । सहज संवित्तिभूतला; । उमजेचिना. ॥ ७७ ॥ तेणें स्वप्रकाशसुदिनें । जागृतें जालीं करणें; । न धरवे मना मन-पणें. । प्रकाशु तो. ॥ ७८ ॥ सूर्यें सूर्यकांतु स्पर्शिला, । तया नाव्हादवे प्रकाशु आपुला; । मग तदधीनु निज कला । दावूंचि लागे. ॥ ७९ ॥ तैसे माझिये बुद्धीते । तुवां स्पर्शिलें स्वमतें; । आता तुज अधीनें वर्तते । लोपताचि नये. ॥ ८० ॥ पृथ्वीचां ठायीं हारपलें । तें जीवनें वटबीज स्पर्शिलें, । आता तें हारपे कां ? पहिलें । आपण नव्हे. ॥ ८१ ॥ पालवापुढें पालव । घेऊंचि लागले धावं; । मग आपुली मर्यादा तंव । झाड विस्तारलें. ॥ ८२ ॥ तैसें हें माझें ज्ञान । विषयभूमिके होतें लीन, । तेथें तुझी कृपा जीवन । पावले ते ॥८३॥

आतां कैसें आच्छादिल ? । आतां कैसें न स्फुरैल ? । यालागीं बुद्धीचें बेळ । अनिवार जालें. ॥ ८४ ॥ अंकुरल्या तया ज्ञाना । पुरेसा पैसु दिसेना । अनंतां ब्रह्मांडांची रचना । मोडों लागली. ॥ ८५ ॥ कार्यकारणाचां संकटीं । न संटे याची वाढि मोठी; । ज्ञान ये मायाकपाटीं । साटोचिना. ॥ ८६ ॥ भगवद्गीता हे सन्मयी। अपारु पैम्‌ ईचां ठायीं । जेथ अंकुरल्या नाहीं । संकट ज्ञाना. ॥८७॥ गीता हे तुझीचि स्वानुभूति; । आणि मन्प्रज्ञा तुझी ज्ञप्ति; । श्रीअवधूता, स्वयंज्योति, । प्रकाशतासि. ॥ ८८ ॥ येथ न सरे माझा अभिमानु, । परंतु तोही तुज आधीनु; । आत्मा अव्ययो सनातनु । तूं अधिष्ठान तया. ॥ ८९ ॥ तरि आतां कयि बोलावें ? । कासया कांहीं न बोलावें ? । तुजशीं वेगळें न व्हावें । हेंचि पुरे. ॥ ९० ॥ ऐसें करूनि अभिवंदन, । श्रीयोगिराजाचें स्तवन, । आत्मत्वें आभया स्मरण । अवधूताचें, ॥ ९१ ॥ आरंभिलें ग्रंथकथन, । श्रीभगवद्गीतेचें व्याख्यान, । यथामति विवरण । प्राकृता वाणी. ॥९२॥ तरि सज्जना साधूनें । प्रार्थीन मी आदरें बहुतें, । स्वामी, अवधान देईजो यथें । कृपा करूनि. ॥ ९३ ॥ हें प्राकृत आरूप बोलणें । नव्हे विषयो तुह्मांकारणें; । परंतु गीतेचेंनि येणें । संबंधें आइकावें. ॥ ९४ ॥ स्वमति चालिला अर्थु । न कळतु गीताभावार्थु; । तथापि न चुके परमार्थु । म्हणौनि आइकावें. ॥ ९५ ॥ ग्रंथु केला अव्युत्पन्नें, । परमार्थो न मिळे बोलणें, । तथापि आत्मान्वयें वचनें । घ्यावीं तुम्हीं. ॥ ९६ ॥ आत्मान्वयो न दिसे । ऐशी वस्तु तंव कांहीं नसे; । भावाभावभावें आभासे । द्रष्टाचि जै. ॥ ९७ ॥ येथें नेदितां अवधान । महत्वा लागैल दूषण; । आतां तयाची जतन । कवणें करावी ? ॥ ९८ ॥ आपुलेनि स्वयंबोधें । न विचाराल अर्थुपदें । संतृप्ति परमानंदें । तयां शब्दु तो कायी ? ॥ ९९ ॥ तरि हें माझें वचन । व्यर्थचि जालें म्हणौन । प्रार्थीतु असें; अवधान । देणें, स्वामी. ॥ १०० ॥ शंकरा शंकर, सुरस । गायन, जेणें मानस । रमे, तें तया निद्रितास । देखूनि कीजे, ॥ १ ॥ तैं श्रमुचि श्रमाकारण; । श्रमु श्रमाचें साधन; । तया श्रमाचें उपसहन । कैसें करावें ? ॥ २ ॥ मारमारें रमणु । रमे समाधी त्रिनयनु; । तैं रंभे ऐशीचा शीणु । तो कवणें हरावा ? ॥३॥ ना, कीं जन्मूनि आंधळा । तया सूर्यो देखोनि शंकला, । तयाप्रति त्याचिया कळा । चालतीचिना. ॥ ४ ॥ दर्पणीं पुरुषु दर्प लाही; । परि शिरहीनु दर्पोनि कायी ? । तेथ प्रयोजनु तो नाहीं । दावावयाचा. ॥ ५ ॥ षड्रस अन्न प्राशिलें, । रसने

ज्वरें धिटाळिलें, । तें अवघेंचि विष जालें; । काय कीजे ? ॥ ६ ॥ तैसा शास्त्रबहिर्मुखु । न रुचे तया हा विवेकु; । तो सावधानु असोनि मूर्खु । काये करावा ! ॥७॥ म्हणौनि श्रोते जे सर्वज्ञ । तेहीं समाधीचें काढून मन, । येथ निरोपणीं सावधान । नाविक करावें. ॥८॥ हां जी, समाधीची अखंडता। भंगे जें येणेंकरितां, । तें अखंडतेतेंचि तत्वतां । दोषु जाणावा. ॥ ९ ॥ सर्वत्राभेददर्शन, । समाधीचें अखंडपण । सर्वदा तें हें वचन । नाइकावें कां ? ॥ १० ॥ गुणसहितु निर्विकारु । समाधीचा भाव निरंतरु; । चढे वोहटे ऐसा पूरु । सागराचा नव्हे. ॥ ११ ॥ दुरूनि आलिया मेघधारा । आंगीचिया लता समग्रा । स्वरूपचि जैसें सागरा, । तैसी समाधि कीं. ॥१२॥ तरी हें झणें अव्हेराल । आणि उपेगाही तुम्हां येईल; । येथिंचें बोलणें सखोल । विचारा पां. ॥ १३ ॥ इतुलेंही बोलणें जाइल, । तुमचें चित्त न मनील, । तरी माझें काये चालेल । केलें आतां ! ॥ १४ ॥ समर्थ उपेक्षा केली, । तो काये भीड धरी बोलीं ? । आतां जोडलां करकमळीं । नमस्कारु तयां. ॥ १५ ॥ मीचि मातें श्रोता, । मीचि मातें वक्ता, । मननरूपें हे गीता । विचारितु असें. ॥ १६ ॥ श्रीअवधूताचेनि स्मरणें । बोधला अर्थु स्वानुसंधानें; । तो आत्मा बुद्धी बोधणें । आपुलिया मना. ॥ १७ ॥ ऐसा विचारु करितां । मीचि श्रोता आणि वक्ता, । आरंभीत असें गीता, । म्हणे दिगंबरानुचरु. ॥ १८ ॥ न पाहें श्रोतयांचें वदन, । न करी भाष्याचरें विवरण, । स्वस्वानुभवें हें मन । न म्हणौनि संपादीं. ॥ १९ ॥ आइकैल तेणें आइकावें; । मानील तेणें घ्यावें; । नावडे तेणें नेघावें । दोहीं श्रवणीं. ॥ २० ॥ स्वसंप्रदायिक जे योगी । यया मननाचे विभागी, । टीका हे तयाचि जोगी, । तेहीं आइकावी. ॥२१ ॥ स्वानुभवचि येथिंचें प्रमाण; । स्वानुभव हेंचि साधन; । अन्यत्र शास्त्रश्रवण; । तैसें हें नव्हे.॥२२॥ प्राकृत म्हणौनि दूषिती, । तेचि यया ज्ञाना वंचती; । भाषाचि 'केवळ भजती, । ते मूर्ख कीं ना. ॥ २३ ॥ हातीं देतां नवरत्नें । मन्हाटेन 'बोलें नेघेणें । आतां हानी तयाकारणें । ते दूरि नसे. ॥ २४ ॥ संस्कृतें बोलिलें सेवणें, । तेंचि सांडावें प्राकृत वचनें। ऐसियां मूर्खां मुंडणें । किती आतां ! ॥ २५ ॥ असो आतां प्रळयपण. । 'येथूनि गीतेचें व्याख्यान. । मागां कथेचें अनुसंधान' । तेंचि कैसें ! ॥ २६ ॥ पुराणांमाजी अपूर्व । भारत, भजती सर्व; । तयामाजीं आदिपर्व । तेंचि प्रथम. ॥ २७ ॥ तया आदिपर्वाचां अर्थी । कौरवां पांड-

यांची उत्पत्ति, । विद्याअभ्यासु, अंतीं । राज्याचें पाळण. ॥ २८ ॥ ऐसें असता वर्तलें, । सभे कौरव, पांडव, मीनले, । द्यूतकर्म खेळिनले, । ते सभापर्वी कथा. ॥ २९ ॥ पांडवीं राज्य हारविलें; । द्रुपदीतें कौरवीं जिंकिलें; । तये क्षणीं रक्षिलें । तीतें वासुदेवें. ॥ ३० ॥ अरण्यपर्वी वनवासु । पांडवीं अनुभविला त्रासु; । तोचि कथाविशेषु । संपादिला असे. ॥ ३१ ॥ नष्टचर्य विराटपर्वी; । रूपें पालटिलीं अघवीं; । अंतीं रूपें पांडवीं । प्रकटें केलीं. ॥ ३२ ॥ युद्धाची करूनि विचारणा । कौरव पांडव आले रणा. । उद्योगपर्वी विवंचना । संपादली हे. ॥ ३३ ॥ आतां भीष्मपर्व सावें; । कौरवां पांडवां युद्ध होआवें, । कुरुक्षेत्रीं, अवघे । मीनले असतां. ॥ ३४ ॥ वासुदेव भगवंतु, । तया पराशराचा सुतु, । तेणेंसीं तो कौरवनाथु । बोलता जाला. ॥ ३५ ॥ धृतराष्ट्र ह्मणे, ' वेदव्यासा, । तूं प्रकाशु आमुचिया वंशा; । तुजचि येकाचा भरंवसा । आहे आम्हां. ॥ ३६ ॥ तरी संकट मानिलें जीवें, । तें तुजवीण कवणा पुसावें ! । तरी विनतिये चित्त द्यावें । कृपा करूनि. ॥ ३७ ॥ यया राज्याचेनि अभिलापें । पांडव आले द्वेषें. । माझे पुत्र आवेशें । चालिले तयांवरी. ॥ ३८ ॥ तिये रणभूमीचां ठायीं, । दोघां युद्ध होतां समयीं, । वर्तैल जें जें अपूर्व कांहीं; । जिणें मरणें; ॥ ३९ ॥ भयाभय, जयाजय, । निपजैल जें जें कार्य, । तें यथार्थ भावें ज्ञेय । मी जाणों अपेक्षीं. ॥ ४० ॥ जये क्षणीं जें संभवे, । तें तयेचि क्षणीं मातें कळावें, । ऐशी अपेक्षा घेतली जीवें, । पुरवावी ते. ' ॥ ४१ ॥ इतुलें आइकोनि बोलणें । तेणें पराशरनंदनें । तया धृतराष्ट्राकारणें । आश्वासिलें. ॥ ४२ ॥ ' राया, अवधारीं वचन; । तुतें जेणें वर्तमान । कळे, तोचि जाण । उपाव असे. ॥४३॥ दूरदर्शन, दूरश्रवण, । यया संजयातें मी देईन. । अतीतानागत वर्तमान । करीन कळे असें. ॥ ४४ ॥ येणें तुजचिपाशीं असावें; । ययातेंचि तुवां पुसावें; । माझेन प्रसादें सांगावें । संजयें सर्व. ' ॥४५॥ ऐसें बोलोनियां ठेला. । व्यासें संजयो अनुग्रहिला. । तो आइकों देखों लागला । दूरील सर्व. ॥ ४६ ॥ अंधु होता जये स्थानीं । तेथें संजयातें ठेवूनि, । श्रीवेदव्यासु तेथूनि । निघता जाला. ॥ ४७ ॥ मग, तो संजयो सांगता; । धृतराष्ट्र तया पुसता; । तेथें विस्तारली कथा । तेचि कैसी ? ॥४८॥

धृतराष्ट्र उवाच

धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।
मामकाः पांडवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥

पुत्रमोहें विमोहितु, । चिंतासागरीं तरतु बुडतु, । धृतराष्ट्र संदेहग्रस्तु । बोलता जाला. ।। ४९ ।।

हें संजयें

धृतराष्ट्र बोले संजया । मातें नुलंघे वैष्णवी माया, । ह्मणौनि उपजलें पुसावया । निरोपण करीं. ।। ५० ।।

कुरुक्षेत्रे

आम्हीं आणि पंडू जाण । हे जयाचें धर्मसंतान, । कुरु ऐसें अभिधान । तयां रायाचें ।। ५१ ।। तया कुरूचें पवित्र, । तेंचि जाण कुरुक्षेत्र. । महत्व तयाचें अपार । तेंचि कैसें ! ।। ५२ ।।

धर्मक्षेत्रे

जयें क्षेत्रीं द्रव्य पेरणें, । तें उगवें अपारपणें. । उत्तम दानाकारणें । स्थान जें कां. ।। ५३ ।। जेथें देइजे येक गुणा । तें उपतिष्ठे सत्वगुणां । अनुसार जाण सहस्र गुणा । दातयांसि ।। ५४ ।। बळीसमानु नाहीं दाता, । वामनासमानु जैसा मागता, । तैसा कुरुक्षेत्रा-परुता । नसे धर्मठाव. ।। ५५ ।। दान देइजे सत्पात्रीं । धर्मरूपें कुरुक्षेत्रीं, । तें अनंत गुणा, अवधारीं, । फळों लागे. ।। ५६ ।। सहज हातींचें पडलें । तेंचि ब्रह्मार्पण केलें, । पुढती नेचिजे सांपडलें । हिरण्यादिक; ।। ५७ ।। तें धर्मरूप होये दान; । वाया नवचे जेथ धन, । तेंचि धर्मरूप जाण । कुरुक्षेत्र जें. ।। ५८ ।। ना, धर्मक्षयापासाव तारी । तें धर्मक्षेत्र, अवधारीं; । उगेंचि वसिजे तरी । पुण्य थोर. ।।५९।। धर्मरूप, धर्मस्थान, । कुरुक्षेत्र, संजया जाण. । तये क्षेत्रीं दारुण । मांडलें असे. ।। ६० ।।

युयुत्सवः

धरूनि युद्धाची वासना । आपुलालिया आंगवणा । न संठे प्रतापु मना- । माझारी जयां. ।। ६१ ।।

समवेताः

ऐसे होत्साते मीनले; । येक येकां प्रमुख मांडले । ते कवण कवण बोलिले । पाहिजती, गा. ।। ६२ ।।

मामकाः

तरी माझे पुत्र आइक । जे कीं दुर्योधनादिक, । येर कौरव सकळैक, । तयां पाठिराखे. ।। ६३ ।।

पांडवाश्चैव

ययांसीं वैरभावें । पंडूचे नंदन अघवे । धर्ममुख्य जाणावे । पांचही जे.॥६४॥ येकमेकां वैरभावें । मीनले कुरुक्षेत्रीं अघवे. । पुसों घेतलें जीवें । तयांचें क्षेम. ॥ ६५ ॥

किमकुर्वत

तरी ते काय करित असती, । हें सांगावें तुवां मजप्रति. । आर्त माझ्या चित्तीं । दिवा रात्रौ. ॥ ६६ ॥ न कळत तयांचें वर्तमान, । स्थिर न बैसे माझें मन; । प्रिय न वाटे उदक अन्न । चिंतेकरितां. ॥६७॥ चिंता पुरुषासें बंधन; । चिंता जीताचि मरण; । चिंता सुखाचें छेदन; । दुःखदाती. ॥६८॥ चिंता हृदयींचा रोगु; । चिंता नाशी परम येगु; । आंगीं लागला सुखभोगु । भोगूं नेदी.॥६९॥ इंद्रियांतें करी शोषन; । देहानाट नये मन; । चिंता भ्रमवी थन; । नेदी विश्रांति.॥७०॥ चिंता हृदयींचा अंधकारु; । चिंता हा कृष्णु विखारु; । चिंता नाशी तोचि गुरु, । संसारत्राता. ॥ ७१ ॥ बाह्यांतरीं व्याकुळता । पुरुषा आणी चिंता. । चिंतासागरीं बुडतां । दुजें न पवे. ॥ ७२ ॥ दैन्य घडवी वदन; । तटस्थ राहती करचरण; । निमिषोन्मेषही नयन । विसरोनि जाती. ॥ ७३ ॥ कार्यातें सांडूनि करणें । उगींचि राहती जडपणें; । न स्फुरती विषयज्ञानें । चिंतेकरितां. ॥ ७४ ॥ भक्षितां न कळे अन्न; । न कळे बोल्ला वचन; । आइकतचि दोन्ही श्रवण । बधिर होती. ॥ ७५ ॥ आगीं आदळलेंही न कळे, । सुख दुःख चिंताकाळें; । मन इंद्रियां न मिळे; । इंद्रियें अर्थी.॥७६॥ आंगा खुपे शेज; । गंधु न कळे जाणिज; । डोळां देखिलें मनुज, । बोळखेना. ॥ ७७ ॥ आगीवीण चिंता जाळी; । सुखांयु अवघा गिळी; । चिंते ऐसें भूमंडळीं । दुष्ट नाहीं. ॥ ७८ ॥ ऐशी चिंता प्रवर्तली, । माझ्या हृदयीं बैसली, । दूरी नव्हे काहीं केली, । काय करणें? ॥ ७९ ॥ तरी तूं मित्रु, प्राणसखा, । बापा, संजया, आइकें कां, । छेदूनि माझी हे शंका । चिंता हरीं. ॥ ८० ॥

संजय उवाच

दृष्ट्वा तु पांडवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।
आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥

इतुलें आइकोनि बोलणें । संजयो तो काये म्हणे, । ते कथा श्रवण करणें । श्रोतां सर्वज्ञीं. ॥ ८१ ॥ संजयो म्हणे गा भूपती, । करितासि

चिता जये अर्थी। तोचि वृत्तांतु तुजप्रति। सांगिजैल. ॥ ८२ ॥ चित्त करूनि सावधान। समूळ आयकें कथन.। कौरवीं पांडवीं रण। शोभलें असतां, ॥ ८३ ॥

तदा

तेणें काळें तये रणीं। मांडले असतां मांडणी,। विचारूनि आपुले मनीं परदळें अवलोकी ॥ ८४ ॥

दुर्योधनो राजा.

कौरव राजा, दुर्योधनु,। जो कीं तुझा नंदनु,। आरिवर्गपंचाननु,। प्रतापिया. ॥८५॥ तंव तेथे वर्तलें कैसें। तेंचि आतां परियेसें;। सांगिजैल उल्लासें। मनाचेनि. ॥ ८६ ॥

पांडवानीकं

पांडवसैन्य अपार। दृष्टी पडिलें समोर;। तें पैं कैसें समग्र। तेणें काळें!॥८७॥

व्यूढं

दळ तंव तें असंख्यात;। रचने रचलें समस्त;। पवना न फुटे तेथ-। माजूनि जावया. ॥ ८८ ॥ मेघांचि जैशी गगनीं। निबिड दाटे मांडणी,। तैसें उंचावलें रणीं। दिसे पांडवसैन्य. ॥ ८९ ॥ अनेकत्व येकवाटलें,। मग तें अखंड जालें,। सैन्य रचने आलें,। फुटेचिना; ॥ ९० ॥ ऐशिया निबिडा, निकटातें,। राया, अवधारीं निरुतें। रचल्या पांडवसैन्यातें। तेणें काळें. ॥ ९१ ॥

दृष्ट्वा तु

निर्धारें देखोनि नयनीं। दचकला सांता मनीं,। दुर्योधनु तो तेथूनि। काय करिता जाला. ॥ ९२ ॥

आचार्यमुपसंगम्य

द्रोणाचार्यो विद्यागुरु,। कौरवमान्यु, प्रवरु,। तयाप्रति सत्वरु। जाऊनियां ॥ ९३ ॥

वचनमब्रवीत्

बोलता जाला वचन। अत्यंतें आश्चर्यंकरून.। कांहीं धैर्यापासाव मन। चळलें तयाचें. ॥ ९४ ॥ अधैर्यवंताचें बोलणें,। वैरियाचें बल वर्णणें,। क्षणक्षणां अवलोकणें,। भयस्या बुद्धी. ॥ ९५ ॥ सैन्याचा अनुमानु कीजे,। युद्धाची त्वरा सांडिजे,। विचारीं मन

घालिजे, । परदळ देखोनि. ॥ ९६ ॥ हृदयींचें धैर्य सुटे । तें राखिजे वाचेचेनि नेटें, । अभयकाराचा प्रगटे । उगाचि शब्दु. ॥ ९७ ॥ बोलोनि धैर्य दाखवणें, । दाखवूनि येरा उपजवणें, । नाहीं तो पदार्थु आणणें, । ऐसें होये. ॥ ९८ ॥ वर्णिजे परदळाची रचना, । आंगवण तुळिजे आंगवणा, । ध्यानचि लागे नयना, । तें धैर्य नाहीं. ॥ ९९ ॥ स्वेद कंप देहीं उपजती, । न साहे दुजयाची उक्ति, । भय दाविता चित्तीं । भयाचि उपजे. ॥३००॥ अभयें वाटे अभय; । भयें वाटे सत्य भय । परवचनें; तै धैर्य । जाणावें सुटलें. ॥ १ ॥ बहुतांशीं निश्चयो करणें, । न पुसत परबळ सांगणें, । धैर्यापासाव सुटणें, । तें ऐसें आहे. ॥ २ ॥ कांतीतें सांडी वदन; । हृदयीं स्पंदती प्राण; । वागविले तैसे करचरण । वागतीचिना; ॥३॥ मागें पुढें पाहों लागे; । येकाचा आधारु मागे; । तैं धैर्य सांडिलें अंगें । ऐसें जाणावें. ॥४॥ उगाचि वाटे त्रासु; । कांहीं नवटे संतोषु; । निःशेषु होय उल्लासु । धैर्येंवीण. ॥ ५ ॥ धैर्याचा जाण, बोहटीं । साम्याच्या येती गोष्टी; । पुरुषार्थु कपाटीं । पडोनि जाये. ॥ ६ ॥ फारही, थोडकें दिसे । आपुलें बळ, परियेसें; । आणि परबळ आवेशें । पावलें गमे. ॥ ७ ॥ ऐशीं अधैर्याचीं लक्षणें । अशूरु तो येकु जाणे. । येरा अनुभवाकारणें । नसे कांहीं. ॥ ८ ॥ तैसें जालें दुर्योधना । देखोनि पांडवांची सेना, । तो आश्चर्यवंतु मना । माजूनी जाला. ॥ ९ ॥ मग द्रोणाचार्याप्रति । परसैन्याची महंती । आपण होऊन भूपति; । राजा बोलिला. ॥ १० ॥ तेचि कैसें वचन । 'राया, देई अवधान. । सांगिजैल येथून ', सजयो म्हणे. ॥ ११ ॥ जें वचन आइकतां । करावीचि नलगे चिंता, । परंतु तुझा मोहो ममता । विचारु नेधे. ॥ १२ ॥

दुर्योधन उवाच

पश्यैतां पांडुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।
व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥

हे आचार्य

सन्मुख उभा राहोनि, । अहो जी आचार्या, म्हणोनि । दुर्योधनु तो वचनीं । बोलता जाला. ॥ १३ ॥

एताम्

धर्मु तो अवधेयां वांडेलु; । अर्जुनु, धनुर्वाडा कुशलु; । भीमसेनु अति बळु । प्रतिमागृन्यु. ॥ १४ ॥ नकुल सहदेव धाकुले । परंतु आंगवणा असती

आगळे । हे पांडूचे पुत्र कथिले । पांचही जण. ॥ १५ ॥ राज्याचेनि अभिलाषें । रणा आले रोषावेशें । द्रोणाचार्या, परियसें । ययां वैरियांची ॥ १६ ॥

चमूं पश्य ॥

सेना पाहे असंवर. । आतां ते कैशी, आईकें उत्तर, । मतें पाहतां साचार । दिसौ आली. ॥ १७॥

महतीम्

रण पांगलें अपार, । बळवंतचि दिसती समग्र, । रणीं न टळती जुंझार, । ऐसें वाटे. ॥ १८ ॥ पायीं तोडर ब्रीदावळी, । वारू हिंसु करिती अंत्राळीं, । नेणों शब्दें टाळीं । वैसों आली. ॥ १९ ॥ दणदणा वाजे धरणी, । हृदय थरारी तेणेंकरूनि, । उलंडे नाडीं मेदिनी, । ऐसें वाटे. ॥ २० ॥ गज, रथ, वारू, वीर, । चतुरंग सैन्य अपार. । नादें कोंदाटलें अंबर, । शब्द न कळती. ॥ २१ ॥ दणदणा धांवे पायदळ; । वारुवाचे वाजती तळ; । घडघडाटें केवळ । शब्द रथांचे. ॥ २२ ॥ नाग गर्जती सत्राणें, । वीरांचीं होती गर्जनें, । ऐसे ते शब्द गगनें, । सांटतीचिना. ॥ २३ ॥ धुळोरा उठिला गगनीं, । सूर्यो लोपला तेणेंकरूनि, । तो पवनें हाला येऊनि । आम्हांवरि पडे. ॥ २४ ॥ प्रळयकाळींचे जळधर । तैसें दळ एकत्र, । हें देखोनि अंतर । धैर्य सोडी. ॥ २५ ॥ दुरूनि पहावें दृष्टी । तंव भय प्रवेशे पोटीं; । सहसा न पडावी गांठी, । ऐसें वाटे. ॥ २६ ॥ येथेंचि आम्हीं रहावें, । तेथेंचि तेहीं थोकावें, । ऐसें घटे तैं बरवें; । परि घडावें कीं ? ॥ २७ ॥ असंवर बळाची उकळी; । वारू न थरती भूमंडळीं; । योद्धे आंगवण आगळी । बोलती बहुसाल. ॥ २८ ॥ आम्हां सन्मूख चालतां । नाहीं भय आणि चिंता. । मुखावरि लक्ष्मी समस्ता । शोभती असे. ॥२९॥ नारायणु जया सारथी । काय वर्णूं तयाची महंती ? । आम्ही शिष्य; ते शोभती । गुरू समान. ॥ ३० ॥ येका केशवाचेनि बळें । व्यापिलीं काये तयांचीं स्थूळें । ब्रह्मांडा ऐशीं विशाळें । उलंडिती ते. ॥ ३१ ॥ गजाचिया थाटांवरि । सिंह चालती जया परी, । तैसे हे आमुचे वैरी । आम्हांवरि आले. ॥३२॥ शस्त्रांपासाव तेज तळपे । तें देखोनि, देखणें दिपे, । रविबिंब हरपे, । तेणें प्रकारें. ॥३३॥ उंचें भूमिके राहवले । उघडूनि वरि चालिले, । क्षणेकु असती वेगळे, । तंवचि बरें. ॥ ३४ ॥

तव शिष्येण.

दळपयी येथ पाहतां, । तुझा शिष्यु तो सर्वथा; । कवणु म्हणशील, तरि आतां । सांगिजैल. ॥ ३५ ॥

द्रुपदपुत्रेण

जो राया द्रुपदाचा नंदनु, । नामें विख्यातु धृष्टद्युम्नु, । तेणे यये सैन्यीं गुणु । आपुला दाविला. ॥ ३६ ॥

व्यूढां

चतुरंग पांडवाची सेना । तिची केली रचना. । आता तो कैसा दळवैपणा?। ऐसें जें पुसाल, ॥ ३७ ॥

धीमता

तरि कुशलत्वाची जो खाणी, । विवेकाची सर्व करणी, । संग्रामविषयीं ज्ञानी। दुसरा नाहीं; ॥ ३८ ॥ भूमिका जाणोनि ते साधिली, । दळाची मांडणी मांडिली, । पवनीं न फुटे फळी, । ऐसें केलें. ॥ ३९ ॥ थोंगीं थोंगीं इतर । राजे ,जे तयाचे भार । आमुतें लक्षूनि समोर । उभे केले. ॥ ४० ॥ उभय भारांचां संकटीं । रीत्रु करूनि पाहिजे दृष्टी, । तंव तिये संधीचां शेवटीं । मध्यें भारु. ॥ ४१ ॥ फळी फोडूनि जेणें जावें, । तेणें खोळेंसिचि पडावें, । मागुतें परतोनि न यावें, । ऐसें केलें. ॥ ४२ ॥ आणि पुढीलु मागें जाला । तो मागिलीमागूनि हाला; । ऐशी अपूर्व कळा । भाररचनेची. ॥ ४३ ॥ ऐसा फांकूनि येरु भारु, । मध्यें स्थापरिला राजभारु, । तेथींचिये रचनेचा प्रकारु। तो काये बोलावा ? ॥ ४४ ॥ पुढें तळप ते वारुवांचे । दाविती वेग अश्वाचे;। शब्द बोलती पैंजेचे; । उपजविती आवेग. ॥ ४५ ॥ तेहीं फळीतेंचि काढावें, । परावें दळ फोडावें, । युद्ध नेऊनि घालावें, । मागिलावरि. ॥ ४६ ॥ तव मागिल कैशी रचना । आचार्यें आणावी मना. । बापु ! बापु ! गाहणा। दळवै तो. ॥ ४७ ॥ हस्ती थावरूनियां विशाळ । मध्यें मध्यें पायदळ; । येकें येकातें बळ, । ऐसें केलें. ॥ ४८ ॥ गजदळा रक्षण पायाचें, । पायदळा दुर्ग गजाचें, । ऐसें मन युद्धाचें । आदरिलें तेहीं. ॥ ४९ ॥ जंव वरि नेहेटु पडे, । तंव ऐसेंचि युद्ध हें गाढें. । मग गज गजां सोंडादडें । पेलित असता, ॥ ५० ॥ पायदळा मागिलाचा आधारु; । गजांमागें हयभारु; । तोचि राके आंवरू । भंगलिया संग्रामा. ॥ ५१ ॥ अश्वारूढ वीर टणक । पाठोशीं घालूनि तेहीं लोक, । गजां आगेंचि प्रमुख । चालावें परदळ. ॥ ५२ ॥

अश्वगती युद्ध करितां । गजगति राहिलिया समस्ता. । महा घोर युद्ध करितां । न टळावें मावारें. ॥ ५३ ॥ मुद्गल, तोमर, फरश, । खड्गाचे हाणिती अवश, । गदायुद्ध अस्मसास । ऐसें प्रवर्ततां, ॥ ५४ ॥ राहिलिया अश्वगती; । वीर वीरां भिडती, । नेटांचे पायां येती । सत्ववंत. ॥ ५५ ॥ भंगाळेया अश्वदळा आवारु । मागें रथांचा असे भारु. । समस्तु भंगळा परिवारु । तेथें राहे. ॥ ५६ ॥ मग शस्त्रास्त्रयोगें प्रवीण, । प्रेरू जाणती बाण, । विद्यामंत्र-आंगवण । येणेंयोगें. ॥ ५७ ॥ ऐशी हे दळाची रचना । सर्वथा न कळे आना. । तुझा शिष्यु द्रोणा । म्हणोनि भला. ॥ ५८ ॥ मातें दृष्टी पाहतां, । दुर्गम तंव माने चित्ता, । परंतु येक आतां । विनवीतु असें. ॥ ५९ ॥ तुवां पाहवें स्वयें दृष्टी, । गोष्टी जाणवैल खरी, खोटी; । बुद्धि आठवैल ते पोटीं । आपुलांचि राखावी. ॥ ६० ॥ आधीं दृष्टी अवलोकावें, । मग विचारेंही पाहवें, । टिके तेंचि करावें, । येथें आपण. ॥ ६१ ॥

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।
युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥

अत्र

येथें पाहतां निर्वाणीं । येथें पांडवांचा सैन्यीं । मातें दिसे नयनीं । तेंचि बोलैन. । ६२ ॥

शूराः

महा महा असती शूर, । प्रतापवंत, पवित्र, । नीतीचे ठायीं सादर । तेचि कैसे ? ॥ ६३ ॥

महेष्वासाः

धनुर्वाड्यांमाजी मेरु, । बाणांतें जाणती प्रेरूं, । शस्त्रास्त्रविद्याभारु । बहुसाळु जयांप्रति; ॥ ६४ ॥

युधि

आणि युद्धाचां ठायीं प्रवर्तले, । मंत्रसामग्रिया, विद्याबळें, । धैर्य, चातुर्य, आगळे । पराक्रमें कैसे ? ॥ ६५ ॥

भीमार्जुनसमाः

जैसे हे भीमार्जुन । आचार्या, सत्य जाण, । तैसेचि; तयांशीं समान । सर्वां पक्षीं. ॥ ६६ ॥ अर्जुनचि अवघे ह्मणावे; । भीमसेनचि सत्य मानावे; आगळाचि परी उणा नव्हे । येकु येका. ॥ ६७ ॥ केवळ अग्नीचें स्वरूप, ।

सारिखेचि जैसे दीप । लागले मग अमूप । संग्रामी होतां. ॥ ६८ ॥ गम्हाळे तैसेचि शंखपाळ, । विषधर सारिखेचि व्याळ; । दर्दुरें किती बळ ॥ करावें तेहींसी ? ॥ ६९ ॥ विघाचा मेघु वोळे । तैं कवणें भिंदुवें आग न जळे ? । तैसे खवळले नाखवळले । मग सारिखेचि हे. ॥ ७० ॥ सिंह जैसे यातीचे । सारिखेचि पराक्रम तयांचे; । तेथें केलें गजांचें । काये चाले ? ॥ ७१ ॥ विष्णूचे जैसे अवतार। म्हणों न येती साने,थोर, । तैसे प्रतापें समग्र। सारिखेचि हे. ॥ ७२ ॥ सागराचे जैसे वेग, ।उदकाचें समान अंग, । तैसे धर्मवंत,अभंग । संग्रामीं हे. ॥ ७३ ॥ सारिखीचि निष्ठा स्वधर्मी; । सारिखेचि संग्रामधर्मी; । सारिखेचि बळपराक्रमीं; । वीर पां हे. ॥ ७४ ॥ बावनकस निखळ । सारिखेचि कनकगोळ; । येक वानें, येक मोल, ॥ रूप येक; ॥ ७५ ॥ पांडवांचां दळीं तैसे । वीर आपुल्यालेनि आवेशें ॥ समान समान, ऐसे । जाण पुनः पुनः ॥ ७६ ॥ वरि अनंतु तो पाठिराखा। अधिकार हा आइका; । येथे अर्थी आशंका । ते आर्थीचिना.. ॥ ७७ ॥ आतां भीमा अर्जुना समान । योद्धे, ते कवण कवण,. । राजे पृथ्वीपाळ. आन । तयांचे संबंधी; ॥ ७८ ॥ ऐसा प्रश्नु कराल, । तरि तेही सागिजतील; । आतां मन निश्चळ । करूनि आइका. ॥ ७९ ॥

युयुधानः

ईश्वराचा तृतीय नयनु । तया आगळा, कां समानु, । तो राजा युयुधानु । आणुलेन सैन्येशीं ॥ ८० ॥ देखिलाचि पुरे नयनीं; । भिडतां युयुधानु रणीं । काळिजाचें होये पाणी । महा शूरां. ॥ ८१ ॥ सांडूनि जावें रणा । देखोनि युयुधाना. । तयाची वेगळीचि सेना। पैल पाहें. ॥ ८२ ॥ आला, रे, आला म्हणती, । वैरी सन्मुख न होती, । हातींचीं शस्त्रें गळती, । तो हा युयुधानु. ॥ ८३ ॥ प्रतापाचा हा सागरु; । प्रकोपाचा महा पूरु; । युयुधानु नरेंद्रु । पांडवदळीं. ॥ ८४ ॥

विराटश्च

प्रतिमा देखोनि जयाची । हृदयें कांपती शूरांचीं, । सेना तया विराटाची । पैल पाहें. ॥ ८५ ॥ मेरूशीं तुक साहे । ऐसा पर्वतु कें आहे ! । विराटु, हो जोगा नोहे । आम्हां तुम्हां. ॥ ८६ ॥ जयाचेनि शब्दें, भयंकरें, । गळती हातींचीं हातियेरें, । कवणाशीं शूरें । विराटें भिडावें ! ॥८७॥ पादघातु हाणे ताणें, । तैं दणाणिती चौदा भुवनें; । वैरी नुरती प्राणें ॥

तितुलेनीचि. ॥ ८८ ॥ मर्यादा नाहीं दहना । जैं तो लागे इंधना, । तैसा भिडता आंगवणा । राजा विराटु. ॥ ८९ ॥ आपलेनि सैन्येशीं निराळा । पैलु, पाहें, असे रचला;। कवणें कवणें तया महाकाळा- । पुढें निघावें ?॥ ९० ॥

द्रुपदश्च महारथः

तयाचि ऐसा समानु । महारथी, द्रुपदु, आनु; । तो राखे, तरिचि मानु । आपुला होये. ॥ ९१ ॥ तंवचि पुरुषार्थ बोलती । जंव तो द्रुपदु न देखती;। मग महा वीर कापती । मनामाजी. ॥ ९२ ॥ भुजा कवणु उचलील, । भींद कवणु वागवील, । अहं कवणु म्हणैल, । द्रुपदेंवीण ? ॥ ९३ ॥ प्रलयकाळु तो वैरिया, । अवधारीं, द्रोणाचार्या. । द्रुपदाचिया वीर्या । कवणें सहावें ? ॥ ९४ ॥ काळाची जैशी मिठी, । तैशी येणेंशीं पडता गाठी, । पुढें होता, कंठीं । प्राणु येकवटे. ॥ ९५ ॥ ऐसा द्रुपद असंवरु; । वेगळाचि तयाचा भारु; । पांडवदळीं हा नृंबारु। आगळा बहू. ॥ ९६ ॥ येणें वीरेंशीं समान । वीर असती आन । आता, तयाचें ज्ञान । करीन तुजप्रति. ॥ ९७ ॥

धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।
पुरुजित्कुंतिभोजश्च शैब्यश्च नरपुंगवः ॥ ५ ॥

धृष्टकेतुः

वैरियाचा पुरवीं अंतु । ऐसा तो राजा धृष्टकेतु;। तेणेंशीं भिडावया समर्थु । दुसरा नाहीं. ॥ ९८ ॥ जयाचा येकुचि हातु । जिंके, ऐसा विख्यातु । यया पुरत्रया- आंतु । कव्हणीही नसे. ॥ ९९ ॥ देखता जयाचें चिन्ह । शरीरीं न थरती प्राण; । पळावया असमर्थ चरण; । वेंगडी वळती. ॥ ४०० ॥ आगवणेंचि- या लाठिवा। न पाहे क्षेत्रिया सर्वा; । जो न देखिजे संव जीवा। सतोपु वर्ते. ॥ १ ॥ येकलाचि पुरे रणीं; । तळीं वरि करी धरणी; । वैरातें शस्त्र घेऊनि । काजचि नसे. ॥ २ ॥ निज सैन्येशीं निराळा । धृष्टकेतु पाहें डोळा. । आतां कैंची जीवनकळा । कौरवातें ? ॥ ३ ॥

चेकितानः

तैसाचि तेणेंशीं समानु । राजा, पाहें, चेकितानु; । स्वसैन्येशीं आपणु । वेग- ळाचि मांडला. ॥ ४ ॥ रोमटु जाला जन्माचा । ऐसा मनोभाव होये शूराचा, । पराक्रमु यया चेकितानाचा । देखोनियां. ॥ ५ ॥ चेकितानु म्हणिजे कैसा, । कुंजरावरि केसरी जैसा; । ' आतां साडा, रे, जीवाशा, ' । म्हणती क्षेत्री. ॥ ६ ॥ कवणें सागरु उलंडावा, । मनुजें पर्वतु लोटावा, चेकितानु

आंगवावा । निज पराक्रमें. ॥ ७ ॥ द्रोणाचार्या, अवधारीं, । चेकितानु नसता जरि । तरि येथें युद्धसामग्री । करितां, बरें. ॥ ८ ॥ येणें काळें दुश्चिन्ह; । हाचि येथें विघ्न; । तंव येणेंशींचि समान । बल आणिकांचें. ॥ ९ ॥

काशिराजश्च वीर्यवान्

काशिराजु वीर्यवंतु, । अति समर्थु, अति समर्थु, । पुरत्रयीं विख्यातु । प्रतापु जयाचा. ॥ १० देखोनि जयाचीं शस्त्रें, । चळचळा कांपती गात्रें, । कद-लदिळ समीरें । जैसें स्पर्शलिया. ॥ ११ ॥ रणा आलयां सांकडें; । वीर पाहती मार्गें पुढें, । जया आपुले पवाडे । तेचि आवडती. ॥ १२ ॥ रोषा वेशाची उकळी, । ते जैशी प्रळयकाळीं । महारुद्राची पेटली । नयनप्रभा. ॥ १३ ॥ मर्यादा न संडी नियमाचीं, । युद्ध हे क्रीडा जयाची, । वर्णना तया शूराची । किती करूं ? ॥ १४ ॥ तो आपुलेनि निजभारें । वेगळाचि ठेला वैरें. । आता येथूनि पुरे । युद्धाचें मत. ॥ १५ ॥

पुरुजित्

जयाचेनि प्रतापें । पुरत्रय हें कांपे, । सूर्यो जैसा, तपे । वैरियांवरि. ॥ १६ ॥ पराक्रमें जो अगणितु, । पवित्र राजा पुरुजितु । पुरवूं शके अंतु । येकलाचि तो. ॥ १७ ॥ आइकें, आचार्यशिरोमणि, । पुरुजितु देखिला नयनीं; आता पुढील करणी । ते कठीण जाणवे. ॥ १८ ॥ रण देखोनि मातला । मग तो नवचे आगवळा. । आता हा वैरि जाला । पांडवांकरितां. ॥ १९ ॥ पृथ्वीवरि हा येकु । पुरुजितु वीरु टणकु. । संग्रामविषयीं निःशंकु । प्रवर्तला. ॥ २० ॥ आपुलेनि सैन्येसीं निराळा । पुरुजितु आथी मांडला. तुही पहा आपुला डोळां, । बोले दुर्योधनु. ॥ २१ ॥

कुंतिभोजश्च.

दुसरा तैसाचि आणिकु । पराक्रमी महामंडलीकु । कुंतिभोजु, प्रासकु, । काळु दुजा. ॥ २२ ॥ येणेंचि येकें काये नव्हे ? । कासया क्षेत्री मेळवावे ? । आतां येथूनि बरवें । न पडे दृष्टी. ॥ २३ ॥ घगघगीतु वैश्वानरु, । कीं, हा क्षेत्रियांमाजी मेरु, । क्षात्रविद्येचा सागरु, । कुंतिभोजु. ॥ २४ ॥ येणें काळातें आंकळावें, । महाकाळेंसीं भिडावें, । मानवांजोगें नव्हे । ययाचें बळ. ॥ २५ ॥ कुंतिभोजु म्हणिजे कैसा, । प्रलयकाळींचा अग्नि जैसा. । परदळांचिया हाराला । येकु पुरे. ॥ २६ ॥

कुंतिभोजु हा स्वबळेंसीं । मीनला असे पांडवासि, । वेगळाचि असे, तयासि ।
पहा दृष्टी. ॥ २७ ॥

शैब्यश्च नरपुंगवः

पुरुषांमाजी जो पुरुषु, । क्षेत्रियां जयाचा त्रासु, । पराक्रमें असमसासु । शैब्य राजा. ॥ २८ ॥ वज्राचें होय पाणी, । राया शैब्यातें देखोनि. । हाये म्हणिजे देवगणीं । ऐसा योद्धा. ॥ २९ ॥ नामरूपवानें सारातें । हा नाहीं तरिचि तें बरवें. । दृष्टी पडतां नुचलवे; । वरुती मान. ॥ ३० ॥ बाणांचा वर्षतां महावोघु । प्रतापाचा मे वोघु, । शैब्या न पुरे जगु । येकल्यातें. ॥ ३१ ॥ आंगवणेचेनि गुणें । भरलाचि असे साभिमानें. । देईल कीं नेदील प्राणदानें, । हेंचि वाटे. ॥ ३२ ॥ ऐसा शैब्य हा समर्थु । निजपरिवारसहितु । पैलु येकलाचि शोभतु । पांडवांमाजी. ॥ ३३ ॥

युधामन्युश्च विक्रांत उत्तमौजाश्च वीर्यवान् ।
सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥

युधामन्युश्च विक्रांतः

धीरु, दारुगा, दमनशीलु, । युधामन्यु तो प्रळयानळु । जेणेंसीं होतां आडळु । पुरे जिणें. ॥ ३४ ॥ जुनटु जुंझारु हा येकु, । नाहीं जयातें कलंकु, । युद्धीं धारला क्षणेकु । ऐसा नव्हे. ॥ ३५ ॥ स्वतेजें तेजहरण, । वैरियांचें आक्रमण, । येणेंचि येकें निर्वाण । करूं शकावें. ॥ ३६ ॥ तैसाचि विक्रांतुही, जाणा, । जेणेंसी न शकती देवगण. । असंवर. करी संधान । प्रतापवंतु. ॥ ३७ ॥ प्रतिज्ञा करूनि जुंझणें, । सावधान करूनि मारणें, । अचूक संग्रामीं जिकणें । वैरकुळ. ॥ ३८ ॥ ऐसे हे दोघे, जाण, । समानधर्मसंपन्न, । एक एकाचें प्राण । कीं जीव दोघेही. ॥ ३९ ॥

उत्तमौजाश्च वीर्यवान्

धैर्यवंतु, वीर्यवंतु, । उत्तमौजा बळवंतु, । क्षेत्रियांमाजी विख्यातु । सर्वदा जो. ॥ ४० ॥ पृथ्वी देखोनि जया कांपे, । मेरु भारेंचि चेंपे, । सूर्यो व्योमीं न तपे, । तपतां यया. ॥ ४१ ॥ शब्दें ब्रह्मांड दणदणी, । न शकिजे राहों रणीं, । उत्तमौजु हा चाटोनि । आला असतां. ॥ ४२ ॥ दुःसहु, दुर्धरु, दुर्धर्षु, । उत्तमौजा काळु क्षेयु; । पांडवां जाला प्रियु, । बरवें नव्हे. ॥ ४३ ॥ भय, शंका ना अधैर्य । करितां युद्धाचें कार्य. । ब्रह्मोचि लागे वीर्य, । सामर्थ्य, आंगीं. ॥ ४४ ॥ ऐसा हा बळिया राजा, ।

महा वीरु उत्तमौजा, । पैलु वेगळाचि जाणिजा । पांडवदळीं. ॥ ४५ ॥

सौभद्रः

प्रळयकर्ता त्रिनयनु, । तैसा हा सुभद्रानंदनु, । अरिवर्गकुळ दीपनु । तावी स्वतेजें. ॥ ४६ ॥ शस्त्रास्त्रविद्यासामग्री । हे जयापासीं पुरी. । आतां वैरियांचां घरीं । यश येणें? ॥ ४७ ॥ दुसरा जाणावा अर्जुनु, । कीं भीमु हा अभिमन्यु, । साना अथवा सामान्यु, । बोलतां नये. ॥ ४८ ॥ लक्ष तेथें बाणु; । वेगु जयाचा दारुणु. । रणशृंगार-व्युत्पन्नु । निपुणु योद्धा. ॥ ४९ ॥ अरिकुळ-वर्नी कुठारु, । महाविष्णूसीं झुंझारु, । येणेंसीं माडता, वीरु । कव्हणीचि नसे. ॥ ५० ॥ ऐसा सौभद्रु वेगाडा । पांडवांमाजीं फुडा. । द्रोणा पाहें निजगडा । नेटका कैसा. ॥ ५१ ॥

द्रौपदेयाश्च

द्रुपदीचे पांचही जण । ते तयाचि असती समान । आतां कवण ते कवणापासून जाले सुत. ॥ ५२ ॥ धर्मापासाव जाला । द्रुपदीतें प्रतिविंन्यु आपुला. । सुतसोमा उपजला । वृकोदरें तेणें. ॥ ५३ ॥ अर्जुनापासाव द्रुपदीतें । श्रुतकीर्ति जाणा निरुतें. । शतानीकु नकुळातें । जाला द्रुपदीपोटीं. ॥ ५४ ॥ सहदेवें श्रुतकर्मा जाणु । जाला पांचाळीपासूनु. । यया पांचांचा समानु । पराक्रमु असे. ॥ ५५ ॥ पांचां वदनीं त्रिनयनु । प्रळयकर्ता जैसा आपणु, । तैसाचि काये सगुणु । जाला यांचेनिरूपें. ॥ ५६ ॥ पांचही योद्धे हे अनिवार, । शस्त्रास्त्रविद्येचे सागर, । शूळधरेसीं झुंझार । म्हणों काये. ॥ ५७ ॥ जयांवरूनि वायो गेला । तोचि न साहवे शूरां सकळां. । कवणें साहवें हाला-हाला? । तैसें वाटे. ॥ ५८ ॥ ययांसीं युद्ध करणें । तें आर्धी आयुष्यें सुटणें. । आपुलें पोष्यें घालणें । येकांचां पाळवीं. ॥ ५९ ॥ निवारणचि जयांचिया । बाणां नाहीं, आचार्या. । दशभुजीं दश दिशा तिया । आक्रमिती हे. ॥ ६० ॥ खिले परदळीं भाचारे । हेंचि नेणती जिए अरे, । दळ भंगिती येकसरें । परावे हे. ॥ ६१ ॥ आले म्हणताचि पळावें, । कां, वेगेंचि शरण रिघावें; । प्राणधन जोडावें । जोडे जरि. ॥ ६२ ॥ धैर्ये, सत्वें, पराक्रमें, । सारिखेंचि संग्रामधर्में, । जाणोनि हाणती वर्में । ऐसे दक्ष. ॥ ६३ ॥

सर्व एव महारथाः

एवं युयुधानु आणि विराटु, । द्रुपदु योद्धा धीटु, । चौथा तो धृष्टकेतु येकटु,।

महा पराक्रमी. ॥ ६४ ॥ चेकितानु पांचवा, । काशिराजु जाणा साचा, । पुरुजितु सातवा । महा वीरु. ॥ ६५ ॥ आठवा कुंतिभोज जाणा, । शत्रु नववा तैसाचि माना, । युधामन्यु अनुमाना । दहावा वीरु. ॥ ६६ ॥ अकरावा उत्तमौजु आहे, । बारावा अभिमन्यु पाहें । विक्रांतु प्रतिविंध्यादिक हे । पांचही द्रुपदीचे. ॥ ६७ ॥ हे महारथी अठरा जाण । परम श्रेष्ठ, असाधारण; । भीमा अर्जुना समान । संग्रामविषयीं. ॥ ६८ ॥ ययां वेगळे जे असती । ते प्रेत्नें आंगवू येती; । परंतु दुर्जय महारथी । अठराही हे. ॥ ६९ ॥ येकें रथेसीं जो भिडे, । तया रायातें फुडें । रथी म्हणणें घडे, । निवाडें न्यूनु तो अर्धरथी. ॥ ७० ॥ दहा सहस्रांसि उठावला । तो महारथी म्हणितला. । अमितांसि येकु चालिला । अतिरथी तो. ॥ ७१ ॥ म्हणौनि ते पै महारथी । पांडवदळीं असतां; । रण हें शोभत आथी । जयांकरितां. ॥ ७२ ॥ आरक्तें, पीतें, हरितें, । छत्रें विचित्रें, शुद्र श्वेतें । सार्वी, जाळियांची बहुतें । बहुतां प्रकारीं. ॥ ७३ ॥ कनकदंडें चामरें । वरि ढळती सार्थी, विचित्रें. । तोडर, ब्रीदें, अपारें । बास्वां पार्यी. ॥ ७४ ॥ रथचक्रें रत्नजटितें । वरि ध्वजस्तंभ शोभते. । नाना वर्णाचि निरुतें । शोभा देती. ॥ ७५ ॥ येक मर्गजाचे निखळ, । रत्नजटित येक केवळ, । येक कांचनाचे निर्मळ, । ओप, देती. ॥ ७६ ॥ येक निखळ नीळाचे, । येक अखंड पाचींचे, । येक माणिकां हिरयांचे । खणोखणीं. ॥ ७७ ॥ येक साधे, येक विचित्र, । ऐसे रथ शोभती परिकर, । वारू पवनेसीं स्पर्धापर । होते जाले. ॥ ७८ ॥ श्वेत, पीत, आरक्त, । चित्रविचित्र बहुत, । येक कृष्ण येक शोभत । सेंदुरवर्ण. ॥ ७९ ॥ येके पायीं दो पायीं । येक विलासले चहूं पायीं । श्वेतें वर्णे जाणयीं । मुखावरि. ॥ ८० ॥ सकळां खोडी सुटले, । सकळां लक्षणीं आथिले, । वस्त्रीं अळंकारीं आच्छादिले । दिसतीचिना. ॥ ८१ ॥ मोहाळीं पांखरांवरी झांटा, । पायीं नेपुरें. क्षुद्र घंटा, । कंठीं माळा, मुखीं पट्टा । जटित सूत्रीं. ॥ ८२ ॥ पुच्छें वरुतीं वाऊनि । पाउल करिती स्वस्थानीं, । अनिवार जैसी नाचणी । स्थिर नव्हे. ॥ ८३ ॥ देहीं न पुरे वळा स्थान, । वरि सारथियाचें आकर्षण, । वारू करिती हिंमाण । पाउलें ठायीं. ॥ ८४ ॥ तेजें दिपले नयन; । भेयें व्यग्र जालें मन. । कैसें पांगलें हें रण । पांडवसैन्यें. ॥ ८५ ॥ मातले कुंजर न सेवरती, । भूमीतें चरण घांसती, । सोंडा पर्वन उलंटिती । आंवरिले असतां. ॥ ८६ ॥ भाट नागारे वर्णिती, । ब्रीदें रायांचीं वाखाणिती; ।

तेणेंच सुखें विश्रांति । भूपाळांतें. ॥ ८७ ॥ येक ते रणपिसेचि जाले, । कंवर सोडूनि मोकळे । हांका देती अंत्राळें, । भूतें जैसीं. ॥ ८८ ॥ येक आनंदले गाती; । येक रण देखोनि नाचती; । येक भुजा दंड मार्दिती । बळाचे जे. ॥ ८९ ॥ पर्वतां येती धडके, । नेणती आपुलें पारिखें, । उन्मत्त झाले, देखें, । ऐसे वीर. ॥ ९० ॥ येक पाहती क्रूर दृष्टी, । येकां चळवळ मोठी, । येके सांगती गोठी । संग्रामनीतीचिया. ॥ ९१ ॥ येक येकां पुढारती, । चमत्कार वेगें दाविती, । साविली विद्या उजळिती । तये ठायीं. ॥ ९२ ॥ बहुतां दिवसांचें पारणें, । तें देखिजे मिष्टान्नें, । तेथें आळुकेपण ब्राह्मणें । जैसें कीजे. ॥ ९३ ॥ देखोनि मूषकांची मांदी । मार्जारां मांडे गवादी, । तीं आकळिलिहीं पार्दी । फिम्कारु करिती; ॥ ९४ ॥ तैसे असंवर पातले, । परिणिती करितां आंकळले, । पांडव वैरी आपुले । बळी कटकीं. ॥ ९५ ॥ दुर्योधनु म्हणे नवल । कैसें या पांडवांचें बळ । उठीना कीं खळबळ । आमुचां सैन्यीं. ॥ ९६ ॥

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।
नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥

हे द्विजोत्तम

दुर्योधनु म्हणे, द्विजोत्तमा. । हेंचि पुढतोपुढती वाटे आम्हां; । परंतु कांहीं येक तुम्हां । सांगणें असे. ॥ ९७ ॥

अस्माकं तु ये विशिष्टाः

आमुचांही दळीं विशिष्ट । वीर असती श्रेष्ठ श्रेष्ठ, । जे कीं बळियाडे सुभट । पुढती केसे ? ॥ ९८ ॥

मम सैन्यस्य नायकाः

माझया सैन्याचे नायक । श्रेष्ठ कर्ता आज्ञापक, । मतें मान्य लोक । महाप्नीळेप. ॥ ९९ ॥

तान्

आतां आइकोनि ऐसे वचन । तूं म्हणसी, ते कवण ? । व्यक्ति, शक्ति, अभिधान, । तयांचें कैसें ? ॥ १०० ॥ तरि, आचार्या, आइकें; वचन । माझें नव्हे अप्रमाण, । माझां सैन्यीं श्रेष्ठ कवण । वीर ते पैं. ॥ १ ॥

संज्ञार्थं ते ब्रवीमि

कीर्ती, गुणें, अभिधानें, । तुजप्रति कळावयाकारणें । सांगेन मी, राजा म्हणे, । अहो आचार्या. ॥ २ ॥

तान्निबोध

मद्वचन तें आइकोनि, । प्रत्यक्ष दृष्टी पाहोनि, । कीर्ती पराक्रमें करूनि । जाण पां तें. ॥ ३ ॥ नाम रूप अवलंबावें, । मग तें दृष्टीही पाहवें, । पाहोनि तोधिंचें जाणावें । विचारें वळु. ॥ ४ ॥ मागां केली जे करणी, । पुढें आतां यये रणीं । मुखश्री दृष्टी पाहोनि । वीर मानावे. ॥ ५ ॥ आतां त्यांचीं अभिधानें । लागतील मातें सांगणें; । चित्त देऊनि आइकणें, । सर्वज्ञ, तुवां. ॥ ६ ॥

भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।
अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥

भवान्

प्रथमचि तुम्ही येक । सर्वांमाजी नायक, । आम्ही आणि पांडव सकळैक । जयांचे विद्यार्थी. ॥ ७ ॥ अंशांशें जे तुझी कळा । तिया हा अर्जुनु आगळा, । संग्रामें जेणें कैलासपाळा । संतोषविलें. ॥ ८ ॥ तुझेनि पादप्रसादें । पांडव जिंकती युद्धें; । तिये विद्येचें नसुत्रें । भांडार तूं. ॥ ९ ॥ अद्यापिही तुझी सेवा । बहुसाळ प्रिय पांडवां; । तो तूं, आचार्या, आह्मां सर्वां । येकला रक्षिसी. ॥ १० ॥ अर्जुनें तुम्हां देखावें । उगेंचि धनुष्य सांडावें । ऐसें होईल, जाणवे । माझां मनीं. ॥ ११ ॥ जालीही बळवंत, परि । दासी स्वामिणीतें न मरी; । आला घाव आंगावरि । उगाचि घे. ॥ १२ ॥ आइकें, गा द्विजोत्तमा, । हाचि भरवसा आहे आम्हां । सन्मुखु अर्जुनु तुम्हां । नदवी वदन. ॥ १३ ॥

भीष्मश्च

तुम्हांचि ऐसा दुसरा । भीष्माचार्यो अवधारा, । जो वडीलु, आजा समर्था । पांडवांतें. ॥ १४ ॥ देखोनि तया भीष्मा । हस्तु नुचलवे अर्जुना भीमा । बोलु लागेना धर्मा । अनुचित करितां. ? ॥ १५ ॥ भीष्मु देखोनि, गा द्रोणा, । ग्वाळुतिया करिती माना, । ऐसें हें वरवें मना । आलें माझया. ॥ १६ ॥ तेही हातियेर सांडावें, । आम्हीं ते जीतचि धरावे, । धर्मपुत्र अथवे । पांचही ते. ॥ १७ ॥ कृष्णु पहिलेंचि अशस्त्री, । असोनि तो काये करी; । पांडव पडले आहारीं । येणें विचारें. ॥ १८ ॥ आतां ते युद्धचि करितील, । तरि विद्या, यश नेतील; । येक गुरु, येक वडील । म्हणोनियां. ॥ १९ ॥ यराही तयां खरें । आलेंही येके प्रकारें; । तन्ही तुम्ही आणि दुसरे । जेथें भीष्मा-

चार्य, ॥ २० ॥ तें दळ तुमचेनि बळवंत; । मरती परि न टळती समस्त, ।
रणीं धैर्य अत्यंत । आमुचयां लोकां. ॥ २१ ॥ जाल्याही देह जर्जर, । भीष्मु
न परते हें साचार; । आणि तुम्हां ऐसे वीर । प्राणु देती. ॥ २२ ॥

कर्णश्च

तैसाचि कर्णु नेटाचा, । जो कीं नंदनु सूर्याचा, । साह्यकर्ता तयाचा ।
पवित्र सूर्यो. ॥ २३ ॥ सूर्येसीं युद्ध करितील । ऐसें काये पांडवबल ? ।
नाना असो, केवळ । ऐसें न घे. ॥ २४ ॥ आणि कर्णा ऐसा नेटकु । दुजा
नाहीं आणिकु; । शस्त्रास्त्रभावीं टणकु; । पाठीं नेदी. ॥ २५ ॥ आंगाचीं होतु
खंडें । परि न पाहे मागें पुढें. । पांडवां नेट येव्हढें । तें आथीचिना. ॥ २६ ॥
वणवा लागेल हा पांडवां, । संग्रामीं वेंचील जीवा, । भरंवसा ययाचा
बरवा । आहे मातें. ॥ २७ ॥ ऐसा हा कर्णु बळवंतु । आमुचां सैन्यीं
उपस्थितु; । येणें येकें निर्धितु, । द्विजोत्तमा, मीं. ॥ २८ ॥

कृपश्च

तैसाचि कृपाचार्यो वीरु । रणसंग्रामीं जो अमरु; । वधूं न शके धनुर्धरु । तया
येका. ॥ २९ ॥ ईश्वराची इच्छा न कळे, । परि पांडव न जिंकती यया बळें, ।
अमरगणु हा येणें काळें । आम्हांमाजी. ॥ ३० ॥ आमुतें तंव ऐसें माने, ।
कृपाचार्यांचिये आंगयणे, । पावलाही शकु त्राणें, । परंतु न पुरे. ॥ ३१ ॥
होणारा न चले कांहीं, । परि पांडवांमाजी ऐसा नाहीं, । मरणचि नातळे
देहीं । जयासि कां. ॥ ३२ ॥ आला घाव निवारूं । फावलयां जाणे मारूं, ।
बापु, बापु, झुंझारु । कृपाचार्यो. ॥ ३३ ॥ ऐसा सर्व भावें आगळा, ।
काळु तो जेणें जिंकिला, । शस्त्रास्त्रविद्या सकळा । प्रेरूं जाणे. ॥ ३४ ॥

समितिंजयः

ह्मणोनियां हा झुंझारु । संग्रामातें जिंकण्हारु, । भरंवसेयाचा विचारु । ऐसा
आहे. ॥ ३५ ॥ येणें सर्वथा न मरावें, । सर्वथा परदळ जिंकावें, ।
भविष्य तेंचि नेणवे, । परि ऐसें आहे. ॥ ३६ ॥

अश्वत्थामा

अश्वत्थामा दुजा वीरु । तेणेंसीं समानु अमरु. । साहों न शके इंद्रु । पराक्रमु
जयाचा. ॥ ३७ ॥ येकलाचि पुरे योद्धा, । वैरियांपासाय नाहीं बाधा; ।
ययाचेनि सर्वदा । क्षेम आमुतें. ॥ ३८ ॥ पांडव येणें मारावे, । कृष्णानें
सेधूनि पळावें, । धर्मातें धरूनि आणावें । येकलेनि. ॥ ३९ ॥ अनिवारा

देह संग्रामीं । आणि प्रवीणु युद्धधर्मी, । अक्षयी सामग्री आम्ही । तयाचीं जाणों. ॥ ४० ॥ ययापासाव सुटतीं । पांडव, निराळे उरती, । राज्याची गोष्टि करिती, । ऐसें न घडे. ॥ ४१ ॥ गति न कळे भविष्याची, । न कळे इच्छा ईश्वराची, । परंतु वासना तंव आमुची । ऐसी आहे. ॥ ४२ ॥

विकर्णश्च

तैसाचि योद्धा असाधारणु । संग्रामीं वेंचील प्राणु, । अभिमानु आमुचा विकर्णु । राखेल हा. ॥ ४३ ॥ येणें विकर्णें दाटिला । तो प्रतापुचि विसरे आपुला. । इतुला परभारु चालिला । येकुचि पुरे. ॥ ४४ ॥ नियमाचें करणें संधान, । अचूक जयाचें विंदान, । पांडव सुटती ययापासून । तरि अपूर्व म्हणा. ॥ ४५ ॥ अग्निमुखीं उरे कापुरु, । व्याघ्रमुखीं उरे नरु, । तरिचि हा विचारु । ऐसा घडे. ॥ ४६ ॥ यशचि असावें साह्यकर्तें, । मग जिंकितां पांडवांतें । क्षणु नलगे विकर्णातें, । ऐसें आहे. ॥ ४७ ॥ स्रष्टया ईशाची करणी । तेचि सत्य निदानीं; । परि विकर्णु हा अभिमानी । ऐसा आहे. ॥ ४८ ॥

सौमदत्तिस्तथैव च

अरिगर्वपंचाननु, । पैलु सोमदत्तीचा नंदनु, । भूरिश्रवा, सुजाणु । संग्रामविषयीं. ॥ ४९ ॥ आंगावरि आले घाये, । मागें पुढें न पाहे; । आमुतें साडूनि नव जाये, । ऐसा मित्रु. ॥ ५० ॥ धनुर्विद्येचा मेरु, । धैर्याचा सखोलु सागरु, । वीरां आगळा वीरु । भूरिश्रवा हा. ॥ ५१ ॥ सौमदत्ती आला म्हणतां । हृदय उले पर्वतां; । वज्र गळे सर्वथा । पाणी होये. ॥ ५२ ॥ थांबूं शके मंडळातें, । मोडूं शके सृष्टीतें, । येसणें बळ ययातें । आंगीं असे. ॥ ५३ ॥ अदृष्टें मातें न कळे, । वीर तंव हे येवढोले; । नारायणें सानुकूलें फळे प्रेत्नु. ॥ ५४ ॥

अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।
नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥

अन्ये च

दुर्योधनु म्हणे, द्रोणा, । सन्यता मानीं वचना. । पाहतां आमुची सेना । आणिकही ॥ ५५ ॥

बहवः शूराः

बहुसाल असती शूर, । वीर धनुवाडे अपार; । परंतु कैसे, हें उत्तर । आइकें माझें. ॥ ५६ ॥

मदर्थे त्यक्तजीविताः

मजकारणें आपुलालें । जिणें तें जेहीं सांडिलें, । मरण बांधोनि आले । पाल्वीं येथ. ॥ ५७ ॥ आपुलिया प्राणाचीं दुर्गें । करूनि ठेले अवघे । माझे प्राण अंतरगें । घालूनियां. ॥ ५८ ॥ आधीं आपण मरतीं, । तरिचि मजवरि युद्ध घालिती; । माझें मरण झेलिती । आंगावरि जे. ॥ ५९ ॥ साडूनि आशा राज्याची, । आपुलिया देहसुखाची, । बळी देऊनि प्राणांची । येथें आले. ॥ ६० ॥ झणें लागेल मातें वारा । आड करिती तेथ शरीरा; । ऐसें अपार, गा विप्रेंद्रा, । माझे मित्र. ॥ ६१ ॥ जव तें असती मागें पुढें, । तंव आत्मभय मज का येवढें ? । जेहीं मजकारणें धडें । आपुलीं दिधलीं. ॥ ६२ ॥ जीवें प्राणें माझे जाले, । माझयां काजा आपुलाले । देह देती; परि येणें काळें । न वचतीं मुरडोनियां. ॥ ६३ ॥

नानाशस्त्रप्रहरणाः

आणि नाना शस्त्रांची परजणी । ते असे जयांचां स्थानीं, ।
प्रेरिती विद्या निर्वाणीं । अनिवार तें. ॥ ६४ ॥ अस्त्रविद्यांचीं प्रहरणें । ठाउकीं जयांकारणें; । अमुकें युद्ध मी नेणें । ऐसें नाहीं. ॥ ६५ ॥

सर्वे युद्धविशारदाः

सर्वेही युद्धीं प्रवीण; । सर्वांचें सारिखेंचि मन; । येकयेकातें, दाऊन । युद्धकर्ते. ॥ ६६ ॥ शूरता आणि दक्षता, । धैर्य आणि माझी ममता, । ययां रायां बहुता । असे हृदयीं. ॥ ६७ ॥ पृथ्वी पाणिया मेळविती, । पाणी अग्निमुखीं जाळिती, । ब्रह्मांडप्रळयो करिती । ऐसे वीर. ॥ ६८ ॥ पराक्रमु न समाये सृष्टी । आणि माझाचि हितीं दृष्टि; । ऐसे नव्हती, जे सकटीं । साडूनि जाय हार. ॥ ६९ ॥ यश कैसें तें मी नेणें, । परि हे मरती मजकारणें; । दुर्योधनु ऐसें बोलणें । बोलिला नियमाचें. ॥ ७० ॥ ऐसें बोलोनि वचन । पुढें करी प्रळपन । तेंचि म्हणे सागेन, । संजयो, राया. ॥ ७१ ॥ दुर्योधनु म्हणे, द्रोणा, । दोन्ही सैन्यें आलीं रणा, । वीर आपुलालिया आंगधणा । उभे असता, ॥ ७२ ॥ दृष्टी कैसीं अनगमतीं, । दोन्ही सैन्यें शोभती । तें मी सागेन; उक्ति । हृदयीं राखावी. ॥ ७३ ॥ पुढील यश, अयश चिन्ह् कळों ये साभाम; । मुखश्री बोळग्वे तयाम । सर्व कळे ॥ ७४ ॥ तरि

मातें जैसें फळे । तितुकें सांगैन येणें काळें; । आतां मन तुवां ठेविलें । पाहिजे शब्दीं. ॥ ७५ ॥

अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।
पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥

अस्माकं बलम्

आमुचें दळ अप्रमित, । महा महा वीर जेथ, ।सैन्यबळ बहुत । अलंकारलें. ॥ ७६ ॥ अश्व, नर, गज, रथ, । योद्धे पराक्रमवंत, । शस्त्रास्त्रसामग्री बहुत । जयांपासीं. ॥ ७७ ॥ समस्त रायें मुकुटांचें । कुंचे ढळती मयोरपत्राचे; । कनकदंडां चामरांचें । तेज फांके. ॥ ७८ ॥ रणकंकणें शोभती, । पायीं ब्रीदें तीं रुळती, । भाट, नागारी वर्णिती । अनंत पवाडे. ॥ ७९ ॥ गजावरि राजचिन्हें । दुरूनिचि वोळखि अवलोकनें. । वस्त्रें, अलंकार, भूषणें, । ययां पर्यामिति नाहीं. ॥ ८० ॥ दहाही अंगुळिका सुरेखा, । तेथ तेथ नाना मुद्रिका. । आंगीं सुंदरता, लोकां । ते काये सांगणें ? ॥ ८१ ॥ श्यामगौरकृष्णवर्ण । शोभती अवघेचि तरुण, । जयांचें पाहतां वदन । भुलती कामिनी. ॥ ८२ ॥ श्रवणीं कुंडलें झळफळितें, । मुकुटीं रत्नें बहुतें, । दोन्ही तेजें मीळितें । येकत्रें होतीं; ॥ ८३ ॥ तेणें प्रकारें प्रकाशलें । वदन विराजों लागलें. । मुखीं तांबोळ घेतलें तेणेंकरूनि ॥ ८४ ॥ अधरोष्ट दिसती सुरंग । टिळक चंदनाचे अभंग । वरि अक्षतांचे रंग । ते माणिकाहूनि; ॥ ८५ ॥ कंठीं माळा बरवती, । कवचें आंगीं शोभती, । वस्त्रें सकुमारें, पातळें तीं । पाणियाहूनि; ॥ ८६ ॥ नानाविधें दिसती छत्रें, । मध्यें मध्यें ढळती चामरें, । ते पुरुष तेणें अलंकारें । अत्यंत शोभती. ॥ ८७ ॥ गजांतें घंटाभूषणें; । गगन दुमदुमी नादें तेणें, । शब्द करिती अतिमानें । कुंजर जै. ॥ ८८ ॥ वारुवां जडितअळंकारें । तें तेज तेजीं येकत्र; । तेथ रथतेज विचित्र । युक्त होये. ॥ ८९ ॥ जडितें चक्रें विशाळें । जैशीं सूर्याचीं मंडळें. । ध्वजस्तंभ रचले । अग्नीचे काये ! ॥ ९० ॥ येक हिरेपाचीचे, । निखळ येक वज्राचे, । अपूर्व येक मर्गजाचे । ध्वजस्तंभ. ॥ ९१ ॥ गोमेद ये वैडुर्ये । जटित नवरत्नीं पाहें, । जयांचें तेज न समाये । महदाकाशीं. ॥ ९२ ॥ ऐसीं सकळें तेजें मीनलीं । अंबरीं येकत्र जालीं; । वेगळीचि कळा उमटली । तयांचां योगें. ॥ ९३ ॥ तेणें तेजें विराजत । सैन्य दिसे शोभित, । तें कैसें अवगमत । आइकें, द्रोणा. ॥ ९४ ॥ सूर्योहूनि आगळा । तेजें भासचि उदेजला, । कीं अनंतां

बिंदूचा घडला । समुदाय हा. ॥ ९५ ॥ वरि शस्त्राची झळफळ । पाहता दिपती नेत्रगोल, । दृष्टि न थरे, बुबुळ । पातीं आड करी. ॥ ९६ ॥

अपार्याप्तम्

इतुकेंही असोनि परि । तया पुरुषाचा शरीरीं । कांहींचि सामर्थ्यसामग्री । ते नये दिसों. ॥ ९७ ॥ असामर्थ्याचीं चिन्हें । आगीं जडलीं ययाकारणें, । तींचि केसीं मद्वचनें । अवधारावीं ॥ ९८ ॥ घालूनि खाटुतिया माना । वीरु उभे; आइकें, द्रोणा. । निद्रना जालिया रसना । येकायेकीं. ॥ ९९ ॥ सन्मुख पाहों न शकती, । पाडवतेज ययाप्रति । न साहवे, ऐसें चित्तीं । गमे माझा. ॥ १०० ॥ अधरोष्ठ चाटिती पाहें । ऐसिया चिन्हा करणें काये? । गळोनि गेले हात पाये । महा वीराचे. ॥ १ ॥ मुखींचीं फोडि मुखीं भिजे, । हातींचें पान हातीं सहजें, । विडा घेणें हें नुमजे, । भ्रमित झाले. ॥ २ ॥ येक क्षारेंवीण पान खाती, । येक ते पान फोडि साटिती, । चावणें साडिलें दतीं । येका वीराचा. ॥ ३ ॥ क्षणक्षणा लागे मूत्र, । क्षणक्षणा मलाची येरधार, । येकेंचि क्षणें सूत्र । सुटलें शरीराचें. ॥ ४ ॥ तान लागे, भूक लागे, । येका आड येकु रिघे, । व्यग्रचित्त अवघे । आमुचे लोक. ॥ ५ ॥ हृदयीं काडी घसा । वाळोनि गेला घसा, । काती कळा पुरुषा । साडूनि गेली. ॥ ६ ॥ हिंसु आइकोनि वाचा । धाकु वाहती पाडवाचा । आला, आला अर्जुनाचा । रथु म्हणती. ॥ ७ ॥ आड करूनि येकातें । पाहती येक निर्गमातें. । येक दाविती हातें । अर्जुनासि. ॥ ८ ॥ अवधि जाली जमाची । ऐसी वदती येकाची, । येक म्हणती वायाचि । याचे जालों. ॥ ९ ॥ आवाजु पडताचि श्रवणीं । गजेंदु उठी आमुचा सैन्यीं, । विसरोनि युद्धाची करणी । अपेक्षिती पळों. ॥ १० ॥ उठती, बैसती, निद्रा करिती, । येक व्यथा आहे म्हणती, । येक प्रताप वाखाणिती । पाडवाचे. ॥ ११ ॥ तें आइकोनिचि एक निराले, । येका अश्रुपात आले, । परिग्रह आपुलाले । आठवोनिया. ॥ १२ ॥ पाडव न वचति जिंकिले, । जो तो ऐसेंचि बोले, । मुख काजळें उटिलें । ऐसें शोभे. ॥ १३ ॥ शक्ति पळाली आगून, । उगेचि गळती धनुष्यबाण. । पडे जो नर अडखुळोन । तो चौघीं उचलावा. ॥ १४ ॥ कपु घेतला शरीरें, । आली हुटहुडी, शारे, । दाटले श्रीदाचेनि भारें । तीं साडिती काटूनि. ॥ १५ ॥ येकाचेनि घेतलें औरें । क्षात्रधर्मचि हे साडावे, । कृषिकर्म सुखें करावें, । जळो हें शस्त्र. ॥ १६ ॥ काये करणें, कोठें जाणें । भागतूनि कैसें फुटणें, । यये विचारीं शाहणे । जाले

सकळैक. ॥ १७ ॥ हळाचे आंगारिती वागरे । वीर पाहतां भावारें । येकुयेका आधारें । आगळे फुटो. ॥ १८ ॥

तत्

ऐसें जें सामर्थ्य सुटलें । आमुचें दळ भंगों आलें, । ते धैर्याचेनि येकें बोलें । येणे काळीं ॥ १९ ॥

भीष्माभिरक्षितम्

भीष्में राखिलें निर्वाणीं । 'नाभि रे नाभि म्हणौनि.' । न जुझावें तुम्हीं कव्हणीं । पांडवांसीं. ॥ २० ॥ निवांत पाहावें येथें तुम्हीं. । पांडवां जिंकैन येकला मी; । तुम्हीं आपुलाला स्वधर्मी । म्हणे चळा. ॥ २१ ॥ भीम, अर्जुन, ये लेंकुरें, । नघलीं ययांवरि हातियेरें; । साडूनि अवघीं शस्त्रें । धरीन जितेचि. ॥ २२ ॥ नकुळ, सहदेव, कक्षाद्वयीं, । भीम, अर्जुन, हातीं दोहीं, । धर्मु कवळीन हृदयीं । भुजादंडें. ॥ २३ ॥ श्रीकृष्णा धाडीन द्वारके, । युद्धचि जालें असकें, । हें म्या करावें येकें; । पाहावें तुम्हीं. ॥ २४ ॥ अर्जुनें माते देखावें, । हातींचें शस्त्र साडावें । लेंकुरपणें रदन करावें, । ऐसेंचि होईल. ॥ २५ ॥ मग तयाची बुझावणी । आम्हींचि करावी मागुतेनि । का सदेहो तो चक्रपाणी । पडैल कृष्णार्ते. ॥ २६ ॥ न चळती पांडवाचीं हातियेरें । ऐसे केलें मग न पुरे ? । आता तुम्ही मजमावारे । उगेचि असा. ॥ २७ ॥ सामर्थ्यहीन सकळ । भगलें जें आमुचें दळ, । तें भीष्मं आपुलें बळ । देऊनि रक्षिलें. ॥ २८ ॥

एतेषां बलम्

आता यया पांडवाचें । सैन्यबळ जें साचें । माडलें प्रळयकाळीचें । जैसें मेहेंड. ॥ २९ ॥

पर्याप्तं तु

इये दृष्टीचेनि सारकारों । निश्चयें पाहता तें कैसें । दिसे, सांगेन तें अनारिसें । म्हणे माना. ॥ ३० ॥ महासमर्थ, बळवत, । धैर्यवीर्यतेजयुक्त, । सैन्य थोडेंचि, परि असंख्यात । ऐसें वाटे. ॥ ३१ ॥ सामर्थ्यवंताचें लक्षण । भासे कैसें, तें सांगेन, । नाव्हदृष्टी जें चिन्ह । तें अंतरीं जाणावें. ॥ ३२ ॥ अवघेचि पाहती क्रूर दृष्टी, । आंवळिती शस्त्रांचिया मुठी, । धाऊं अपेक्षिती मिठी । आम्हांवरि. ॥ ३३ ॥ गजांचिया थाटावरि । जैसा चाले केशरी, । तैसें पांडवदळ भारी । उचावलें. ॥ ३४ ॥ आरक्त जयाचे नयन, । करकरां वाजती दशन । आवेशलें भुजास्फोटण । पांडव करिती. ॥ ३५ ॥ खाडामिसिया सरसावितां, । आम्हा

उजू माथें तुकिती, । भयचि नाहीं चित्तीं । जया आमुचें. ॥ ३६ ॥ धैर्य, प्रतापु, शरीरीं । न सटे, तो ये बाहेरि । रोपवेशा तोचि करी । आम्हा देखोनिया. ॥ ३७ ॥ तेजें तानिती परदळ, । शूरत्वाचे स्पद प्रबळ, । बोल बोल्ती ते मत्ताळ । येतीचिना. ॥ ३८ ॥ धैर्य विसावलें अतरीं, । दक्षता प्रकटे बाहेरि, । पळोनि जावें हे सामग्री । कम्बचि विसरले. ॥ ३९ ॥ प्राण दानें घ्या, रे, म्हणती, । आपुलेनि सामर्थ्ये उडविती । आता, मग झोंबती । माझा पदरीं ॥ ४० ॥ कवीचिवरि हे राठिले । दाविती अनिवारें बळे, । आह्मीं अहमत साडिलें । म्हणोनि वरें. ॥ ४१ ॥ हाकेचि सर्वे स्फुरण, । उठी आगीं आगवण, । तयाची करावया ज- (त ?) न समर्थ जे का. ॥ ४२ ॥ न जिंकों ऐसें वचन । न बोले थोर सान. । आवेशु, रोषु, स्फुरणें, । ययाचें बहू. ॥ ४३ ॥ मुखावरि विजयकळा । पडोंचि पाहती गळा. । हलुहलू पाउला पाउला । साउमे येती. ॥४४॥ पाल्वें पुसोनि खड्गातें । आले उगारलेनि हातें, । पाडवसैन्य आमुतें । अनिवार दिसे ॥ ४५ ॥

इदम्

हें ऐसें अनिवार, परि । का राहिलें, हातु न करी ? । म्हणसील, तरी अवधारीं । माझें वचन. ॥४६ ॥

भीमाभिरक्षितम् ।

भय दाऊनि आपुलें । हें भीमसेनें वारिलें, । नीतिमाडणी माडिलें । फुटों नेदी. ॥ ४७ ॥ रचनया राखिलें दळ । आवरूनि ठायीं निश्चळ, । आगळे उणे भूपाळ । फाकतीचिना. ॥ ४८ ॥ स्थीरु स्थीरु राहा राहा । ऐसेंचि बोले भीमु हा, । आज्ञा धर्माची पहा, । मग करा वेगु. ॥ ४९ ॥ नमस्काररूनि श्रीकृष्णातें, । आज्ञा पुसोनि धर्मातें, । अर्जुनु जव ये येथें, । तव न करा युद्ध. ॥ ५० ॥ इतुलाही योगु घडला, । मी पाल्वीन ममत्ताला. । मयोरकुचा भ्रमला । तेचि सज्ञा. ॥ ५१ ॥ तव न जुझावें कव्हणीं । भीम ऐसें बोलोनि । आम्हावरि पर तें आवरूनि । सैन्य राखिलें. ॥ ५२ ॥ ऐसी आपुली उणीव, । आणि वैरियाचे प्रहृष्टभाव, । आम्ही दृष्टी स्वमेव । देखोनि आलों. ॥ ५३ ॥ इतुलेंचि तुमतें पुसणें. । इतुल्या काचे करणें ? । इतुलें असता उणें, । क्षेम कैसें ? ॥ ५४ ॥ तुम्हीं सर्वज्ञ आणि गुरु, । तारे करणा गुसावा हा विचार ? । तथापि आमुत प्रकार ।

येकु स्मरला. ॥ ९५ ॥ तेणेंचि प्रकारें बोलैन, । समस्तां आज्ञा देईन ते मानूनि प्राण । कार्यी वर्तावें. ॥ ९६ ॥

अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।
भीष्ममेवाभिरक्षन्तु भवंतः सर्व एव हि ॥

सर्वेषु अयनेषु च

सकळहीं मार्ग असती; । अवधारा, । जी गुरुमूर्ती । हेंचि माझी उक्ति. । जे त्या त्या मार्गी ॥ ९७ ॥

यथाभागमवस्थिताः

आपुलालेनि मार्गे राहिले । न चळती कांहीं केलें, । मर्यादायुक्त; जे भले । महा वीर, ॥ ९८ ॥

भवंतः सर्व एव हि

तयाप्रति हेंचि वचन. । तुह्मीं सर्वीही मिळोन । आज्ञारूप सांगेन । तेंचि करावें. ॥ ९९ ॥

भीष्ममेवाभिरक्षन्तु

येकले या भीष्मातेंचि रक्षावें, । हा तुह्मां रक्षील स्वभावें. । इतुलेनि कार्य अघवें । आमुचें संपादेल. ॥ ६० ॥ निश्चित बोलिला वचन । दुर्योधनु तो, राया, जाण. । तरि येयांचा भाव सांगैन; । मार्ग ते कैसे ? ॥ ६१ ॥ संग्रामु जिंकावयाकारणें । जेणें जेणें प्रवर्तणें, । ते ते मार्गचि जाणणें । संप्रदाय-भेदें. ॥ ६२ ॥ धनुर्विद्या साधिजे, । तो मार्गुचि वेगळा म्हणिजे; । मार्गे तेणें नेणिजे । गदायुद्ध. ॥ ६३ ॥ छत्तिसा दंडाची परजणी, । भिन्न भिन्नचि मार्ग ते मानी; । संग्रामु जिंकिजे जेहीं करूनि । रिपु निग्रु करितां. ॥ ६४ ॥ वेगळी गति वेगळी युक्ति, । आयुधाची वेगळी व्यक्ति, । वेगळा गुरु, वेगळी प्रतीति । तरि मार्ग वेगळाले. ॥ ६५ ॥

अयनेषु च सर्वेषु

युद्धसाधन अनेक । ते ते मार्गचि सकळिक । तेथें तेथें साधक । क्षेत्री जे जे. ॥ ६६ ॥

यथाभागमवस्थिताः

तेहीं करितां साधन । जे विद्या होये निप्पन्न, । ते जयाची तयाचिलागून । प्रयोजना ये. ॥ ६७ ॥ येकाची विद्या येकातें, । सत्य. नये प्रयोजनातें; । म्हणोनि आपुलालेनि मतें । वेगळालें युद्ध. ॥ ६८ ॥ जया जितुका विद्या(रि?)

योगु, । तयाचा तितुलाचि विभागु. । ऐसा असतां प्रसंगु । काये म्हणे.॥६९॥ आश्रयूनि नाना मार्ग. । अधिकारें पावे विद्याभाग. । क्षेत्रीं राहिले अभंग । संग्रामीं जे; ॥ ७० ॥

भवंतः सर्व एव हि

तयांतें विनवी स्वभावें; । तुम्हीं अवघीं येक करावें । सर्वथा निश्चयें मानावें । माझें वचन. ॥ ७१ ॥

भीष्ममेवाभिरक्षन्तु

तुम्हीं रक्षावें भीष्मातेंचि । पुरे सांगणें इतुलेंचि; । आतां गति संरक्षणाची । तेचि कैसी ? ॥ ७२ ॥ जेणें जेणें मार्गें पडैल, । भीष्मावरि युद्ध येईल, । तेथें तुम्हीं स्वविद्याबळ । आश्रयावें. ॥ ७३ ॥ मार्गें घालूनि भीष्मातें, । तेणें मार्गें, तेथें, । पाहेनि अधिकारभागातें । युद्ध करावें. ॥ ७४ ॥ प्राणाचें दुर्ग कराल, । ययातें तुह्मी राखाल, । तरि महानिर्वाणीं रक्षील । हाचि तुमतें ॥ ७५ ॥ अथवा रक्षणप्रकारु । तों आनु येक असे विचारु । सागिजैल दिंगंबरानुचरु, । ऐसें म्हणे. ॥ ७६ ॥ भीष्मेंचि युद्ध करावें, । यया मार्गें पुढें तुम्हीं असावें, । घातकियापासाव रक्षावें । भीष्माचार्यातें. ॥ ७७ ॥ संग्रामु करितां दुःचिंतेपणें । झणें मागूनि येकाधा हाणे, । सव्यें वामें रक्षणें । तयापासाव तुम्हीं. ॥ ७८ ॥ पाठिरखा मोकाळिला । आणि भीष्मु येकला । वैरीं खोळे घातला । तैं काये करणें ? ॥ ७९ ॥ तरि ऐसिया सं(कष्)टांपासूनि । रक्षावें तुम्हीं ययालागूनि, । वेगळें पाठीपासूनि । जावेंचिना. ॥ ८० ॥ ना तरि आन येकें भावें । येथींचा भावार्थु जाणवे, । आचार्याप्रति स्वभावें । बोले दुर्योधनु. ॥ ८१ ॥

अयनेषु च सर्वेषु

प्रवर्ततां राजनीती । 'अनंत मार्ग तेथें असती; । त्यांमाजी प्रयोजना येती, । संग्रामविषयीं जे; ॥ ८२ ॥ आपुलाले सुजाणपणें । जो मार्गु आश्रयिला जेणें, । संग्रामीं रिपु निवु जाणे । यया हेतु; ॥ ८३ ॥ तोचि तयातें सोपानु । तेणेंचि साधे प्रयोजनु । यया-लागीं दुर्योधनु । ऐसें बोले. ॥ ८४ ॥ संग्रामीं जयो पावणें । नीतिमार्गे ऐसियाकारणें । तें सर्वही मार्ग जाणें । तयांचां ठायीं. ॥ ८५ ॥

यथाभागमवस्थिताः ।

निज योग्यते अनुसार । आपुलाले सैन्येसीं समग्र । भूमि न सोडित वीर ।

उभे असतां, ॥ ८६ ॥ देखोनि तया सेना । वेगळाली भाररचना । दुर्योधनु विज्ञापना । कैसी करी. ॥ ८७ ॥

भवंतः सर्व एव हि ।

तुम्हीं नीतिमार्गं जाणतीं, । आणि अपार सेन्यवंतीं, । येक करावें प्रस्तुतीं, । सांगिजैल जें. ॥ ८८ ॥

भीष्ममेवाभिरक्षन्तु ।

भीष्माचि येकातें तुम्हीं । रक्षावें आजि संग्रामीं;। निर्धारें हेंचि आम्हीं। मागिजत असे. ॥ ८९ ॥ जो फावैल नीतिमार्गु,। तैसाचि करावा संग्रामयोगु;। नीति सोडूनि प्रसंगु। हटाचा न करावा ॥ ९० ॥ नीतिमार्गें सैन्यें बळें। तुम्हीं पाहिजे यया रक्षिलें। आतां रक्षण म्हणितलें। तेंचि कैसें?॥ ९१ ॥ जंववरि आपणा पुरवे। तंव तैसें युद्ध संपादावें। विधिमार्गें आणि प्रभावें। सैन्यबळाचेनि. ॥ ९२ ॥ नागवे ऐसें जाल्या। पाठीसि यावें यया। मागून पुढून तया। भीष्मा रक्षावें. ॥ ९३ ॥ जेणें जेणें मार्गें रिघावा। करील तैसा तैसा रक्षावा;। जिवा वेगळा न करावा। जिवाचा जीवुं. ॥ ९४ ॥ कीं आपुलालेनि मार्गें मांडले, । आपुलालेनि सैन्यभोरें रचले, । रणीं वीर राहिले । युद्धालागीं. ॥ ९५ ॥ तयां बोले दुर्योधनु, । भीष्मु हा माझा प्राणु, । मीचि, ऐसा मानूनु । यया रक्षा. ॥ ९६ ॥ तुमचीं असती शरीरें । तंव यया न सोडावें अंतरें, । मागें पुढें आदरें । सांभाळावा. ॥ ९७ ॥ येकु जाईल बहुतांवरि । तें तुम्हीं याचांचि पदरीं। झणें येकाधासि तरि । दृष्टि करावी. ॥ ९८ ॥ साम्यें दंडें माया भेदें । परदळ भंगावें विनोदें; परि आपण तेणें प्रमादें । भुलावेंना. ॥ ९९ ॥

अयनेषु च सर्वेषु

अथवा दळाची केली रचना, । जाणोनि लोकांची धारणा, । जे जे कार्याची सूचना, । ते ते मार्ग. ॥ ७०० ॥ येकीं पुढेंचि असावें, । येकीं दोहीं भुजीं चालावें, । येकीं पाठीसि यावें । ऐसें केलें. ॥ १ ॥ दोहीं पार्श्वी काठीकार । मध्यें मध्यें कांबीकार । आडवे तिडवे वीर । येती कैसे ? ॥ २ ॥ नियमलेनि नीतिमार्गें । लोकीं वर्तावें आज्ञायोगें; । ते तेचि कीं प्रसंगें । मार्ग जाणावे. ॥ ३ ॥ ऐसे नियम सकळैक, । ते ते मार्ग अनेक, । तयां समस्तां मार्गीं लोक । तेचि कैसे ? ॥ ४ ॥

यथाभागमवस्थिताः

आपुलालेन कार्यविभागें । चालावें आपुलालेन मार्गें; । न होआवें पुढें मागें। ऐसा नियमु. ॥ ५ ॥ एवं सकळां मार्गीं वर्तते । आश्रयूनि कार्यविभागातें । न सोडित ठायातें । ठेले वीर. ॥ ६ ॥

भवंतः सर्वे एव हि

तेहीं येक करावें, । जें माझेंही वरवें, । पुढतोपुढती न पुसावें; । सांगणें येक. ॥ ७ ॥

भीष्ममेवाभिरक्षन्तु

भीष्मु मानूनि माझा ठायीं । हा रक्षावा अवघींहीं । जवळीपासिकहीं । पारिखा येऊं नेदावा. ॥ ८ ॥ ययासमवेत युद्धा जाणें, । ययासमवेत परतणें, । ययासभवंते राहणें । मार्गी आपुलाल्या. ॥ ९ ॥ आपुलेन मार्गें वर्तावें, । आपुलेनि मार्गें यावें, । जावें, आपुलेनि मार्गें राहवें । मर्यादावंतीं. ॥ १० ॥ कार्यविभाग आपुलाला । तो जयाचा तेणेंचि पाहिजे केला; । मार्गु सांडी आपुला । तो माझा वैरी. ॥ ११ ॥ तुम्हीं आपुलालेन मार्गें । आणि कार्यविभागें । पाहिजे त्यापरी अवघे । भीष्मा रक्षा. ॥ १२ ॥

अयनेपु च सर्वेपु

ना कीं कठिण भूमिका पाहोनि । सैन्याची केली मांडणी. । रक्षपाळ स्थानीं स्थानीं । सभवंते तया. ॥ १३ येकीं ठायींचि असावें, । येकीं सभवंतें फिरावें, । येकीं येका करावें । रात्रीं सावधान. ॥ १४ ॥ सैन्यासभवंतें परिस्तरण । मृत्तिका, काष्ठें, पाषाण; । अंतरीं यावयालागून । मार्ग नियमिले. ॥ १५ ॥ प्रवेशु जाल्याही अंतरीं । पावावया राजद्वारीं । संधीवसंधी परोपरी । मार्ग केले. ॥ १६ ॥ जे जे मार्ग, जीं जीं द्वारें, । तेथें रक्षक आंतु बाहिरें । पारिखा आंतु बाहेरि न चरे । मार्गी कव्हणी. ॥ १७ ॥ आतां ते मार्ग अनेक । आंतु, बाहेरि, सकळैक । तेथें तेथें लोक । तेचि कैसे? ॥ १८ ॥

यथाभागमवस्थिताः

जेथें जेथें जो ठेविला, । तया व्यापारु जो सांगितला, । तया अर्थीतु लोकु केला, । तोचि तयाचा भागु. ॥ १९ ॥ एवं मार्गरक्षकां बहुतां । स्वधर्मविभागयुक्तां । राजा म्हणे सर्वथा । हेंचि सांगणें. ॥ २० ॥

भवन्तः सर्व एव हि

तुम्हीं समस्तीं आइकावें, । सांगिजेल तें करावें; । माझें हित पाळावें । ऐस जरि. ॥ २१ ॥

भीष्ममेवाभिरक्षन्तु

आपुलालेनि निजमतें । येता जाता येथें । तुम्हीं रक्षावें भीष्मातें । दिवा रात्रौ. ॥ २२ ॥ ह्मणें हा येकटाचा येकटु । भीष्मु जाईल धीटु, म्हणौनि रक्षावा सुभटु । सर्वां प्रेरनीं. ॥ २३॥ ना जें जेणें मतें नियमिले, । जे जे धर्म जया विभागिले । श्रेष्ठाश्रेष्ठ दिधले । अधिकार जया, ॥ २४ ॥ तेहीं मर्यादावर्ती धर्मवर्ती । राखावा भीष्मु बहुतीं, । हेंचि आज्ञा, समस्तीं । मान्य करावी. ॥ २५ ॥ स्वसेन्यीं, परसैन्यीं, । दिवसा अथवा निशीमार्नी, । आसनीं, गमनीं, शयनीं, । भीष्मु रक्षावा. ॥ २६ ॥ इतुली काय याची जतन. । ऐसें बोलसील वचन, । तरि द्रोणाचार्या सांगैन । दुर्योधनु म्हणे ॥ २७ ॥ सामर्थ्यहीन सकळ । भग्न जालें आमुचें दळ । तया भीष्मेंचि येकें वळ । ऐसे जालें. ॥ २८ ॥ मृतातें आणिले प्राण । अधेर्या केलें धैर्यदान । सैन्याचे आमुचयालागून । आयुष्य हा. ॥ २९ ॥ सैन्य येणें रक्षिले, । तें आमुचें कुनाम चुकविलें, । मृता मातें उपचारिलें । अमृता वचनीं. ॥ ३० ॥ येणें आमुचीं कीर्ति । उजळिली सांगों किती. । क्षेत्रीं आम्हा हासती । चुकविलें ते. ॥ ३१ ॥ हा आत्मा हा जीवुप्राणु । आम्हा कौरवा येकु जणु, । नसता आजि तें अज्ञणू । वाचतों आम्ही ? ॥ ३२ ॥ रणवटु ययाचा मस्तकीं, । यया अधीन वर्तनें लोकीं; । भीष्मु तो मी, ऐसी कीं । बुद्धि धरावी. ॥ ३३ ॥ येका भीष्मातें रक्षणें, । ते रक्षिलें होये आह्माकारणें, । दिधलें जाणों प्राणदान । समस्तासि. ॥ ३४ ॥ येंग आहीं जीवंत, । विण येणें सर्व मृत, । देहो जीवु प्राणवत । हाचि आम्हा. ॥ ३५ ॥ ऐसें रायें बोलिलें । तव येरिकडे काये वर्तलें । तें आईके, राया, वहिलें । सांगिजेल. ॥ ३६ ॥

संजय उवाच

तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।
सिंहनादं विनद्योच्चैः शंखं दध्मौ प्रतापवान् ॥

संजय उवाच । कुरुवृद्धः

कौरवामाजीं वडील । जयें आति वृद्ध केवळ, । कुरवशींचा निर्मळ, । जुनाट, वीर. ॥ ३७ ॥ बुद्धी वाडु, वयें वाडु, । मानें वाडु, त्राणें वाडु, । ज्ञानें वाडु, गुणें वाडु, । संजयो म्हणे ॥ ३८ ॥

पितामह.

धृतराष्ट्र, दुर्योधनपिता, । तयाचा जो चुलता । म्हणौनि आजा समस्ता ।

कौरवां जो. ॥ ३९ ॥ जैसा आजा कौरवांतें । तैसाचि जो पांडवांतें, । वडीलु चुलता पंडूतें । म्हणोनियां. ॥ ४० ॥ ऐसा बहुतां काळांचा, । जुनाटु, वीरु, नामाचा । आजा कौरवां पांडवांचा । भीष्माचार्यो. ॥ ४१ ॥

प्रतापवान्

प्रतापविषयीं थोरु, । प्रकोपविषयीं रुद्रु, । विद्याविषयीं सागरु । प्रांनहीतु. ॥४२॥ जयाचेनि तपलेपणें । परदळें करपोनि जाणें, । सूर्याचेनि किरणें । भूतृणें जैसीं. ॥४३॥ अमिता बळा मिति नाहीं; । तया वर्णावें आतां कायीं? । धैर्य तें संग्रामविषयीं । कौतुक जया. ॥४४॥ बहुता काळाचा भुजंगु । सांडूनि चपळतावेगु । असे; तो शांतु बहिरंगु । आगिका दिसे. ॥४५॥ परंतु ईश्वरें न करावें, । तेणेंसीं आंग न ल्गावें, । लागल्या तो नागवे । गारुडियांही. ॥४६॥ तैसा हा जुनाटु भुजंगु । अर्जुना लागैल सवेगु, । यांसि गारुडी श्रीरंगु । जिंकोनि तयातें. ॥ ४७ ॥ ह्मणे वर्षो हाचि मेघु, । पळावया नाहीं मार्गु; । चालिला अविशेगु । असंवरु जयाचा. ॥ ४८ ॥ येणें कृष्णेसीं झुंझावें, । यापुढें काइसीं पांडवें; । परंतु परम भक्त तो नव्हे । आसुरु कहीं. ॥ ४९ ॥ जेथें हा राहे वीरु । तें ययाचा शरीरभारु, । कौरव पांडव हे परिवारु । ऐसेंचि दिसे. ॥ ५० ॥

उच्चैः सिंहनादं विनद्य

आतां भीष्माचार्यें ऐसेन । आंगवूनि आपुलें त्राण । उंचें घोपेंकरून । काये करितां जाला. ॥ ५१ ॥ सिंहाचियापरी आरोळी । देता जाला तये काळीं । ल्टणकु शब्दु अंतराळीं । सर्वत्रु जाला ॥ ५२ ॥ केलें सिंहनादें प्रगर्जन, । तया शब्दाचें थोरपण । सांगों तरि उपमान । सांपडेचिना. ॥ ५३ ॥ चौदा भुवनें गडबडिलीं, । श्रोत्रां टाळीं पडलीं । नादु न निमे पोकळीं । सहसा अपारपणें. ॥ ५४ ॥ ऐसा ठणकु सिंहनादु । करूनि भीष्माचार्यें शब्दु । काय साधी तें सावधु । आइके, राया. ॥ ५५ ॥

तस्य हर्षं संजनयन्

दुर्योधनु संतोपावा, । सैन्यातें धिंवसा होआवा, । आपुला पराक्रमु जाणावा । समस्तां वीरीं. ॥ ५६ ॥ युद्धाचा कळावा प्रारंभु, । वैरियां उपजावा क्षोभु । धकेंचि गळावा गर्भु । वैरिया दळीं. ॥ ५७ ॥ ऐसें अपेक्षूनि मानसीं । मुख्य बीज तेंचि परियेसीं । दुर्योधना रायासि । हर्षु उपजवणें. ॥ ५८ ॥ गर्जोनि सिंहनादें । अत्यंत उच्चें शब्दें, । दुर्योधनहृदय आल्हादें । भरिता जाला. ॥ ५९ ॥ हर्षु उपजवूनि दुर्योधना । पुढती आपुलिया आगवणा, । भीष्माचार्यो वीरु, जुना, । काये करिता जाला. ॥ ६० ॥

शख दध्मौ

सिंहनादाचिया़ठीं जाण । शंखाचें केलें स्फुरण । तेणें शब्दें त्रिभुवन । जालें भयाचकित ॥ ६१ ॥ अनचर्टे म्हणती काये जालें? । ब्रह्मांड का पां थरारिलें? । पुरत्रयें कोसळलें । अवधियें रचनेसीं ॥६२ ॥ विजूचा गडगडाटु कानिसा । ऐसा शब्दु या आकाशा- । माजूनि निघाला, परियसा । कासयाचा तो ॥ ६३ ॥ कौरवदळीं बोलती । भीष्में आरंभु घेतला आरी, । आता हा लावील ख्याति । पाडवातें. ॥ ६४ ॥ गजाचिया भारावरि । भीष्मु उठावला केसरी, । ना किं बकसमुदायावरि । ससाणा जैसा ॥ ६५ ॥ भीष्मु प्रवर्तला संग्रामातें । ऐसें जाणेरों आलें समस्तातें । मग तेणेंचि काळें राजे ते । काय करिते जाले? ॥ ६६ ॥

> ततः शङ्खाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।
> सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥

ततः

पाहोनि भीष्माचें चिन्ह । क्षेत्रीं माल अग्रवेजण । तयानंतरें आपण । वाते जाले ॥ ६७ ॥ नाना वाद्यविशेष । सख्या नाहीं तयास, । लक्ष आणिता भाप । टाकेचिना ॥ ६८ ॥

शङ्खाश्च

पृथ्वीपाळीं आपुलाले । आणि त्याच योद्धीं वेगळाले । कौरवदळींचेही उठिले । अपार शंख ॥ ६९ ॥ शंखातें नाहीं गणणा, । वरि वाद्यविशेषां आना । नाद करिती आगरणा । घेतले शूर ॥ ७० ॥

भेर्यश्च

भेरी वाजविली अपारा । जाणविती येरयेरा । ऐसा भेरीशब्दचि तो अंबरा- । माजी सटे ॥ ७१ ॥

पणवानकगोमुखा

पणवशब्दें ढोल, । आनक ते पैं मर्दळ, । गोमुखें काहाळा केवळ । बुरगादिक ॥ ७२ ॥ अपार यमाचे सगान । ठायीं ठायीं गर्जनी समग्न । आता वाद्या तया आनान । केसे केले? ॥ ७३ ॥

सहसैवाभ्यहन्यन्त

दुंदुभी ढोल मादळ । हे आदिकरूनि सकळ । वनवाद्यविशेष केवळ । मिश्र अमता ॥ ७४ ॥ शंख बुरगे काहाळा । इत्यादि सुस्वरा यांनी सकळा ।

सिद्ध करूनि नृपाळा। काये केलें ? ॥७५॥ येकेचि समयें ब्राह्मण, । घंनातें केलें पिटण, । आणि सुस्वरें पवनें दाटून । नादु केला. ॥ ७६ ॥ मग तीं घनें आणि सुस्वरें । वाद्यें वाजती येकसरें. । तेथें निवडला अंबरें । नफळे येकु नादु. ॥ ७७ ॥ अनिवड उठिला टणकु । अंबरीं नादु येकु; माजि तयां मेळापकु । सिंहनादांचा. ॥ ७८ ॥

स शब्दस्तुमुलोऽभवत्

तो अनिवडू शब्दु थोरला । दुमुदुमीतु गगनीं भरला,। पोकळींमाजी कोंदला, । यात्र नाहीं. ॥ ७९ ॥ तेणें नादें गर्जती, । गिरि पर्वत गडगडिती, । तेही नाद मिळती तेचि नादीं. ॥ ८० ॥ अंबर दाटलें ध्वनीं; । मुखींचा शब्दु न कळे कानीं; । ऐसा शब्दु शून्यस्थानीं अक्षयी राहीला. ॥ ८१ ॥

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ ।
माधवः पाण्डवश्चैव दिव्यौ शंखौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥

ततः

कौरवसैन्यामाझारी । वाद्यघोष जाले ययापरी; । मग तयानंतरें अवधारीं । कैसें वर्तलें. ॥ ८२ ॥ पांडवसैन्या जाणवलें । जें समस्तीं कौरवीं वाइलें; । युद्धप्रेत्ना प्रवर्तले । ऐसें जाणोनि. ॥ ८३ ॥

श्वेतैर्हयैः

शुद्ध, श्वेत, निर्मळ, । गांग जैसें सोज्वळ, । तया वर्णाचे केवळ, । ते गांगें घोडे. ॥ ८४ ॥ ऐसे शुद्ध, शुभ्र, निर्मळ, । आगळें वायूपां मेजवळ । समस्तां अवगुणांवेगळ । तेहीं घोडां. ॥ ८५ ॥

युक्ते महति स्यन्दने

युक्ते थोरलां रथीं, । अवधारीं, राया नरपति, । रत्नखचितें प्रदीप्तीं । तेजोमयीं. ॥ ८६ ॥

*स्थितौ*

येकु रथी, येकु सारथी, । महावीर दोघे असती. । ते कवण भूपति । म्हणसील जरि, ॥ ८७ ॥

माधवः पांडवश्चैव

सकळे मायेचा नियंता । येकु श्रीकृष्णु लोकत्राता, । तेथ रथीं दुसरा । तत्वता । पंडूचा नंदनु. ॥ ८८ ॥ एवं श्रीकृष्णु आणि अर्जुनु । राया पंडूचा नंदनु, । ते तिघुल्यावरूनु । काये करते जाले. ॥ ८९ ॥

क्रियौ शंखौ प्रदध्मतुः ।

देवतोमय टणक । दिव्य शंख अलौकिक । दोघे दोन्ही सम्यक । वाजविते जाले. ।। ९० ।। तयाची करावी वर्णना, । तरी मति कैंची मातें अज्ञाना ? । श्रीकृष्णु तो उपमाना । ये कैसे नि ? ।।९१।। साम्या न येती दृष्टांत; । उपमानें न गमती जेथ; । न चले योग्यतेचें मत । श्रीकृष्णु स्तविर्ता. ।।९२।। दिगंबरानुचरु म्हणे।। बोलों अपेक्षिलें माझेनि मनें । तंव वाचा त्यान्ही श्रीकृष्णें। आप विसरलिया. ।।९३।। शब्दें मौनें निमालों. । बोलों काये मी बोली ? । परतु आज्ञा जाली । यया दिगंबराची. ।।९४।। अष्टादशाध्यायी गीता । हे केवळ ब्रह्मकथा; । माजीयीप्रथमाध्याय पाहता । विषादलक्षणु. ।। ९५ ।। तरी साहित्याचेनि अंगें । परमार्थु बोलैन प्रसंगें । यथामति अहंत्यागें । अवधूतस्मरणें. ।। ९६ ।। स्वप्रकृतिगुणसाक्षित्वें । निवडला जो आत्मत्वें, । तो जीवात्मा शुद्धत्वें । बोलिजे शुद्धत्व पदार्थु. ।। ९७ ।। एवं शुद्ध त्वंपदार्थु निखळु, । तोचि अर्जुन योद्धा सबळु । तया सारथी गोपाळु । परमात्मा तो. ।। ९८ ।। अशस्त्री म्हणिजैल कैसा, । जो शुद्धु तत्पदार्थु परियसा ? । सांगैन तयाची दशा । गुणातीत. ।।९९।। कर्तृत्व, कार्य, करण, । हें गुणाचें सकळ भान. । गुणातीता अकर्तेपण । परमात्मा यातें. ।। ८०० ।। कीं उत्पत्ति, स्थिति, लय, तिन्हा । व्यापार वर्तती मायागुणीं, । तया गुणाची साडणी । करूनिया जो. ।। १ ।। एव निजप्रकृतीचे गुण । सकळा कर्मी तेचि कारण, । तया गुणाचें विसर्जन । करूनिया जो. ।। २ ।। शुद्धु तत्पदार्थु परमात्मा, । तोचि श्रीकृष्णु विज्ञानात्मा, । ऐसिया दोघा उपमा । कासयाची ? ।। ३ ।। तत्त्वपदार्थ शुद्ध दोन्ही, । आता हे मीनले जये स्थानीं । तो रथु करणू निर्वाणी । ऐसें जाणावें. ।। ४ ।। अग्निघोषु हें अभिधान, । तयाचें कैसें ज्ञान. । सांगिजैल वचन; । मानावें श्रोता. ।। ५ ।। सकार्य अज्ञानदहन । होये, तें अग्निरूप ज्ञान. । घोषु म्हणिजे स्फुरण । तयाचें जें. ।। ६ ।। अग्निघोषु तो कैसा । ज्ञानवादु जो आपैसा; । जेणें जीवेश्वर भेदु काळसा- । सहितु खचे. ।।७।। जीवेश्वरभेदहरण, । ऐसें तें कवण ज्ञान ? । तरि जहदजहल्लक्षण । जया ज्ञानाचें ? ।।८।। तरि जहदजहल्लक्षणा । स्फुरण जें अग्निरूपा ज्ञाना, । अग्निघोषु रथु सुजाणा । तोचि कळे. ।। ९ ।। तिये जहदजहल्लक्षणारूपे रथीं । जीव ईश्वर येक होती, । तरि परमात्मा सारथी । हेंचि

कैसें ? ॥ १० ॥ तरि योगसंग्रामीं कर्ता। आपुला आपणुचि तत्वता. । परंतु ययातें वागविता । पाहिजे सद्गुरु.॥ ११ ॥ वेद, शास्त्रें, पुराणें, । जया वागवावयाकारणें; । तया परमात्मयाचें हें करणें । म्हणौनि सारथी. ॥ १२ ॥ आणि कर्म करूनि ईश्वरार्पण; । भक्तीं परमात्मयाचें भजन; । विशुद्ध आत्मज्ञान पाविजत असे. ॥ १३ ॥ म्हणौनि परमात्मतंत्रें वर्ततां । जीवा ईश्वरासी ऐक्यता; । यापरी सर्वथा । सारथी कृष्णु. ॥ १४ ॥ कीं सकळइंद्रियनियामकु, । मना बुद्धीचा चाळकु,। सारथी द्वारकानायकु । अर्जुनातें. ॥ १५ ॥ ना, गुरुयुक्तीचेनि बळें । जीव तो परमेश्वरीं मिळे; । तो गुरुचि तेणें काळें । शुद्ध तत्पदार्थु. ॥ १६ ॥ यापरी शुद्ध तत्पदार्थु सारथी, । नाहीं अनुमानु ये अर्थी; । ऐसा अर्जुना द्वारकापति । वागविता झाला. ॥ १७ ॥ तरि आतां पंडु तो कवणु । जयापासाव हा अर्जुनु । शुद्ध त्वंपदार्थु आपणु । गुणसाक्षी जो ? ॥ १८ ॥ तरि अविद्येचां अंतीं । शुद्ध विद्या ते कुंती. । आतां पांडु म्हणिजे व्यक्ति । शुद्ध जयाची. ॥ १९ ॥ तो शुद्धात्मभाव पांडुरु । विद्ये कुंतीचा करी अंगिकारु; । दोघांपासाव झाला कुमरु । तो शुद्ध जीव अर्जुनु. ॥ २० ॥ अर्जुनु जीवभावें मेळा । तो तयांचां पोटीं राहिला. । बीज दाता भला । शुद्धात्मभाव. ॥२१॥ शुद्धात्मभावें विद्ये द्वारा । होणें जाणें धनुर्धरा; । तरिचि शुद्ध त्वंपदार्थु खरा । अर्जुनु तो. ॥ २२ ॥ धर्ममुख्य चौघे जण । येर ते आतां कवण ? । तरि तयांचेंही लक्षण । ययायोग्य असे. ॥ २३ ॥ शुद्धात्मस्वभावें स्वात्मधर्मु । तोचि पांडुनंदनु धर्मु, । आत्मलोपु अधर्मु । तो न साहे जया. ॥ २४ ॥ भीमु भयंकरु भेदबुद्धि । अभ्यासु जो तद्विरोधी, । जयाचेनि बळें आधि, व्याधि, । संसारु, दूरि होये. ॥ २५ ॥ तेथें निरभिमानु तो नकुळु, । अकर्ता दिसे परि सबळु; । याचेनि आधारें मेळु । साधक प्राणांचा. ॥ २६ ॥ देवसहित जया असणें, । होणें, जाणें, क्रीडणें, । तया सहदेवाकारणें । ज्ञानभाव म्हणिजे. ॥ २७ ॥ ज्योतिषां इंद्रियांतें प्रकाशी । विवेकु सहदेव ज्योतिषी, । स्थूळ प्रेत्नु जयासी । साहेचिना. ॥ २८ ॥ एवं आत्मधर्मु धर्मु जाणा, । आत्मयोगु भीमु म्हणा, । जयाचिया आंगवणा । योगसंग्रामु हा. ॥ २९ ॥ निरभिमानु तो नकुळु । कहीं नव्हे प्रेत्नशीळु; । ज्योतिषी सहदेव निर्मळु । ज्ञानभाव तो. ॥ ३० ॥ तेथही नाहीं करणी, । परंतु असावा वीरु रणीं । आधारें तयाचेनि यांचूनि । संग्रामु न कळे. ॥ ३१ ॥ अवघें साहित्य पावलें ।

तरि वारू ते कवण आथिले, । शुद्धसत्वगुण धवले । ऐसे जे का ? ॥ ३२॥ तरि पाढरा जयाचा वर्णु । तो जाणावा शुद्ध सत्वगुणु, । जाले तेणें गुणवर्ण-करूनु । ते वारू श्वेत. ॥ ३३ ॥ शुद्धसत्वभाव कवण । वारू हें जया अभिधान, । तरि तयाचेंचि लक्षण । सांगिजैल. ॥ ३४ ॥ अनात्मभावीं वृत्तित्यागु । आत्मतत्वीं अनुसंधानयोगु, । हा द्विविधु वृत्तिविभागु । शुद्धें सत्वें गुणें. ॥ ३५ ॥ असतभान सकळ । येथ त्यागवृत्ति होये शिथल. । योगसंग्रामाचें वळ । तें काहींचि न चले. ॥ ३६ ॥ यालागीं अनात्मा असत-भान । ययाचें पाहिजे निराकरण, । शुद्धें सत्वेंवाचून । हा स्वभाव कैंचा ? ॥ ३७ ॥ अनात्मतत्वाचा निरासु, । असता भानाचा हरासु, । जाला असता घ्वसु । वृत्तिमात्रतें, ॥ ३८ ॥ तेथें स्वानुसधानाकारें । वृत्ति ते जैं न स्फुरे, । तैं समाधि फावे इतरें । ऐसें न घडे. ॥ ३९ ॥ त्यागयोगज्ञानें चपळ । ते पुढील दोन्ही केवळ; । मार्गीलें धुरेचे शवल । विज्ञानें ते. ॥ ४० ॥ म्हणौनि आत्मभावीं अनुसधान, । आत्मइतरभावीं निरसन, । या दोहीं वृत्तीचि असाधारण । वेग जे का, ॥ ४१ ॥ तेचि वारू तया रथा, । श्वेत-वर्ण जे सर्वथा. । जहदजहल्लक्षणा रथा । वागवू शकती. ॥ ४२ ॥ सारथी गुरु अनतु । जो परम शुद्ध तत्पदार्थु. । शुद्ध जीवु वासनामुक्तु । अर्जुनु तो. ॥ ४३ ॥ येके रथीं इतुले जण । तरि हनुमता साहित्य कवण ? । ऐसिया परिहासवचन । बोलिजत असे. ॥ ४४ ॥ पूर्वीचें सस्कारबळ । ईश्वरानुग्रहरूपें केवळ । तोचि रामदूतु समूळ । वर्म जाणावें. ॥ ४५ ॥ ससारसागरीं बुडिला, ( जिंकिला ) । स्वधर्मे आपुला केला, । जेणें तो अर्जुनु भला । योगभ्रष्टु. ॥ ४६ ॥ आता द्रुपदी कवणी मानावी ? । तरि ते स्व-रति जाणावी. । पाची जणीं अनुभवावी । येकी निष्टा. ॥ ४७ ॥ शुद्धें त्वपदार्थे अर्जुनें । स्वनिष्ठ स्व रतीरमणें, । आता स्वात्मधर्मे तेणें । तेचि अनु-भवावी. ॥ ४८ ॥ आत्मयोगें तेथेंचि रमिजे, । आत्मबोधेंही विचरिजे, । निरभिमानता भोगिजे । तेचि स्थिति. ॥ ४९ ॥ ऐसी पाचाही जणा । येकी कांता सुलक्षणा । तीचिया पतिव्रतपणा । दूपणाचि नसे. ॥ ५० ॥ श्रीकृष्णु जो जगद्गुरु, । तो तीचा पाळकु ईश्वरु, । स्वय वाहे भारु । सर्वस्वें तीचा. ॥ ५१ ॥ स्व-रति परमात्मा अद्वैरि, । स्व-रति तेचि धारा करी, । गुरु परमात्मा साह्यकारी । जिये स्व-रतीचा. ॥ ५२ ॥ हे दुष्टा हातीं पडली । तैं दुर्गमापासूनि रक्षिली । स्व रति आपणा धाकुली । म्हणौनि ईश्वरें. ॥ ५३ ॥

ऐसे पांडव शुद्धात्मक । तयां दळींचे कवण लोक ? । ते सांगावे, कव्हणी येक । ऐसे म्हणती. ॥ ५४ ॥ तरि ययें अर्थी विचारणा । आपुली परावी सेना । साहिल्य आलें गुणा । ऐसें पाहिजे. ॥ ५५ ॥ परावे ते पृथ्वीचे राज । आपुले पांडवातें आत्मज । यापरी स्वपरभावीं काज । चाले संग्रामाचें. ॥ ५६ ॥ आतां परावे राजे ते कवण, । जे नसती आत्मजांसमान ? । आणि आत्मज आन । जे ते न होती. ॥ ५७ ॥ युयुधानु राजा येकु । प्रथम वाखाणिला टणकू, । तरि तो धर्माधर्मविवेकु ऐसें जाणावें. ॥५८॥ विराटु जो तयामागें । तो कर्मयोगु जाणावा प्रसंगें; । धर्माधर्मज्ञाना आगें । उमजला जो. ॥ ५९ ॥ तिसरा द्रुपदु तयापाठीं । तो भक्तियोगु, जाणा, गोष्टी. । कर्म भक्तिरूपें उठी । तरि ज्ञान होय. ॥ ६० ॥ विहितकर्मआचरण, । तें भक्तिरूप इश्वरार्पण, । अथवा ईश्वरभजन । तोही भक्तियोगु. ॥ ६१ ॥ तयामागें धृष्टकेतु । कर्मेचि तयाचा संकेतु. । अभ्यासयोगु विख्यातु । तो तो जाणावा. ॥ ६२ ॥ शमु, दमु, प्राणायामु, । प्रत्याहारु, सर्व नियमु, ऐसा अभ्यासयोगु उत्तमु । धृष्टकेतु तो. ॥ ६३ ॥ वैराग्ययोगु तयावरि । चेकितानु राजा तो निर्धारीं. । आतां सांडिजे बाह्यसामग्री । तो योगु नव्हे. ॥ ६४ ॥ योगीं प्रतिबंधू जेणें । तेंचि सर्वकाळ सांडणें; । मग योग्यता पावणें । अध्यात्मज्ञानीं. ॥ ६५ साहवा समर्थु काशिराजु । तो सत्संगु मानावा सत्वीजु, । जेणें द्वारें योगिराजु । आत्मा सांपडे. ॥ ६६ ॥ सत्संगें निःकामु पोपला । तो तयापासाव म्हणितला, । तरि तो पुरुजितु सांगितला । काशिराजापाठीं. ॥ ६७ ॥ निःकामें जिंकिलें पुरत्रय, निःकामें केलें स्वकार्य, । सत्संगापासाव वीर्य । यया उत्पत्ती चें. ॥ ६८ ॥ पुरुजितापाठीं सांगितला । राजा कुंतिभोजु भला, । तो अक्रोधु म्हणितला । तेणेंचि क्रमें. ॥ ६९ ॥ निःकामा अक्रोधु शरीरीं, । क्रोधु तो नाशला वैरी; । यालागीं कुंतिभोजु क्षेत्रीं । अक्रोधु जो. ॥ ७० ॥ शैब्यु तयामागें नववा । तो अदंभु सन्यु जाणावा. । कामा क्रोधांच्या अभावा । उपरि जो होये. ॥ ७१ ॥ विक्रांतु आणि युधामन्यु । द्विविधु आस्थायोगु संपूर्णु. । उत्तमौजु सुभानु । तो स्वास्थायोगु अकरावा. ॥ ७२ ॥ ऐसे हे परराष्ट्रनाथ । बहिरंगचि समस्त. । आतां अंतरंग सुत । तेचि कवण ? ॥ ७३ ॥ सुभद्रेचा जो नंदनु । जाला अर्जुनापासूनु । तो येकु अभिमन्यु । आत्मजु होये. ॥ ७४ ॥ तैसा आपणाचिमात्र जाला । सत्प्रेमु शुद्ध जीवा आपुला, । तोचि सौभद्र कथिला । अर्जुनाचा. ॥ ७५ ॥

आत्मधर्मु जो आर्थी । तो अनात्मधर्मा विरोधी, । म्हणौनि गुणीं विवित्तबुद्धी । वर्ते नित्यु. ॥ ७६ ॥ एव स्वात्मधर्मे जाला । विविक्तात्मबोधु आपुला । तो धर्मापासाव उपजला । प्रतिविंध्यु सुतु. ॥ ७७ ॥ आत्मयोगाची जव स्थिति । तव भेदाचें भानचि नाहीं. । अनुभवी जाणती प्रतीति । यया बोलाची. ॥ ७८ ॥ आत्मयोगा भीमसेना—। पासाव श्रुतसोमा जाणा, । तो द्वैताभावबवु म्हणा । भवसेन ॥७९॥ अर्जुनु शुद्धात्मा निर्वाणीं । स्वरूतिविकाशु तयापासूनि, । श्रुतकीर्ति म्हणौनि । अभिधान तया. ॥ ८० ॥ नकुळु निरभिमानी चोखडा । शतानीकु तत्पुत्र गाढा. । तो स्वरूपो परमु बो(?) गाडा । वीरु जाणावा. ॥ ८१ ॥ सहदेव तो स्वप्रकाशु । श्रुतसेनु तयाचा अशु, । तो स्वरूपान्वयप्रकाशु । सर्वेनु जाणावा. ॥ ८२ ॥ एव धर्मे प्रतिविंध्यु जाला, । श्रुतसोमा भीमा आपुला, । श्रुतकीर्ति उपजला अर्जुनें तेणें. ॥ ८३ ॥ शतानीकु नकुळाचा, । श्रुतसेनु सहदेवाचा, । आता निर्धारु ययाचा । तोचि कैसा. ॥ ८४ ॥ आत्मधर्मे विविक्तबोधु, । आत्मयोगें द्वैतच्छेदु; । आत्मशुद्धत्वें उद्बोधु । स्वरूतिविकाशाचा. ॥ ८५ ॥ निरभिमानें उपरमु, । स्वप्रकाशें मुख्य धर्मु, । आत्मान्वयोपक्रमु । सर्वेनु स्फुरे. ॥ ८६ ॥ येकालियें स्व रतीपासून । पाचाचें हे पाच ही जण. । ईवेगळें जन्मस्थान । न वर्ते तया. ॥ ८७ ॥ विविक्तात्मबोधा धाकुला, । का जो तयापाठीं उपजला, । द्वैताभाव स्फुरला । योगबळें तेणें. ॥ ८८ ॥ द्वैताभावापाठींचा । स्वरूतिविकाशु पुत्रु तीचा. । तया धाकुला गुणाचा । स्वरूपो परमु. ॥ ८८ ॥ तयापाठींचा बुद्धिवतु । अन्वयात्मबोधु विख्यातु. । स्वरतिचि यया हेतु । पाचा जणातें. ॥ ८९ ॥ अरति स्वात्मभाव विचरे । अनात्मसबधी तेथ दुसरे । तेणेंसीं वेगळीक स्फुरे । ते तयेचि क्षणीं. ॥ ९० ॥ स्व–रति स्वात्मयोगु तो निष्ठा. । निष्ठे प्रपचाभाव द्रष्टा, । विविक्तज्ञानी तो कष्टा । कैसा नव्हे ? ॥ ९१ ॥ प्रपचाभावें आत्मरति । शुद्धात्मा विचरे प्रतीती. ॥ तेथें स्वरूतिबोधा उत्पत्ति । ते कैसी न व्हावी ? ॥ ९२ ॥ स्व–रती निरभिमानु मीळे । तेथें वृत्तिसमूह मावळे. । स्वरूपो परमु तेणें काळें । सिद्धु होये. ॥ ९३ ॥ स्वप्रकाशें केवळें । सर्व आत्मा हें कैसें न कळे, । म्हणौनि स्व–रति स्वप्रकाशु मिळे । अन्वया करी. ॥ ९४ ॥ विविक्तबोधापासून । प्रपचाभावदर्शन. । प्रपचाभावेंकरून । स्वरूति उमटे. ॥ ९५ ॥ स्व–रूति जालिया उपरमु । कळे निर्विकल्पु आत्मारामु, । मग आत्मबोधें सकळु भ्रमु । आत्माचि होये. ॥ ९६ ॥ ऐसी अनुभवाची

प्रतीति । जयांतें केवळ नाथीं, । तेंचि रचना मोडिती । यया साहित्याची. ॥ ९७ ॥ न होता योगु अंतरंगु । तंव तोचि भीमु बहिरंगु. । तेथें देहप्रकृतीसीं संयोगु । घडला तया. ॥ ९८ ॥ तेचि हिडिंबा देहप्रवृत्ति, । तीपासाव घटा उत्पत्ति; । भीमपुत्रु म्हणती । दृढ निश्चयो तो. ॥ ९९ ॥ हटेंचि घालावें आसन, । हटेंचि न करावें शयन, । हटेंचि तोडावें अन्न, । करावा जयो. ॥ ९०० ॥ ऐसा हटनिश्चयो तो घटु । वीरु जाणावा उत्कष्टु । तया येसणा बलिष्टु । नाहीं कव्हणी. ॥ १ ॥ संसारवन विसंची, । करणांतें बळेंचि वंची, । मिठी नुकले तयाची । महावीरातें. ॥ २ ॥ ऐसीया ययां पांडवातें । वैरी कौरव येथें । तेंचि आता निरते । करण जाणावे. ॥ ३ ॥ तरि शुद्धदशेचा विरोधी । अभिमानु जो अविद्यासंबंधी, । तोचि दुर्योधनु विशुद्धी । धर्मद्रोही. ॥ ४ ॥ दुर्योधनपिता अंधु । धृतराष्ट्र जो प्रसिद्ध, । तयाचा साहित्यबोधु । तोचि कैसा ? ॥ ५ ॥ आपुलें यथार्थ अज्ञान । आणि परार्चे अयथार्थ ज्ञान । ना कीं अयथार्थु बोधु । अन्यथा ज्ञान स्वपरविपर्यी; ॥ ६ ॥ ऐसा अज्ञानपूर्वकु बोधु । तो धृतराष्ट्र राजा अंधु; । तयापासाव उद्बोधु । अहंभावातें. ॥ ७ ॥ तया धृतराष्ट्राची वनिता । अहंदुर्योधना माता, । ते अनात्मरति सर्वथा । ऐसें असे. ॥ ८ ॥ अन्यथा बोधें अधिष्ठिली. । अनात्मवृत्ती भोगिली, । तेणें भोक्तृत्वें उत्पत्ति जाली । अहंदुर्योधना. ॥ ९ ॥ तया अभिमानाचिया प्रवृत्ति । अन्यथा बोधाचिया उपपत्ती । शतपर्यंत होती वृत्ति । तेचि बंधुवर्ग. ॥ १० ॥ अन्यथाबोधें अनात्मरति । अभिमानाचि अंशरूपें भेदती; । तेचि दुर्योधना आपुती याती । येकोदर बंधु. ॥ ११ ॥ मी ज्ञाता, मी भोक्ता, । कर्ता, पोषकु, चेष्टकु, नियंता, । चाळकु, व्यापकु, नियमिता, । नित्य आश्रयो, ॥ १२ ॥ मी स्थूळु, मी कृशु, काणु, । मी बधिरु, मूकु, नेत्रहीनु, । पंगु, खुळा, मी सुलक्षणु, । अवलक्षणु मी, ॥ १३ ॥ मी परिग्रही, अपरिग्रही, । मी गेलों, आलों, नाहीं, । आहें, इमें देहीं, । मीचि देहो, ॥ १४ ॥ मी पिता, मी पुत्रु, । मी शिष्यु, मी गुरु, । मी आपुला, इतर । तो मी, ॥ १५ ॥ मी गृही, मी वनस्थु, । मा ब्रह्मचारी, सन्यस्तु, । मी अनर्गतु, अतीतु, । ऐसा अहंभाव; ॥ १६ ॥ मी स्त्री, पुरुषु, नपुंसकु, । मी परिवारु, मी नायकु, । मी ज्ञाना, मी मूर्खु, । साधकु सिद्धु, ॥ १७ ॥ मी मारिता, मी मरें, । मी मरण, मारणें, वैर, । मी आचारशीळु, आचारें । सुटलों मी, ॥ १८ ॥ मी भोगी,

मी त्यागी, । मी योगी, मी वियोगी, मी मार्गी, अमार्गी । माते पाहें, ॥ १९ ॥ मी दक्षु, मी शिथळु, । सूक्ष्मु मी, मी स्थूळु, । आकाश, वायो, अनळु, । अवनी, जळ, मी; ॥ २० ॥ मी जागृतु, मी निजैला, । मी उभा, बैठा, संचला, । मी मी मातें आपुला । आपणास्तव; ॥ २१ ॥ मी प्रियु, मी अप्रियु, । मी ज्ञाता, ज्ञान, ज्ञेयु, । मी जी मरें आकारामयु. । आत्मा तो मी; ॥ २२ ॥ मी वैरी, मी मित्रु, । मी सुहृदु पवित्रु, । मी भिन्नु, मी येकत्रु, । मी नरु होयें; ॥२३॥ प्रपंची मी, निःप्रपंची, । मातें मी दुजा नाहीं—चि, । मी भूमिका सर्वांचि । भासवया; ॥२४॥ अन्यथाबोधें अनात्मरती । ऐसे अहंभाव क्षुद्र उठती । तेचि बंधु बोलिजती । शत दुर्योधनाचे. ॥ २५ ॥ आतां दुर्योधनाचां दळीं । अकारा महारथी असती । मेळीं; तयांची संज्ञा बोलिली, । तेचि कैसीं? ॥२६॥ दशकु ज्ञानकर्मकरणांचा, । अकरावा चाळकु । यांचा, मन ऐसा रूपाचा । निर्धारु जया. ॥२७॥ दहा इंद्रियें, अकरावें मन । ऐसे मनरथी अकरा जण. । भारतीं केलें कथन । महावीरें. ॥२८॥ ऐसिया ययां येथूतें । आणि श्रेष्ठा दुर्योधनातें । स्त्री म्हणिजे ते न वर्ते । येकी प्रकृति. ॥ २९ ॥ जे जे प्रकृति तो तो अभिमानु । ते तो रतिरंगु आनु, । म्हणौनि सहस्रधा मनु । भोक्तयाचा. ॥ ३० ॥ पांचां येकीचि द्रुपदी । तिया समस्तां ऐक्यसमाधि. । आतां ययां अभिमानाचां भेदीं । तैसी नसे. ॥३१॥ नाना अहंकृति जैसिया । प्रवृत्ति, क्रीडाही तैसिया; । म्हणौनि अहंभावा उपजल्या । येकत्वचि नाथी. ॥३२॥ यया दुर्योधनाचा सैन्यीं । आचार्यां रजोगुणु, म्हणौनि । द्रोणाचार्यो तयालागूनि । नाम ठेविलें. ॥३३॥ रजोगुणें अनुगृहीतें । अवघी पावती रतीतें । गती स्थिती क्रीडेतें । अनायासें. ॥ ३४ ॥ आजा भीष्मु तो तमोगुणु । ये अर्थी कैसा अनुमानु? । तरि तमोगुण तो अप्रकाशमानु । स्वरूप विषयीं. ॥ ३५ ॥ स्वरूपाचेन अप्रकाशें । म्हणिजे आत्मा ज्ञानदोषें, । अन्यथाबोधु प्रकाशे । धृतराष्ट्र जो. ॥ ३६ अबोधापासाव अन्यथाबोधु; अन्यथाबोधें अभिमानु सिद्धु; । अनात्मप्रकृतीसि संबंधु । जें घडे अन्यथाबोधा. ॥ ३७ ॥ म्हणौनि दुर्योधनातें प्रपिता । भीष्माचार्यो हा तत्वता । तमोगुण सर्वथा; । नव्हे अनारिसें. ॥ ३८ ॥ यापरी रजोगुण तमोगुण । हे बळवंत येथें गहन. । अहंदुर्योधनाचें सैन्य । समर्थ तेहीं. ॥ ३९ ॥ ययासीं करितां संग्रामु । योगियाचा पुरे मनोधर्मु; । कां योगापासाव श्रमु । वाटे तया. ॥ ४० ॥ रजोगुणे, तमोगुणें. । द्रोणें आणि भीष्में तेणें । दुर्योधनाचें पाळणें । सकळ

क्षेम. ॥ ४१ ॥ कर्तेया पुरुषाचेनि आंगें । कार्यकारणसंयोगें । कामु जाला प्रसंगें । तोचि कर्णु. ॥ ४२ ॥ विषयज्ञतेचा बोधु । सूर्यो. जैसा प्रसिद्धु, । तयापासाव उद्बोधु । जया कर्णा. ॥ ४३ ॥ पंचबाणाचेनि बळें । शूळधरातें जो नाकळे । ते पंच बाण हिरिले । जयाचे कुंतिया. ॥ ४४ ॥ अविद्याअज्ञाननिवृत्ति । शुद्धविद्या, ज्ञान, कुंती । विवेकें जाली शांति । तया माराची. ॥ ४५ ॥ पंचबाणें सांडवला । कर्णु नेटकु उरला; । तयाचिया कवचकुंडलां । केला इंद्रें हरासु. ॥ ४६ ॥ कवच म्हणिजे केवळ । कामातें संस्कारबळ । जयातें भंगूं शबळ । न शकती देव. ॥ ४७ ॥ असत्संगाचीं वचनें । कुंडलें जीं कर्णभूषणें, । असंख्य बळ तेणें गुणें । कामरूपा कर्णा. ॥ ४८ ॥ एवं संस्कारु पूर्वीचा । आणि असत्सगु आतांचा । यया कवचा कुंडलांचा । हरिता इंदु. ॥ ४९ ॥ इंदु परमात्मा तत्वता । सकळकर्मफळभोक्ता । तो प्रसन्नु जाला असतां । विहितानुष्ठानें; ॥ ९५० ॥ दुष्ट संस्कार पूर्वीचा ।' क्षयो जाला तयाचा. । असत्संगु आतांचा । तो त्यागीचि न शके. ॥ ५१ ॥ ईश्वरानुग्रहें तेणें । प्राचीनें जालीं क्षीणें । सत्संगु पुरुषाकारणें । तोचि न सोडी. ॥ ५२ ॥ यापरी कवचकुंडलें । इंद्रें नेलीं पूर्वकाळें । कर्णु उरला येणें काळें । इच्छे आद्यावळीसी ॥ ५३ ॥ अभ्यासयोगी जो हटु । तोचि भीमसेनपुत्रु घटु । तो भरील तिचा घोंटु । प्राणावरूनि. ॥ ५४ ॥ प्राणायामें प्रत्याहारें । शमदमसाधनप्रकारें । स्थिति ज्ञान स्फुरे । हे करील हटु घटु. ॥ ५५ ॥ तया हटा इच्छा नाशील, । ते अधिष्ठानज्ञानें नाशैल, । येकयेकां करितां वेचैल । ऐसीं दोवें. ॥ ५६ ॥ विषयप्रबोध भास्करु । तो येईल साह्य करूं, । तरि परमात्मा सारंगधरु । सारथी येथ. ॥५७॥ परब्रह्म निर्गुण । तयाचे ठाई जया गमन, । तें धरिलें जेणें ज्ञान । लोकानुग्रहार्थ. ॥ ५८ ॥ तोचि परमात्मा गुरु । तयाचा असतां निकटाकारु, । अंतर्मुखु होईल विचारु । क्षणामात्रें. ॥ ५९ ॥ तेथ तया सूर्याचें नचले, । कर्णु मारिजैल अधिष्ठानबळें; । ऐसा वीरु तेणें काळें । कौरवांचा. ॥ ९६० ॥ हिंसेचें करी पाळण, । जयातें भजती कृपण, । कृपेचा मिषु परी ग्रसन । करी तिचें; ॥ ६१ ॥ ऐसा क्रोधु जो अगाधु, । तो कृपाचार्यो वीरु प्रसिधु; । जयाचा लागे संबंधु । तें ब्रह्मांड जळे. ॥ ६२ ॥ भंगलाचि पुढती न भंगे । लागलाचि वैरी अंतरंगें; । जयाचे बाण वेगें । प्रवेशु करिती. ॥ ६३ ॥ रोगु हें धनुष्य कठिण, ।

अविपु हेंचि संधान, । अवाच्यवाद ते बाण । येती सरसरां. ॥ ६४ ॥ हस्तक्रिया तें मल्लयुद्ध, । तेथेंचि द्रवे जें अशुद्ध, । तें तें जाणा गदायुद । रोकडेंचि. ॥६५॥ क्रूरा दृष्टी पाहणें, । अंतरीं विश्वासघातु करणें, । ते अस्त्रविद्या प्रेरणें, । सामर्थ्यें मंत्राचेनि. ॥ ६६ ॥ रुद्रातें जिंकोनि लाठा, । विष्णु न वचे जयाचिया वाटा, । सिंहावतारी येकटा । होता सांपडला. ॥ ६७ ॥ आला, आला, रे, म्हणती । ब्रह्मादिक जया कांपती । तपें जतन करिती, । पळती वसिष्ठादिक. ॥ ६८ ॥ पांचांही पांडवा येकु पुरे; । निवारी कवण यया दुसरें? । परि सद्गुरु गदाधरें । बळवंत ते. ॥६९॥ जेथ संग्रामीं रिघाला । गुणु करी आपुला; । परंतु चिरकाळ राहिला । ऐसा नव्हे. ॥९७०॥ मायायुद्धाचेनि गुणें । सितराते हें पूर्ण जाणे; । फावलें घे, परि निर्वाणें? । नेट न करी. ॥ ७१ ॥ महाविषाचा कल्लोळु, । प्रलयाग्नीचा ज्वाळु, । क्रोधु कृपाचार्यो शबळु, । कौरवांचा. ॥ ७२ ॥ आतां वीरु अश्वत्थामा । तो मदु जाणावा अस्थिरात्मा; । होतां जयाचिया अभिक्रमा । मोक्षु नासे. ॥ ७३ ॥ नव्हे शाश्वतें अश्वत्थ, । नश्वर जें कां निश्चित, । अनित्यस्वभावयुक्त । ऐसें जाणावें. ॥ ७४ ॥ ऐसी अश्वत्थामया प्रकृति; । मोहक जयाची स्थिति, । तो अश्वत्थामा म्हणती । मदु हा जो कां. ॥ ७५ ॥ द्रव्यें होये द्रव्यमदु; । राज्ये जाला तो राज्यमदु; । विद्यायोगें विद्यामदु, । मदु तारुण्याचा. ॥ ७६ ॥ आतां भोगें प्राचीन क्षर, । तदंग द्रव्य नश्वर; । द्रव्यमदातें थार । तेथ कैंची? ॥ ७७ ॥ भोगें तपसामग्री सरे, । राज्य तेणेंचि काळें वोसरे. । राज्यमदु तो खोंकरें । गळे पाणियापरी. ॥ ७८ ॥ विद्येआगळी विद्या भेटे, । विद्यामदु तेथेंचि आटे; । अशाश्वतु हा घटे । येणें आगें. ॥ ७९ ॥ तारुण्य नित्य क्षर असतां । तारुण्यमदा नाहीं नित्यता; । यापरी अनित्यु सर्वथा, । परंतु कैसा? ॥९८०॥ सर्वथा नाहीं मरण, । प्रगुन जयाचें स्थान, । स्थिति, उपजु, संहरण, । होतां जातां. ॥ ८१ ॥ जें जें कांहीं देहीं मिळे, । तदंगें उठी हा तत्काळें. । याचेनि नासे डोळे । लावूनि निजे. ॥ ८२ ॥ द्वैतसंगाचि जैं जाईल, । अद्वैत ब्रह्म उरैल, । तैं हा नाशैल तरि नाशैल; । येरव्हीं कैंचा? ॥ ८३ ॥ अमरां मदु अमरत्वाचा, । रक्तमरां आपुलिया आंगांचा । चढु मात्र द्वैताचा । तो जैं मदु. ॥ ८४ ॥ तें कासेन यया मारण । म्हणोनि अनित्या नाहीं यया मरण. । मायारूप विवरण । करितां ययाचें, ॥८५॥ राजसभे ह्याचि शोभे, । संग्रामु तो याचेनि लोभें । येकां लाभु दे अलाभें । भतवी येकां. ॥ ८६ ॥

येणें जिंकिले क्षेत्री; । ब्राह्मण ययाचे भिकारी; । जे भ्रमोनि दारोदारीं । हाचि मिरविती. ॥ ८७ ॥ शास्त्रज्ञां आंगीं संचला, । वेडाचि पुरुषु येणें केला, । दासत्व देऊनि स्थापिला । जाणता जातु. ॥ ८८ ॥ अनवधानें युद्धा करणें । भिडे तैं परावमानें. । पर्वता ऐसें मांडणें । न चलत जया. ॥ ८९ ॥ सागरा ऐसा पसरु । काल वरे वया ऐसा अंधकारु, । जयामाजी मिळे नरु । तो आप भुले. ॥ ९९० ॥ ऐसा मदु कौरवदळीं; । पांडवांतें सगळें गिळी; । परंतु परमात्मा वनमाळी । सद्गुरु तेथें. ॥ ९१ ॥ विकर्णु वीरु टणकु, । कर्णहीनु, वधिरु, मूकु, । योध्दा मत्सर नामकु । कौरवांचा. ॥ ९२ ॥ आगळी विद्या देखे । ते जें भावें आइके, । तारी सागराचेनि तुकें । पावे महिमान. ॥ ९३ ॥ आगळिये विद्येचें श्रवण । आइता परापासून । न धरी तयातें मन । वधिरु तो. ॥ ९४ ॥ नेघत वचन विचारें । उठी मत्सरु द्वेषाकारें; । बोले न घडती उत्तरें । म्हणोनि मूकु. ॥ ९५ ॥ ज्ञान नाहीं शरीरीं, । जाणतुयाचा द्वेषु करी. । मत्सरु आश्रितें मारी । पातेजौनि. ॥ ९६ ॥ नाइके म्हणोनि वधिरु, । न पुसे वाचाहीनु परु, । ऐसा जाणतयाचा मत्सरु । अल्पज्ञा आंगीं. ॥ ९७ ॥ मत्सरें वाइले पुरे, । काये करिती हातियेरें? । यया विकर्णाचेनि आधारें । सकळ कौरव. ॥ ९८ ॥ मत्सरें जिंकिले योगी, । जिंकिले देव स्वर्गीं, । मत्सरें मनुजें अवघीं । घातलीं बंदीं. ॥ ९९ ॥ सुरासुर युद्ध करिती, । परि दोघे जिंकिले जाती. । ऐसा जयो तो हातीं । मत्सरा असे. ॥ १००० ॥ निंदा धनुष्य कठिण, । वर्मवादाचे बाण, । मागें पुढें कुचरपण । ते मंत्राविद्या. ॥ १ ॥ उणी गोष्टि लावणें, । तें अग्निबीज पेरणें, । अग्न्यस्त्र म्हणणें । तयालागीं. ॥ २ ॥ उडवणें परावी उक्ति । पवनास्त्र तया म्हणती. । उणी घरी वदंती । तें वरुणास्त्र कीं. ॥ ३ ॥ अपार उपहास जाले, । ते मुद्गल, तोमर, भले । ऐसा पांडवांचीं मूळें । खाणों पाहे. ॥ ४ ॥ *सोमदत्तीचा शुद्धु । सौमदत्ती विरुद्धु; । तो दंभु अशिद्धु । पराक्रमाचा. ॥ ५ ॥* सोमु प्रकाशे विश्वंभरी, । आणि कलंक तया अंतरीं, । तो भाव मुखावरि । जाणवतु असतां. ॥ ६ ॥ आच्छादूनि तया कलंका, । निर्मळु प्रकाशु दावी लोकां, । ऐसा सोमु जो कां । ब्रह्मांडीं असे, ॥ ७ ॥ तेणें स्वभाव आपुला । आपणा ऐसाचि सृजिला । सृष्टीवरि प्रेरिला । दिधला भूतांतें. ॥ ८ ॥ सोमदत्तु तो बोलती, । युक्तु तेणें तो सोमदत्ति. । दांभिकु ऐसी युक्ति । मानावी हे. ॥ ९ ॥ तया दांभिकापासाव जाला । दांभिकां स्वभाव जो आपुला । तो दंभभाव

हाणितला । सौमदत्ती. ॥ १०१० ॥ दंभुचि कां न योजावा ? । दांभिकु भाव कां कल्पावा ? । दंभयुक्तापासाव उद्भवला । पावला जो. ॥ ११ ॥ तरि दंभु तो पुरुषाश्रयेवीण । प्रकट दावूं न शके लक्षण; । आणि लक्षण-मुक्ता कवण । जाणे दंभा ? ॥ १२ ॥ म्हणौनि दंभवंतु तो सोमदत्ती, । तयाचा स्वभाव सौमदत्ती. । पुरुषयुक्तत्वें आला व्यक्ती । तो दंभु कैसा ?॥ १३ ॥ वाहेरि दावी दातुत्व, । अंतरीं असे कृपणत्व, । पुरुषयोगें स्पष्टत्व । यया दंभलक्षणातें. ॥ १४ ॥ अंतरीं दुराचारी मन, । वाहेरि दावी कर्मठपण, । हें आश्रयेवीण लक्षण । वाहेरि न पडे. ॥ १५॥ अंतरीं दूषण यातातें, । वरि दावी निर्मळा वेषातें; । हें दंभलक्षण निरुतें । पुरुषेंचि प्रकाशलें. ॥ १६ ॥ क्रोधाचा सागरु अंतरीं । शाति विवरी वरि, । तो दंभु शरीरीं । उमटों लागे. ॥ १७॥ निश्चयो, प्रेम,नामस्मरण, । वाहेरि मांडी देवार्चन, ।तया दांभिकाचें लक्षण। चंद्रा ऐसें. ॥ १८॥ अंतरीं अनियतु चित्तें, । वाहेरि योगु दावी लोकांतें; । ऐसें लक्षण दंभातें । परि पुरुषें प्रकटे. ॥ १९ ॥अंतरीं भोगु विषयांचा, । वाहेरि वेषु त्यागाचा, । सोंग जैसा विप्राचा । वहुरूपी संपादी. ॥ १०२० ॥ ऐसा आपुला आंगीं कळंकु, । वाहेरि रंजवी लोकु, । तो स्वभाव दांभिकु । वीरु सौमदत्ती. ॥ २१ ॥ येणें जिंकिले सर्वज्ञ; । देव, ऋषि, साधुजन, । याज्ञिक, दाते, आन । तापस संन्यासी. ॥ २२ ॥ क्षेत्रियांमाजी क्षेत्री । हाचि मान्यु सर्वत्रीं; । येणेंसीं युद्ध करी । ऐसा कवणु ? ॥ २३ ॥ प्रतिष्ठा हेंचि हातीं धनु । संपादणूक युद्ध-प्रेत्नु । जया गुणा भजे जनु । बाणु तो तो. ॥ २४॥ येणें जिंकिलीं धनें. । धनंजयो कां न म्हणणें ? । लोक भजती तेणें गुणें । ईश्वरुही होये. ॥ २५ ॥ ऐसा सौमदत्ती वळियाडा । जाणावा कौरवाकडा; । जयाचा सैन्यवेढा । पुरवयातें. ॥ २६ ॥ आणिकही वहुत शूर । दुर्योधनाचे मित्र, । दुर्योधनार्थ समग्र । जे प्राणें वेंचती, ॥ २७ ॥ ते बहुविध आतां कवण ? । ऐसिया आक्षेपा, वचन । सागिजैल; सावधान । श्रोतां होणें. ॥ २८ ॥ बाह्य प्रपंचु जो सकळैकु । विचारितां पांचभौतिकु । देहादि इतरु आणिकु । आभासु जो जो. ॥ २९ ॥ येकु चरु, येक अचरु, । येकु आपणु, येकु इतरु, । येकु आपुला, येकु परु । इतरांचा कल्हणी. ॥ १०३० ॥ चौदाही भुवनांचे ठायीं । पांचभौतिकु जितुला कांहीं, । तो प्रपंचु ये अर्थी नाहीं । संदेहो तो. ॥ ३१ ॥ तया प्रपंचाचोनि संगें । उठी स्वप्रकृति गुणा आंगें; । स्वभाव वो तो निजागें । वीरूचि होये. ॥ ३२ ॥

शोका ऐसा शबळु । कवणु दुजा महाकाळु ?। जो करूं शके कवळु । शुद्धा अर्जुनाचा. ॥ ३३ ॥ मोहो, वळियांचा राणा,। प्रपंचा आंगें उपजला, जाणा. । तो कव घालील अर्जुना । रोकडीचि. ॥ ३४ ॥ प्रापंचिकु तैसाचि विषादु, । जयाचा योगियां बाधु, । जाला मग उच्छेदु । योगा होये. ॥ ३५ ॥ भयवेग, चिंतावेग । ऐसे वीर हे अभंग, । अगणित बहिरंग । अंतरंग हे.॥३६॥ दुर्योधनार्थे आपुलें जिणें । साडिलें राज्यसुख येसणें; । तयाचां काजीं प्राणें । जाण्हार जे. ॥ ३७ ॥ संकल्पविकल्प संधान, । वृत्तींचे प्रेरिती बाण, । संग्रामविषयीं प्रवीण । अत्यंत दक्ष. ॥ ३८ ॥ येहीं महारुद्र जिकावा, । महामेरु उलंडावा, । सातां सागराचा भरावा । येकु घोटु. ॥ ३९ ॥ असंवर वेग जयाचे, । अमित पुरावे बाणाचे, । मेळयावरि येकाचे । अमित होतीं. ॥ १०४० ॥ यापरी काम, क्रोध, मद, मत्सर, । दंभ, प्रापंचिक वीर, । कौरवदळींचे अपार । पराक्रमें ते. ॥ ४१ ॥ द्रोणाचार्यो रजोगुणु । तमोगुणु भीष्मु गहनु, । दुर्योधनु अभिमानु । प्रिय तयाचे. ॥ ४२ ॥ ऐसे कौरव पांडव सागितले. । आता कुरुक्षेत्र कवण म्हणितलें ?। तयाचें नाम, रूप, वेगळें । सागिजैल. ॥ ४३ ॥ कुरुक्षेत्रज्ञु, क्षेत्रद्रष्टा । तयाचें क्षेत्र हें वसैठा. । आतां तेंचि कैसें, ? प्रकटा । वाणी बोलों. ॥ ४४ ॥ धर्मक्षेत्र हें जया विशेषण, । आतां यया बोलाचें विवरण; । तरि धर्मक्षयापासून । जें कीं तारी. ॥ ४५ ॥ धर्मु म्हणिजे गुणविकारु । ययाचा जेथें फुटे अंकुरु । तेंचि क्षेत्र निर्धारु । ऐसा जाणावा. ॥ ४६ ॥ गुणांचें वाटलें स्थान । तरि प्रकृतिक्षेत्र पुरातन; । देहचतुष्टयसमान । सारिखी भूमि. ॥ ४७ ॥ अभिमाना दुर्योधना । सारथी कृष्णु हें घडेना. । गुरु न संगती अधिकारहीना । म्हणोनिया. ॥४८॥ वडीलु भाऊ कृष्णाचा । साह्यकर्ता कौरवांचा; । वळिभद्रु जो तयाचा । निर्धारु कैसा ? ॥ ४९ ॥ कृष्णु परमात्मा ब्रह्म जयीं । तियाहूनि थोर कांहीं नाहीं. । तरि तोचि अत्यंताभाव तयीं । वडीलु कृष्णा. ॥१०५०॥ आतां अभाव कौरवदळीं । तो भावा येऊं नेदी जवळी. । नामारूपाची होळी । पावती कौरव.॥५१॥ कौरवदळीं अभाव । सर्वांसि रक्षकु वाव, । तो कौरवसैन्याचा भाव । उरोंचि नेदील. ॥ ५२ ॥ सैन्याचें अभावलक्षण । अभावाचें तेंचि सैन्य. । कौरवदळा असामान्य । साह्यकर असतां. ॥ ५३ ॥ भावो तो लागोंचि नेदील, । अवघे अभावा नेतील, । यापरी कौरवां रक्षितील । अभावें पक्षींचे. ॥५४॥ अभाव वळिभद्रु स्वमेव, । अभाववृत्ति ते यादव, ।

हे कौरवांचे सर्व । करिती आपणा ऐसें.॥ ९५ ॥ पांडव ते हे ऐसे जाणा, । कौरव ते हे साच माना. । साहित्याचीं केली रचना । यथामति. ॥ ९६ ॥ आता कृष्णार्जुन येकें रथीं । शंख ते कवण वाजविती ? । तैसेचि धर्मादिक शब्द करिती । ते शंख कवण कवण ? ॥ ९७ ॥

पांचजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।
पौंड्रं दध्मौ महाशंखं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥

पांचजन्यं हृषीकेशः

पांचभौतिकु विस्तारु । जेथें समरसेनि होये येकत्रु, । तोचि निःप्रातु सागरु । परब्रह्म. ॥ ९८ ॥ कीं पाचभौतिक सकळ । जेथिंचे तरंग कल्लोळ, । तेंचि ब्रह्मार्णव निर्मळ । निजाकारें. ॥ ९९ ॥ कीं पाचा यत्नाचिया देवता । नुरती जेथ पाहता; । येकाकारें समस्ता । जाती मिळोनि. ॥ १०६० ॥ कीं धर्मादि पाचही जण । रचिले जे साहित्यकरून । लयोद्भवस्थितिस्थान । तयाचें जें. ॥६२॥ ऐसें पूर्णार्णव निर्मळ, । चिदानंदमय केवळ, । सन्मात्र, सर्वग, अखिळ, । प्रातहीन. ॥ ६३ ॥ तेंचि आपुली स्थिति । असता उल्लासे स्वप्रकृति । तें गुणाचे नद भरती, । दाटे भरितें. ॥ ६४ ॥ तें चराचराचे तरंग । पाचभौतिक आभासे जग. । भरितें वोहटे, तें अतरंग । तेंचि येकवाटे. ॥ ६५ ॥ उपक्रमोपसंहारें, । अथवा व्यतिरेकान्वयप्रकारें, । जेथें स्फुरे, संहरे । पाचभौतिक हें. ॥ ६६ ॥ तया ब्रह्मार्णवापासाव जाला । तो पांचजन्यु, शंखु आपुला । हृषीकेशें वाजविला । सकळेंद्रियनियामकें. ॥ ६७ ॥ पांचजन्या शखातें । कैसें वाजविलें गोपीनाथें ? । शब्द उमटले तेथें । तेचि कवण ? ॥ ६८ ॥ च्यान्ही वेद, ते च्यान्ही छंद, । मग तयाचे अनंत भेद, । शाखारूपें विविव । नाद उमटती. ॥ ६९ ॥ नानास्वरीं रुंजि पडे, । वेधोनि सुस्वर जाले वेडे, । बधिराचे बधिरत्व उडे । सचेर नादु. ॥ १०७० ॥ जेथें येवलया पुढती । परती ते सर्वथा नाथी. । साही अठराही दुमदुमिती । नादें जेणें. ॥ ७१ ॥ अनुग्रहरूपनाद । ते ते जयाचे भेद, । म्हणौनि सद्गुरूचे शब्द । तें स्फुरण शंखाचें. ॥ ७१ ॥

देवदत्तं धनंजयः ।

आतां धनंजयो तो अर्जुनु । शुद्ध जीव सनातनु, । तेणें वाजविला तो

आतु । कवणु शंखु ? ॥७२॥ गुरु तोचि देव ईश्वरु । श्रीकृष्णु चक्रधरु, । तेणें दिधला विचारु । स्वानुभवाचा जो. ॥ ७३ ॥ साविवेक देवदत्तें । करिता जाला स्फूर्तीतें. । शब्द उमटती तेथें । तेचि कैसे. ॥ ७४ ॥ अमृताहनि मधुरता । शब्दीं वर्षती या प्रेमामृता; । तेयिंची गोडी आइकतां । चित्ता न सोडवे. ॥ ७५ ॥ आत्मानंद हर्षकर । ऐसे जेथिंचे नाना स्वर, । जेणें श्रवणें अपार । विश्रांति होये. ॥ ७६ ॥ नादश्रवणें कां जेणें । असताचि देह विसरणें; । गुणाचिया संगा न मिळणें । गुणेंचि गुणीं. ॥ ७७ ॥ आइकतां नादु सुस्वरु । आंगातें होये पसरु. । तें माया महत्तत्व अहंकारु । प्रपंचु ग्रासे. ॥ ७८ ॥ देवदत्तु आत्मविचारु । तेणें उपजला बोधांकुरु, । तो चहूं वाचांचा भीतरु । फोडूनियां. ॥ ७९ ॥ बाह्याकाशीं प्रवर्तला । जनांतें सुखी करता जाला. । देवदत्तु शंखु वाजविला । ऐसा अर्जुनें. ॥ १०८० ॥

भीमकर्मा वृकोदरः

भीमकर्मा वृकोदरु । जैसा प्रळयकाळीं रुद्रु; । वैरियांतें असंवरु । तेणें कवणु वाइला ? ॥ ८१ ॥

पौंड्रम्

रज तम सांडूनि येकसरा । शुद्ध सात्विकें वर्णे पांढरा, । योगशंखु अवधारा । पौंड्रनामें. ॥ ८२ ॥

महाशङ्खम्

थोरांमाजी थोरपण । तें वर्ते जयालागून, । अभ्यासा आंगीं कठिणपण । तेंही असे. ॥ ८३ ॥ इंद्राहूनि महिमान, । वज्राहूनि कठिणपण, । सत्यलोकाहूनि स्थान । आगळें जयाचें. ॥ ८४ ॥ आत्मयोगाचिये स्फूर्ती । आइकोनि देव कांपती; । येसणी जयाची महंती । तो शंखु हा. ॥ ८५ ॥ धर्म, अर्थ, काम, तिन्ही । साधारण जयाहूनि, । तो महाशंखु निर्वाणीं । भीमसेनाचा. ॥ ८६ ॥ भयंकरु भीमसेनु । भयंकरु तयाचा गुणु, । भयंकरु हा गहनु, । शंखु तयाचा. ॥ ८७ ॥ कामा, क्रोधा दरारा । मदा, मत्सरा धीरा, । राजसां, तामसां समग्रां । हृदय फोडी. ॥ ८८ ॥ दंभातें लावी त्रासु, । दर्पाचा करी ग्रासु, । मत्सरु पावे नाशु । जयाचेनि घोषें. ॥ ८९ ॥ प्रपंचें न यावें दृष्टी । योग विरुवांत कावटी । सावे कां सोसणी मोटी । दुर्गमु हा. ॥ १०९० ॥ आंगाचिया आंगवणा । धरिलाचि

नवचे कल्हणा । आइकों म्हणतां मना । धाकु पडे. ॥ ९१ ॥ धरितियांतें दुस्तरु,। वैरियातें भयंकरु, । आइकतियां दुःखहरु । परि आकळेना. ॥ ९२ ॥ आत्मयोगस्पंदु ऐसा । महाशंखु हा आपैसा । भीमसेनें परियेसा । आंगवण फरूनि ॥ ९३ ॥

दध्मौ

वाजविला अतिलाणें; । गडबडिलीं तिन्हीं भुवनें; । दचकलीं दोन्हीं सैन्यें । आवातु आइकतां. ॥ ९४ ॥ जयाचा ध्वनि आइकोन । दमीं पडलें करणगण । शमीं लपालें मन । बाहिरि न पडे, ॥ ९५ ॥ पवनु ठायीं पांगुळला, । दहनु मंदता पावला, । पुरुषु जीतूचि मेला । ऐसा ठाये. ॥९६॥ आवस्था उडालिया च्यान्ही, । वाचा दाटलिया अंतरीं, । विषय हारविलें समग्रीं । करणी पहा. ॥ ९७ ॥ करितां शंखाचें स्फुरण । क्षीण व्यापारवंत गुण. । दाटूनि धरी समाधान । न सुटे तें. ॥ ९८ ॥ ऐसा श्वेतु आणि टणकु । भयंकरु, अतिभेदकु, महा मोठा शंखु । वाइला भीमसेनें. ॥ ९९ ॥

अनंतविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥

कुन्तीपुत्रो युधिष्ठिरो राजा

विये कुंतीचा नंदनु, । युधिष्ठिरु राजा सुजाणु, । स्वात्मधर्मु सनातनु । पवित्र जो. ॥ ११०० ॥

अनंतविजयम्

तेणें वाइलें विख्यातें । अनंतविजया शंखातें । तो अनंतविजयो येथें । कवणु शंखु ? ॥ १ ॥ अपारु, सनातनु, शातु, । आत्मा, अजु, अखंडितु, । सच्चिदानंद, अनंतु, । आपणचि जो ? ॥ २ ॥ तयाचा ठायीं निष्ठा जयो । ऐसा सहजभाव अव्ययो, । न चले न ढळे आश्रयो । गुणाचेनि. ॥ ३ ॥ शुद्धात्मधर्मी सहजपण, । तया सहजाचें सहज स्फुरण, । अनंतविजयो अभिधान । तया शंखाचें. ॥४॥ अनंता जया आत्मयांचा । अनंता जयो भवसर्पाचा । अनंता जयो भूतभेदाचा । आत्मधर्म स्फुरणें. ॥ ५ ॥ आत्मधर्मु जो सहजभाव, । साध्य साधन तेथें वाव; । सहजस्फुरण ठाये ठाव । जें होणें जया विशेषा. ॥ ६ ॥ तो अनंतविजयो धर्में । वाइला अति संभ्रमें, । मुक्तांचें मानस रमे । नादें तेणें.॥७॥ तो नादु उठवी साधना । सिद्धदशेमाजी गगना । व्यापतु दिसे आना । तो

न धरवे शंखु. ॥ ९ ॥ यत्नायत्न पांगुळले, । सहजात्मधर्मी दीपले, । जेहीं शब्द आइकिले । तया शंखाचे. ॥ १११० ॥

नकुलः सहदेवश्च

नकुळु तो अभिमानलयो; । सहदेव ज्ञानान्वयो; । आधीं अहंभावाचा क्षयो, । पाठीं अन्वयज्ञान. ॥ ११ ॥ एवं अभिमानवृत्तिविसरु, । वृत्तिविसरें आत्मसाक्षात्कारु, । तो सर्वत्रु भाव एकत्रु । आत्मयाचा. ॥ १२ ॥ ऐसेनि नकुळें तेणें. । आणि सहदेवें सुजाणें । शंखा केलें वाधावणें । तोचि कवण ? ॥ १३ ॥

सुघोषमणिपुष्पकौ

स्वभानलोपें नकुळें । वृत्तिलयाचेनि वळें । सुघोषाचें स्फुरण केलें । ठाइंचे ठायीं ॥ १४ ॥ गुणातीतातें आत्मस्फुरण । तेंचि सुघोषाचें वादन; । निर्मळ आत्मस्पंदन । निर्विकल्प. ॥ १५ ॥ तेणें सर्वत्र आनंदमयता, । सर्वत्र जाली चिन्मयता, । तिचाही स्पंद तत्वतां । विरोनि गेला. ॥ १६ ॥ निद्रा मारूनि ते निजणें, । जागृति असूनि जागणें, । स्फूर्ति नाशूनि स्फुरणें । आंगें आंगें. ॥ १७ ॥ तया शंखाची अमोघ ध्वनि । रिघाली साती श्रवणीं, । त्रिपुटीचा ग्रासु करूनि । स्फुरों लागे. ॥ १८ ॥ मणिपुष्पकु जो पवित्रु । ज्ञानरूपु स्फुल्लारु । निरस्ता गुणां आधारु । आत्मत्वें दे. ॥ १९ ॥ गुणातीतात्मान्वयें । निर्विकल्पचि सकळ पाहे । चिन्मय विश्व अवघें । हें स्फुरे जेणें, ॥ ११२० ॥ एवं अन्वयात्मज्ञानकळा । पुष्पित दिसे स्वलीला, । मणिपुष्पकु म्हणितला । तोचि शंखु. ॥ २१ ॥ मणिपुष्पकु शंखु सद्भावें । नादविला तो सहदेवें; । अद्वयात्मबोधु तो स्वभावें । म्हणोनिया. ॥ २२ ॥ तेणें नादें भरलें, । नादचि विश्व जालें, । भेदभाव गळाले । वैरियाचे. ॥ २३ ॥ साधूंतें परमानंद, । वंधूंतें अक्षयी बोधु, । ऐसा निर्मळु आत्मान्वयवादु । संस्थारला. ॥ २४ ॥ ऐसें जालें शंखस्फुरण । तें समस्तीं करूनि श्रवण । यथामति आपण । विबुद्ध जाले. ॥ २५ ॥ ते राजे पांडवदळींचि । स्वस्ववृत्ति शंख तयांचे । ते आपुलालेपरी प्रतिज्ञेचे । ठाठे वाजविती. ॥ २६ ॥

काश्यश्च परमेष्वासः शिखंडी च महारथः ।
धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥

काश्यश्च परमेष्वासः

सत्संगु जो कां सबीजु । महाधनुर्धारा काशिराजु, । बाणांचां प्रेरणीं सहजु । जळधरु दुजा. ॥ २७ ॥

शिखंडी च महारथः
भीष्माचार्यातें दंडी । ऐसा सत्वगुणु तो शिखंडी; । सहनविक्रमप्रौढि । हेचि जया. ॥ २८ ॥

धृष्टद्युम्नः
हर्ष जो भक्तियोगाचा । तो पुत्रसमानु शिष्यु द्रोणाचा, । अधिकाधिकु दास-त्वाचा । परम विषयो जो. ॥ २९ ॥ द्रुपदा भक्तियोगाचा नंदनु, । एवं पारमार्थिकु रजोगुणु, । महाबळ धृष्टद्युम्नु । दळवयी पांडवा. ॥ ११३० ॥

विराटश्च
कर्मयोगु तो विराटु, । सत्वशुद्धीचा जो पाटु, । योगसंग्रामी नेटु । संस्कार जेणें. ॥ ३१ ॥

सात्यकिश्चापराजितः
कर्मयोगा बळ जेणें । तो धर्माधर्मविचारु मानणें, । सात्यकी तया म्हणणें । युयुधानु जो. ॥ ३२ ॥ जिंकिला नवचे कव्हणा, । पर जिंके जो आंगवणा, । साधका हाचि दावणा । मिरवणा आधीं. ॥ ३३ ॥

द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।
सौभद्रश्च महाबाहुः शंखान्दध्मुः पृथक् पृथक् ॥ १८ ॥

पृथिवीपते ।
संजयो म्हणे पुढती, । आईक, राया, पृथ्वीपति, । आणिक शूर पुढती । पांडवांचे. ॥ ३४ ॥

द्रुपदः ।
द्रुपदु जो जाणें विका,, । क्षेत्री नागवे आणिका, । तो भक्तियोगु हे लोकां । साहित्य बुझाविजे. ॥ ३५ ॥

द्रौपदेयाश्च
पाचही द्रौपदीचे कुमर, । पांडवात्मज आले वीर, । तयाचें साहित्य समग्र । तें मागाचि कथिलें. ॥ ३६ ॥

सर्वशः
ते प्रतिविंध्यादिक समस्त, । पुढती असधारीं निश्चित, । संजयो म्हणे तेथ । आणिकु असे. ॥ ३७ ॥

सौभद्रश्च महाबाहुः
देवी सुभद्रेचा नंदनु, । नाम जयाचें अभिमन्यु, । साहित्यस्थानीं सधेनु ।

बोलिला जो. ॥ ३८ ॥ आगळिया भुजासंग्रामीं । प्रवीणु आपुला स्वधर्मीं; । सत्प्रेत्नु तो विकर्मी । लागेचिना. ॥ ३९ ॥

शंखान्दध्मुः पृथक् प्रथक्

ऐसे आपपरावे सकळैक । पांडवदळींचि जे लोक, । बोलिले यांहूनिहीं आणिक, । जे मागां कथिले. ॥ ११४० ॥ रथी, अतिरथी, महारथी, । अवघे मीनले काये करिती ? । तया अर्जुना आणि श्रीपती, । पाहोनियां. ॥ ४१ ॥ अववेचि करिती शंखस्फुरणें । येकेचि समयें येके त्राणें । आपुलालेनि महिमानें । उठावले. ॥ ४२ ॥ स्वभाववृत्तिस्फुरणें । तींचि शंखांचीं आव्राटणें; । आतां तो नादु गगनें । कैसा व्यक्तु जाला ? ॥ ४३ ॥

स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।
नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥

स घोषः

तो जो घोषु अति टणकु । अवघिया खांचा येकु, । उपजतांचि भयदात्मकु; । पुढतीं कैसा ? ॥ ४४ ॥

नभश्च

पृथ्वीपासूनि वरुतें, । तया सत्यलोकाही परुतें, । पाविजे जंव कंचुकातें । ब्रह्मांडाचिया. ॥४५॥ सात स्वर्गें जया अंतरीं । ऐसें आकाश जें, अवधारीं, । ना कीं चौदा भुवनामाझारीं । जे जे पोकळी, ॥ ४६ ॥

पृथिवीं चैव

पृथ्वीपासूनि तळु घेतां । सातही पाताळें जीं तत्वता । तेंथिचीं धरणी त्यां त्यां समस्तां । जे लोकां आधारु, ॥ ४७ ॥ ना कीं भुवनें चौदाही । कठिण पृथ्वी जे तेथें काहीं, । आणि शून्य पोकळ जें कांहीं । तें पैं व्योम, ॥ ४८ ॥ एवं ऐसिये तिये पृथ्वीतें, । आणि ऐसिया तया व्योमातें, । नादु तो आपुलेनि मतें । काय करिता जाला ? ॥ ४९ ॥

व्यनुनादयन्

प्रतिनादें नादविहु, । जडातें जाणों बोलविहु, । तेणें क्षणें वृत्तांतु । तो कैसा जाला ? ॥ ११५० ॥ पृथ्वीवरिचे समस्त । नादें गर्जती पर्वत; । तरुवर पाषाण समस्त । स्फुरोंचि लागले. ॥ ५१ ॥ जडातें जाली चेतना, । पृथ्वी हे वाजे वीणा, । पाषाण नेणों पाषाणां । पाचारिती. ॥ ५२ ॥

नादुचि नादातें झगटे । तेथें प्रतिनादु आनु उठे, । येणें प्रकारें वाटे । नानाविधु तो. ॥ ९३ ॥ पर्वतीं करिता शब्दु । जैसा उठी प्रतिनादु, । देवालयीं केला शब्दु । जैसा भेदे, ॥ ९४ ॥ शब्दें प्रतिशब्दु कपाटीं, । तळघरीं जैसा उठी, । तेणेंचि प्रकारें नादसृष्टि । नादें उपजविली. ॥ ९५ ॥ चौदाही गर्जती भुवनें, । पृथ्वी आणि गगन, जाणें; । भूतेंही प्रतिनादें तेणें । स्फुरतीं जालीं ॥ ९६ ॥ विश्वात्मा विश्वभरितु । शखु वाजविता अनंतु । नाद तो सेणेंसीं अन्वितु । म्हणोनिया. ॥ ९७ ॥ विश्वाकारें स्वयं स्फुरला, । ना कीं प्रकारु आनु जाला, । विश्वात्मेन शखु वाइला । ऐसें असता. ॥ ९८ ॥ विश्वतोमुखें नादु क्षरे । ऐसें जालें येणें प्रकारें, । एवं प्रतिनादवूनि विश्व भरें । नादु कैसा ? ॥ ९९ ॥

तुमुल

दुमदमीतु नभीं भरला, । ब्रह्मांडीं सपूर्ण कोंदला, । न भेदी कीं अवलीला । कचुकातें. ॥ ११६० ॥ प्रतिनादेंसीं तो मिळोन । पावला नादु थोरपण, । मग शखनादुचि हे खुण । नुमटे तेथ. ॥ ६१ ॥ उगाचि ध्वनि प्रचडु, । धाडाहूनि गाडु, । तया ब्रह्मांडीं पवाडु । पुरता न दिसे. ॥ ६२ ॥ तया नादाचें ठणकपण, । राया, तुजप्रति मी सांगेन, । सावधान करूनि मन । श्रवण करीं. ॥ ६३ ॥ महाप्रळयींचे मेघ । गर्जती जैसे अमोघ, । तयाहूनि येक अग । आगळेंचि नादाचें. ॥ ६४ ॥ कोटि विजूचा गडगडाटु । जैसा होये येकवाटु, । तें नादु तेथें प्रगटु । होये जेसा, ॥ ६५ ॥ ऐसा नादु गडगडिला, । तो काय करिता तेथ जाला ? । तेंचि वर्तमान, अवलीला । आइकें राया. ॥ ६६ ॥

धार्तराष्ट्राणा हृदयानि व्यदारयत्

राया धृतराष्ट्रा, तुझे कुमर । दुर्योधनादिक समग्र । आणि तया दळींचे वीर । प्रतापिये जे, ॥ ६७ ॥ तयाचीं हृदये लक्षून, । मग तयामाजी प्रवेशोन, । तीं विदारिता जाला, जाण, । नादु तो स्वयं. ॥ ६८ ॥ काळरूपी नारायणु । सत्यसकल्पी श्रीकृष्णु । तेणें कैसा कीं अनुमानु । सकल्पु केला ? ॥ ६९ ॥ तेणें सकल्पें शखु वाता । नादाकारें नेणों तत्वता', कौरवा हृदयीं प्रवेशता । जाला स्वभावें. ॥ ११७० ॥ तो सत्यसकल्पु ईश्वराचा । कौरवा हृदयीं सुखाचा । नव्हे, तो हरिता प्राणाचा । ऐसा जाला. ॥ ७१ ॥ पडताचि शब्दु श्रवणीं । येक उलडले रथावरूनि, । वारू ते पागुळ होऊनि । भुमी वैसले. ॥ ७२ ॥ सारथियें सोडिले वागोरे । जाणों तया

आलें फेंपरें, । मुरकुंडी देऊनि अवसेंर । तेणें पडिले. ॥ ७३ ॥ येक हात पाय खोडिती, । येक ते नव्हन लाविती, । कासाविस होती । कौरववीर. ॥ ७४ ॥ गळाले धनुष्यबाण, । शस्त्रें पडिलीं सुटोन, । सर्वांगीं महाभ्रमण । उपजतें जालें. ॥ ७५ ॥ टाळीं बैसली श्रवणीं, । आंधारी आली नयनीं, । स्थळ सांडिलें प्राणीं । तेणें काळें. ॥ ७६ ॥ हृदयीं कांडती साली । द्राव नाहीं मुखकमळीं; । जीतचि समग्रीं भोगिली । अवस्था मरणाची. ॥ ७७ ॥ -कितुलेनि येके काळें । अवघे सावध जाले, । रथ, वारू, आपुलाले । पाहती संयोग. ॥ ७८ ॥ संचु करूनि तो पुडती । येक येकातें पाचारिती. । काये जालें, हो ? म्हणती. । काये हा नादु ? ॥ ७९ ॥ एक बोलती वचन । मानें हें प्रळयाचें चिन्ह. । आम्हीं पूर्वीं श्रवण । केलें होतें. ॥ ११८० ॥ येक म्हणती अकाळु. । येक म्हणती कैंचा काळु ? । फुटला हा ब्रह्मांडगोळु । प्रत्यक्षु पहा. ॥ ८१ ॥ येकु म्हणती, खचलीं । चौदा भुवनें, रिचवलीं, । मेरु पडला भूतळीं । हेंचि खरें. ॥ ८२ ॥ येक म्हणती पळावें, । येक म्हणती कें जावें ? । जेथिंचें तथेंचि अवघें । विश्व मरैल. ॥ ८३ ॥ वीर दिशेतें भूलले, । पांडवांचिकडे चालिले, । येक ते लाजावले । देखोनि पार्था. ॥ ८४ ॥ येक करिती देवस्मरण, । येक न बोलती मोठेन, । येक आठविती स्वभुवन । भाखिती करुणा. ॥ ८५ ॥ धैर्य-हृदयींचें पळालें, । भय सहस्रगुणा प्रवेशलें, । हृदय फुटों आलें । तेणेंकरूनि. ॥ ८६ ॥ तेज सांडिलें क्षत्रीं. । म्हणती करा आतां मैत्री, । पराक्रमु तो अंतरीं. । कल्हणा न वर्ते. ॥ ८७ ॥ अवघे परजणी विसरले, । धनुष्यें आच्छादिते जाले, । धैर्यप्रभावें सुटले । थांवतीचिना. ॥ ८८ ॥ मागेंचि पाहती सकळ । तंव वाव न देखती केवळ । मग सर्वांगें विकळ । उभे ठेले. ॥ ८९ ॥ कितुलेंनि येकें व्यवधानें । कळलें पांडवांचें वाधावणें; । मग अधिक प्राण तेणें । सांडूं प्रवर्तले. ॥ ११९० ॥ श्रवणीं सांचळ आइकती, । आला आला पार्थु, म्हणती. । येक येकातें भिती । देखोनियां. ॥ ॥ ९१ ॥ क्षणेकु गजबु करिती, । क्षणेकु निवांत ठाती, । ऐसी पडली विस्मृति । महावीरांतें. ॥ ९२ ॥ म्हणती करा वाधावणें, । तंव अवघे सुटले त्राणें. । कोठें जाणें? काये करणें ? । हेंचि विचारिती. ॥ ९३ ॥ येक येकातें आळविती, । वारू बुजले न संवरती, । सांभाळा, सांभाळा, म्हणती । आन

येक. ॥ ९४ ॥ आपुला शब्दु आपणातें । आइकिला न वचे, तेणें मतें । उपशांति नाहीं नादातें । काये कीजे.? ॥ ९५ ॥ उगीचि आयकोनि हांक । येक म्हणती राख, राख, । येक वेळां पाहों मुख । आत्मजाचें. ॥ ९६ ॥ वाधात्रणें सर्व सरलें, । पांडव नित्रांतही ठेले, । तथापि नादु तेणें । पोकळें ग्रासिजेना. ॥ ९७ ॥ माणुसांचिवरि खु जाती, । उगेचि वीर अडखुळती, । साष्टांगीं दंडवता क्षिती । पडती वीर. ॥ ९८ ॥ हातींचें अश्व सुटलें । मग तें नव्हेचि आपलें. । गर्जी भय धरिलें, । परतले ते. ॥ ९९ ॥ सव असव तेथ न कळे, । येकाचें येका जालें । नादें जें युद्ध केलें, । तें न करवे वीरां. ॥ १२०० ॥ सर्वांगीं स्वेदु पाझरे, । चळचळां कांपती गात्रें, । वचन बोलतां तोतरे । दाटी वाचे. ॥ १ ॥ बोलतां सस्पंदे वदन; । शब्दु न फुटे तेणेंकरून, । पळों जातां चरण । आढिया घालिती. ॥ २ ॥ बैसोनि सुख नवटे, । मग तो पुरुष उठे, । उगाचि चाले वाटे । वैसे पुडती. ॥ ३ ॥ टणकु नादें वायस । दश दिशा सेविती आकाश, । शब्दु करिती असमसास । तैसें जालें. ॥ ४ ॥ परंतु ययांचेचि शब्द । ते अवघेचि निर्नाद, । न उमटतीचि भेद । तेयें नादीं. ॥ ५ ॥ सहस्र वाजती भेरी, । तो नादु भरे अंबरीं. । तेथपासीं वाजती ते परि । नाइकवे वीणा ॥ ६ ॥ नक्षत्रांची प्रभा जैसी । दिवसा न उमटे आकाशीं, । सामवे सूर्याचां प्रकाशीं । सर्वांचें तेज; ॥ ७ ॥ तैसे कौरवांचे शब्द । नादें जाले निर्नाद; । उत्तरा प्रतिउत्तरांचे भेद । तेथ काइसे ? ॥ ८ ॥ समस्त धैर्यें सुटले, । तेजें, पराक्रमें, गळाले, । विद्या वीर विसरले । संग्रामाची. ॥ ९ ॥ धैर्यव्रतें हारपलीं । ना तीं नादें हिरिलीं, । ययापरी विसंचिलीं । कौरवांचीं ॥ १११० ॥ शंखनादें ऐसें जालें । तें परमार्थदृष्टी कैसें देखिलें ? । पाहिजे कथन केलें । अवधारावें. ॥ ११ ॥ नादु जो पांचजन्याचा । तो आज्ञाप्रसादु सद्गुरूचा; । देवदत्तु अर्जुनाचा । तें बोलणें शिष्याचें. ॥ १२ ॥ एवं आक्षेप शिष्याचे । आणि परिहार गुरूचे, । शंख कृष्णा अर्जुनाचे । ऐसे स्फुरले. ॥ १३ ॥ शिष्यानुभवाचें कथन, । वरि गुरुवाक्य तया समाधान, । दोहींचा प्रमाणीं प्रमाण । वेदां शास्त्रां. ॥ १४ ॥ एवं गुरुशिष्यांचां येकांतीं । तत्वानुभवाची जे उक्ती, । तेचि शंखनाद होती । कृष्णार्जुनांचे. ॥ १५ ॥ तेथें पहिलीचि भूमिका योगाची । म्हणोनि भीमशंखु तयांपाठीचि । प्रेतनकळा आत्मयोगाची । संपादली ते. ॥ १६ ॥ वादाशरें निश्चळता ।

मना इंद्रियातें तत्वता । मग ज्ञानवृत्ति नियमितां । अविष्टार्नी, ॥ १७ ॥ अतत्वभाव संहरे, । आत्मतत्वचि केवळें उरे, । शंखु तो तयानंतरें । आत्मधर्मीचा. ॥ १८ ॥ योगाचेनि आधारें । आत्मधर्मीधर्मु स्फुरे; । अनंतविजयो खरें । तोचि शंखु. ॥ १९ ॥ सहजात्मस्थितीचें स्फुरण । योगाचेनि आंगें उत्पन्न, । अनंतविजयो अभिधान । तया शंखा. ॥ १२२० ॥ आत्मधर्मीचिये स्फूर्ती । पाहिजे नित्यत्वें स्थिति, । तरि असती दोन्ही वृत्ति । प्रेत्नाचिया. ॥ २१ ॥ येकु लयो अहंभावाचा, । भाव निर्विकल्पो स्थितीचा, । तोचि सुघोषु नकुळाचा । येकु शंखु. ॥ २२ ॥ दुसरा आत्मान्वयो गुणेंसीं । सविकल्पसमाधि म्हणिजे जयासीं, । मणिपुष्पकु निश्चयेंसीं । तो शंखु सहदेवाचा. ॥ २३ ॥ एवं व्यतिरेकान्वयस्फुरण, । संप्रज्ञातासंप्रज्ञात, ज्ञान । सुघोषु मणिपुष्पकु सुलक्षण । शंख दोन्ही. ॥ २४ । ऐसी गुरुशिष्यांची उक्ति । तिसरी आत्मयोगाची प्रवृत्ति. । चौथा आत्मधर्मु आत्मस्थिति । सहज निष्ठा. ॥ २५ ॥ व्यक्तिरेकु पांचवा वृत्तिलयो । सर्वां गुणीं आत्मान्वयो, । ऐसा आत्मानुभवें ज्ञानविषयो । संपादतु असतां. ॥ २६ ॥ तया स्वानुभवाचे साह्यकर । योगु उठिले समग्र; । तेचि शंख इतर । इतरां रायांचे ॥ २७ ॥ सत्संगाचा आधारु । प्रथमचि पाहिजे निरंतरु, । यालागीं तयाचा बडिवारु । तो शंखु काशिराजाचा. ॥ २८ ॥ वासनात्यागु; सहनशीलता, । सत्संगीं पाहिजे हा भाव पुरता; । म्हणौनि शिखंडी वाजविता । जाला तो शंखु. ॥ २९ ॥ वासनात्यागाचेनि पैसें । गुरुदास्य असावें हर्षे; । म्हणौनि तो प्रेमउत्कर्षु विशेषें । शंखु द्रौपदाचा. ॥ १२३० ॥ कर्मयोगाचा आधारु । सत्वशुद्धीतें पाहिजे अपारु, । म्हणौनि कर्मयोगव्यविचारु । नादविला विराटें. ॥ ३१ ॥ कर्तव्याकर्तव्य जाणणें । पाहिजे साधकां कारणें, । म्हणौनि तो शंखु युयुधानें । रायें वाजविला. ॥ ३२ ॥ सत्प्रेत्नाचा बडिवारु । शंखु वाजवी अभिमन्यु वीरु. । सत्प्रेत्नेंवीण इतरु । यागु तो कायी ? ॥ ३३ ॥ येणें प्रकारें सत्संगु, । आणि जाला वासनात्यागु, । गुरुभजनीं अभंगु । हर्षु तोही. ॥ ३४ ॥ विहिता कार्याचें अनुष्ठान, । योगीं कर्तव्याकर्तव्यज्ञान, । वरि सत्प्रेत्नुसाधन । संपादत असतां, ॥ ३५ ॥ अनुभवाचे स्पंद उमटती. । त्या त्या उजळाविया उक्ति । तरिचि वाटे स्वानुभूति । स्थितीचा

ठायीं. ॥ ३६ ॥ यालागीं द्रुपदीचे नंदन । शंख वाजविती पांचही जण. । तयाचेनि नादें नंदन । योगिया होये. ॥ ३७ ॥ सर्वत्र सर्वदा असंगपण, । साक्षित्वें स्फुरे ज्ञान; । ते नित्य अलिप्तता वादन । प्रतिविंध्यु करी. ॥ ३८ ॥ प्रपंचाभावदर्शन, । नामरूपनिराकरण, । योगबळें शंखस्फुरण । श्रुतसोमा करी. ॥ ३९ ॥ योगाचिये निश्रेणि । नाहीं प्रपंचाभावदर्शन, । म्हणौनि योगाधारें खूण । दुसरी अनुभवाची. ॥ १२४० ॥ स्ववृत्ति स्वस्वाकारें । स्वानुसंधान जें स्फुरे । तेंचि नित्य चतुरें । वाढविलें पाहिजे. ॥ ४१ ॥ म्हणौनि तिया वृत्ती । श्रुतकीर्ति करी स्फूर्ति. । शतानीकु वाजवी युक्ति । तो शंखु कैसा ? ॥ ४२ ॥ स्वरूपीं उपरमु वृत्तिलयो, । निर्विकल्पु आत्मा आश्रयो, । ऐसा बोधुक्षयो । तयातें नसावा. ॥ ४३ ॥ स्फुरलिये वृत्तीसि अखंडता । श्रुतसेनु होये वाजविता. । यापरी अनुभवाची प्रकटता । ते हे शंख. ॥ ४४ ॥ ऐसे ज्ञानविज्ञानपुरस्कारें । स्पंद होती आतु बहिरे. । तो नादु तेणें अंबरें । साठेचिना. ॥ ४५ ॥ अंबर तेंचि जें चिदाकाश । तयाची कैसी भाष ? । जाणताचि, जे पामरास । गोचर नव्हे. ॥ ४६ ॥ स्वप्नीं देखिजे प्रपंचभान । ज्ञातृत्व, ज्ञेय आणि ज्ञान, । तया भानातें गगन । स्थान होये. ॥ ४७ ॥ नाना भान तया आपन, । भानसहित तें गमन; । तयाचें जें मनस्थान । तेंचि खरें. ॥ ४८ ॥ मनाचें जें निरंतरपण । तेथें तत्सतया भासे गगन । मग तें गगनीं भान । तिये त्रिपुटीचें. ॥ ४९ ॥ आता तें गगन, ते त्रिपुटी, । भासे मनचि मना पोटीं. । निरंतरीं अंतर दृष्टी । पडे ते माया. ॥ १२५० ॥ दर्पणीं पदार्थ प्रतिबिंबले, । तेवीं ते आकाशीं भासले, । परि दर्पणाभावीं पाहिले । सांपडतीचिना. ॥ ५१ ॥ दर्पणाभावें प्रतिबिंबिता । आकाशा नाहीं सत्ता ; । यापरी पूर्णापोटीं रिक्तता । माया ते तें. ॥ ५२ ॥ आता अवस्थाचा पोटीं । जें भान, जे जे त्रिपुटी, । तें मायेमाजि उठी । ऐसें आभासे. ॥ ५३ ॥ माया मा या ते माया । चैतन्यचि सत्यत्व सर्व तया. । आपणचि आत्मा भासे जया । स्वरूपस्थान. ॥ ५४ ॥ स्वरूपाभाव अन्यथा भान, । येथिची त्रिपुटी ही भिन्न; । येकें आत्मचैतन्येंवीण । नसे कांहीं. ॥ ५५ ॥ जे जे अवस्थे आत्माऽभाव, । आणि द्रष्टृत्वें जे जे आत्मभाव, । आणि ज्ञानज्ञेयादि भाव । निरिस जे कां, ॥ ५६ ॥ ते आत्मचिन्मयतेचाचि पोटीं । आत्मचिन्मयताचि तेंमी उठी. । आत्मचिन्मयत्वें दृष्टी । पडे आत्मय. ॥ ५७ ॥ आता जागृति दिसे

गगन। दिसे त्रिपुटीचें भान,। तया सर्वांचें स्थान। आत्मचिन्मयता. ॥ ५८ ॥ आत्मचिन्मयतेचा पोटीं। कार्य, कारण, सर्व उठी;। चैतन्याभाव गमे दृष्टी। तो तयाचिमाजी. ॥ ५९ ॥ ऐसें चिन्मय तें,चिदाकाश,। तयाचां पूर्णत्वीं हें आकाश;। प्रतिबिंबित चोख। ऐसें जें दिसे. ॥ १२६० ॥ जयामाजी सर्व भान। तें चिन्मय चिन्मयें गगन,। जयाचेनि अभावें भान। त्रिपुटी न भासे. ॥ ६१ ॥ शून्यापोटीं भान भासे,। हें जाणतां न बोले ऐसें;। तरि शून्यचि शून्य कांहीं असे,। तेथें अशून्य. ॥ ६२ ॥ मुख प्रतिबिंबे दर्पणीं। गगन भासे नयनीं,। तेंचि वाव मानूनि। पूर्ण जाणावें. ॥ ६३ ॥ तैसें जें चैतन्यघन। तेंचि चिन्मय गगन। शंखनादातें स्थान। लयोद्भवा स्थिति. ॥ ६४ ॥ ऐसे शंख, ऐसा नादु,। ऐसा चिदाकाशीं तो शब्दु। अवघा होऊनि येकविधु। तन्मयत्वें भरला. ॥ ६५ ॥ कौरवांचीं वाजती तुरें। बहिर्मुखेंचि तीं समग्रें.। बाह्याकाशीं अपारें। करिती घोषु. ॥ ६६ ॥ मनबुद्धि-इंद्रियस्पंद,। गुणांचे वेग विविध,। ते बाह्याकाशीं शब्द। उमटों येती. ॥ ६७ ॥ आतां हें बाह्य गगन,। आणि चराचरादि दिसे भान,। हें चिदाकाशीं अकिंचन,। असत्य, सर्व. ॥ ६८ ॥ यापरी असत्य स्पंद। उमटती ते सत्या-माजी अभासती;। स्वतंत्र तेणेंसीं गमती। ऐसें न घडे. ॥ ६९ ॥ स्वप्नीं जाला मंत्रघोषु। जागृतीं आइके जै पुरुषु,। तरिचि कौरवांचा वाद्यघोषु। ये घोषीं कळे. ॥ १२७० ॥ यापरी आच्छादूनि तया। घोषा कौरवदळींचिया।। शंखनादु कौरवां तयां। काय करिता जाला ? ॥ ७१ ॥ अभिमानु जो दुर्योधनु। तयाचा काढे प्राणु। शंखनादु गहनु। चित्स्पंदु आइकतां. ॥ ७२ ॥ रजोगुणाचां देहीं। अनुरंजिजे तो भाव नाहीं.। भयें हृदयें दों ठायीं। होऊंचि लागलीं. ॥ ७३ ॥ तमोगुणाचे प्राण। करूं अपेक्षिती प्रयाण। कामा, क्रोधातें दारुण। विघ्न जाणवलें. ॥ ७४ ॥ मदें सांडी आशा,। मत्सरु सुटला अविशा,। यया दंभादिकांचा घसा। वाळोनि गेला. ॥ ७५ ॥ प्रापंचिक बहुसाल। वीर पडिले विकल;। जयाचें तया स्थूल। शरीर न सांभाळे. ॥ ७६ ॥ पारमार्थिकां पांडवां। देखोनि सुटले गर्वा.। ते प्रापंचिक प्रौढ भावा। कौरव कैसे ? ॥ ७७ ॥ पुढें होतां नाहीं धिंवसा,। निर्गमाची तुटली आशा;। तयांवेगळा यां बव्हंशा। ठावचि नाथी. ॥ ७८ ॥ मागें मुरडोनि जाणें,। ना आवेशें पुढें होणें,। घर्में मध्येचि प्राणु देणें। ऐसें जालें. ॥ ७९ ॥ पांडवीं केलें शंखस्फुरण।

तेणें भयंकर दिसे रण, । तें कुरुक्षेत्र कीं कारण । ऐसें न कळे. ॥ १२८० ॥ नादें तेणें काये केलें ? । कौरवहृदय चिदारिलें. । अभिमानादिका उपजविलें । भये आत्मधर्मकाचें. ॥ ८१ ॥ भय उपजवूनि मानसीं । प्रतिध्वनि जाली कैसी ? । तेंचि आता निर्धारेंसीं । सांगिजेल. ॥ ८२ ॥ निःशब्द, निर्विकल्प स्फुरण । तेंचि सशब्द सविकल्प होऊन । जालें चराचरीं सपूर्ण । नादरूप ॥ ८३ ॥ येथें उठावया प्रतिध्वनि । काये कारण मानावें मनीं ? । तरि समाक कपाट म्हणोनि । प्रतिनादु उमटला. ॥ ८४ ॥ परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी, । येका नादाचे प्रतिनादा च्यारी । देहचतुष्टयांचा तळवरीं । प्रतिनादु जाला ॥ ८५ ॥ नाकीं अभ्यासु घन अपार । गुणाचे पर्वत थोर । तेथें नादें प्रतिनाद अपार । उठिले जाले. ॥ ८६ ॥ यापरी शुद्ध स्फुरण, तो नादु, । तेंचि शबळ तो प्रतिनादु । तया अनंतधा भेदु । शबळा स्फुरणाचा ॥ ८७ ॥ ऐसें तें शब्दस्फुरण, । नादें कौरव निसचून, । प्रतिनादें भिन्न भिन्न । होऊनि मतभेदें, ॥ ८८ ॥ ध्वनिरूप राहिले अंबरीं । अंबर दुमदुमिलें नादु करी । आता चिदाकाशीं सर्वत्रीं । तो शब्दु स्फारला. ॥ ८९ ॥ नादें व्यापिलें चिदंबर, । नादें व्यापिलें त्रिपुर, । नादें व्यापिलें चराचर, । काये कारण. ॥ १२९० ॥ ऐसा नादु तो चिद्बोधु । चिद्रूपीं जाला प्रसिद्धु । तो जेथिंचा तेथें शब्दु । सामावला जैसा तैसाचि ॥ ९१ ॥ मग फिटुनि एक व्यवसायें । तो नादु गिळिला गगनें । कौरव म्हणती प्राणें । वांचलो आता ॥ ९२ ॥ रण सांडूनि पळावें । तरि राखिलें भीष्मदेवें । कौरवसैन्य अपार. । तें कवणें प्रकारें ? ॥ ९३ ॥ भीष्मु तमोगुण तें अज्ञान, । तेणें कळविलें अभिमान, । तयातें पडलें विस्मरण । भेदु स्वदर्शनीं ॥ ९४ ॥ पाडव कैसे ? आपण कवण ? । कैसें भविष्य ? कैसें वर्तमान ? । हें अवघेंचि विसरोन । गेले जाले ॥ ९५ ॥ आत्मा ज्ञानें पोपला । तें अहंकारमदें स्पर्शिला । यापरि कवळलागला । ते निशेष सर्व ॥ ९६ ॥ विसरोनि अवस्था पूर्वीची । कौरव सामुग्री युद्धाची । करू प्रवर्तले अज्ञानाची । ऐसी करणी ॥ ९७ ॥

अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ।
प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पांडवः ॥ २० ॥

अथ

इतुलें घर्तलें असतां । कौरवसैन्य सरसावलें, । मग तयानंतर तत्वतां । कैसें घडलें ? ॥ ९८ ॥

कपिध्वजः पांडवः

हनुमंतध्वजु अर्जुनु, । क्षेत्रियामाजीं त्रिनयनु, । नित्यस्थिति सावधानु । शुद्धात्मा जो. ॥ ९९ ॥

धार्तराष्ट्रान् व्यवस्थितान् दृष्ट्वा

राया धृतराष्ट्राचे कुमर, । आणि तयाचे वीर समग्र, । संग्रामविषयीं प्रेत्नपर । देखोनिया, ॥ १३०० ॥ अज्ञानपूर्वकु बोधु, । तेणें अहकारु तो बहुविधु. । कार्यी प्रवर्तला उच्छेदु । करूं पाहो(हे?)योगाचा.॥ १ ॥ अभिमानाचें जें करणें । तें आत्मलोपाचिकारणें. । कौरव प्रकार येणें । सरसावले. ॥ २ ॥

प्रवृत्ते शस्त्रसंपाते

येक परजितीं हातियेरा, । येक निरपती खड्गधारा, । येक धनुष्यां येकसरा । लाविती बाणु. ॥ ३ ॥ मग बाणांचे सपात, । आणि शस्त्राचे आघात । प्रवर्तले असता तेथ । कौरव करे? ॥ ४ ॥ आपुलालिया प्रवृत्ती । अभिमाना प्रवर्तती, । योगाचा विनाशु अपेक्षिती । ऐसें देखोनि. ॥ ५ ॥

धनुरुद्यम्य

राया पांडूचा नंदनु । चढवूनि धनुष्याचा गुणु । गाडीवतें उचलून । घेऊनियां ॥ ६ ॥ अवलीळांचि उभा ठाला, । परसैन्य पाहों लागला, । आत्मशुद्धत्वें जाला । साक्षी गुणाचा. ॥ ७ ॥

हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।

अर्जुन उवाच ॥

सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥

अर्जुन उवाच ॥

हे महीपते

संजयो बोले महीपाळा, । राया धृतराष्ट्रा, सुशीला, । पाहोनि तया कौरवदळा । अर्जुन तो. ॥ ८ ॥

तदा

तेणें काळें कायी॥ करिता जाला, जाणयीं । तेचि मातु आइकयी । जरि जाणों अपेक्षिसी. ॥ ९ ॥

हृषीकेशं वाक्यमाह

सकळइंद्रियनियंता, । सर्वज्ञु, सर्वकर्ता, । गोपीनाथपासीं होता । अर्जुन तयाप्रति. ॥ १३१० ॥ बोलता जाला वचन. । अहो जी कृष्णा, म्हणौन ,॥

आतां तें वाक्य कवण । हें जैं म्हणसी ? ॥ ११

इदम्

तरि आतां तुजकारणें । सांगिजेल अर्जुनाचें बोलणें. । राया धृतराष्ट्रा, जाणें । तें ऐसें हें वचन. ॥ १२ ॥

अर्जुन उवाच ॥ हे अच्युत

अर्जुन जाला विनविता. । तो म्हणे ' जी अच्युता, । आदिनारायणा, अनंता, । अवधारीं विनवणी. ॥ १३ ॥

सेनयोरुभयोर्मध्ये मे रथं स्थापय

या दोहीं सैन्यामाझारी । माझा हा रथ स्थिरु करीं. । विलंबु ये अर्थी न करीं, । वासुदेवा. ॥ १४ ॥ मागें सांडूनि आमुचें, । दळ, पुढें कौरवांचें । मध्यें अंतर दोहींचें । ऐसें हें स्थान. ॥ १५ ॥ तेथें हा रथु स्थिरु करणें । हें जें अर्जुनाचें बोलणें, । येथींचें कारण तें कवणें । साहिलें जाणावें ? ॥ १६ ॥ शुद्ध आत्मा जो अर्जुन, । प्रकृतिगुण विलक्षण, । आपुला ठायीं आपणु । स्थिति असतां. ॥ १७ ॥ आत्मधर्मे आत्मयोगें । आत्मत्वविलयें ज्ञानाआंगें । अहंदुर्योधनादिक अवघे । व्यक्त न असतीचि. ॥ १८ ॥ आत्मदृष्टी आत्मइतरु । कैसा भासेल अहंकारु ? । दीपें पाहतां अंधकारु । सांपडेना. ॥ १९ ॥ आत्मधर्मे अन्य धर्म, । ना विषयो होती अधर्म. । आतां तें याचें क्रूर कर्म । जाणवे कैसें ? ॥ १२२० ॥ शुद्धें आपुलेन आत्मयोगें । निष्टाचि जोडे प्रसंगें । परंतु गुणादिकांचें अवघें । मान नानुभवे. ॥ २१ ॥ आत्मत्वाचा जेथ ह्रासु, । तेथ तिया दृष्टी परप्रकाशु । नाहीं; परंतु गुणव्यंतु । तेचि स्फुरे. ॥ २२ ॥ आत्मान्वयबोधें नेणें । द्वैत कैसें पाहणें ?॥ यालागीं अर्जुन नेणें । स्ववृत्ती कौरवांसि. ॥ २३ ॥ शुद्धात्मा अर्जुनु म्हणे, कृष्णा, । सद्गुरु, ईश्वरा, सर्वज्ञा, । यया कौरवांची सेना । ते मातें न दिसे. ॥ २४ ॥ माझेन शुद्धत्वें मी नेणें । आतां बंधूंचेनि सन्निधानें । यया कौरवांतें जाणणें । हें जैं म्हणों, ॥ २५ ॥ तरि ते आत्मइतरां ज्ञान । उपच्छेदकचि, श्रीकृष्णाकारण । न होतीं कौरवज्ञाना । अभिमानादिक जे ॥ २६ ॥ आतां कौरवांचे रूप, नाम, । लक्षण, गुण, कर्म, धर्म, । हें आमुचें यां लोकां परम । पुसावें जैं. ॥ २७ ॥ तैं तयांचां आंगीं भाव स्वपर । ते परभावा प्रकाशकर; । तयांचें कार्य उत्तर । मानावें म्यां ? ॥ २८ ॥ धर्माधर्मज्ञु युयुधानु, । तो परधर्मुचि नेणे आपणु; । आणि पराचा प्रकाशी गुणु । तो तैसा नव्हे. ॥ २९ ॥ विराटें केली सांडणी । तो

विहित कर्मयोगू निर्वाणीं,।स्वगुणेंचि परगुण जाणोनि । जाणु जाल ।.॥ १३३०॥ तेणें अधर्मु काये जाणावा ? । परधर्मु कोठें पाहावा ? । संसारु दूरि पडावा । हेंचि चिंती. ॥ ३१ ॥ भक्तियोगा द्रुपदातें । कौरव न कळती निरुतें; । तो आपुलेनिचि मतें । असे निरंतर. ॥ ३२ ॥ अभ्यासयोगु, धृष्टकेतु, । तो तयां दूरि दूरि नांदतु; । सर्वथा नेणे सांगातु । रजतमादिकांचा. ॥ ३३ ॥ चेकिताना काये पुसणें ? । सर्वही साडिलें जेणें; । वैराग्यदृष्टी तो नेणे । यया कौरवां. ॥ ३४ ॥ काशिराजु, तो सत्संगु; । कौरवांचा नेणे मार्गु; । दूरि वैरी बहिरंगु । कौरवनाथु तया. ॥ ३५ ॥ पैला पुरुजिता निःकामातें । कामाचें ज्ञानचि न वर्ते । आणि निःकामता तेथें । पुसणें ना सांगणें. ॥ ३६॥ कुंतिभोजा अक्रोधा । कौरव नाडळती कंदा. । तयांचा मार्गुचि सर्वदा । नाश्रयीं जो ॥३७॥ शैब्यें अदंभें दंभातें।जाणिजतें तयातें.।ज्ञान तेंचि न वर्ते।आपुलां ठार्यी. ॥ ३८ ॥ अदंभा न कळे अहंकारु । कपटिया कौरवांचा विचारु; ययांचा आर्गी अपारु, । दंभु म्हणौनियां. ॥ ३९ ॥ धर्माधर्मविषयीं ज्ञान । तया न कळे धर्माधर्मज्ञान; । रात्रि जाणावया दिनमान । नये काजा. ॥१३४०॥ निहिताकरणशिळांतें । विहित नेणे निजमतें. । येक विरुद्ध येकांतें । म्हणौनियां. ॥ ४१ ॥ अभक्तधर्मु न कळे भक्ता. । कौरव जाणावे कैसे आतां ? । तयांची नेणती वार्ता । आमुचे लोक. ॥ ४२ ॥ अयोगयुक्तांची खूण । योगु तंव नेणे आपण. । साधनाप्रति असाधन । विषयो नव्हे.॥४३॥ अविरक्त कौरव सकळ, । वैराग्य नेणे तयाचें मूळ. । येकमेकांतें केवळ । वोळखतीचि ना. ॥ ४४ ॥ असत्संगाचे स्वभाव । सत्संगु नेणे ते सर्व. । जाणावे आम्ही कौरव । प्रकारें कवणें ? ॥ ४५ ॥ सकाम कौरव वैरी । निःकामु जाणे कैसियापरी? । अक्रोधा क्रोधसामग्री । जाणतां नये. ॥ ४६ ॥ दंभयुक्त ते भर्वसेन । अदंभा कैंचें त्यांचें ज्ञान. । सागतील तें अज्ञान । ज्ञानचि नव्हे. ॥ ४७ ॥ आस्थाशून्याचे सर्व । नेणे आस्था मनोभाव. । यापरी अप्रकट कौरव. । ते मारावे कैसे ? ॥ ४८ ॥ अस्वास्थेचें जें जाळें । ते स्वास्थें न होती आपुले; । तयाचें मान न कळे । ज्ञान करितां. ॥ ४९ ॥ असत्प्रेन हे सकळही । सत्प्रेत्ना पुसावे कायी ? । सौभद्रु नेणे कांहीं । कौरवां तयां ॥ १३५० ॥ विविक्तबोधा अविविक्तता । न पडे दृष्टी पाहतां. । नेणे प्रतिविंध्यु अविभक्तां । कौरवांतें. ॥ ५१ ॥ श्रुतसोमा द्वैताभाव तो । तेणें द्वैतसद्भाव, । कौरवांचा नांदता भाव । प्रपंचु जो. ॥ ५२ ॥ श्रुतकीर्ति

स्ववृत्तिप्रकाशु. । आतां कौरवां परवृत्तिप्रकाशु, । तयाचा तेणें आभासु ? कैसा जाणावा ? ॥ ९३ ॥ शतानीकु स्वरूपें परमु, । आम्हाहूनि तो उत्तमु, । अविद्यागुणाचा धर्मु । तया तो नेणें. ॥ ९४ ॥ भेदभारी कौरव । श्रुतसेनु अन्वयोभाव, । तेणें ते स्वमेव । कैसे जाणावे ? ॥ ९५ ॥ अन्वयेंचि येकत्र मीनले । परि कामु कैसा यया न कळे. । क्रोधु सांगती तें भले । मानीन मी. ॥ ९६ ॥ मदाचीं कैसीं सज्ञा । ते येकातेंही कळेना. । मत्सरु आला आगवणा । अन्वयेंचि नवोळखती. ॥ ९७ ॥ दभुचि जाणितला पुरे । प्रपचु नेणतां निर्धारें. । रजतमभाव साचोकारें । जाणतीचिना. ॥ ९८ ॥ अभिमानु जाणती सामग्री । नाहीं समस्तां शरीरीं । हे बहुसाल दूरि । कौरवातें. ॥ ९९ ॥ ययाचेनि सन्निधानें । दुर्योधनादिका मी नेणें. । दूरि पडले अति मार्वे । सगास्तव. ॥ १२६० ॥ यया सर्गे ययापासीं । मिळोनि असता, परियसीं । वासुदेवा, आम्हासि । कौरवज्ञान नव्हे. ॥ ६१ ॥ भूमिकाही युद्धाची न काळे । जालों, श्रीकृष्णा, आधळे. । कौरवरूपा न मिळे । माझी दृष्टि. ॥ ६२ ॥ आता नेणता कौरवातें । मारूं कैसे कवणे मतें ? । म्हणौनि कौरव आमुतें । कळावेचि ते. ॥ ६३ ॥ जागृतीं वैरी जाला, । तो स्वप्नीं न वचे मारिला. । सुषुप्तीं विसरीं पडिला । तें मागणें नव्हे. ॥ ६४ ॥ समस्तां अवस्थाचा ठाईं । हे वैर साधिती काहीं काहीं. । शुद्धही आपुला गेहीं । काळीं येती ॥ ६५ ॥ तेथ कळती तयाचे आघात, । परन्तु न कळे स्वरूप निश्चित, । यालागीं मारिता तेथ । फावतीचिना. ॥ ६६ ॥ अहदुर्योधनादिक अवघे । प्रतरि म्या हे दृष्टी पाहावे । वर्म जाणोनि मारावे । महावैरी. ॥ ६७ ॥ जयाची वोळखि तोंचि नाहीं, । आता मारावें तया तेणें कायी । म्हणौनिया डोळां दोहीं । पाहीन कौरव. ॥ ६८ ॥ पाहणेंचि पडिलें जीवा । तरि स्वजनसगु हा साडावा, । यालागीं रथु काढावा । सैन्यामाजूनि. ॥ ६९ ॥ कौरव पाहावयाकारणें । तयाचिमाजी रिघणें । आपुलया सैन्या भेटणें । हें पुढती न घडे. ॥ १२७० ॥ दुष्टाचा पडो न हालो । मग तीं आत्मा न सोडती ? । आत्मा सन्यस्तें मारिती । सर्व सेना ॥ ७१ ॥ भवु दुर्गम वधशाळा । येथें वासना कर्मशृखळा । घालूनि रक्षिती, गोपाळा, । तरि तैसें नको ॥ ७२ ॥ आपुलें सैन्य साडावें, । आणि ययामाजी न रिघावें । दोहींतें जाणत राहावें । मध्यप्रदेशीं. ॥ ७३ ॥ तुरीये ऐसी टेंकुली । रथु नेइजे तियेजवळी, । मग उन्नानि सर्व मी न्याहाळीं । ऐसें करणें. ॥ ७४ ॥ ज्याचेनि सर्गे जे देखावें ।

तेही संगमातें लावावे. । परंतु निवडतां फावे बरवें । ऐसें असावें. ॥ ७५ ॥ श्रीकृष्ण-नाथा, अवधारीं. । कौरव मी देखें बरवियापरी । विनविलें ऐसें करावें, श्रीहरी । म्हणौनि. ॥ ७६ ॥ ऐसें बोलणें आइकोनि । कृष्णु विचारी अंतःकरणीं, । हें खोटें चिन्ह म्हणोनि, । पुनः पुनः ॥ ७७ ॥ रजतमादिकांचेनि संगें । अहंकारा झोंबेल हा आंगें; । मग दुर्योधनादिक अवघे । माझे म्हणेल. ॥ ७८ ॥ गुणसंगोवेण नेणें तयां. । आतां गुणसंगु शुद्ध यया । शोका, ममते, मोहा तया । कारण होईल. ॥ ७९ ॥ स्वजन येणें साडिलें । मग तें नव्हे आपुलें. । जें कौरु मागें पडिलें । तें पुढें नये. ॥ १३८० ॥ स्वजनांची असंगती, । परजनांची होईल संगती, । मग आपुला आपणु पुडती । नव्हेल हा. ॥ ८१ ॥ भ्रमु पाहवया भुलणें, । तेणें भुलोनिचि तेथ जाणें । पाहान ऐसेंही नेणे । तेंचि होये. ॥ ८२ ॥ निद्रे वेंखिला वैरी, । जागणें सांडूनि तया मारी; । तो स्वप्नीं अज्ञानसागरीं । मारणेंचि विसरे. ॥ ८३ ॥ तैसा स्वसंगु सांटील । तयांची दृष्टि पडेल. । हा हीं रूपें अवलोकील । ऐसें असतां. ॥ ८४ ॥ दृष्टीदृष्टांचां येकपणीं । सुटेल शुद्धत्वापासूनि; । रजतमें मोहितु होऊनि । होईल तयांचा. ॥ ८५ ॥ ममता उपजेल येकात्मतें । मग कायि करावें शत्रुलें ? । पोटीं घाव घातकत्वें । घातला नवचे. ॥ ८६ ॥ आतां येणें ते न देखावे । ऐसें कीजेल बरवें. । परंतु वैरी ते मारावे । नेणतां कैसे ? ॥ ८७ ॥ अंधें सांडावा अमार्गु, । कैसा छेदावा भुजंगु ? । करावा पाठिलागु । वैरियां केवीं ? ॥ ८८ ॥ नपुंसकें ब्रह्मचर्य घेतलें, । वागेंद्रिय मूकें जिंकिलें, । वृक्षें ध्यान धरिलें, । तें ध्यान कायि ? ॥ ८९ ॥ जो जया गुणातें नेणे, । तो छेदिला गुणु तेणें, । ऐसें जाणतया न मने । आणि घडेही ना. ॥ १३९० ॥ म्हणौनि येणें ते जाणावे, । जाणोनि वैरी मानावे, । मानूनि समूळ मारावे, । तरीचि बरें. ॥ ९१ ॥ आतां दावणें, कीं न दावणें; । रथु नेणें, कीं न नेणे; । करणें कीं न करणें । गुणसंगी हा. ॥ ९२ ॥ ऐसें विचारूनि मानसीं । श्रीकृष्णु नियंता मायेसि । तो न विहतु प्रकृतिगुणासि, । चाल म्हणे. ॥ ९३ ॥ गारुडी विद्येचेनि बळें । सर्पु लावी मग तत्काळें. । कार्य करु, करूनि आपुलें । उतरी तया. ॥ ९४ ॥ अमृतकरें कां विहावें ? । पाहिजे तैं पोटींचें मारावें, । वर्म आहे ठावें । उठवावयाचें जया. ॥ ९५ ॥ ऐसा करूनि विचारु । कृष्णें केला अंगीकारु. । तंव पुढती धनुर्धरु । बोलता जाला. ॥ ९६ ॥

यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।
कैर्मया सह योद्धव्यमस्मिन्रणसमुद्यमे ॥ २२ ॥

योध्दुकामानवस्थितान्

अर्जुनु म्हणे, ' जी कृष्णा, । युद्धाची जयांतें कामना, । संग्रामु करणें मना । हेंचि माजी जयां, ॥ ९७ ॥ कौरव मुख्य करूनि । येऊनि राहिले जे रणीं । बाण लाविले गुणीं । करिती युद्धसामग्री, ॥ ९८ ॥

अहमेतान्यावन्निरीक्षे

आता ययांतें जंव मी पाहें, । तरि माझा रथु तेथें राहे, । ऐसें करावें यादवरायें । श्रीकृष्णें तुवां. ॥ ९९ ॥ पाहवया कवण कारण, । ऐसें बोलाल वचन; । तरि तेंचि आता येथून । बोलिजेल. ॥ १४०० ॥

अस्मिन्रणसमुद्यमे

इये रणभूमीचां ठाईं । प्रेनेवंत संग्रामविषयीं । तयामाजी आइकयीं, । गोपिनाथा. ॥ १ ॥

कैः सह मया योद्धव्यम्

कवणासीं म्यां युद्ध करणें, । आधीं कवणा पाचारणें,। धुरेचिवरि घाये घालणें। ऐसें पाहिजे. ॥ २ ॥ जेणेंसीं संग्रामु करितां । जया तोही न ये मिरवितां, । ऐसिया दुर्बला अशक्ता । पाचारूनि काये ? ॥ ३ ॥ जेणेंसीं करितां संग्रामु । हारि आली, घडला श्रमु, । तो सागतां उत्तमु । सागोंही ये. ॥ ४ ॥ ऐसोनि येकेसीं भिडावें; । ना तरि धनुष्य कासया धरावें ?। अपुरुषार्थिया हाणावें । तें विग्य जिणें. ॥ ५ ॥ आनही येकु, श्रीकृष्णा. । धूरचि ये जेथ रणा । तेथ न जिंकता, येरि सेना । जिंकिली होये, ॥ ६ ॥ उगेंचि समस्तीं पळावें, । तें छायेनेंचि पाठीं लागावें; । ऐसें होईल स्वभावें । धूर सांपडतां. ॥ ७ ॥ म्हणौनि माझया रथातें । तुवा नेइजो पा तेथें; । पाहतां फावे कौरवातें । जेथूनिया. ॥ ८ ॥ कौरव काय हे नवे ? । अवघे असतीचि ठवे, । मा आता दृष्टी पाहवे, । ऐसें म्हणाल; ॥ ९ ॥ तरि अवधारा, जी गोपिनाथा, । पाहणें नाहीं कौरवा समस्ता. । वाढलों येकयेका देखता । हे ठायेंचि असती; ॥ १४१० ॥ परंतु येथ येक पाहणें । घेतलें माझेन अंतःकरणें, । तेंचि लागैल सागणें । देवा पुढा. ॥ ११ ॥

योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।
धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥

दुर्बुद्धेर्धार्तराष्ट्रस्य

दुष्ट, दुर्मति, दुराचारी, । जन्मला धृतराष्ट्राचा उदरीं, । परतला कुळाचि-वरि । दुर्योधनु हा. ॥ १२ ॥ पापियामाजी अग्रिकु, । धर्मद्रोही, तुझा निंदकु । स्वपरहितनाशकु, । ऐसिया ययातें. ॥ १३ ॥

प्रियचिकीर्षव

प्रिय करूनि वर्तती । आणि ययातेंही प्रिय होती, । प्रीती परस्परा प्राणु देती । येकयेका. ॥ १४ ॥

अत्र युद्धे

मग दुर्योधनाचेनि, जाणा, । लोभें आपुलाली सेना । घेऊनि येथें, श्रीकृष्णा, । यये युद्धीं ॥ १५ ॥

य एते समागता.

जे आले असती राय, राणे, । आम्हासीं युद्धाकारणें, । आच्छादलीं जेहीं रणें, । भूमिका न दिसे. ॥ १६ ॥ अवघिये पृथ्वीचे भूपाळ । अवघे येक-वाटले सबळ । महाप्रतापिये, निर्मळ, । युद्धकर्ते. ॥ १७ ॥

योत्स्यमानान्

ऐसे झुझार वरे । राजे जे कीं 'परावे । म्हणती जे युद्ध करावें, । समस्ता तयातें. ॥ १८ ॥

अवेक्षेहम्

निवाडें मी पाहीन । मजसीं जुझार ते कवण, । इतुलेंचि अपेक्षी मन । पासाव तुम्हां. ॥ १९ ॥ एव कौरवदळींचे वीर, । दुर्योधनातें प्रियकर, । परावे राजे अपार । शूर जे जे ॥ १४२० ॥ आले असती यया रणा, । पाहीन तया समस्ता जणा, । इतुलेंचि मागणें तुम्हा, । कृष्णा गोकुळ-पति. ॥ २१ ॥ जव मी पाहें तयातें । तव रथसहिता मातें । नेऊनि दावूनि समस्तातें । सर्वेंचि आणा. ॥ २२ ॥ ऐसें अर्जुनाचें बोलणें । विचारु नारायणें । घेतलें परमार्थें जेणें, । तें साहित्य कैसें ? ॥ २३ ॥ अनात्मका नाहीं सत्ता । तयातें पाहों अपेक्षितां, । आत्मा आपुली आत्मसत्ता । ती चालों युपावे. ॥ २४ ॥ आत्मलोपाचेनि आगें । येकदेशी ते आपणु जागे, । ते स्वरूपीं दृश्य अनवे । देखें स्वसत्तया ॥ २५ ॥ जागृति साडूनि निजेला, । तो आपण यया गाहाळला, । स्वप्नाकारें उमटला । देखें दिसे. ॥ २६ ॥ यापरी असताचें भान । पाविजे आत्मलोपेंकरून, ।

तरि कृष्णु म्हणे स्वस्थान । सांडावेंचि कीं ॥ २७ ॥ असतां नाहीं प्रकाशु । आणि जाणावा तयांचा भासु; । तरि आपुला आपण चिद्विशेषु । आच्छादावा. ॥ २८ ॥ आपुलें देखणें माल्हवूनि । स्वप्नीं माणुसें देखाणीं । करूनि देखावीं म्हणौनि, । हेंही तैसेंचि. ॥ २९ ॥ स्वगुणसहित अधिष्ठान, । तें दष्टीमार्गे घालून । सैन्य जें स्वप्रकाशमान, । हरी परप्रकाशा. ॥ १४३० ॥ मग आपणावरिची काढावी, । इतर भावीं आरोपावी; । मग तेथें दिसे देखों दावी । आपुलीचि तया. ॥ ३१ ॥ दृश्य दृश्याकारें भासे, । देखणें तयाचें होऊनि घसे, । द्रष्टा द्रष्टेनें प्रकाशे । तो आत्मचिन्मात्रतया. ॥ ३२ ॥ आपणां आपुल्यां विसरणें, । तरिचि कौरवां पाहणें. । चांगचि हें मनें । घेतलें अर्जुनाचेनि. ॥ ३३ ॥ स्वरूप, स्वस्थान, स्वदर्शन, । सांडावेंचि लागेल येथून; । ना तरि अहंदुर्योधनाचें ज्ञान । होईल कैसें ? ॥ ३४ ॥ आणि अहंदुर्योधन मित्र, । अरि षड्वर्ग राजे अपार, । योगसंग्रामातें समग्र । आले जे कां. ॥ ३५ ॥ तयांमाजी कवण योद्धे ? । कवण वधतों कवणाचेनि वधें ? । हें आधीं न बोधे, । तंव संग्राम कायी ! ॥ ३६ ॥ कवणु कैसा जिंकावा, । कवणु मुख्यु पाचारावा, । कवणावरि न घालावा । आपण हातु. ॥ ३७ ॥ कवणेसीं भिडतां कीर्ति, । भिडतां कवणेसीं अकीर्ति, । ऐसी जाणीव, ते निरुती । बोज संग्रामाची. ॥ ३८ ॥ न करितां घात तमोगुणा, । आपणा आपुलिया अज्ञाना । संकल्पुचि आधीं आंगवणा । काये मारावा ? ॥ ३९ ॥ रजोगुणु तैसाचि देहीं । वरि विषयतोपु मारणें कायी ? । रजोगुण पडतां घाई, । तो सहज पडेल. ॥ १४४० ॥ कामु न वचतां मारिला, । ध्वंसिंगुचि आधीं हाला; । तो कवण उवेगा आला । त्यागु तैसा ? ॥ ४१ ॥ क्रोधु असतां आंगेसीं । हाणिजे न्यासें आश्रमासि; । वरि कामु बळिया तयासि । आकळूं न शकिजे. ॥ ४२ ॥ तैसा संगपु म्हणावा ना । संगतांचि लाजिरवाणा; । ययालागीं अर्जुना । बरवें कळलें. ॥ ४३ ॥ भोगु ठेवूनि संगु मारणें, । दंभु ठेवूनि प्रपंचु सांडणें, । मधु आंगेसीं; वरि हाणणें । असत्संगा. ॥ ४४ ॥ मत्सरु लागला सत्संगा । आपणु लागे शोका मागां; । तेणें वैरी तो जोगा । आपण नव्हे. ॥ ४५ ॥ यापरी नेणोनि युद्ध-करणें । तें श्रमचि तयाकारणें । बोलतां लाजिरवाणें । क्षेत्रिपाप्रति. ॥ ४६ ॥ कामु जिंकावा निर्वासनें, । क्रोधु जिंकावा सहनें, । रजोगुणु शानें, । ऐसी

मर्यादा. ॥ ४७ ॥ ऐसियें नीतीतें जाणता । पार्थुचि काये तत्वता । म्हणौनि अपेक्षी मागुता । क्षेत्रीं पार्हो. ॥ ४८ ॥ समुदाय पाहिजे अवघा । तंवचि रथु तेथें ठेवावा; । सर्वेचि काढूनि आणावा । ऐसा भाव. ॥ ४९ ॥ तरि कौरव हे असद्गुण । वाधील तयाचें सन्निधान. । आत्मविषयीं मौन । पडैल तें. ॥ १४५० ॥ तैंचि आताचि चिंता । रथु काढावा म्हणे मागुता, । इतुल्यात्वरि नेणता । कैसा अर्जुनु? ॥ ५१ ॥ सर्गे पडैल अज्ञान, । तैसेंचि होईल तें मन; । परतोनि पाहवें हें ज्ञान । लोपु पावैल. ॥ ५२ ॥ मग तै चालैल काये? । याला-गीं आताचि प्रार्थितु आहे. । अर्जुनु हा तैसा नोहे, । जो परमार्थु साडी. ॥ ५३ ॥ अर्जुनाचा जैं मी सारथी । तें याची गति माझां हातीं. । मार्गामार्ग तें मज-प्रति । असती ठावेचि, ॥ ५४ ॥ तरि काय एक येणें न देखावें, । कासया अर्जुना विहावें, । असो चढउतार ते अवघे । जाणें मीं गुरु. ॥ ५५ ॥ ययाची शुद्रता आच्छादीन, । गुणाची दृष्टि लावीन, । क्रूर कौरव असज्जन । दावावे या. ॥ ५६ ॥ साडूनि आपुलिया भूमिकेतें । आणी दृष्टि मार्गे स्वसे-न्यातें; । त्याचेंही ज्ञान ययातें । न पवतें करीन. ॥ ५७ ॥ आत्मज्ञानें इतर ज्ञान । तें करीन येथ प्रमाण, । बाधिती सग दारुण । निवारीन ते. ॥ ५८ ॥ ऐसें विचारूनि मानसीं । मनेंचि आश्वासी पार्थासि । वा रे, वासना हे आवैसि. । पुरवीं आपुली. ॥ ५९ ॥

संजय उवाच

एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥
भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षितां ।
उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥

संजय उवाच

*इतुलें प्रवर्तलें असता । माडली पुढें कैसी कथा, । सजयो जाला अनुवादता ।* राये धृतराष्ट्रेसि. ॥ १४६० ॥

हे भारत

सजयो बोलें पवित्रा, । राया भारतकुळप्रवरा, । चित्त देईं, धृतराष्ट्रा, । माझां वचनीं. ॥ ६१ ॥

गुडाकेशेन ।

गुडाका, निद्रा, जे तत्वता । तिचा ईशु जो जिंकता, । जितनिद्रु पार्थु सर्वथा । ऐसेनि तेणें, ॥ ६२ ॥

एवमुक्तो हृषीकेशः

येणें प्रकारें हृषीकेशु । विनविला जो द्वारकाधीशु, । तो श्रीकृष्णु जगन्निवासु । काय करिता झाला ? ॥ ६३ ॥

उभयोः सेनयोर्मध्ये

आपपरावीं दळें दोन्हीं । केवळ ययांचा मध्यस्थानीं । भूमिका वरवी लक्षूनि । तये ठायीं ॥ ६४ ॥

भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षितां प्रमुखतः

भीष्मा आणि द्रोणासि । सन्मुख सकळां रायांसि । शंका न धरितां पार्सी । नेऊनि कौरवां ॥ ६५ ॥

रथोत्तमं स्थापयित्वा

रथामाजी जो उत्तमु । अर्जुनरथु परमु । तयातें तो आत्मारामु । स्थापूनियां. ॥ ६६ ॥

हे पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति उवाच

श्रीकृष्णु बोले सुभक्ता, । अवधान देईं पार्था, । कुंतीनंदना प्रतापवंता, । सुभद्रापति. ॥ ६७ ॥ वैरी कौरव मीनले, । भीष्मण उभे राहिले । राजे पृथ्वीचे वेगळाले । यये रणीं. ॥ ६८ ॥ ययां समग्रांतें तूं पाहें. । जैसी जैसी वासना होये, । तैसा तैसा श्राति लाहे । दृष्टीचेन. ॥ ६९ ॥ ना परि ऐसें अर्जुना । नव्हे जाणा सुजाणा. । भयें व्यापिलें मना । वरि जें पाहणें. ॥ १४७० ॥ तुज ऐसा वीरु । प्रतापिया जुंझारु । करूं शकसी मेरु, । उपराठा हा. ॥ ७१ ॥ कायिसीं कौरवें बापुडीं । एसणी आंगीं असतां प्रौढी, । भय तें देशू निवडी, । पांडुनंदना. ॥ ७२ ॥ आन एक परियसीं. । सांगों काये तूं नेणसी । मी जो असे पार्सी । तो पां कैसा ? ॥ ७३ ॥ आत्मा यया विश्वाचा । तो कैसा नव्हे कौरवांचा ? । भीष्मा आणि द्रोणाचा, । पांडुपुत्रा. ॥ ७४ ॥ सकळ पृथ्वीचे राय, राणे । ययांचा आत्मा मीचि जाणें. । यये अर्थी बोलणें । असे वेदाचें. ॥ ७५ ॥

प्राणस्य प्राण उत चक्षुषश्चक्षुः

ऐसें हें वेदाचें वचन । यचना माझां यया प्राण । म्हणौनि आतां सांगैन । तें मानीं सत्यत्वें ॥ ७६ ॥ प्राणपंचकाचा मी प्राणु, । प्राणपंचकु मज

अधीनु, । प्राणां प्राणत्व मजपासूनु । सत्तारूपा. ॥ ७७ ॥ माझोनि अर्जुना, आधारें । चेष्टे प्राणसमूह चारें. । धरी सकळें. शरीरें । ते माझी सत्ता. ॥ ७८ ॥ डोळ्यां माझेनि । डोळेपण, श्रवणत्व श्रवणांलागून, । वाचा करी वचन, । ते सत्ता माझी. ॥ ७९ ॥ त्वचा जाणें स्पर्शातें, । माझेनि चैतन्य तियेतें; । परिमळु कळे घ्राणातें । आत्मेन म्यां. ॥ ६४८० ॥ चरण माझेन चालती । व्यापारीं कर प्रवर्तती, । मनें संकल्प करिती, । ते माझी सत्ता. ॥ ८१ ॥ मी आत्मा अहंकारी, । तरि अहंकारु स्फुरे बाहेरि, । चित्त अनुसंधानातें करी । तें माझेन गा. ॥ ८२ ॥ बुद्धि स्फुरे ते माझेन, । माझेन प्रकाशे अंतःकरण, । एवं सर्वात्मा मी मज अधीन । सकळ दृश्य. ॥ ८३ ॥ ते हे शस्त्रें पुरांजिती । आतां तीं कवणाचां हातीं । मजवांचूनि ते भ्रांति । नसे कांहीं. ॥ ८४ ॥ बुद्धि ते कैसी स्फुरेल, । माझेंचि तीतें बल? । करचरण वागतील । तयांचे कैसे? ॥ ८५ ॥ ऐसें जाणोनि अंतःकरणीं । सर्वथा भय तें सांडूनि, । वैरी कौरव नयनीं, सुखेंचि पाहें. ॥ ८६ ॥ ऐसें बोलोनियां वचन । श्रीकृष्णें धरिलें मौन. । मग तो पार्थाचें वदन । पाहतु ठेला. ॥ ८७ ॥ ऐसें संजय सांगतां । रायें धृतराष्ट्रें परिसतां । परमार्थी पात्र कथा. । इतुली हे कैसी? ॥ ८८ ॥ निजमायेचें प्रावरण । तेणें अर्जुनातें आच्छादून । निजयोगिंगा घेऊन । निद्रा करविली. ॥ ८९ ॥ मग निद्रेमाजूनि अंतरीं । दिसे स्वप्न जाणों बाहेरि. । अर्जुना कौरव तयापरी । सन्मुख दाविले. ॥ १४९० ॥ ना कीं अर्जुन येकला । तो येकपणें लपविला, । कौरवभेदें दाविला । देखें दिसे. ॥ ९१ ॥ शुद्धीं उपजवूनि गुण । अर्जुना केलें भूषण; । तेणें मोहकें तो स्थान । विसरला काये? ॥ ९२ ॥ सांडूनि आत्मधर्मातें, । मागें वाळूनि आत्मयोगातें, । स्वभावलया सखयातें । दूरि धरूनि, ॥ ९३ ॥ अन्वयबोधु राहविला; । सत्प्रेत्नु मागें केला; । विविक्तात्मबोधु वारिला । राहें म्हणौनि. ॥ ९४ ॥ द्वैताभावबोधातें । निद्रा लावूनि परहस्तें । स्ववृत्तिविकाशा तयातें । गुप्त केलें. ॥ ९५ ॥ स्वरूपोपरमा न कळत, । आत्मान्वया न पुसत, । शुद्धता आपुली समस्त । तेथेंचि ठेवूनि. ॥ ९६ ॥ धर्माधर्मविवेकु । दूरि केला तो लोकु. । कर्मयोगु टणकु । तया दवडिलें. ॥ ९७ ॥ भक्तियोगा भक्तिउत्साता । भेटीचि नाहीं पांडवा । अभ्यासयोगा ठावा ।, न होत संचारु. ॥ ९८ ॥ वैराग्ययोगें चुकाविलें, । सत्संगवेगळें केलें, । निःकाम अक्रोध वारिले । डावेन हातें. ॥ ९९ ॥ अदंभा नाहीं भेटि, ।

आयेगु उठी उठी, । स्वास्थयोगाची दृष्टि । पडेंचि नेदितां; ॥ १५०० ॥ जहदजहल्लक्षणाख्यु । आच्छादूनि दाविला विपरीतु, । ईश्वरानुग्रहो हनुमंतु । पाळटिला तो. ॥ १ ॥ आत्मविषयीं जें होतें, । अनात्मसाधनीं केलें तें, । बहिर्मुख वाल्यातें । लागिली गति. ॥ २ ॥ ऐसा अर्जुनु निवाला । तो कृष्णा पाहों विसरला. । विसरें सावधु जाला । कौरवां देखे. ॥ ३ ॥ कृष्णाज्ञानाचें हें फळ, । कीं आत्माज्ञानाचें केवळ; । परंतु सारथियाचें बळ । तें पालटेना. ॥ ४ ॥ मार्गीं जातां दोघांतें । निद्रा आली येकातें, । तें आलें अरिष्ट निद्रितातें । तें जागृतेंचि वारावें. ॥ ५ ॥ तैसा अर्जुनु पडला गुणीं, । कृष्णु परमात्मा ज्ञानी; । तेणेंचि अर्जुनालागूनि । सांभाळावें. ॥ ६ ॥ यापरी आत्मभावृत्तिमार्से, । अनात्मतत्त्वप्रकाशें । अर्जुना आणिलें ईशें । कौरवदर्शना. ॥ ७ ॥ ऐसें बोलोनि अनंतु । उगाचि ठेला तटस्थु. । आइकें, राया, मातु । संजयो म्हणे. ॥ ८ ॥ ऐसें कृष्णाचें करणें । परमार्थवर्ती कैसें मानें । तेंचि अनुभवाचेनि मानें । बोलिजैल. ॥ ९ ॥ शुद्ध त्वंपदार्थु अर्जुनु; । तया अविवेकु शुद्धसत्वगुणु । लावूनि केला जाणु । सकळां गुणांचा. ॥ १५१० ॥ शुद्धसत्वगुणें तेणें । कवण अवस्था भोगणें, । कवण देहु काय जाणणें, । वर्तणें कैसें ? ॥ ११ ॥ शुद्धसत्वगुणापासून । शुद्ध जालें स्वानुसंधान. । तेथिचें स्वस्वाकारें ज्ञानें । तें महाकारणदेह. ॥ १२ ॥ महाकारणदेह तेणें । प्रपंचाभावदर्शनें । स्वरूपीं अनुसंधान करणें । ते तुरीयावस्था. ॥ १३ ॥ नामरूपगुणाभान, । आभासयोगा तेंचि लक्षण. । ऐसें स्वरूपस्फुरण । त्रिविध असतां; ॥ १४ ॥ तया स्फुरणाचा अभिमानु । धरूनि आत्मा जो आपणु । असे, तोचि सनातनु । प्रत्यगात्मा साक्षी. ॥ १५ ॥ प्रत्यगात्मा तुरीया महाकारण । आणि गुणांचें अभावदर्शन, । शुद्धसत्वगुणेंकरून । इतुकें जालें. ॥ १६ ॥ ऐसा शुद्धसत्वें गुणें चेइला । कृष्णें अर्जुनु प्रबोधिला, ॥ १७ ॥ तो अभावदृष्टी जाणों लागला । अहंदुर्योधनादिकां । मग ऐसिया अर्जुनातें । भीष्मु दाविला मायामतें, । तमोगुणु ऐसें जयातें । ठेविलें अभिधान. ॥ १८ ॥ केवळ भीष्माचें दर्शन । तें तमोगुणाचें सन्निधान, । तेंचि जालें आवरण । शुद्धसत्वा तया. ॥ १९ ॥ तें शुद्धसत्व आच्छादलें । तेंचि तमीं प्रकाशक जालें. । मर्त्य चंद्रें उमटलें । जैसें राहोबिंब. ॥ १५२० ॥ आतां तमोगुणें तेणेंकरून । कवण देहअवस्थाभान । तेंचि कीजैल कथन । यथामति

॥ २१ ॥ स्वस्वरूपाचें ज्ञान । लोपु तयाचा, तें अज्ञान. । देहद्वयाचें कारण । कारणदेह म्हणिजे. ॥ २२ ॥ परविपर्यीं अभानवृत्ति, । स्वविपर्यीं अनुसंधौनस्फूर्ति, । यया तुरीयालोपा म्हणती । सुषुप्त्यवस्था. ॥ २३ ॥ कारणदेह तें अज्ञान, । सुषुप्ति स्वपरविस्मरण; । येथें सुख असाधारण । तो आनंदु भोगु. ॥ २४ ॥ ऐसिया आनंदा अनुभवितां । अज्ञाना सुषुप्ति पाळितां । आत्मा मानणें म्हणतां । तोचि प्राज्ञु. ॥ २५ ॥ कारण सुषुप्ति आनंदु । प्राज्ञु आत्मा सिद्धु. । तमोगुणु यथाविधु । अविद्येचा. ॥ २६ ॥ अविद्येचेचि तमोगुणें । सत्व आच्छादिलें तेणें. । प्रकाशमय तें तमें घेणें । झाकलें नवचे. ॥ २७ ॥ मग रिघालें तमापोटीं । तमपूर्वक सत्व उठी. । तेणें प्रपंचु पडे दृष्टी । तोचि कैसा ? ॥ २८ ॥ अज्ञानपूर्वक ज्ञान । वृत्तिभेदें जालें भिन्न. । तेंचि लिंगदेह म्हणौन । बोलिजत असे. ॥ २९ ॥ स्वपरविपर्यीं प्रवृत्ति । अज्ञानपूर्वक व्यापारवृत्ति. । स्वप्नमनोरथु म्हणती, । ते तेथें अवस्था. ॥१५३०॥ अन्यथा आभासें विषयज्ञान । यया विषयां विलक्षण; । प्रविविक्तु भोगु म्हणौन । तोचि म्हणिजे. ॥ ३१ ॥ प्रविविक्तां विषयां भोक्ता, । स्वप्ना लिंगातें पाळिता, । आत्मा अन्यथा बोधें वर्ततां । तो तैजसु म्हणिजे. ॥ ३२ ॥ लिंग स्वप्न तैजसु । विपरीतु विषयभासु. । हा तमयुक्त प्रकाशु । पूर्वोक्त सत्वाचा. ॥ ३३ ॥ भीष्मा तमाचें सन्निधान । इतुलें फळलें असोन, । वरि द्रोणाचें दर्शन । दिधलें गोविंदें. ॥ ३४ ॥ द्रोणु रजोगुणु अविद्येचा, । अर्जुनु तमपूर्वका सत्वाचा. । तो संगु लाहोनि तयाचा, । कैसा जाला ? ॥३५॥ अज्ञानपूर्वक आगीं ज्ञान । रज तें विषयाभिलाष लक्षण. । तया दोघा एकपण । जालें असता ॥ ३६ ॥ लिंगचि पांचभौतिक साकारलें, । स्थूळदेह स्वयेंचि जालें, । स्थूळ विषय तेणें रळें । भोगावया. ॥ ३७ ॥ आत्माज्ञानें प्रवृत्ति अंतरीं । जे होती विषयांवरि, । तेचि जाली बाहेरि । स्थूळदेहद्वारा. ॥ ३८ ॥ बाह्य विषयाचें ज्ञान, । तेचि जागृति जालें स्वप्न. । अंतरींचें कल्पित विषयभान । तेंचि बाह्य साकारलें. ॥ ३९ ॥ अज्ञानसुषुप्तिसंस्कारें । मनोरथुचि होये स्वप्नाकारें. । तेंचि या दृष्टी साचोकारें । गमे तो प्रपंचु. ॥ १५४० ॥ तैसाचि प्रकल्पितु प्रपंचु । रजोगुणें वहिर्मुखलें साचु; । त्रिपुटीचा अंतर्संचु । बाहिरि पडला. ॥ ४१ ॥ बाह्य विषयातें भोक्ता, । ज्ञाता, साधकु, कर्ता, । आत्मा तोचि तत्वता । विश्व म्हणिजे. ॥ ४२ ॥ जागृतीतें प्रकाशी, । मी जागृतु वृत्ति ऐसी । जया, तया

आश्रयासि । म्हणिजे विश्वु. ॥ ४३ ॥ स्वयमेव स्थूलाकारें । मी म्हणौनि जो स्फुरे, । तो स्थूलात्मा चतुरें । विश्व जाणावा. ॥ ४४ ॥ आत्मत्वें मानितु स्थूलासि, । आंगें प्राकाशी जागृतीसि, । स्थूल, होऊनि विषयांसि । भोगीं स्थूला, ॥ ४५ ॥ भोक्ता, भोग्य, भोगणें, । 'स्थूलचि अत्रवें माने । कार्य, कर्तृत्व, करणें, । तैसेंचि साकार. ॥ ४६ ॥ चेष्टय, चेष्टकत्व, चेष्टणें, । स्थूळ साकारचि मानणें, । रजोगुणाचेनि संनिधानें । ऐसें वर्तता, ॥ ४७ ॥ अभिमानांश कौरव । कृष्णें दाखविले सर्व । योगें तयांचेनि भाव । कैसे अर्जुनाचे ? ॥ ४८ ॥ मी जीवु मी देही आपणु, । मी कर्ता, भोक्ता, जाणु, । मी आश्रमु, मी वर्णु, । याति, कुल. ॥ ४९ ॥ मी जीं, मीचि मरें, । मी मारीं, मी न मरें, । मी येकला, मी परिवारें । पांडव मी. ॥ १५५० ॥ मी कृष्णसखा अपराधीनु, । ऐसा विविधु देहाभिमानु । कार्याकार्यीं अर्जुनु । पावता जाला. ॥ ५१ ॥ अहंकारयुक्ता अर्जुनातें । कृष्णें दाविले वीर ते । अरिषड्वर्ग; तयांतें । पाहोनि कैसा ? ॥ ५२ ॥ अहंबुद्धी विषयपरु, । जाला कारणयोगें कामातुरु; । कामापूर्ती अपारु । क्रोधीं संभवला. ॥ ५३ ॥ कामपूर्तिकरून । मदयुक्त तयाचें मन. । तैसाचि दुसरा देखोन मत्सरु होये. ॥ ५४ ॥ तैसा न देखे दुसरा । ते दांभिकु प्रति इतरा । होये, तेण खरा । प्रपंचु अनुभवी. ॥ ५५ ॥ प्रपंचाचेनि अनुभवें । तरंग उठती नवे नवे. । तेहींयुक्त संभवे । कैसा अर्जुनु ? ॥ ५६ ॥ मायामोहपरायणु । जाला ममत्वा अधीनु. । लोभाचा भरु दारुणु । प्रवर्तला आंगीं. ॥ ५७ ॥ मोहें शोकु, दुःख, विषादु; । चिंतायोगें असावधु; । ऐसा प्रापंचिकांचा संबंधु । फळला तया. ॥ ५८ ॥ देहत्व बाणलें खरें । मग इतुलयानंतरें । मग ऐसा तो देहधारें । काये करी ? ॥ ५९ ॥

तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ।
आचार्यान्मातुलान्भ्रातॄन्पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ २६ ॥

संजयो म्हणे धृतराष्ट्रा, । आइकें कुरुकुळप्रवरा, । कृष्णें कौरवां समग्रां दाखविलें असतां ॥ १५६० ॥

पार्थः

पार्थु पांडूचा नंदनु, । अरिकुळगर्वहुताशनु, । प्रतापदिनकरु आपणु । आपुलिया दृष्टी ॥ ६१ ॥

तत्र स्थितानपश्यत्

तेथें जे वीर होते । पाहोंचि लागला तयांतें. । मग पाहोनि तेचि ते । पालटता जाला. ॥ ६२ ॥ आतां तत्रस्थ कवण कवण । येणें पाहिले निर्धारून, । तयांचें रूप, अभिधान । सांगिजैल. ॥ ६३ ॥

पितॄन्

आपणु जयांतें मानी । ऐसे जे पितृस्थानीं । तयांतें अर्जुनु देखोनि । तटस्थु जाला. ॥ ६४ ॥

अथ पितामहान्

आणि येक तयावरि । भीष्मु आजा वरवयापरी । देखिला; तेणें जिव्हारीं । खोंचला अर्जुनु. ॥ ६५ ॥ येणेंचि भीष्मेसीं समान । दिसते जाले मानें मान. । आतां तयाचें मन । कैसें वैर न संडी ? ॥ ६६ ॥

आचार्यान्

तंव तेथेंचि देखिला द्रोणु, । विद्यादाता, गुरु सर्वज्ञ; । तेणेंचि मार्गें आनु । समुदाव दृष्टी पडला. ॥ ६७ ॥

मातुलान्

शैल्यु मामा देखोनि । क्षीति उपजली अर्जुना मनीं; । तेणेंचिपाडें मागुतेनि । मामे कौरवाचे. ॥ ६८ ॥ मातुल देखोनि समस्त । व्यग्र जालें चित्त. । तंव आन येक विपरीत । तेथें आभासलें. ॥ ६९ ॥

भ्रातॄन्

दुर्योधनादिक सकळ । बंधुवर्ग दिसती केवळ. । तयाचिपासीं अळुमाळ । वेगळे पाहतां ॥ १९७० ॥

पुत्रान्

दुर्योधनाचे जे पुत्र । ते पुत्रस्थानींचि समग्र. । तयासीं भावितां वैर । मनचि नेघे. ॥ ७१ ॥

पौत्रान्

दुर्योधनपुत्रपुत्र, । ते आपुलेही पौत्र; । अर्जुनें देखिले समग्र । संग्रामामाजीं. ॥ ७२ ॥

सखींस्तथा

जयासीं क्रीडा निरंतर, । ऐसे जे बाळमित्र; । जयांचे आपणां उप-

कार, । आपुले जयां; ॥ ७३ ॥ जैसे कीं बंधु आपुले । तैसेचि ते मित्र देखिले. । पुडती नवल प्रवर्तलें । तये क्षणीं. ॥ ७४ ॥

श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।
तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥ २७ ॥

श्वशुरान्

दुर्योधनादिकां श्वशुर । ते तैसेचि आपणां समग्र । कौरव न होतां इतर । म्हणौनियां. ॥ ७५ ॥

सुहृदश्चैव

शरीरसंबंधी कौरवांतें । आपणाही तेणेंचि मतें. । आपुलेही तयां सांगातें । सखे सोइरे. ॥ ७६ ॥ अद्यापि संबंध चालती । सोइरिकेची महाप्रीति, । ऐसे हे कौरवांप्रति । मीनले राजे. ॥ ७७ ॥

सेनयोरुभयोरपि

पुढें पाहतां स्वजन, । मग अर्जुनु पाहे परतोन; । तंव आपुलांही सैन्यीं समान । तेचि लोक. ॥ ७८ ॥ मागें पुढें सासुरे, । तैसेंचि अवघे सोइरे, । आपंपरावे दुसरे । ते भाऊचि सकळ. ॥ ७९ ॥ मागें पुत्र, पुढें पुत्र, । मागें पौत्र, पुढें पौत्र, । सखे, सुहृद समग्र । सारिखेचि. ॥ १९८० ॥

सर्वान्बंधूनवस्थितान्

आपपरावी सैन्यें दोन्ही, । अवघे बंधुचि रणीं । राहिले, त्यांमजी कव्हणी । पारिखा नसे. ॥ ८१ ॥

तान्समीक्ष्य

तयातें दृष्टी देखोनि, । तयांची क्रीडा आठवूनि, । केवल स्वकीयं मानूनि । जीवप्राण. ॥ ८२ ॥

स कौंतेयः

तो देवी कुंतीचा नंदनु । पावला साता सीणु. । कैसा जाला आपणु, । आइकें, राया. ॥ ८३ ॥

कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।
अर्जुनउवाच
दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥

कृपया परयाविष्टः

कार, । आपुले जयां; ॥ ७३ ॥ जैसे कीं बंधु आपुले । तैसेचि ते मित्र देखिले. । पुडती नवल प्रवर्तलें । तये क्षणीं. ॥ ७४ ॥

श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।
तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥ २७ ॥

श्वशुरान्

दुर्योधनादिकां श्वशुर । ते तैसेचि आपणां समग्र । कौरव न होतां इतर । म्हणौनियां. ॥ ७५ ॥

सुहृदश्चैव

शरीरसंबंधी कौरवांतें । आपणाही तेणेंचि मतें. । आपुलेही तयां सांगातें । सखे सोइरे. ॥ ७६ ॥ अद्यापि संबंध चालती । सोइरिकेची महाप्रीति, । ऐसे हे कौरवांप्रति । मीनले राजे. ॥ ७७ ॥

सेनयोरुभयोरपि

पुढें पाहतां स्वजन, । मग अर्जुनु पाहे परतोन; । तंव आपुलांही सैन्यीं समान । तेचि लोक. ॥ ७८ ॥ मागें पुढें सासुरे, । तैसेचि अवघे सोइरे, । आपपरावे दुसरे । ते भाऊचि सकळ. ॥ ७९ ॥ मागें पुत्र, पुढें पुत्र, । मागें पौत्र, पुढें पौत्र, । सखे, सुहृद समग्र । सारिखेचि. ॥ १९८० ॥

सर्वान्बंधूनवस्थितान्

आपपरावीं सैन्यें दोन्ही, । अवघे बंधुचि रणीं । राहिले, त्यांमाजी कव्हणी । पारिखा नसे. ॥ ८१ ॥

तान्समीक्ष्य

तयांतें दृष्टी देखोनि, । तयांची क्रीडा आठवूनि, । केवल स्वकीय मानूनि । जीवप्राण. ॥ ८२ ॥

स कौंतेयः

तो देवी कुंतीचा नंदनु । पावला सात्विकीं गुण. । कैसा जाला आपणु, । आइकें, राया. ॥ ८३ ॥

कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।
अर्जुनउवाच
दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥

कृपया परयाविष्टः

कौरवमोहें मोहिला, । अनियारा कृपा व्यापला, । ममत्वाचा पूरु चालिला । साटेचिना. ॥ ८४ ॥

विषीदन्

मग विषादातें पावोन, । परम दुःख मानून । श्रीकृष्णाचें वदन । पाहोनियां ॥ ८५ ॥

इदमब्रवीत्

बोलिला कर्थाचें वचन; । तें हें ऐसें जाण । राया तुजप्रति सांगेन, । संजयो म्हणे. ॥ ८६ ॥

अर्जुन उवाच । हे कृष्ण

अर्जुनु बोले, श्रीकृष्णा, । सकळभ्रमनिवारणा, । आत्मयारामा, सनातना, । आनंदरूपा, ॥ ८७ ॥ संदेहसागरचें तूं तारूं; । अज्ञाना ज्ञानदिवाकरु; । बुडतियांप्रति आधारु । तो दुजा नाहीं. ॥ ८८ ॥ तरि हृदयस्थ सुख, दुःख, । कवणें विचारावें, आइक. । तूचि तत्वतारक; । तूतेंचि सांगणें. ॥ ८९ ॥

इमं स्वजनम्

वैरभावें जे पाहिले, । तुवां प्रत्यक्ष दाखविले, । ते पाहतांचि बोळखिले, । पारिखे नव्हे; ॥ १९९० ॥ माझे बंधु, माझे मित्र, । माझे गुरु, माझे गोत्र, । माझे सुहृद समग्र, । माझे जन. ॥ ९१ ॥

युयुत्सुं समुपस्थितम्

मजसींचि युद्धाकारणें । अपेक्षा करूनि मनें । उभे राहिले ते मी म्हणें । माझे सर्व. ॥ ९२ ॥ येक पुत्र, येक पौत्र, । येक बंधु, येक मित्र, । आर्य, गुरु, अपार । सुहृद, सखे. ॥ ९३ ॥ दोहीं सैन्यीं पाहतां । माझे नें व्हो ममता, । ऐसा येक निवाडितां । नसे कोण्ही. ॥ ९४ ॥

दृष्ट्वा

आतां हें देखोनि दृष्टी । कवणु भाव मातें उठी, । तो, श्रीरंगा, जगजेठी, । सांगेन मी. ॥ ९५ ॥ कौरवांचा सम्यग्दर्शनीं । हा भाव उपजला अर्जुनीं; । तो जाणता सर्वज्ञीं । कैसा जाणावा ? ॥ ९६ ॥ अर्जुनु लंपटाळु, निर्मळु, । नो अविद्यागुणीं जरा सबळु; । स्थूळदेहीं अभिमानशीळु । योद्धा-

थेंभोक्ता. ॥ ९७ ॥ स्थूळीं जोडली अहंता । तांचेनि योगें तत्वता । उपजती जाली ममता । देहसंबंधिकां ठाई. ॥ ९८ ॥ देह होती देहापासूनि; । देहीं आत्मबुद्धीतें करवळूनि, । ते माझे पिते म्हणौनि । ममत्वें मानी. ॥ ९९ ॥ तया देहा जनक, । ते आजे मानी लोक. । तयांतेही पिते आणिक । ते पणजे कल्पी. ॥ १६०० ॥ ऐसी वंशाची परंपरा । सृष्टि देखे सृष्टिद्वारा. । भूतेंचि भूतां समग्रां, । कारणें. ॥ १ ॥ माझा वंशु पवित्रु, । पणजा, आजा, पितरु, । अमुकें गोत्र, प्रवरु । अमुका माझा. ॥ २ ॥ मग उदरपूर्तीलागूनि । जे विद्याभ्यासी जयांपासूनि । ते ते गुरूचि मानी । तारक आपुले. ॥ ३ ॥ शुक्तिशकलाचा ठाईं । रजतबुद्धि जैसी कांहीं, । तैसी असद्गुरूचा ठाई । भावना सद्गुरूची. ॥ ४ ॥ देहाभिमानेंकरून । ममत्वें मानिजे हेंचि भजन, । माझे गुरु, माझे पितृगण । इतुलेंचि मात्र. ॥ ५ ॥ जीचां जन्मला उदरीं । देहो कर्मयोगें संसारीं, । तेचि माता; ययापरी । जाणों परंपरा. ॥ ६ ॥ देहीं आत्मत्व मानी, । म्हणे हे माझी जननी. । तीचेनि संबंधेंकरूनि । तीचीं जनकें. ॥ ७ ॥ अवघींचि ममत्वें सोपी, । माझीं माझीं म्हणे तयांसि, । पराचें सुखदुःख आपणासि । लागे तेणें ॥ ८ ॥ माझी माता, माझी आजी, । मातुळादि अवघीं माझीं, । आपणु तयाचां कांजी । विसरे स्वहित. ॥ ९ ॥ बंधु मानी येकोदर, । आणि पितृव्याचे कुमर, । मातृभगिनींचे समग्र । तैसेचि ते. ॥ १६१० ॥ स्वशरीरापासाव जाले । ते पुत्र मानी आपुले. । बंधूंपासाव जन्मले । ते पुतणे म्हणे. ॥ ११ ॥ पुत्रपुत्र ते पौत्र । ऐसे वंशींचे साने थोर. । देहात्मभावें अनितर । माझे म्हणे. ॥ १२ ॥ देहा देहे प्रीतिकर्ता । तो प्रियु मित्रु तत्वता; । ऐसियां बहुतावरि ममता । योगें पसरे. ॥ १३ ॥ हा माझा बाळमित्रु, । मातें येणें केला उपकारु, । तैसाचि म्या या अपारु । पैला केला. ॥ १४ ॥ शरीरसंबंधें वनिता । तीचा ठाई महाममता । संबंधी तीकरितां । ते आपुले म्हणे. ॥ १५ ॥ स्त्रीचा पिता तो श्वशुरु, । तैसाचि तद्बंधु इतरु; । स्त्रीचा भाऊ येकोदरु । शाळा मानी. ॥ १६ ॥ जेथ जेथ संबंधु करी, । ते ते ममत्वेंचि सुहृद धरी. । आत्मा देहसंगें बाहेरि । बाधला ममत्वें. ॥ १७ ॥ माझें क्षेत्र, माझा ग्रामु, । माझा देशु, माझा आश्रमु, । पशु, पदार्थ, द्रव्य, धर्मु, । सर्व माझें म्हणे. ॥ १८ ॥ देहीं अहंत्वें शिरकला । तो जनीं ममत्वें माधला. । स्वतंत्रु आपणु आपला । कैसा होईल ? ॥ १९ ॥ बांधला

ममत्वें आथी. । सांपडलां वहुतां हातीं. । तीं इच्छा आपुलिया नाचविती, । करविती कर्मे. ॥ ११२० ॥ येकांचा जाला व्याही; । येकांवरि करी साइं; । येकांकारणें परि कांहीं । आपुलें नेणें. ॥ २१ ॥ वारुवांपुढें धांवावें, । उच्छिष्ट येकांचें खावें, । हें येकांलागीं परि अघवें । आत्मार्थ नव्हे. ॥ २२ ॥ येकांपुढें तिष्टतु । मुखाची वास पाहतु, । ऐकांचा म्हणवी सुतु । ऐकांलागीं ॥ २३ ॥ येकातें वोपी प्राण, । येकांचे साहे दंडण, । येकांलागीं अन्न । प्राप्त करी. ॥ २४ ॥ परिग्रहो तंव तंव इव्यासु । करूंचि पाहे आयासु; । आयासु तंव तंव संतोषु । ममतानद्ध ॥ २५ ॥ विदेशीं करी गमन, । करी नीचाचें सेवन, । तें कव्हणा येकांचिलागून । परि आत्मार्थ नव्हे. ॥ २६ ॥ येकांचें द्रव्य चोरी, । येकांचें सर्वस्व हरी, । येकांचा वधु करी । पातेजौनी. ॥ २७ ॥ विश्वासघातु, प्रत्यक्षघातु । इतरार्थ करी समस्तु, । येणें येकु आत्मघातु । तोचि जोडी. ॥ २८ ॥ ममतेचा विषयो कायी । अहंता वैरिणी, देहीं । ते करूं नये तें सर्वहीं । करवी कर्मे. ॥ २९ ॥ मित्रु होता तोचि वैरी । आपणु आपला संसारीं. । हें अहं-ममत्व शरीरीं । येणें केला. ॥ ११३० ॥ अहंत्वें वंधु शरीरीं, । ममत्वें मोटका संसारीं, । या दोहींपासाट सुटे, तरि, । आपणु मुक्तु. ॥ ३१ ॥ ऐसा अहंत्वें कवळला, । ममत्वें जनीं वाधला, । जी अर्जुनु जाला । परातें वद्ध. ॥ ३२ ॥ मग परंकृपया व्याप्तु, । परदुःखें दुःखवंतु, । परचि जाला समस्तु । संगें संगीं. ॥ ३३ ॥ पर देखोनियां कौरव । उपजले विषादस्वभाव. । तेथिंचे इतर भाव । आत्मत्वेंचि स्फुरले. ॥ ३४ ॥ कौरव सांगितले गुण । तयांचेंचि व्यक्तपण । तें होऊनि इतर भान । आपण आभासलें. ॥ ३५ ॥ कामुचि जाला पदार्थाकारें; । क्रोधुचि वैरी होऊनि स्फुरे; । ममता तेचि स्वजनाकारें । व्यक्त जाली. ॥ ३६ ॥ तमोगुण, रजोगुण, । आणि देहींचें, जी, मी, पण, । तेंचि आत्मइतरभान । होऊनि आभासलें. ॥ ३७ ॥ गुणु तोचि तेयांची अवस्था, । अवस्थाचि प्रपंचु सर्वथा; । जेथें जागृतु होये भोक्ता । तेथें मान उठी. ॥ ३८ ॥ म्हणौनि कौरव तेचि असद्गुण; । कौरव तेंचि गोचरमान; । आपुलें येक मीपण । सकळ विश्व. ॥ ३९ ॥ मीपणाचेनि विलयें । द्वैतभान उरे कायें? । अहंता ममता जें होये । तें अविद्यक मीपण ॥ ११४० ॥ प्रापंचिका भेद-

निरासा । सांडावी मीपणाची आशा; । मग द्वैताभाव आपैसा । करणेंचि नल्गे. ॥ ४१ ॥ यापरी इतर भावें देखिले, । ते कौरव गुण आपुले । मोहें हृदय व्यापिलें । जीवा अर्जुनाचें. ॥ ४२ ॥ मग तो विषादातें पावोन । बोलता जाला वचन । अगाये कृष्णा म्हणौन, । तेंचि कैसें ? ॥ ४३ ॥

सीदंति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।
वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥

सीदंति मम गात्राणि

अर्जुन म्हणे, श्रीकृष्णा, । वैरभावें आलों रणा; । तंव पाहतां येथ स्वजन । माझीं गात्रें ॥ ४४ ॥ विशीर्ण होत असती; । कर पाद विकळ जाती; । यया आंगांचें श्रीपाति । पाणी जालें. ॥ ४५ ॥

मुखं च परिशुष्यति

शोषोनि गेलें वदन, । आलें रसनें रुक्षपण, । बोलतां नये वचन । ऐसें होतसे. ॥ ४६ ॥ टवटवा होती ते गेली, । प्रेतकळा येती जाली । तूं बापु, माझी माउली, । आइकें, कृष्णा. ॥ ४७ ॥

मे शरीरे वेपथुश्च

माझां शरीरीं उपजला । कंपु तो काहीं केलां । न संवरेचि लागला । गात्रांतें बांधूं ॥ ४८ ॥ चळचळां कांपती हातपाये, । हृदये तें स्पंदत आहे, । चातुर्थक तरि नोहे । परि तैसें जालें. ॥ ४९ ॥

रोमहर्षश्च जायते ।

कांटाळे येती कणकणा, । उठिती रोमांच सणसणा. । मातें माझें आंगवेना । शरीर हें. ॥ १६५० ॥

गांडीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।
न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥

हस्ताद्गांडीवं स्रंसते

सांवरूं किती देहभाव । धनुष्य हातींचें गांडीव, । पाहें, पां, हस्तापासाव । पडत आहे. ॥ ५१ ॥ कंपवातें हाल्या । काडी न्रुचले हस्तां तयां, । तेंवि गांडीव हें, कृष्णराया, । नागवे मातें. ॥ ५२ ॥

त्वक्चैव परिदह्यते

भातें लागलें शरीरीं, । त्वचा तापली लोहापरी; । दाहो उपजला अंतरीं । बाहेरि अवघा. ॥ ९३ ॥

न च शक्नोम्यवस्थातुम्

पाहतां हिमाची हुडहुडी । कदळी कांपे थोडी । पवनु लागे आडी पाडी । ऐसें असतां. ॥ ९४ ॥ शेवटीं शैत्य नाहीं शरीरीं. । आगी जळे बाहिरी, अंतरीं. । गात्रें निवती जयापरी । तो उपाव नसे. ॥ ९५ ॥ सर्वांग डवडवीत स्वेदें जलें, । आणि मुख तें कोरडें पडलें । व्याधीवीण ऐसें जालें । येणेंकरितां. ॥ ९६ ॥ उभा राहवया मी असमर्थु, । बैसोंही न शकें नेटस्थु, । मग ध्वजास्तंभीं टेंकतु । पाहें सुख. ॥ ९७ ॥ तंव टेंकोनिही मातें न सवे, । शरीर रथावरि पाडावें, । तेंही परंतु जीवें । विचारिलें. ॥ ९८ ॥ बाह्यांतर जेथ विकळ । तेथ पडोनही नसवे केवळ. । अपार लागली तळमळ । तीणेंकरितां ॥ ९९ ॥ प्राणुचि नेणें जाईल, । स्थूळचि माझें पडैल, । मांडलें मरणमूळ । व्याधीवीण. ॥ १६६० ॥ रण सांडूनि पळणें, । कां येथेंचि प्राणु देणें; । परंतु, श्रीकृष्ण, देहें येणें । न शकें राहों. ॥ ६१ ॥

भ्रमतीव च मे मनः

भ्रमु उपजला मानसीं, । विसरलों, जी, मी क्रियेसि; । सुख नवटे जीवासि । विश्रांति नाहीं. ॥ ६२ ॥ विचारु हारपला देहीं; । मन न बैसे येके ठाईं. । खान पडलें हृदयीं, । धैर्य गेलें. ॥ ६३ ॥ शूरत्वचि पडलें रणीं, । तेजप्रतापु फुटला वाणीं, । स्वजन देखोनि नयनीं । ऐसें जालें. ॥ ६४ ॥ धृति धृति सांवडली, । क्षात्रविद्या हारपली, । क्षात्रव्रतें जळालीं, । उरलें पळणें ॥६५॥ कठिणता उपजे शरीरीं, । मोहाची उकळी ये भारी, । स्वजन हे देखिलियावरी । ऐसें जालें. ॥ ६६ ॥ वैरभावें वैरें मेले । भेदाचे थारे मोडले । कौरव हे बंधु आपुले । देखोनियां. ॥ ६७ ॥ देखोनि तयां कौरवां । विषादु उपजला पांडवा. । तेचि कथा अनुभवा । आणितां कैसी. ॥ ६८ ॥ अहंता होती स्वस्थानीं, । तेचि ममता विस्तारली जनीं. । 'अहंमम' योगेंकरूनि । बंधन आत्मया. ॥ ६९ ॥ मथाचोनि विच्छेदें । आत्मा स्वस्थु निजानंदें.. । सर्वत्र येकु स्वयंबोधें । नित्यमुक्तु. ॥ १६७० ॥ म्हणोनि ययाचा उच्छेदु । करणें हा मुख्य वादु; ।

हेचि निष्ठा सिद्धु। साधकु साधी. ॥ ७१ ॥ तरि अहंवुर्योधनु थेकला। तोचि कार्यभेदें भेदला. । संघातु म्हणौनि कल्पिला। कौरवांचा. ॥ ७२ ॥ तेंचि अहंत्व ममतारूपें। तें तों व्यक्त कौरवस्वरूपें. । इतरत्वें नामरूपें धरूनि वर्तती. ॥ ७३ ॥ काम, क्रोध, मद, मत्सर, । दंभ, प्रापंचिक वीर, । हे संबंधीचि समग्र। तयां कौरवांचे. ॥ ७४ ॥ आतां हे अवघेचि मारावे, । मग स्वस्थितां राज्य करावें, । संग्रामीं यश पावावें। ऐसें अपेक्षूनि. ॥ ७५ ॥ शुद्ध जीवु तो अर्जुन। आला संग्रामु अपेक्षून; । वैरी अवलोकितां, स्वजनु। ऐसा आभासला. ॥ ७६ ॥ आतां तयाचा नाशु करणें, । परम दुःख तेणें गुणें. । पांडुनंदनातें मानें. । मग तो म्हणे कृष्णें ! ॥ ७७ ॥ देवा, मुरारी, भवहरणा, । मातें मारितां यया स्वजना, । अहंममतारूपां आणि आना । कामक्रोधादिकां, ॥ ७८ ॥ गात्रें हीं पडती विकळें. । युद्ध करणें कवणें बळें ? । करपाद येणें काळें । विशीर्ण होती. ॥ ७९ ॥ ममता होतां निर्मूळ । उपेक्षणें पडेल स्थूल. । मग जागृतीचें केवळ । कार्यचि नाहीं. ॥ १६८० ॥ स्थूळें आणि जागरणेंवीण । व्यक्त नाहीं लिंग, स्वप्न, । यापरी देहद्वय गळोन । अव्यवेंचि जाये. ॥ ८१ ॥ अभिमानातें नाशु करणें, । तरि अभिमाननाशें तेणें । त्रिपुटीचा लोपु जाणणें. । मग काये उरे ? ॥ ८२ ॥ ज्ञेय, ज्ञान, ना ज्ञातेपण, । कर्ता, ना कार्य, कारण, । देहद्वय अभावोन । अज्ञान उरे. ॥ ८३ ॥ तैसाचि सांडावा कामु । तें दंडावा करणधर्मु, । कार्याचा नोहे उपक्रमु । कर्तृत्वनाशें. ॥ ८४ ॥ कामहीना नाहीं ज्ञान, । ज्ञानहीना ज्ञातेपण, । तें देहद्वयाभावें अज्ञान । तें असत्वावें. ॥ ८५ ॥ क्रोधाचा छेदु करितां । देहातें कवणु रक्षिता ? भय, काम, क्रोध, तत्वता । पालक स्थूळाचे. ॥ ८६ ॥ मद, मत्सर, मारावे, । ते तेजिती अभिमान जीवें. । आतां अभिमाना पाडावें । यांसिया यवा, ॥ ८७ ॥ अभिमानु येतां रणा । देहद्वयाचे उरेना. । आतां वधावें रजोगुणा । द्रोणाचार्यातें, ॥ ८८ ॥ तें रजोगुणाचेनि मारें । इंद्रियां विषयो न स्फुरे. । स्थूळ, जागृती, संहारे । प्रपंचज्ञान. ॥ ८९ ॥ बाह्यप्रपंचज्ञानावीण । न उमटे लिंग, स्वप्न, । ते अज्ञानीं होऊनि लीन । उगेचि असावें. ॥१६९०॥ भीष्माचार्या, तमोगुणा, । केवळ मारावें आंगणा, । तें देहत्रयाची अभावना । सिद्ध होये. ॥ ९१ ॥ आत्मज्ञानें येकेवीण । यथा

कौरवाचें नाहीं दर्शन. । मग अदर्शनें हनन । तें फावेचिना. ॥ ९२ ॥ रज्जुस्थानीं सर्पु भासे, । अदर्शनें तो नसे । तेथें देखताचि असे । भाव तयाचा. ॥ ९३ ॥ देखता मृगजळ वाव । अदर्शनीं त्याचा भाव, । शुक्तिखंडीं रजतभाव । तोही तैसाचि. ॥ ९४ ॥ ज्ञानें नाशु, तो नाशु । अज्ञानें धर्वृही आभासु; । यालागीं आपुला अप्रकाश । जो प्रकाश कौरवा. ॥ ९५ ॥ आता प्रापंचिकानें मारावें । तै तें देहचि पाडावें; । देहरक्षणीं अवरें । दक्ष म्हणौनि. ॥ ९६ ॥ यापरी हाणावा वैरी, । तो घाव पडे देहद्वयावरी. । आता देहद्वयाचा संहारी । होये कैसें ? ॥ ९७ ॥ कर्मयोगु जो कीं विराटु । तो प्राणाचा धरील वीटु; । भक्तियोगु निकटु । तो दूरि पडैल. ॥ ९८ ॥ भक्तियोगाचेनि हर्षे । कोठें बसावें, परियसें. । सत्संगा संतोषु नसे । देहद्वयेवीण. ॥ ९९ ॥ अभ्यासयोगु रुसैल, । वैराग्ययोगु भंगैल, । सत्प्रेमु पळैल । आम्हापासूनि. ॥ १७०० ॥ धर्माधर्मविचारु । मग तो कैचा वीरु ? । गुरु हा तूं सारंगधरु । दुरावसील. ॥ १ ॥ सेवा, नमस्कार, परिप्रश्न । करावे कैसें वाक्यश्रवण ? । साधन, नाना दर्शन । तेंचि दुर्लभ होईल. ॥ २ ॥ तैं विविक्तात्मबोधु तो कैंचा ? । अभाव नव्हे प्रपंचाचा. । स्वरूपसद्भाव आमुचा । तुझेनि तो. ॥ ३ ॥ उपरमें कैसें, जी, होआवें, । अन्वयें पळोनि जावें । गुरूतें प्रसन्न करावें । हें जें नसे ॥ ४ ॥ तै आत्मधर्मु, ना आत्मयोगु, । आत्म शुद्धतेचा न लभिजे भागु, । आत्मविश्रामु, ना अन्वयप्रसगु । ऐसें होईल. ॥ ५ ॥ यापरी कौरवाचेनि मारें । हित आम्हा न दिसे विचारें; । आणि आम्हा यया दुसरें । शरीर नाहीं. ॥ ६ ॥ दुर्योधनु तो अभिमानु । आता मग वेगळा मी मानूं । तें, धिग्य ! हा प्राणु । राखोनि काये ? ॥ ७ ॥ अभिमानाश हे कौरव । माझे मीचि असें सर्व. । दोघाचें विचारिता पूर्व । भेदु नाहीं. ॥ ८ ॥ ययाचीं वृत्तिसतानें । तीं माझीं. कीं मज आनें, । आता ययाचेनि हननें । स्वयेंचि दुखविजे. ॥ ९ ॥ गात्रें विकळें पडती, । करणभाव माझे गळती, । माझेनि कौरव दुखवती । ऐसें जाणोनिया. ॥ १७१० ॥ माझें मी खाता मीपण । मग काये दावूं वदन ? । बोलताचि नये वचन । येणे रीती. ॥ ११ ॥ आपुला अभिमानु खाइजे । मग मुख कासया दाविजे ? । वदनकळा सहजें । शोषती यापरी. ॥ १२ ॥ माते मी जालों वैरी, । उपजला कंप शरीरीं. । प्रकृति गुणाचा संहारीं । चचळ जाली. ॥ १३ ॥ नाश खाति साव-

नांचा । फांटाळे काया, त्वचा, । स्फुरण जालें रोमांचा । आंगें तेणें ॥ १४ ॥ योगुसंग्रामु जेणें करावा । तो अविशुद्धि नुपजे जीवा. । कारणाभावें यादवा । धनुष्य सुटे. ॥ १५ ॥ अभिमाना करितां दहन । आंगीं चढलें दीपन; । आतां त्याचेनि मरणें मरण । नये कैसें ? ॥ १६ ॥ आत्माभिमानहरासें । मातें राहवे येथ कैसें ? । योगयुद्ध अनायासें । पुरें जालें. ॥ १७ ॥ माझें मीपण मज नाहीं, । तें उरोनि येर कायि ? । भ्रमितु मी सर्वा विषयीं । नेणें कार्याकार्य. ॥ १८ ॥ संसारु ना परमार्थु, । ना स्वार्थु, ना परस्वार्थु, । रोकडा होये आत्मघातु । आपुलेन हातें. ॥ १९ ॥ गुणयुक्ता शत्रलातें । न छेदवे गुणबुद्धिगुणातें; । तों पुढती अर्जुनु तेथें । काय म्हणे. ॥ १७२० ॥

निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।
न च श्रेयो नु पश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥

केशव

चतुराननजन्मस्थाना, । जळाब्धिवासिया, नारायणा, । अवधारीं, केशवा, कृष्णा, । अर्जुनु म्हणे. ॥ २१ ॥

आहवे

हा संग्रामु अति दुस्तरु । वोडवला अति भयंकरु । काळरूपु महाउग्रु । ययाचां ठाईं ॥ २२ ॥

स्वजनम्

वैरभावातें आश्रयून । युद्धा आले हे माझेचि जन, । पूर्वज आणि संतान; । ऐसियां ययातें ॥ २३ ॥

हत्वा

मारावें आपुलेनि हातें, । यया राज्याचेनि स्वार्थें; । परंतु मारूनि येथें । यया सर्वां ॥ २४ ॥

न च श्रेयो नु पश्यामि

श्रेय कांहीं दृष्टी न पडे, । जेणें आपुलें हित जोडे; । परंतु आन येक निवाडे । वधें ययांचेनि ॥ २५ ॥

विपरीतानि निमित्तानि च पश्यामि

उपराठीं, गा लक्ष्मीपति । निमित्यें तेचि दृष्टी पडती, । इहपरलोकीं अपकीर्ति । तेंचि जोडे. ॥ २६ ॥

अर्जुनें गोत्रवधु केला, । हा बोलु नव्हे धाकुला; । वंशीं दोषु आरोपला । फिटे कैसोनि ! ॥ २७ ॥ गुरुहत्यारा हा अर्जुनु । जाणता नेणता म्हणेल जनु । तेणें फाळें देणें प्राणु । ऐसें वाटैल ॥ २८ ॥ आजा अर्जुनें वधिला, । जन्मे हा कळंकु लागला. । चिरकाळ पुढें उरला । हाचि बोलु. ॥ २९ ॥ अर्जुनें मारिले पुत्र, । राज्याभिलाषें पौत्र, । ऐसिये अकीर्तीचे डोंगर । किती निस्तरावे. ॥ १७३० ॥ इतुलें साहोनि कांहीं । जोडिलें म्हणों, तरि तें नाहीं. । जेणें आपुलें काहीं । बरवें दिसे. ॥ ३१ ॥ परलोकविरुद्ध कर्म, । इहलोकदूषित धर्म, । मातें घडलें कुकर्म । महापाप. ॥ ३२ ॥ यापरी स्वजन मारूनि रणीं । उपराठीं निमित्येंचित्राचूनि । दाविजे, मिरविजे ऐसी करणी । कांहींच न जोडे. ॥ ३३ ॥ पापसंग्रहो जोडिला, । थोरु पुरुषार्थु केला. । लोक म्हणती मला । कुळघातकी मातें. ॥ ३४ ॥ ऐसें अर्जुनाचें बोलणें । परमार्थें कैसें घेणें ! । तें साहित्य आइकणें । जाणता जनीं. ॥ ३५ ॥ शुद्ध, आत्मा केवळु, । तोचि अविद्यागुणीं शबळु । खेळतु असता खेळु । अहंममतेचा. ॥ ३६ ॥ विषयीं आसक्ति अतिमानें । स्वपरदेहीं बहुगुणें; । वर्तता प्रीति मनें । सुटेविना. ॥ ३७ ॥ काम, क्रोध, मदु, मत्सर, । दंभ प्रापंचिक अपार । भावनाशक समग्र । ते आगीं जया, ॥ ३८ ॥ ऐसा कर्मबद्धु, देहबद्धु, । वासनाबद्धु, गुणबद्धु, । संसारश्रमीं ममताबद्धु । अर्जुनु तो. ॥ ३९ ॥ गुरूचें सानिध्य पावला, । तोचि कृष्णु सारथी भला. । तोचि कौरवभारु देखिला । स्वरूपलोपकु. ॥ १७४० ॥ तो संग्रामु योगसंग्रामु । अर्जुना तया माने दुर्गमु; । भारी बाधक शत्रु, दस्यु, । जयो गुणाचा. ॥ ४१ ॥ मग गुणदृष्टी चेइला । गुरु सारथी कृष्णु भला । तेणेंसीं बोलता जाला, । केशवा, म्हणौनि. ॥ ४२ ॥ योगसंग्रामु हा दारुणु, । येथें योद्धा मी आपणु; । मातें वैरी ते स्वजनु । माझेंचि कुळ. ॥ ४३ ॥ माझा अभिमानु प्रतापु । कामु, क्रोधु, आटोपु । माझा प्रपंचु सुखरूप । विषयाकारत्वें. ॥ ४४ ॥ कार्याकार्यीं प्रवर्तता । माझे अभिमान मीचि सर्वथा; । प्रतिष्ठा, पदवी, मान्यता, । माझा डंबु. ॥ ४५ ॥ मी करितों माझा मत्सरु । मीं करितो मदु मत्परु, । मी करितों समग्र । भाव माझा. ॥ ४६ ॥ रज, सत्व आणि तम । माझिये प्रकृतीचे धर्म. । कर्ता मी, कार्य, करण; । धर्म सकळ माझें. ॥ ४७ ॥ ऐसे माझे प्रकृष्ट भाव । तेचि

मातें वैरी कौरव, । ये योगसग्रामीं सर्व । मारावे हे. ॥ ४८ ॥ तरि रणीं मारूनि ययातें । श्रेय काहीं न दिसे मातें. । उपराठीं निमित्तें बहुतें । तीचि आभासती ॥४९॥ म रिते म्या या रजोगुणा । इतुलेनि मीचि पडलों उणा, । परतु तेणें लाभु तो मना । नये दिसों. ॥ १७५० ॥ रजोगुणाचेनि अभावें । विषय कैसे म्या भोगावे? । प्रपच भान जाणावें । तेंचि न घडे. ॥ ५१ ॥ इंद्रिया आटी जडता । प्राण पागुळले राहता । ऐसेनि येणें चित्ता। करणु सतोषु? ॥ ५२ ॥ देहचि कैसें सारावें? । जागृती भुलिजे स्वभावें. । इतुलेन अहितचि जाणवे, । परि हित तें नाहीं ॥ ५३ ॥ आपुला अभिमानु साडिता । मग उरलें जिणें तें वृथा. । पाच पाच टोले भरयता । नेघे का मग? ॥ ५४ ॥ मारितेन सुख मारावें, । रिटविरेन रिटवावें, । येणें अहत्यागें वरवें । माझें काय? ॥ ५५ ॥ यशकीर्तिजयोत्कोटी । करणें भोगावी आवडी? । कर्मीऽ ती वरपडी । कैंची मग? ॥ ५६ ॥ आपुला आपणु रखावा, । कीं अभिमानु धुडी मेळवावा? । हासावया ठाव करावा । माणुसातें. ॥ ५७ ॥ क्रोधु वैरियाचा वैरी । तया तें मारणहारु मारी, । मग अरिकुळाचा घरीं । पाणी तारावें, ॥ ५८ ॥ क्रोधहीना नाहीं त्राण, । नव्हे देहाच लक्षण । त्रास दुसरेयापासून । नित्य होये. ॥ ५९ ॥ क्रोधें सुटला नरु । व्याघ्रु तोही माजर, । ना चिल्लीचा विखारु । चढे ना उतरे. ॥ १७६० ॥ आत्मकाम पूर्ण करावे । आपणा ऐसेंचि बरवे, । ते व्यर्थ करूनि मारावे । वैरियें कीं. ॥ ६१ ॥ आता कामातें मी मारिता । आपुला वैरी तत्वता. । सार्वकाळ निराशता । स्वभावें होये. ॥ ६२ ॥ सकळ काम पुरती । तें देखिजे जे महती, । ते न साहे आपणाप्रति । आपुली जे. ॥ ६३ ॥ तें आपुलिया इष्टा नाशु । अरिष्टकर्ता पुरषु, । आपणुचि मानहरासु । आपुला करी. ॥६४॥ ऐसे जे आपुले गुणभाव । ते पोषावे आपणचि सर्व, । जयाचेनि स्वभेव । आपणु सुखी. ॥ ६५ ॥ ना ते आपुलिये जतने । आपणा लाविले नारायणें, । ऐसिया तयातें हाणे । तो आत्मघातकी खरा. ॥ ६६ ॥ केतकीदळ सकुमार, । तयातें रक्षक पदर, । नलगावे वैरियाचे कर । सहसा म्हणौनि. ॥ ६७ ॥ परिमळु तो आतुडे करी । आच्छादूनि केवडे । हातु लावितांचि मोरडे । ऐसे वाढे. ॥ ६८ ॥ तें सकटक, वासहीन, । बाहेरि नसतें आवरण, । तें कोमळ दळ तें कवण । सोडूनि जातें? ॥ ६९ ॥

भक्षण करिते पशु; । गोवळां होता उल्हासु; । तैसा आत्मगुण विशेषु । आपणा रक्षी. ॥ १७७० ॥ नारिकेलाचीं आवरणें । तींचि तेणें न साहणें, । तरि रासभा मुखीं चूर्णे । आपुलीं करावीं. ॥ ७१ ॥ फणसावाहेरि आवरण । तें हो स्वादहीन, विवर्ण; । तरिचि अंतरीं जतन । गोडियेची. ॥ ७२ ॥ असो आपुलिया गुणा । मारूं योगयुद्धें, कृष्णा, । तरि भीचि पडलों उणा; । श्रेय न देखें. ॥ ७३ ॥ अरिष्टें तींचि दिसती । ऐसा विचारु आथी; । म्हणौनि आपुली याति । मारीना मी. ॥ ७४ ॥

न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च
किन्नो राज्येन गोविंद किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२ ॥

हे कृष्ण

अवधारीं, गा श्रीकृष्णा. । अर्जुनु म्हणे, नारायणा, । आता हाचि निर्धारु मना । माझारि माझया. ॥ ७५ ॥

विजयं न कांक्षे

गुरुगोत्राचा करूनि क्षयो । जाला जो मातें विजयो, । नाहीं मज तयाचा विषयो । नापेक्षीं तो. ॥ ७६ ॥ येणें विजयेवीण तुम्हासि । राज्य नाहीं, ऐसें म्हणसी; । तरि विनंति माझी परियसीं, । वासुदेवा. ॥ ७७ ॥

न च राज्यम्

तरि मारूनि स्वजनातें । आणि पावोनि जैतातें, । राज्य जोडावें; तरि तें । राज्यही नापेक्षीं. ॥ ७८ ॥ राज्याचिये उपलब्धीवीण । सुखातें नाहीं जनन, । ऐसें तू जें वचन । बोलसी, कृष्णा, ॥ ७९ ॥

सुखानि च

तरि आपुले स्वजन मारावे । मारूनि राज्य पावावें. । मग राज्यद्वारा भोगावें । विविध सुख; ॥ १७८० ॥ तीं सुखेंही मी नाना । नापेक्षीं, गा जनार्दना, । न मरूनि आपुलिया जना । असों न सुखाभावें. ॥ ८१ ॥

हे गोविंद

अवधारीं, गोवर्धनधरा, । गोविंदा, अजा, ईश्वरा, । तूं हृदयस्थु, दातारा, । आत्मा सर्वां. ॥ ८२ ॥ मनादिइंद्रियसाक्षी, । देवा, तूं विश्वकुक्षी; । तुजप्रति सांगणें प्रत्यक्षीं । हेंचि कायि? ॥ ८३ ॥ आम्हीं मनोगत सांगावें, । तें पहिलेंचि तुतें ठावें. । आता मनाचा स्वभावें । तरि बोलिजैल. ॥ ८४ ॥

नः

गुरुघातकी, गोत्रघातकी, । ये येसणें पुरलयीं पातकी, । राज्य करून तम्ही कीं । ऐसिया आमुतें। ॥ ८५ ॥

राज्येन किम्

राज्यें तेणें कवण हित? । परलोकीं काय प्राप्त? । सांगों तें नये वित्त । जोडिलें हें. ॥ ८६ ॥ प्राचीन तेंचि भोगावें, । हें न चुके जें स्वभावें, । तें राज्यें अपारें करावें । आतां काये? ॥ ८७ ॥ येकलें उपजणें, मरणें, । जी जें तंव देहें येणें, । आपुलाचि आहार घेणें । ऐसें असतां, ॥ ८८ ॥ अपारें राज्यें कवणु । आमुतें आतां प्रयोजनु? । प्राचीन सारावें भोगूनु । इतुलेंचि मात्र. ॥ ८९ ॥ अपार मीनती जीव । तें आपुलेन प्राचीनें सर्व; । त्यामाजी राजा स्वमेव । माणुस येक. ॥ १७९० ॥ अवघियां सारिखेंचि अन्नपान । निद्रा, जागृति, जिर्णे, मरण; । राज्य भोगिती बहुत जण । आपुलालेन प्राचीनें. ॥ ९१ ॥ अश्वभागु अश्वीं नेणें, । गजभागु गजा देणें, । नरभागु नराकारणें । वांटवांचि तो. ॥ ९२ ॥ चोरभागु तो चोरचा, । मृत्तिकेनें भागु मृत्तिकेचा. । देवभागु देवांचा । तयां माजि ॥ ९३ ॥ मुखक, मक्षिका, मत्कुण, । त्रिभागू नेती सकळ जण. । राजाआदि समान । भोग सारिखे. ॥ ९४ ॥ द्रव्यादि पदार्थ देखणें । सारिखेंचि सर्वांकारणें; । स्पर्श अनुभवु घेणें सारिखाचि तो. ॥ ९५ ॥ नाद आइकती अपूर्व । तेही सारिखेचि सर्व. । स्त्रीसुखाचे अनुभव । समान तेही. ॥ ९६ ॥ रस सारिखेंचि जाणणें, । तैसेचि गंध अनुभवणें, । प्राचीन भोगें साधणें । सारिखेंचि. ॥ ९७ ॥ अनिवार साही विकार, । अंतीं नाशे शरीर, । व्याधि आधि निरंतर । सारिखेंचि भोगणें. ॥ ९८ ॥ राजा तो कासेन आगळा । विचारीं, पां गोपाळा, । राज्यभोगु सकळा । सारिखा जें. ॥ ९९ ॥ तरि अहंता आणि ममता । यिया दोहींची परिपुष्टता, । इतुलेनेचि सर्वथा । राजा श्रेष्ठ. ॥ १८०० ॥ मी राजा, हें सर्व माझें, । ऐसें अहंते ममतेचें वोझें, । जयाचां खांदीं साजे । तोचि राजा. ॥ १ ॥ तरि आगळी असोनि अहंता । ते पुरवी कवणा स्वार्था? । कल्पनाचि मात्र कीं, अनंता, । आणिक काहीं! ॥ २ ॥ करंणी येक दुर्बळु जनु । तैसाचि धरि अभिमानु. । तें तो आणि तो समानु । कसेन होती! ॥ ३ ॥ राजवेषें नटे नटिया । जितुला कुमारा अनुभवु तया । तितुलाचि तया राया; । परि आगळा नमे. ॥ ४ ॥ तयातें नाहीं नियता, ।

ऐसें बोलसील, अनंता; । तरि ययाचियाही नित्यता । अभिमाना कैंची ? ॥ ५ ॥ राज्याचा भ्रंशु होये । तें तो अभिमानु काये राहे ? । स्वप्नीं सुगति नये । सर्वथैव. ॥ ६ ॥ जागृती ही नाहीं नित्यपण; । जेणें कल्पूनि धरावा तें मन । अति चंचळ; म्हणौन । अभिमानु न थारे. ॥ ७ ॥ निमिषोन्मेषीं असे कां नसे. । अभिमाना नित्यपण ऐसें. । आता मरणीं केवळ विनाशे । नाहीं पुडती. ॥ ८ ॥ आतां ममतेचेनि आंगें । अभिमानु सुखाचा लगे. । ते खोटी प्रसंगें । तरि मायिक ममता. ॥ ९ ॥ द्रव्याचिया राशी । तेथें ममता रायासि; । परि तें सर्वथा तयासि । भोगा नये. ॥ १८१० ॥ भोगीचि तें तें बहूतांचें; । विभाग समस्तां जीवांचे; । ठेवी, तें आणिकांचें । देह पातानंतरें. ॥ ११ ॥ जयाचे तया देखतां । तें द्रव्य हांये आणिकु भोगिता; । तेथें हा धरी ममता । तें नाशु पावे. ॥ १२ ॥ द्रव्य सर्वथा बलवंताचें, । तें नें कैसें येकाचें ? । महाममत्व तेथींचें । तें काये करी ? ॥ १३ ॥ भय उपजवी, पिसें लावी, । समयीं हांसवी, रडवी, । चिंताचि पुरुष अनुभवी । परि तें पराचें. ॥ १४ ॥ भोगितां ठेवितां, परावें; । देतां कां आपुलें नव्हे. । तरि भल्यतया नेदवे । काये ह्मणौनि ? ॥ १५ ॥ समृत्यातेंचि देणें, । तरि विभागीचि तो मानणें; । धर्मु येका करणें । तो विभागु तयाचा. ॥ १६ ॥ विभागी तोचि मागेल । विभागी तोचि लाहील, । विभागा नव्हे तया देईल । राजा कवणाचें ? ॥ १७ ॥ म्हणौन द्रव्य अव्यय ईश्वराचें; । पाळण करी भूतांचें. । तेथें ममत्व येकाचें । ते कल्पना खोटी. ॥ १८ ॥ परद्रव्यीं ममता धरणें । कवणा नटकें हें येसणें ? । राजाचि आगळा कवणें । प्रकारें येकु ? ॥ १९ ॥ राज्यलेणें जायाचें; । मरणापुढें हें कैचें । मरणापूर्वी येकाचें । नव्हे सर्वथा. ॥ १८२० ॥ द्रव्य तैसीचि दारा । बळवंतें नेलिया घरा, । माझी म्हणतां शिरा । छेदु पावे. ॥ २१ ॥ पुत्रादिपदार्थ सकळ । परावे जाणतां केवळ; । 'अहंममता' हें मायाजाल । ईश्वरें प्रेरिलें. ॥ २२ ॥ तरि राज्य कवणाचें ? । येणें हित काये आमुचें ? । बोझें अहंममतेचें वाहवें व्यर्थ ॥ २३ ॥ समस्तांवरि माझी सत्ता । हेंही न घडे सर्वथा. । माझां राज्यीं मीचि कर्ता । हें साच जैं, ॥ २४ ॥ तैं न पिकतां पिकवावी मेदिनी, । पर्वताचें करावें पाणी, । आगि जाळावी इंधनीं, । करावी भस्म ॥ २५ ॥ लावावां व्योमातें अनलु. । करावा जळाहूनि शीतलु । सूर्यो जळचरां कालु तो । कां तपो. ॥ २६ ॥ कवणाचें निवारी मरण, । चुकवी कवणाचें पतन, । मुक्त करी बंधन ।

कीं यद्वा मुक्ति दे?॥ २७ ॥ आधिव्याधिपरिहारु । माझा मी न शकें करूं; तो सकळा भूताचा ईश्वरु । कैसेनि होईना? ॥ २८ ॥ पुरुषार्थींची राणीव, । भगवंता, तुझी सर्व; । आम्ही पराधीन स्वमेव । स्वतंत्र नहों. ॥ २९ ॥ आत. कल्पनाचि वाढवणें, । ममताचि पुष्ट करणें, । परि अकीर्तिकरें राज्यें येणें । लाभु कवणु? ॥ १८३० ॥ येणें मोक्ष, कीं आत्महित, । इष्टप्राप्ति, अविच्छेदन, मत. । या लागीं राज्येंकरूनि स्वहित । काये असे? ॥ ३१ ॥ तूं ह्मणसी, देवा, वचन. । विषयभोग येणें करून । ते यथेष्ट आपण । अनुभवा आणावे. ॥ ३२ ॥

भोगैः किम्

विषयभोग अपार । ययातें पावलें शरीर, । तथापि तेहीं भोगीं साचार । काये आमुतें? ॥ ३३ ॥ वासु घेऊनि पुष्प टाकिलें, । तेयें प्राणीं काये उरलें? । भूतीं भूत परीक्षिलें । लाभु कवणु? ॥ ३४ ॥ साही रसातें जाणोनि । उरली रसना स्वस्थानीं; । तेयें नित्य उरलें तेणेंकरूनि । तेंचि काये? ॥ ३५ ॥ उर्वशी ऐसिया भोगिता, । तो भोगु सेवटा जाता; । उरला लाभु कवणु तत्वता । आपुला आर्गी? ॥ ३६ ॥ उत्तमें वस्त्रें लेइला । मग तीं फेडूनि लाभु पाहिला; । तंव दाविजे मिरविजेसा उरला । नाहीं अर्थु. ॥ ३७ ॥ उत्तम गंधविलेपन, । सुमनमाळाचें भूषण, । अंतीं लाभु तेणेंकरून । तो कायी जाला? ॥ ३८ ॥ उत्तम आइकिलीं गायनें, । वाद्यें चतुर्विधें आणि तानें, । अंतीं लाभु तेणें गुणें । तो काये उरला? ॥ ३९ ॥ दृष्टी देखोनि पुरिलें । तें पोटांतु नाहीं गेलें; । मेळिया तेणें द्रव्यें आपुलें । हित कवण? ॥ १८४० ॥ गज, रथ, नर, वारु, । येरही पदार्थु अपारु, । पशु, वस्त्रें, धान्य, प्रकारु । ययाही वेगळा. ॥ ४१ ॥ ययाचेनि दर्शनें, स्पर्शनें, । लाभु काये आपणाकारणें? । मरतां येकलेनि जाणें । मग तें करणाचें? ॥ ४२ ॥ उपजल्या तैसाचि गेला; । वाउगाचि मध्यें गलबला; । ममतें अहंतें केला । तो लाभेंवीण. ॥ ४३ ॥ पाषाणाची प्रतिमा केली, । षोडषोपचारिलें पूजिली, । तीनें निश्चित जोडी जाली । कवणा अर्थाची? ॥ ४४ ॥ सुकोनि गेलीं तीं सुमनें । वाहोनि गेलीं जीवनें, । वाळोनि उडालीं चंदनें । राहानी चिना. ॥ ४५ ॥ ठेविले नेले नैवेद्य. । नमस्कारीं काये साध्य? । दीप लागले, साध्य बोध्य । काये तेणें? ॥ ४६ ॥ कांहींचि न भोगे पाषाणा । तैसेचि ना भोगीं आपणा । ज्ञानक्रिया, वासना । तेचि आगळी. ॥ ४७ ॥ ज्ञान, कर्म, वासना, तीन्ही । मनुजा असती;

नसती पाषाणीं. । परंतु संप्राप्ति निर्वाळीं । सारिखीचि ते. ॥ १८९० ॥ आला भोगु तो जाणोनि । वासना धरावी मागुतेनि; । मग ते पुरवावया लागुनि । करणी करावी. ॥ ९१ ॥ जाणोनि काये आले ? । भूतीं भूता वोळखिलें, । स्थूळ सूक्ष्म मीनलें । आपुलाले याती. ॥ ९२ ॥ उरली भोगाची केवळ । वासना, तीचें काये फळ ? । उगीचि लाले तळमळ । हानिलाभाची. ॥ ९३ ॥ तिये वासनेचेंचि आंगें । क्रियाचि वाढों लागे. । श्रमु तो क्रिये आंगें । वाडगाचि. ॥ ९४ ॥ तेणें श्रमें सुख, दुःख; । तयाचें पाहवें मात्र मुख. । परि तेणें आपणा आणिक । काय जोडे ॥ ९५ ॥ या परी विषय भोगितां । आत्म स्वार्थु नाहीं, अनंता. । देहरक्षणमात्र समस्तां । साध्य येक. ॥ ९६ ॥ मा देहरक्षणाकारणें । इतुलें राज्य काये करणें ! । आयासें ग्रासु मेळवणें । तेंचि उदंड. ॥ ९७ ॥ पाप कासया आचरावें ! । यश कासया इच्छावें ! ! । राज्य काये करावें । अल्पासाठीं ! ॥ ९८ ॥ आता तें देहरक्षण, । तयाचें ह्मणसी हें साधन; । तें ऐसेंनि देहरक्षणें । करूं वासुदेवा. ॥ ९९ ॥

जीवितेनवा

जिणें तेंही मी नापेक्षीं; । मरण वरि वरें लक्षीं. । पाप जिणें प्रत्याक्षीं । तें काये नित्य ? ॥ ६० ॥ तये पुढती न चुके मरण; । मेळिया पापफळ दारुण; । तया अनिवाराचें निवारण । कवणें करावें ? ॥ ६१ ॥ सदन्नें पोपलें मास । तें इंधन जालें आग्नीस; । व्याघ्रां श्वाना जंबुकांस । काजा आलें. ॥ ६२ ॥ कीं क्रिमकीट आतलें । मांस वायसीं भक्षिलें; । घारीं गीधीं नेलें, । सेवटीं मृत्तिके मिळे. ॥ ६३ ॥ सकुमारता काय जाली ? । लावण्या आगि लागली ! । स्वरूपता ते उरली । काये तेथें ? ॥ ६४ ॥ राज्यें येणें आगळें । मांस जोडावें हेंचि उरलें. । वांचूनि देहरक्षण घडलें । तें येरां समानचि ॥ ६५ ॥ आतां मासालागीं राज्य करूं, । तरि मांस तोही येकु मास. । वाहतां आर्थी श्रमु थोर । सेवटीं ऐसें ॥ ६६ ॥ वर्णु सुंदरता लावण्य, । मांसें शोभे तारुण्य । तें मांस सेवितां पुण्य । नागा लागे ॥ ६७ ॥ स्त्रीरूपें मास भोगावें, । आत्मरूपें मासचि पाहवें, । केवळ मासकर सेवावें, । तेंही मांस ॥ ६८ ॥ मास तें देहपाती । मांगा ते नये; होय माती. । तरि तेणें मासें, श्रीपति, । कवणु प्रयोजनु ? ॥ ६९ ॥ म्हणौनि तेसें

जिणें, । तें नापेक्षिजे माझेनि मनें, । अथवा देह पडो अन्नें । वोचूनि जन्हि तन्हि ॥ १८७० ॥ तेंही परंतु जीवित । नापेक्षी माझें चित्त. । जिणेनि लाभु हें मत । तया मूर्खाचें. ॥ ७१ ॥ जिणें, तैसें मरणें, । लाभालाभु नाहीं येणें. । सुकृत कांहीं करणें, । तेणें लाभु ॥ ७२ ॥ म्हणौनि न वधि स्वजनातें, । नापेक्षीं येथ जयातें, । हें राज्यच पोहिजे मातें । अहितकर. ॥ ७३ ॥ राज्यजनितें सुखें । नापेक्षीं मी, तीं दुःखें. । जिणें तैसेंनि कौतुकें । तें मज न पोहिजे. ॥ ७४ ॥ ऐसें बोलिलें अर्जुनें, । परमार्थसाहित्यें घेणें; । अगों योगें करणें, । अवधारा पां. ॥ ७५ ॥ अर्जुनु ह्मणे, " श्रीकृष्णा, । गुरू तूं योगी, नारायणा, । यया योगयुद्धाची वासना । नाहीं मातें. ॥ ७६ ॥ येथिचा जयो मी नापेक्षीं; । यशायश तेंही न लक्षीं; । साहतां वरें अकीर्तीसीं । संग्रामु न करितां. ॥ ७७ ॥ आतां योगसंग्रामीं यये । जालेनि केवळेंनि केवळें जयें, । स्वस्थिति साम्राज्य आहे । तें भागवें कीं. ॥ ७८ ॥ स्वरूपस्थितीचिये राणिवे । इंद्रु तेंही सरि नपवे. । मा भौमराज्य अवघें । तें काय तेथ ? ॥ ७९ ॥ ऐकोनि जयाचें माहिमान । देव कांपती तिवेजण; । सामर्थ्य परम गहन । गुणातीताचें. ॥ १८८० ॥ अनंतें ब्रह्मांडें, हा देशु; । चराचरें प्रजा विशेषु; । दुसरा नाहीं देव, ना दासु; । शिष्यु, ना गुरु. ॥ ८१ ॥ येसणेंही राज्य, परि । तयाची वासना मी न करीं, । अभिलाषु मोडला अंतरीं । स्वसाम्राज्याचा. ॥ ८२ ॥ पावोनि यया सुखातें । अंतर्भावीं सुखें अनंतें. । तीं भोगावीं कीं समस्तें । साम्राज्यद्वारा. ॥ ८३ ॥ ब्रह्मऐक्यें ब्रह्मसुख. । इंद्रऐक्यें इंद्रसुख. । विष्णुऐक्यें विष्णुसुख । जीवन्मुक्ता तया. ॥ ८४ ॥ रुद्रऐक्यें रुद्राचें. । तैसेंचि सकळां देवांचें । सुख पार्थिवां राजयाचें । आम्नान्वयें असे. ॥ ८५ ॥ ना कीं आत्मसुखा अंतर्भावीं । क्षुद्रें सुखें आलीं अवघीं; । म्हणौनि ना सुखें अनुभवी । राजयोगी राजा. ॥ ८६ ॥ ऐसें सुखभोग अनंत । नापेक्षी तयातेंही चित्त. । म्हणौनि विजयो आणि हें समस्त । नलगे राज्य. ॥ ८७ ॥ ऐसें कां ह्मणसील जालें ! । तरि सांगेन आतां बोलें. । इंद्रियद्रष्टेण गोपाळें । जाणवें तुवां. ॥ ८८ ॥

न राज्येन किम् ।

जालेंही राज्य येसणें; । आमुतें काय येणें ! । स्वप्नींचे जैसें भोगणें । मान

सिक सुख. ॥ ८९ ॥ आत्मान्वयें जाला भूपाळु । देहीं मागे भिक्षाकवळु.। तेणें राज्यें सुकाळु । कल्पनेचा. ॥ १८९० ॥ आत्मत्वें मी विश्वकर्ता। देहीं न मीळती पांच अक्षता; । ऐसेनि थोरपणें अनंता, । कवणु व्यभु ? ॥ ९१ ॥ विवेकें जाला श्रीविष्णु, । आणि शरीरीं जो पराधीनु; । लौकिकीं नाहीं मानु । तें काये करणें ? ॥ ९२ ॥ ज्ञानें मूळधरु मी आत्मा । आणि देहीं दुःखीमिवश्यामा । ऐसी वासनामय महिमा । ते काये करावी ? जी. ॥९३॥ ब्रह्मांडमंडळां, अनंता ।आत्मा, ईशु, मी नियंता, । पाळिता, प्रळयकर्ता। इच्छामात्रें. ॥ ९४ ॥ ऐसी भावना अंतरीं, । आणि सुडका न मिळे बाहेरि. । पोष्या उपवास उदरीं । पाळा बांधे. ॥ ९५ ॥ आत्मत्वें राज्य माजणें, । मातें नसे पश्वादिकां अंगेंजणें । आपण काये अनुभवणें । तेथिचें. कांहीं ॥ ९६ ॥

भोगैः किं

ब्रह्मानंदाचां पोटीं । क्षुद्रानंदाचिया कोटि; । योगमार्गें ज्ञानदृष्टीं । भोगिजत असतां, ॥ ९७ ॥ तेणें भेगें शरीरीं । काय फिटे, गा मुरारी. । देहो दुःखी परोपरी । तो जैसा तैसाचि. ॥ ९८ ॥ लागली क्षुधा तेणें न सरे, । कोरडेन कोंडेन जें सरे; । तृषा पुरेना विचारें । तया सुखाचेनि. ॥ ९९ ॥ पाया लागला पाथरु, । तेणें दुःखी होये नरु; । आतां व्यथेचा परिहारु; । करावया. ॥ १९०० ॥ मिळीफळ जैसें गुणांचें, । तेसें काज न करी तें सुख तयाचें. । अमृतपानाहूनि अन्नाचें । कवण महिमान ? ॥ १ ॥ ब्रह्मानंदें निवाला, । अमृतपानें जो धाला, । तो क्षुधार्थी पीडिला । तरी तें काय ॥ २ ॥ अनंतें सुखें समरसलीं, । ययाचां हृदयीं भरलीं; । तरि सुख, दुःख, बाह्य स्थूळीं । नेणोंच तें ॥ ३ ॥ चहोंटा पडला उताणा । इंद्रपद भेगी वासना. । तयाची वृथा कल्पना । ते काय करावी ? ॥ ४ ॥

जीवितेन वा.

आत्मा विनाशपणें । कल्पकोटि जे जिणें, । आतां मातें काय तेणें ? । म्हणौनि नापेक्षीं. ॥ ५ ॥ आत्मत्वें अविनाशपण । न चुकवी देहाचें मरण. । मा तया योगाचें थोरपण । तें काये करावें ? ॥ ६ ॥ विश्वेंसीं अविनाशता । आपण भोगिजत असतां, । तेणें अमरत्व ममत्ता । नये जैसें; ॥ ७ ॥ तैसेंनि आपुलाही

शरीरीं । न येतें उपेगावारीं । जिणें जयांचें, मुरारी; । मरणें सत्य. ॥ ८ ॥ स्वस्थितीचेनि राज्यें तेणें, । गुणांचा ठायीं काये पात्रणें; । राज्य वासनिकमनें । भोगिजे जया परी. ॥ ९ ॥ तेणें राज्यें जे जे भोग, । ते भोगितां नलगे तया आंग। । मृगजळींचें जैसें गांग । कोरडेंचि. ॥ १९१० ॥ तेथिंचें जें अविनाशपण । न शके चुकवूं मरण. । आतां तेणेंकरूनि कल्याण । काये पाहवें ? ॥ ११ ॥ काये तें राज्य वाखाणूं ? । काये तीं सुखें वानूं ? । अमरपणाचा गुणु । तो तयाचि ऐसा ॥ १२ ॥ तें कव्हणी येक स्वप्न; । लाभु काये तेणेंकरून ? । मुठि योकि तृण । तें तन्हीं मिळतें कां ? ॥ १३ ॥ मानसिक वरि चित्र, । नाना गंधर्वनगर । स्वर्गेंचि भासे अपार; । नये भोगा. ॥ १४ ॥

येपामर्थे कांक्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।
त इमेव स्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३ ॥

राज्यं भोगाः सुखानि च.

वासुदेवा, अवधारीं । वचन येक, वरवयापरी; । येणें चाड नाहीं संसारीं । मातें येकल्या. ॥ १५ ॥ आतां हें राज्य अभंग, । आणि ययापासार जे भोग, । ते भोगावया अमोघ । चिरकाळ जिणें. ॥ १६ ॥ राज्य, भोग, धय, तीन्ही । ययांचा करु नित्यपणीं । जीं जीं सुखें चक्रपाणी । तीं तीं सकळें ॥ १७ ॥

येपामर्थे कांक्षितं नः

काया, वाचा आणि मनें । करूनि तपें अनुष्ठानें, । आम्ही इच्छूं जयां कारणें । भोगावया, ॥ १८ ॥ देवा, राज्य दे कां मातें, । आणि मी पोषीन या स्वजनातें, । माझीं यीं झणें आणिकातें । हातु पसरितील. ॥ १९ ॥ षड्रस अन्न वोगरिल, । परंतु जयावीण विष जालें, । तीं वाडें धाकुटीं मुलें । कैसीं सांडावीं ? ॥ १९२० ॥ जयाचिया तृप्ती आपणा । न खातां तृप्ति होये मना, । जयातें न देखत, अन्ना । हातु न घालवे. ॥ २१ ॥ संभवतां बैसे पाला । तें अन्न मृताचा गळाला ? । जयावीण हलाहला । सारिखें रुचे. ॥ २२ ॥ मुखें मुखीं ग्रासु घालिजे, । मुखींचा मुखें काढूनि घेइजे, । ऐसी महाप्रीति उपजे । जया देखोनि. ॥ २३ ॥

जयांचेनि अवमानें । मानी जो आपणाकारणें, । तो वैरी होये अतिमानें । मित्रुही परि ॥ २४ ॥ आपुलें ऐसें म्हणिजे, । तें राज्य जयां देईजे, । गेलें ऐसें जिवा नुपजे । निश्चिंतां होये. ॥ २५ ॥ सेजे केलें शयन । जयाची न करितां आठवण, । होये मग दाटून । सादु घालिजे. ॥ २६ ॥ जयांचिया पादधूळी । सुखरूप सेज जाली, । जयावीण वनमाळी । विरस ते ॥ २७ ॥ आसनीं नाहीं पेसु, । परि जयांकारितां संतोपु, । जयाचा कठिणु स्पर्शु । मृदु वाटे. ॥ २८ ॥ आयुष्य बहुसाल मागावें । तें जयांतें हो म्हणावें, । परंतु आपणा न इच्छावें । जयांचे आयुष्य; ॥ २९ ॥ सुख मागोनि शंकरा, । देईजे वाटूनि कुमरा, । यां सुखी असतु, ईश्वरा, । येणें अंगें ॥ १९३० ॥ जयाकारणें आयास, । जयाकारणें राज्यबव्हश, । स्तेय करूनि आयास । पोपिति जन; ॥ ३१ ॥ जयांकारणे मिराशी । जयाकारणें श्रमती, तापसी, । जयाकारणें द्रव्यासि । जतन कीजे ॥ ३२ ॥ जयाकारणें आत्मसुखें, । जयाकारणें भोगिजें दुःख; । जयाकारणें मूर्ख । शहाणे होइजे, ॥ ३३ ॥ जयाचेनि वियोगें । हातीं पायीं राख लागे, । आपुलें नव्हे अवघें । ऐसें होये, ॥ ३४ ॥ तात्पर्य जयाचेनि । विकिजे आपणालागूनि, । प्राण वेंची, परि । मनीं त्यागु नुपजे ॥ ३५ ॥ ऐसीं जीं पोटिचीं बाळें । नाना आंतडी उदरातुलें, । मुलें मुलांचीं मुलें; । भावंडेही ॥ ३६ ॥ समान वाड धाकुले । परि काळजाचे तुकडे आपुले । यथां जीवावेगळे । कैसें करावें, ॥ ३७ ॥ गुरु, पितर पुजावें, । ये अर्थी भाग्य मागावें, । पिते पितामहा तोषवावें, । दैव आलया. ॥ ३८ ॥

त इमेव ।

तें हेचि कीं, बापा कृष्णा, । कौरव जाण सर्वज्ञा; । आणि बाळमित्र आपण । आवडीचे. ॥ ३९ ॥ ते हे पुत्र; ते हे पौत्र; । ते हे मित्र; ते हे गोत्र. । ते हे बंधु समग्र । सर्वथा कीं; ॥ १९४० ॥ ते हे पितर, प्रपिते; । ते हे गुरु विद्यादाते, । राज्यसुख हें जयांतें । आपुलें भोगवावें. ॥ ४१ ॥

युद्धे अवस्थिताः ।

तेंचि हे वैरी होऊनि । उभे असती रणीं । यया संग्रामालागूनि; । पुढती कैसे ? ॥ ४२ ॥

प्राणांस्त्यक्त्वा धनानि च.

मांडूनि स्वराज्य, स्वस्थान, । मांडूनि स्वजन आणि धन, । सांडूनि आपु-

नाम, रूप आणि वेगु । विचारें असंतु हा योगु; । तेथें शुद्धा उदका डागु । नसे भेदाचा. ॥ ८५ ॥ ह्मणौनि शबळवाचिन आकारें । शुद्ध तेंचि विकारें । शबळ मिथ्या; विचारें । शुद्ध तें सत्य. ॥ ८६ ॥ ऐसा परिहारु सूचिला, । तेथेंही संदेहो उपजला. । आत्मा शुद्ध तो केला । विकारवंतु जे ॥ ८७ ॥ तरि आत्मयाचीनि नित्यपणें । विकारा पाहिजे नित्य असणें. । विकार नित्य तैं अनुभवणें । निर्विकारता कैसी ? ॥ ८८ ॥ यालागीं नित्याचे स्वभाव, विकार, । ते जे अनित्य, क्षर, । तें नित्याचे ते समग्र । कैसे बोलावे ! ॥ ८९ ॥ संत विकार संताचे; । नित्य नित्या आत्मयाचें; । असंत अनित्य ते तें साचे । इतराचे जाणावे ॥ १९९० ॥ ऐसिया आक्षेपाकारणें । जळ-दृष्टांतु तोचि दावणें । जळचि जैसें स्वगुणें । होये तरंग कल्लोळ ॥ ९१ ॥ उदकाचिये सर्वत्र स्थिती । दुजें कवण कारण आथी । तेथ लहरिया, तरंग उठिती । आपेआप जैसे. ॥९२॥ तैसेंचि शुद्ध सनातन। आत्मतत्व, निर्गुण । तेंचि शबळ सगुण। जाणावें दृष्टांतें; ॥ ९३ ॥ ऐसा परिहारु केला; । तेथेंही संदेहो जाला. । जळीं कल्लोळु उपजला । आणि तरंगादि विकारु.॥ ९४ ॥ तो केवळें उदकें येकलेनि । विकारु उपजे कैसेनि ? । पवनाजीवनाचिये मिळणी। होतील लहरिया. ॥९५॥ उदका वायो झगटे, । तैं तें तरंगाकारें उठे. । लहरिया वेगु प्रकटे । ते चेष्टा पवनाची. ॥ ९६ ॥ तरंगाकार साकारले, । तें राहों पवना वेगळें । न शके, म्हणोनि अंतराळें । तरंगीं वायो. ॥ ९७ ॥ पवनु पाणियें आंचरला, । तो बाहेरि पडों चुकला, । मग जळाधीनु राहिला । तरंगाकृति. ॥ ९८ ॥ तरंगीं सिरकलेनि पवनें । तरंगाकारें जळें धरणें; । या परी नसुधेन जीवनें । तरंग न होती. ॥ ९९ ॥ तैसेचि कल्लोळ धांवती, । लहरिया जळीं क्रीडती, । तेथेंही पवनु आथी । आधारु तयां ॥ २००० ॥ पवनु ह्मणे पाणिया, । मग तें होय लहरिया; । पवनाधारेंचि तिया । होती, भासती. ॥ १ ॥ पवनाधारें होणें, । पवनाधारें आभासणें, । पवनाधारें चेष्टणें । लहरियांचें. ॥ २ ॥ पवनु सोडी संगति, । तैं लहरिया, तरंग नुठिती. । जळ निर्विकार, स्वस्थिति । जैसें तैसेंचि. ॥३॥ ह्मणौनि केवळ जळचि सविकार, । ऐसें निश्चयें उत्तर । न बोलवे, तरि शुद्ध निरंतर । शबळ कैसे ? ॥ ४ ॥ येथें सूचला परिहार. । स्वस्थिति असतां सागरु, । उगाचि भरितें ये पूरु । वेग धांवती. ॥ ५ ॥

आणि वातरहितेंही जळीं । तरंग होती येके काळीं । म्हणोनि पवना वेगळीं । जळनियाही मानिजे. ॥ ६ ॥ ऐसें वचन बोलता । आक्षेपु उपजला मागुता । पवनेवीण सर्वथा । नेणुचि न मभवे. ॥ ७ ॥ आणि दुजेनवीण जीवन । सविशेष होईल आपण । ऐसें न घडे म्हणान । बोलिजत असे. ॥ ८ ॥ सागरु सपूर्ण सर्वथा । परतु वरिता पसु रीता, । म्हणौनि आकाशाचा मागुता । सगुचि तो ॥ ९ ॥ सूक्ष्म पवनु वसे गगनी । तें गगन मिळे जीवनीं; । तरीचि निवातीं तयायामूनि । तरंग होती. ॥ २०१० ॥ पोकळीं आधारें कल्लोळ । पवनाचेंचि तेथे वळ, । नातरि पाणिया पोटीं केवळ । विकार नुपजती. ॥ ११ ॥ वरिवरि तोय चंचळ, । अतरीं निस्तरंग, निश्चळ, । येणें प्रकारें केवळ जळ । तेंचि न विकारे. ॥ १२ ॥ कव्हणी करितीं परिहारु । अतरीं वाहे सागरु, । ना तरि भरितें पूरु । तो केसा येत ? ॥ १३ ॥ अवसे पुनिवेचें भरितें । पूर्ण करी सरितातें; । अतरीं उदक न वाहतें । तें न घडतें हें. ॥ १४ ॥ वरि वरि नित्य लहरिया । धातचि असती तिया । भरितें न होती म्हणोनिया । ऐसें घडे. ॥ १५ ॥ एव उदक अतरीं वाहे । हे खरें मत आहे, । परतु येथेंही होये । येकि आशका ॥ १६ ॥ अतरीं पाणी वाहे । ते रीतियाची ठाया जाये । ना तरि कोरडिया काये । नदिया भरतिया ॥ १७ ॥ म्हणोनि व्योमाचेनि वाहे पसें । वाहे अतरीं तें व्योम असे, । पवनु व्योमा वेगळा नसे । म्हणोनि बळ ते त्याचें ॥ १८ ॥ आकाशीं वाहे जीवन । तें पवनवेगेचि-करून । ते अतरीं वायो गगन । नित्य असता, ॥ १९ ॥ सर्वकाळ भरितेंचि असावें । म्हणोनि तें ऐसें नव्हे । स्वभावचि सहज भावें । तया सागराचा ॥ २०२० ॥ ऐसा परिहारु केला, । सागरी स्वभाव लाविला, । येथेंना आथी उपजला । सदेहो येकु ॥ २१ ॥ स्वभाव तो जैं पाणियाचा । तरंगादि विवर्तु जयाचा । पुरु येणें पौर्णिमेचा । आपेंआपु जो, ॥ २२ ॥ तरि घटु भरूनि जळ आणावें । मग तें पौर्णिमे पाहवे । भरितें आलें तें न बोलावें । आम्हीं वचन. ॥ २३ ॥ आता घटोदका नये भरितें । तरि वर्मु नारोपावा जळातें. । जळीं जळा वेगळे तेथें । निमित्य कल्पावें ॥ २४ ॥ पृथ्वी, आकाश, वायो, चद्र । अथवा देवतारूपें सागरु । परतु पाणियाचा

विकार । ऐसें तव नव्हे. ॥ २५ ॥ जळविकारची हे होते । तें मेंवर वाटवे पोटिसे । वराग्नेहरि न येते । त्वण काये? ॥ २६ ॥ म्हणौनि जळ तें निर्विकार, । अन्य धर्मी तेथें विकार; । आतां अद्वय, अज, अक्षर, । आस-तत्व जें ॥ २७ ॥ तेथें शबळद्रोचे विकार । तया धर्म न होती समग्र । तेथें निमित्य तदितर । कवण कल्पावें? ॥ २८ ॥ प्रकृति मानावी तें असत । हें विकारवादियांचेंचि मत; । आतां तीचें आंग सत । कैसें साहे? ॥ २९ ॥ जीवन हाले पवनें, । तसें ब्रह्म मायेनें; । मग तद्विकार पडलें होणें । केवळा तया. ॥ २०३० ॥ तरि असंता सत बाध्य । वंध्यजा माणूस वध्य । लटिकें सत्य साध्य । ऐसें दिसे. ॥ ३१ ॥ एवं शुद्ध तें केवळ निर्विकार, । दुजें असत तादितर; । तरि भव-भानचि समग्र । असावेंना. ॥ ३२ ॥ आतां हें काये आभासे? । कवणा बाधक असे? । याचिये निवृत्तीचें पिसें । तेंचि कवणा? ॥ ३३ ॥ ऐसें या आक्षेपा-निवारण । बोलती जाणते वचन. । अहो शुद्ध, निर्विकार, सनातन, । तें जैसें तैसेंचि. ॥ ३४ ॥ तें विकारलें ना पालटलें, । जैसें तैसेंचि असे संचलें, । प्रपचु हें अज्ञान आपुलें । आपणा भासे. ॥ ३५ ॥ आत्माज्ञानें शबळता । शुद्धा भासे प्रपंचता, । आत्मज्ञानें पाहतां । मिथ्या सर्व. ॥ ३६ ॥ म्हणौनि नामरूप ज्ञानाज्ञान । अवघेंचि हें आत्माज्ञान; । तरि आत्माज्ञाना अधिष्टान । पाहिजे कीं. ॥ ३७ ॥ आपुलें अज्ञान कवणातें । शुद्धा न घडे शुद्धमतें । आणि शुद्धा वेगळें येरतें । अज्ञानकार्य. ॥ ३८ ॥ विण आश्रयें अज्ञान । कवणा भासे भान? । आतां शुद्धा वेगळें स्थान । कैचें यया? ॥ ३९ ॥ अज्ञाना न दिसे स्थान, । तरी बोलणेंचि अप्रमाण; । आतां गुरुमार्गे योगसेवन । तें कवणा पाहिजे? ॥ २०४० ॥ कव्हणी देतील उत्तर । शुद्ध ब्रह्म तें अक्षर; । तें पालटोनि प्रपंचाकार । जालें हें न घडे. ॥ ४१ ॥ प्रपचु विकारु ब्रह्मीचा, । शबळु भाव शुद्धाचा; । ऐसा-ही निश्चयो तयाचा । केला नवचे. ॥ ४२ ॥ पालटुचि जया नाहीं, । विकारु, तरगु नुपजे कांहीं; । तरि अज्ञान जें आत्मविषयीं । तेंचि भासे. ॥ ४३ ॥ बोलतां ऐसें वचन । शुद्धा आत्मया कें अज्ञान? । यालागीं तेंही प्रळपन । साडिलें सर्व. ॥ ४४ ॥ आतां अधिष्ठानीं नाहीं परिणामु ।

विकारु, अज्ञान, न तद्धर्मु, । रज्जुसर्पन्यायें भ्रमु । उगाचि भासे. ॥ ४५ ॥ दोरु तो कांहीं पालटला, । किंवा सर्पत्वें विकारु तेथें उठिला, । पाहे तो केवळु आंधळा । ऐसेंही नव्हे. ॥ ४६ ॥ तेथें पाहतियाचीं दृष्टी । दोरु सर्पाकारत्वें उठी, । तयाचिया दोरपणा तुटि । काये तेणें ? ॥ ४७ ॥ ऐसेनि विचारें येणें । शुद्धीं प्रपंचु स्थापणें, । तरि ऐसेंही हें बोलणें । सदोष दिसे. ॥ ४८ ॥ दोरु दोरपणें खरा, । देखणा तो सत्य दुसरा, । पूर्वदृष्ट तिसरा । सर्पु साचारु; ॥ ४९ ॥ तिघां न साहे एकपण । साहे तें नुठी अन्यथाभान; । म्हणौनि त्रैविध्य कारण । यया आरोपा. ॥ २०५० ॥ तीघाजी एक खोटें, । तें अन्यथाभानाचि तें नुटे; । ऐसें शुद्धीं काये घटे । मा घडे हें. ॥ ५१ ॥ दोरु दोरा आपणपयां । भुजंगु नव्हे कांहीं यकलिया । आनां सर्पु सर्पस्थानीं तया । दोरत्व नकळे. ॥ ५२ ॥ द्रष्टा दोहींचा जो नरु । तो नेणे सर्पु अथवा दोरु, । तें रज्जुस्थानीं विखारु । कैसा भासे ? ॥ ५३ ॥ दोहीं वेगळा द्रष्टा पुरुषु । नेणे दोरी भुजंगाभासु । म्हणौनि येथें वन्हशु । योगु पाहिजे. ॥५४॥ जाणता असावा नरु, । ज्ञानसहित दृश्यपरु, । तना सर्पाचा साक्षात्कारु । पूर्वीं पाहिजे; ॥ ५५ ॥ तदाकृतीचि दोरु असावा, । प्रकाशु निर्मळु नसावा, । दुचतेपणाचिया भावा । मग तो दिसे; ॥ ५६ ॥ तरि ब्रह्माचें कवणा दर्शन, । ब्रह्मापूर्वीं प्रपंचज्ञान, । मग ज्ञानाचें मंदपण । वर्तत असतां, ॥ ५७ ॥ प्रपचाचि सारिखें तें व्यक्त । मा प्रपंचु मानिजे तेथ । हें अप्रमाण मत । नाना प्रकारीं. ॥ ५८ ॥ ब्रह्मापूर्वीं प्रपचु कैचा ? आणि प्रपंचद्रष्टा अनु येथिचा । ययाही वेगळा तयाचा । सारिखे वाटु कांहीं; ॥ ५९ ॥ तरि ब्रह्म अव्यक्त अगोचर । व्यक्त प्रपंचभान गोचर । तयातें सारिखें हें उत्तर । घडेचिना. ॥ २०६० ॥ ब्रह्मातें कवणु जाणु । जेथें आत्मभाव अकिंचनु । होये, मग निर्गुणु । बोधु स्फुरे. ॥ ६१ ॥ सच्चिदानंदमय सर्वदा । अप्रकाशु नाहीं तेथ कदा. । म्हणौनियां आरोपवादा । वाळवें पाणी ॥ ६२ ॥ तरि आता प्रपचु तो विलक्षणु, । विचारें घेतां सगुणु, । तरि इतुलेही दोष सांडुनु । रूप करावें. ॥६३॥ ब्रह्मचि पालटोन जालें ऐसें । हें न घडे सर्वथा विवेकांशें । मागुतें होणें जैसें तैसें । आहे म्हणौनि. ॥ ६४ ॥ ब्रह्म शुद्ध, निर्विकार; । तेथें उठिती गुणादि

प्रपंचविकार; । तरि निमित्येवीण साचार । ऐसें न घडे. ॥६५॥ निर्निमित्य, निर्विकार, । संचलेंचि असतां निराकार, । अज्ञानें अन्यथा गोचर । भासलें तेथें; ॥ ६६ ॥ ऐसें बोलावें वचन । तरि शुद्ध नलगे अज्ञान. । रज्जुसर्पन्यायें विपरीत भान । नाथिलें आरोपिजे. ॥ ६७ ॥ हेंही वचन खंडलें । तरि आतां कैसें उरलें । विवर्तरूप भान भासलें । तये ब्रह्मप्रकाशीं. ॥ ६८ ॥ सूर्याचे जैसे किरण । अच्छिद्र, निरंतर, पूर्ण, । तयांमाजी जीवन । ऐसें आभासे. ॥ ६९ ॥ पालटूनि आपुलिये दशे । किरण काय जाले तैसे ? । अथवा सत्य तरंग सागरीं, तैसें । किरणीं मृगजळ. ॥ २०७० ॥ किरणाज्ञानें हें दिसे । तरि किरणज्ञानेंही काये नभसे ? । तें आतांही जैसें तैसें । किरणचि सर्वत्र. ॥ ७१ ॥ रज्जु सर्पापरी भासलें । ऐसें मृगजल कैं जालें । तें आभासोनि आपुलें । आपणाचि वाव. ॥ ७२ ॥ किरणाचिये स्थिती । पालटून संता प्रतीती । भेदेंविण भासे भ्रांती । परि प्रलया नये. ॥ ७३ ॥ ऐसें ब्रह्म पूर्ण, सनातन, । नित्य, संत, निर्गुण, । अद्वय, अखंड, स्थिर, पूर्ण, । जैसें तैसें. ॥७४॥ तेथें आभासे प्रपंचु तो विवर्तु । अव्यक्तीं व्यक्तु मूर्तिमंतु. । ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान, समस्तु । गुणांकु जो. ॥ ७५ ॥ भासे तंव संशयो नाहीं, । धरिजे तंव सत्यता नसे कांहीं; । प्रतीति वाटे परि तेही । तया अधिष्ठानाची. ॥ ७६ ॥ येणें भासावेंचि मात्र । परि नसावें सर्वत्र । शुद्ध आत्मतत्व निर्विकार । तें पालटावेंना ॥ ७७ ॥ ऐसा निश्चयो ययाचा जाला । तरि प्रश्नु येकु आथी उरला । येणें पुरुषु जाजावला । सांडूं कां पाहे. ॥ ७८ ॥ याचिये निवृत्तीकारणें । सद्गुरूचे पाये सेवणें, । अभ्यासु दुर्गमु सोपणें । आंगोआंगीं. ॥ ७९ ॥ कर्म, भक्ति आणि ज्ञान । याचिये निवृत्ती साधन; । वेदु तो हेंचि आचरण । मुक्तीचे स्थापी. ॥ २०८० ॥ तरि जें नाहीं कांहीं, । प्रतीती नये आणितांही, । तयाचिये निवृत्तीचें कायी । येसणें दुःख ? ॥ ८१ ॥ सर्वज्ञ ऐसें म्हणती । हा श्रमु आत्मया नाथी । गुणागुणकृत प्रतीति । येत असतां. ॥ ८२ ॥ तेथिचें ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान; । कर्ता,-कार्य, कारण; । साध्य, साधकु, साधन । येणें आकारें. ॥ ८३ ॥ जो जो भाव आभासे । तो गुणातेंचि गुणाचा असे. । येणें त्रासोल्लासु

दिसे । तो गुणातेंचि गुणीं. ॥ ८४ ॥ तरि योगु तोही गुणातें । परि न चडे आत्मया शुद्धातें, । ऐसें नाना सिद्धांतें । सिद्ध केलें. ॥ ८५ ॥ तरि योगु हा आत्मा नेणे; । इच्छावा गुणाचिकारणें । स्वस्थिति गुणींचि भोगणें । रमणें सुखीं. ॥ ८६ ॥ निर्विकल्पें समाधि, । प्रपंचु न स्फुरावा कधी । ऐसी विशुद्धा बुद्धि । नव्हे आत्मयाची. ॥ ८७ ॥ सविकल्प मनें । निर्विकल्प हों इच्छिणें, । समाधि प्रपंचु विसरणें । हे तयाची इच्छा; ॥ ८८ ॥ स्वरूप मातें कळावें, । योगाभ्यासें तेथ राहवें, । अद्वितीय राज्य करावें, । भोगावें सुख, ॥ ८९ ॥ ऐसें शुद्धा आत्मया सिद्धा । केवळ इच्छावें कदा । नलगे. तो सर्वदा । जैसा तैसाचि. ॥ २०९० ॥ अविवेपासाव उठी । तया अहंभावाची हे गोष्टी; प्रपंचें जयाची दृष्टि । पावली श्रमातें. ॥ ९१ ॥ आत्मसुख म्यां भोगावें, । आपुलाचि ठाईं असावें, । संसारापासाव सुटावें, । हे इच्छा-गुणा. ॥ ९२ ॥ स्वरूपीं नित्य रमण । विसरों करी मीपण । अपेक्षी योगु सान । ते मनचि येक. ॥ ९३ ॥ म्हणौनि जयांकारणें । स्वस्थितिसाम्राज्य इच्छिणें, । आपुलें सुख भोगवणें । जयां गुणां, ॥ ९४ ॥ विषयांपासाव सोडवावें, । स्वानंदीं मन क्रीडवावें, । आपुलें पद भोगवावें । तया करवीं, ॥ ९५ ॥ योगु सांगु अभ्यासवूनि, । मग तो सिद्धी पाववूनि, । सुख आपुलें जयांलागूनि, । वाटूनि द्यावें, ॥ ९६ ॥ कर्मयोगें सत्वशोधन, । सत्वशोधनें आत्मज्ञान । आत्मज्ञानें समाधान । सुखाचि प्राप्ति; ॥ ९७ ॥ भक्ती आराधूनि ईश्वरा । तदनुग्रहें गुरुद्वारा । आत्मबोधु खरा । अपेक्षावा; ॥ ९८ ॥ तो तंव नलगे आत्मयातें । आत्मबोधु गुणातें । अहंदुर्योधनादिकांतें । प्राप्त करावा. ॥ ९९ ॥ अभ्यासयोग सोसूनि, । स्वरूपीं निश्चलता साधूनि । आत्मसुख हें गुणीं । प्रकट करावें. ॥ २१०० ॥ प्रपंचु जयांतें अरिष्ट । तयांतेंचि इच्छावें इष्ट आत्मतत्व प्रकट । करूनियां. ॥ १ ॥ अप्रकटु आपणु जयां । आत्मबोधु इच्छावा तयां । मग तो जनीं दावावया । समर्थ करावी. ॥ २ ॥ मना करवीं भोगवावें । तें स्वरूप वोळवावें । आणिकांप्रति प्रकाशवावें । इंद्रियद्वारा. ॥ ३ ॥ नयनांचा भागु नयनां, । श्रवणांचा, देइंजे श्रवणां, । ज्ञानकरणां कर्मकरणां । यथायोग्यत्वें. ॥ ४ ॥ बुद्धी भागु बुद्धीचा, । मना देइंजे मनाचा, । अभिमाना अभिमानाचा । विभागु आहे. ॥ ५ ॥ सर्वज्ञत्व, सर्वसाक्षित्व, ।

सर्व भोक्तृत्व, कर्तृत्व, । अन्वयें सर्वरूपत्व । सर्वदा जें, ॥ ६ ॥ विविक्तात्मता गुणीं, । सच्चिदानंदमयता स्वस्थानीं, । हे आत्मपदवी राज्यस्थानीं । कल्पिली जे, ॥ ७ ॥ ते सर्वथा देइजे अभिमाना । तया कौरवा दुर्योधना । मग इतरु भागु इतरा गुणा । मुदादिकु. ॥ ८ ॥ कोण्हा हर्षु उल्हासु, । कव्हणा सुखसंतोषु । कव्हणा क्रीडाविशेषु । निजानंदीं ॥ ९ ॥ म्हणौनि जयाकारणें । आत्मराज्य आपण इच्छिणें । सुखे भोग सर्व वाटणें । आपुले जया, ॥ २११० ॥ तेचि गुणभात्र हे कौरव । संग्रामीं उभे सर्व, । आश्रयूनि वैरभाव. । कैसे पुडती ? ॥ ११ ॥ सांडूनि संगु प्राणाचा । आणि देहा अधिष्ठानाचा । स्वस्वविषया धनाचा । त्यागु करूनि. ॥ १२ ॥ शमदमयोगसंग्रामीं । जाणोनिया हे मरणभूमि । आले कालाचा आश्रमीं । वसों काये ? ॥ १३ ॥ त्रिपुटीचा आश्रयो सोडूनि, । निरावलंबीं करूनि मांडणी, । विवेकव्याघ्राचा वदनीं । उभे ठाले. ॥ १४ ॥ सांडूनि संकल्पनावन, । प्राण आगाचें चचळपण, । येकनिष्ठ मरणालागून । मानस आलें. ॥ १५ ॥ देहसंगु, प्राणसंगु, । सांडूनि ममत्व धनविभागु, । वाहेरि होता तो अंतरंगु । अभिमानु आला. ॥ १६ ॥ सांडूनि स्थूळ आणि जागरण । जो गुणे विषयस्फूर्ति धन । वर्जूनि बाह्य क्रीडण । विवेका आला. ॥ १७ ॥ सांडूनि अज्ञान, जडता, । निसरु, प्रमादु, घन सर्वथा । तमो गुणु हा उजेडता । समयीं आला. ॥ १८ ॥ जें जे जयाचे स्थान । ते तें राज्य तेणें सांडून । निरावलंबीं येऊन । मांडणी केली ॥ १९ ॥ जे जे जयाची प्रवृत्ति । तें ते धन भोगवृत्ति । तेंति सांडूनि स्थिति । निरावलंबा केली. ॥ २१२० ॥ जें जें कार्य जयालागून । तें ते भोग्यरूपधन, । असो ते सर्व सांडून । अंतरा आली. ॥ २१ ॥ आता ती करणें करणें । श्रीकृष्णा माझीं स्वजनें । तयाचीं रूपे अभिमानें । सांगन मी. ॥ २२ ॥

आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।
मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबन्धिनस्तथा ॥ ३४ ॥

**आचार्याः**

माझें अज्ञान बालदशेचें । तें हारिलें जेहीं साचें. । मृदु वचन मर्यादेचें । सिकविलें बोलों, ॥ २३ ॥ आगोळीं धरूनि चालविलें, । रुनुवदी वरूनि

बोलविलें, । पशूचें मनुष्य केलें । माझें देह; ॥ २४ ॥ अन्नचि कैसें खाणें, । तेंही परतु मी नेणें; । फळलें जयांचें शिकवणें । ते येक गुरु. ॥ २५ ॥ नामें रूपें पदार्थींचा । सज्ञा जाणविली तयांची, । ते ससारमार्गीं गुरुचि । कैसे न मानावे ? ॥ २६ ॥ वाचणें, पढणें, बोलणें, । आइकणें, घेणें, देणें, । हे जेंहीं आम्हांकारणें । शिकविलें असतां, ॥ २७ ॥ आजि ते वैरी जाले । सग्रामा उभे राहिले । तयांचें मातें आठवलें । तें कैसें विसरों ? ॥ २८ ॥ द्रोणाचार्यो विद्यागुरु । स्वधर्मी केला मी चतुरु. । आतां तयाचा उपकारु । काये ऐसा निस्तरणें ? ॥ २९ ॥ शिरकमळी पादपूजा । अजुणी तेसाचि भाव माझा । तेणें द्रोणाचार्येसी जुझा । कैसें प्रवर्तणें ? ॥ २१३० ॥

पितरः

येक ते माझे पितर, । येक ते बंधु साचार, । गोत्रज साने थोर । मजहूनि, कृष्णा. ॥ ३१ ॥ ययांची मुखें पाहता । कैसी उपजे कठीणता । हे गोत्रवत्सळ व्यथा । तोचि जाणे. ॥ ३२ ॥

पुत्राः

येक ते कुमर धाकुले, । मज देखतां उपजले, । कडीये खांदी घेतले । माया मोहे. ॥ ३३ ॥ येकपात्रीं भोजन । ग्रासा पसरिती वदन, । जैसी पक्षिणीचीं जाण । सानीं पिलीं. ॥ ३४ ॥ घालूनि पदरीं पिला । आळि करिती जे, गोपाळा, । आजिवरी पाळिला । ळळा जयांचा आम्हीं. ॥ ३५ ॥ तयांतें आम्हीं मारावें । तेंहीं कवणाप्रति सांगावें । मग पडे वुझावावें । आपणातेंचि. ॥ ३६ ॥ उपजलाहा तमोगुणु । हातु नलगे कठिणु, । जयांचेनि दुःखें प्राणु । जाऊं पाहे. ॥ ३७ ॥ तयां कव्हणी बाधा करी, । तो पिताही मानें वैरी; । वाणु लागे शरीरीं । तेणें दुःखें. ॥ ३८ ॥ कानीं पडतां रुदन । नव्हे स्थिर आपुलें मन, । जाजावती पचप्राण । ध्यान भगे. ॥ ३९ ॥ नाम घेऊनि आळविती । तेचि विश्राति होये चित्तीं, । धांवोनि गळ्या झोंबती । तें कैसीं मारावीं ? ॥ २१४० ॥ दुखवलीं घालिती सादु, । तैं तयां आर्तांचा शब्दु । आइकोनि उपजे खेदु, । घालिजे उडी. ॥ ४१ ॥ आतांचि पासीं आळीं । गळ्या झोंबों लागलीं । तरि कैसीं न म्हणों आपुलीं । सांवरूं मोहो ? ॥ ४२ ॥ पशूतें काये पान्हा; । अवधारीं गा नारायणा, । वांजां

न कळे वेदना । पुत्रवताची. ॥ ४३ ॥ पाटसें साडूनि न पळे । मृगें गुपोनि जाती जीनें, । माया तैसीचि देवें । लाविलीहे. ॥ ४४ ॥ पक्षिणी आडीं घातलीं, । आच्छादूनि तया वेसली, । जरि मार्जरें कव घातली । परि साडूनि नवचे. ॥ ४५ ॥ मा आह्मी तरि माणुसें । आप पर नेणो केसें ? । यया ममत्वाचे फासे । वहुसाल आम्हा. ॥ ४६ ॥ आठवे क्रीडा ययाची, । वाळभाषा वाळकाची, । अज्ञुणी मातें वाकुटीचि । ऐसीं वाटती. ॥ ४७ ॥ आपुला मोहो पुत्रावरी । तेसाचि पितराचा आपणावरि । येणें अनुभवे श्रीहरी । जाणावा तो. ॥ ४८ ॥ पुत्र होताचि, यादवा, । क्ता मतोपु जीवा । आता अविघ्न वाढावा । हेचि वासना ॥४९॥ कैं शिवल हा चालें, । कैं पा शिकेल वोलें, । कैं शिकेल खेळों । लेंकुरामाजी ? ॥ २१५० ॥ कैं हा आळि करील, । भाणाचें अन्न कैं नासील, । धुळी भरला कैं येईल । खेळोनि हा ? ॥ ५१ ॥ ऐसीचि घोकणी करिता । पावे ते ते अवस्था, । ते ते सुख, अनता, । किती वडिलाचें ? ॥ ५२ ॥ आता हो पा हा जाणता, । आम्हा समप्राते पोषिता, । आपुला कुमार म्हणता । ऐसे चितिती. ॥ ५३ ॥ अज्ञानावरि ममत्वचि । परि आशा वहुसाल प्रबुद्धाची । ते आम्ही ययाची । ऐसी पुरवावी ? ॥ ५४ ॥ हा काळुवरि आशावतें । मी जाणें, देवा, ययातें । मी भेटी जातुसें ययातें । शस्त्र घेऊनि ॥ ५५ ॥ आला म्हणोनि वाट पाहती, । मातें देखोनि उल्हासती, । आता म्या तया, श्रीपति, । कैसें मारावे ? ॥ ५६ ॥ येकें वाडें, येकें धाकुलीं, । स्वजनें समामा आलीं । दूरि होतों तीं वोळखिलीं । पासीं येऊनि. ॥ ५७ ॥ कवणावरि घाव घालू ? । साग पा मातें येथु गोळ, । गोविंदा, तू निर्मळु । ह्मणोनि पुसें ॥ ५८ ॥

तथैव च पितामहाः

जसेचि गुरु द्रोणादिक, । तेसेचि आजे भीष्मादिक, । युद्ध करावया सन्मुख । माडले जे. ॥ ५९ ॥ जया देखता उपजलों, । जया देखता वाढलों, । जया देखता जालों । धर्म जाणते. ॥ २१६० ॥ नमस्कारूनि जयात । आरंभु केला धनुर्विद्येतें, । आशीर्वाद हे आमुतें । फळले जयाचे, ॥ ६१ ॥ तयाप्रति आम्हीं जाता । श्रीचरणीचि ठेवावा माथा, । कीं वाण हा, गोपीनाथा,।

प्रेरावा तयांवरि? ॥ ६२ ॥ तयांचा दंडु साहणें, । किं आम्ही तयां दंडु करणें, । वासुदेवेंचि निरोपणें । धर्मु आम्हां. ॥ ६३ ॥ स्वर्गी पूर्वज पाहती। आमुतें ते काये म्हणती? । देवऋषिगण नेदिती । आमुतें स्थान. ॥ ६४ ॥ तयांचें देखणें कृपेचें, । आमुचें तें वैरबुद्धीचें, । आतां पवित्रपण दोघांचें । विचारिजो देवें. ॥ ६५ ॥

**मातुला:**

शैल्यादिक मातुळ । हे पितरां समान केवळ । तयांसीं करणें वळ । तें भक्ति काइसी? ॥ ६६ ॥ माता काये म्हणैल? । तीतें कैसें वाटैल? । कष्ट जननीचे विफळ । वाटती जननीतें. ॥ ६७ ॥ घरा आलिया मातु, । भेटि जालिया सन्मातु, । प्रीतियोगु असाधारणु । अझुणीवरि तो. ॥ ६८ ॥ ऐसें असोनि येणें क्षणें । उगेंचि शस्त्र घेऊनि पुढें होणें, । तें भिडेतें लोटणें । कासेन पां? ॥ ६९ ॥

**श्वशुरा:**

माझे तैसेचि श्वशुर । पितरस्थानींचि समग्र । आणि जयांकरितां संसार । शोभताति. ॥ २१७० ॥ येहीं आमुचें काये केलें, । आम्हीं यांचें काये नाशिलें, । ययां आम्हां वैर लागलें, । कासयाचें? ॥ ७१ ॥ यशाची सांगावी गुढी, । पितर मारिले हे प्रौढी, । आणि श्वशुरांचां धडीं । बाण रोविले. ॥ ७२ ॥ खोंचले पडती रणीं । तें तें, श्रीकृष्णा, चक्रपाणी, । आमुतें देखोनि मनीं । कैसें वाटैल? ॥ ७३ ॥ हातीं शस्त्र, डोळां पाणी, । काये चालैल तेथ करणी? । अर्थस्वार्थु तो मनीं । उमटेचिना. ॥ ७४ ॥ मेल्या घरवरि जाणें, । तेथ रडतियां काये संबोखणें, । मसीचीं घटलीं वदनें । ऐसीं होतील. ॥ ७५ ॥ मातेचें मुख पाहवें, । कीं पंडूचें मन धरावें, । स्त्रियांतें बुझवावें । कवणें बोलें? ॥ ७६ ॥ सांभाळावया, श्रीधरा, । सोइरे येती आम्हां घरा. । तें तयां देखोनि समग्रां । काये बोलावें? ॥ ७७ ॥ कवण कैसे मारिले, । काय पुरुषार्थ सांगावे आपुले, । आणि तेचि शंकू लागले । तैं काये कीजे? ॥ ७८ ॥ मग तयांतेंही मारणें, । मारिजे तंव ऐसेंचि करणें, । पुढें मोइरिकेकारणें । कवण येती? ॥ ७९ ॥

**पौत्रा:**

बंधु पुत्रांचे, माधवा, । पुत्र ते पौत्र आम्हां पांडवां. । आतां तयांचियां जीवां।

वाईट होती. ॥ २१८० ॥ वाकुळाळिया घरीं स्त्रिया । प्राणाचि देती तिया । आह्मीं बुझानिजे तया, । तरी तोंड नाथीं. ॥८१॥ मरता करुणातें वोनाती । आसुची मुखें अवलोकिती । तरि आपुलेंचि मास दातीं । आम्हीं धरिलें. ॥ ८२ ॥ भेऊ नका, रे, म्हणावया । करणु आहे, कृष्णा, तया? । सर्वी व्याघ्रा आह्मा तया । बाळेंचि आहारु. ॥ ८३ ॥

श्यालाः

शाल्का हे भली रळी । जीवानरि आह्मीं आरंभिली, । सोइरीक फळा आली । रोकडीचि. ॥८४॥ माजलया न कळे माउसी । तोचि न्याय जाला आम्हासि. । सिद्ध असतिया मनुष्यपणासि । आम्हीं साडिलें. ॥ ८५ ॥ बहिणी साभाळावया जाणें । तें प्रीतियोगें करणें । काळें येऊनि परतणें । आपुलें वदन. ॥ ८६ ॥ परतोनि घरा येता । स्त्रियाचे दुःख देखता । काये म्हणावे, अनंता, । मुखचि नाहीं. ॥ ८७॥ बाहेरीचि वसता भलें । ऐसें मानसीं विचारिलें, । तरि आम्ही साभाळू आलें । सोइरे तत्सवथी. ॥ ८८ ॥ तयासीं बोलता मातु । मुखाचिवरि असावा हातु; । निर्नासिकाचा वृत्तातु । आम्हा घडला. ॥ ८९ ॥

संबंधिनस्तथा

तैसेचि पैल ते येक । विवाहीं जावाई लोक; । शरीरसवधी अनेक । अनेका परीचे. ॥ २१९० ॥ जयाचे उपकार आम्हासि । आगावरि जाळिया राशी, । हे प्रत्युपकार तयापासि । आम्हीं योजिले. ॥ ९१ ॥ एकमेकाचा घरीं । लेकुरें घातलीं असतीं उदरीं । आता तया बाळका गळया सुरी । घातली कीं. ॥ ९२ ॥ कन्या पुसों येती क्षेम. । तया काय सागावें कर्म!। पापी बोवाई अधम । दुराचारी. ॥ ९३ ॥ सुना आलिया द्वारा । शब्दु न निघे मुखा बाहेरा, । आता निज मस्तकावरि चिरा । घालावा काये? ॥ ९४ ॥ भगिनी पुसती काये जाले । तयाचीं सानी सानीं मुलें, । तयाप्रति आता बोलें । काये सागावें? ॥ ९५ ॥ ऐसी जीवलगें अपारें । उरलेनि आमुचेनि शरीरें, । जीणें ना मरणें पुरे । ऐसें करितील. ॥ ९६ ॥ ऐसें अर्जुनु बोलिला । तो परमार्थे अर्थु केसा आला । तो पाहिजेल सागितला । साहित्यप्रकारें. ॥ ९७ ॥ अर्जुनु ह्मणे, गोपीनाथा, । आपुलेन गुणमार्गें वर्तता । सहित

स्वजनां समस्तां । यये संसारी. ॥ ९८ ॥ तेथें रजोगुण अविद्येचा । द्रोण गुरु जो आमुचा । पुढती तयाचि मानाचा । आर्णाकुहीं जनु ॥ ९९ ॥ धर्मीं प्रवृत्ति जयाचेनि । जागते जाले करणीं । मानु महत्व जनीं । भोगिलें मग. ॥ २२०० ॥ तया रजो गुणातें मारावें । ते धर्म लोपती अवघे; । कार्याकार्य नेणवे । ऐसें होईल. ॥ १ ॥ रजोगुणु हा शरीरीं । असोनि आम्हां काये वेरी? । जेणेविण संसारीं । न कळे चातुर्यता. ॥ २ ॥ अन्यथाबोध हे पितर । रणा आले समग्र । जयांकरितां आचार । नामरूप भेद. ॥ ३ ॥ पदार्थभेदाचें ज्ञान । फेडूनी शब्दशेचें अज्ञान । प्रत्यक्ष आम्हांलागून । संपादिलें यहीं. ॥ ४ ॥ जेहीं दाविला संसारु । नामरूपबोधु केला स्थिरु । जयांचेनि आंगें द्रोणु गुरु । रजोगुणु देखिला. ॥ ५ ॥ अन्यथबोधें उपजले । अभिमानबधु आपुले । दुर्योधनादिक आले । रणामि जे. ॥ ६ ॥ कार्याकार्यी प्रवर्तावें । तें जयांसंगें जावें यावें । येकें देहें प्राणें जीवें । वर्तावें संसारीं; ॥ ७ ॥ तयांचा नाशु गरुडध्वजा, । तो भुजाछेदु सत्य माझा । कार्याकार्य मग बोजा । निपजे कैसें? ॥ ८ ॥ अभिमानापासाव अपार । वेग उठिती ते कुमर. । आम्हींचि तयातें थोर । केले असतां, ॥ ९ ॥ वाईट कैसें चितावें, । चिंतिलिया उणेंचि पडावें; । मग कवणालागी सोपावें हिताचें साधन. ॥ २२१० ॥ आत्मबोधु तमोगुणु, । आजा भीष्मु कैसा कवणु । तरि अन्यथाबोधु जयापासूनु । पुत्रस्थानीं जाला ॥ ११ ॥ येणें येकलेनवीण । आम्ही मग कवणाचे कवण? । कौरव, पांडव ह्मणौन । नामचि नसतें. ॥ १२ ॥ अनात्मरतीचे सहोदर । अर्थ, स्वार्थ, माये समग्र । जयांकरितां थोर । जालों आम्ही. ॥ १३ ॥ आशीर्वादें जयांचेन । आमुतें राज्य, सुख, धन; । जालों पदार्थ संपूर्ण, । वासुदेवा. ॥ १४ ॥ जिहीं कुंतीचा आजु, । आत्मस्वार्थु बळिया वडु, । तो कौरवांचा जाला, आठऊ । सांडूनियां. ॥ १५ ॥ मग देहात्मस्वार्थु ह्मणवी । यातीचा मोहो जीवीं । तयातें वोखटीं चितावी । कैसेनि गति? ॥ १६ ॥ अभिमानप्रकृतीचे जनक । आपुले जे जे अविवेक, । ते ते सामुरे सकळैक । आम्हां कौरवां. ॥ १७ ॥ अभिमानवेगां आंगें । करणवेग उठिती प्रसंगें, । ते पौत्रस्थानीं अवघे । कौरवपौत्र. ॥

॥ १८ ॥ अभिमानप्रकृतिसहोदर, । मोह शालक अपार, । अविवेकाचें उदर । फोडूनि निघाले. ॥ १९ ॥ अविद्यागुणसगर्भी । न होती आमुचे ददी । प्रकृति प्रकृतिविरोधी । दुसरी नसे. ॥ २२२० ॥ अविद्या विंच नव्हे दुसरी, । करण कुंती कवणि गांधारी, । धृतराष्ट्र काये दूरी । असे पंडूतें ? ॥ २१ ॥ पाहता कौरवा आम्हा । येकु जीऊ, येकु आत्मा, । येकु देही, पुरुषोत्तमा । अनुभवें बोलें. ॥ २२ ॥ आह्मा वेगळे ते कायी । त्यांवाण आम्हा ससार, नाहीं । दिशा उद्वसा दहाही । ऐसें होय. ॥ २३ ॥ मग तें करणाचें वन, भुवन, । देहसुख, अन्न, पान, । व्यवहारीं थोरपण । स्वजनाकरिता. ॥ २४ ॥

एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोपि मधुसूदन ।
अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥

## हे मधुसूदन

अर्जुन ह्मणे, जी श्रीकृष्णा, । अवधारी मधुमर्दना । विचारें अणिता मना । पारिकें करण ? ॥ २५ ॥ आपुली रसना, आपुले दशन, । आपुले कर, आपुले चरण, । येक स्वरूप जाण । आमुचें ययाचें. ॥ २६ ॥

## घ्नतोपि

आता जऱ्ही ऐसें जालें । हे मातें मारू आले, । वेर दृष्टी पाहिले । नोळखतीची, ॥ २७ ॥

## एतान्न हन्तुमिच्छामि

तऱ्ही ययाते मारणें । ऐसियें इच्छेतें जें करणें । तें मी नावल्गी मनें । कदाकाळीं. ॥ २८ ॥ जें मी निसरेन आपणपया । तरीचि मारिता होईन यया, । का नेत्र असोनि तया । जें रूप न कळे. ॥ २९ ॥ साडीन अभिमानु कुळाचा । शरीरा आणि यातीचा । तरिचि वधु ययाचा । माझेनि हातें. ॥ २२३० ॥ तू मातें ना मी तूतें । ऐसें जैं होईल निरुतें । तैंचि अहदुर्योधनातें । वधीन मी. ॥ ३१ ॥ अकाळीं प्रळयो माडेल, । शशिसूर्य तमीं हारपतील, । ब्रह्माट विल्या जाईल । तैं वडैल हे. ॥ ३२ ॥ वेद, शास्त्रें, पुराणें । ई जैं मातें अप्रमाणें । तैंचि अकार्य हें येसणें । आगे घडेल. ॥ ३३ ॥ सकळा भूताचें भान । पृथ्वी, आप, तेज, वायो, गगन, । ययाचें मातें ज्ञान । विपरित जैं, ॥ ३४ ॥ ऐसें अनुचित्त जैं घडे ।

स्वहिताची चाड पुढें। मातें नाहीं कीं निवाडें। ऐसें जालें. ॥ ३५ ॥ तैं मी जालों धर्महीनु। विसरलों आपुला गुणु। यया जीवांचा कवणु। अर्थु पुढां ? ॥ ३६ ॥ मुखचि न दावावें जनां। पुढती भक्तु ह्मणवावें ना। न मिळावें माझी करुणा। ऐसें होईल. ॥३७॥ एवं मारिलाही परी। मी ययांतें नमरीं. । आतां स्वार्थबुद्धि शरीरीं। कांहीं म्हणसी. ॥ ३८ ॥

## त्रैलोक्यराज्यस्यापि हेतोः

लोकत्रयीचें राज्य पावणें। ऐसियाही अर्थाकारणें। झोंबोनियां ते मारणें। ऐसें न घडे. ॥ ३९ ॥

## किन्तु महीकृते

त्रैलोक्यराज्य पावणें। एसणग्राहीं स्वार्थाकारणें। ययांतें नाहीं मारणें। ऐसें असतां. ॥ २२४० ॥ पृथ्वीचें राज्य तें किती। सार्वभौम, गा श्रीपती, । तें [illegible] नारक अंतीं। ऐसें नव्हे. ॥ ४१ ॥ आतां तेचि विवंचना। सांगेन हृदय[illegible] ल्पना। राज्यें येणें, श्रीकृष्णा, । होईल दुःख. ॥ ४२ ॥ छेदूनि स्वजन[illegible] तेयेरीं। पुत्रत्रयीचें राज्य जन्हीं। म्यां केलें, श्रीहरी, । येकलेन, ॥ ४३ ॥ तन्ही तयाचें मज कारण। सांग पां, श्रीकृष्णा, कवण ?। जेणें भोगावें तें जन। रणीं हारपलें. ॥ ४४ ॥ मी कवणाचा मग काई। माझें तें कोठें कन्हणीं नाहीं, । मागें पुढे देहीं। येकलाचि मी. ॥ ४५ ॥ येका शरीररक्षणातें। भिक्षेनें काय अपुरतें ?। मा त्रैलोक्यराज्यस्वार्थें। भ्रांत होआवें ? ॥ ४६ ॥ मरावें तें न चुके मरण, । भोगावें तें खरें प्राचीन, । वाढवावें दुष्ट क्रियमाण। वाउगेंचि. ॥ ४७ ॥ दैवाधीनता चुकली, । कीं आधिव्याधि निमाली, । येणें राज्यें सिद्धि जाली। ते पैं कवण ? ॥४८॥ राज्यें चुकलें पतन, । कीं राज्य हें ज्ञानघन, । मोक्षस्वरूप निधान। आंतराणींचें हें, ॥४९॥ येणें देहबुद्धि चुकली, । ज्ञानकळा उदेजली, । याता-याति चुकली। ससारयात्रा. ॥२२५०॥ ईश्वरु म्हणतील मातें, । मोक्षु देईन मी भूतातें, । उत्पत्तिस्थितिप्रळयांतें। करीन सामर्थ्यें॥५१॥ होईन काये जहरु ?। मागुता नरु तो नरु. । आपुलाचि घालीन भारु। दुसरेयावरि. ॥ ५२ ॥ देवा, कैसा रक्षिसील, । देवा, काये देसील, । देवा, अरिष्ट निरसिसील। कवणे परी ? ॥५३॥ देवा, देवा, म्हणतां। न चुके माझी पराधीनता; । येणें

राज्यें मी आतां । करूं काये ? ॥५४॥ प्राचीन तेंचि भोगणें, । तें राज्यें हित काये येणें । कांहीं आत्महित करणें । तें येक वांचूनि. ॥५५॥ आणिक येक, अनंता, । पुरत्रयीचें राज्य करितां, । गेला द्रोणु तो मागुता । देखेन कैं ? ॥ ५६ ॥ पडिला जो भीष्मु रणीं, । न संपडे तो मागुतेनि । तैं मी ऐसा ह्मणौनि । कवणु पाहिल ? ॥ ५७ ॥ दुर्योधना साढु देईं । तंव तो कवणे ठाईं ? । पडलेया वंधूंची नाहीं । भेटी पुनः! ॥ ५८ ॥ अवघेन राज्यें जोडती । पुत्र पौत्र तेंचि येती । नाना भव्यति येकि प्राप्ति । सांग तेणें? ॥ ५९ ॥ अवघे स्वजन मारावे । मग तें कोणाकारणें करावें । पुरत्रयीचें अधर्वे । भौपत्य जें कां ? ॥ २२६० ॥ समूळ कर्ण छेदूनि । कुंडलें घालावीं कवणें स्थानीं ? । जाटिलें मोलाचीं पाहोनि । काये काज ? ॥ ६१ ॥ अंगुलिका । छेदूनि सकळा । मुद्रिका घेतलिया, गोपाळा, । आतां ते माळ गळां । करूनि घालावी ? ॥ ६२ ॥ नाशिकेवीण मुक्ताफळ । कामिणी घालिती केवळ, । तैसें माझें राज्य विकळ । स्वजनेवीण. ॥ ६३ ॥ घोडिकें डोकें, सिरीं खोपा । तैसें मज झालें, बापा! । शिरेवीण पाहें पां । भारणचि नये ॥ ६४ ॥ दृष्टीवीण सुलोचन, । प्राणहीनाचें भूषण, । तैसें कौरवहीन जाण । माझें राज्य. ॥ ६५ ॥ थोटीं घातलिया वेळा, । मरोनि भोगणें सोहोळा, । असो तें राज्यचि, गोपाळा, । काये करावें ? ॥ ६६ ॥ राख लावूनि जाणें । मार्गे परतोनि न पाहणें, । ऐसें उचित वरि करणें । कौरवांपाठीं. ॥ ६७ ॥ ऐसें अर्जुनु बोलिला, । तो अर्थु परमार्थे घेतला, । कैसा ? तो भाव कथिला । पाहिजे कीं. ॥ ६८ ॥ अर्जुनु बोले, मधुसूदना; । राया, सद्गुरु, सर्वज्ञा, । नमरीं मी यया स्वजनां । स्वभावांतें. ॥ ६९ ॥ इहीं जन्हीं मातें आच्छादिलें । सत्यात्मत्वें मारिलें, । आत्मप्रभावा दाविलें । सर्वत्र जन्हीं, तन्हीं. ॥ २२७० ॥ हे माझे माझिये प्रकृतीचें । गुणस्वभाव आंगींचे, । सर्वथा मारणें ययांचें । न इच्छीं मी. ॥ ७१ ॥ आपुले स्वभाव मारावे, । मारें आपणचि मरावें, । मरोनि जीवें जियावें । तें काये जीणें ? ॥ ७२ ॥ सार्द्रता सांडूनि पाणी । तें काये उरे स्वस्थानीं ? । चंचळता पडे रणीं । तें वायोचि कैंचा ! ॥ ७३ ॥ सछिद्रभाव आपुला ।

तो जैं गगनें ग्रासिला, । तें सद्भाव उरला । तयाचा काये. ॥ ७४ ॥ तैसी जे माझी स्वस्थिति । तेचि मातें आत्मप्रकृति । तीचे गुण ते तीप्रति । आपुले भाव. ॥ ७५ ॥ ते पाववितां नाशातें । अभाव होये प्रकृतीतें; । प्रकृति अभावली तेथें । कैसें होय ? ॥ ७६ ॥ मीपणेंसी मीचि नाहीं । सत्व, रज, तम, तेथ कायी ? । स्वपरवृत्तिविलयीं । काय पाहणें ? ॥७७॥ यालागीं माराक्याकारणें, ,। इच्छा न कीजे माझेनि मनें. । ययाहीवरि येक जाणें, । गोपीनाथा. ॥ ७८ ॥ मारिलेही म्यां हे स्वभाव, । अहदुर्योधनादिक कौरव, । रजतमआदि सर्व । जे आचार्य, गुरु, ॥७९॥ आतां मारूनि ययांतें । आम्हीं आपुलेनि हातें । सकळे ये पुरत्रयीचें तें । राज्यही केलें, ॥ २२८० ॥ आत्मसत्तया सर्व भान, । आत्माचि सर्वांचें अधिष्ठान, । आत्म-इतर अकिंचन ॥ नामरूप हें. ॥८१॥ अद्वितीय ब्रह्म निर्मळ, ॥ तेथ सर्व माया हें मृगजळ, । ऐसें स्वरूपस्थिति केवळ । शोभन जे, ॥ ८२ ॥ तें राज्य म्यां केलें, । मा तेणेंकरूनि काये जालें ? । आपुलांही मनीं, गोपाळें । विचारावें. ॥ ८३ ॥ ऐसें हें माझें वचन । मानाल तुम्ही अप्रमाण, । तरि ययें अर्थी बोलेन । चित्त देइंजे. ॥ ८४ ॥ दावूं मिरवूं मी हें जनीं । ऐसा मी येकु म्हणौनि । तरि तो दंभुचि नयनीं । दिसे सर्वा. ॥ ८५ ॥ दंभु दिसे, परि हें न दिसे । दावूं म्हणतां, राज्य ऐसें. । आतां नदवूनि माणुसें । जाणतीं करूं, ॥ ८६ ॥ तरि जयाची प्रगुप्त कळा । जनांतें न दिसे डोळां, । लोक देखती स्थूळा । शरीरातें. ॥ ८७ ॥ मित्राप्रति मित्रुचि कळे, । शत्रूतें शत्रु तत्काळें, । परंतु माझें राज्य कव्हणे काळें । नये उजैडा ! ॥ ८८ ॥ दिसे स्त्रीतें भर्त्तारु । पुत्रां पिता, पितया पुत्रु, । एवं मद्विपर्यांचा अंधकारु । चराचरातें. ॥ ८९ ॥ दावितां इतरां न दिसे, । आतां असो हें ऐसें. । आणिक येक घडेसें ॥ काये विचारूं? ॥ २२९० ॥ मत्सत्तया विश्व असे, । माझेनि चैतन्यें प्रकाशे, । माझेनि सुखें उल्लासे । जेथिचें तेथें. ॥ ९१ ॥ आतां येणें राज्येंकरून । आपुला वैरी मी मारीन; । सत्ता चैतन्य हरीन । सकळ सुख. ॥ ९२ ॥ तरि मातें माझिया दृष्टी ॥ वैरी न दिसे जगजेठी, । तें तिये दृष्टीचेचि पोटीं । लपोनि जाये. ॥ ९३ ॥ भानचि न कळे दुसरें, । कवण मारी, कवण मरे, ।

ऐसेनि मी वैराकारें । लागलोंचि जें. ॥ ९४ ॥ तें वैरी मारूं अपेक्षितां, । मीचि मातें वैरी दिसें तत्वता. । आतां आपणा मारूं, कीं मारकता । तेचि मारूं? ॥ ९५ ॥ येर देहभावें वैरी । असतचि असतां संसारीं । येणें राज्यें ते श्रीहरि । मारिलें नवचति. ॥ ९६ ॥ असो वैरी आतां मारणें, ॥ मित्रातें कांहीं देणें, । आपणा राज्य येसणें । पुरत्रयीचें. ॥९७॥ तरि मित्रु, आणि तया देईजे, । हें नामरूपमान जें जें, । तेंचि उफराटें विसरिजे । तेणें राज्यें. ॥ ९८ ॥ नसधें उरलें देणें घेणें । आतां तें काये करणें? । सांटावें परंतु येणें । मनोरथु न पुरे. ॥ ९९ ॥ न संडिजे जैं तो मनोधर्मु । तें राज्यभंगु होये हा नियमु; । अद्वैतु, निर्विकारु, आत्मारामु । म्हणौनियां. ॥ २३०० ॥ मारितां हरितां वैरियातें, । रक्षितां, देतां मित्रांतें, । नये येणें अमितें । महाराज्यें. ॥१॥ असो हें दुजयाजोगें नव्हे, । आपुलें आपणाचि भोगावें; । तरी अनुभवा आणितां देहभावें । न फळे देहीं. ॥ २ ॥ आयुष्य करूं अपार । तरि देहेंसींच यया वैर. । पहिलेचि आधीं शून्याकार । शरीर करी. ॥ ३ ॥ आतां दुःखाचिया काकुळती । तयांची पाहे निवृत्ति । नाना सुखें प्रतीती । आणूं म्हणे ॥ ४ ॥ तें राज्यें तेणें अपारें । अणुमात्रही दुःख न हरे; । सुख अंशांशेंही न स्फुरे । कन्हणा विषयाचें. ॥ ५ ॥ येणें हे क्षुधा हरैल, । तृषा नावेक राहील, । आली निद्रा वारेल । ऐसें न घडे. ॥ ६ ॥ शमैल तापु खोंकला, । हरैल वातु अवलिळा, । पित्त नाशील, गोपाळा, । ऐसें न घडे. ॥ ७ ॥ मोडला तिडके कंटकु । न मिळे तया तेणें भिलुकु, । प्रपंचु स्वाधीनु सकळैकु । तो कैसा मी नेणें. ॥ ८ ॥ न हरे दुःख अंशांशें । न स्फुरे विषयसुख । राज्यमिसें; कन्हणी हें वचन अनारिसें । म्हणैल जरि, ॥ ९ ॥ तरि सुखदुःख शरीरभान । ययाचें केवळ असंतपण; । तेचि स्वराज्य म्हणौन । कैसें असे? ॥ २३१० ॥ कांहीं येक दुःख हरी, । तें असंता संत करी; । तेणें संतें वैरी । आपुलें होये. ॥ ११ ॥ विषयसुख करी उत्पन्न । तैं आणी विषयां संतपण । विषय संत, तेथ आपण । उडोनि जाये. ॥ १२ ॥ कांहीं चिन्ह शरीरीं । राज्य हें जैं प्रकट करी । तै शरीरेंसीं सरोबरी । जाली यया. ॥ १३ ॥ आपणास या अद्वयातें । शरीर संत दुजें वर्ते । ऐसें जालें तेणें मतें ।

जाण तयासी. ॥ १४ ॥ मग देहाचां संतपणीं । अभाव होये पदस्थांनीं; । राज्यभंशु निर्वाणीं । तोचि जाणावा. ॥ १५ ॥ म्हणौनि देहीं कांहीं उमटे । प्रयोजनाप्रयोजनु येणें घटे, । तें राज्य म्हणणें तेंचि खोटें । ऐसें असतां, ॥ १६ ॥ शरीरें काये भोगावें? । प्राचीनाचि प्रतीती ये अवघें. । मा येरां काय न संभवे । प्राचीन भोगमूळ ? ॥ १७ ॥ डोळां पाहवे तें अदृश्य, । आइकों तें वाचे अप्रकाश्य; । चाखो तें तें अरस्य । तेथिचें सर्व. ॥ १८ ॥ गंधही न येणें मतें, । नये प्रतीति घ्राणातें, । स्पर्शावें तें तें व्योमातें । लागों नेदी. ॥ १९ ॥ मनेंचि मानावे समस्त । तें तें संकल्पा अतीत । बुद्धि मालवे मग तेथ । उदयो जयाचा. ॥ २३२० ॥ मनें कल्पे ना बुद्धी कळे, । मनबुद्धींद्रियां वेगळें, । समस्तां गुणां नातळे । प्रकृतीचिया. ॥ २१ ॥ आत्मत्वेंचि आतां भोगणें । ऐसें मानूं निजमनें, । तरि मीतूंपणे नुरणें । राज्यी जये. ॥ २२ ॥ मी आपणुचि जेथ नाहीं, । तेथ राज्य तें कवणाचें कायी? । आतां स्वार्थबुद्धि वाई । तेचि सांडिली. ॥ २३ ॥ माझी सत्ता, माझें ज्ञान, । सर्वत्र माझें सुख पूर्ण, । त्रैलोक्य माझें अधीन । हे काये कल्पना? ॥ २४ ॥ मीचि नाही, तेथ माझें । कवणा मानें हें सहजें? । आंगेवीण वोझें । कवणें उचलावें? ॥ २५॥ ग्रामेवीण सीमा जैसी । पाणियेवीण उकळी कैसी? । मीचि नाहीं, तेथ परियसीं । राज्य कवणाचें? ॥ २६ ॥ तेणें सुख तें कवणाचें । पूर्णत्व काये होये या जीवाचें, । ज्ञानमयत्व नव्हे आंगाचें। तैं तेणें काये? ॥ २७ ॥ आपणा न भोगे कांहीं । तरि असो आतां ऐसेंही । कव्हणे अंगें कव्हणा कांहीं । उपेगाचें. ॥ २८ ॥ असंत ते संत न करी, । संता संत हें काय करी? । संताचे असंत करी । तऱ्ही होये. ॥ २९ ॥ नित्य तें नित्य नित्याकारें । अनित्य, अनित्य प्राकारें । येणें राज्यें तिसरें । काय केलें? ॥ २३३० ॥ अनित्या असंता नाहीं करणें । मा न करितां काये असिजे तेणें? । वंध्यापुत्र मारणें । लागेचिना. ॥ ३१ ॥ नित्या संताची नित्यस्थिति । ते येणें काये करावी, श्रीपती? । अनित्यता आणि तयाप्रति । तरि वरि होये. ॥ ३२ ॥ सहज जें जैसें आहे । तें जैं अनारिसें नोहे, । तैं स्वराज्यें येणें काये, । वासुदेवा? ॥ ३३ ॥ सर्वत्र संत गुणातीत । सर्वत्र सर्वदा तें मुक्त, । गुण मिथ्या समस्त । भासतांही. ॥ ३४ ॥

तेथ येणें काय करावें ? । मुक्त तें जैं बद्ध नव्हे, । ब्रह्मा मोक्षु न संभवे। कदाकाळीं. ॥ ३५ ॥ जालेनही राज्यें जेणें । जैसें तैसेंचि असणें, । जयापरी पारणें । मानसिक. ॥ ३६ ॥ जेथिचीं करणें तेथें, । विषय तैसींचि महाभूतें, । उणें पुरें प्रपंचातें । होयेचिना. ॥ ३७ ॥ जैसी तैसीचि त्रिपुटी, । त्रिधा कर्मी नाहीं तुटी, । ब्रह्मरूप अवघी सृष्टि । जाणीतली असतां. ॥ ३८ ॥ गुणातें सहज वेगळेपण । तेथ कासयातें साधन? । आत्मयाचें असंगपण । सहज सर्वत्र. ॥ ३९ ॥ तरि पशुस्थानीं बद्धु कवणु । मुक्तु मुक्तस्थानीं सनातनु; । अखंडु सद्भाव समानु । सारिखा वस्तूचा. ॥ २३४० ॥ बद्ध मुक्त सारिखेचि, । बद्धचि अथवा मुक्तचि; । आतां प्राप्ति ऐसिया राज्याचीं । असोनि काये? ॥ ४१ ॥ कासया योगु हा संग्रामु? । कासया जयो उपरमु? । कासया हा करणग्रामु । वोसु पाडावा? ॥ ४२ ॥ स्वक्षात्राज्यें येणें काये? । कल्पनामात्रचि सर्व आहे. । आतां जयो करितां उपाये । नाहीं सुख. ॥ ४३ ॥

निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।
पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥

### हे जनार्दन

अर्जुन म्हणे, जनार्दना, । अवधारीं श्रीहरि, कृष्णा, । माझया ये अर्थी मना । येक आलें. ॥ ४४ ॥

### धार्तराष्ट्रान्निहत्य

राया धृतराष्ट्राचे कुमर, । दुर्योधनादिक समग्र । ययांतें मारूनि वैर । साधिलें असतां, ॥ ४५ ॥

### नः का प्रीतिः स्यात्

काये वरें वाटैल आमुतें । भोगून कवणा संतोषातें, । आठव आठवू ययांतें। प्राणु देऊन? ॥ ४६ ॥ पाणी पाणी म्हणौनि । येके पडली रणीं, । आतां तें आम्हीं पाणी । कैसें प्राशावें? ॥ ४७ ॥ अन्नाची करूनि आठवण । बाळकीं दिधले असतील प्राण. । आतां तें मुखीं अन्न । कैसें घालावें? ॥ ४८ ॥ बैसोन बंधुहीन आसनीं । तैं काये सुख वाटैल मनीं? । नको नको, चक्रपाणी, । तैंचें दुःख. ॥ ४९ ॥ भोजनीं बैसलों पंक्ती । पुत्र, पौत्र, ना संतति;

आपुलीं मारूनि यति । तें अन्न खाणें. ॥ २३९० ॥ स्वजन वधून राज्य भोगणें । तें तयांचें मांस खाणें; । जिव्हा भक्षूनि पारणें, । गोपीनाथा. ॥ ५१ ॥ कवणा येका विसरावें । आपणचि मरतां बरवें. । जळो तें जीणें, देवें । खांडवल्याचें. ॥ ५२ ॥ आतां ययांचे जे आश्रम । दृष्टी पाहतां मनोरम । उद्वस अवघे परम । कैसे पहावे ? ॥ ५३ ॥ बैसले ते ठायें आठवती, । ययांचिया क्रिया वागती, । तिया देखोनि लागती । हृदयीं बाण. ॥ ९४ ॥ सुखःदुःख कवणा पुसावें, । आपुलें कवणा सांगावे, । गेलें बंधुधन तें नवें । आणितां नये. ॥ ९५ ॥ न मिळे पिता, न मिळे जननी, । न मिळे आजा गागतेनि, । न मिळे बंधु, भगिनी, । येर सर्व मिळे. ॥ ५६ ॥ येणें प्रकारें ययांतें । मारूनि सुख नाहीं आमुतें; । आठवण देईल दुःखातें, । नारायणा. ॥ ५७ ॥ तू म्हणसील ऐसें वचन । सकोमळ, पार्था, तुझें मन; । परंतु ययांचें आचरण । तें तंव महादुष्ट; ॥ ९८ ॥ तरि हें मातें, मधुमर्दना, । सांगावें नलगे, नारायणा; । हे कौरव, वसुदेवनंदना । केवळ कैसे ? ॥ ५९ ॥

## आततायिनः

आततायी, अति उग्र । जयांचें कर्म घोर, । परपीडक, भयंकर । घातरूप. ॥ २३६० ॥ येहीं लाक्षाजोहर रचिलें । अग्निमाजी जाळूं आदरिलें, । तये वेळे रक्षिलें । वासुदेवें तुवां. ॥ ६१ ॥ भीमसेना दिधलें विष, । विकळ पाडिलें तयास, । चुकले नाहींत हे वधास । परि तूं सारथी. ॥ ६२ ॥ शस्त्रें घेऊनि वरि आले । आतां मारावया काये उरलें ? । आइकें, श्रीकृष्णा, । पराजिलें । आम्हांवरि. ॥ ६३ ॥ राज्य हरिलें सकळ, । तें नव्हे संग्रामबळ; । द्यूतकर्म अविमळ । खेळोनियां. ॥ ६४ ॥ आमुतें नाहीं धरणी । ऐसें केलें दुर्जनीं । ते मी ययांची करणी । विसरलों काये ? ॥ ६५ ॥ क्षेत्रहर, राज्यहर, । द्रव्यहर, स्त्रीहर, । ऐसे ययांचे आचार, । ते आततायी हे. ॥ ६६ ॥ आततायी यांचीं लक्षणें । जाणीतलींचि असति सर्वज्ञें । परंतु हेंचि सांगेन । संक्षेपें मी. ॥ ६७ ॥ आगि लावूनि ग्राम जाळी, । गायीचे ग्रास पोळी, । अग्नि दे, वनमाळी, । आततायी तो. ॥ ६८ ॥ विष दे तैसाचि तोही । आततायी संशयो नाहीं. । हातीं हातियेर हाणे तयीं । तोही तो घडे. ॥ ६९ ॥ आततायी द्रव्यचोरु, । स्त्रीक्षेत्रराज्यहरु, । परद्रोही, हत्यापरु । आत-

यायी. ॥ २३७० ॥ बळात्कारें धर्मु लोपी, । आश्रये पाळी पापी, । साधूतें पिडी. पररूपीं । द्वेषें पाहे. ॥ ७१ ॥ ऐसे ते आततायी सर्व । येक येक आश्रयूनि आसुरभाव; । आंतां आततायी कौरव । ते सकळा गुणीं. ॥७२॥ आतां आततायी हे मारितां । दोषु नपवे वधु कर्ता । तयां रक्षी तो सर्वथा॥ महापापी. ॥ ७३ ॥ आततायिया कौरवातें । मारावें, संशयो नाहीं येथें; । परंतु, नारायणा, तेथे । येक आहे. ॥ ७४ ॥ हे गुरु आणि पितर । पितामह, बंधु, समग्र । पुत्र, पौत्र, इष्ट, मित्र, । साले, श्वशुर कीं. ॥ ७५ ॥ पितेन सर्वस्व हरिलें, । प्राणान्तरि दुःख दिधलें । तया आततायित्व लाविलें । शास्त्रें कवणें ? ॥ ७६ ॥ शस्त्रें हाणो आला गुरु, । पिता, प्रपिता, वृध्द पितरु, । आतां तयांचाचि देहो साकारु । ऐसें असतां, ॥ ७७ ॥ मारी तो आततायी मानावा ? । कीं मारू नेदी, तो कल्पावा ? । विचारें पाहें, यादवा, । उत्तर देई. ॥ ७८ ॥ श्वशुरें हरिली स्त्री, । तैसीचि शालकें अवधारीं, । तो आततायी कवणे परी । मानावा पां ? ॥ ७९ ॥ आपुलें सर्वस्व नेलें, । बंधूनें राज्य घेतलें, । तें तयाचेंचि, कीं आलें । आततायीपण ? ॥ २३८० ॥ पुत्र, पौत्र, पितर, । पितामह, बंधु समग्र, । सासुरे, शालक, अपार । शरीरसंबंधी, ॥ ८१ ॥ येहीं आमुतें मारिलें, । आगी लाविली, विष दिधले, । शस्त्र काढूनि हाणिले । ऐसेंही असतां, ॥ ॥ ८२ ॥ क्षेत्रदाराराज्यहरण, । येहीं घेतलेही प्राण, । हे आततायी म्हणौन । कैसे मारावे ? ॥ ८३ ॥

**एतान्हत्वा**

येयांतें वैराकारें अनंता, । पाहोनि मारिलें आम्हीं नेणतां, । तरि येणें गोत्रवध सर्वथा । संदेहो नाहीं. ॥ ८४ ॥

**पापमेवाश्रयेदस्मात्**

आमुचां शरीरीं संचरती, । महापापें प्रवेशती, । वाव नाहीं गिळिती । आमुचयां रूपां. ॥ ८५ ॥ मग आमुचया ऱ्या व्यक्ति । त्या पापाचियाचि मूर्ति, । पापा नाहीं मिति । तें सर्वत्र होईल. ॥ ८६ ॥ ब्रह्महत्या रिघालिया । वीरहत्या प्रवेशलिया । गोत्रहत्या संक्रमलिया । शरीरामाजी, ॥ ८७ ॥ गुरुहत्या, पितृहत्या, । पुत्रहत्या, पौत्रहत्या, । सुहृदहत्या, मित्रहत्या, ।

आम्हां पोटाळिती. ॥ ८८ ॥ सायंकाळ प्रवर्ततां । गुरां, गोपाळा, समस्तां । ग्रामामाजी प्रवेशतां । जैसा धेनु नाथी, ॥ ८९ ॥ दिशांतरगत पक्षी जैसे । सायंकाळीं आपैसें । वृक्षु, टाकूनि आकाशें, । येवोंचि ठागती. ॥ २३९० ॥ आगोठी मेव वर्षलें । तें मुंगिया अथवा मुगळे । सांडूनि येकें विळें । विळीं प्रवेशती; ॥ ९१ ॥ तैसें आमुचा शरीरीं । पापें रिघती अंतरीं, । तीं पुढती काढावया बाहेरी । कवणु समर्थु? ॥ ९२ ॥ भूतांचां गोंदळीं पडिलें । तें माणुस नव्हे आपुलें; । तैसें पापा अधीन जालें । जीणें होईल. ॥ ९३ ॥ बाहेर अंतरीं पाप सर्व । आम्ही पापी पापवैव; । पापचि दृष्टी सावैव । दिसों येईल. ॥ ९४ ॥ येणेंही आंगें पाहतां । अवधारीं, गा गोपीनाथा, । यया कौरवां मारितां । गोत्रजांतें, ॥ ९५ ॥ आमुतें वरवें तें नाहीं । परि अनर्थ पाहिजे तितुकाही; । यालागीं निश्चयो हृदयीं, । जे संग्रामु न करणें. ॥ ९६ ॥ अथवा आन येके प्रकारें । श्लोकाचा भाव स्फुरे, । तोही अर्थु चतुरें । विचारावा. ॥ ९७ ॥

### हे जनार्दन

अर्जुनु म्हणे, जनार्दना, । जनाकारें तुझी ईक्षणा । जगत्स्रष्टा, श्रीकृष्णा । वचनें अवधारीं. ॥ ९८ ॥

### धार्तराष्ट्रान्निहत्य

राया धृतराष्ट्राचे नंदन । दुर्योधनादिक सकळजन । आतां स्वजनां ययांतें मारून । इतुल्यावरि ॥ ९९ ॥

### नः का प्रीतिः स्यात्

कायें सुख अवधारीं । होईल आमुचां शरीरीं ? । दुःखाची अन्यत सामग्री । विस्तारेल. ॥ २४०० ॥ मग किती भोगावें ? । देह गेलियाही दूरि नव्हे, । यालागीं ययां न मारावें । हेंचि सुख. ॥ १ ॥

### अस्मान्हत्वा

आम्हीं सांडिले युद्धभाव । ऐसें असतां, हे कौरव । आमुतें मारितील स्वमेवें । तरि मारूनियां. ॥ २ ॥

### आततायिनः

आततायी हे निरुते । जाणावे येणें मतें । गोत्रघातकी ययांतें । लोक म्हणतील. ॥ ३ ॥

मार्गा लाखाजोहर केलें । तेणें काये भलेपण आलें ? । भीमसेना विप दिधलें । केली अकीर्ति. ॥ ४ ॥ राज्य हरिलें आमुचें । तें कारण नव्हेचि साधुत्वाचें; । कपटें धूतें आमुचें । सर्वस्व नेलें. ॥ ५ ॥ द्रुपदी हरिली पतिव्रता । आमुचीं आम्हांचि देखतां, । येणें कर्में, अनंता, । कौरव ते ॥ ६ ॥ परलोकाप्रतिः अंतरले, । देवांचे द्रोही जाले, । इहलोकीं मिरवले । आततायीपणें. ॥ ७ ॥ आतां येणें काळें यये रणीं । आले असतां शस्त्रें घेऊनि । तरि इतुलेंचि कीं आम्हांलागूनि । पुरे करिती. ॥ ८ ॥ तरि मारिलिया आम्हांतें । काये होईल तयांतें । तेंचि वचन गोपीनाथें । अवधारावें. ॥ ९ ॥

एतान्पापमेवाश्रयेत्

पापें आश्रयिती ययांतें । मग तो बोल्ल काये आमुतें ? । मारवले आपुलेन हातें । ऐसें होईल. ॥ २४१० ॥ ययांचीं शरीरें सकळें । महापापा होती स्थळें; । गोत्रवधा आगळें । कवणें दुरित ? ॥ ११ ॥ आतां आतताई, गोत्रघ्न । हें न पडे ययां अभिधान ? । परलोकप्राप्ति ना वदन । इहलोकीं दावावया. ॥ १२ ॥ ते आमुचें सर्व चुकलें, । अयश ययांतें लागलें, । ऐसें होईल येणें काळे । भवंसन. ॥ १३ ॥ ऐसें अर्जुनाचे बोलणें । परमार्थलें कैसें घेणें, । तेंचि आतां सांगणें । येथूनि असे. ॥ १४ ॥ अर्जुनु म्हणे, गा जनार्दना, । गोपीपते, रमारमणा, । सद्गुरो, स्वामी, सर्वज्ञा, । ज्ञानमूर्ति. ॥ १५ ॥ राया धृतराष्ट्राचे नंदन । अन्यथाबोधाचे गुण । अहंदुर्योधनादिक जाण । येर सकळ. ॥ १६ ॥ माझिये प्रकृतीचे सर्व । गुणागुणकृत स्वभाव । मजसी वेगळे सर्वथैव । न वर्तती ते. ॥ १७ ॥ आतां तया स्वजनां । स्वगुणां, आइकें कृष्णा, । मारूनि आम्हां गोत्रघ्नां । कवण सुख ? ॥ १८ ॥ झाडितां आंगींचा रजोगुणु । आणि तयाचि ऐसा तमोगुणु, । अत्यंतु असे सत्वगुणु ; । तरिचि बरें; ॥ १९ ॥ नातरि कष्ट बहुसाल, । नचले योगाभ्यासाचें बल, । अत्यंत मन चंचळ । न सोडी विषयसंगा. ॥ २४२० ॥ आतां रजोगुणाचे हनन । तेंचि शमदमादि साधन । निरोधितां इंद्रियगण । कैसें होये ? ॥ २१ ॥ मौनें दाटिली वैखरी । ते तिहीतें प्रवृत्ति करी, । मग मौनें तेणें अंतरीं । कवण सुख ? ॥ २२ ॥ बाह्य घाचेचें मौन । अंतरीं न राहे अंतःकरण । तें वाङ्मियमालागून । कवणु आधारु? ॥ २३ ॥

आधारेंविण तें धरितां । दुःख वहुसाल, अनंता, । तेथें संयमुचि तो वृथा । अवघा जाये. ॥ २४ ॥ करांचा नियमु केला । तेणें स्थूळाचा घातु जाला, । मग मन दुःखरूपा तयाला । आश्रयींचिना. ॥ २५ ॥ हट्ट कीजे जंव जंव । दुःखचि आगळें होये तंव तंव । शरीरनिर्वाह सर्व । छेदती जैं. ॥ २६ ॥ चरणां सोपान चालणें । परंतु नटके आसनीं वैसणें । अंतरीं रजोगुणु तेणें । अधिकु होये. ॥ २७ ॥ आसननियमु वाहेरि । गमनशीळ अंतरीं, । तें मुद्रा जोडी नानापरी । आसनाची. ॥ २८ ॥ शिश्न दमियलें संयमें, । न नियमे मन तेणें दमें; । मग अंतर अवघें कामें । नाशोनि जाये. ॥ २९ ॥ अंतरी असतां स्त्रीकामु । वाहेरि दमु तो श्रमु; । मग नानावर्णी मनोधर्मु । तो लागे विचरों. ॥ २४३० ॥ हटें धरितां कर्मकरण । कर्मत्यागा तयालागून, । तंव तें दशगुणा मन । प्रवर्ते कर्मीं. ॥ ३१ ॥ शब्दु सांडिलें आइकणें, । तो व्यापारु अंतःकरणें । वहुसालचि करणें । ऐसा नियमु असे. ॥ ३२ ॥ नयन लाविले वाहेरि । बुद्धि उतावीळ रूपावरि । ते हात पाये नेत्र करी । ऐसी पाहें. ॥ ३३ ॥ वनितादिस्पर्शसंन्यासें । मन मोकळें धांवे आपैसें; । तें नाना यातीचीं माणुसें । कवळून ये. ॥ ३४ ॥ रसना पीडिली रसाज्ञानें । तो दमुचि तें तेणें । सांडूनि सेवीन म्हणे । नाना रस. ॥ ३५ ॥ मग तें प्रवर्तलें तेथूनि । सेव्या असेव्यातें नमनी. । इच्छा ते रस भोगूनि । शरीरा ये. ॥ ३६ ॥ घ्राणें सुगंधा नेघावें । तैं अंतरी सर्व आश्रयात्रें । ज्ञानेंद्रिय दमावें । तैं ऐसें होये. ॥ ३७ ॥ रोगियां अपथ्य नियमांचें, । तैसें कर्मज्ञानइंद्रियांचें; । प्रमाण सुटतां तयाचें । मात्रा भगे. ॥ ३८ ॥ मग काये किती करावें । काये जाणावें, भोगावें, । अंतःकरण शांत नव्हे । बाह्यभोगेंवांचूनि. ॥ ३९ ॥ प्रस्थें येकें धाइजे । तें तितुलें क्षुधे नेदिजे, । मग ते माथां वाजे । तया मना. ॥ २४४० ॥ मन क्षुधित प्रवर्तलें । तैं वोदनाचे पर्वत आटले, । कोरडें तळें पडिलें । तिये काथिकेचें. ॥ ४१ ॥ दुःखाचे वेंचले सागर । परि क्षुधा तयाची अनिवार । कधींचि नव्हे क्षर । अक्षयी ते. ॥ ४२ ॥ स्त्रीकामीं अनिवारपण । तया मनाचें जाणोन । परम पुरुषें जाणें । काये केलें. ॥ ४३ ॥ अव्यक्त मन आंकाळिलें । स्थूल शरीरीं कोंडिलें, । शिश्न येक द्वार केलें । मात्रा येकि स्त्री. ॥ ४४ ॥ ईश्वरें दमु केला । तोचि मूर्खपणें सोडिला, । करणव्यापारु सोडिला ।

पाहिजे म्हणौनि. ॥ ४५ ॥ तेणें तें मनचि सुटलें । नानावर्णी विचरतें जालें आतां तें भोगितां कल्पें काळें । तृप्तिचि नाहीं. ॥ ४६ ॥ यापरी इंद्रियधर्म । तेचि मनोव्यापारां नियम. । प्रमित होय कर्म । तेणें-करूनि: ॥ ४७ ॥ तें.इंद्रियकर्म सांडितां । मनाचिया वृत्ति बहुता । नित्यातृप्त तें सर्वथा । असंवर सुटे. ॥ ४८ ॥ तत्वता दमु तो अदमु । आणि साधितां महाश्रमु, । व्यापारेंचि रजोगुणु सुगमु । तो मारिता नव्हे. ॥ ४९ ॥ आतां तमोगुणु मारावा । आत्माबोधु पाडावा । तरि पाडूनि खरा करावा । हेंचि होये. ॥ २४५० ॥ निद्राचि येकि मारावी, । केवळ जें न करावी, । तें न करून आणावी । तीतेंचि पुष्टता. ॥ ५१ ॥ प्रहरों दोचें विस्मरण । इतुलेन खरें ज्ञान, ध्यान; । तेंचि करावें मारून । प्रहरां आठांचें. ॥ ५२ ॥ आळया वेगा मानु देतां । नव्हे घटिका सर्वथा; । तेंचि अवमानें दंडितां । विळें लागे. ॥ ५३ ॥ आपुल्या अज्ञानातें । मारावया जो प्रवर्त्ते । तेंचि अज्ञान ज्ञानरूपतें । तमाचिये मारी. ॥ ५४ ॥ रजें रजचि बळिकट, । तमें तमचि उत्कृष्ट; । होये निरसितां कष्ट । ययालागीं ते. ॥ ५५ ॥ अभिमानु आपुला मारणे । तो खराचि तेणें यत्नें । लागावयाकारणें । समर्थु होये. ॥ ५६ ॥ अनभिमानरूप केवळ । तयातें कायिसी तळमळ? । आतां करितां तो निर्मूळ । मूळ पोपे. ॥ ५७ ॥ आणि आपुलिया आत्मभावा । अभाव कवणें हाणावा? । आपुला आपण न करावा । तरिचि नव्हे. ॥ ५८ ॥ आतां न करणें तो अप्रकाशु, । करणें आपुला प्रकाशु, । तयाचा करितां नाशु । अज्ञान उरे. ॥ ५९ ॥ अज्ञान अन्यथा बोधा । करूनि लागे सर्वदा । वरि मांडलें अहंवादा । न संडी तें. ॥ २४६० ॥ अभिमानत्यागें अज्ञान, । अनभिमानेंचि तें वर्तमान, । न निरसे ऐसें कारण । अनंतां अभिमानां. ॥ ६१ ॥ अभिमानकारण तें छेदावें । तें अभिमानेंवीण काज नव्हे, । जागृतावरि न धांवे । निद्रा जैसी. ॥ ६२ ॥ अभिमानें घेली सावधानता, । तीणें हाली अज्ञानता, । मग ते अभिमानां अनंतां । प्रसवों न शके. ॥ ६३ ॥ अभिमानु धरणें, धरू जाणणें । तें अभिमानबीज करपवणें, । ज्ञाता, साधकु तो जाणें; । येरु सुखें. ॥ ६४ ॥ अभिमानु स्वभावनिर्मळु, । निर्मेवाचा करी सुकाळु, । तयाचा ध्वंसु केवळु । अभिमाना करी. ॥ ६५ ॥ यापरी स्वगुण मारितां ।

गुण बाधक होतीं, अनंता, । म्हणोनि नाशें ययांचेनि सत्यता । न दिसे सुख. ॥ ६६ ॥ आणि गुण तंव हे आततायी, । स्वरूपप्रकाशु येहीं नाहीं; । गुण घातिती कर्मद्रोहीं । ते कैसे गुण? ॥ ६७ ॥ तापत्रयदावानळें । येहीं आमुतें जाळिलें, । लाक्षाजोहर रचिलें । पापरूपी. ॥ ६८ ॥ विषय विषाचा गळाळा । आत्मयोगाभिमान निर्मळा । गुणींचि येहीं, गोपाळा, । पाजिला कीं. ॥ ६९ ॥ आत्मविवेकलक्षण । गुणीं सर्वस्व हरिलें धन; । आमुचेंचि आम्हां अधिष्ठान । पारिखें केलें. ॥ २४७० ॥ गुणरत्नयावरी । शस्त्रें घेऊनि आम्हांवरि । आले अभाव परोपरि । आमुचा करावया. ॥ ७१ ॥ ऐसे हे गुण आततायी, । ययां मारितां दोषु नाहीं, । परंतु, श्रीकृष्णा, आइकई । येक आहे. ॥ ७२ ॥ मारितां ययां गुणांतें । मारिलें होये साधनातें; । साधनमारें आमुतें । पाप आश्रयील. ॥ ७३ ॥ गुणांचां केवळ मरणीं । कार्य, कर्तृत्व, करण, तिन्ही । लोपतां; तेणेंकरूनि । कर्मा करणें. ॥ ७४ ॥ संध्यावदनें बुडालीं, । स्नानें समूळ हारपलीं, । यज्ञादिकें लोपलीं । कर्में सकळें. ॥ ७५ ॥ कुठले यजन, याजन; । अध्ययन आणि अध्यापन; । प्रतिग्रह आणि दान । माळवलें तें. ॥ ७६ ॥ वर्णाश्रमांची मर्यादा । मोडिलिचि कीं सर्वदा; । आश्रयो नाहीं भक्तिवादा, । भंगला तो. ॥ ७७ ॥ ईशाचें गुणश्रवण, । कैसें करावें संकीर्तन, । त्रिकाळ प्रतिमापूजन । सुटलें तें. ॥ ७८ ॥ स्मरण नाहीं गुणघ्यसें; । वंदन, सेवन न प्रकाशे । दासत्व अभावें आपैसें । फरणीवीण. ॥ ७९ ॥ भाव कैसा समर्पणें, । सर्वस्वें देवाचें होणें, । तत्कर्मवांचूनि न करणें । तें भंगलें व्रत. ॥ २४८० ॥ श्रवण, मनन, निदिध्यासन, । साक्षात्कार, ना शब्दज्ञान, । नित्यानित्यतत्वदर्शन । शून्य जालें. ॥ ८१ ॥ गुणमारें प्रेमु मेला, । प्रेमनमारें योगु हारपला, योगाभावें घडला । संग्रहो पापांचा. ॥ ८२ ॥ कर्मा करणें दोष दारुण । आम्ही होऊन तयां स्थान, । सेवटीं सत्वशुद्धि ना ज्ञान, । साधन नव्हे. ॥ ८३ ॥ विहितेविण जें कीजे । तें पापचि देहा आपजे, । कर्माकर्में दोषु उपजे । सारिखाचि. ॥ ८४ ॥ करितां कर्मा करणें । करितां अविहित करणें, । दोषु गुणमारें येणें । जोडतु असे. ॥ ८५ ॥ अथवा आन येकें मतें । अर्जुनु म्हणे कृष्णातें, । आइकें, जनार्दना, निरुतें । म्हणोनियां. ॥ ८६ ॥ अन्यथाबोधाचे हे गुण । धृतराष्ट्राचे नंदन, । दुर्योधनु श्रेष्ठ करून । येर

सकळ ॥ ८७ ॥ ययांतें मारूनि आमुतें । काये सुख होईल योगमतें ? । अभ्यासदुःखें अनंतें । आंगीं वाजती. ॥ ८८ ॥ दुःखरूपु सोपूनि अभ्यासु । आत्माज्ञानें गुणनाशु, । तेणें गुणांचाचि विकाशु । आगळा होये. ॥ ८९ ॥ अभ्यासाचें दुःख खरें, । वरि हेंही जालें दुसरें; । तरि ज्ञानयोगें विचारें । मारूं गुण; ॥ २४९० ॥ तरि आत्मज्ञानाचिया दृष्टी । असतचि गुण अद्वैत उठी; । ते गुण मारावे हे गोष्टी । धारेविना. ॥ ९१ ॥ गुण ऐसें जाणावें । तें आत्माज्ञानेंचि वरवें, । विरुद्ध मानूनि मारावे । ते अज्ञानकृतें अभ्यासें. ॥ ९२ ॥ अज्ञानकृतें योगाभ्यासें । गुण मारितां सुख न दिसे. । अस्तु आतां ते जैसे तैसे । म्हणौन सोडिले. ॥ ९३ ॥ तरि हे आमुतें मारितील, । मारून काये करितील ? । केलें आपुलें भोगितील । आपणचि हे. ॥ ९४ ॥ तापत्रयलाखाजोहारीं । आमुतें जाळिलें जन्हीं, । तन्हीं ते यांचे वैरी । ययांतेंचि जाले. ॥ ९५ ॥ विषयविष आत्मयोगातें । दिधलें गुणीं भीमसेनातें. । सेवटीं तें ययांचें ययांतें । अपेशाचि उरलें. ॥ ९६ ॥ आमुचें हरिलें ज्ञानधन । तें ययांचेंचि वाढलें आख्यान; । गुण आततायी म्हणोन । ठसा जाला. ॥ ९७ ॥ अधिष्ठानापासाव दवडिलें । तेणें आमुचें काये गेलें ? । तेचि सर्वस्वें वंचले, । जाले गोत्रद्रोही. ॥ ९८ ॥ स्वरती हरिलें येहीं, । मग हरूनि केलें कांहीं ? । पतिव्रते । दूषण नाहीं । लागलें कीं. ॥ ९९ ॥ गुणानतुमतेंचि स्वरती, । दोषी ते दोषी, श्रीपति; । आपुलीचि अकीर्ति । वाढविली येहीं. ॥ २५०० ॥ आतां शस्त्रें घेऊनि आले, । आम्ही जाऊं न वधले; । इतुलेन आततायी भले । जाले पुत्रयीं. ॥ १ ॥ आमुतें मारिलियावरी । उरलां ययांचा शरीरीं । पापेंचि श्रीहरि, । प्रवेशतील. ॥ २ ॥ आत्मधर्मु येहीं हाला, । तैं अनात्मधर्मु गुणीं रिघाला; । तोचि मग प्रसवला । अनंतां पापां. ॥ ३ आत्मयोगु नाशिला येहीं । तेथ आत्मयोगु ययांसीं ऊर्ई । नित्य राहिला जाणयीं, । वासुदेवा. ॥ ४ ॥ कर्मभ्रष्ट, भक्तिहीन । कहींचि । नुपजे यां ज्ञान; । आत्मलाभाचें स्वप्न । गुणां नलभे. ॥ ५ ॥ विकर्म, अकर्म, । काम्य कर्म । करितां पाप दुर्गम; । योगाभावें वर्म । आपणचि चुकलें. ॥ ६ ॥ स्वभावलया हाणतील । तैं पाषाणचि होतील, । पापसागरीं बुडतील । प्रांतहीनीं. ॥ ७ ॥ अन्वयबोधातें हाणती । आपुलीचि खंडें पाडिती । मानें मारूनि दाविती । कैसें सुख. ॥ ८ ॥ म्हणौनि ययांकारणें । आमुतें मारूनि आत-

तार्यीपणें । पापाचि तयाकारणें । पात्र होईजैल. ॥ ९ ॥ आमुतें आच्छादूनि, । श्रीहरि, । आपणा दाविती हे जन्ही, । तथापि आम्हांचि ते त्यांचां आकारीं । ऐसें कां नव्हे ? ॥ २५१० ॥ आत्मलोपें भान । तें आत्मसत्तया भासमान । तरि तेहीं भोगिलें आम्हां मारून । तें भोगिलें आम्हीं. ॥ ११ ॥

तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान्स्वबांधवान् ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥

हे माधव

अर्जुनु म्हणे, श्रीकृष्णा, । महामायेचिया अधिष्ठाना, । मुररिपु, जनार्दना, । वचन अवधारीं. ॥ १२ ॥

तस्मात्

ऐसीं पापभयें दारुणें । म्हणौनि तयाकारणें । निश्चयो आमुचेनि मनें । येकु केला. ॥ १३ ॥

धार्तराष्ट्रान्स्वबांधवान्

राया धृतराष्ट्राचे कुमर । मित्रांसी सहितत्वें समग्र, । तत्पुत्र आणि पौत्र । ऐसियां यातें. ॥ १४ ॥

हन्तुं नार्हा वयम्

मारावया सत्य आम्ही । योग्य न हों संग्रामीं । पुढती आन येक मी । बोलों पाहतुसें. ॥ १५ ॥

स्वजनं हत्वा

भलयती, गा श्रीपति, । आत्मसुखार्थ करावी प्रवृत्ति, । दुःखसाधनी मनोवृत्ति । ते लागेचिना. ॥ १६ ॥ तरि हे आमचे स्वजन, । बंधु आणि सतान, । आतां ययांतें मारून । यये संग्रामीं ॥ १७ ॥

कथं सुखिनः स्याम

पुढें कैसें सुखी असोन, । सुखें राज्य कैसें करून, । जीऊन अथवा मरोन, । सुखी कैसे ? ॥ १८ ॥ मेळियावरि गोत्रघातें । स्वर्गु नाहीं, हें निरुतें । परंतु रौरव नरक रोकडे । भोग न चुकती. ॥ १९ ॥ बहु काळ सुख नाहीं ।

यातना, दु खतें अक्षयी, । मेळियानरि ऐसें जयीं, । जीता कसें ? ॥ २५२० ॥ कीर्ति ते नाशली, । मुखातें मसि लागली, । गुरुगोत्रहत्या घडली । म्हणोनिया. ॥ २१ ॥ मोयरिया मुख न दावावें, । आता जाहिरे न यावें, । घराचिमाजी पडावें । तरि एक सुख. ॥ २२ ॥ तव मृतभर्तृका वधुस्त्रिया । आणि तत्पुत्रदारा तिया । नातिसुना अनाथिया । मंदिरामाजी. ॥ २३ ॥ सौभाग्यहीना दिसती । तियाची सेज पडली रिती । दिनराती दु:ख करिती । तें देखोनिया, ॥ २४ ॥ काये पा सुख वाटेल, । मुख कसें पाहवेल, । हृदय दें ठायीं होईल । ऐसियावरि. ॥ २५ ॥ काये तया सबोधावें, । काये मुख दावावें, । आता स्त्रियामाजी नव जावें । हेंचि वरें. ॥ २६ ॥ तरि दुर्योधनाचें सिंहासन । वेसताचि होईल आठवण । तेंचि भद्र, तेंचि स्थान, । परिवार तोचि. ॥ २७ ॥ अंतरींचें दु ख सावरावें, । कीं लोकांचें मुख पाहावें, । काय म्हणतील अवघे । मनामाझारी. ॥ २८ ॥ धर्मकथा निरोपण । सांगों येती ब्राह्मण । तेंचि आम्हीं आइकोन । काय करावें? ॥ २९ ॥ वेद, शास्त्रें, पुराणें । राहिलें इतिहास वोलणें, । घरोघरीं आम्यानें । आमुचींचि होतील. ॥ २५३० ॥ वेसोनि उगें नसवे । तें सांगसि काये बोलावें ? । कवण धर्म स्थापावें । श्रेष्ठ म्हणोनि ? ॥ ३१ ॥ गुरुहत्याविधु जयातें । ब्रह्महत्या कर्म निरुतें । गोत्रहत्या म्हणिजेतें । परम उचित ॥ ३२ ॥ इष्टवध आचार जया । कवणु श्रेष्ठु धर्मु तया ? । आता मुखचि नाहीं पापया । जेणें वोलिजे. ॥ ३३ ॥ पाहों नये, वोलों नये । आइकों नये, भोगू नये, । मागों नये, सांगों नये, । ऐसें जालें. ॥ ३४ ॥ आता निद्राचि करूनि असावें । तरि मानसीं तेंचि आठवे । डोळा लागता पावे । स्वप्न तेसेंचि. ॥ ३५ ॥ जीजे तव ऐसें, । मेळिया दु.ख तेसें, । सुख तें कोठें असे । आम्हालागीं ? ॥ ३६ ॥

हि

सत्य सत्य हें निर्धारें । माझ्या मानसीं निश्चयो स्फुरे । अनुमानाचीं उत्तरें । नव्हती, देवा. ॥ ३७ ॥ ऐसें बोलिजे अर्जुनें । तें परमार्थदृष्टी कैसें घेणें, । ययें अर्थी वोलणें । विचारावें. ॥ ३८ ॥ अर्जुनु ह्मणे, मायाश्रया, । अवधारीं सद्गुरुराया, । परब्रह्मा परमात्मया, । माझें वचन. ॥ ३९ ॥ योगा स्वधर्मीचें उच्छेदन । आत्मलोपक पाप गहन । लागेल आम्हालागून, । गुण हे

मारितां. ॥ २५४० ॥ तयाकारणें, मुरारि, । आम्हीं आपुलां अंतरीं । येकि युक्ति वरवी, थोरी, । विचारिली असे. ॥ ४१ ॥ राया धृतराष्ट्राचे कुमर । आमुचे बधुवर्ग समग्र । ते स्वगुण साचार । संगत जे. ॥ ४२ ॥ आपणचि आपुली प्रकृति । तीपासाव गुणां उत्पत्ति । ते आपणाचिपासावति या युक्ती । कैसें नमनावें ? ॥ ४३ ॥ आपणाचपासाव जाले, । आम्मांशचि जे संचले, । स्वयमेव जन ते कल्पिले । भावें स्वजनाचेनि. ॥ ४४ ॥ म्हणौनि ते स्वभावगुण, । अभिमानादिक स्वजन, । योगसंग्रामीं मारून । ययां सर्वांतें ॥ ४५ ॥ पापी होणें काये उचित ? । म्हणौनि योग्य न हों येथ । मारावया गुणगोत, । नारायणा. ॥ ४६ ॥ मारूनियां हे गुण । काये सुखी आम्हीं होऊन ? । निश्चयात्मक माझें मन । ऐसें कल्पी. ॥ ४७ ॥ गुणीं कर्म आचरावा । गुणीं भक्तियोगु साधावा । अभ्यास तोही करावा । हा रे गुणाचेनि. ॥ ४८ ॥ गुण तरि आत्मश्रवण । निदिध्यास आणि मनन । गुणापासाव ध्यान, । मनाचा जयो. ॥ ४९ ॥ गुणातें आत्माकारता । तेचि समाधि, गा अनंता; । अनुभवूं गुणांकरितां, । स्थिति ही गुणां. ॥ २५५० ॥ गुणसहित सगुणत्व, । गुणसहित निर्गुणत्व, । गुणसहित गुणाती तत्व । ऐसें असावें. ॥ ५१ ॥ कांहीं सांडणें, कां विसरणें । ऐसें करणें मातें नमने । जैसें तैसेंचि असणें । जेथिंचे तेथें. ॥ ५२ ॥ ऐसें असता जें घडैल । तेंचि सुखरूप केवळ । सांडी मांडी हें सकळ । कारण दुःख. ॥ ५३ ॥ म्हणौनि ययाकारणें । स्वजनां स्वगुणां कीरु मारणें । नाहीं; आतां जें भोगणें । तें येहींसहित. ॥ ५४ ॥ चालताचि चालणें, । नाहीं बोलतांचि बोलणें । करितां सकळ करणें । केलें न व्हावें. ॥ ५५ ॥ आहार घेऊनि निराहारता । ऐसी असो, अनंता, । परंतु न प्रवर्ते घाता । क्षुधेचिया. ॥ ५६ ॥ जागृती निद्रे स्वप्नेसीं । भोगावें, जी, तुरियेसीं । तुरिया असत उन्मनीसि । भोगणें ग्यां. ॥ ५७ ॥ अवस्थांसीं अवस्थातीतु । गुणांसीं असैन गुणमुक्तु. । देहेसीं विदेहवंतु, । नारायणा. ॥ ५८ ॥ जडमूढपिशाचता मातें नलगे दशा प्राप्ता; । यया गुणसंगा सर्वथा । सोटींना मी. ॥ ५९ ॥ प्रपंचुचि निःप्रपंचु होईल, । तरीचि बोधु तो सेविजैल; । यापरी पद भोगिजैल । तरि सकळां गुणांसीं. ॥ २५६० ॥ ऐसें स्वस्थिती राज्य करितां । सुख सर्वोत्तम तत्वता । त्यागें, निग्रहें, लयें, खद्वता । महादुःख. ॥ ६१ ॥

सुखेंचि जाणें, येणें, । व्यवहारीं सुखें वर्तणें, । योगुअभ्यासु करणें, । सुखेंचि तोही ॥ ६२ ॥ शयनीं, आसनीं, भोजनीं । सुखेंचि असणें स्वगुणीं, । संसार परमार्थु या मिळोनि । तोचि वरवा. ॥ ६३ ॥ ऐसें अर्जुनु बोलिला, । नमरी मी स्वजनु आपुला, । पुढें कायें बोलता जाला । श्रीकृष्णेसीं. ॥ ६४ ॥

यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥

एते लोभोपहतचेतसः

कौरव हे स्वजन परि । अवधान देईं, गा मुरारि, । लोभु तो ययाचा शरीरीं । बहुसाळु असे ॥ ६५ ॥ राज्यलोभु, स्त्रीलोभु, । द्रव्यलोभु, पुत्रलोभु, । पदलोभु, पदार्थलोभु, । बहुसाळु असता, ॥ ६६ ॥ तेणें लोभें हाले । चित्त जयाचें नाशलें, । हिताहितज्ञान आच्छादलें. । उमटेचिना. ॥ ६७ ॥ मी कवणु ? हें कायी ? । होतो कोठें ? जाईन कयीं ? करावें कायें ? करीं कायी ? । हें कळेचिना. ॥ ६८ ॥ ऐसे लोभें उपहत । नाशलें असता चित्त, । कौरव ते अतिभ्रांत । कायें करिती. ॥ ६९ ॥

कुलक्षयकृतं दोषम्

कुळक्षयें केलें दुरित । तें पाप कुळक्षयकृत, । मारिता आपलें गोत । दोपु जो का. ॥ २६७० ॥

मित्रद्रोहे च पातकम्

आणि द्रोहोकरिता मित्राचा । तेथें जो सग्रहो पापाचा, तेणें होये हिताचा । नाशकु जो. ॥ ७१ ॥ एव कुळक्षयें जालें । आणि मित्रद्रोहें घटलें । पाप अप्रमित चालिलें । ऐसिया ययातें. ॥ ७२ ॥

यद्यपि न पश्यन्ति

न पाहे तिहीं जन्हीं तें । कौरव लोभें राज्यस्वार्थें । मारूचि म्हणती आमुतें । ऐसें जन्हीं. ॥ ७३ ॥

कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥

हे जनार्दन

तरि आम्ही तव सावधान, । जनार्दना, आइकें वचन, । आमुतें राज्य

आणि तृण । सारिखेंचि. ॥ ७४ ॥ शरीराचि जेथ नश्वर। तेथ राज्य कवणातें स्थिर । आणि प्राचीन तें वज्रत्तर । भोगासि जें. ॥ ७५ ॥ तें राज्य हें कवणाचें । प्राचीन सारावें पूर्वींचें । अनिवार आगम तयाचे । ते आपेंआप येती. ॥ ७६ ॥ आणि ईश्वरें केली सृष्टिरचना । तो नेदी राज्य. जैं आपणा, । तें वृथा धरूनि वासना । पापचि करावें. ॥ ७७ ॥ ईश्वरेंचि दिधलें यावरि । मग तें राज्य कवण हरी, । येथ युद्धाची सामुग्री । ते उगेचिना. ॥ ७८ ॥ आतां दिधलें हें ईशें घडे । परि भोगितां तें कुडें, । ईश्वरेंसीं अंतर पडे । तें काये करावें? ॥ ७९ ॥

कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिः

इतुलें जाणों हृदयीं । तरि कुलक्षयकृत पाप ये समयीं । देखत असतांही, आइकयी, । वासुदेवा. ॥ ८० ॥

अस्मात्पापात्

यया पापापासाव घोरा, । अतिनाशका, भयंकरा, । अवधारीं सारंगधरा । पासूनियां ॥ ८१ ॥

निवर्तितुम्

परतावयाकारणें साधन । विवेकु अथवा ज्ञान,। जेणें हें पाप दारुण नये आंगावरि. ॥ ८२ ॥

अस्माभिः कथं न ज्ञेयम्

तें कैसें पां आमुतें न कळे । आम्ही तंव न हों आंधळे । अविवेकी, मर्दे मातले, । आततायी.॥ ८३ ॥ व्याघ्र देखोनि पळावें । हें काये लागलें सिकवावें?। पश्वादिकांहीं बरवें। ठावेंचि असे. ॥ ८४ ॥ परीक्षा न पाहिजे विषाची। माळा न लेइजे भुजंगाची । संगती तया चोराची । धरूंचि नये. ॥ ८५ ॥ न कीजे वैरियेसीं येकांतु, । न संगिजे खळा आत्मस्वार्थु, । पाहोनि येकु पुरुषार्थु । कर्म करावें. ॥ ८६ ॥ न कीजे साधूंसीं मत्सरु, । परत्रावकाचा अंगीकारु, । सत्यासत्या वेगळा विचारु। करूंचि नये. ॥ ८७ ॥ न विश्वासावें दुर्मित्रा, । वाउगी न करावी यात्रा । आपलें वित्त तस्करा । सांगोंचि नये. ॥ ८८ ॥ इष्ट देखोनि प्रवर्तावें, । अरिष्ट देखोनि परतावें, । मा हें तंव ठावें। बाळकांही. ॥ ८९ ॥ आइकोनि जाणों, देखोनि। विचारें मनामाजनि।

-तरि कुळक्षया पापापासूनि । कैसें न परतावें ? ॥ २५९० ॥ प्रळयकाळींचा हा वणवा । परतें परतें, वासुदेवा, । गोत्रवधु हा पांडवां । ग्रासूं आला. ॥ ९१ ॥ हें सिहवदन पसरलें । आंग चुकवावें आपुलें, । पाप दारुण पावलें । नीघ वेगीं. ॥ ९२ ॥ विषाचा हा सागरु, । प्रळयकाळींचा पूरु, । कृष्णा, तूं होसी तारुं । तरि नीघ वेगीं. ॥ ९३ ॥ कल्पांतीं मेघ रचले । तैसें पाप येकुवाटलें, । येणें आकाश रुंधलें । बाह्यांतरींचें. ॥ ९४ ॥ आतां मग हें गर्जेल, । बाणधारा वर्षतील, । प्रळयो पाप करील । गोत्रवधाचें. ॥ ९५ ॥ पळे, तेणोंचि जिंकिलें, । भिडे, तेणें हारविलें; । मारी, तेणें मारिलें । आपणापयां. ॥ ९६ ॥ कल्पांतींचेनि, वा, वचणें, । उडालों मी , पापें येणें, । कृष्णा, काये करिसी नेणे । ययावरि. ॥ ९७ ॥ जंव हें आहे घडावें । तंवचि केशवें चुकवावें, । घडल्या, जोगें नव्हे । तुम्हां आम्हां. ॥ ९८ ॥ दहाही दिशा सुनाटा । परि पळावें कवणा वाटा ? । आतां निर्गमाचा दारवंटा । हाचि येकु. ॥ ९९ ॥ हातींचें शस्त्र सांडणें, । उगेंचि मग पाठीं बैसणें, । युद्ध कौरवांसीं न करणें । हेंचि मुख्य. ॥ २६०० ॥ ऐसें अर्जुनाचें बोलणें । परमार्थे कैसें येणे ? । तें आतां वक्ष्यमाणें । जाणावें पैं. ॥ १ ॥ अहंभाव दुर्योधनु । सकळां गुणां हा कामधेनु । गुणसमूह अर्थातु । जया वर्ते. ॥ २ ॥ अभिमानु राजा गुणातें, । गुण परिवारु ययातें, । आतां अभिमानुअंश ते । अनुज खरे. ॥ ३ ॥ अभिमानसहित गुण । आपुलालां विषयीं ययां ज्ञान । त्या त्या साधनीं प्रवीण । वर्तत असती. ॥ ४ ॥ ते स्वस्वविषयलोभें कैसे । नासले चेतना जयांची असे । हिताहित न प्रकाशे । कांहीं केलिया. ॥ ५ ॥ हिताहितविषयीं अज्ञ । विषयलोभें ते गुण । मग लुब्धले तेणेंकरून । पुढती कैसे ? ॥ ६ ॥ कुळक्षयें दोषु जाला । आणि मित्रद्रोहें घडला । पापसंग्रहो सांचला । ऐसियातें. ॥ ७ ॥ नेणती आपुलेनि प्रकारें । लोभहताज्ञानदोषें । तऱ्ही परंतु अनारिसें । आपण न पाहवें. ॥ ८ ॥ आत्मधर्मु नाशावाचि । हा स्वभाव तयां वर्तेचि. । केली करणी आत्मयोगाची । साहेचिना. ॥ ९ ॥ आत्मसद्भावें शुद्धाकारें । नांदती गुण त्याचेन वैरें; । आपुलेनीचि परि अहंकारें । थोडें केलें. ॥ २६१० ॥ स्वभावल्या हेचि वैरी; । उपरमा शोभती पदरीं, । लयविक्षेप आंगावरि । घालिती तया. ॥ ११ ॥ अन्वयें साची अखंडता । नसधे ते गुणांकरितां । प्रवर्तले आत्महिता । परोपरी हे. ॥ १२ ॥

समाधी सुख नदवावें, । स्थितीनें उठोनि पळावें, । दशेनें येथें न यावें, । नाशावे आम्हीं. ॥ १३ ॥ विया जीतचि मरावी, । स्वरति ते निदवावी, । एव आमुची खूण बुरावी । ऐसें पाहताती. ॥ १४ ॥ सत्सगु आमुचा मित्रु । म्हणती तो मारावा शत्रु; । असत्सगु अपवित्रु । त्याचेनि वोले. ॥ १५ ॥ आमुचे सबधी अपार। ते ययाचेंचि सन्मित्र, । परतु बहुसाल वेर । चालिती तयासीं. ॥ १६ ॥ ऐसें काये यया पाहिजे । परि विषयलोभाज्ञानमाजें । आम्हा स्वजनासींचि जुझे । उभे ठाले. ॥ १७॥ कुळहत्या दोष अनेक, । मित्रद्रोहाचें पातक, । नेणेती ऐसेही मूर्ख । जऱ्ही जाले, ॥ १८ ॥ तऱ्ही आइकें, जनार्दना, । आम्हीं जाणों हे विवचना । जळो ते विषयवासना, । पुरे तें कर्म. ॥ १९ ॥ कुळक्षयदोषु अपारु, । मित्रद्रोहें पापसागरु, । हा आत्मनाशु समग्रु, । गुणाचेनि मोरें. ॥ २६२० ॥ हा प्रत्यक्षु दिसतु असता, । अवधारीं अनता, । येणें बुडोनि सर्वथा । ऐसें जाणोनि. ॥ २१ ॥ यया पापापासाव परतणें, । योगसप्राप्तु न करणें, । निःशेष गुण न मारणें । ऐसिया वर्मा ॥ २२ ॥ जाणतचि नेणों कैसें, । दिसतचि काये न दिसे, । म्हणोन उचित नव्हे ऐसें । आम्हा तव. ॥ २३ ॥ आम्ही तव यया नमरू, । पापाचा सग्रहो न करू । आता करिता गुणसहारु । पाप कैसें? ॥२४ ॥ तरि विहिता कर्माचें अनुष्ठान । गुणमारे त्याचें छेदन । तैं विहिता करणें करून । कवण पाप नव्हे? ॥ २५ ॥ गुणातें होता अभाव, । मोडला भक्तीचा ठाव, । आता अभक्तीचा भाव । अगीं जया ॥ २६ ॥ तयाचें पापचि कर्म, । पापचि तयाचें अकर्म, । पाप देहरूपनाम । अभक्ताचें. ॥ २७ ॥ नाना गुणाचिया नाशा— । सरिसींचि, हृशीकेशा, । कर्म, भक्ति, लोकेशा, । दोन्हीं नाशली. ॥ २८ ॥ गुणाचा होता घातु । मग कैंचा योगप्राप्तु? । मनुष्य ना तो पशु, । पापाणु होय. ॥ २९ ॥ कर्मेंचि दशा पावणें । ऐसिया प्रेत्नाकारणें । गुणाचेनि उपच्छेदनें । अतरों न आम्ही. ॥ २६३० ॥ के सत्वशुद्धि?, कैंचा गुरु? । विवेकु ना आत्मसाक्षात्कारु. । प्रथमाचि करिता मारु । गुणाचा ऐसें. ॥ ३१ ॥ ऐसें आम्हीं जाणता । कैसें प्रवर्तावें अनर्थो । पाळगी गुण हे आता । नमरू आम्ही. ॥ ३२ ॥

कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥

कुलक्षये

कुलक्षयो जाला असतां । अवधारीं, लक्ष्मीकांता, । उरलां कुळीं सर्वथा । येक होईल. ॥ ३३ ॥

सनातनाः कुलधर्माः

परंपरागत चालिले । कुळधर्म जे कीं आपुले, । मागां कधींचि लोपले । नाहींचि जे ते ॥ ३४ ॥

प्रणश्यन्ति

नाशतील अवघे जाण; । मग धर्मनष्टें कुळेंकरून । कुळांचां ठाईं आन । काये होईल ! ॥ ३५ ॥

धर्मे नष्टे

धर्मु असतां नाशला । अवधारीं, गा गोपाळा, । कर्मैवांचूनि सकळां । असिलें नव्हे. ॥ ३६ ॥

कुलं कृत्स्नम्

मग धर्म नव्हे तें करिती, । अवधारीं पां, श्रीपति । तेणें अवघियांचि कुळांप्रति । काये होईल ? ॥ ३७ ॥

अधर्मोऽभिभवत्युत

अधर्मुचि तो व्यापील, । धर्म शेष नुरवील, । अधर्मत्व आंगा येईल । तें येणेंचि अगें. ॥ ३८ ॥ सत्याचि ऐसें घडेल. । कुळातें धर्मुचि मूळ, । आतां धर्मे सुटलें कुळ । कैसें शोभे ? ॥ ३९ ॥ धर्माधर्मविचारणा । कृष्णातेंचि नये मना; । पाप पुण्य कळेना । ऐसें होईल. ॥ २६४० ॥ हिताहित, कार्याकार्य, । वध्य, मोक्ष्य, भयाभय, । पाप, पुण्य, अज्ञेय, । तें नियमुचि नाहीं. ॥ ४१ ॥ इंच्छा तें कर्म करावें, । इंच्छा तें सुखेंचि भोगावें, । जावें, यावें, ध्यावें, द्यावें । इंच्छा आपुलिया. ॥ ४२ ॥

अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः ।
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥

हे कृष्ण

अर्जुनु बोले, श्रीकृष्णा, । पुढती अवधारीं सर्वज्ञा, । आमुचया कळों मना । ऐसें येत असे. ॥ ४३ ॥

अधर्माभिभवात्

अधर्मु जाला असतां कुळीं । वेदाज्ञा, शास्त्राज्ञा गेली. । मग लोकलज्जा उरली । कर्मेंचि ते. ॥ ४४ ॥

प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः

लोकलज्जेचें गेलें आवरण, । तुटलें आचारबधन, । वरि स्त्रियांचें अधरपण । ऐसें असतां ॥ ४५ ॥ पर पुरुषीं कां न रमती ? । बधु तेहि अभिलाषिती; । मा गोत्रपुरुषां सोडिती । हें काये घडेल ? ॥ ४६ ॥ कवणा कवणें शंकावें, । कवणाचें भलें सांगावें । अवघियांतेंचि न संभवे । कर्मीं नियमु. ॥ ४७ ॥ इच्छा तेथें विचरावें, । इच्छा तें अन्न भक्षावें, । इच्छा ते कर्म करावें, । नाहीं आज्ञा. ॥ ४८ ॥ यापरी कुळस्त्रियांकारणें । लागलीं सत्यचि दूषणें । त्या वेश्याचि वर्णावर्णें । मुक्ता जालिया. ॥ ४९ ॥

हे वार्ष्णेय

वृष्णीकुळसमुत्पन्ना, । वासुदेवा, नंदानंदना, । अवधान देईं, कृष्णा, । पुढिले गोष्टी. ॥ २६५०. ॥

स्त्रीषु दुष्टासु

दुष्टां स्त्रियांचां ठाई । कैसें निर्धारें होये काई ? । तेंचि मी आइकयीं । सांगैन, कृष्णा. ॥ ५१ ॥

वर्णसंकरः जायते

वर्णसकर जया म्हणती । तो होये, गा गोपति, । तया वर्णसकराची गति । कैसी ते अवधारा. ॥ ५२ ॥ चहूं वर्णांचे होती । ते पुत्र येकेकुळीं मिळती, । इतुलेनिं ते याति । नाशोनि गेली. ॥ ५३ ॥ चार्‍ही वर्ण येकत्राटले, । चार्‍ही आश्रम मीनले, । स्वपरगोत्रींचे जाले । येकीतें पुत्र. ॥ ५४ ॥ मग तयांपासाव संतान । तयां कायिसे वर्णावर्ण ? । आश्रमधर्महीन । मलयतें करिती. ॥ ५५ ॥ तोचि वर्णसंकरु जाणावा । कुळीं कुळघ्नां अथवा । मग कुळाचिया नांवा । सांडूनि वर्ते. ॥ ५६ ॥

येक पितयाचे जाले, । येक बंधूचे उपजले, । स्वगोत्रें परगोत्रें जन्मले, । येकीपासाव. ॥ ५७ ॥ ते परस्परां काये होती ? । तंव आणिकां वर्णांचे किती. । बंधु बंधु म्हणविती। पुढें कैसें ? ॥ ५८॥ आपणाचिमाजी आपण । कन्याचें न करितां वरण । विचरती मग तेथून । संतान जें, ॥ ५९ ॥ तें आपुलियेचि परंपरे–। सारिखें सर्वत्र विचरे; । पशु जैसें नावरे । धर्माधर्म. ॥ २६६० ॥ ऐसें कुळ नाशैल. । सहस्र कुळें मिळतील. । मग तैसेंच चाळैल । चिरकाळवरि. ॥ ६१ ॥ पुडती याति खरी होये । ऐसें ब्रह्म-याही परि नोहे । यातिसंकरु जो म्हणों ये । तो तो, कृष्णा. ॥ ६२ ॥ ऐसें अर्जुनाचें बोलणें । परमार्थवंती कैसें जाणणें, । तें साहित्यप्रकारें येणें । बोलिजैल. ॥ ६३ ॥ अर्जुनु म्हणे, गा मुरारि, । गुरो, सर्वज्ञा, अवधारीं. । गुण हें कुळचि आम्हां जरि । अभिमानेंसीं, ॥ ६४ ॥ तरि केवळ क्षयो. । आणि अहंवृत्तीचा निलयो । स्फुर्ति नाहीं श्रयो । ऐसें जालें असतां,॥ ६५॥ जाणों तें कुळचि नाशलें । गुणसमूह क्षया गेले । ऐसें असतां प्रवर्तलें । पुढें कैसें?॥ ॥ ६६ ॥ अनादिसिद्ध गुणकर्म । तेचि नाशले स्वधर्म; । गुणप्रवृत्तीचें नाम । बुडोनि गेलें. ॥ ६७ ॥ अनादिसिद्धा होतिया । त्या गुणवृत्ति मावळलिया, । एवं गुणधर्म अस्तवलिया । पुढें कैसें ? ॥ ६८ ॥ वर्णधर्म ते उडाले, । आश्रमधर्म बुडाले, । योगधर्म नाशले । सनातन जे. ॥ ६९ ॥ भक्तिधर्मा नाहीं ठाव, । ज्ञानधर्माचा अभाव, । मोक्षधर्मउपाय । समस्तु भंगला. ॥ २६७० ॥ जेहीं धर्मीकरून । देव, मानव, ऋषिगण, । मार्गां तरले, मागुतेन । तरती पुढें; ॥ ७१ ॥ ब्रह्मा, रुद्र, श्रीहरि । हे वर्तती जये आचारीं । जे धर्म आधीं, उपरि । सृष्टि जाली; ॥ ७२ ॥ वेद, शास्त्रें, पुराणें, । जयां धर्माकारणें । ते अनादि धर्म येणें । योगें नाशळयावरि,॥ ७३ ॥ मग अवघाचि कुळीं अधर्मु । उपजोनि विस्तारैल परमु; । सर्वत्र निष्ठा, नियमु । तोचि नाशैल. ॥ ७४ ॥ कर्मेविण नसती गुण । मग कांहीं करिती वृत्तीलागून । तेथें मोक्षधर्मांचें उच्छेदन । तेंचि होईल. ॥ ७५ ॥ विहिताविहित जाणोनि सम । सारिखेंचि टाकिजे कर्म । तेथें कर्मेवीण धर्म । गुणांतें नसे. ॥ ७६ ॥ आतां भय तें कांहीं करणें । न करूनि नाहीं असणें । तंव विहिताचीं साधनें । दुःखरूपें सदा. ॥ ७७ ॥ मग दुःखरूप तेंचि न करवे, । सुखरूप विकर्म करवे; । यापरी मोक्षधर्म अघवे । तेचि नाशती. ॥ ७८ ॥ चहूं

चर्णी समानता । जाणोनि अवघे सांडितां । वर्णेचीण सर्वथा । न सरेसें जालें. ॥ ७९ ॥ तें दुःखरूपु ब्राह्मणु । तयांतें आश्रयी कवणु? । तेथें केवळु नीचि वर्णु । तोचि प्रतिष्टि. ॥ २६८० ॥ तैसा गुणधर्मु सांडितां । अकर्म कां विकर्म घडे न करितां । तेथें त्यागु तो मुक्तता । वरूनि जाये. ॥ ८१ ॥ न करितां अकर्मचि वाड, । करितां विकर्म तेंचि गोड, । विहिता धर्माची चाड । ते कासया मग? ॥ ८२ ॥ विहितु नव्हे जो धर्मु । तो विकर्माकर्मरूपु अधर्मु; । आतां तयाचा उपक्रमु । कुळीं जाला. ॥ ८३ ॥ अवधारीं, कृष्णा, वनमाळी, । अधर्मु जाला असतां कुळीं । केवळ स्वधर्माची होळी । करूनियां, ॥ ८४ ॥ कुलस्त्रिया ज्या गुणप्रकृति । त्या अवधियाचि दुष्टा होतीं । परपुरुषीं रमती । धर्मे सुटलिया. ॥ ८५ ॥ शांति स्वधर्मे सुटली, । तेचि अशांति जाली; । वादीं विवादीं झोंबिन्नली । परावया पुरुषा. ॥ ८६ ॥ निवृती स्वधर्मु सांडिला, । प्रवृत्तिवेधु तीतें लागला; । मग प्रवृत्तीतें गळां । धरावया झोंबे. ॥ ८७ ॥ विरक्ति नाशली अधर्में, । अविरक्ति जाली अन्य धर्में, । ते परावां पुरुषीं रमे । विषयालागीं. ॥ ८८ ॥ भक्ति अभक्ति धर्मावेगळी । ते दंभाची स्त्री जाली; । तयाहीपासाव व्यवली । रमे नाना पदार्थीं. ॥ ८९ ॥ सहिष्णुता सुटली धर्मे । असहिष्णुता जाली ते अधर्मे, । मग वाटे जातयांसींचि रमे । विषयो पोषी. ॥ २६९० ॥ कीर्तीतें आलें दूषण । तेचि अकीर्ति होऊन । परतली कुळ न विचारून । तेंचि भोगी. ॥ ९१ ॥ स्मृती अधर्मे मोहिलें । तिणें विस्मृती आंग दिधलें, । मग विस्मृती आंगें आपुलें । परावें भोगी. ॥ ९२ ॥ मेधा वेधली अधर्मे । दुर्मेधा जाली संभ्रमें; । मग ते सर्वां वर्णी रमे । दिवारात्रीं. ॥ ९३ ॥ धृती लागला अधर्मु । तिणें सांडिला स्वरामु, । तेथें परपुरुषाचा आगमु । होंचि लागला. ॥ ९४ ॥ दया अदया आतली । परावया झोंबों लागली; । विहितें धर्मे सुटलीं । कुळें कां जैं. ॥ ९५ ॥ निर्विकल्पते हालें अधर्मे । ते परावा पुरुषीं रमे; । सकल्पता संभ्रमें । जाली शांती. ॥ ९६ ॥ समाधी अधर्मु पाहिजे । तरि लयविक्षेपांतें भुंजे; । मग केवळ सुटली लाजे । विश्व भोगी. ॥ ९७ ॥ स्वरति धर्म सांडवेल । तेचि पररति होईल; । यापरी नाशतील । आम्हां-कडिला. ॥ ९८ ॥ आतां तयांची अशांति । स्वधर्मेचि आंवरिली होती । तो तुटतां, तीची गति । काये होईल? ॥ ९९ ॥ अनिवृत्तीचें लक्षण । पहिलेंचि खोटें चिन्ह; । ते धर्मनळेंकरून । आंवरली असता, ॥ २७०० ॥

धर्मु अधर्में हाल्ला । तीचां फांसा सुटला । आतां तिया नाही भोगिला । ऐसा कवणु ?॥ १ ॥ सरागता ते नागिणी । दाटूनि भवेव दावी.। धर्मु नाहीं, गांधीं देटावी । कवणें ?॥ २ ॥ अभक्ती स्वपुरुषु नावडे । अधर्में घेतलीं ते कडे; । आतां भोगावया पुरुष थोडे । सृष्टीवरी. ॥ ३ ॥ असहिष्णुतेचां ठाईं । मर्यादा पहिलेंचि नाहीं, । परि धर्में होती कांहीं । तोचि उडाला. ॥ ४ ॥ मग हे आर्या गुरूतें । झांवे बापाभावांतें; । भीड, भय जीतें । शंका नाहीं. ॥ ५ ॥ अकीर्ति पहिलेचि खोटी, । परि धर्में झांकिली दृष्टि; । आतां अधर्में पाठि । राखिली असतां ॥ ६ ॥ कवणा केवळ भुंजेना ? । येकली पुरे या जना; । यापरी कुलांगना । नाशतील. ॥ ७ ॥ निस्मृति आपपरावया । धरूनि वैसेल वरितया । अन्यथा स्मृति आंवरावया । जोगी नव्हे. ॥ ८ ॥ दुर्मेधा दाटावी कवणें ? ॥ अधृती मोकळीं वारा रानें. । राम्हाटीं घर कल्पने । विक्षिप्तेचें. ॥ ९ ॥ कामना न धाये पुरत्रयें, । रोषकळा भर्त्तारां खाये, । वासने नाहीं सोये, । ते रमे स्वपरजनीं. ॥ २७१० ॥ ऐसिया कुळस्त्रिया नाशतील, । परपुरुषीं रमतील, । तेथें स्वभाव उमटतील। तेचि पुत्र. ॥ ११ ॥ तयांचियाही प्रती । आपपरावें नेणती । धर्मुचि नाहीं, तें रीति । कवण तयांची ? ॥ १२ ॥ एवं नाशलिया कुळस्त्रिया, । अनधारीं, यादवराया, । गोकुळपति, वरि तया । केसें होईल ? ॥ १३ ॥ भर्तारनियमेवांचून । आता ते कुळ कवण ? । कवणें आपुलें म्हणौन । मानावें तें ? ॥ १४ ॥ चान्ही वर्ण येकवाटले । स्वपरगोत्रीं मीनले. । आश्रम तेही विचरले । येकीचां ठाईं. ॥ १५ ॥ जालया संताना यातिनिर्धार । नाहीं, ऐसा जो प्रकार । तोचि वर्णसंकरु, । क्षयो वर्णाचा. ॥ १६ ॥ भक्तु, ज्ञानी, ना तो कर्मी, । साधकु ना सिध्दु, असंयमी, । संसारीं, इंद्रियधर्मी, । मोकळा जो. ॥ १७ ॥ येणे पापेकरितां । मनुष्यदेहाची दुर्लभता । नाना योनी अनियता । पावे जीव. ॥ १८ ॥

सकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्यच ।
पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिंडोदकक्रियाः ॥ ४२ ॥

संकरो नरकायैव

ऐसा यातिसंकरु जो, कृष्णा, । तो नरकाचिकारणे, नारागणा, । नरकसाधन केवळ म्हणौ । यये ससारीं. ॥ १९ ॥

कुलघ्नानां कुलस्यच

कुळघ्नां आणि कुळांते। जोडलां कुळवधाचे निमत्ते। कुळन्तु, कुळ येणें पंथें। जाये नरकपुरा. ॥ २७२० ॥ पुढिला वंशा ऐसी गति। मागिळां पूर्वजां स्वर्गी स्थिति। ते येणें काये पावति याति। येकार्णवें? ॥ २१ ॥

पतन्ति पितरः ह्येषां

तरि स्वर्गवासी जे पितर। तेही पडती समग्र। नरकामाजी निरंतर। ययां कुळघ्नांचे. ॥ २२ ॥ होआवयां पितरां पतन। ते केसें कवण कारण। म्हणसील, तरि वचन। आइकें, कृष्णा. ॥ २३ ॥

लुप्तपिंडोदकक्रियाः

तरि स्वर्ग पावावें सुकृतें, । वसावें सुकृत जंव तंवचि तेथें, । मग सुकृतक्षयें मागुतें। पतन होये. ॥ २४ ॥ तयांचा वंशीं सुपुत्रु। कर्मी, ज्ञानी, भक्तु पवित्रु, । तापसी, धर्मिष्ट, उदारु, । महादाता. ॥ २५ ॥ ऐसा पुत्रु करि तर्पण, । श्राद्धक्रिया, पिंडदान। पितरोद्देशेंकरून। तें अमोघ होये. ॥ २६ ॥ तेणें सुकृतें च्यवन। नव्हे यां पितरांलागून। याळागीं पवित्र संतान। इच्छिती लोक. ॥ २७ ॥ आतां गोत्रघ्नांचां कुळीं। शुभक्रिया ते राहिली। यातिसकरें याति नाशिळी। ऐसें असतां. ॥ २८ ॥ लोपलें श्राद्ध, तर्पण। तयां पितरां पिंडदान, । पितरोद्देशें आचरण। कांहीं न घडेचि. ॥ २९ ॥ म्हणौनि ते पितर च्यवले। नरकसागरीं पडोनि राहिले, । सकरें ऐसें केलें। नाशिलें कुळ. ॥ २७३० ॥ ऐसें बोलिला पार्थु, । परमार्थे तयाचा अर्थु। सांगिजेल भावार्थु; । भजावा श्रोतां. ॥ ३१ ॥ जेहीं मारिलें कुळातें। आपण आपुलिया गुणातें। केवळ गुणमारें धर्मातें। अंतरलें कुळ. ॥ ३२ ॥ उरला गुणीं नाहीं विहीत। कर्म, भक्ती ना ज्ञानमत। योगु साधन स्वहित। जाळें गुणवंशीं. ॥ ३३ ॥ उरला जो अहिताचारु। आत्मयातिलोपकरु। तोचि यातिसंकरु। वर्ते कुळीं. ॥ ३४ ॥ तया कुळघ्नांचिया कुळा। यातिसकरु हो, गोपाळा, । नरकासि कारण जाला। ऐसें साचार. ॥ ३५ ॥ आत्मलोपकु अनाचारु। तोचि गुणीं यातिसंकरु। नरकाकारणें विस्तारु। पावला गुणघ्नां कुळीं. ॥ ३६ ॥ आतां अनाचारें गुणसंताना। आणि गुणघ्नांचिया, कृष्णा, । नरकु तो कवणु मना। आणावा कीं? ॥ ३७ ॥ तरि नरकाचें केवळ पुर। तें हें स्थूळ शरीर, । क्रिमि, कीट अपार। उदरीं जया. ॥ ३८ ॥

क्रिमि, कीट, मूत्र, मळ, । आम, श्लेष्मा, मेदु केवळ। ऐसें अवघें कुथिळ। येकवाटिलें. ॥ ३९ ॥ मासें मोट बांधली । वरि त्वचा तया वोली, । अतरीं साम्राजली । नोळावा रक्ताचा. ॥ २७४० ॥ अस्थि लावूनि केलें नीट । पत्रनें चेपलें स्पष्ट । वरि रोमा लावूनि प्रकट । शृंगारिलें, ॥ ४१ ॥ परि ते मळाची मादूस । धातुही मळ आवरण तयास । नवा द्वारीं परियस । वोसंडे मळीं. ॥ ४२ ॥ नरकमय, नरकपात्र । नरकचि भोगी इतर । ऐसेंचि स्त्रीचे शरीर । तेथें रमे. ॥ ४३ ॥ नरकें नरक भोगावें । ते सुख जेणें घ्यावें । तेणें नरकचि अघवें । सेविलें का नव्हे? ॥ ४४ ॥ नारकी नरकीं रमे । तो नरकद्वारें सक्रमे, । नरकस्थानीं सभ्रमे । वासु करी. ॥ ४५ ॥ ते दोहींचे वीर्यमळ, । तयाचें धरी स्थूळ, । तयाहीमाजी कुथिळ । मळमूत्रादिक. ॥ ४६ ॥ ऐसें नरकीं प्रवेशला, । नरकाचाचि आकारला, । नवा मासा उपजला । नरकपिंड. ॥ ४७ ॥ तें पैं नरकाचे गोठोंडें । नरकद्वारें घे मार्गे पुढें । पुत्र पुत्र येणें वाढें । ममतें की. ॥ ४८ ॥ ऐसें मळाचें तरग-अपार । जाले, भरलें शरीर, । यया नरकाचें निरतर । सुख काजया. ॥ ४९ ॥ तया नरकाचिया सरक्षणा । नरका परावया काटाळेना. । सेवा करी, दुर्जना । सेव्य मानूनि. ॥ २७५० ॥ तेही नरकमयचि लोक, । काढी तयाचेही नरक. । खाजनि अन्न, उदक । नरक करी. ॥ ५१ ॥ स्वपरनरकपाळणा । नरकपदा करी आचरणा, । मृगपशुदेहीं, श्रीकृष्णा, । नरकचि खाये. ॥ ५२ ॥ म्हणोनि नरकु हा ससारु । मातहीनु सागरु । येथें होऊनि जलचरु । वसु गोत्रमाचा ॥ ५३ ॥ विचरे जाण, नारायणा, । जो चुकला तत्वसाधना, । एव अनाचारें नरकुचिना । ससारु हा. ॥ ५४ ॥ गुणनाशकाची वशावलि । ससारनरकीं पडली, । आता पूर्वजा गति जाली । तेचि कैसी? ॥ ५५ ॥ स्वर्गस्थ पितर पडले । तेही ससारनरका आले, । आता ते करण कल्पिले । तयाचे पूर्वज. ॥ ५६ ॥ तरि कुळघ्न ते आम्ही जाण, । आमुचें जें प्रवृत्तिसतान, । सुबुद्धि, सुचित्तसुमन । ऐणें आकारें. ॥ ५७ ॥ यपातें अधर्मु अनाचारु । ससारीं घाली यातिसंकरु, । तेथें आपुला विचारु । तो पूर्वीचि गेला. ॥ ५८ ॥ तें जें आमुचें संतान । तें तयाचे आम्ही पितरगण । आणि शुद्धस्वभावलक्षण । आमुचे पितर. ॥ ५९ ॥ ते स्वर्गीहूनि च्यवति, । स्वरूपस्थ ससारा येती, । मागुतें निष्ठा नपवती । ऐसें होईल. ॥ २७६० ॥

यही साडिली साधनें । आम्हीं निष्ठा भोगिजे जेणें, । तीचि पिंडउदकें क्रियमाणें । लोपलीं वशी. ॥ ६१ ॥ देहद्वयीं नाहीं साधन । तें निष्ठेपासान सकळा च्यवन, । आम्हा आणि पूर्वजा पतन । तें हें ऐसें. ॥ ६२ ॥ आत्मधर्मु च्यवला, । तोचि अनात्मधर्मु जाला, । स्थूळीं येऊनि बेसला, । नरक भोगी. ॥ ६३ ॥ आत्मयोगा जालें च्यवन, । अनात्मयोगीं घेतलें स्थान, । देह नरकी देहाधीन । रूप तयाचें. ॥ ६४ ॥ शुद्धु मी जालो शबळु, । देहोचि आत्मा केवळु, । चोन्यायशी लक्षांचा मेळु । येकला भोगी ॥ ६५ ॥ स्वभानलयो स्वरूपस्थु । तो देहभाव जाला प्रकटितु । साधनाचा होता घातु । ऐसें जालें. ॥ ६६ ॥ अन्वयबोधु भेदा आला । तो ममत्वें नरकीं बाधला । आपपरा लागला । नरका झोंनों. ॥ ६७ ॥ स्वरति जाली देहरति, । विद्या च्यवली कुंती, । ते देहाबाहेरि आतौती । नरकी वसे. ॥ ६८ ॥ यापरी देहद्वयीं साधनेवीण । आम्ही च्यवलों सद्गुण, । आमुचें वृत्तिसतान । तेंही नाशलें. ॥ ६९ ॥ नाशोनि जातां गुण । नाशले मोक्षाचें साधन, । मोक्षसाधनेंवाचून । केसें जालें ? ॥ २७७० ॥ सद्वृत्तीतें जाले पतन, । तयाचें सद्गुण करण । स्वरूपनिष्ठ स्फुरण । भाव जयाचे ॥ ७१ ॥ ते अवघेचि आले देहावरि, । पडले भवनरकसागरी, । मोक्षपथु तो दूरि । चिरकाळ पडला. ॥ ७२ ॥

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।
उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥

**वर्णसंकरकारकैः**

आता वर्णसंकरातें करिते । विनाशक यातीतें, । वर्णावर्ण आच्छादिते । मनुष्यदेहीं ॥ ७३ ॥

**दोषैरेतैः**

दोष जे का असाधारण । काये होये येहींकरून ? । पुनरपि सांगेन । अर्जुनु म्हणे ॥ ७४ ॥

**कुलघ्नानाम्**

कुळघातकी जे नर । तयातें हे दोष समग्र । लागोनि, तदनतर । काये करिती ? ॥ ७५ ॥

**जातिधर्माः**

जाति म्हणिजे वर्णु, । शूद्र, वैश्यु, क्षेत्री, ब्राह्मणु, । ययांचा आचारधर्मु जो कवणु । तो यातिधर्मु जाणावा. ॥ ७६ ॥

**कुलधर्माश्च**

जाणोनि यातिधर्मु कारितां, । आपुलां आचारीं वर्ततां, । तेथें कुळधर्मु मागुता । तो येकु आहे. ॥ ७७ ॥ वडिलांपासान वडिलां । जो धर्मु काळों आला, । तो वृद्धाचारुविधु आपुला । कुलधर्मु जो. ॥ ७८ ॥

**शाश्वताः**

ऐसे यातिधर्म पुरातन, । आणि कुळधर्म सनातन । बहुतां काळांचे जाण वंशीं होते, ॥ ७९ ॥

**उत्साद्यन्ते**

ते उत्सादिजतील येहीं । दोषीं, कृष्णा, जाणयीं; । यालागीं वंशाचां ठाईं । चोखटें हे. ॥ २७८० ॥ दोषीं धर्म उत्सेदिले, । तयां दोषां जेहीं केलें, । तेहींचि धर्म आपुले । नाशिले कीं ना ! ॥ ८१ ॥ घरींचा माल्हविला दीपु । अंतरीं घालूनि महासर्पु, । तैं वाळकवधु, वंशलोपु, । तेणेंचि केला. ॥ ८२ ॥ आश्रमा लाविला अग्नि । प्रेत्नें अति प्रेत्न करूनि । तया घातकिया देखोनि । दूरि ठावें. ॥ ८३ ॥ माजलेपणें अन्ययातीं । परणीं, तेथें होये संतति, । तितुलेंही कुळ, श्रीपति, । येकें नाशिलें. ॥ ८४ ॥ जैसे येक गोत्रीं विवाहीं । पाप करूनि येके देहीं । वोसरले परि नाहीं । पापा खंडण. ॥ ८५ ॥ तेथें जालें जें कुळ । तें पतीत सर्व चांडाळ; । तिये परंपरे मूळ । तें पूर्व जैसें. ॥ ८६ ॥ संताना क्षयो नाथी, । आगळीचि वाढे संतति. । तें तें पाप तयाप्रति । जडोंचि लागे. ॥ ८७ ॥ संतान नित्य नवें नवें । आतां तेणें कैं पां सुटावें ! । परि तें पाप तैसें नव्हे । जें जाये सरोनि. ॥ ८८ ॥ तेसें येक कुळ मारिलें, । उरलें तें पतीत केलें, । याति-संकरीं घातलें । ऐसें असतां, ॥ ८९ ॥ जैसी ते चाले परंपरा । तैसें पाप निस्तारे, श्रीधरा, । तें गोत्रघ्ना शरीरा । जडोंचि लागे. ॥ २७९० ॥ अधिकाधिक राशी, । क्षयो नाहीं पापासि, । यापरी नाशूनि वंशासि । नाशती जे. ॥ ९१ ॥

तया कवण गति गोत्रम्नां । आणि पुढिला संताना,। तें मी सांगेन, कृष्णा,। चित्त देई. ॥ ९२ ॥

उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।
नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥

## हे जनार्दन

तूं जनार्दनु, जनव्यापकु,। जनमायानिवर्तकु,। जनभानप्रकाशकु । आदिपुरुषा. ॥ ९३ ॥ तुजप्रति काय सांगणें । शब्दांचीचि वास पाहणें,। परंतु घेतले मनें । तें निवेदीन. ॥ ९४ ॥

## उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणाम्

यातिधर्मु कीरु बुडाला,। कुलधर्मु जयांचा उत्सेदला,। वर्णसंकरु प्रवर्तला । कुळीं जयांचा, ॥ ९५ ॥ विधि निषेध पडले विसरीं, । जया जे इच्छा तो तें करी, । वर्णावर्णाचि पाइरी । गेली मोडोनियां. ॥ ९६ ॥ बहुभर्तृका सोवासिणी,। विधवा नसती नियमेंकरूनि,। भक्ष्याभक्ष्य काये म्हणौनि । जाणतीचिना. ॥ ९७ ॥ विटाळु कवणाचा मानावा, । अमुकाचि आचार करावा,। ऐसा चेपु चालवावा । हें उरलें नाहीं. ॥ ९८ ॥ जयांचां कुळीं ऐसें जालें, । सर्वेही आचारु बुडाले,। तयां मनुष्यां घडलें । पुढें काई? ॥ ९९ ॥

## नरके नियतं वासो भवति

तरि नियमें जाण, श्रीधरा,। नरकीं वासु तयां, सर्वेश्वरा,। खरा खरा खरा । भवसेनि होये. ॥ १८०० ॥ पूर्वजु जो कुळघातकी । तो आधीं वसों नरकीं पाहे मग स्वपितर की । पाठवी पहिलें. ॥ १ ॥ स्वर्गस्थें आपुली पितरें । तीं नरका पाठवूनि समग्रें,। मग देहपातानंतरें । आपणुही जाये. ॥ २ ॥ पितरसहितु नरकीं राहिला, । तेथे वंशु पाचारी आपुला । कुळीं धर्मु नाशिला । तो ययाचि हेतू. ॥ ३ ॥ तेणे कां पाचारावे । लागे? तें घडे स्वभावें. । यातिसंकरें काये नव्हे । येकलेनि? ॥ ४ ॥ म्हणौनि तये कुळीं उपजला । तो नरकाचिप्रति जाता जाला. । भला मागु लागला । संतानासि. ॥ ५ ॥ इष्ट, मित्रु, सेजारी,। तयांची देखी जो जो धरी, । तो तो तयांचिबरावरि । लागे वाटा. ॥ ६ ॥ मग येथिचा सेजारी तो तेथें; । यापरी इष्टां, मित्रां, सुहृदांतें, । नरका यावया आइतें । द्वार केलें. ॥ ७ ॥ काये पां नरका जा-

न्हारु। तोचि तेथें जन्मे नरु, । सोइरा होये, करी सेजारु, । देखीं अपेक्ष. ॥ ८ ॥ महापथीं आटनाट । नरका जावया प्रकट । केली आपुले इष्ट, । पापिष्टें पोपिलें. ॥ ९ ॥ म्हणोनि उत्सन्नकुळधर्मी । मनुष्यातें, मेघश्यामा, । नरकीं वासु हे आम्हा । केसेनि ठरे ? ॥ २८१० ॥

इति.

तरि ऐसें येणेंचि प्रकारें । धर्माधर्मनिर्णय शास्त्रें, । वडिलाचेनि मुखांतरें । हा काळुवरि ॥ ११ ॥

अनुष्टुभ.

आइकिलें असे आम्हीं । विचारु करिता धर्माधर्मी, । आणि सर्वज्ञा, देवा, तुम्हीं । कैसें नेणा ? ॥ १२ ॥ वेदीं, शास्त्रीं, पुराणीं, । ऐसीचि साधूची वाणी । हा काळुवरि श्रवणीं । आम्हीं आइकिली. ॥ १३ ॥ ऐसें अर्जुनाचें वचन । घेता परमार्थेंकरून । केसें दिसे विवरण । साहित्यमार्गें ? ॥ १४ ॥ गुणीं असता धर्मलोपु, । तोचि वर्णसंकरु पापरूपु, । स्वरूपघातीचा संकल्पु । सुटला जेणें. ॥ १५ ॥ गुणकारक शुद्ध गुण । तया स्वरूपस्था होये च्यवन, । यातिसंकरें, कृष्णा जाण, । ऐसें होईल. ॥ १६ ॥ पुनरपि येक आहे, । तें भविष्य सांगों काये ? । श्रीकृष्णा, तुझे पाये । विनोनि सांगें. ॥ १७ ॥ वर्णसंकरातें करिते, । गुणीं सन्मार्ग जो तया छेदिते, । ज्ञानयोगातें नाशिते । ऐसे दोष. ॥ १८ ॥ जेहीं दोषीं अकर्म । परिपुष्ट होय निकर्म, । ऐसे दोष परम । हिंसारूप ॥ १९ ॥ गुणत्रयां केवळ क्षयो । अभिमानादिकांचा ल्यो । केलिया अकर्मरूपु अव्ययो । महादोषु. ॥ २८२० ॥ सारसगु जेणें बरवा । तो समुदाव मारावा । व्यापारु उत्सेदावा । इंद्रियाचा. ॥ २१ ॥ ऐसाही येकु दोषु । रजाचा होतां हरासु । जडत्वाचा दोष विशेषु । आंगीं जडे. ॥ २२ ॥ अभिमानु मारिला स्वजनु । तो दोषु असाधारणु. । आता प्रवृत्तिनाश तो आनु । तेणेंचिकरितां. ॥ २३ ॥ कर्म, भक्ति आणि ज्ञान, । धर्म बुडाले प्रवृत्तीवीण । ऐसे दोष दारुण । मीनले असता ॥ २४ ॥ येहीं काये कीजैल । तेंचि, देवा, सांगिजैल । वर्णसंकरा जें मूळ । स्वरूपलोपा. ॥ २५ ॥ हे कुळघातकी पा लागतील, । मग याति, धर्म, कुळ, । धर्म सकळ अनादिसिद्ध समूळ । जे कुळीं वर्तते, ॥ २६ ॥ तयाचा करितील उत्सेदु । वसु अनधारी धर्मांधु, । करितील विहितवधु । करूनिया हे. ॥ २७ ॥ आता यातिधर्म ते कवण ? । कुळधर्म कैसे सनातन ? । ययाचें सर्व लक्षण ।

सांगिजैल. ॥ २८ ॥ यातिधर्मु तो स्वरूपधर्मु । ऐसा जाणावा नियमु. । आतां तत्साधन गुणधर्मु, । कुळधर्मु तो तो. ॥ २९ ॥ यातिधर्माचें लक्षण। संक्षेपेंचि तें सांगेन;। चित्त करूनि सावधान। आइकावें श्रोतां. ॥ २८३० ॥ निर्विकल्पता, निर्विकारता, । नित्य निष्कर्मरूपता, । व्योमाचेनि तत्वता । स्वभावें असणें. ॥ ३१ ॥ अभावाहूनि पातळपण । आंगाचें करावें गगन । ऐसें येक लक्षण। स्वरूप धर्माचें. ॥ ३२॥ सर्वत्र सर्वदा असंगपण। कासया नलगे, जैसें गगन; । तैसें देहअवस्थागुणमान। यया नलगणें. ॥ ३३ ॥ असंगपणाचेनि अंगें । आपण आपणपणा नलगे, । ऐसा यातिधर्मु प्रसंगें । दुजा जाणावा. ॥ ३४ ॥ मळातें न धरी जीवन। पावकु आणि जैसें गगन,। तैसें आपुलें सोज्वळपण । मैळीं नेदावें. ॥ ३५ ॥ दर्पणाहूनि सोज्वळता। कां झळफळीतु बाळसविता। तोचि अस्तमाना जातां। जैसा निर्मळ. ॥ ३६ ॥ शुद्धा स्फटिकाचें अंतर । असे तंव अछिद्र । परि निर्मळपणें सांतर । पोकळ दिसे. ॥ ३७॥ स्वभावेंचि स्वरूप निर्मळ । आणि गगनाहूनि पूर्ण विशाळ। तैसेंचि निर्मळ निश्चळ । नित्य असणें. ॥ ३८ ॥ हा येकु यातिधर्मु । आतां ययाहूनि परमु। तोचि कैसा अति उत्तमु । सांगिजैल. ॥ ३९ ॥ मंडळा, दीपा, रत्नातें । सर्वांगीं ज्योति जैसी वर्ते। तैसेंचि चिद्रूपभान निरुतें। स्थिती असणें. ॥ २८४० ॥ जेसणी जैसी संपूर्णता। तेसणी तैसी चिन्मयता, । चेतनापूर्णत्वें पूर्णता । तो येक धर्मु. ॥ ४१ ॥ जागृतीचेनि संहारें । निद्रा जे व्हेळीं सचरे। तैं सर्वांग सुखें भरें । प्रेत्नेवीण. ॥ ४२ ॥ मौळिया पावे सन्न। तैं धरिता न धरे दाटून । देह पडे, कारणगण। विरोनि जाती. ॥ ४३ ॥ तैं जें सुख सर्वांगीं । संचरे तयालागीं, । तैसें प्रेत्नेवीण स्वसंयोगीं । आहे सुख. ॥ ४४ ॥ रतीचें मान वोहोटे । बिंदु तोही सुटे । मग उगाचि असतां वाटे । जैसें सुख. ॥ ४५ ॥ तैसें सहज निर्विकारपणें । विरालेन मनें, अभिमानें, । सर्वत्र सुखमय पूर्णपणें । असिजे स्थिति. ॥ ४६ ॥ ऐशी जे सुखावस्था। ते असावे न सोडितां,। आत्मधर्मु तत्वता। हाही एक. ॥ ४७॥ आतां देहद्वयत्वें नुरणें,। मीपणें विरोनि असणें,। नाम रूप स्फुरणें । हारपावें स्वरूपीं. ॥ ४८ ॥ सागरीं विरे लवण । तें सांडी आंगाचें कठिणपण; मग पाणियामाजी हारपोन । पाणी होये. ॥ ४९ ॥ तैसें स्वशक्ति सांडणें, । विरोनि मीपणें जाणें,। आपणामाजी हारपणें । हा येकु धर्मु. ॥ २८५० ॥

नित्य, निर्मळ पूर्णपण । माजी गगना नाहीं स्थान,। आत्मत्वेंचि सद्रूपभान । स्वरूप जें. ॥ ५१ ॥ द्वैतबुद्धी पाहतां । व्योमाआड जयाची सत्ता । त्रिपुटीतें तत्वता । विपयो नव्हे. ॥ ५२ ॥ ज्ञेय सर्व अभावे, । ज्ञाता, ज्ञान अस्तवे,। ज्ञातेपण माळवे । ठाइंचे ठाईं. ॥ ५३ ॥ दृश्य हारपण भान, । द्रष्टा, देखणें लीन; । तें विरालिया द्रष्टेपण । आंगेंआंग जें. ॥ ५४ ॥ आंगेंचि अभावा खाये, । आंगेंआंग स्वयचि आहे, । आपण भजिजे तें नोहे । परि आपण खरें. ॥ ५५ ॥ ऐसी जे आत्मभावना । तो यातिधर्मु येकु माना । आतां निष्ठारूपु आपणा । तो धर्मु शेवटील; ॥ ५६ ॥ तेथे सकळां धर्मां सांवरून । असावें निष्ठा करून । तयांचें सक्षेपें लक्षण । सांगिजैल. ॥ ५७ ॥ आत्मसद्भावें असणें । आंगाचेनि निबिडपणें, । परंतु गगनाचीं विरळपणें त्याहूनि विरळ. ॥ ५८ ॥ येतां सपूर्ण आत्मसत्ता । तेवढी चिन्मयचि। तत्वता, । पूर्ण आनंदमयता । तिणेंसीं सहित. ॥ ५९ ॥ विरणेंचि पूर्णत्वें उरणें, । उरणें ते विरालेपणें, । ऐसें उरणे, विरस्फुरणें । येकुदांचि असावें. ॥ २८६० ॥ असिजे तेंचि निर्मळपण। तेंचि असगतेचें लक्षण. । निर्विकल्प निर्विकारपण। गगना ऐसे. ॥ ६१ ॥ अवचियां स्वधर्माचे होणें, । ते येकदाचि स्थिति जाणणें, । अनुभवी तो येणें । वचनें सतोपैल. ॥ ६२ ॥ स्वधर्म जाले उत्पन्न। मग पाठीं स्थितीचें भान । ऐसें इतुले व्यवधान । तेथ कैंचें ? ॥ ६३ ॥ जें त्यां स्वधर्माचे होणें । तेचि स्थिति, तेचि असणे,। तेचि दशा अनुभवणें । अखडत्ता तेचि. ॥ ६४ ॥ ऐसियाचें जें नित्यपण । ते निष्ठा जाणती सज्ञान, । यातिधर्माचें लक्षण। इतुलें सांगितलें. ॥ ६५ ॥ आतां यये अर्थी साधन । जयातें आचरती गुण। तया कुळधर्माचे लक्षण । ऐसे जाणावे. ॥ ६६ ॥ विहिता कर्माचें अनुष्ठान । पाहिजे सत्वशुद्धीलागून, । यालागीं आचरण । तें येक कुळधर्माचें. ॥ ६७ ॥ सत्वशुद्धी क्षेत्र शोधलें । परि ज्ञानबीज पाहिजे पेरिलें, । तरि ते अर्थी पाउलें । देखावी सद्गुरूचीं. ॥ ६८ ॥ तरि गुरुप्राप्तीलागून । करावें ईश्वराराधन, । मग तयाचें प्रसन्नपण । जाले असतां ॥ ६९ ॥ ईश्वरु, कृपासागरु, । तोचि आदिगुरु होये गुरु; । निजभक्ता साक्षात्कारु । आपुला दावी. ॥ २८७० ॥ म्हणोनि ईश्वराराधन । तो येकु कुळधर्म जाणोन, । साधक भजती, ते सर्वज्ञ। होती तत्प्रसादें. ॥ ७१ ॥ भेटलयावरि सद्गुरु । तयाचा जो भजनप्रकारु, ।

तो कुलधर्मु थोर । साधकांतें. ॥ ७२ ॥ भक्तियोगें आराधिला । सद्गुरु प्रसन्नु जाला, । तेणें उपदेशु केला । आत्मविवेचा. ॥ ७३ ॥ तीचा ठाईं प्रेम गहन । करावी तीची जतन, । ययें अर्थीं साधन । उपाय जे जे ॥ ७४ ॥ ते कुलधर्मचि अघवे । जाणतीं साच मानावे, । तयांचे भाव कळावे । ऐसें जारि ॥ ७५ ॥ तरि सद्गुरुनाथें निरोपिलें । ज्ञेयतत्व जें प्रकाशिलें, । आपण आपणा दाविलें । निर्वाळूनि, ॥ ७६ ॥ तद्विरुद्ध जे पदार्थ । आणि तद्विरुद्ध ज्ञान समस्त, । तद्विरुद्ध निश्चित । कर्म जें जें ॥ ७७ ॥ ययां तिहींचा त्यागु करणें । तो कुलधर्मु येकु मानणें; । आतां त्रिविधें त्यागें तेणें । धर्मु दुसरा. ॥ ७८ ॥ तदनुकूळ जे पदार्थ । तदनुकूळ ज्ञान निश्चित, । तदनुकूळ समस्त । कर्तव्य कर्म, ॥ ७९ ॥ तिहींचा अपरित्यागु । प्रेत्नें करावा योगु, । कुलधर्मु सांगु । ऐसा दुसरा. ॥ २८८० ॥ त्याग योग सांगितले । भावभेदें वेगळाले. । आतां प्रांजळ जेणें कळे । तेंचि बोलैन ॥ ८१ ॥ शब्दादि विपय जाण । आणि स्थूळ तयांचें अधिष्ठान; । एवं आत्मइतर भान । बाह्यांतरीं जें ॥ ८२ ॥ तें प्रतिकूळ ज्ञेय सांडावें । अनुक्रमेंचि निरसावें, । आतां हें भान जेणें जाणवे, । ते इंद्रियज्ञान, ॥ ८३ ॥ आत्मइतरज्ञान इंद्रियांचें । आत्मइतरज्ञान मनाचें, । आत्मइतरज्ञान बुद्धीचें । सांडावें तेंही. ॥ ८४ ॥ आत्मइतरअर्थसाधन । बाहेरि अंतरीं क्रियास्फुरण, । तें तद्विरुद्ध मानून । सर्व सांडावें ॥ ८५ ॥ आतां शब्दादि पांचही विपय । आणि स्थूळ देह हें स्वकीय, । अतरीं अवळंबन ध्येय । भान जें जें ॥ ८६ ॥ तें आत्मइतरही केवळ । परंतु घेइंजे तदनुकूळ, । योगाभ्यासातें बळ । जेणें होये. ॥ ८७ ॥ बाह्यांतरीं ज्ञेयभान । ययाचें केलें अवलंबन, । तया अनुकूळाचें ज्ञान । तें प्रतिकूळ नव्हे. ॥ ८८ ॥ अनुकूळ ज्ञेय जें जें । तें जेणें ज्ञानें गामिजे, । तें ज्ञान न सांडिजे । साधनरूप. ॥ ८९ ॥ बाह्यांतरीं क्रियावृत्ति । प्रवर्तली जे ते अर्थी, । ते अनुकूल संती । नये सांडू. ॥ २८९० ॥ प्रतिकूल शब्द व्यवहारिक । ते सांडूनियां सकळैक, । अध्यात्मश्रवण आवश्यक । आदरें करावें. ॥ ९१ ॥ अनुकूळ तारि ध्यावी । प्रतिकूळ स्त्री सांडावी. । चहूं आश्रमीं विचारावी । टाकि आपुली. ॥ ९२ ॥ वस्त्र तें जें देहरक्षण । शीतवातलज्जावारण, । येर प्रतिकूळ मानून । सर्व सांडणें. ॥ ९३ ॥ शीतोष्ण, मृदु, कठीण । येथें प्रतिकूळाप्रतिकूळ पाहोन । त्यागात्यागीं

प्रवर्तन । सुखें करावें. ॥ ९४ ॥ जें घेतां योगु नाशे । तें नेघावें आयासें, । नेघतां जें योगु भ्रंशे । तें घ्यावें सुखेंचि. ॥ ९५ ॥ याप शब्द स्पर्श दोनी । योगीं दृष्टि घालूनि । अनुकूळ प्रतिकूळ पाहोनि । घ्यावे सांडावे. ॥ ९६ ॥ बाह्यरूपाचें अवलंबन । प्रतिकूळ तें सांडून,। साधू, गुरु, देव, दर्शन । तयांचें घ्यावें. ॥ ९७ ॥ पड्रसा अन्नाची परवडी, । सांडावी जिव्हेची आवडि; । तेथें देहरक्षणमात्र पुडी । तेचि करावी. ॥ ९८ ॥ लघु अन्न, लघु आहारु । काळनियमु तोचि साचारु, । योगातें साहे प्रकारु । तोचि योजावा. ॥ ९९ ॥ प्रहरा येका अन्न । पावे आपुलें स्वस्थान, । दुसरेन पाहोरे पचन । होतें होये. ॥ २९०० ॥ तिसरेन तृषा निवारती । धातुसत्वें निवडती, । चौथेन विभागती । मळ, मूत्र दोन्ही. ॥ १ ॥ पांचवेन मूत्र झडे, । मळ होती कोरडे, । सावेन मळभागु पडे । स्थाना येऊनि. ॥ २ ॥ वातें मळ ऊर्ध्व जाले । ते सातवेन प्रहरें पडले । वायोनें अधोमुख केलें । ऐसें असतां. ॥ ३ ॥ आठवेन शेप मळ झडती, । क्षुधेची होये उत्पत्ति, । म्हणोनि काळ चुकों नेदिती । योगी अन्नाचा. ॥ ४ ॥ अन्नाचिपाडें उदक केवळ, । निरामय अन्न तें निर्मळ. । आतां योगियां परिमळ । ग्राह्याग्राह्य. ॥ ५ ॥ जया दुर्गंधाकरितां । अथवा सुगंधु हो तत्वतां । योगु भंगे, तो सर्वथा । गंधु नेघावा. ॥ ६ ॥ जेणें गंधेवीण । योगीं न राहे आसन । तोचि गंधु दाटून । प्रेत्ने साधावा. ॥७॥ जेणें परिग्रहें परिवारें । योगाचा योगु मरे । तो परिग्रहो चतुरें । तेव्हांचि सांडावा. ॥ ८ ॥ जेणें परिग्रहेवीण । योगावरि न ये मन, । तया परिग्रहाची जतन । करावीचि कीं. ॥ ९ ॥ देह स्थूळ हें उपेक्षावें, । उपेक्षूनि योगार्थ ठेवावें, । जाणों पहिलें नव्हे, नवें । ऐसें करूनि. ॥ २९१० ॥ देहभाव, देहासक्ति, । देहचेष्टा, ज्ञानवृत्ति, । साधक बाधक चित्तीं । पाहोनियां ॥ ११ ॥ घेणें, सांडणें देहभावां, । जाणें, येणें, यादवा, । अवस्थाबोधु विचारावा । वर्तावें तैसें. ॥ १२ ॥ आली निद्रा हारावी, । नाहीं निद्रा न प्रार्थावी, । पावली तेचि मानावी । क्षुधा, तृषा. ॥ १३ ॥ टाकें तेचि आसन, । टाके तेंचि व्यवधान, । हें आपुलें साधन । आपणचि जाणावें. ॥ १४ ॥ बाह्यविपर्यांचेनि अध्यासें । अंतरीं भान मना भासे, । तें तद्विरुद्ध ऐसें । जाणोनियां ॥ १५ ॥ आत्मइतर सांडावें । आत्मविक्षेपक अघवें, । तयामाजी घ्यावें । अनुकूळ जें. ॥ १६ ॥ मनोजयालागून ।

जें ध्येय कीजे अवलंबन, । देवाचें रूप सगुण । आदिकरूनि. ॥ १७ ॥ अवलबनाचि परी । तें घेइंजे योगावारीं, । जेणें मन अंतरीं । स्थिर राहे. ॥ १८ ॥ आत्मइतर ज्ञेयभान । दृश्याचें जें अवलंबन । तयाचा त्यागु आदान । प्रकारें येणें. ॥ १९ ॥ आतां बाह्यांतरीं स्फुरे ज्ञान । तेथे त्याज्यात्याज्य कवण ? । तया ज्ञानाचें लक्षण । सांगिजैल. ॥ २९२० ॥ सद्गुरुनाथें उपपादिले, । ज्ञेयस्वरूप प्रगट केलें, । तन्निष्ठ ज्ञान ते भलें । निर्मळ ज्ञान. ॥ २१ ॥ तदर्थे साधनभूत । बाह्यज्ञान जें समस्त, । तें न संडावें निश्चित । भर्वसेन. ॥ २२ ॥ प्रत्यक्षबोधु दृष्टातें, । अनुमानें जाणिजे ज्ञेय तें । विचारावी समस्तें । उपमानें तीं. ॥ २३ ॥ अध्यात्मकथाश्रवण । ना कर्म उपासना पक्षीं ज्ञान । तेंही अवघें साधन । म्हणोनि न सांडावें. ॥ २४ ॥ श्रवण, मनन, निदिध्यासु । येथें उपेगी ज्ञान विशेषु, । आत्मा अजु अविनाशु । कळे जेणें. ॥ २५ ॥ मनबुद्धिकरणद्वारा । ज्ञानप्रकाशु आंतु बाहिरा । उपयोगी आत्मसाक्षात्कारा । न संडावा तो. ॥ २६ ॥ आत्मविक्षेपक जें ज्ञान, । आत्मलोपाचे कारण, । आत्मज्ञानें उत्पन्न, । तें ज्ञान सांडावें. ॥ २७ ॥ नाना विद्या, नाना कळा, । उदरार्थेचि ज्या सकळा, । अभिमाना, दंभा प्रबळा, । सदा प्रसवती. ॥ २८ ॥ तें सांडावें सकळ ज्ञान । मना बुद्धी इंद्रियांपासून, । जया ज्ञानाचें विस्मरण । सानुकूळ योगा. ॥ २९ ॥ विषयज्ञानही परी । आत्मज्ञाना पुष्टि करी, । तें अनुकूळ सर्वोपरी । घेइंजे ज्ञान. ॥ २९३० ॥ ब्रह्मज्ञानाचिया गोष्टी । त्या विषयवासनेतें पुष्टि । कर्रितीं उदरासाठीं, । तें ज्ञान सांडावें. ॥ ३१ ॥ अधिष्ठानज्ञानाची जतन । आपण विचारावी अवजतन. । येथें काये सांगावें दुर्जेन । यये अर्थी ? ॥ ३२ ॥ करणद्वारा तेंचि कीजे । आत्मयोगा उपयोगी जें; । येर सर्व सांडिजे । विषयसाधन. ॥ ३३ ॥ कर्मयोगु, भक्तियोगु, । येकांत सेवन अभ्यासयोगु, । जयो अंतरंगु, बहिरंगु । नित्य करावा. ॥ ३४ ॥ क्षुधा, तृषा, आसन, निद्रा, । प्राणपिंडु, दृष्टीची मुद्रा, । जयो करावा यां समग्रां । मदु मंदु. ॥ ३५ ॥ यया वेगळें व्यापारादिक । निषिद्ध अथवा कामिक, । अकर्मही परि आणिक । करूं नये. ॥ ३६ ॥ मनें मन तें जिंकावें । ध्यान, मनन नित्य करावे, । येर संकल्प सांडावे । सार्वकाळ. ॥ ३७ ॥ बाह्य निश्चळता, करणदमु । अंतर्निश्चळता मनें तो शमु, ।

ऐसा हा योगागमु । जेणें कर्में ॥ ३८ ॥ साधे, तेंचि करावें; । बुडे जेणें तें न करावें, । हे आपुलें आपणा जाणवें; । परि नेणवे इतरा. ॥ ३९ ॥ व्यतिरेकें निवडणें गुणीं । अन्वयें ते गुण ग्रासूनि । स्वस्थ असणें, करणी । हेचि बुद्धीची. ॥ २९४० ॥ सारासारविचारें । ऐसी क्रियाबुद्धि स्फुरे । तेचि करावी चतुरें । निष्ठेलागीं. ॥ ४१ ॥ यया वेगळी विचारणा । ते ग्राह्य नव्हे आपणा, । साडावी वासना । तिये जाणिवेची. ॥ ४२ ॥ पदार्थु कर्म आणि ज्ञान । अनुकूळ प्रतिकूळ जाणोन । घेणें, साडणें आपण । आपुलें करावें. ॥ ४३ ॥ ऐसे कुळधर्म सागितले । ते सक्षेपेंचिमात्र इतुले । ययाचा अतु न कळे । ऐसे असती. ॥ ४४ ॥ ऐसे यतिधर्म समूळ । आणि कुळधर्म हे सकळ, । गुणांचि ययाचें स्थळ । परि गुणातीत नव्हे. ॥ ४५ ॥ गुणातीता शुद्धातें । दोहीं धर्मी सगु न वर्ते, । हें अनादिसिद्ध गुणातें । शाश्वत कार्य. ॥ ४६ ॥ गुणीं धर्म हे सनातन । बहुत काळ वर्तमान, । जेंहींकरूनि सतान । पवित्र गुणाचें ॥ ४७ ॥ आता तेंहीं दोघीं, कृष्णा, । लागोनि तया कुळघ्ना गुणां, । यया धर्मा सनातना । नाशिजेल. ॥ ४८ ॥ योगधर्माचेनि ह्रासें । स्वरूपधर्मुही न प्रकाशे, । मग देहात्मभावउल्हासें । वर्तती गुण. ॥ ४९ ॥ दोघीं धर्म लोपले, । मा इतुलेनि काये जालें ? । ऐसें जनार्दनें गोपाळें । म्हणिजैल जरी ॥ २९५० ॥ तरि अवधारीं गा श्रीरमणा, । वासुदेवा, जनार्दना, । ययें अर्थीं सभावना । कैसी भासे ? ॥ ५१ ॥ जया गुणाचा ठाईं । यया मनुष्यांचा देहीं । स्वरूपधर्मु, योगधर्मु नाहीं । अणुमात्रुही. ॥ ५२ ॥ कर्म, भक्ति, ना योगनिष्ठा, । विवेकुचि वैरी उपराटा । मार्गु साडूनि अव्हाटा । घाली मनातें. ॥ ५३ ॥ करी तें दुष्कृत क्रियमाण, । भक्षी ते भळयतें अन्न, । वर्णा आश्रमाची जतन । साडिली जेहीं. ॥ ५४ ॥ मोकाट वनचरापरी । मनुष्य जे कामचारी, । जयाचा गुणव्यापारीं । साडिली सोये, ॥ ५५ ॥ तया नरकीं वासु निरतरु, । नरकु तोचि जो ससारु; । तयां मोक्षाचा पदरु । सापडेचिना. ॥ ५६ ॥ नाना योनि भ्रमती, । मनुष्य देहाची नव्हे प्राप्ति, । मा स्वर्गु, मोक्षु, हे उक्ति । काय बोलावी ? ॥ ५७ ॥ योगमुक्तु जो नरु । तयातें नित्य ससारु, । ऐसा आम्हीं विचारु । बहुसाल आइकिला. ॥ ५८ ॥ साधुकारी होये साधू; । पापकारी पापी बद्धु, । ऐसें बोले यजुर्वेदु । बृहदारण्यीं. ॥ ५९ ॥ अयोगयुक्तु जो नरु । तया नरक-

युक्तु संसारु । नाही, ऐसा आधारु । कवणा शास्त्राचा ? ॥ २९६० ॥ यालागीं, श्रुति, स्मृति, पुराणे, । आर्य आचार्यवचनें, । महर्षीचें बोलणें, । हेंचि आइकिलें. ॥ ६१ ॥ ते सर्वथा नव्हे अप्रमाण, । तरि उत्सन्नयोगधर्म जे गुण । नरकु संसारु तयालागून । नियमत्नाचि असे. ॥ ६२ ॥

अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।
यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥

अहो

इतुलें बोलोनि अर्जुनु । आपण पया जाला सावधानु; । तो अहो येणें आश्चर्यैकरूनु । काये बोले ? ॥ ६३ ॥

बत

कटकटा मातें काये जालें ? । धिग्य धिग्य माझें ज्यालें ! । अति कष्टी होऊनि बोले । दीर्घे श्वासें. ॥ ६४ ॥ दातीं चावूनि तर्जनी, । नयनातें आणूनि पाणी, । पदरु लावूनि वदनी । हातु ठेवी. ॥ ६५ ॥

महत्पापम्

गुरुहत्या, गोत्रहत्या, । पुत्रहत्या, पौत्रहत्या, । इष्टहत्या, मित्रहत्या, । हत्या सुहृदाची, ॥ ६६ ॥ ब्रह्महत्या, वीरहत्या, । येणेंचि योगें मातृहत्या, । पितृहत्या, स्त्रीहत्या । आत्महत्याही घडती. ॥ ६७ ॥ ऐसें पाप असाधारण । गणावया शके कवण, । ब्रम्हांडीं नाहीं स्थान । जें ठेवावया. ॥ ६८ ॥ दुस्तरा, दुर्धरा, दुर्गमातें । दुष्टा, दुर्निमित्या, दुःखदातें । असाधारणा पापातें । ये काळीं ॥ ६९ ॥

कर्तुं व्यवसिता वयम्

आम्हीं प्रवर्तलों करावया. । अनर्थु अनर्थु म्हणोनिया, । विस्मयो करी आपुलिया । मनामाझारी. ॥ २९७० ॥ गिळिता विष परतलें, । तैसें लागस आंगा चुकलें । तें पाप येणें काळें । कैसें करण ? ॥ ७१ ॥

यत्स्वजनं हन्तुमुद्यताः

तरि स्वजन जे आपुले । यया संग्रामाप्रति आले, । ते मारावया जे केले । आम्हीं प्रेत्न, ॥ ७२ ॥ तेंचि पाप भयकर, । आमुचें कर्म थोर; । ऐसें घडावया साचार । हेतु कवण ? ॥ ७३ ॥

राज्यसुखलोभेन
तरि लोभें राज्यसुखाचेनि । आठवलें हे आम्हांलागूनि; । देवदेवा, चक्रपाणी, । कैसें घडलें । ॥ ७४ ॥ पोटाचिया काकुळती । पोटींचीं बाळें खाती । तेचि दशा आम्हांप्रति । पावली कीं. ॥ ७५ ॥ सर्प, व्याघ्र, कीं मार्जार; । आम्ही तव न हों नर, । येसणें दुरित अपार । करूं प्रवर्तलों. ॥ ७६ ॥ जळो हें राज्य । जळो सुख ! । जळो तो लोभु ! जळो मुख ! । सर्व मिथ्या क्षणिक । स्वप्नापरी. ॥ ७७ ॥ ययासाठीं येसणें । दुरित कासया करणें । आतां दृढ विचारु मनें । करूं येकु. ॥ ७८ ॥

यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।
धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥

अप्रतीकारम्
सांडूनि युद्धाचे प्रेत्न, । आंवरूनि करचरण, । लावूनि दोन्ही नयन । उगाची बैसेन मी. ॥ ७९ ॥

अशस्त्रम्
हातींचीं सांडीन हातियेरें, । धनुष्य नुचलीं मी करें, । बाण मोडूनि माघारे । सांडीन आतां. ॥ २९८० ॥

माम्
मग अशस्त्रिया प्रेत्नरहिता, । नयन लावूनि ध्यानस्था, । निश्चळा मातें तत्वता । देखोनियां हे, ॥ ८१ ॥

शस्त्रपाणयः धार्तराष्ट्राः
हातीं घेऊनि हातियेर । राया धृतराष्ट्राचे कुमर । पावले सांते समोर । हांकु देऊनि ॥ ८२ ॥

यदि रणे हन्युः
मजवरि घालिती घाये, । जैं ये रणीं मी मारिला जायें । तैं तेणेंकरूनि काये । मातें होईल ? ॥ ८३ ॥

तन्मे क्षेमतरं भवेत्
यये रणी मी मेला, । देह सांडूनियां गेला, । तरि तेणें क्षेमचि मजला । मा पुढें आहे. ॥ ८४ ॥ येकुदा न चुके मरावें । मृत्तिके शरीर द्यावें, । मा वडिला न समर्पावें । हे काये म्हणिजे ? ॥ ८५ ॥ जीतां विष्ठा, मेलिया कीट । भक्षिती वायस पापिष्ट, । श्वानां, जबुकां इष्ट । मांस करावें. ॥ ८६ ॥

तें माझेनि येके वधें। माझें गोत्र सुखें नांदे,। ऐसें झालें तें येणें संबंधें। उपकारु, केसणा? ॥ ८७॥ अवलोकितां गुरुचरण। याचेन हातें मरण,। तरि आतां स्वर्गभुवन। सर्व माझें. ॥ ८८ ॥ देह समर्पीन वडिलांतें। इतुलेन भजन खरें निरुतें। मरतां तयांचेन हातें। द्विगुणा जालें. ॥ ८९ ॥ नाशवंत शरीर वेंचीन,। अविनाश स्वर्ग पावैन,। येणें लोभु तरि मरण। तेंचि पाहिजे! ॥ २९९० ॥ याचेन हातें मी मेला,। तरि माझा अपवादु चुकला;। अर्जुनु म्हणती भला। लोकत्रयीं. ॥ ९१ ॥ इहलोकीं कीर्ति विस्तारून,। परलोकु रोकडा पावैन,। तरि यये रणीं मरण। तेंचि साधावें. ॥ ९२॥ इहपरलोकविरोधी। मेलिया मी नव्हें कधीं,। तरि मरणालागीं बुद्धि। विचारावी. ॥ ९३ ॥ घालूनि बैसावें सिद्धासन,। लावावे दोन्ही नयन,। हातींचे धनुष्यबाण। दूरि टाकावे. ॥ ९४ ॥ अंतरीं ध्यान ईश्वराचें,। सखया सारथिया कृष्णाचें,। बाहेरि देह कौरवांचें। करूनि सोडावें. ॥ ९५ ॥ मरतां न यावें काकुळती। आल्हादु असावा चित्तीं,। मरणापुढें उत्तम गति। तेचि लक्षावी. ॥ ९६ ॥ पाप होतां चुकलें। येणेंचि आनंदें चित्त भरलें। असतां, शिरकमळ उडालें। ऐसें होआवें. ॥ ९७ ॥ ऐसें विचारूनि मानसीं। आदरिली क्रिया तैसी;। अर्जुनु प्रार्थी मरणासि। कौरवांचेनि हातें. ॥ ९८ ॥ ऐसें अर्जुनाचें करणें। परमार्थवंतीं कैसें जाणणें?। तेंचि साहित्याचीं वचनें। बोलिजतील. ॥ ९९॥ शुद्ध त्वंपदार्थु अर्जुनु। वर्तमाना स्थिती सावधानु। गुणप्रधानु आपणु। काये करिता जाला? ॥ ३००० ॥ अहो म्हणौनि आश्चर्ये। मनींचि विचारिता होये;। आपणपयांचि गुजाये। दुर्जनवीण. ॥ १ ॥ अहो पहा हो कटकटा!। अनर्थु चुकला हा मोठा;। धिग्य धिग्य अदृष्टा। कैसें बोडवलेंसि! ॥ २ ॥ कर्माकरण महापाप। जडत्व केवळ दुःखरूप। सकळां वृत्तींचे लोप। ऐसिया ताटस्थ्यातें, ॥ ३ ॥ केवळ करावयाकारणें। देहें, इंद्रियें, बुद्धी, मनें,। आम्हीं प्रवर्तलों कीं काळें येणें। परम अन्यायीं। ॥ ४ ॥ आतां तें प्रवर्तणें कैसें। अर्जुनुचि बोलतु असे। पापीं प्रवर्तन तें ऐसें। अवधारा म्हणे. ॥ ५ ॥ राज्यसुखलोभेंकरून। मारावया उदेजलों स्वजन,। ऐसें दुष्ट तें आचरण। तें महापाप. ॥ ६ ॥ करूनि गुणांची सर्व शांति। आम्हीं अनुभवून स्वस्थिति। आनंदमयी पूर्णज्ञप्ति। पदवी साम्राज्याची. ॥ ७ ॥ राज्यसुखाचेनि

संजय उवाच

एवमुक्त्वार्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत्।
विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ ४७ ॥

संजयो म्हणे, वीरा। आइकें कुरुकुलप्रवरा,। राया धृतराष्ट्रा पवित्रा,। काये जालें. ॥ ३०५० ॥

अर्जुनः

राया पंडूचा नंदनु। अरिकुलगर्वहुताशनु। कुंतीसुतु अर्जुनु। वासुदेवेसीं ॥ ५१ ॥

एवमुक्त्वा

ऐसें बोलोनि निर्धारें। कौरवमोहें अपारें। मग पुढती यया पुढारें। काये करिता जाला? ॥ ५२ ॥

संख्ये

तये संग्रामसंकटीं। दोहीं सैन्यांमाजिवटीं। घाया उगारिलिया तळवटीं। कौरवांचिया ॥ ५३ ॥

सशरं चापं विसृज्य

गांडीव धनुष्य सांडिले,। शरसहित दूरि ठेविलें,। भाते तेही परि सोडिले। तेणें काळे. ॥ ५४ ॥ एवं सांडूनि धनुष्यबाण,। आणि युद्धाचें सकळ प्रेल्न,। प्रौढी प्रतापाचें वचन। आंगवण टाकूनि. ॥ ५५ ॥

शोकसंविग्नमानसः

शोकयुक्तु होऊनि। मनीं विषादातें पावोनि। करितु चिंता सोसणी। विसरोनि निमिषोन्मेष. ॥ ५६ ॥

रथोपस्थ उपविशत्

उगाचि रथावरि बैसला,। मातें कैसा गमों आला। अर्जुनु अवघा उतरला। वोळखवेना. ॥ ५७ ॥ मुखचंद्राचिया कळा। चिंते अमुवास्येचिया काळा। लोपोनि मुखेंचि सकळा। गुप्त जालिया. ॥ ५८ ॥ कीं विशादराहो असुर। तेणें आच्छादिला मुखचद्रु। उमटेनाचि धनुर्धरु। काहीं केलिया. ॥ ५९ ॥ मोहजळधर अंबरीं। अर्जुनीं दाटले अंतरीं। तेचि या मुखचंद्रा वैरी। जाले काये? ॥ ३०६० ॥ शूरत्व उगेंचि गळालें,। तेज आंगूनि पळालें,। कृपाशैल्य प्रवर्तलें। नाडि न सपडे. ॥ ६१ ॥ धैर्य आणि दक्षता। येहीं सुटला असतां। अर्जुनु पहिला होता। तो नव्हे जाला. ॥ ६२ ॥

ध्यानस्थु बैसे योगी । नव्हे तो शरीरसंगी, । शब्दु सामावोनि बाह्यभागीं । मौन राहे. ॥ ६३ ॥ तैसें अर्जुनातें जालें. । नेणों लक्ष कोठें लागलें. । निमिषोन्मेषण वारलें, । भासेविना. ॥ ६४ ॥ सांडिली आपुली अहंता, । अर्जुनदेहाची ममता, । प्राणरक्षणीं चिंता । तें आथीचिना. ॥ ६५ ॥ सर्वांगा आला श्वेदु, । बाहेरि न फुटे शब्दु, । अधर करिती स्पंदु, । द्रवतीं नेत्र. ॥ ६६ ॥ कवळू पाहे दुर्योधना । ऐसी उपजली करुणा, । परतुं देखोनियां श्रीकृष्णा । शकला तो. ॥ ६७ ॥ मोहाची उकळी न सरे, । झळझळा कांपती गात्रें, । तो वेगु नाना प्रकारें । सांवरिता होये. ॥ ६८ ॥ कीं पाहोनि जिव्हार रसना । मोहो पतगु तो अर्जुना । लागला तेणें आंग-वणा । निकळु गेला. ॥ ६९ ॥ ऐसें संजयो अनुवादला; । तो परमार्थ भान घेतला । कैसा, तो प्रकाशिला । पाहिजे कीं. ॥ २०७० ॥ आता संजयो तोचि करणु? । तरि भविष्यभाव जो सर्वज्ञु । राया अधाप्रति, आपणु । वृत्तांतु सांगे. ॥ ७१ ॥ भविष्यभाव म्हणे, राया, । अन्यथाबोधा, अनात्मया, । धनजयो तो वरि इतुलया । काये करिता जाला? ॥ ७२ ॥ शब्दु त्वपदार्थु आत्मारामु । आश्रयूनि शुद्ध प्रकृतिगुणधर्मु । तुरियेचा ठाईं आगमु । केला जेणें. ॥ ७३ ॥ प्रतीति यानया गुण । केलें सगुणप्रवृत्तीचें आवरण, । तथापि जो तेणेकरून । आपणचि शोभे, ॥ ७४ ॥ आळाही जो जीवदशे । आगीचें शुद्धत्व न नसे, । मग गुणद्वाराचि प्रकाशे । तैसा होऊनि. ॥ ७५ ॥ गुणद्वारा आत्मप्रकाशु । तोचि इच्छूनि अभ्यासु । इतरा-लागीं अविनाशु । योगु प्रतिष्ठी. ॥ ७६ ॥ योगाची केवळ वासना । ती नसाये अयोगा अयत्ना, । म्हणौनि त्या कर्माकरणा । पाप म्हणे. ॥ ७७ ॥ प्रेत्नु करणे तेंचि कर्म, । प्रेत्नु करणें तेंचि अकर्म, । प्रेत्नु न करणें तें अधर्म । पापरूप. ॥ ७८ ॥ म्हणौनि सुप्रेत्नालागूनि । आस्थाभूतु होऊनि । स्वगुण समरीं म्हणौनि । येणें प्रकारें. ॥ ७९ ॥ सद्गुरु कृष्णेसीं ऐसें वचन । बोलिला होता ताता जाण. । राया, पुढें आचरण । काये करिता जाला? ॥ २०८० ॥ आत्मज्ञानें योगागमु । तो हठयोगु संग्रामु, । बळेंचि छेदणें गुणधर्मु, । अकर्म करणें. ॥ ८१ ॥ ऐसा संग्रामीं सकटें । स्व अन्य राहिलें कोठें । आणि गुणाचें निरडें मोठें । यांमाजी असता ॥ ८२ ॥ अरिपद्व-

गांची माडणी, । अभिमानाची तळपणी, । रजतमाची दाटणी । समीप जेथें ॥ ८३ ॥ ऐसें प्रकृतिक्षेत्रस्थान । तेथें स्वसैन्य मार्गे सांडून । गुणाचा हातु सोडून । उभें असतां, ॥ ८४ ॥ धनुष्य बाण विसर्जिले, । जयाचे प्रेत्न सांडिले, । अर्जुन काय केलें । येणें आत्मेन. ॥ ८५ ॥ स्वगुणीं धरूनि आसक्ति, । प्रेत्नाची भारी आर्ति, । म्हणौनि शोकयुक्त चित्तीं । बैसला रथावरि ॥ ८६ ॥ स्वगुण नाहींचि मारणें, । अकृत्य, अकर्म न करणें, । पुरे जडत्वें येणें । म्हणौनियां. ॥ ८७ ॥ अयत्नावरूनि उदासीनु । राहिला पदार्थु होऊनु, । गुणमाराचा प्रेत्नु । सकळु सांडिला. ॥ ८८ ॥ आता तो नव्हे पहिला । धारणेचिपासाव सुटला, । बोधचंद्रु हारपला । यत्नायत्नीं. ॥ ८९ ॥ शुद्धता होती आर्गी । ते न दिसे योगसर्गीं, । प्रेत्न कप सर्वांगीं । उपजते जाले. ॥ २०९० ॥ आपुलेपणें अभिमानातें । झोंबों करी गळाचि तें, । तव सद्गुरु गोपीनाथें । शकला तो. ॥ ९१ ॥ आत्मशुद्धता पौर्णिमा । ते गुणकडवसा जाली आमा, । स्वबोधु लोपला चंद्रमा । गुणाचा दाटपणीं. ॥ ९२ ॥ न लगते लागले भाव, । गळाले अकर्म अन्वय, । असद्वृत्ति तिया सर्व । रूप आच्छादिलें. ॥ ९३ ॥ जहदजहल्लक्षणार्थी । प्रेतवत्‌ गुणासक्ती । अर्जुनु बैसला, गुरु सारथी । पासीं कृष्णु. ॥ ९४ ॥ ईश्वरानुग्रहो पाठीसीं । शुद्धगुणवेगा वाढवासी । अर्जुनु साडूनि यत्नमारासि । यत्नीं प्रवर्तला ॥ ९५ ॥ काहीं आसक्ति गुणाची, । काहीं अपेक्षा योगाची, । अर्जुनु तो गुणमाराची । साडणी पाहे. ॥ ९६ ॥ आसक्ति गुणीं केवळ, । गुणसगाचेंचि हें फळ, । आणि शुद्ध स्वरूप निर्मळ । ज्ञान तेणें. ॥ ९७ ॥ शुद्ध गुणसगु फळला । अर्जुनु तो ऐसा जाला; । गुणयुक्त स्वभावो आपुला । आणि शुद्धता न सडी. ॥ ९८ ॥ गुणयुक्तत्वें गुणासक्ति, । आत्मशुद्धत्वें योगी रति, । काहीं तम, काहीं ज्योति, । सांजवेळे जैसी. ॥ ९९ ॥ उवरियावरि बैसला, । तो आतु बाहेरि देखता जाला, । तुरीयस्थु गुणीं मिळाला । तैसें पाहे. ॥ २१०० ॥ प्रपंचज्ञान, स्वरूपज्ञान, । दोहीं ठाईं आसक्त मन, । शुद्ध गुणाचें सन्निधान । ऐसें फळे. ॥ १ ॥ इंद्रजाळ महेंद्रजाळ पाहिजे, । तें माया, हें काये नेणिजे?। परि पाहता सुख उपजे । आणि सांडवेना. ॥ २ ॥ बहुरूपिये येतां सन्निधु, । तो काये न कळे पुरुषु? । परतु पाहतां उल्हासु, । न पाहवेना. ॥

॥ ३ ॥ तैसेंचि मायिक लाघव । हें मिथ्या नामरूपभान सर्व; । हें समस्ता कळे, अपूर्व । काये येथें ? ॥ ४ ॥ वेदें, शास्त्रें, गुरुउक्ती, । आपणाही कळे प्रतीति, । सत्या असत्याची संगती । कायिसी हे ? ॥ ५ ॥ असता नाहीं सतपण, । आत्मसत्तयाचि त्याचें भान, । जैसी छाया, जैसें स्वप्न । आपुले न सय. ॥ ६ ॥ ऐसें असोनियाही परि । सगाची प्रीति भारी, । जाणत जाणता मिथ्या अतरीं । साडि नुपजे. ॥ ७ ॥ गवर्नगर का पाहवें, । चित्र देखोनि रंजावें, । निट, नट सत्य नव्हे । परि विपयो होये. ॥ ८ ॥ तैसी हे माया ऐश्वरी । मिथ्या ! मिथ्या !! मिथ्या !!! परि । प्रतीतिमुग्न खरें करी । तेणें न सोडवे. ॥ ९ ॥ तैसें शुद्ध जीवरूप अर्जुना । मग्नु जाला माया-गुणा, । आता मिथ्या परि वासना । सोडू न शके. ॥ ३११० ॥ ईश्वरें येक करावें, । गुण हे आगा न यावे, । भान हें दृष्टी न पडावें । गुणाचें कार्य. ॥ ११ ॥ प्रकृति लागली आपणासि, । गुण जडले आगेसी, । भान गुणकार्य दृष्टीसि । भासों आलें. ॥ १२ ॥ मग परस्परा अन्वयें । तिहींचें येक होये, । मग सोडिता नाना उपायें । आगीचें न सुटे. ॥ १३ ॥ तें बळाचें अग नव्हे । तदधीन उगेचि वर्तावें, । ज्ञानें, योगें दूरि करावें । क्रमेंक्रमेंचि. ॥ १४ ॥ कुपथ्य करिता गोड वाटे, । खऱ्या सहसा न सुटे, । मग उपायें उपायेंचि घटे । तयाचा निरासु. ॥ १५ ॥ शुद्ध अशा अर्जुनातें । ऐसें जालें येणें मतें. । आता बळाचें येथें । नचले काहीं. ॥ १६ ॥ सद्गुरु कृष्णु सारथी । म्हणौनि योगार्थ गुणासक्ती, । भूतळा, आपुली याति । विसरला नाहीं. ॥ १७ ॥ येणेवीण हा असता । तैं बद्ध पशु होता, । योगु तो नापेक्षिता । कदाकाळें. ॥ १८ ॥ विपयाचेनि सभ्रमें । करिता अकर्में, विकर्में । मग ससारचक्रीं भ्रमे । हेंचि होतें कीं. ॥ १९ ॥ आता तें ययाचें चुकलें । सारथिया गुरूचेनि बळें । ईश्वरानुग्रहें केवळें । पाठी काढिले. ॥ ३१२० ॥ नेणों महिमा रथाची, । नेणों महिमा वारुवाची, । नेणों महिमा यातीची । अर्जुनाचिये. ॥ २१ ॥ दिगंबरानुचर म्हणे । हे गुरुमहिमा श्रीकृष्णें । आतां ऐसिया अर्जुनाकारणें । सारथी सद्गुरु, ॥ २२ ॥ उतरूनि मोहाची भावना, । पोषूनि योगाची कामना, । ज्ञानें आणी क आधिष्ठाना । क्रमेंक्रमेंचि. ॥ २३ ॥ अकर्मनिष्ठा नावडे, । ते करूळ वर्गीन कडे । आणि प्रथमारथें न घडे । सहज ऐसें ॥ २४ ॥ कर्मचि अकर्म

दावील, । योगुचि ज्ञानमयु स्थापील, । गुणाचि ब्रह्म करील । अर्जुनाचें. ॥ २५ ॥ प्रपंचु तोचि परमार्थु । करावया गुरु समर्थु. । आतां पुरेल मनोरथु । अर्जुनाचा. ॥ २६ ॥ अर्जुनु मुक्तु प्रकृतीसीं; । आंगीं असतियां गुणांसी । टाके तितुल्या प्रपंचासि । धरीना सुखें. ॥ २७ ॥ कांहीं सांडणें ना घेणें, । जैसें तैसेंचि मुक्त होणें, । सद्गुरुप्रसादाचें येसणें । महीमान आहे. ॥ २८ ॥ कर्मचि करितां संन्यासु; । सन्यासा लावितां कर्मदोषु । गुरूतें कायिसा आयासु? । तो सर्वांचा कर्ता. ॥ २९ ॥ गुणसहित गुणातीतता, । कर्मसहित निष्कर्मता, । अवलंबसहित मुक्तता । निरंतर. ॥ ३१३० ॥ प्रपंचेसीं ब्रह्मस्फुरण; । प्रेत्नचि करील अप्रेत्न; । अप्रेत्ना देईल दूषण । कृष्णु सद्गुरु ॥ ३१ ॥ अर्जुनाची वासना जैसी । तैसाचि योगु सांगेल तयासि । परमात्मा निश्चयेसीं । पुढिला अध्यायीं. ॥ ३२ ॥ दिगंबरानुचरु म्हणे । गीतावर्म हेंचि जाणणें; । पुढिलें अपूर्व निरोपणें । कळों येईल. ॥ ३१३३ ॥

ॐतत्सत्परब्रह्मणे नमः । ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतायां सूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे दिगंबरानुचरकृतगीतार्णवनाम्नि टीकायां तस्यां टीकायां अर्जुनविषादयोगो नाम प्रथमोऽध्यायः ॥ १ ॥

---

मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाणे.

महाराष्ट्रकाव्यग्रंथ.

१०.

श्रीदासोपंतकृत

# गीतार्णव.

अध्याय दुसरा.

---

विनायक लक्ष्मण भावे, बी. एस्‌सी.,

यांनीं

'महाराष्ट्रकवि' या मासिक पुस्तकांत छापून प्रसिद्ध केला.

---

शके १८२८

# गीतार्णव.

## ( अध्याय दुसरा. )

---

पहिल्या अध्यायाप्रमाणेंच या अध्यायाचीही एकच प्रत आम्हांस रा. रा. श्रीधर अवधूत देशपांडे यांजकडूनच मिळाली. ही पोथी १४ इंच लांब व ६॥ इंच रुंद असून हिचीं बरोबर अडीचशें पानें आहेत. दर एक पृष्ठावर सरासरीनें दहा ओळी आल्या आहेत; व त्यांमध्यें आठ ते दहापर्यंत ओंव्या लिहिल्या आहेत. पहिल्या अध्यायाप्रमाणेंच याही अध्यायाचें पहिलें एक पान गहाळ झालें असून त्यावरील मजकूर इंग्रजी कागदावर नवीन लिहून घातला आहे.

या अध्यायाच्या अक्षरासंबंधानें एक बाब थोडी लक्षांत धरण्यासारखी आहे. ती ही कीं, या पोथीचें अक्षर अगदीं हुबेहुब श्रीदासोपंतांच्या हस्ताक्षराच्या वळणावर आहे. यावरून ही पोथी प्रत्यक्ष दासोपंतांनींच लिहिली नसली, तरी ती त्यांनीं लिहिलेल्या पोथीवरूनच उतरून घेतली असावी, असें अनुमान करतां येईल.

---

# गीतार्णव.

## अध्याय २.

जयजयाजी विश्वनाथा, । विश्वंभरा, अद्वैता, । आदिगुरो, श्रीअवधूता । पुण्यकीर्ति. ॥ १ ॥ जी जी सज्ञानता तुमचेनि । सानुग्रहें मुक्ती पाणी, ॥ आदिगुरो निदानीं । कैसे होये ॥ २ ॥ नाकळत असकल्पा । उठा खात संकल्पा, । मन तै अमूपा । दृष्टीं दिसे. ॥ ३ ॥ दृश्याची भाप विघडे । ..................चोपकडे । काढूनि दिसे तें फुडें । वेगळें दृश्य. ॥ ४ ॥ नगमत गमे दर्शना । सुखाचा सचु जुना । तोहि माजी ( सताना ? ) । जिरे जयाचिया; ॥ ५ ॥ जें किरुत ये सस्फूर्ती । दृष्टे पवणाचिये व्यक्ति । सांचसें सपादिती । शून्याचें शून्य; ॥ ६ ॥ (स्वभावाचिया ?) सभत्रा। स्वभावें स्वभाओ स्वभावा । न साहे गुणागुणलाघवा । जयाचा की; ॥ ७ ॥ निराशवृत्तीची डांग । ....हे निराशाचें आग । तेथें कवणीएक अमोघ । अवाच्य जे; ॥ ८ ॥ कार्य कारणगुणान्वये । सुटलें आर्थीचि तव आहे । परतु विण जेणें न लाहे । साचाहि साच पण; ॥ ९ ॥ आसता सुख घेले सुखें । वेदका वेदक वेदकें । वृत्तीचेनि जें झोंकें । डोळें न डोळचीं; ॥ १० ॥ सता सुखसवेदन, । सतभासें स्वस्फुरण, । मग पाठी निराकरण । करी गुणावें; ॥ ११ ॥ जे स्फुरतीयसझेती । मायकारण वोलती । स्वस्वरूपाची अत्यार्ति । जेन्हेळीं करी; ॥ १२ ॥ ऐसें गुणसाम्य निरुते । अभिगमे सत जेथें ॥ जेणें तें सद्गुरुनाथें । स्वयाचि होइजे, ॥ १३ ॥ तया अव्यया. गुणातीता, । माझा नमस्कारु श्रीअवधूता; । जें अवलीला मी मता । जाणू केला. ॥ १४ ॥ अज्ञानाची कडसर्णी । करिता ज्ञाना हानि, । आपुलीं आपुलीं स्थानीं । मग ते सामवे. ॥ १५ ॥ ऐसी सद्गुरूची महिमा, । नाहीं कीं जियेते सीमा, । वरी न साहेचि उपमा, । अनुपम्य जे. ॥ १६ ॥ तया श्रीगुरुपरमात्मया । नमस्कारूनि योगिराया, । परोपकारू येथूनिया । पाहों, अनुवादों. ॥ १७ ॥ जे भवरोगिया सजीवनी । अर्जुनाप्रति श्रीकृष्णवाणी । गीता भागवती ह्मणोनि । व्यासें रचिली, ॥ १८ ॥ ते प्राकृतें बोलेन वचनें, । श्रीदिगंबरानुचर ऐसें ह्मणे; । सिद्धी पावो नामस्मरणें । अवधूताचेनि. ॥ १९ ॥

तेचि प्रसंग यथामति। आणितां प्राकृतु अभिव्यक्ती । प्रथमाध्यायाचां अतीं। कैसें संपादिलें. ॥ २० ॥ गुरु गोत्र..................नी। न पडावा शब्दुहि श्रवणीं । तो आपणां घडतु देखोनी, । अर्जुनु तो ॥ २१ ॥ सांडिला सांता..................वळें । मृत्युहिपासाव नटळे। धनुप बाणी विसर्जिले, । न करी संग्रामु. ॥२२॥ मग मोहसागरीं....कळे, । विपादोत्कर्षे आंदोळे, । पाणियें भरी डोळे, । न उमजेचि. ॥ २३ ॥ ऐसी प्रवर्तमान व्यवस्था । (राया?) अर्जुनाची कथा । प्रति धृतराष्ट्र अनुवादता । जाला संजयो. ॥ २४ ॥

संजय उवाच

तं तथा कृपयाऽऽविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।
विपीदंतमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥

संजय उवाच

संजयो म्हणे महीपति । राया, अवधारीं सुमति, । संग्रामसंकटीं पुडती । काय अपूर्व वर्तलें. ॥ २५ ॥ तो त्या पंडूचा नदनु । अरिवर्गगर्वदहनु । शोभता जाला अर्जुनु । अवधारीं, कैसा. ॥ २६ ॥ राहोग्रस्त शशिकला । दिसों लागे जेंवि डोळां । तैसा अर्जुनु लपाला । मोहा आड. ॥ २७ ॥ सजल मेघ कोंदाटले, । तेथें रविबिंब हारपलें । असोनि, (ता)पनत्व गेलें; । तैसा गमे नावेक. ॥ २८ ॥ धूम्रें पावकु झांकोळे, । थरारी दीपु अनिळें, । तैसा पार्थु मोह-(जाळें)। उमटेचिना. ॥२९॥ धैर्य सांडिलें ह्रूकोश, । ममत्वें घ्येलें तें बहुवस, । मीं कवणु हेहि भाप । विसरला तो. ॥ ३० ॥

तथा कृपयाविष्टम्

मग जो तेणेंचि व्यामोहें । बंधुवर्गाचेनि स्नेहें । (व्यामोहित) सांता कायें । जाला करिता ? ॥ ३१ ॥

अश्रूपूर्णाकुलेक्षणम्

वाडें धाकुटीं संसारीं । मा....इ मुळींचि ये सोइरीं । कठिण जालों मी वैरी । धीग्यजिणें. ॥ ३२ ॥ मज दुर्बळा हें कीं धन । ........मातें पंचप्राण । भयंकर कैसें रण । आश्रयिलें येहीं; ॥ ३३ ॥ करितां संग्रामीं येथळाहो । ........(हा)रपलीं कें पाहों, । ऐसा अर्जुनीं स्नेहो । जाला उचंबळता.

॥ ३४ ॥ मुख पोहोनी सकळांचें । हृदय कोंवळें पार्थाचें । तें गहिंवरलें, दुःखाचें । आलें भरितें; ॥ ३५ ॥ आंसुवीं भरले नयन, । त्रिकळ पडिले ईक्षण, । कंठु दाटी, वदन । लागलें स्फुरों. ॥ ३६ ॥

विषीदंतम्

पुढतों पुढती आठवितु, । डोळे भरूनि पाहतु, । विषादसागरीं बुडतु । पुनः पुनः; ॥ ३७ ॥ ऐसा जिंकिला देखोनि मोहें । अर्जुनु स्वजनस्नेहें, । मग इतुल्यावरि लाहें लाहें । तया प्रति. ॥ ३८ ॥

मधुसूदनः

तो मधुमर्दनु, मुरारि, । अर्जुनाचा साह्यकारी, । गोपिनाथु, ब्रह्मचारी, । तयाचिया कृपा ॥ ३९ ॥

वाक्यमुवाच

बोलता जाला वचन । पाहोनि अर्जुनाचें मान । निरसावया परि मौन । दुःखहेतुक. ॥ ४० ॥

इदम्

तें वचन म्हणसी कैसें, । तरि चित्त देऊनि परियसें । जें हें पुढां द्वारकाधीशें । बोलिजत असे. ॥ ४१ ॥

श्रीभगवानुवाच

कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।
अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥

हे अर्जुन

आदिमायेचा ईशु, । योगिहृदयविलासु, । परमात्मा, परमपुरुषु । म्हणे अर्जुना. ॥ ४२ ॥

त्वा

तूं क्षत्रियांमाजी अग्रिकु, । पूर्णप्रतापाचा अर्कु, । अरिवर्गगर्वग्रासकु, । महावीरु, ॥ ४३ ॥ संग्रामविषईं चतुरु, । अपराजितु महामेरु, । क्षेत्री वर्णिती वडिवारु । तया तुझां ठाईं. ॥ ४४ ॥

इदं कश्मलम्

हें दुःख अत्यंत समल, । मोहनामक कश्मल, । पुनरपि हें प्रीतिजाळ पाहातां कैसें ? ॥ ४५ ॥

अनार्यजुष्टम्

आर्यनीती हें न मिळे; । जाणतां जनीं त्याज्य केलें; । जें की आंगीं संचरलें । काय करीं; ॥ ४६ ॥ पुरुणर्थी पाडी खान, । दैन्याचें घडवी वदन, । आधीं ग्रासी शहाणेपण, । प्रवर्तताची; ॥ ४७ ॥ सुखातें गाळी घाणा, । हांसवी देखतयां जनां, । ममत्व म्हणिजे दीना । दीनत्वापादक; ॥ ४८ ॥ म्हणौनि जाणतां जनीं । नाथी आश्रइलें कव्हणीं । पुढती पापरूप म्हणौनि; । कैसें पां तें ? ॥ ४९ ॥

अस्वर्ग्यम्

संग्रामु स्वधर्मु क्षेत्रियांतें, । स्वर्गु पाविजे जेणें मतें, । हें विघ्नकर जाण तेथें । समयीं वोडवलें. ॥ ५० ॥ येणें हातूनि गेला स्वर्गु, । दिसों लागला नरकमार्गु, । न फिटे हा ससारडागु । येणें कश्मलें. ॥ ५१ ॥ सकळां वर्णां, सकळां । आश्रमीं, अर्जुना डोळां । जैं हे पडे अवलीळा । कर्मकरणी, ॥ ५२ ॥ तैं कर्म, भक्ति, आणि ज्ञान, । नाशे वैरागास्य धन, । वोडवे नरकुपतन, । स्वर्गु दुरावे. ॥ ५३ ॥ मनचि संकल्पद्वारा । प्रसवे दुःखा अपारा; । आश्चर्य अवधारी वीरा, । पुढती कैसें ? ॥ ५४ ॥

अकीर्तिकरम्

देखतीं, आणि आइकतीं, । तेहि नवेक दुःखिचि होतीं, । परंतु हा एकु न म्हणतीं । धन्यु ऐसें. ॥ ५५ ॥ पूर्वील हारपे आल्या, । वर्तमानी नेदी सौख्या, । कारण होइजे मौर्ख्यां । भरवसेनि. ॥ ५६ ॥ अवघी जोडिली हारवावी, । कीर्ति पुढें न व्हावी, । अकीर्तिजोडी जोडावी, । तरि हें असो ॥ ५७ ॥ पुरुपार्थ मात्र न फळे, । न पाहिजे तें तें जेणें मिळे, । वरि मरणचि ये वेळे । वोडवलें हें. ॥ ५८ ॥

विपमे समुपस्थितम्

आपुलें सैन्य बहुवस । परि मावारें सांडिलें दुरास, । समीप परदळ असमसास । तेणें वेढाळिलों. ॥ ५९ ॥ शस्त्रें वाजतीं खणखणा, । सूटती वाण सणसणा, । धांवती पायदळें दणदणा, । आह्मां उजू, ॥ ६० ॥ अंबर दाटलें धूळीं, । रथ, धांवती भूमंडळीं, । हातुपावते जवळी । कौरव हे. ॥ ६१ ॥ पळावया नाहीं वाओ, । वाजेल आतां मग धाओ, । प्राणरक्षणीं

उपाओ। तो आथीचिना. ॥ ६२ ॥ ऐसें संकट आतां विषम। असतां मांडलें दुर्गम, । वोढवलें कवण कर्म । अर्जुना तूतें; ॥ ६३ ॥

कुतः

कवणें हेतु हें उपजलें ?। कवणा कार्या तुवां घेतलें ?। कीं काय नेणों आलें। कोठूनि कश्मळ ? ॥ ६४ ॥ पाठविलें कवणे पापें ?। हें तंव विघ्न नव्हे सोपें, । आता उमजौनि आपण पें, । आइकें उपदेशु. ॥ ६५ ॥

क्लैब्यं मास्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।
क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥

हे पार्थ

पार्था, हें तंव मी जाणे, । जें घेतलें तुझेनि मनें, । तें याचा न बोलावें, परि येणें । चित्तें न संटे. ॥ ६६ ॥ देखोनियां भीष्मा, द्रोणा, । सुटलासि तू आंगवणा, । न जिंकवे दुर्योधना, कर्णा । ह्मणौनि. ॥ ६७ ॥ मी मुकलों कीं प्राणातें। श्रीकृष्णु अशस्त्री येथें, । मागां सुता आणि कलत्रातें। काये होईल ? ॥ ६८ ॥ कुंतीतें कवण पाळी ?। काये करील पांचाळी ?। ऐसें आठऊनि उकळी। ते सटिचिना. ॥ ६९ ॥

क्लैब्यं मास्म गमः

तरी हें पूर्वीचि विचारावें, । कीं मागें पुढें आता पाहावें, । नपुंसकत्व आश्रयावें । उचित नव्हे. ॥ ७० ॥ पुरुषाआंगीं पुरुषत्व, । (तें)चितविष्ट ईश्वरत्व, । घ्यता तयाचिया सत्व। क्षेत्रींचि घेलें. ॥ ७१ ॥ पुरुषार्थें जिणें गोड, । पुरुषार्थेंचि मरण चाड, । पुरुषार्थु नाहीं तैं उघड । मुख न दवावें. ॥ ७२ ॥ हा काळुवरी पांडवा। भरसा होता जीवा, । आता एणें आंगें ठावा। पडिलासि मा. ॥ ७३ ॥

एतत्

हें पैं क्लैब्य असाधारण, । जगीं उपहासाचें कारण, । तथापि चुकवी मरण। ऐसेंहि नव्हे. ॥ ७४ ॥ हें वांचतया काये मारी, । कीं मरतया राखे परोपरी, । व्यर्थ विनाशु करी। तया पुरुषार्थाचा. ॥ ७५ ॥

त्वयि नोपपद्यते

ह्मणौनि तूतें क्षत्रिया । अनुचित हें, धनंजया, । आधीं मानसीं बरवया- । परी विचारीं. ॥ ७६ ॥

हे परंतप

आइकें गा, प्रतापिया, । अर्जुना, वीरराया, । अवलंबूनि धैर्या तया । एक करीं. ॥ ७७ ॥

हृदयदौर्बल्यम्

हृदयीं घेलें दुर्बळत्व । धैर्यनाशक, असत्व । तें कैसें लोकदृष्टी अवलत्व । आश्रयिलें जें तुवां. ॥ ७८ ॥

क्षुद्रम्

तुच्छ जाणचि जगती, । जळो जळो ययाची प्राप्ति, । परम लघुत्व किती । काय मी सांगों ? ॥ ७९ ॥

त्यक्त्वा

जेणेंसी युक्त असता । जीतचि मरण गा पार्था, । आता साडूनिया सर्वथा । सावधु होई. ॥ ८० ॥

उत्तिष्ठ

प्रमुख पातले वैरी; । धनुष्यबाण घेतु करीं, । उभा राहीं झडकरी । युद्धीं व्यवसाइकु. ॥ ८१ ॥ वोखटा देखे सिवणा, । उठूनि बैसे तो शहाणा; । तैसा स्पर्शोनिया नयना । सावधु होई. ॥ ८२ ॥ ऐसें म्हणोनि, गोपिनाथु । अर्जुनाकडे असे पाहातु, । भाओ कळावा हृदयस्थु, । आक्रंदे जेणें. ॥ ८३ ॥ भयाचि घेलें असैल, । तरी येणें तेज उपजैल; । तें क्षणाधेंचि करील । भस्म तयाचें. ॥ ८४ ॥ अथवा आन असेल कारण । यया दु:खाचें असाधारण, । तें बोलतां वचन । येईल उमजों. ॥ ८५ ॥ व्याधिपरीक्षा करणें, । तें भेषजें साधारणे, । मग योजावीं रसायनें । तये रोगनिवृत्ती. ॥ ८६ ॥ तव तो वीरराणा काये । आथी पीटला युद्धभयें, । मा उतरे तेणें उपायें । मोहो तयाचा. ॥ ८७ ॥ पडे सन्निपाताची मिठी, । तेथें भृंगिराजु हे कें गोठी ? । म्हणौनु अर्जुनु तो नुठी । तितुलेनीचि. ॥ ८८ ॥ परतु सखा श्रीकृष्णु । जो फेडी ससारशीणु, । बोलिला देखोनि नदनु । तया पंडूचा. ॥ ८९ ॥ नाविक सबोधी मनातें, । सारीतु पच-प्राणातें, । नयन पुसूनि हातें । अनुवादता जाला. ॥ ९० ॥

अर्जुन उवाच

कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।
इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥

हे मधुसूदन हे अरिसूदन

अर्जुनु म्हणे श्रीकृष्णा, । अवधारीं, मधुमर्दना, । अरिकुळगजपंचानना, । वचन माझें. ॥ ९१ ॥ अविघ्नाची तू राशि, । स्मरण तुझें विघ्नें ग्राशी, । तो तूं सारथी हृषीकेशी । असतां येथ, ॥ ९२ ॥ कैसें जी भयें नांदावें ? । अमृतीं मरण पाहावें ? । म्हणौनि असो तें अघवें, । नेणों आम्हीं.॥ ९३ ॥ सकळांतःकरणचाळकु, । सकळां इंद्रियां नियामकु, । तो तूं द्वारकानायकु । जाणों आह्मी. ॥ ९४ ॥ वधिसी कौरवें समग्रें; । तें यांचेचि हात हातियेरें । सहारिती इच्छामात्रे । सकळ सैन्य. ॥ ९५ ॥ तो तू अशास्त्री, अकर्ता, । सर्वी सर्वरूपें सर्वकर्ता, । हें मीं काये गोपिनाथा । विसरलाजी ? ॥ ९६ ॥ तू सत्यसंकल्पी हें निरुतें । 'मारीं ' म्हणतासि कौरवांतें, । अतःपर काय मागुते । पाहिजे वळ ? ॥ ९७ ॥ म्हणौनी भय ऐसें श्रवणीं । नाइकों आम्ही तुझेनि, । प्रवर्तलें माझां मनीं । तें अवा(?)रिसें जी. ॥ ९८ ॥

संख्ये

आम्हा आणि कौरवांतें । वोडवला अर्थस्वार्थे । संग्रामु तो हा येथें । एक आर्थी. ॥ ९९ ॥

भीष्मं च

पैल दृष्टीं देखिला । भीष्मु, श्रीकृष्णा कृपाळा, । वडिलु आमुचयां वडिलां । आजा ह्मणिजे. ॥ १०० ॥

द्रोणं च

दुजा समानु तेणेंसीं । द्रोणाचार्यो, परियसीं । हे क्षात्रवृत्ति जयापाशीं । मागीतली आह्मी. ॥ १ ॥

पूजार्हौ

एवं एकु गुरु, एकु आजा, । जे की आले येथ झुंझा; । करावी तयांची पूजा । ऐसे दोघ. ॥ २ ॥ शरीरें दासत्व कीजे, । वाचा कीर्तनीं गाइजे, । यां नेत्रकमळीं पूजिजे, । सद्भूतें. ॥ ३ ॥ प्राण मीं देईन दक्षणा, । मन ओंवाळीन श्रीचरणा, । निरंतर मूर्तिध्याना । करीन जी मी.

॥ ४ ॥ काये कसें आता कीजे ? । कासेन उत्तीर्णहोईजे ? । तया उभे पा येणें जुझें । पाचारूनी. ॥ ५ ॥

इषुभिः

तिखट, कठिण, खडतर, । बाण जे हे अति उग्र, । भेदिते वैरियाचें अतर। येहीं करूनी. ॥ ६ ॥

कथमहं प्रतियोत्स्यामि

मी कैसा विंधों सत्राणें, । माडों प्रतियुद्धाकारणे,। वरी म्हणौनि न म्हणे । अनज्ञा हे. ॥ ७ ॥ जयापासान जीवसाठीं । विद्या अभ्यासिली जगजेठी, । तिणेंचि मी तया पाठीं । कैसा लागों. ? ॥ ८ ॥ आपुलयाचि कुळा- वरी । धिक् जन्मला भी वैरी, । हेचि दुःख श्रीहरी, । आठवे मातें. ॥ ॥ ९ ॥ वहुता जन्माची जोडी । त्या गुरुचरणीं मातें आवडी, । न विसवावें एकि घडि । रूप जयाचें. ॥ ११० ॥ तया सद्गुरू । गुण निधाना, । अवधान देईं, श्रीकृष्णा, । सग्रामीं पाचारवेना । म्हणौनि ऐक. ॥ ११ ॥

गुरूनहत्वा हि महानुभावान । श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।
हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव । भुंजीय भोगान् रुधिरप्रदिग्धान् ॥ ५ ॥

महानुभावान् गुरून्

जयाचें सत्य स्वरूप । पूर्ण ब्रह्म, निर्विकल्प, । अपरापर अमूप, । ज्ञानगम्य; ॥ १२ ॥ जया स्वस्वरूपानुभवें । ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान, स्वभावें, । प्रपच- भान नेणवे । ब्रह्मनिष्ठा, ॥ १३ ॥ ऐसें गुरुस्वरूप निर्भ्रांत । आइकोनि जाणों विवेकें; । ते हे श्रीकृष्णा, आइकें । द्रोणादिक. ॥ १४ ॥

अहत्वा हि

म्हणौनि निर्धारु, परियसीं, । ऐसा वर्ते मानसीं, । सर्वथा न वधू ययासी । यये संग्रामीं. ॥ १५ ॥ आता तू म्हणसील एक । न वधिता पैं द्रोणादिक, । येहीं कौरव टणक । ते न जिंकरती रणीं. ॥ १६ ॥ तरी जिंकोनि कौरवातें । कारण काये आमुतें ? । गोत्रवधु निभियें । तेणेंचि न करू ॥ १७ ॥ तू म्हणशील, गा श्रीपति, । कौरव जरी न वधिजती । तरी राज्य- भागु हा नाथी । निश्चयेंसीं. ॥ १८ ॥ तरी चाड नाथी राज्यें येणें, । यें

परलोकविरुद्धें साधनें; । दुःखदार्ती आम्हा, कारणें । वोडवतील. ॥ १९ ॥
आतां राज्याचेनि अभावें । शरीरनिर्वाहो न संभवे, । तरी तेहि एक वर्वे ।
आधीं विचारिलें. ॥ १२० ॥

भैक्ष्यमपि भोक्तुम्

चोपूनि शरीर क्लेशां । साहों वरि पडल्या आयासा, । रुक्ष तन्हीं, हृषीकेशा, ।
भिक्षा करूं. ॥ २१ ॥ तेणें(चि) अतिथिपूजन, । यया धर्माचें सरक्षण ।
परिग्रहाचें पाळण, । करूं देहनिर्वाहो. ॥ २२ ॥ पापार्जित राज्य, जाण, ।
तयाहूनि तें भैक्ष्यान्न । सेविता वाटे कल्याण, । पुढेती कैसें ? ॥ २३ ॥

इह लोके.

यये लोकीं वर्तता, । अवधारीं, गा गोपिनाथा, । भैक्ष्यसेवन तत्नता ।
राज्याहूनि, ॥ २४ ॥

श्रेयः

परम श्रेष्ट, श्रेयकर, । स्वर्गु पावावया द्वार, । इहपरलोकीं परिकर, । अवि-
रुद्ध जे. ॥ २५ ॥

इहैव

चक्रपाणि, अवधारीं । ना तरी यये संसारीं । राज्य सुख-यये शरीरीं ।
आश्रयुनी. ॥ २६ ॥

गुरून् हत्वा

महानुभावा गुरूतें । वधावें आपुलेनि हातें, । हे वैरी, येणें मतें, । गोपि-
नाथा; ॥ २७ ॥

रुधिरप्रदिग्धान्

मग अशुद्धें ययांचेनि । स्निग्ध जाली मेदिनी, । तीपासाव, चक्रपाणी, ।
निपजले जे, ॥ २८ ॥

अर्थकामांस्तु भोगान्

नाना अर्थ सकळ, । ते ते काम प्रबळ, । आणि भोग जे अनुकूळ, ।
पातान तयां, ॥ २९ ॥ ते तेणें अशुद्धें भरले, । मांसें, मेदें, वोळले, ।
गुरुगोत्रवधें हरिले । पदार्थ जे, ॥ १३० ॥

भुंजीय
ते भोगावे सप्राप्त, । हें काये देवा उचित ? । येणेंचि देखा हित । आमुचें
जी. ॥ ३१ ॥ जोडितां ऐसा पुरुषार्थु । जोडे नरकपदपंथु; । बहुकाळ
परमार्थु । तो दूरीचि ठाके. ॥ ३२ ॥ ऐसेंहि हें अनुचित । आचरावें
आम्हीं येथ, । तरी आन येक प्रस्तुत । गमों लागे. ॥ ३३ ॥

न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो । यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।
*यानेव हत्वा न जिजीविषामः । तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥

कतरन्नोगरीयः
शस्त्रास्त्रभरोवरी । युद्ध करितां, श्रीहरि, । आमुतेंचि बरवें, अवधारीं, ।
क्षेम आहे, ॥ ३४ ॥

एतच्च न विद्मः
हें तव न कळे निश्चित । कैसे मानावें जी हित । यशाचां हातीं वित्त ।
आधीं सापडलें. ॥ ३५ ॥

यद्वा जयेम
तें यश येणे मतें केवळ । आम्हा वाट्या येईल; । जिंकिजती कौरव सकळ, ।
पडती द्रोणादिक; ॥ ३६ ॥

यदि वा नो जयेयुः
किंवा जाऊ न जिंकिले, । दुर्योधना हातीं पडिले, । पळाले, कीं सर्व मेले, ।
होईल ऐसें. ॥ ३७ ॥

ते धार्तराष्ट्राः
असो, आतां प्रस्तुत । भीष्मद्रोणादिकीसहित । राया धृतराष्ट्राचे सुत ।
कौरव हे, ॥ ३८ ॥

प्रमुखेऽवस्थिता
सन्मुख माडले माडणीं, । युद्धाची इच्छा करूनी, । राज्य जिंकों म्हणौनि ।
पासाव आम्हां. ॥ ३९ ॥

यानेव हत्वा
ययां गुरुसहिता. गरुडध्वजा, । वाडा, अवाटा, गोत्रजा, । राज्याभिलापें
जुंझा—। माजी वधूनी, ॥ १४० ॥

* या श्लोकाखालीं श्लोकाचा गद्य साराश पोथीमध्यें लिहिला आहे तो असा.—
"उभेपांमध्यें जयो जो तो कीं कवणातें पराययो तो कवणातें नकळे म्हणतो."

न जिजीविषामः

आम्ही न जीयों सकळ; । शस्त्रेंसीं न चले बळ; । मरणातें सप्रामु मूळ । क्षेत्रियासी. ॥ ४१ ॥ यद्यपि वाचलों येथें, । तेथें काधया अपघातें, । नाशों न जे व्हेळीं तें । आयुष्य वोसरे. ॥ ४२ ॥ प्रमित आथी जिर्णे, । तया मागें पुढें मरणें; । अनित्यें शरीरें येणें, । अनित्य भोग. ॥ ४३ ॥ अनले घेतल्या मदिरा— । माजि ठेवा विसोरा; । तो काजा नये, येकसरा । जाये जळोनि; ॥ ४४ ॥ तैसें पातकीं जोडावे, । तें भोगिता, देह नित्य नव्हे; । वरि लोकविरुद्ध अवघें । दु.खचि होईल. ॥ ४५ ॥ म्हणौनि असो, गोपिनाथा, । एतद्विषयीं प्रवर्तता । काये नेणों यया चित्ता । वर्तत असे. ॥ ४६ ॥

कार्पण्यदोषोपहतस्वभावः पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।
यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे । शिष्यस्तेहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ ७ ॥

कार्पण्यदोषोपहतस्वभावः

कार्पण्यम्

तें ह्मणसील कैसे काये, । हृदयीं तुझां बेसलें आहे, । तरि ते सागेन, जेणें होये । चित्तविभ्रमु. ॥ ४७ ॥ कौरव माझे गोत्रधन, । कौरव माझे पच-प्राण, । येहीं सुखें असावे, मन । ऐसें मानी. ॥ ४८ ॥ ययाचेनि सुख संसारीं । दु खें, दुःख वाटे शरीरीं; । ते मरतील, मग काये करीं । सप्रामीं यये ? ॥ ४९ ॥ रणीं हारपल्या दुर्योधना । कें पाहों भीष्मा, द्रोणा ? । कर्णासारिखा, श्रीकृष्णा, । पुटतीं कैंचा ? ॥ १५० ॥ ऐसें कार्पण्य उपजलें, । तें विचारें कैसे जी टळे ? । वरि आन येक स्फुरलें । माझा मनी. ॥ ५१ ॥

दोषः

गोत्रवधु, गुरुवधु, । मित्रद्रोहो, भूतवाधु, । हा पापसागरु प्रसिद्ध । बुड-वील मातें. ॥ ५२ ॥ जो मी साधूचा गुणद्वेषा, । तो चालता यिया स्वर्गवाटा । न पवतु, देवा, उपराठा । नरक पोवेन. ॥ ५३ ॥ कालिमा येइल मुखातें, । कैंनि पाहों, देवा, तुमते ? । कें मीं आपुलेंनि हातें । पितर मारूं ? ॥ ५४ ॥ एव येकें आगें करुणा, । येके आगे पाप, श्रीकृष्णा, ।

पळवें, श्रीकृष्णा, । 'मा भीं' म्हणौनि आपणां—। आड घालावें. ॥ ८४ ॥ विषय विष हें केवळ, । व्यापिलें हृदय सकळ, । अंतीं जाळीं व्याळ । माझीचि मज. ॥ ८५ ॥ संसारदुःखहाळाहळें । सर्वांग माझें हें जळे, । कवणे अमृतें रसाळें । निवविसील ? ॥ ८६ ॥ संग्रामाचेनि प्रसंगें, । गोत्रवधाचेनि अंगें, । उपजलें मोहाचिमार्गें । वैराग्य अर्जुना. ॥ ८७ ॥ संसारसुखप्रद्वेषें । अर्जुनें बोलिलें ऐसें । पुढतीं, श्रीहरि, परियेसें, । पार्थु म्हणे. ॥ ८८ ॥ हें संसारसुख गहन, । म्हणतासि दुःख असाधारण । तरि यये विषयीं प्रमाण । कवण आथी ? ॥ ८९ ॥

न हि प्रपश्यामि ममापनुद्याद् । यच्छोकमुच्छोषणमिंद्रियाणाम् ।
अवाप्य भूमावसपत्नमृद्धं । राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥ ८ ॥

मर्मेंद्रियाणाम्

तरि बाह्यांतरस्थें करणें । कर्ता कार्यें निजगुणें । वर्तत असती कवणें । प्रकारें पैं ? ॥ १९० ॥ अंतःकरण व्यानवेगें । श्रोत्रांचां द्वारीं रिघे, । शब्दविषईं मग जागे । तेणें रजोगुणें. ॥ ९१ ॥ वक्तव्यातें करी वाचा । तो ही दर्त्यंकुरु साचा । भोक्तया अंतःकरणाचा । कर्मावरी, ॥ ९२ ॥ मन समानाचेनि बळें । त्वचेचां स्थानीं मिसळे । तेथें तो स्पर्शु आडळे । नानाविधु. ॥ ९३ ॥ त्यागादान करकर, । ते मनापासाव विकार, । जे व्हेळीं तें सादर । कर्मीं होये. ॥ ९४ ॥ उदानवेगें उडोनि । बुद्धि वैसे नयनीं, । रूपविषयो तेथूनि । भोगी तेजस्थ. ॥ ९५ ॥ पादु करी गमनातें । ते कर्मवृत्ति तये बुद्धीतें, । यया परीतें भूतें । नांदती स्थूलसूक्ष्में. ॥ ९६ ॥ चित्त प्राणें चंचळ । रसनेसीं मिळे केवळ, । तेथें रससमूह सकळ । कळों लागे, ॥ ९७ ॥ शिश्न उठे रतिवरि, । ते कर्मवृत्ति चित्तीं अवधारीं; । ये चाऱ्ही आपुलालपरी । देहीं वर्तती. ॥ ९८ ॥ अहंता अपानांशें । घ्राणीं येऊनि प्रवेशे । गंध तेथिचे आवैसे । लागें जाणों ॥ ९९ ॥ तेथें विसर्गयितव्याकरिती । पायु कर्मवृत्ति बोलती । जे अहंता कर्माप्रति । करूं पाहे. ॥ २०० ॥ एवं कर्मेंद्रियें कर्मकरण, । ज्ञानेंद्रियें ज्ञानकरण, । प्राणपंचक चेष्टाकरण, । रजोगुणकृत. ॥ १ ॥ तेथें शब्दादिविषयपंचक । ज्ञेय, भोग्य, कार्य, सकळैक । तामसाहंकारें साभासात्मक । येणें भूतपंचक हें, ॥ २ ॥ करणद्वारा कार्यातें । कर्ता

अंतरगुसाक्षी वर्त्ते, । सात्विकें अहकारे तें । अतःकरणचतुष्टय. ॥ ३ ॥ तेथें त्या करणसर्गे कर्त्ता । विपयसाधनीं असतां । त्रिपुटीचिया संयुक्तता । कामु उठी. ॥ ४ ॥ तो रजो गुणें उपजला, । तमोगुणा प्रकाशूं लागला, । सत्व गुणाचा केला । ग्रासु जेणें. ॥ ५ ॥

यच्छोकम्

तये कामनेचां पोटीं । होती शोकाची गाठी, । ते रजतमवृत्ति सकटीं । वाढि धरी. ॥ ६ ॥ मग प्रारब्धभोग डोहेळे । भोगितां नवमास भरले, । मग कवणे येकें विनासकाळें । जन्मु ययाचा. ॥ ७ ॥ अर्थहानितिथि अवधारीं, । स्वजनविनाशवासरीं । मरणाशारिखां नक्षत्रीं । समयो ध्येला. ॥ ८ ॥ तो पैं एणें समयें । माझां हृदइं जन्मला आहे, । कृष्णा, आकाशीं नसमाये । ऐसा वाढे. ॥ ९ ॥

उच्छोपणम्

मग मनादींद्रियां शोपी । सुखाचा वोळांशु ग्राशी, । संजीननकळा ग्राशी । शरीराची ॥ २१० ॥ सहस्त्रां किरणीं भास्करु । स्थिल्लेरसीं विरोधु करूं । लागला, तें अनिवारू । कवणें निवारावा ? ॥ ११ ॥ अनळाहूनि हा दाहकु, । विषाहूनि अति मारकु, । प्रळयकर्ता तो पीडकु, । न ये समानते. ॥ १२ ॥ कृष्णा एणें अनिवारें । माझीं करणें सकुमारें । तीं पैं सबाह्य-अभ्यतरें । नेली शोपूनियां. ॥ १३ ॥

अद्नुयाद्र हि प्रपश्यामि

आतां ययाचिया विनाशा । नेणे माधवा परिव्वसा । काय आगरू कैसा । पसरु ययाचा ? ॥ १४ ॥ सकळ कौरव नाशती, । भीष्म द्रोण रणीं पडती, । मग आम्हीं ही आम्हां प्रति । नहों चिरंजीवियें. ॥ १५ ॥ हेंचि पुनः पुनः आठवे, । विसरु न पडे येणें जीवें; । म्हणौनि शोकु समूळु माळवे । तेंचि करावें. ॥ १६ ॥ तूं म्हणसील, गोपिनाथा, । कौरवनाशें राज्य पावतां, । सकळ ऐश्वर्य भोगितां । जायील हा. ॥ १७ ॥ अर्थसंपन्ना-कारणें । दारापुत्र काय उणे ? । इष्टमित्र देहें येणें । बहुसाळ होती. ॥ १८ ॥ मग हानिकाळें उपजला, । तो प्राप्तिकाळें शोकु मेला, । तरि यया इतुल्या बोला । वचन आथी. ॥ १९ ॥

भूमौ

सप्त सागरांची मांडणी, । जेथें सप्त द्वीप उभवणी, । सप्त पाताळासीं मेदनी । विस्तीर्ण हे. ॥ २२० ॥

राज्यमवाप्य

येथिचें राज्य, श्रीकृष्णा, । तपें, दानें, भक्ती, आंगवणा । प्राप्त जालें मज अर्जुना । पुडती केंसें ? ॥ २१ ॥

समृद्धम्

नाना द्वीपें, देश, नगरें, । नानाविधें दामोदरें, । नाना स्तुतिस्तोत्रें । लोक करिती. ॥ २२ ॥ चिंतामणीची पाउठणी, । कामधेनूची दुभणी, । विश्वकर्मा उभवणी । करता जाला. ॥ २३ ॥ रथ्या वस्त्रें नेसलिया, । मोल नाहीं माणिक्यां मोतियां, । आंगणीं विखुरिती वैडूर्यां । जैसी वाळु. ॥ २४ ॥ तेथें अमृताचें मेघुडें, । रानीं कल्पतरूचीं झाडें, । असो तें राज्य अपाडें, । कैसें पुडती ? ॥ २५ ॥

असपत्नम्

वैरी दुजा नाइकिजे, । एकछत्र राणिव कीजे, । जो जो विषयो उपजे, । तो सिद्ध जेथें; ॥ २६ ॥

सुराणामपि चाधिपत्यम्

इंद्राची ही अमरावती । जाली कृष्णा आपैती, । सकळ देव कारिती । शुश्रूषा जन्हीं; ॥ २७ ॥ चौदाहि रत्नें भांडारी । माझां वर्तती, श्रीहरि, । उर्वशी, रंभा अवसरीं । मेनिका उभी: ॥ २८ ॥ सकळां यज्ञीं मी भोक्ता; । सकळयज्ञफळदाता, । सुरां, असुरां नियंता । मानवातें. ॥ २९ ॥ ऐसा ब्रह्मांडवर्ती इश्वरू । जालों मी अर्जुनवीरु, । तन्हीं द्रोणाऐसा गुरु । गेला तो न सांपडे. ॥ २३० ॥ भीष्मा म्हणौनि आळवीन, । तै सादुमातें देईल कवण ? । देवा, सर्वथा हे स्वजन, । न जोडे पुडती. ॥ ३१ ॥ आतां मीं ययातें विसरला, । आणीं पुडती जन्मु पावला, । मी तो नव्हें एकला, । त्रैलोक्यनाथु ॥ ३२ ॥ तरी तें पुडती नश्वर । देह तेंही नित्यक्षर, । शाश्वत नव्हे साकार । ब्रह्मांड हें. ॥ ३३ ॥ तेथिचां विनाशदर्शनीं, । शोकु न चुके मागुतेनी, । यालागीं विनाशु तेणेंकरूनी । नघडे

पयाचा. ॥ ३४ ॥ बहुतां जन्माचां सांगातीं । अनादिजीवीं वासनावर्ती । नानापदार्थसंप्राप्ती । नाशेचिना. ॥ ३५ ॥ घृतें न शमे पावकु, । इंधनीं होये अधिकु, । जैसा विषईं विषइकु । धाला न म्हणवे. ॥ ३६ ॥ अंतवंत अर्थ सकळ, । अतेव सुखहि अनिश्चळ, । देह अस्थिर, निर्मूळ । अतेव राज्य हें. ॥ ३७ ॥ नाशवंत वस्तु शोंवतां । शोकु न तुटे, देवा, सर्वथा, । एथें माझया चित्तां । एक मानलें. ॥ ३८ ॥ यावें सकळांचें ईश्वरत्व, । आणि सत्याचि असपत्नत्व, । अपरिच्छिन्नत्व, पूर्णत्व, । सुखचि जें, ॥ ३९ ॥ तरि असंत आणि नाशवंत । तें निरसावें समस्त, । मग जें सत्य निभ्रांत । असेल कांहीं, ॥ २४० ॥ तें सत्य, अविनाश, अभिन्न, । प्राप्य होय असाधारण; । राज्य, तैं या दहन । शोकांचें होये. ॥ ४१ ॥ अवधारीं गा गोविंदा, । जें अविनाशी सत्य सदा । तें शोकहानि सर्वदा । जोडी जोडावें. ॥ ४२ ॥ आतां तये सत्यराणिवे, । निर्वैर जारि असावें, । पाहिजे तया सांडावे । यथा भेददर्शना. ॥ ४३ ॥ सकळ समृद्धींची चाड । सुख पाहिजे जैं वाड, । तैं सहज सत्य निबिड । असे, तें आश्रयावें. ॥ २४४ ॥ ह्मणौनि असंत सकळ, । याची प्राप्ति शोकमूळ, । आतां करावें शोकावेगळ । तुवां सद्गुरुनाथें ॥ ४५ ॥

संजय उवाच ।

एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप ।
न योत्स्य इति गोविंदमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥[१]

हे परंतप

परमप्रताप दिनकरा, । अवधारीं, गा धृतराष्ट्रा, । वचन माझें हें वीरा, । संजयो म्हणे. ॥ ४६ ॥

गुडाकेशः

करी योगियां आडवारा, । संसारिकांतें संसारा, । ते जिंकिली जेणें निद्रा । अर्जुनु तो. ॥ ४७ ॥

---

[१] या श्लोकाखाली श्लोकाचा गद्य सारांश पोथीमध्यें लिहिला आहे तो असाः— संजयो राया धृतराष्ट्राप्रति सांगता जाला, राया, पूर्वोक्तप्रकारें अर्जुनु श्रीकृष्णनाथाप्रति बोलोनि मौनें ठेला.

हृषीकेशम्

सजलमेघसंनिभा । तया रुक्मिणीचिया वल्लभा । प्रति सन्मुखु उभा । राहोनियां, ॥ ४८ ॥

एवमुक्त्वा

एणें प्रकारें अनुवादला, । तो अभिप्राओ मागां कथिला; । अवधान देईं, वहिला, । पुढती काय म्हणे? ॥ ४९ ॥

गोविंदम्

तया सकळेंद्रियनियामका, । करणधर्मज्ञा, व्यापका, । आत्मया, द्वारका-नायका । प्रसन्नउनी, ॥ १५० ॥

न योत्स्ये

न झुंझें सर्वा प्रकारीं, । न प्रवर्ते हातियेरीं, । वार्ता राज्याची न करीं, । सारंगधरा, ॥ ५१ ॥

इत्युक्त्वा

ऐसें बोलोनि पुनः पुनः । करूं पाहे प्रतिज्ञा, । तंव ते दीर्घ कल्पना । म्हणौनि काय करी? ॥ ५२ ॥

तूष्णीं बभूव ह

गिळूनि वाचेचिया वेगा । आणि मात्रासमूहु अवघा, । कांहींचि न बोले उगा । जैसा तो मौनी. ॥ ५३ ॥

निश्चयो बैसला हृदईं, । युद्ध हें करणेंचि नाहीं; । पाहे परंतु तो दोहीं । नयनीं कृष्णा उज. ॥ ५४ ॥ जेणें शोकाचें होय दहन, । पाविजे अवि-नाशस्थान, । तें पुसिलें असतां श्रीकृष्ण । काय म्हणतील? ॥ ५५ ॥ काय असेल पां तें कैसें, । निवेन मी जेणें सद्रसें, । शोकसमूह विनाशे । परिसतांची? ॥ ५६ ॥

तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये विषीदंतमिदं वचः ॥ १० ॥*

---

* या श्लोकाखालीं श्लोकाचा गद्य सारांश पोथीमध्यें लिहिला आहे तो असाः–ऐसें देखोनि तो द्वारकानायकु, सकळयोगिजनविश्रामु, सच्चिदानंदैकरसाचा मूख, वैकुंठाधि-पति, कृपासागरु अर्जुनेंसीं बोलता झाला.

हे भारत

ऐसा सावधानु, सुभटा, । अर्जुनु ठेला, भरतश्रेष्टा, । कैसा धीटु यया धीटां-माझारि तो. ॥ ५७ ॥

सेनयोरुभयोर्मध्ये

ऊभयसैन्यमध्यदेशीं । वर्ततां काळाचां ग्रासीं, । न वर्ते भय मानसीं । कैसा कोंवळा. ॥ ५८ ॥

तं विषीदंतम्

गुरुगोत्रवध देखोनी । विषादु वर्ते जया मनीं । जो कीं ममत्वें पिठूनि । मौनी केला, ॥ ५९ ॥ जयाचें श्रीमुख कोमायलें, । इंद्रियवर्गीं जया सांडिलें, । जो कांहींचि कव्हणेसीं न बोले । तेणें अर्जुनेसीं, ॥ २६० ॥

हृषीकेशः

तो सकळकरण नियंता, । अवधारीं, राया भारता, । आत्मा जो सकळां भूतां, । तो गोविंदु स्वयं, ॥ ६१ ॥

प्रहसन्निव

क्षणेकु हास्यवदनु, । क्षणेकु विस्मितु, नारायणु । क्षणेकु करी अनुमानु । माथा तुकी. ॥ ६२ ॥ जाणु नानेणु सामाने । म्हणौनि हासिजे नारायणें, । समयो पाहोनि करणें । लागे विस्मयो. ॥ ६३ ॥ क्षणेकु माथा तुकिजे, । सत्यंवांचूनि हा न समजे, । आतां हा भक्तु यातें सहजें । सांगावेंचि तें. ॥६४॥

इदं वच उवाच

ऐसें विचारूनि क्षणाएका, । देओ निजभक्तांचा अलुका । बोलिला तें हें आइकें कां, । राया, वचन. ॥ ६५ ॥

श्रीभगवानुवाच

अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासूनगतासूंश्च नानुशोचंति पंडिताः ॥ ११ ॥

अशोच्यान्

भलें केलें, गा सुप्राज्ञा, । कृष्ण ह्मणे, साधु अर्जुना, । परंतु तुझें तंव हें मना । आमुतें न मने. ॥ ६६ ॥ जे तूं देखतासि कौरव । ते शोकायोग्य नव्हती सर्व, । मिथ्या हें मापालाघव । दृश्यमान. ॥ ६७ ॥ यया दृश्यांचा

साचपणीं । नानात्व जाये फिटोनी, । एकत्व उरे निदानीं । पूर्ण ब्रह्म. ॥ ६८ ॥ शोकायोग्य तूं असंत । किंवा मानितासि वस्तु संत ? । या दोंमाझारि प्रस्तुत । एक धरीं. ॥ ६९ ॥ असंताचा शोकु करणें, । तरि स्वभावें ते असोंचि नेणे, । *गगनारविंदा सुकणें* । हा बोलु न साहे. ॥ २७० ॥ वंध्यजु, सांग, काये मरे, । खिरे मृगजळ खोंकरें, । उत्पाटण कीजे चतुरें । श्रृंग ससयाचें ? ॥ ७१ ॥ दर्पणिचें रूप मेलें, । स्वप्नींचें राज्य गेलें, । किंवा चित्री हारपलें, । सांपडेंविना. ॥ ७२ ॥ रज्जुस्थानीं आभासला । तो भुजंगु कवणें मारिला । जेणें अर्जुनु हा जाला । शोकारूढु ? ॥ ७३ ॥ शुक्ति-खडिचें रजत, । हारविलें पार्था तुवां येथ, । मिथ्या मायिक प्रस्तुत । जरि शोचितासी. ॥ ७४ ॥ आतां शोकु करिसी सत्याचा, । तरि विनाशु नित्या तया कैंचा । अजा, अव्यया, शुद्धाचा ? । म्हणोनि न घडे. ॥ ७५ ॥ कवणें रे गगन हालें, । अमृता विष पाजिलें, । आंगीं तम लाविलें । तया दिनकरा ? ॥ ७६ ॥ चंद्रतेजें मंडळ । चंद्राचें पोळे (लोपे?) केवळ । निमिषीं सदाट आभाळ । तें लोपी सूर्या. ॥ ७७ ॥ सत्य स्वभाओ सत्याचा, । अभाओ न साहे आंगाचा, । मुळीं असत्या भाओ कैचा, । जें तें विनाशे ? ॥ ७८ ॥ म्हणोनि देखतासी जें तूं अवघें । तें सद्भागें ना असद्भागें, । शोका विषयो प्रसंगें । आम्हीं विचारितां. ॥ ७९ ॥

त्वम्

आणि तू न संवरितु आपणा । अवधारीं, गा अर्जुना । भीष्म द्रोणादिकां स्वजना । पाहोनियां. ॥ २८० ॥

अन्वशोचः

करितु आहासि शोकातें । हे नाशतील एणे मतें, । तें न साहेचि आमुतें । म्हणोनि वारिलें. ॥ ८१ ॥ 'कुतस्त्वा' श्लोकें येणें । वारितां विवेकवचनें, । तू आपुलेचिनी जाणपणें । उमजसीना. ॥ ८२ ॥

प्रज्ञावादांश्च भाषसे

'कथं भीष्म महं संख्ये । गुरूनहत्वा' श्लोकें एकें, । 'न चैतद्विमः' इत्यादिकें । जाणीव बोलसी. ॥ ८३ ॥ मी एकु एथ विषईं जाणु । ऐसा धरितासि अभिमानु, । आणि सर्वेचि मागुता, नेणु । होऊनि पुसतासी.

॥ ८४ ॥ 'कार्पण्यदोषोपहतः' येणें, । 'न हि प्रपश्यामि' श्लोकें आनें । मी कांहींचि नेणें नेणें, । सांगा म्हणतासी. ॥ ८५ ॥ पुसतासि शोकविनाशु, । आणि तोचि दृढाविसी बहुवसु, । मानितासि शब्दीं विश्वासु । तो मायीकु अथवा. ॥ ८६ ॥ पुत्रत्रयादि दृश्य सकळ, । राज्य असंतत्वें शोकमूळ, । एणें न प्रशमति जाळ । तया शोकाग्नीचे. ॥ ८७ ॥ ऐसा सिद्धातु जल्पसी, । असंत राणीव सांडिसी, । आणि तयाचा शोकु करिसी । नाशैल म्हणोनि. ॥ ८८ ॥ असंत दृश्य हें जाणता । तूंचि शोकु करितासी, पार्था, । यया जाणपणाची वार्ता । जाली पुत्रत्रयीं. ॥ ८९ ॥ सद्गुरु जाला सुप्रसन्न । तेथें शिष्यु म्हणे मी जाणु, । परिहारु आणि प्रश्नु । स्वयंचि करी ॥ २९० ॥ आपुलेनीचि युक्तिजालें । बोले सद्गुरुपुढां आगळें, । तयां जन्मूनि नकळे । कांहींचि तत्वज्ञान. ॥ ९१ ॥ शास्त्रवादीं तूटली, । पुराणश्रवणें भांबावली, । बुद्धि जयाची विखुरली । बहिर्मुख. ॥ ९२ ॥ तया जालाहि सद्गुरु, । काये करी उपदेशव्यवहारु । पूर्वाभ्यासु अंधकारु । निबिडु जया? ॥ ९३ ॥ आपुलेनि युक्तिबळें । तत्वतां तत्व न कळे, । तेथें सद्गुरूचे पाऊलें । सेवावे पडती. ॥ ९४ ॥ पयपाणी निवडणें, । हें राजहंसाचें करणें, । कवणें करावें अनुमानें । काळउनी? ॥ ९५ ॥ एवं बहिरंगा युक्ति । त्या खोटिया येथ न सरती, । याळागीं आइकें पुढती । सांगिजैल तें. ॥ ९६ ॥

पंडिताः

पंडित जे कां बुद्धिवंत, । ज्ञानी अनुभवें निश्चित, । सारासारज्ञ प्रशांत, । सांख्यसंप्रदाई, ॥ ९७ ॥ प्रकृतिगुणव्यतिरेकें । जे जाणती तत्व टाईकें, । तें विशुद्धें सुविवेकें । कैसें पुनरपि? ॥ ९८ ॥

गतासून्

प्रारब्धाचेनि सेवटे, । प्राणापिंडाची ग्रंथि सुटे, । पांच भौतिक येक घाटे । जे व्हेळीं भूतपंचकीं; ॥ ९९ ॥

अगतासूंश्च

कां प्रारब्धभोगीं वर्तमान । देहीं नांदती पंचप्राण, । तें देह सजीव तें क्रियमाण । आचरतें दिसे; ॥ ३०० ॥ तयां दोहींचां, वीरपति, । साक्षात्कारीं ज्ञान युक्ति, । हें मेळें कां मरेळ काकुळती । ऐसिया या, ॥ १ ॥

नानुशोचन्ति ।
न शोचिती अतिमानें । मिथ्या जयां जिणें मरणें, । सर्वदा सर्वी सारिखेपणें । जेणें, तें अवधारीं. ॥ २ ॥ असंतत्वें अनात्मयां, । किं संता संतत्वें आत्मयां, । हेंचि एक, धनंजया, । राहे निवाडूनी. ॥ ३ ॥ अनात्मा कीरु असंतु । जरी तो वारें अभासतु, । जैसा सागरु हेलावतु । मृगजळाचा. ॥ ४ ॥ तयाचेनि साभासपणें । कार्य ना अकार्य जाणे, । न भरती उदकस्थानें । ना सदनें पडती. ॥ ५ ॥ असो, तो मिथ्या भ्रमु. । नित्यु निभ्रांतु आत्मारामु । तो या जन्म मरणाचा श्रमु । नेणे केव्हांही. ॥ ६ ॥ साडूनि अनात्मभावना । तद्दृष्टीं पाहातां, अर्जुना, । आत्मा अभिन्नु असतां गुणा, । नव्हतु असे. ॥ ७ ॥

न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।
न चैव न भविष्यामः सर्वे वयमतःपरम् ॥ १२ ॥

अहम्
आतां मी जो हा श्रीकृष्णु । दिसे साकारु, व्यक्तु, सगुणु, । तो सत्यें स्वरूपें आपणु । कैसा असें? ॥ ८ ॥

जातु
तरि गुणी गुणाकारें वर्ततां, । लयोद्भवु तया होतां, । कवणेहि काळीं, पार्था, । त्यांचा भावीं अभावीं ॥ ९ ॥

नासम्
मी नाहीं अधिष्ठान, । माझेन अभावें भासे भान, । तेणें पळमात्रहि तन्ही चैतन्य । नाहीं ऐसें, ॥ ३१० ॥

नत्वेव
नसेचि जाण निर्धारें, । अतेव्र असे हेंचि खरें, । भावाभाव निरंतरें । ग्यांचि उपटती. ॥ ११ ॥

त्वंन
तूंहि तैसाचि आत्मा । नाहीसा नससी, वीरोत्तमा, । तव सत्तया अनात्मा । भासे गुणात्मकु. ॥ १२ ॥ तव सत्तया गुणाभासु । भासे नभसे जाणिजसु, । अभावीं आपुलाहि पुरुषु । तूं सनातनु आत्मा. ॥ १३ ॥

इमे जनाधिपाः
आतां हे राजे वेगळाले. । ययांचीं विविधें स्थूळें, । तीं आत्मामेंदीं सकळें । जिरोनी जाती ॥ १४ ॥

न चैव न
आतां तेणें निजाकारें । आत्मस्वरूपें अक्षरें, । हे नसती ऐसें, बा रे, । कहींचि न घडे. ॥ १५ ॥ व्यक्तांचें भान, अभान, । जिया सत्तया भासे जाण, । ते भावीं अभावीं संपूर्ण । असेचि आत्मसत्ता. ॥ १६ ॥

अतःपरम्
आतां ययां शरीरांचांहि अभावीं, । कां प्रळयाचां प्रादुर्भावीं, । कार्याकारणाचा गांवीं । संहार होतां, ॥ १७ ॥

सर्वे वयम्
आम्ही अवघेचि निजाकारें । प्रकृतिगुणभावअभ्यंतरें । आत्मा ब्रह्म निरंतरें । बोधें ऐसे न, ॥ १८ ॥

न भविष्यामः
नाहींसि असण्हार नहों, । असोंचि अभावा न साहों; । तेणेंचि विचारें पाहों । अन्वयदृष्टीं, ॥ १९ ॥ तंव आत्मा, ब्रह्म, सनातन । तेणेंसीं भिन्न नसे सर्वभान । आतां अविनाश जग सगुण । हेंहि कां नव्हे ? ॥ २० ॥ भावीं अभावीं मृगजळाचां । सर्वत्र अभाओ नसे सत्याचा, । आता असतां तया भानाचा । कवणु विचारु ? ॥ २१ ॥ तैसें आत्माभिन्न । जग अविनाश जाण, । परंतु व्यतिरेकें तुज लागुन । बुझाविजतसे. ॥ २२ ॥

देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥

देहिनः
अविद्यादिगुणरहितु, । विद्यागुणसाक्षीभूतु । तो उभयउपाधिविविक्तु । आत्मा कैसा ? ॥ २३ ॥ जया नाम ना, रूप, गुण, वर्णु, । अंतादिमध्यभावविहीनु, । सच्चिदानंदु, निरंजनु, । ब्रह्म परम. ॥ २४ ॥ मग निजप्रकृतिसमायोगें । गुणाचां ठाईं रिघे, । त्या त्या अवस्था दृष्टीं जागे । तें ते शरीरीं. ॥ २५ ॥ तयामाजि रजोगुणें । जागरावस्थेजेनि स्फुरणें । विश्व होऊनि जाणे । तया बाह्य प्रपंचा. ॥ २६ ॥

अस्मिन्देहे

तैं वर्ततां ययें साकारें, । स्थूळदेहीं एकाकारें । स्वस्वरूपाचेनि विसरें । तेंचि जाला. ॥ २७ ॥ मी कृशु, मीचि स्थूळु, । मी काणु, मूकु, गौरु, शामळु, । एवं दृश्यु देहो सकळु । जो आपणु जाला. ॥ २८ ॥

कौमारम्

तेथें प्रथम बाळदशा । क्रमली अज्ञानवयसा, । मग चालों बोलों आपैसा । शिकता जाला. ॥ २९ ॥ धूळीवीण तो न खेळे, । शीतळे भूमीवरी लोळे, । विभूतिमाझारी घोळे । आवर्टीसी. ॥ ३० ॥ लज्जा नाथी काळें तेणें, । कामु, अभिलाषु, स्वार्थु, नेणे । साचें भयें भय न मने, । तैं माने लटिकेन. ॥ ३१ ॥

यौवनम्

मग तें कौमारत्व, धनुर्धरा, । वोसरों लागे सरसरा । दिवसां, मासां संवत्सरीं, । सांडितें होय. ॥ ३२ ॥ मग तारुण्य पावे क्रमेंचि, । तैं पूर्वील क्रीडा कैंची ? । कामु, क्रोधु, लज्जा, मोहो, आंगाची । वरव पाहे. ॥ ३३ ॥ दंभ, दर्प, अभिमान, । बळ, पारुष्य, बुभुत्सा, जाण, । रात्रिदिवसु ध्यान । त्वये कामिनीचें. ॥ ३४ ॥ बाळदशेचीं सकोमळें । तीं गात्रें जालीं सबळें । तेथें नाना साधनोपायमेळें । विषयबुभुत्सा. ॥ ३५ ॥

जरा

लव, त्रुटी, पळ, निमिष, । क्रमितां याम, अहोरात्रें, मास, । लोटती संवत्सर बहुवस, । होतां काळक्षपण. ॥ ३६ ॥ जेणें जेणें कीं, बापा रे, । पाउलें तारुण्य वोसरे । तेणें तेणेंचि संचरे । जरा आंगीं. ॥ ३७ ॥ तैं पळाले ते दंभ, दर्प, । आणि इंद्रियांचे आटोप, । कळों लागे पुण्यपाप, । तंव देहेन ठके. ॥३८॥ दाराकामु पालटला, । ममता नेणों तोचि जाला, । बुद्धि जाऊनि उरला । क्रोधु बहुवसु. ॥ ३९ ॥ अंधता जाले, दंत । ते पै गेले समस्त, । केश पडले विपरित, । गात्रें कंपती. ॥ ४० ॥ नेत्रश्रोत्रज्ञानहीन, । कर्मकरणा क्षीणपण, । ऐसी जरा ये कि, जाण, । तारुण्यासवेंचि? ॥ ४१ ॥

**यथा प्राप्नोति**

हें कौमारत्वाद्यवस्थात्रय । स्थूळ देहीं अनुभूय, । पुरुषातें होये प्रतीय-। मान कैसें ? ॥ ४२ ॥ अवस्था आंगींची वेसरे, । दुजी आंगीं सचरे, । तेणें देहगुणधर्म, बारे, । स्वभाव पालटती. ॥ ४३ ॥ तेथें आपुलया पालटा। नेणें देहिंचा देहद्रष्टा, । परि देह कैसें, सुभटा, । वर्तत असे. ॥ ४४ ॥ जळ कल्लोळेंसीं सुसाटे, । बहुतां दिवसाची नदी वाटे, । जीवन जीवनेंसीं न फुटे, । दिसे काल्हिचेंची. ॥ ४५ ॥ परतु पहिलें मिळे सागरीं, । मागें येते आन लहरी । तेहि मिळतां तिसरी । सर्वेचि पावे. ॥४६॥ ऐसा जळप्रवाहो पाहे । नित्य नवा नवा आहे । आणि पाहातया आन नोहे । काल्हिचेंचि जळ ॥ ४७ ॥ दिसे दीपकळिका निश्चळ, । काल्हिची ऐसी केवळ, । परंतु अगवालें चंचळ। कैसी वर्ते ? ॥ ४८ ॥ पहिला वेगु मिळे गगनीं, । तव सर्वेचि आनु मिळे मिळणीं, । दीपु अभिन्न इतुळेंनि । अखंडु दिसे. ॥ ४९ ॥ कठापासाव स्फुरे स्वरु । तो अखड दिसे निर्धारु, । परंतु पहिली ध्वनि समीरु । घेत गगनीं रिघे. ॥ ३५० ॥ वायो, पार्था, विचरे । तो मागें नवानवाचि भरे, । कीं पहिला तोचि हें खरें । मानिसील. ॥ ५१ ॥ तैसें दिवसेंदिवस वाळपण । गेलें तें नये मागुतेन, । क्षण-क्षणाचें आन आन । अनुभवत असे. ॥ ५२ ॥ ऐसा प्रवाहो नवा नवा शरीरीं, । मग पावे तारुण्यलहरी, । तेहि तद्वत अवधारीं । क्षणक्षणा नवी, ॥ ५३ ॥ तेणेंचिसीं अभिन्न । आलें जें वार्धक्य, जाण,। तेंहिक्षीण, प्रतिक्षणीं आन । तुझ अनायासें. ॥ ५४ ॥ एक भोगिलें प्राचीन, । दुजें भोगा आलें तें आन, । तेंहि सरे सरे तंव जाण । पावे तें नवें. ॥ ५५ ॥ साही विकार ते नवे, । देह पालटे स्वभावें, । अवस्था अवस्थेपाठीं पावे । हें नेणे देही. ॥ ५६ ॥ अन्नापासाव सांचे । ते धातु देहधर्में वेंचे, । कां ग्रासे रोगाचें । जैं उठणें होये. ॥ ५७ ॥ तेथें प्रतिदिनीं अन्न आन, । अन्न भेदें धातु भिन्न, । अतेच प्रवाहलक्षण । शरीर हें. ॥ ५८ ॥ तेथें वर्ततां तद्रुपु देही । पालट नेणें आपणा कहीं, । मानी मी ठाईंचा ठाई । असें जैसा तैसा. ॥ ५९ ॥

**तथा देहांतरप्राप्तिः**

तैसीचि, जाण पांडवा, । देहातरप्राप्ति जीवा,। कर्मप्रवाहो हा नवा । म्हणौनिया.

अस्मिन्देहे

तें वर्ततां यये साकारें, । स्थूळदेहीं एकाकारें । स्वस्वरूपाचेनि विसरें । तेचि जाला. ॥ २७ ॥ मी कृशु, मीचि स्थूळु, । मी काणु, मूकु, गौरु, शामळु, । एवं दृश्यु देहो सकळु । जो आपणु जाला. ॥ २८ ॥

कौमारम्

तेथें प्रथम बाळदशा । क्रमली अज्ञानवयसा, । मग चालों बोलों ऐसा । शिकता जाला. ॥ २९ ॥ धूळीवीण तो न खेळे, । शीतळे भूमीवरी लोळे, । विभूतिमाझारी घोळे । आवडीसी. ॥ ३३० ॥ लज्जा नाथीं काळें तेणें, । कामु, अभिलाषु, स्वार्थु, नेणे । साचें भयें भय न मने, । तें माने लटिकेन. ॥ ३१ ॥

यौवनम्

मग तें कौमारत्व, धनुर्धरा, । वोसरों लागे सरसरा । दिवसां, मासां संवत्सरीं, । सांडितें होय. ॥ ३२ ॥ मग तारुण्य पावे क्रमेंचि, । तें पूर्वील क्रीडा कैंची ? । कामु, क्रोधु, लज्जा, मोहो, आंगाची । वरच पाहे. ॥ ३३ ॥ दंभ, दर्प, अभिमान, । बळ, पारुष्य, बुभुत्सा, जाण, । रात्रिदिवसु ध्यान । तयें कामिनीचें. ॥ ३४ ॥ बाळदशेचीं सकोमळें । तीं गात्रें जालीं सबळें । तेथें नाना साधनोपायमेळें । विषयबुभुत्सा. ॥ ३५ ॥

जरा

लव, त्रुटी, पळ, निमिष, । क्रमितां याम, अहोरात्रें, मास, । लोटती संवत्सर बहुवस, । होतां काळक्षपण. ॥ ३६ ॥ जेणें जेणें कीं, बापा रे, । पाउलें तारुण्य वोसरे । तेणें तेणेंचि संचरे । जरा आंगीं. ॥ ३७ ॥ तैं पळाले ते दंभ, दर्प, । आणि इंद्रियांचे आटोप, । कळों लागे पुण्यपाप, । तंव देहेंन ठके. ॥३८॥ दाराकामु पालटला, । ममता नेणों तोचि जाला, । बुद्धि जाऊनि उरला । क्रोधु बहुवसु. ॥ ३९ ॥ अंधता जाले, दंत । ते पै गेले समस्त, । केश पडले विपरित, । गात्रें कांपती. ॥ ३४० ॥ नेत्रश्रोत्रज्ञानहीन, । कर्मकरणा क्षीणपण, । ऐसी जरा ये किं, जाण, । तारुण्यासंतीं. ॥ ४१ ॥

यथा प्राप्नोति

हें कौमारत्वाद्यवस्थात्रय । स्थूळ देहीं अनुभूय, । पुरुषार्ते होये प्रतीय-। मान कैसें ? ॥ ४२ ॥ अवस्था आंगींची वोसरे, । दुजी आंगीं संचरे, । तेणें देहगुणधर्म, वा रे, । स्वभाव पालटती. ॥ ४३ ॥ तेथें आपुल्या पाल्टा। नेणें देहिंचा देहद्रष्टा, । परि देह कैसें, सुभटा, । वर्तत असे. ॥ ४४ ॥ जळ कल्लोळेंसीं सुंसाटे, । बहुतां दिवसांची नदी वाटे, । जीवन जीवनेंसीं न फुटे, । दिसे कालिचेंची. ॥ ४५ ॥ परंतु पहिलें मिळे सागरीं, । मागें येते आन लहरी । तेहि मिळतां तिसरी । सर्वेचि पावे. ॥४६॥ ऐसा जळप्रवाहो पाहे । नित्य नवा नवा आहे । आणि पाहातया आन नोहे । कालिचेंचि जळ ॥ ४७ ॥ दिसे दीपकळिका निश्चळ, । कालिची ऐसी केवळ, । परंतु अंगवातें चंचळ । कैसी वर्ते ? ॥ ४८ ॥ पहिला वेगु मिळे गगनीं, । तंव सर्वेचि आतु मिळे मिळणीं, । दीपु अभिन्न इतुलेंनि । अखंडु दिसे. ॥ ४९ ॥ कंठापासाव स्फुरे स्वरु । तो अखंड दिसे निर्धारु, । परंतु पहिली ध्वनि समीरु । घेत गगनीं रिघे. ॥ ३५० ॥ वायो, पार्था, विचरे । तो मागें नवानवाचि भरे, । कीं पहिला तोचि हें खरें । मानिसील. ॥ ५१ ॥ तैसें दिवसेंदिवस वाळपण । गेलें तें नये मागुतेन, । क्षण-क्षणाचें आन आन । अनुभवत असे. ॥ ५२ ॥ ऐसा प्रवाहो नवा नवा शरीरीं, । मग पावे तारुण्यलहरी, । तेहि तद्वत अवधारीं । क्षणक्षणा नवी, ॥ ५३ ॥ तेणेंचिसीं अभिन्न । आलें जें वार्धक्य, जाण,। तेंहिक्षीण, प्रतिक्षणीं आन । तुझ अनायासें. ॥ ५४ ॥ एक भोगिलें प्राचीन, । दुजें भोगा आलें तें आन, । तेंहि सरे सरे तंव जाण । पावे तें नवें. ॥ ५५ ॥ साही विकार ते नवे, । देह पालटे स्वभावें, । अवस्था अवस्थेपाठी पावे । हें नेणे देही. ॥ ५६ ॥ अन्नापासाव सांचे । ते धातु देहधर्में वेंचे, । कां ग्रासे रोगाचें । जें उठणें होये. ॥ ५७ ॥ तेथें प्रतिदिनीं अन्न आन, । अन्न भेदें धातु भिन्न, । अतेव प्रवाहलक्षण । शरीर हें. ॥ ५८ ॥ तेथें वर्ततां तद्रूपु देहीं । पालट नेणे आपणा कहीं, । मानी मी ठाईंचां ठाईं । असें जैसा तैसा. ॥ ५९ ॥

तथा देहांतरप्राप्तिः

तैसीचि, जाण पांडवा, । देहांतरप्राप्ति जीवा,। कर्मप्रवाहो हा नवा । म्हणौनियां.

तेथें उदानु, चक्षु, पादु, बुद्धि, । करण मग अनुभविजे । तया रूपातें.॥९४॥ ते बुद्धि उदानाधारें । चक्षुइंद्रियीं संचरे, । रूपविषई स्फुरे । द्रष्टव्य तेणें. ॥ ९५ ॥ पादु करी गमनातें, । एवं त्रिपुटीचेनि येणें मतें, । अनुभविजे रूपातें, । पांडुपुत्रा. ॥ ९६ ॥ कर्ता, भोक्ता चित्त वर्ते; । प्राणु, शिश्न, रसना, करण तेथें; । रसु विषेया निभ्रांतें । मानसें जाणावें. ॥९७॥ चित्त प्राणाचेनि आश्रयें । रसनेचिया ठायां जाये, । तैं रसनानुभउ होये । जीवासि पैं. ॥ ९८ ॥ शिश्न प्रवर्ते रतीं । ते येकिं चित्ताची कर्मवृत्ति । रस तन्मात्रा, वीरपति, । यापरी भोगावे. ॥९९॥ भोक्ता, कर्ता, अहंकारु, । तेथें अपानु, घ्राणु, पायु, हा प्रकारु, । करण बोलिजे परिकरु । जैं गंधु साधे. ॥४००॥ अहंता अपानें उठे, । घ्राणद्वारा बाह्य प्रगटे, । मग गंधाचा तये पेठें । सुकाळु करी. ॥ १ ॥ अहंतेची कर्मवृत्ति । विसर्गयितव्यावरिती, । पायु म्हणिजे, वीरपति, । ऐसा गंधु भोगिजे. ॥ २ ॥ कर्ता, कार्य, कारण; । भोक्ता, भोग्य, भोगणें, जाण; । ज्ञाता, ज्ञेय, आणि ज्ञान; । ऐसी हे त्रिपुटी. ॥ ३ ॥ गुणांची वर्ते साभास । तें गुणत्रय परियस, । सांगिजैल सविशेष । उमजउनी. ॥ ४ ॥ जीवाचें जें प्रथम स्फुरण । तें सत्वात्मक ऐसें जाण, । ज्ञानरूप अंतःकरण । चतुर्धा जें. ॥ ५ ॥ तें कर्ता, भोक्ता, साधकु, । जीवातें वृत्तिपंचकु, । दुजा राजसु गुण येकु । उठी क्रियारूपें. ॥ ६ ॥ पहिला पंचकु प्राणाचा, । दशकु तया इंद्रियांचा, । करणभाओ ययाचा । असे निरंतरु. ॥ ७ ॥ तिजा तामसु अहंकारु । तेणें पंच तन्मातृकाविचारु । द्रव्यवंतु, साकारु, । अतेव कार्य तें. ॥ ८ ॥ एव त्रिपुटीरूपें गुणत्रय । स्वभावगुणीं साभासमय । वर्तत असतां, विषय । येती भोगातें. ॥ ९ ॥ हे प्रकृतीचां आंगीं गुण, । प्रकृति जीवाची, ऐसें जाण, । अतेव जीवदशे विषय सेवन । ते येणें प्रकृतिसंगें. ॥ ४१० ॥ आतां जीवदशा कैसी करणा । पुसलीळ हें, अर्जुना, । तरि सांगिजैल तें मना । आणि निरुतें. ॥ ११ ॥ आपणपयां नेणोन । आत्मया होये विषयस्फुरण, । तेंचि देहद्वयाचें कारण, । प्रसवे त्रिपुटीतें, ॥ १२ ॥ तेणेंसीं युक्त वर्ततां । जीउ म्हणिजे, पांडुसुता, । तेंचि देहद्वय विचारितां । जीवप्रकृति. ॥ १३ ॥ तया देहद्वयाचें कारण । जें आत्मविषईचें अज्ञान, । तेंहि तृतीयदेहआवरण । असेचि जीवदशे. ॥ १४ ॥ पुरुषु आपणपयां जाणे, । तेंहि जाणणें आव-

रग भानें, । अज्ञानें अन्यथा ज्ञानें । पासाव जया. ॥ १५ ॥ एवं ज्ञाना-ज्ञानकृत, जाण, । आत्मया जें वृत्तिस्फुरणं, । तेचि प्रकृति सगुण । जीव दशा म्हणिजे. ॥ १६ ॥ तोचि पुरुषु अपाणु । जाणोनि जाणिवे विलक्षणु,। सकार्य, अज्ञानविहीनु, । असे तो कैसा ? ॥ १७ ॥ सत्यु, सनातनु, विशुद्धु, । प्रकृतिगुणी, आब्राध्यु, । कार्यकारणोपाधिसंबंधु । न वर्ते जेथें ॥ १८ ॥ आपण पया ज्ञानशीळु । होतांची होये शबलु । मग अज्ञानें अन्ययाज्ञानें केवळु । म्हणे मी जीवात्मा. ॥ १९ ॥ जागृतीचेनि परिलोपें। वृत्ति उठे स्वप्नस्वरूपें, । तेथें साचोकारें मिथ्यासंकल्पें । भोगिजती भोग. ॥ ४२० ॥ असो अविविक्ता ज्ञानता, । विषयभोगु हा तत्वतां । जीवातें कैसा वर्तता, । देखिजतु असे ॥ २१ ॥

शीतोष्णसुखदुःखदाः

ज्या योग्या जया पंच तन्मात्रा भोग्या, । त्या शीता. उष्णा, सुखा. दुःखा, तया । देती विविधा. ॥ २२ ॥ शीतळेंचि स्पर्शे एकें । कालभेदें, पार्था आइकें, । उपजती सुखें दुःखें, । तें कल्पितेंचि. ॥ २३ ॥ तेंविचि संस्पर्शु उष्णाचा । तो काळ भेदें सुखादुःखाचा, । आनुहि स्पर्शु अर्थाचा । तो द्विविधुचि. ॥ २४ ॥ देहीं लागे मृदु, कठिण, । आध्यात्मिक, आधिदैविक, जाण, । दंडुपूजाआदिकरून । जें देहीं आडळे. ॥ २५ ॥ शब्दादिविषय समस्त । ते अनुकूळ, प्रतिकूळ अर्थ, । सुखदुःखभाव दात । यया लागुनी. ॥ २६ ॥ ते सुदुःखद अर्थ कैसे । विवेकाचेनि उन्मेषें, । पांडु पुत्रा, परियसें, । प्रकाशीन मी. ॥ २७ ॥

आगमापायिनः

सुखाची घडी ते सरे, । सवेंचि दुःख संचरे, । तेंहि काळें वोसरे । भोगीत असतां. ॥ २८ ॥ म्हणौनि अथिर जाणई, । सुखदुःखद, आगमापायी, । एथें सांगिजैल तें आइकई । कारण, बापा. ॥ २९ ॥ प्रारब्धापासाव शरीर । स्थूळ, आणि भोग समग्र । भोगीजत असतां क्षर, । नित्य नवे. ॥ ४३० ॥ भोगेंचि प्राचीन सरे, । तेणें सरसरां देह वोसरे, । आयुष्यजळ खोकरे, । थोरेंचिना देहीं. ॥ ३१ ॥ ते भोगहि प्रारब्धजनित, । यालागूनि क्षर समस्त; । आतां प्रारब्ध अथिर, येथ । एक कारण. ॥३२॥

प्रारब्ध संचिताचें रचलें, । तें संचित क्रियमाणाचि जालें, । आतां क्रियमाण म्हणितलें । तें मनेंद्रियव्यापार. ॥ ३३ ॥ आतां मनेंद्रियधर्म क्षर, । तज्जनित कर्म नित्यक्षर, । म्हणौनि आगमापायी समग्र । पांच भौतिक. ॥ ३४ ॥ आतां ते व्यापार कवण । म्हणसील, तरी सांगेन; । तेथें गमन, आणि आगमन, । तया पादांचें, ॥ ३५ ॥ त्यागादान करांचें, । वक्तव्य तये वाचेचें, । आनंदयितव्य शिश्नाचें, । पायूचा विसर्गु. ॥ ३६ ॥ जाण, श्रवणें श्रोतव्य, । त्वचेचें स्पर्शयितव्य, । नेत्रांचें द्रष्टव्य, । घ्रातव्य घ्राणें, ॥ ३७ ॥ रसयितव्य रसनेचें, । षड्विकार यया-स्थूळाचे. । क्षुधा, तृषा, धर्म प्राणाचे । पांडवा. ॥ ३८ ॥ व्यानु करी तृप्तीतें, । आप्यायन शरीरातें. । नाडीगतु अंतराळीं वर्ते । शरीरातें, ॥ ३९ ॥ मलमूत्रोत्सर्गु करी । अपानु समीरु तो अवधारी, । नाभी समानु तो सावरी । शरीरातें. ॥३४०॥ गात्रें करी चंचळें, । जडदेह तेणें चळें, । मुखींचें गीळ उगळे, । हे धर्म उदानीं. ॥ ४१ ॥ नागकूर्मादि पंचप्राण । आवांतुक देहीं वर्तमान । निमिषोन्मेषादि चंचळपण, । ते तयांची चेष्टा ॥ ४२ ॥ सुखदुःख जाणणें शरीरीं । तृष्णा कल्पना, अवधारीं, । लज्जामोह शोकव्यापारीं । मनचि दक्ष. ॥ ४३ ॥ स्वरूपाज्ञानकृतस्फुरण । काम रागात्मक जाण, । करीत प्रपंचविवरण । उठी कल्पनारूपें. ॥ ४४ ॥ तें प्रपंचोन्मुख मंतव्य, । जेणें तें मनसंभाव्य, । काम सकल्पसेव्य, । सुख-दुःख जया. ॥ ४५ ॥ मन चंचळा आवरिती । ऐसीजे विवेकवृत्ति, । ते बोद्धव्यात्मक, सुभद्रापति, । बुद्धि म्हणावी. ॥ ४६ ॥ नाना वृत्तींचेनि संन्यासें । एकाग्र अनुसंधानीं वैसे, । तें चेतव्यात्मक आपैसें । लक्षण चित्ता. ॥४७॥ ते अनुसंधानात्मक वृत्ति । चित्ताची गा वीरपति, । तेथं-चि क्रिया योगें अहंकृति । उठी ते अहंता. ॥ ४८ ॥ ऐसिया चारी वृत्ति । पासाव जया स्फुरती, । सकळां वृत्तींचां अंतीं । ज्ञानमात्र जें; ॥ ४९ ॥ तें जाणावें अंतःकरण, । तयांचें कैसें स्फुरण, । सांगिजैल अधिष्ठान । वृत्तींचें जें. ॥ ४५० ॥ संकल्परहित, जाण, । निश्चयापूर्वी संवेदन, । अहंता ना अनुसंधान । मात्र जेथें ॥ ५१ ॥ सहज निर्विकार संवेदन । आपुलिये वोळखीवीण । म्हणवीत असे अंतःकरण । जेथूनि वृत्ति स्फुरणें. ॥ ५२ ॥ हेंचि चतुर्धा वृत्तीं भिन्न । बोलिजे अंतःक-

रण । विषय, इंद्रियें, प्राण । उपजती येथूनीचि ॥ ५३ ॥ लिंगदेहसाभास अवघें । हेंचि स्थूळ देहाचेनि संगें । देहबुद्धीतें लागे । प्रकाशु करूं ॥५४॥ तैं काम, क्रोध, मद, मत्सर, । डंब, प्रपंच, व्यापार, । अनेक गुणधर्म अपार । अहंता, ममता. ॥ ५५ ॥ शांति, सहिष्णुता, प्रकाशु, । हा सत्वगुणुसाभासु । अस्थिरता, प्रवृत्ति, अभिलाषु । निपजे रजोगुणें. ॥ ५६ ॥ अप्रकाशु, जडत्व, क्रोधु, । तमोगुणु हा प्रसिद्धु; । देहाभिमानें गुणभेदु । हा देहींचि उपजे. ॥ ५७ ॥ अहंतानिष्ठ गुणत्रयं । तेणें लिंग त्रिपुटीमय, । आतां, प्रकृतिनिष्ठ गुणकार्य । तें असे वेगळेंची. ॥ ५८ ॥ स्थूळजागृति रजोगुणें, । लिंगस्वप्न सत्वें गुणप्रधानें, । अज्ञानसुषुप्ति तमें तेणें । कार्य उपजे. ॥ ५९ ॥ महाकारण तुर्यावस्था । हें शुद्ध सत्वकार्य, पार्था, । हा गुणादिवृत्तिविकारु, आइकतां । वहुतु असे. ॥ ४६० ॥ तयापासाव क्रियमाण । संचित होये प्राचीन. । तें देहा, देहभोगा, कारण । सुखदुःखा होये. ॥ ६१ ॥ आतां कारणचि जेथें क्षर, । तेथें कार्य कैचें स्थिर ? । म्हणौनि सुखदुःख शरीर । तें नीच नवें ॥ ६२ ॥ देखिलेंचि स्वप्न न दिसे, । सुखदुःख जाण तैसें, । आतां आन येक, परियसें, । रोकडेंची.॥६३॥ जागृति भासे तें सीवणा, । सीवणाचें जागरीं, अर्जुना, । नाथी सुखदुःख पुनः पुनः । नीच नवें जें. ॥ ६४ ॥ सुषुप्ति नाथी अवस्थाद्वय, । तेथिचें सुखहि मिथ्यामय, । तेंहि निद्रासुख काये । वर्ते जागरणीं ? ॥ ६५ ॥ अवस्थाजन्य, वीरा, । तन्नाशें नाशे, धनुर्धरा, । तें सुखदुःख देहांतरां । कैसें पुरैल ? ॥ ६६ ॥ अगा येकीचि असतां जागृति, । आना करणाचें आनाप्रति । सुखदुःखभान पुडती । पाहे कैसें ? ॥ ६७ ॥ जेणे द्वारें निपजे, । साच ऐसें देखिजे, । तेथेंहि स्थिर न देखिजे, । आगमापायी. ॥ ६८ ॥ जेणें क्षणें जेथें दिसे, । तेथेंहि पाहातां मानसें । कल्पनामात्र असे । सुखदुःखभान. ॥ ६९ ॥ स्वरूपाज्ञानें पाहातां । सुखदुखःभान दिसे, पार्था, । तें विचारें हाती धरितां । न संपडेची. ॥ ४७० ॥

**अनित्याः**

आतां स्वरूपाचेनि निश्चयें । सुखदुःखदें जें विषयें । तें मिथ्या कीर अविद्यामयें । नभसतीचि. ॥ ७१ ॥ तेथें देहें ना त्या अवस्था, । तेथें प्रपंच

ना सुखदुःखवार्ता, । अनित्य तें नित्या संता । आत्मया न वर्ते. ॥ ७२ ॥ सूर्यदृष्टीं नाथी तम, । जागृता स्वप्न मनोरम; । सत्य, सनातन, निःसीम, । तेथें असत्य नसे. ॥ ७३ ॥ आतां तूं ह्मणसील ऐसें, । स्वरूप दृष्टी जें न भसे । ते उरलां देहीं भासे, । काय करणें ? ॥ ७४ ॥

तांस्तितिक्षस्व

तारिं छटिकेंनि देहे तेणे । छटिकें सुखदुःख जें माने, । तें उगेंचि लागे साहाणें, । पांडवा तुवां. ॥ ७५ ॥ सांग, मृगजळ उपसावें, । कीं वंध्या-सुतातें वधावें, । छायेचें परि छेदावें । शिरकमळ काये. ॥ ७६ ॥ महेंद्र-जाळींचीं रचना । मोडितां अज्ञानत्व, अर्जुना, । जेणें साचाचया स्थानीं । पाविजत नसे. ॥ ७७ ॥ तम जाळुं पावकें, । रजतभ्रमु तुकुंतुके, । कीं रज्जुसर्पा तंवकें । हाणत उठावें ? ॥ ७८ ॥ भ्रमोनि वोसरलया भ्रमु, । आगीं तो काढितां वृथा श्रमु, । सहज नाशे क्रमु । विश्रांताचा. ॥ ७९ ॥ तैसें आत्मदृष्टीं निरसलें । मिथ्या शरीर सुखदुःखमेळें । प्रारब्धाश्रयें उरलें । यथापूर्व. ॥ ४८० ॥ दग्ध पटाची जैंवि घडी । तंतुमय दिसे फुडी, । जे उकळितां रोकडी । भस्मभूत. ॥ ८१ ॥ तेथिचें जें सुखदुःखभान । तयांचें तेचि निरसन, । जें मिथ्यात्वें मिथ्या सहन । मिथ्या दृष्टीं. ॥ ८२ ॥ प्रारब्ध जाये शेवटा, । तैं देह न उरे, सुभटा, । तें सुखदुःखसहित वाटा । लागे मरणाचिया. ॥ ८३ ॥ जीवन्मुक्ताचें हारपलें । तें पुडती नाहीं देखिलें, । देहादिसुखदुःख जितुलें । प्रपचभान. ॥ ८४ ॥

यं हि न व्यथयंत्येते पुरुषं पुरुषर्षभ ।
समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥

हे पुरुषर्षभ

अवधारीं, गा सुभटा, । पुरुषांमाजि अतिश्रेष्ठा, । सांगिजेल ते निष्ठा । पांडुकुमरा. ॥ ८५ ॥ विषयेंद्रियसंयोगें । सुखदुःख जें मना उमगे, । तें आगमपायी अनित्य अवघें । ऐसें जाणोनी, ॥ ८६ ॥

यं पुरुषम्

जे पुरुषु विविक्तात्मा । न लगतु प्रकृतिगुणधर्मा । कर्माकर्मविकर्मा । नाडळ-

तूंचि. ॥ ८७ ॥ कां शब्दब्रह्म बोधलेपणें । गुणी, गुण, असंत जाणे, । मग अवस्थाचें सांडणें । करूनि पाहातां ? ॥ ८८ ॥

समदुःखसुखम्

देह आणि देहिक । सारिखेंचि सुखदुःख । स्वप्रभान स्फटिक । तैसे देखे. ॥ ८९ ॥ सुखदुःखाचा सांचपणीं । गुणचि आभासती तिन्ही । आणि गुणाचां तत्त्वदर्शनीं । प्रकृति साच. ॥ ४९० ॥ निर्धारितां ते प्रकृति । विवर्तु मात्र, भूपति, । तेथें आत्माचि तो सत्यप्रतीति । येऊं लागे. ॥ ९१ ॥ तया आत्मया निजानंदा । गुणेंसीं प्रकृति नसे कदा, । यापरी मिथ्यात्वें द्वंद्वा । देखे सारिखेंचि ॥ ९२ ॥

धीरम्

जाणोनि जाणीवे न साहे, । प्रकृतीचा निराशु साहे, । तयें प्रकृती न साहे, । येणेंसीं वेगळेंपण. ॥ ९३ ॥ मग पूर्णताचेनि अंगें । सहिष्णु होये आंगें; । मृगजळ किरणसंगें । जेंवि सूर्यें धेलें, ॥ ९४ ॥ तेंवि सुखदुःखमान देहीं । विषयोपस्पर्शें जाणई, । भासे इंद्रियाचा ठाईं । तया मनातें. ॥ ९५ ॥ तेथें भोक्ता, भोग्य भोगणें, । ये त्रिपुटीचेनि आश्रयपणें । आंगीं साहे, परि नेणे । आत्मदृष्टि. ॥ ९६ ॥

एते न व्यथयंति

मग ते मात्रांचे संस्पर्श । होतु सुखदुःखाकारें साभास, । परंतु जयाचें उदास । स्वरूप त्रिपुटीसीं. ॥ ९७ ॥ अनुकूळ ना प्रतिकूळ । सूर्या किरणीं मृगजळ, । तैसें भान मात्र सकळ । तें असोनि नाहीं. ॥ ९८ ॥

हि

शास्त्राचार्यउपदेशें । स्वरूप निर्धारें हे ऐसें । जयाचा हृदईं बैसे । सर्वकाळ, ॥ ९९ ॥

सः

तो न भोगूनि सर्व भोगी, । भोगूनि सर्वा अभोगी, । संगसहितु असंगी, । असंगी सगसी ॥ ५०० ॥ सन्मात्रु आत्मत्वें स्थाणु, । सर्वाश्रयत्वें सहिष्णु, । असतें येणें सीणु । न पवेचि जो तो. ॥ १ ॥

अमृतत्वाय कल्पते

तो मुक्त म्हणावया, पांडवा, । योग्यु जाणावा तुवां, । देहीं असोनि देह-

भावा । नाडळेचि जो. ॥ २ ॥ जितूचि मुक्तु, विदेही, । न बधिजे देहाचा ठाईं; । यालागीं सांगेन तें आइकई । वचन माझें. ॥ ३ ॥

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः

उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्वदर्शिभिः ॥ १६ ॥

असतः

तरि जें आत्मेन न होइजे । गुणयुक्त ऐसें देखिजे, । तें सद्विलक्षण जाणिजे । असत म्हणोनि. ॥ ४ ॥ तू म्हणशील जरी, पांडवा, । अनात्मभाओ मातें जाणवा । तरि अनित्या, असता, सर्वा । रूप करू ॥ ५ ॥ बा रे. पृथ्वी, आप, तेज, वायो, गगन । यया महाभूतांचें निर्माण । स्थूळ शरीर ऐसें जाण । आत्मवासी. ॥ ६ ॥ ते दृश्य, आणि षड्विकारी, । आभासे एके जागरीं, । नभसेचि अवस्थीं एरीं, । वारे नित्य नव्हे. ॥ ७ ॥ या परी हें नव्हे आत्मा, । बोलिजे यालागीं अनात्मा, । जो जागे या शरीरधर्मी । सर्वदा साक्षिनें ॥ ८ ॥ येथींची जे जागरावस्था । तीतेंहि आत्मा जाणता, । अतेन अनात्मा ते तत्वता । दृश्य म्हणौनि. ॥ ९ ॥ स्थूळदेह जागरावस्था । एथें अभिमानित्वें वर्तता, । तो विश्वआत्माचि तत्वता । तदाश्रयो ॥ ५१० ॥ तोहि अभिमानु सगुणु । आत्मा येथींचा जाणु, । अतेन एतद्विलक्षणु । बोलिजे अनात्मा. ॥ ११ ॥ एथें नेत्रस्थान ते दृश्यचि । स्थूळ भोगु आत्मया वेधुचि, । पचविभ प्रवृत्ति रजोगुणाची । दृश्यु तोहि. ॥ १२ ॥ एव प्रणवीं प्रथम पादु. । अकारें नाम्यु जों प्रसिद्धु । तो जाणे आत्मा यथाविधु । प्रकृतिद्वारा. ॥ १३ ॥ तदृष्टीं जें प्रपचभान । तें अनात्मक साच जाण, । विराटउत्पत्ति ब्रह्मा, म्हण, । असत्पदार्थु हा. ॥ १४ ॥ आता तें स्थूळदेह कर्मज, । कर्म तें कारणजन्य बुझ, । तें कारण विचरे सहज । आगे कर्तया. ॥ १५ ॥ एव कर्ता, कार्य, करण, । एतदात्मक लिंग, जाण । जें कर्मद्वारा कारण । होये स्थूळ देहा ॥ १६ ॥ लिंगदेह जव न मरे, । तव हें स्थूळ देह खरें, । यालागीं तेंचि आधीं चतुरें । विचारावें. ॥ १७ ॥ शब्द, स्पर्श, रूप, रस, गध, । हे विषय पाचहि प्रसिद्ध, । ज्ञेय, भाग्य यथाविध । म्हणौनि अनात्मा ॥ १८ ॥ वाचा, पाणि, पाद, पायु, उपस्थ. । हें कर्मकरण आत्मया समस्त । ज्ञेय म्हणौनि मिथ्याभूत । बोलिजे अनात्मा. ॥ १९ ॥ श्रोत्र, त्वकु, चक्षु, रसना, घ्राण, ।

आत्मया वेद्य हे ज्ञानकरण, । तो हेंचि नव्हेगा, म्हणौन । अनात्मा वेंद- ॥ ६२० ॥ व्यानु, समानु, उदानु । प्राणु, आणि अपानु, । यया पंचविधा पवना, जाणू, । तो आत्मा वेगळाचि. ॥ २१ ॥ अहंका- रातें आत्मा जाणे, । अहंकारु आत्मया नेणे, । अतेव तोहि असत पणें, । अहंकारु वेगळाचि. ॥ २२ ॥ अनुसधानात्मक चित्त । आत्मया ते ज्ञेयभूत, । अतेव आत्मा नव्हे निश्चित । जाणावे तें. ॥ २३ ॥ बोद्धव्या- त्मक जाण बुद्धि । तीतें नाहीं आमसिद्धि, । आत्मा जाणे त्रिशुद्धि । म्हणौनि वेगळा. ॥ २४ ॥ मन, आणि अंतःकरण, । आत्माचि जाणे याची खूण, । यालागीं अनात्माचि त जाण । परि आत्मा नव्हे. ॥ २५ ॥ ऐसें पचविसा तत्वांचें । लिंगुदेह आत्मयांचें, । आत्माचि जाणे ठाईंचें । म्हणौनि अनात्मा. ॥ २६ ॥ आत्मस्वरूप नित्य, संत, । म्हणौनि लिंगदेह हे असत, । आता स्वप्न उठी तज्जनित । तेंहि अनात्मा. ॥ २७ ॥ लिंगदेह, स्वप्नावस्था । ययां दोहींतें मी जाणता, । अभिमानु हाहि तत्वतां । आत्मया दृश्यचि. ॥ २८ ॥ यालागीं तैजसु तोहि । आत्मया वेद्य आइकईं; । म्हणौनि संतत्वें, पार्था जागईं, । आत्मा निराळा. ॥ २९ ॥ प्रविविक्तु भोगु कठस्थान । यातें आत्मयाचें ज्ञान. । जाणे दृश्यत्वें म्हणौन । आत्माचि तें न घडे. ॥ ६३० ॥ अविवेचा हा सत्व गुणु । प्रणवा द्वितीय चरणु, । उकारु म्हणिजे तो सगुणु । नव्हेचि आत्मा. ॥ ३१ ॥ एतद्रूपीं आभासे । हिरण्यगर्भसिध्य विविष्णु ऐसें । तेंहि दृश्य आत्मया असे । अतेव असंत. ३२ ॥ पार्था, देहद्वयाचें कारण । आत्मयां आपुलें अज्ञान, । जेणेंविण अन्यथाज्ञान । देहद्वय नाथी. ॥ ३३ ॥ तेंहि अज्ञान विचारिता । आत्माचि जाणे, पांडुसुता, । अतेव तत्साक्षी स्वरूपवेत्ता । आत्मा सनातनु. ॥ ३४ ॥ अज्ञान आत्मया दृश्य, । अनात्मा असंत तें अवश्य, । सुषुप्ति तेंहि प्रकाश्य । आत्मयातें. ॥ ३५ ॥ कारण देहसुषुप्ति । उभयसाक्षींचें अभिमान वृत्ति, । तेंहि आत्माजि स्वप्रतीतीं । जाणू जाणे. ॥ ३६ ॥ आनदुभोगुस्थान हृदय, । आत्मया तें वर्ते ज्ञेय, । म्हणौनि असत तें अनात्ममय । जाणावें सुजाणीं. ॥ ३७ ॥ ऐसा पंचविधु तमोगुणु । प्रणवा तृतीय चरणु, । मकारु मत्रा म्हणौनु । नव्हे सतु आत्मा. ॥ ३८ ॥ एतत्कारण चतुरा । माया प्रळयोर........। आत्मया अक्षरा । अपरस्थानीं.

॥ ३९ ॥ अज्ञाना जन्मस्थान । ते आत्मयाचें स्वरूपज्ञान, । तेंहि दृश्य महाकारण । देह आत्मराजा. ॥ १४० ॥ जेथ वर्ते तुर्यावस्था, । तियेचा आत्माचि जाणता, । यालागीं विशुद्धा संता । वेगळेंचि हें. ॥ ४१ ॥ महाकारणा तुर्ये जाणु । तो प्रत्यगात्मा आत्मअभिमानु, । आत्मया दृश्यु म्हणौनु । अनात्मा हा. ॥ ४२ ॥ आभास, भोगु, मूर्ध्निस्थान, । आत्मया येथ विपई ज्ञान, । हें आत्माचि ऐसें न म्हण । विलक्षणु जें. ॥ ४३ ॥ हे अर्धमात्रा प्रणवाची । जाणता येथिचा आत्माचि । यालागूनि असंतसताची । तुटी न करीं. ॥ ४४ ॥ एतद्दृष्टीं आभासलें । प्रकृतिपुरुषत्व निर्धारलें, । सर्वेश्वरत्व म्हणितलें, । तेंहि असंत. ॥ ४५ ॥ यापरी साक्षत्वसाक्षी, । विलक्षणसाक्षी, आश्रयसाक्षी, । आत्मा तो स्वरूपसाक्षी । साक्षित्वशून्यु. ॥ ४६ ॥ यापरी जें जें आत्मा नव्हे, । तें तें असत अघवें; । माया अविद्यात्मक स्वभावें । जें कार्यकारण. ॥ ४७ ॥

भावो न विद्यते

तें असतत्वें काहीं नसे, । मिथ्या मृगजळ जैसें तैसें, । वांझेचिया पुत्रा नसे । जैसें अस्तित्व. ॥ ४८ ॥ तेथें कवण सुख, कवण । दुःख, आणि भोक्तेपण, । कार्य, कारण, ना कारण, । कर्ता तेथें ? ॥ ४९ ॥ असत स्वस्थानीं ठाओ । तया सुख दुःख कैं, हा भाओ । तें न शके टाकूं ठाओ । तया सत्याचा. ॥ १५० ॥

सतः

आता अनाभावरहितु, । आत्मा निरुपाधित्वें शांतु, । प्रकृति गुणाचा साधातु । न वर्ते जया. ॥ ५१ ॥ देहचतुष्टयविहीनु, । अवस्थाचतुष्टयविलक्षणु, । अभिमानचतुष्टया पासूनु । वेगळाचि जो. ॥ ५२ ॥ ऐसी अविद्या गुणरचना, । प्रणवु पुरुषु हे कल्पना, । जयाची कां, अर्जुना, । आधी निरसली. ॥ ५३ ॥ जो चिदानंदैक, सद्वस्तु, । आत्मा, सतु, निराभासु, । कार्यकारणोपाधिउदासु । कैसा पुनरपि ? ॥ ५४ ॥

अभावो न विद्यते

नाहीं ऐसा, अर्जुना, । नव्हे जो, बा रे विचक्षणा, । आत्मा सगुण, गुणा, अगुणा, । त्रिगुणा, अतीत. ॥ ५५ ॥ अस्तित्वें, बा रे, जयाचेन । मिथ्या-

हि जें अनात्मभान, । साच रूपर्यात आपण । भासों लागे. ॥ ५६ ॥ रज्जूचेनि साचारपणें । लटिकिया सर्पाचें असणें, । दृष्टीचेनि झावळपणें । अनुभवा ये. ॥ ५७ ॥ सत, पार्था, अधिष्ठान । मृगजळीं साच किरण, । म्हणोनितें मृगां जीवन । साच जाले; ॥ ५८ ॥ तैसी सत्ता आत्मयाची । ते अवभासक अनात्मयाची, । सेखीं ते जेथिंचे तेथेंचि । असंत नसे. ॥ ५९ ॥ जेथील्ल, बापा, जो विवर्तु, । तो तद्दृष्टींचि मिथ्या जाणतू । आत्मा सर्वदा नित्यु, शान्तु, । सतु, सनातनु. ॥ ५६० ॥ तरा सुखदुःखाचें भान, । असत जें विषयसेवन, । तें आथीचिना, जाण, । जैसें तम भास्करीं. ॥ ६१ ॥

उभयोरुभयोरपि

अनात्मा कीरु, असंतु, । आत्मा निरुपाधिकु, सतु, । ययां दोहींचा साधातु । अनादि असे. ॥ ६२ ॥ हेचि म्हणति ब्रह्ममाया, । हेंचि नित्यानित्य, धनजया, । हाचि पुरुषु, हेचिछाया, । प्रकृति गुणमयी. ॥ ६३ ॥

अंतस्तु

यया दोहींचा निर्धारु, । तोचि नित्यविचारु । सारासार विभागप्रकारु । बोलिजतु असे. ॥ ६४ ॥ तो नेणतांचि शाद्विक, । वेडवाटी जाले मूक, । युक्ति न चले, बा रे, आणिक । सद्गुरुवाचूनी. ॥ ६५ ॥

तत्वदर्शिभिदृष्टः

अतेव सद्गुरूचेनि वचनें । निरसलीं जयाचीं अज्ञानें, । जयां स्वस्वरूपाचें देखणें, । निवळले अंतरीं. ॥ ६६ ॥ अपरोक्षआत्मज्ञानसिद्धि । सारासारीं वर्ते बुद्धि । आत्मानात्मविचारसिद्धि । कसी ज्ञानियांची? ॥ ६७ ॥ सद्विलक्षण असत, । असद्विलक्षण तें सत. । ऐसें ज्ञान अनुचित । अनुभवसिद्धां. ॥ ६८ ॥ सद्वैलक्षण्यें असत । वर्ते, हें नव्हे उचित; । निरङतांचि मिथ्याभूत । ऐसें थायी. ॥ ६९ ॥ किरणावेगळें मृगजळ । घटां प्राथिलें शीतळ, । ऐसें हें वचन निर्फळ । वाचकाचें. ॥ ५७० ॥ शुक्ति खडूनि निवटिलें । मुसे रजत आटिलें, । जाणतें माणूस न बोले । ऐसें वचन. ॥ ७१ ॥ जें जेणेंवीण न वर्ते । तें तेणेंसी वेगळें वर्ते, । तें अनित्यपण तयातें । बोलोंचि नये. ॥ ७२ ॥ आतां असतेंसी वेगळ ।

कीजे संत निर्मळ, । तैं तें झाडूनि मृगजल । किरण काळत्रयें. ॥ ७३ ॥ दोराचेनि एकपणें । भुजंगा साच होणें, । स्वतन्त्र अमात्रयाकारणें । जो कांहीं नसे. ॥ ७४ ॥ तेथिंचा वारूनि विखारु, । घेऊनि येतां दोरु, । दृष्टिभ्रमें साचारु, । तेथेंचि दिसे. ॥ ७५ ॥ छाया साडूनि परदेशीं । पळे जो, पांडवा परियसीं, । ते पाठी लागली, ऐसी । मति मूर्खाची. ॥ ७६ ॥ शर्करा उलंडूनि गोडी । जो कीं, पार्था, तळी पाडी, । तो विचारितांतें खोडी । ठेवील गा. ॥ ७७ ॥ जये वस्तूचा जो विवर्तु । तो तिये वेगळा न वर्ततु, । काये निवडावें सांग तूं, । सत्य आतां? ॥ ७८ ॥ म्हणौनि सत्ता विलक्षण । असंत, ऐसें न म्हण, । असंता वेगळें कवण । संत करी? ॥ ७९ ॥ तरी सदसद्भाव समरस । असतां एकत्र, परियस, । सत्ता असत, बहुवस, । तें नवर्ते काळत्रयीं. ॥ ८० ॥ भासलेंहि असतभान । परि तेथें ते संताचि आसमान, । दोंचां निर्धारीं येकपण । निर्धारत असे. ॥ ८१ ॥ अनात्मतत्व केव्हांहि । आहे म्हणावया योग्य नाहीं; । आत्मस्वरूप संत कहीं, । तें नाहींसें नव्हे. ॥ ८२ ॥ निर्धारें धरितां असद्भावो, । सांपडे तो सत्यात्मस्वभावो, । विवर्ता हाणतां घावो, । पडे अधिष्ठानीं. ॥ ८३ ॥ नित्यानित्य मुनिर्धारितां । नित्याचि निश्चित असे, पार्था, । अनित्य असंत तें तत्वतां । कांहींचि नसे ॥ ८४ ॥ असो अनित्याची कथा, । नित्याचां ठाईं, पांडुसुता, । नित्यात्मस्वरूप आतां । सांगों सविस्तर. ॥ ८५ ॥

अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।
विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ १७ ॥

इदं सर्वम्

पांचभौतिक साकार, । दृश्यमात्र चराचर, । ब्रह्मांड, आणि समग्र । पीड जीवांचे; ॥ ८६ ॥ लिंगदेह पैं अनेक, । आणि हिरण्यगर्भ एक, । एवं सकार्यकारणात्मक । देहद्वय हें. ॥ ८७ ॥ अनंतें अज्ञानें जीवांची, । आणि मायाशक्ति ईश्वराची, । पासाव जया स्थूळसूक्ष्माची । उभवणी हे. ॥ ८८ ॥ ज्ञानरूपें बहुवसें । महा कारणें जीवां, परियसें, । तत्कारण ईश्वरीं असे, । तेयें किं महामाया. ॥ ८९ ॥ जागृति, स्वप्नें, सुषुप्ति, । आणि तुर्याहि वद्धती, । उत्पत्ति लयो, वीरपति, । साक्षित्व ईश्वरीं. ॥ ९० ॥ अभि-

मानचतुष्टयेंसीं प्रत्यगात्मा, । नैकरूपी विज्ञानात्मा, । ब्रह्माविष्णुरुद्रमहात्मा, । आदिपुरुषु. ॥ ९१ ॥ ऐसें जें कार्यकारण, । प्रकृतिद्वयाचें भान, । गुणमय साभासमान, । नामरूपात्मक. ॥ ९२ ॥

येन ततम्

जेणें संपूर्ण निराभासें । जळतरंगन्यायें, परियसें, । स्फुरलें संव्याप्त अनायासें, । पांडवा गा. ॥ ९३ ॥ जये रज्जूचां स्थानीं । सर्पभ्रमाची मांडणी, । तये सर्पाभिव्यक्ति व्यापूनि । वर्ते रज्जूचि. ॥ ९४ ॥ सुवर्णे व्यापिले अलंकार, । घटमठीं मृत्तिका समग्र, । तेंवीं व्याप्येंसीं निरंतर । व्यापक चैतन्य. ॥ ९५ ॥ नाना मृगजळाचे कल्लोळ । तेथें वर्ते तें किरणाचि सकळ, । स्थिर, पूर्ण, आणि विशाळ, । तें जैसें, तैसेंचि. ॥ ९६ ॥

तदविनाशि तु

आभासकाळीं तें आभासो, । विनाशकाळीं सुखें नाशो, । उत्पत्तिकाळीं प्रकाशो । पाहिजे तितुलें; ॥ ९७ ॥ परंतु किरण स्वस्थानीं । तें जैसें तैसें असे निदानीं, । जें विवर्ताकारें होऊनि । तैसें नव्हे. ॥ ९८ ॥ तद्वत् सकळ साभास । असंत सर्वदा, परियस, । तेथें तें संत चिदाभास । निजात्मचैतन्य. ॥ ९९ ॥ अज, अविनाश, अखंड, । अमोघ, घन, निबिड, । विवर्तु जेथें कोट । मायादिगुणाचें. ॥ १०० ॥

विद्धि

ऐसें निभ्रांत: दृष्टीं । तत्त्वें जाणे, गा किरीटी; । तत्त्व पदाची तूटी । जाणोनि वाच्यांशें. ॥ १ ॥ द्रष्टादृष्टीं, संकटीं, । दृष्टि पावलीस दाटी, । ते द्रष्टेपणाची शेवटीं । संपादूनियां. ॥ २ ॥ देखणें विलया जाये, । वरि देखणेपणीं न समाये, । देखणें तें जें होये । देखावया. ॥ ३ ॥ तेथ अभाओ लागे कुळा । द्रष्टादृष्टी जिवाळा । द्रष्टेपणेंसीं वेगळा । जे व्हेळीं होसी. ॥ ४ ॥ यत्नाची मोडे भाप, । अयत्न ठेले निःशेष, । उन्मेषु तेंचि निमिष, । जें प्रत्रोधतां. ॥ ५ ॥ देहायवस्थाव्यतिरेकें । योसरलेनि वस्तु विवेकें, । आपण पयांठाइकें । करूनि ठाईं. ॥ ६ ॥ स्वरूपाचि स्वरूपाचें । करीं देखणें आंगाचें, । मग जाणेना मज याचें । अविनाश ब्रह्म. ॥ ७ ॥ वृत्तिपासाव योसर । पात्रे कां न पवे विचार, । तंव सहजस्थिति चतुर ।

होई जाणावया. ॥ ८ ॥ जयाचा वृत्तिविसंचु । सकळामानापरि संचु, । साचें असाचे येणें साचु । तो जाण आत्मा. ॥ ९ ॥ नाशलेनि येणें भानें । अविनाश जें, तें तूं जाणें, । ते भासलेनि हि तेणें । लोपेना प्रकटे. ॥ ६१० ॥

अस्याव्ययस्य

तया अव्यया, जगद्धरिता, । आत्मया, सहजा, शांता, । प्रकृतिगुणनिरस्ता, निरूपाविकातें, ॥ ११ ॥

विनाशं कर्तुम्

येणे प्रकृतिगुणाभासें । अथवा त्याचेनि विनाशें । नाशु करावया अविदुषें । प्रवर्तली जन्हीं, ॥ १२ ॥

कश्चिन्नार्हति

तन्हीं वस्तूचिया विनाशा, । अग्रधारीं गुडाकेशा, कव्हणी करूं न शके ऐसा, । माझा निर्धारु. ॥ १३ ॥ असंताचा जो हरासु । तो संतांचा अति प्रकाशु, । जेणें असतचि परिग्रासु । कीजे विवर्ताचा. ॥ १४ ॥ असो, तें प्रलयीं न मरे, । प्रळयोचि जेणे सहारे, । रुद्र कर्ता हे स्फुरे । सत्ता जयाची, ॥ १५ ॥ मरणें, जिर्णें, मारणें, । जयाचेंनि साचें निदानें, । तया अविनाशिया कारणे । कवण वर्धा ? ॥ १६ ॥

अंतवंत इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।
अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युद्धस्व भारत ॥ १८ ॥

हे भारत

न मोडता आंगींचें अव्ययपण, । करीं प्रकृतीचे अधिष्ठान, । गुणी प्रवेशला देहधारण । अन्वयें सपादी. ॥ १७ ॥

शरीरिणः

तो शरीराश्रयो शरीरीं । अवस्था भोगी चान्हीं; । गुणी गुणात्मा धरी । गुणाभिमानु जें. ॥ १८ ॥ अववान देईं, वीरा, । जो असोनि शरीरीं, शरीरा । नाडळतु साता, धनुर्धरा, । आत्मा कैसा ? ॥ १९ ॥

अनाशिनः

अवस्थेचेनि पालटें । अवस्था शरीरेंसीं आटे, । नें अव्ययपण तें न तुटे ।

वस्तूचे जये. ॥ १२० ॥ मरणान्तस्ये विनाशे । स्थूळ शरीर, परियसें, । तेथें अविनाशतत्व आपेसें । ते असे असतची ॥ २१ ॥

नित्य

विनाशु नाथीं जये वस्तू, । वृद्धि ना उपजु जाण तू । तो नित्यु, सिद्धु, आत्मा स्वस्थु, । सनातनु सदा. ॥ २२ ॥

अप्रमेयः

प्रमाता, प्रमाण, प्रमेय, । नरते जेथ हें त्रय, । तें परब्रह्म अप्रमेय । निजात्मस्वरूप. ॥ २३ ॥ दर्शनें जाली कुठितें, । वेडावलीं शास्त्रें समस्तें । वेद परतले जयातें । न पवतीचि. ॥ २४ ॥ अतत्वादु वादागा । न स्पर्शे शब्दु आगा । जयाचिया, तें, आइकें गा, । प्रमेय नव्हे ॥ २५ ॥ मायेचें माप विरे, । विचारिता विचारु सरे, । स्फूर्तीचा कपु जिरे । जये निरंजनीं. ॥ २६ ॥ दृष्टांत गेले वाया, । उपमाना तूटी, धनंजया, । आता निर्विकल्पा अद्वया । प्रमाण कैंचें ? ॥ २७ ॥

अस्य

ऐसा जो निराकार । देहीं देहाहूनि पर, । आत्मा अव्ययो, अक्षरु, । यथा शुद्धातें. ॥ २८ ॥

इमे देहा

स्थूळें, सूक्ष्में, कारणें, । आणि यें महाकारणे, । विचारिता स्वरूपज्ञानें । कैसीं वर्तती ?, ॥ २९ ॥

अतवंत उक्ताः

पूर्वीं काहींची नव्हतीं, । काहींचि न उरती अतीं, । मध्येहि जे आभासती । मिथ्यामात्रें. ॥ १३० ॥ भोगेंचि प्रारब्धातें क्षयो, । क्षीणें प्रारब्धे देहविलयो, । आत्मा तो अजु, अव्ययो, । स्थूळ, नाशवत, तया ॥ ३१ ॥ स्थूळींचे कर्म निपजले, । कर्मेंचि स्थूळ देह रचलें, । स्थूळीं भोगिता कर्म सरलें, । निमाले स्थूळ ॥ ३२ ॥ ह्मणोनि, अर स्वभावता । स्थूळ देह हें ततता. । आता लिंगदेहाची व्यवस्था । ते कैसी असे ? ॥ ३३ ॥ विचारूनि न पाहिजे, । तव तें अनादि देखिजे, । ससारबीज ह्मणिजे । गुणत्रयात्मक. ॥ ३४ ॥ आता स्थूळाचिया विविक्तता, । स्थूळ मिथ्या जाण, पार्था, ।

जागृतिलेपीं पाहता । आभासे जैसें, ॥ ३५ ॥ तेंवि कर्मेंद्रियाची चळवळ । साद्वनि, व द्यप्रवृत्ति निश्चळ । ठाता, अतर्दृष्टि सकळ, । कर्मकरण नसे.॥३६॥ आणि जेथवरी शब्द पावे, । स्पर्श जेथूनि जाणवे, । रूपाववोधु धावे । जेथें लागावया, ॥ ३७ ॥ जाणवे जेथूनि रसु, । जेथें गवज्ञाना अविरामु, । विषय नुभऊप्रकाशु । जेथूनि स्फुरे ॥ ३८ ॥ ज्ञानेंद्रियाचे अतराळ, । स्फुरलिये स्फुर्तीचें मूळ, । चिदाकाश सुनिर्मळ, । तन्निष्टतया ॥ ३९ ॥ करिता वर्मनिहिर्ने । कांहींचि न भसती ज्ञानकरणें, । स्वता निरटलेपणें । जैं द्रष्टा पाहे ॥ ६४० ॥ प्राणपचकाची चळवळ । भौतिकभूतदृष्टी सकळ । चिदाकाश जेंवि निर्मळ, । तेथें तदभाओ सदा ॥ ४१ ॥ अहतत्वादिधर्मराशीं । द्रष्टा होये अभिमानसाक्षी, । त अमता त्या अविद्यामयासी । नेणें स्वरूपें. ॥ ४२ ॥ चेततत्व सन्यस्त । करूनि, चित्तद्रष्टा चित्त । पाहे, तव ते मिथ्याभूत, । कांहींचि न वर्ते–॥ ४३ ॥ निरसूनि वोद्धयितव्यातें । आत्मा पाहे बुद्धीतें, । ते ते त्या वध्यासुताते । दीस म्हणे ॥ ४४ ॥ सकल्पविकल्परहित, । करूनि निर्विकार मन स्वरूप, । पाहाता तें मिथ्याभूत, । आ माचि सतु. ॥ ४५ ॥ निर्विकल्प सवेदन, । प्रपचोन्मुख चंन करण, । तें स्वरूपदृष्टी अकिंचन । कांहींचि न वर्ते. ॥ ४६ ॥ एव तत्वात्मक सगुण, । लिंग देहधर्म क्षीण । करूनि पहाता, जाण । अर्जुना आत्मत्वें, ॥ ४७ ॥ निरसता भाओ वर्माचा, । आणि नर्महीना लिंगाचा, । तदभावें दृश्याचा । कार्य कारणा. ॥ ४८ ॥ सविकारा अविवेकदृष्टी । लिंग देहेंसीं असे भेटी ? । तें विचारिता, गा किरीटी, । मृगजळाऐसें ॥ ४९ ॥ यया देहद्वयाचें कारण । तें प्रसिद्ध आमाज्ञान, । जाणोनि पाहाता, अकिंचन । कांहींचि न वर्ते ॥ ६५० ॥ नेणोनि तये नेणिवेतें, । नेणे जेणे जाणुमतें, । तें जाणोचि लगे, तेणें । नेणपण नुरे. ॥ ५१ ॥ नेणावयाचिये खुणे । नेणे आगिचेनि जाणपणें, । मग जाणूचि तो मी नेणें । ऐसें भावी. ॥ ५२ ॥ नेणिव काज नेणिवे, । मिण जाणिवा कीर नव्हे, । खुणे सागतयाचिये स्वभावें, । जरि आक्षेपिसी ॥ ५३ ॥ जाणताचि कांहीं नसे, । नेणिवेचें मत कैसें ? । जे रात्रि करी दिवसें । असते नहीं. ॥ ५४ ॥ अर्जुना आपुलें नेणणें । बोलावया तन्ही कारणें, । नेणिजे तव जाणपणें । साच केलें. ॥ ५५ ॥ जाणोनि पाहाता तया, । नामरूप ना अस्तित्व

तया, । आतां तें मिथ्याही म्हणावया, । सांग काय असे ? ॥ ५६ ॥ या परी वाओ अज्ञान, । आतां तत्कार्यी कैसें भान ? । साच एक तें ज्ञान । तये ठाईं. ॥ ५७ ॥ तें ज्ञान जाणावें विविक्तता, । ज्ञातेन स्वस्वरूपसत्ता, । जंव तंव वेदनवेत्ता । स्वयेंचि तेथें. ॥ ५८ ॥ आंगाचिया चचळपणा । नाम कायी सांगे अर्जुना । जै तो प्रभंजनु आपणा । आपणु नव्हे. ॥ ५९ ॥ चंचळधर्मविहिन । जालें सहज जीवन, । ते तेथींचें सडोळपण । वुडतां न संपडे, ॥ १६० ॥ तैसा ज्ञातृत्वभावविहिनु, । ज्ञाता सहजीं निमग्नु, । तेथें ज्ञानभावो अकिंचनु । तो आथीचिना. ॥ ६१ ॥ सहजीं सहज निर्विकारता, । सहजास्थिति असतां, । आत्मया नित्या, संता, । यये देहादिकें ॥ ६२ ॥ कांहींचि न वर्तती केव्हां, । अवधारीं, गा पांडवा, । आभासे विवर्तु अवघा, । असंतु तो. ॥ ६३ ॥ पूर्वीं कांहींचि न होता, । अंतीं न उरे मागुता, । आभासकाळीं ही विचारितां । कांहींचि नसे. ॥ ६४ ॥ आदि, अंतीं असंत, । मध्येंही मृगजळ तद्वत, । येथें सत्य तें न घेपिजत, । येणें असत्यें. ॥ ६५ ॥

तस्माद्युध्यस्व

तयाकारणें अर्जुना । न करीं दुजी विवरणा, । स्वधर्मोपासाव चळेना, । युद्ध करीं. ॥ ६६ ॥ तुवां जें घेतलें भय, । तें मिथ्या, गा मोहमय, । स्वधर्मु लोपे, परि श्रेय । न पवसी येणें. ॥ ६७ ॥ आतां हेंचि जरी वाढविसी, । तरी अवधारीं मातु ऐसी, । जे लौकिकीं अनारिसी, । वदती पैं. ॥ ६८ ॥

य एनं वेत्ति हंतारं यश्चैनं मन्यते हतम् ।
उभौ तौ न विजानीतो नायं हंति न हन्यते ॥ १९ ॥

यः

जो पैं बुद्धीचा साधारणु, । अकर्तात्मज्ञानविहिनु, । आपणपयां पूर्ण नेणु, । गुणीं मोहला. ॥ ६९ ॥ प्रकृतिगुणसंयुक्ता, । देहोचि मीं, हे मानीतु सांता । जाला हातियेरु परजिता । काये म्हणे ! ॥ १७० ॥ मीं येकलाचि, परि धींटु, । नागवे पराक्रमपुष्टु । भरीन यया घोंटु । वैरियांचा. ॥ ७१ ॥ पराक्रमाचे लाठे, । वीर मारिले मोठे मोठे, । तो मी येकलाचि सुटें, ।

तैं वाईट्ट सर्वी. ॥ ७२ ॥ शस्त्रास्त्रविद्यानिपुण, । मार्जी योद्धयां त्रिनयनु, । सर्वथा वेईन प्राणु, । यया अरिकुळाचा. ॥ ७३ ॥ ऐसें म्हणोनि, सत्राणें । उठिला युद्धा कारणें, । तो आपणपयां नेणे । म्हणौनि केसा ? ॥ ७४ ॥

एनम्

जो प्रकृतिगुणविविक्तु, । कार्यकारणभेदमुक्तु, । असतयाही न स्पर्शतु, । कर्तेपणा जो. ॥ ७५ ॥ ऐसा निर्विकारु, निरंजनु, । निर्विकल्पु, आत्मा आपणु, । गुणी असोनि गुणविहितु, । ऐसिया यातें. ॥ ७६ ॥

हंतारं वेत्ति

देहात्मबुद्धिचेनि गुणें, । मारिता मी, येणें अभिमानें, । हननशीळता जाणे । निरुपाधिकातें. ॥ ७७ ॥ अथवा पैलें पैल मारिलें, । ऐसेंहि जनु बोले, । ना तरी वेरी आले । मारावयासी. ॥ ७८ ॥ ऐसा एकु जनु पार्था, । आइकें दुजयाची वार्ता, । जन भुललें परमार्थी । काय करिती ? ॥ ७९ ॥

यश्च

जो कव्हणी जिकिजे रणीं, । कां मेरे अवचटें वाणीं, । कीं मारावया आळा म्हणौनि, । पळोंचि लागे. ॥६८०॥ मग तो थरथरां कांपतु, । कां घायाळु भूमि हुंबतु, । नेणोनि आपणा, काये म्हणतु, । देहात्मभावें. ॥ ८१ ॥ निरपराधिया मातें, । पेलेहाले शस्त्रघातें, । तंव दुजा म्हणे, येथें । रणीं पडिलों. ॥ ८२ ॥ आतु म्हणे धांवा धांवा, । ययापासाव मज वांचवा, । पुत्रु होईन सर्वां । क्षेत्रियांचा मी. ॥ ८३ ॥ मर मर पावला वैरी, । काये जाव्हासि ? गा श्रीहरी । मारिलों कीं, येहीं उत्तरीं । आक्रंदे फुडा. ॥ ८४ ॥ ना तरी पैलु मारिला पैलें, । हा हा मेरल, कां मारिलें ? । ऐसें जो अज्ञानु बोले । तो कैसा ? पांडवा ॥ ८५ ॥

एनम्

मनबुद्धींद्रिया अस्पर्शु । आत्मा अजु, अप्रकाशु, । तो देहोचि, हा अवरु । भाओ धरूनी. ॥ ८६ ॥

हतं मन्यते

मारिला ऐसें मानिती । अवधारीं गा, वीरपति । अधिष्ठान तत्व नेणती । अज, अक्षर, जें. ॥ ८७ ॥

तौ

ऐसें एक म्हणती मारिता, । अवधारीं गा पांडुसुता । एक म्हणती मरता। आत्मादेहत्वें, ॥ ८८ ॥

उभौ

ते दोघेही अवधारीं, । पामरजन संसारीं, । जाणती शब्दाची कुसरी, । परंतु कैसे। ॥ ८९ ॥

न विजानीतः

नेणतयांमाजी अग्रिक, । मूर्ख म्हणति थोर लोक । पशुवादिकांचे बाळक, । तृणें आहारिती. ॥६९०॥ जळो तयांची प्रतिष्ठा, । जळो जळो देहचेष्टा, । अजा अव्ययातें कटा । मळु लाविती. ॥ ९१ ॥ मशीचें करूनी वदन, । हांसविती जे परजन, । सर्वथा उदरपरायण, । भ्रमती द्वारें. ॥ ९२ ॥ तैसी ते जाणीव ते धीरपती, । जे आपुला अंशु साहाती । पोटाचि लागीं भ्रमतो । नेणती स्वरूप, ॥ ९३ ॥ तयांचें जळो ज्यालें, । केलें अथवा जाणितलें । जें मारितें, कां वधिलें । स्वरूप ह्मणती. ॥ ९४ ॥ अविनाशु आत्मा नेणती, । मारिला, मेला, जे ह्मणती, । ते आत्मलोपें पावती । महा पापें. ॥ ९५ ॥ आत्महत्या, ब्रह्महत्या । घडली तयां सर्वहत्या, । जेहीं आत्मयां सुनिया । अनित्य केले. ॥ ९६ ॥ अमायिक तत्व नणती, । माथा गुणी विचरती, । मात्रागमनी होती, । भरंवसेची. ॥ ९७ ॥ अभक्ष्य जें सद्रावें, । विषय जात आयते । भक्षिती, ते जाणावे । चांडाळ कीं. ॥९८॥ सद्रसापासाव चुकले, । असद्रसे लोक मातले, । ते सुरापानी लागले भले, । तेंचि करूं. ॥ ९९ ॥ गुरु ईश्वराची शक्ति, । तेथेंचि ते रमती । गुरु-तल्पु तो तयांप्रती । दोषु घडला ॥ ७०० ॥ हिरण्यगर्भी अनैक्यता. । तदंशा आपणा पार्था । नेणतीं महावाक्यार्था, । लक्षणत्रयीं. ॥ १ ॥ ते हिरण्य-स्त्यई जाणावे, । लिंगभेदी मानावे, । नष्ट ह्मणोनि पाचारावे, । असत्य वादी. ॥ २ ॥ नाना पापकर पापात्मे, । संतीं वर्जिले दुरात्मे, । आतां संत ते प्रज्ञानात्मे । कैसे देखती ॥ ३ ॥

अयम्

आत्मा अजु, अविनाशी, । सकलांतरनिवासी, । सकळ मिथ्या जयासीं, । कांहींचि नसे. ॥ ४ ॥

न हंति

तो मारिता नव्हे अर्जुना । कैसा कासेन कवणा । वधी ? स्वरूपें आपण । आपणु सर्व. ॥ ५ ॥

न हन्यते

आणि मारावया योग्यु नव्हे । गुणाचेनि अभावें, । एथें सांगिजेल, तें बरेंच । धरावें जीवीं ॥ ६ ॥ सतें आपुल्या संतता, । असंतेंसी वैर करितां, । कैसें घडे ? हें तत्वता । तूंचि विचारी ॥ ७ ॥ संत संतवरी उठे । तरी तें वेगळें न फुटे, । म्हणौनि बोलणें खोटें । नये बोलतां. ॥ ८ ॥ असंत वधी असता, । तैं तें कैचें जाण स्वता, । यापरि कवणु मारिता । कवणातें कैसा ? ॥ ९ ॥ अनस्ती अस्ती मरण, । कीं अस्ती अस्ती जाण, । अनस्ति मिथ्या, अस्ति अभिन्न, । सर्वदा असे ॥७१०॥ अनस्ति पडे अस्तीं । तरि ते काये कें पा होती ? । अनस्ति अस्तीं, सुभद्रापति । बोलोंचि नये. ॥ ११ ॥ यापरी सदसद्विचारें, । कवण मारी ? कवण मेरे ? । जें असे तें चारे, । असे तैसेंची. ॥१२॥ उष्ण ना शीतल, ऐसें । मृगजळ वन्हणी असे, । ते दिसोनीहि परि नसे । कांहींचि कोठें. ॥ १३ ॥ माजि न दिसतेनिअगे । असें ते किरणचि अवघें । आतां साच मानावीं ते दोघें, । की येकचि तें ? ॥ १४ ॥ तैसें हें द्वैत दृश्यमान । भासलें ही कीरु आसमान । नव्हे, म्हणौनि निर्गुण । तेंचि खरें. ॥ १५ ॥ तेथें सुमारकु ना मरता । अव्ययता, नित्यसतता । तें आत्मस्वरूप पार्था । कैसें पुनरपि ? ॥ १६ ॥

न जायते म्रियते भयिता वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ २० ॥

अयं

हा अजु, अविनाशी, चिदात्मकु, । सन्मात्र, आत्मा, व्यापकु, । आनंदमयु, प्रकाशकु । माये अविचेतें. ॥ १७ ॥

कदाचित्

आपुलिया निजस्थिती । निर्विकल्पु, गा सुमती. । तो कव्हणेही काळें प्रकृती । वशु होउनियां. ॥ १८ ॥

न जायते

जन्मे ऐसा न पडे, । तो जन्मु जाण निवाडे, । यया स्थूळ शरीरातें घडे. । योनिद्वारा, ॥ १९ ॥ तें पांचभौतिक देह जाण, । कर्म भोगावया प्राचीन । जन्मतें जालें, क्रियमाण । करी पुनरपि. ॥ ७२० ॥

म्रियते वा

भोगें प्राचीन सर्व सरे, । मग प्राण खिरती खोंकरें, । देहीं तेणें न थरे. । तो मरे पिंडु. ॥ २१ ॥ तेथें कठिणांशे धरणी । मीनती जाली स्वस्थानीं, । सारद्रांशें धनुःपाणी । जीवनीं जीवन ॥ २२ ॥ तेज तेजीं सचरे । उष्णांशेसीं, वारें, । देहस्थें चंचळें समीरें । पवनीं प्रवेशिजे ॥ २३ ॥ व्यापकां विकारांचें गगन । गगनीं होये सुलीन, । जालयां देहपतन, । भूतवियोगु हा. ॥ २४ ॥ जन्मकाळीं येक वाटे, । मरण काळीं वेगळें फुटे, । एवं भूतपचक प्रगटे, । प्रपंचाकारें. ॥ २५ ॥ ऐसी लयोद्भव अवस्था, । भौतिकदेहातें पार्था । ते आत्मयां देहमुक्तां, । न वर्तेची. ॥ २६ ॥

भूयः

पुनरपि अर्जुना जाणई, । आत्मा वर्तता देहीं, । तो असंगु तये ठाईं, । ह्मणौनि कैसा ? ॥ २७ ॥

न भूत्वा

मरणाचिये प्राग्दशे, । जन्मु ही होणेंचि असें, । तव न दिसे, परंतु वसे । गर्भी पिंडु. ॥ २८ ॥ पूर्वी काहींचि नसतां । तें जन्मु कवणातें होता, । पाठीं मग मरता, । तो कवण सांगे ? ॥ २९ ॥ ह्मणौनि जन्मा पहिलें, । पिंडु आहे ह्मणितलें. । आतां कवण रूप ? कथिलें । ते पाहिजेचि की. ॥ ७३० ॥ जीवरूपें जाणई, । संक्रमला पितृदेहीं, । तो वीर्यसंगें आइकई, । निवडता होये. ॥ ३१ ॥ तें वीर्य योनिद्वारा, । पावे मातेचिया उदरा, । तेथें रक्तयोगु येकसरा, । होता होये ॥ ३२ ॥ तो शुक्ररक्तसमरसु, । माजी पवन समावेशु । आधी जीवा अविरामु । तये ठाईं. ॥ ३३ ॥ जव भरती नवमास, । तंव आकृति होये देहास । जन्मापूर्वी परियस, । असणें तें हें. ॥ ३४ ॥ तेथेंही आत्मा असंगु, । नेणे पांचभौतिकुसंयोगु । शुक्ररक्तसमायोगु, । जो पवनें वाढे ॥ ३५ ॥

न भविता वा

यापरी उदरीं होता, । तो जाला जन्मु पावता, । मग तयाउपरी जे अवस्था, । तेही आत्मया नसे. ॥ ३६ ॥ तेथें देहचि गर्भी रचलें, । देहचि जन्मतें जालें, । मग जन्मापाठीं लागलें । शरीर वाढों. ॥ ३७ ॥ करूनि बीजारोपण, । वरी कीजे जळसिंचन, । तेणें प्रथमावस्थे-उपान । वृक्षाचें फुटे. ॥ ३८ ॥ अवनीजलसंयोगें, । झाड तें वाढोंचि लागे, । तैसीं स्थूलदेहाचीं आगें, । वृद्धि पातलीं. ॥ ३९ ॥ आहारु तयाचें जीवन, । आहारु वृद्धीचें कारण, । अतेव अन्नमय जाण, । शरीरकोशु हा. ॥ ७४० ॥ कर्मकरणें, ज्ञानकरणें, । पार्था, प्राणपंचक जाणें. । देहवृद्धीसवें स्वाहणें, । स्वप्रयोजनीं होये. ॥ ४१ ॥ इंद्रियप्राणसंयुक्तता, । मनातें ही निपुणता, । मनाग्रन्वेंही पांडुसुता, । बुद्धीतें ही ॥ ४२ ॥ ऐसी क्रमूनि बालदशा, । वृद्धिही आलियां कळसा । वळावलं देहद्वय ठसा, । तंव तारुण्य पावलें. ॥ ४३ ॥ तेथे स्वप्रयोजनीं वर्तता, । गर्तृकरणीं समस्तां, । लावण्य पाल्हायिलें पार्था, । तये शरीरीं. ॥ ४४ ॥ कामु तपे अनिवारु, । क्रोधु, मोहो, मत्सरु, । अविद्यागुणविकारु, । विस्तारता जाला. ॥ ४५ ॥ फळां आली सराटी, । रिगणी पाल्हावली कांटी । तारुण्यदशा हे वोखटी, । जांवासि गा. ॥ ४६ ॥ मद्यपु जैसा उन्मत्त, । तैसा तारुण्यमदें डोलतु, । मनेबुद्धींद्रियसाधातु । वोल्खी चकत्या. ॥ ४७ ॥ ऐसें उन्मादघनपटल । तारुण्य वितुळलें आभाळ, । तंव वार्धक्यगुण विकळ, । तें जाले पावतें. ॥ ४८ ॥ तैं करणीं गर्व सांडिले, । दतीं ठाय सोडिले, । अधरोष्ठतळ पाळे, । मुखाचि माजी. ॥ ४९ ॥ हनुवटी आली घ्राणा, । शब्दु नाइकवे श्रवणा, । न दिसेचि रूप नयनां, । तैं रसनें रसु. ॥ ७५० ॥ गंधाची आवडी गेली, । शका उठूनि पळाली, । ठाईंची ठाइं पालटली, । आंगीं त्वचा. ॥ ५१ ॥ कर्मकरणें विकळें, । केशमात्र पालटले । आज्ञा, पाठविली काळें, । ते हे जरा. ॥ ५२ ॥ देहेंद्रियसंगें, मन, प्राण, । जाली बुद्धिही धर्महीन, । पातलें देखोनि मरण । गात्रें कंपती. ॥ ५३ ॥ जन्मा-झूनि पुढें ऐसें । जें काहीं होणार असे, । तेहीं देहातेंचि, परि नसे । आत्मया शुद्धा. ॥ ५४ ॥ ऐसे देहधर्म कथिले, । ते षड्विकार सांगितले, । आत्मा जयातें नातळे, । ते कैसे पुनरपि ॥ ५५ ॥ जन्मापूर्वी असणें ।

असणयांपाठीं जन्मणं, । जन्माउपरी वाढणें, । क्रमणें बालदशा, ॥ ५६ ॥ तारुण्य, वृद्धी, शेवटीं । वार्धक्य तयाहीपाठीं, । सहावें मरण, गा किरीटी । ऐसे षड्विकार. ॥ ५७ ॥ ते समस्त यया स्थूळाचे । धर्म नवती आत्मयाचे, । कैसें स्वरूप तयाचें ? । म्हणोनियां. ॥ ५८ ॥

अजः

भूतीं भूतें उपजती, । भौतिकीं भौतिकें निपजती, । गुणीं गुण, द्रुपदीपति, । कारणें कार्यें. ॥ ५९ ॥ पासाव प्रकृतिगुणत्रय, । विराट्, हिरण्यगर्भ, माया, तत्कार्य । उत्पत्ति, स्थिति, प्रळयो; हे ज्ञेय । अवस्थात्रय, तेथें. ॥ ७६० ॥ तो शबलापासाव गुणद्वारा, । उपजता जाला, वीरा, । शबलब्रह्म तें, वीरा, । साक्षी तेथें. ॥ ६१ ॥ तें ही साक्षित्व सर्वेश्वरत्व, । महामायेचें शुद्धसत्व, । आतां शुद्ध, निर्विकारतत्व, । तें असग तेथें. ॥६२॥ विराटापासाव नानास्थूळें, । हिरण्यगर्भापासाव लिंगें सकळें, । मायेपासाव केवळें, । अज्ञानें जीवांचीं. ॥ ६३ ॥ उत्पत्तिपासाव जागृति, । स्वप्नेंपासाव तये स्थिति, । प्रळयापासाव सुषुप्ति, । जीवांतें ययां. ॥ ६४ ॥ चतुराननें विश्वजाळें, । तैजस विष्णुचें रचलें, । रुद्रें प्राज्ञ आभासलें, । येकें अनेक. ॥ ६५ ॥ जीवीं ऐसें देहत्रय, । अवस्थात्रय, अभिमानत्रय, । एथींचें साक्षित्व ध्येय, । तें शुद्धसत्व; आवियक ॥ ६६ ॥ तेथें येकेंचि मायेपरेचीं, । अनंत महाकारणें जीवांचीं, । तुरीयावस्था एकेंची, । साक्षित्वें जालिया. ॥ ६७ ॥ क्षेत्रज्ञ नानाप्रसगात्मे । ते परमात्मे, न येके जीवात्मे, । अविद्या गुणकार्यधर्में, । वर्तती जे, ॥ ६८ ॥ ऐसें प्राकृतगुणद्वारा, । प्रकृतिपासाव वीरा, । उठी पुरुषु निदसुरा, । स्वरूपीं जव. ॥ ६९ ॥ मग स्वरूपाचिया दृष्टी, । विवर्तु मायावी तर्वी उठी, । जैसें किरणाचिये दाटी, । मार्जी मृगजळ. ॥ ७७० ॥ यापरी गुणसाम्यादि सकळ, । भानमात्र मायाजाळ, । जये अधिष्ठानीं केवळ, । स्फुरों लागे. ॥ ७१ ॥ मग तयाचिये साभासते । सर्वें उपजे तत्कार्यें तें, । तयापि अज, अधिष्ठान तें । असे, जैसें तैसेंची. ॥ ७२ ॥ उत्पत्तिकाळीं उपजलें, । तेथें अधिष्ठानमात्र जें संचलें, । किरणीं जालेति मृगजळें, । किरण न जन्मे. ॥ ७३ ॥

नित्यः

तो जळाभासु अनित्यु, । प्रकाशु तो नाश रहितु, । तैसा अभावितां मायाविवर्तु, । जें अभावावेगळें. ॥ ७४ ॥ कार्यकारणप्रकृतिगुणीं । आभासे दश्य अधिष्ठानीं, । ते नाशत असतां निदानीं । अविनाश जें. ॥ ७५ ॥

शाश्वतः

उत्पत्तिपूर्वी स्वस्थ जैसें, । उत्पत्तिकाळीं नव्हे अनारिसें, । सर्वविनाशीं तैसें, । शाश्वत असे. ॥ ७६ ॥ स्वरूपसुखाचें वाड, । सच्चिदैकरस निविड, । उत्पत्तिस्थितिलयीं अखंड । जैसें तैसें. ॥ ७७ ॥ अवस्था पालटती गुणीं । प्रपंचु पालटे तये स्थानीं । उपजे येकु, तंव नाशोनी । दुसरा जाये. ॥७८॥ तेथें तेणें गुणसंगें । असोनि, परि निजांगें । उपजाविनाशाजोगें जें । तत्व नव्हे. ॥ ७९ ॥ आभासोनि भान वितुळे, । तेथें जंसें तैसें सचळें । आत्मस्वरूप एकलें । अद्वैत ब्रह्म. ॥ ८० ॥

पुराणः

उत्पत्ति, स्थिति, विनाशु, । हा गुणकंपु वृत्तिविशेषु, । जये तत्वीं साभासु, । निवर्तु बापा. ॥ ८१ ॥ ते अनादिसिद्ध अधिष्ठान, । महामायेचें जन्मस्थान, । प्रकृति पुरुष हे जेथून । ये विस्फूर्ती. ॥ ८२ ॥ घटमठांचिया आकृति । धरणीवरी होती, विरती, । ते जैसी तैसी निजस्थिति । अनादि असे. ॥८३॥ देहसमूहाहूनि पहिलें, । जें मग अवस्थादिक उठिलें, । जीवेश्वरत्व रचलें, । ते सत्ता जयाची. ॥ ८४ ॥ सर्वांचेंही अधिष्ठान । पद, अनादिसिद्ध, पुराण, । आभासे मिथ्या गुणभान, । तें कांहींचि नसे. ॥ ८५ ॥

अयम्

ऐसें हें आत्मस्वरूप । अज, अविनाश, निष्कंप, । पुरातन, निर्विकल्प, । देहीं वर्ततां, ॥ ८६ ॥

हन्यमाने शरीरे

नाशोनिया देह जाये, । शस्त्राचेनि येके घायें, । कां शेवटा आलेनि पर्यें, । रोगादिकीं. ॥ ८७ ॥

न हन्यते

तेथें तो न यचे छेदिला; । देहवधें आत्मा मधिला, । मिथ्या आभासु तोचि

मोडला । शरीराचा यया. ॥ ८८ ॥ परिध्वंसु घटाचा. । तो नव्हे तया गगनाचा, । सहजस्वभाओ आत्मयाचा । तैसा असे. ॥ ८९ ॥ आकारु मोडे तरंगीं, । तो अभाओ वाजे गांगीं, । ऐसी सांगतयाची सांगी । साच न मानावी. ॥ ७९० ॥ रज्जुस्थानीं भुजंगाचा, । अभाओ तो नव्हे रज्जूचा, । तेविं जैसा तैसा ठाईंचा । असेचि आत्मा. ॥ ९१ ॥ साभासता आणि शून्यता, । असंताची जे पार्था, । ते नल्गे तया सता, । ऐसें आहे. ॥ ९२ ॥ अज्ञानमत अनारिसें । मिथ्या, तें तया साच दिसे, । आणि साचाऐसें तें न भसे । जवळीचि परि. ॥ ९३ ॥ तो पैं बहुकाळ निजैला, । स्वप्नसागरीं बुडाला, । तेथें जाणता जनु आथीला, । तो कैसा अवधारीं. ॥ ९४ ॥

वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।
कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हंति कम् ॥ २१ ॥

हे पार्थ

नेणों म्हणती जन बहुत, । नकळे हें सर्वांचे मत, । परतु जाणते विरुलेगा येथ, । निजात्मविषईं. ॥ ९५ ॥ आतां तिजात्मतत्व तें कैसें, । कहींचि अज्ञाना न प्रकाशे, । अनुभववेद्य तें परियसें, । ययेचि देहीं. ॥ ९६ ॥

अविनाशिनम्

न थिरे मळयाचेनि जळवरें, । न जळे तद्ग्रासकें वैश्वानरें, । न शोपे, न चळेचि समीरें, । जेणें दहनु मरे. ॥ ९७ ॥ अर्जुना, आकाशीं न समाये, । पुंडती तें कैसें पां आहे, । अरे भूतपंचकविलयें । अविकाधिकची. ॥ ९८ ॥ ग्रासूं न शकेचि अहंकारु, । जेणें अहंतेप्रति मारु, । सामावे महत्तत्वाचा अंकुरु, । उपराठा जेथें. ॥ ९९ ॥ अव्यक्तीं न लोपे धनंजया, । लोपे अव्याकृत जेथें माया, । जेणे स्वरुपें महाप्रळया, । प्रळयो कीजे. ॥ ८०० ॥ प्रकृति आत्मा अधिष्ठान, । अतेव न मोहे तो तिचेन । असंतें, तिये संतपण । जेणें सन्मात्रें. ॥ १ ॥ असतांही प्रकृति-आंगीं, । जो आपुलीये शुद्धतेलागीं, । न भुले, नव्हे तत्संगीं, । प्रकाशूनही. ॥ २ ॥ आतां वर्ततां येयेदेहीं, । देहाविनाशे नाशु नाहीं । अन्यथाज्ञानाच्या विलयीं, । विलयो नेणे. ॥ ३ ॥ प्रज्ञानज्ञानें संहारे, । तेथें लोपुची जयाचा

मरे, । आत्मा स्वप्रकाशु, निर्धारें । अविनाशी तो. ॥ ४ ॥ सहजस्थिति पुरे ज्ञान, । तें सहजीं सहजाचें सहजपण, । तेथें सहज अविनाश अधिष्ठान, । तेंचि आत्मा. ॥ ५ ॥

नित्यम्

तया आत्मया, नाश रहिता, । नित्या, निर्गुणा, शांता, । विनाश काळें वर्ततां । विनाशु नाथी, ॥ ६ ॥ घटा, दंडु, एकसरा, । वाचें जे तो नवजे अंबरा, । तें सर्वदा सारिखें, वीरा, । जैसें तैसेंचि. ॥ ७ ॥ तैसें अनात्मक, अनित्य, । विनाशे तेंचि मिथ्याभूत, । आत्मस्वरूप, नित्य, संत, । तें जैसें तैसेंचि. ॥ ८ ॥

अजम्

तूं म्हणसील, गा वीरपति, । विनाशकाळीं नाशु नाथी । ते उत्पत्तिकाळीं उत्पत्ति । सारिखें काये ? ॥ ९ ॥ तरि आधीं अजत्व, आथी खरें, । तरिचि विनाशकाळीं न मरे, । लयोद्भव हे बाहिरे, । जयाचिया संचितीं. ॥१०॥ जन्म मरणादि जाणई, । षड्विकार स्थूलाचां ठाईं, । देहांतरप्राप्ति लिंगदेहीं । ते नसे स्वरूपीं. ॥ ११ ॥ आत्मयाचें जें अज्ञान, । तें जेवेळीं येथें कारण, । ते वेळीं तज्ज्ञानेंचि निरसन, । ऐसें आहे. ॥ १२ ॥ तमें न ... भास्करु, । तैसा आत्मा हा निर्धारु, । जन्म मरण तो अधाकारु । ... प्रकाशीं. ॥ १३ ॥

अव्ययम्

पार्था, म्हणशील तूं ऐसें । तया आपुलेनि अप्रकाशें, । जरा मरण ... दिसे, । आपुलां ठाईं ॥ १४ ॥ मग लाहोनि स्वविषई ज्ञान, । करीं ... अज्ञानच्छेदन, । मग अजअद्वयलक्षण, । वोळखों लागे ॥ १५ ॥ या ... लय विक्षेपें तेणें, । व्यथो स्वरूपाचेनि अज्ञानें । प्रपंचोपसर्गें दारुणें, आत्मयासि; ॥ १६ ॥ तरि अवधारीं येथ वचन, । आत्मयाचें अव्ययपण ... भव, वोसरु, हे खूण, । नेणे आत्मा ॥ १७ ॥ स्वरूपीं लयो ... आणि विक्षेपु राजसें तेणे, । समाधिस्फुरण सत्वगुणें, । ऐसें आहे. ॥ १८ तें प्रकृतीचें गुणत्रय, । करितां आपुलालें कार्य, । कैसें वर्ते तात्पर्य तेंचि अवधारीं ॥ १९ ॥ उपजे लयो तमोगुणें, । तैं राजसत्वा लोपुं जा...

समाधिविक्षेपा कारणें, । मांडे व्ययो, ॥ २० ॥ तैसाचि, रजोगुणें विक्षेपु, । तें सत्वतमवृत्तिलोपु, । लयो मांडे अमूपु, । लया समाधी, ॥ २१ ॥ तैसाचि सत्वगुण बळावे, । तैं रजतम लोपु पावे, । लयो, विक्षेपु मालवे, । तो तयां व्ययो. ॥ २२ ॥ ऐसे गुणत्रय प्रकृतीचें । लायोनि संनिधान आत्मयाचें, । प्रवर्तलें कार्य तयांचें, । तें हेंचि त्रिविध. ॥ २३ ॥ एथें अन्योन्यता वृत्ति वेचू, ॥ स्वकीयावृत्या गुणसंचु, । आत्मा अव्ययो, निःप्रपंचु, । तो नलगे गुणातें ॥ २४ ॥ नातरी अवस्थीं अवस्थांचा । वेचु, देहीं देहांचा, । तेणें आत्मयां सुसंचा । संचु ना व्ययो. ॥ २५ ॥

एनम्

ऐसा प्रकृतिगुणसाक्षी, । साक्षित्वही तें नापेक्षी, । अवस्थाचतुष्टयातें लक्षी, । अन्योन्यसिद्धी. ॥ २६ ॥ गुणीं जाणता गुणातें, । अवस्थायोगें अवस्थातें । देहयोगें देहातें, । सत्य मिथ्या. ॥ २७ ॥ मग असंगु ठाला गुणीं, । तैं गुण मीनति कारणीं, । समाधि, विक्षेप, लय ग्रासूनी, । स्वयेंचि उरे. ॥ २८ ॥ नाश्रयी अवस्था, शरीरें, । तैं त्या सकळांचेनि संहारें, । जैसा तैसा स्वस्थु उरे । निर्विकल्पु आत्मा. ॥ २९ ॥ एवं गुणी वर्ते गुणाभासें, । भान प्रकाशी स्वप्रकाशें, । तथापि संचेना विसकुसे । जो आत्मा, तेणें ॥ ८३० ॥ गुणाचिया असंगता, । उरे आत्मा निःप्रपंचता, । तेणेंही जो स्वरूपता । नेणें चढ़ं उतारु. ॥ ३१ ॥ असो, ऐसा गुणागुणीं । सारिखाचि आत्मा निदानीं, । तया हृदयस्था, धनुःपाणी, । आपणपयां गा. ॥ ३२ ॥

यः वेद

जो जाणे गुरुप्रज्ञा, । अपरोक्षसिद्धिसंज्ञा, । आइके सद्गुरूची आज्ञा, । कैसी एथ विषई. ॥ ३३ ॥ साधनचतुष्टयसंपन्नु । शिष्यु, जो अति विचक्षणु, । गुरुदास्यें न पवे शीणु, । तोचि अधिकारी. ॥ ३४ ॥ तया अधिकारिया शिष्यातें, । महावाक्याचेनि अर्थे, । सद्गुरू जाले उपदेशिते, । गुह्यज्ञान. ॥ ३५ ॥ महावाक्यार्थतात्पर्य । विचारितां तें पदत्रय । परोक्ष, चैतन्य, जें ध्येय, । तें तूंचि म्हणौनि ॥ ३६ ॥ वाक्यार्थाच्या अवबोधीं, । शिष्यें घेतली भेदबुद्धी, । तें विरुद्ध तये समाधी । ऐसें जाणोनी; ॥ ३७ ॥ मग लक्षणत्रय

कथिलें, । गुरुनाथें अवबोधिलें, । तें सांगेन पार्था वहिलें, । देईं अवधान. ॥ ३८ ॥ तेथें येकि ते जहल्लक्षणा, । दुजी ते अजहल्लक्षणा, । तिजी जहदजहल्लक्षणा, । ऐसें लक्षणत्रय. ॥ ३९ ॥ जहल्लक्षणानामें त्यागु, । अजहल्लक्षणा अत्यागु, । जहदजहल्लक्षणा त्यागात्यागु, । ऐसें जाणावें.॥८४०॥ आतां त्यागु, अत्यागु, त्यागात्यागु, । कैसा ? हा असे प्रसंगु, । तो सांगिजैल सांख्ययोगु, । मुख्यु बोलें. ॥ ४१ ॥ तरी तत्पदार्थे परमात्मा, । तो शबलु, शुद्धु, गा उत्तमा, । द्विविध असे महिमा, । तया पुरुषाची. ॥ ४२ ॥ शबलु तो मायासंयुक्तु, । वाच्यु बोलिजेत तत्पदार्थु, । शुद्धु तो मायारहितु, । लक्षु जाणावा. ॥ ४३ ॥ तेवींचि त्वंपदार्थें जीवात्मा, । तोही शबलु शुद्धु वीरोत्तमा, । अविद्यायुक्तु प्रत्यगात्मा, । तो शबलु वाच्यु. ॥ ४४ ॥ अविद्यागुणरहितु । ते शुद्धलक्षु त्वंपदार्थु, । आतां उभयपदीं परमार्थु, । तो सांगिजैल. ॥ ४५ ॥ उभयवाच्यांश शबळ, । तें सांडावेंचि गा समूळ, । उभयलक्षांश जे केवळ, । तेंचि घ्यावें. ॥ ४६ ॥ आतां उभयलक्षांशीं भेदु, । तो प्रकृतिद्वयेंचि प्रसिद्धु, । प्रकृतिद्वय तें निषेधु । पावलें जहल्लक्षणीं. ॥ ४७ ॥ मग प्रकृतिद्वयोपसंहारें, । उभयत्व मिथ्या वारे, । अखंडैकरसब्रह्म खरें, । तेंचि असे. ॥ ४८ ॥ घटां मठांचिया आकृति, । घटाकाशें मठाकाशें होती, । घट मठाभावें अस्फ़ूर्ति, । तया भेदाची.॥४९॥ यापरी प्रकृतिप्रधान, । निरसितां उभयस्फुरण. । अखंडैकरस निरंजन, । संपादिलें असिपदें. ॥ ८५० ॥ तैं देहावयवस्थान्यतिरेकें, । गुणाभिमान प्रत्येकें, । निर्मळ स्वरूप ठाइकें, । ठाई जाणे. ॥ ५१ ॥ देहादिप्रपंचु बुडाला, । कीं नाहींचि, ऐसा तो जाला, । करणगुणधर्मु लोपला, । जेथींचा तेथें. ॥ ५२ ॥ पांगुळलें ठाईं मन, । जालें संकल्पदहन, । निःशेष फिटोनि अज्ञान, । ज्ञान सामावलें. ॥ ५३ ॥ ऐसें स्वप्रकाश, सुनिर्मळ, । स्थिर, पूर्ण, अचंचळ, । मायाअविद्यामृगजळ । अभावेल जेथें, ॥ ५४ ॥ तेथें जीउ, ना ईश्वरु, । प्रपंचु, ना व्यापारु, । सकळगुणोपसंहारु, । स्फुरों लागे. ॥ ५५ ॥ सच्चिदानंदमय निर्गुण, । तें मीचि ब्रह्म सनातन । ऐसें स्वानुभवें स्वरूपज्ञान, । जालें जयासी. ॥ ५६ ॥

स पुरुषः

तो पुरुषु तत्वज्ञु, । न पत्रे गुणवृद्धिर्साणु, । प्रसंगें व्यवहारीं प्रवर्तमानु, । ते वेळीं कैसा. ॥ ५७ ॥

कं हंति

सत्यात्मवेदनें अवधारीं, । असत्य तें का यमा मारी ? । आतां संत संताचा करी, । वधु काये ? ॥ ५८ ॥

कथं हंति

इतुल्याही वरी पांडवा, । नेणे जो गुणविकार भावा, । आत्मा करणहीनु अघवा, । निर्विकल्पु. ॥ ५९ ॥ तो मारिता कैसा होईल ? । गगना पल्लव फुटतील, । स्वरूप जयाचें निश्चळ, । अद्वैत सदा ॥ ८६० ॥ सर्व शून्यता अखंडत्वें, । काय मारी आत्मा आत्मात्वें ? । प्रकृतिगुण रहितत्वें । निर्विकारु जो ॥ ६१ ॥ तो काये मारील कैसा ? । आतां असो जैसा तैसा, । परि मारिला जाय, गुडाकेशा । ऐसाही नव्हे. ॥ ६२ ॥

कं घातयति

जया नाम, रूप, ना गुण, वर्णु, । सहजस्वभावें अकिंचनु, । व्योमाहीहूनि सानु, । कांहींचि नव्हे. ॥ ६३ ॥ भावाभाव अभावना, । ते जयाची संभावना । वृत्तिकरितां अर्जुना, । विषयो नव्हे. ॥ ६४ ॥ ऐसा अन्यदृष्टी इदंत्वें । कांहींचि नसे साभासत्वें, तो आपणपयाही आत्मत्वें । नसे ना असे. ॥ ६५ ॥ तो मारूनि कैसा घेईल ? । कवणा विषयो होईल ? तयाची तयाही सखोल । दृष्टि नेणे. ॥ ६६ ॥

कथं घातयति

ऐसा स्वभावविलक्षणु, । स्वरूपेंचि जो आसमानु, । आपुलेंचि निराशी आपणु, । अधिकु स्फुरे. ॥ ६७ ॥ जो जो वृत्तीचा विनाशु, तो तो सहजात्मप्रकाशु ! स्फुरे, जो गुणविशेषु, । तो तदाधारेंची. ॥ ६८ ॥ तेथें स्फुरे जें मीपण, । तें जया पासाव सगुण, । तेथिचें आत्माचि साचपण, । निर्धारितां. ॥ ६९ ॥ आतां हलेपणाचिया वृत्ती, । जो कीं अवतरला आधीं, । तो आपणा कीं आनाप्रती, । ऐसें पाहे पां. ॥ ८७० ॥ मारकपणाचेनि आवेशें, । उठी तो तोचि असे, । वीग तया भान नसे, । योग्य

मारावया. ॥ ७१ ॥ असता कैसा मारी, । जें पाहिलेंचि नाथीं अवधारीं, । आतां संत तें याचां अंतरीं, । प्रकाशू न यया. ॥ ७२ ॥ ऐसा मारकर्वे प्रकटे, । तव दुजें तया न भेटे, । मग आपणपया उठे, । मारितु जो कां. ॥ ७३ ॥ तो मेरे जंवजंव अभिमानु, । तव तंव आत्माचि स्थाश्नु, । आतां कैसा मारी आपणु ? । आपणातेंही. ॥ ७४ ॥ तरंगदशेचा विरे, । तंव तंव सागरु सागरें, । नाहींसा नव्हे वारे, । असे जैसा तैसा. ॥ ७५ ॥ न लगतु प्रकृतिचिया । अंगा, आत्मा, धनंजया, । परतु ते वेगळी तया । असो न शकेचि. ॥ ७६ ॥ यालागुनी अमाइकु । कैसा न म्हणावा मायिकु ? । गुणा न स्पर्शे गुणिकु । गुणदृष्टी आत्मा. ॥ ७७ ॥ स्वस्थानीं सहजस्थिति, । काहींचि नव्हे ऐसी मूर्ति, । यया विवर्ताची संगती । न वर्ते जया. ॥ ७८ ॥ ऐसा निर्मळु, निराकुळु, । आत्मा स्वस्थु, निश्चळु, । तथापि तेणेंसीं वेगळु । विवर्तु नसे. ॥ ७९ ॥ असे तंव सर्वभावें, । आणि सर्वी नाहीं ऐसा नव्हे, । असाचा साचुपण अघवें, । जयाचेनि. ॥ ८० ॥ मृगजळासंगें वर्ते, । तें किरण जैसें तैसें तेथें, । परंतु याचिया साचपणातें । आपणची करी. ॥ ८१ ॥ दंडीं भुजंगु वाओ, । आणि तोचि त्या जल्पता ठाओ, । रजतभाओ अभाओ, शुक्तिखंडीं. ॥ ८२ ॥ तैसा असंगत्वा न चळे, । आत्मा प्रकृतिसंगें खेळे । तो कैसा येणें स्थूळें । साकारलेनि ? ॥ ८३ ॥

**वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।**
**तथा शरीराणि विहाय जीर्णान्यन्यानि संयाति नवानि देही ॥२२॥**

**नरः**

दृष्टांत मुखें सांगेन, । तरी अवधारीं तें वचन, । कव्हणी एकु पुरुषु जाण,। वर्तत असतां. ॥ ८४ ॥

**वासांसि**

उत्तमें आणि पवित्रें, । नूतनें, निर्मळें वस्त्रें, । परिधान करी आदरें, । वेष्टी, वेढी. ॥ ८५ ॥

**जीर्णानि**

मग तें मळें घेइजेती, । धूतां धूतां फाटती. । जीर्णावस्था पावती, । वितुळती स्वभावें ॥ ८६ ॥

विहाय

मग तें झर्झरेआणी । काजा न येती देखोनी । प्रतिष्ठवितु तो फेडूनि सांडिता होये. ॥ ८७ ॥

यथा

आतां तें संत्यक्तें वस्त्रें, । जातीं जाळीं जैसीं केरें, । पुरुषु न करी अभ्यंतरें । क्षिति तयांचीं ॥ ८८ ॥

नवानि पराणि

मग तो आपणु काय करी, । उत्तमें नवीं दूसरीं, । निर्मळें पार्था अवधारीं । काढूनियां ॥ ८९ ॥

गृह्णाति

टप करूनि मोडी घडी, । पांघुरे, वेष्टी, आवडी । मेचे, तैसें वेढी, फेडी । परी न करी दुःख. ॥ ८९० ॥ तेही पावती जीर्णावस्था, । मग फेडूनि सांडी मागुता । आणिकें हें होये पांघुरता, । आवडीचीं ॥ ९१ ॥ ऐशीं साडिलीं अपारें । आणि घेतलीं ही अपरांपरें । पुढेंही, देहो तंव न सरे, । तयाचें तैसेंची. ॥ ९२ ॥

तथा

नागरिकांचें हें जैसें, । आत्मया देहांतर तैसें, । तें पुडती सांगैन, परियसें । दृष्टांतीं तुज. ॥ ९३ ॥

देही

प्रकृतियोगें युक्तु, गुणी, । आत्मा जाला देहाभिमानी । देही देहो मीचि म्हणौनी, । आत्मत्वें प्रकाशी. ॥ ९४ ॥

शरीराणि

देहद्वारा क्रियमाण । दिसें, तें गुणकर्म ऐसें जाण, । गुणीं प्रवेशला आपण, । करूंचि लागे ॥ ९५ ॥ तें क्रियमाण जालें संचित, । अंतीं प्रारब्ध तेंचि होत । भोगावयालागीं उचित । सुखदुःख तेणें. ॥ ९६ ॥ एव प्रारब्धें कर्में तेणें, । सुखदुःखभोगाकारणें । लागलें शरीर धरणें, । आत्मयासीं. ॥ ९७ ॥ गर्भीं कुसरी रचिलें, । जन्मोनि संसारा आणिलें, । मायामोहें वाढविलें, । मातेनें जें. ॥ ९८ ॥ तें वृद्धी घाढनियां पोटीं, । क्रमचि बाळदशा लोटी । तारुण्य सामावीत उठी, । तेव्हेळीं कैसें. ॥ ९९ ॥

जीर्णानि

प्रारब्ध शेवटा गेलें, । शरीर जराभूतलें । जीर्णावस्था पातले, । वस्त्र जैसें. ॥ ९०० ॥ देहो जाला विवर्णु, । बारंगला रोमांचगणु । कर्मकरण क्षीणु,। अत्यंत वो. ॥ १ ॥ दृष्टिहीनत्वें पाटलें, । त्या वेळीं थिगळ लाविलें, । उपनेत्र योजिलें कांचेचे जे ॥ २ ॥ कर्मकरण नेहटीं, । पाटलें मग दे गांठीं, । काष्टाची धरी काठी, । तव सुटे क्षणक्षणा. ॥ ३ ॥ सछिद्रें ज्ञानकरणें । गेलीं वितळोनि अर्धज्ञानें, । उडोंचि लागलें पवनें, । किती सांभाळिजे ॥ ४ ॥ गादलें अति म्हातारें, । शरीर नव्हे तें पोतारें, । धूणार उवगलें द्वारें । मळीं कोंदाटलीं ॥ ५ ॥ गधु न साहे तयाचा । तंव भोगु सरे प्रारब्धाचा । मग प्रावरणाश्रयोनि तिचा । काये करी ॥ ६ ॥

विहाय

ज्ञानकरणें आंतु वोढी । प्राणेंसी सहित फेडी, । मनोमानसें आवडीं । सांडिली जेणें ॥ ७ ॥ मग ते घाती उकरडे, । श्वानें घारी, माकोडे. । कां भस्मभूत निवाडें, । शरीर होये. ॥ ८ ॥ त्यक्तदेह ऐसें गेलें, । तंव एथिचें कर्म उरलें, । तें प्रारब्ध भोगा आलें । देहाचां अंतीं ॥ ९ ॥

अन्यानि नवानि

मग तो देही फुडी, । प्राचीन चौंकडी सोडी, । आणिकें नवीं काढी, । शरीरांबरें ॥ ९१० ॥

संयाति

मग आंगा पाडी उतरी, । विरचीं गर्भीं कुसरी । लेइला, नेसला बाहेरी, । ये संसार चहोटां. ॥ ११ ॥ तयाची ब्रव भोगितां, । तेंही पावे जीर्णावस्था, । पुडती आयासु सांडितां, । नसेचि तया. ॥ १२ ॥ यापरी अनंतें फेडिलीं । नवीं बहुतें भोगिलीं । पुढें सख्या सांडिलीं । शरीरधारणीं, गा. ॥ १३ ॥ नूतनें जीर्णें जालीं, । फाटोनियां वस्त्रें गेलीं । परि नीच नवी ते उरली । काया जैसी. ॥ १४ ॥ खोंचलयासवें न खोंचे, । वेचलटासवें न वेंचे, । तैसें शरीर हें विसंचे, । आत्मा अजु, अव्ययो. ॥ १५ ॥ तो असतांही शरीरीं, । वस्त्र पांघरलें जया परी, । तें तुटो, फाटो बाहेरी, । आपणु

वेगळा. ॥ १६ ॥ अनुकुळें, प्रतिकुळे भूतें, । साधकें, बाधकें, भूतांतें । आत्मा निराकारु, तयातें । न घेपिजेची. ॥ १७ ॥

नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।
न चैनं क्लेदयंत्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥

आत्मा निराभासु देहीं, । देहोचि मी म्हणे ऐसाही । असता, देह ते घाई । सुखेचि पडो. ॥ १८ ॥ परतु देहाभासविहीना, । निर्विकल्पा, निरजना, । निरवयवा सनातना, । आत्मयातें, ॥ १९ ॥

शस्त्राणि

ते शरीरभेदके शस्त्रें, । मुद्गल, तोमर, अस्त्रें, । तिखटें कठिणें भयंकरें, । हाणीतलीं हीं ॥ ९२० ॥

न छिंदंति

छेदू न शकती, गा पवित्रा, । घाओ जैसा त्या अबरा, । ते आदळती गात्रां, । देहाचया. ॥ २१ ॥

एनम्

मग देहभंगें जो अभगु, । आत्मा देहीं असंगु, । तया अग्नीसी सयोगु । केला जन्हीं. ॥ २२ ॥

पावकः

तो प्रळयकाळींचा अनळु, । लागला ब्रह्मांडातें जाळुं, । त्या माजी भौतिकु मेळु; । देहोही जळतां. ॥ २३ ॥

न दहति

आत्मया पावकु न जाळी, । देहाचीचि होये होळी, । पेटो घातलीही पोकळी, । पेटु नेणे. ॥ २४ ॥

एनम्

दग्धमठीं जेवीं गगन, । जैसें तैसें सनातन, । तैसें न जळतें निर्गुण, । आत्मस्वरूप जें, ॥ २५ ॥ तें पाणियामाजीं घालिता, । शरीरसहित पार्था, । भिजोनि बुडो कां सारद्रता । लागो ययातें. ॥ २६ ॥

आपः

आतां सांवर्तकु मेघु वर्षे, । कल्पांतकही तया सरिसें, । सांवत्सरक अनायासें,। पातलें जन्हीं, ॥ २७ ॥ ब्रह्मांडकंचुकु विराला, । प्रपंचु हारपोनियां गेला, । तये प्रळयार्णवीं निमाला, । तो स्थूळदेहोची. ॥ २८ ॥

न च क्लेदयंति

परंतु आद्रकें धनंजया, । न स्पर्शे जळ तें आत्मया, । न भिजे, न विरे, न बुडे, तया । गगनापरी तो. ॥ २९ ॥

मारुतः

जो तया जीवनातें प्राशी, । तो अनळु अनिळा प्राशी, । जया पडे तेणेंसीं,। योजिला आत्मा. ॥ ९३० ॥ ब्रह्मांडाऐसीं हळुवटें, । वायो उडवी सदाटें, । तो शोषावया नेटें । उठिला जन्हीं, ॥ ३१ ॥

न शोषयति

तरी शोपूं न शके, । तेणें शोषती देहादिकें, । जें कीं सारद्रता धर्मकें, । पांडुपुत्रा. ॥ ३२ ॥ गगन पवनें न उडे, । मा काय होये कोरडें ? । तें अंग न चळे, झाडें । जेणें मोडती, ॥ ३३ ॥ देहीं प्राणु देहवासी, । जठराग्नीतें प्रकाशी, । सातही धातु शोषी, । परि आत्मया कें ? ॥ ९३४ ॥

अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २४ ॥

अयमच्छेद्यः

ऐसा निरवयव, निराकारु । देहीं असोनि देहपरु, । अछेद्यु आत्मा अक्षरु,। दृश्यु नव्हे. ॥ ३५ ॥ मारकु, मारणें, मरण, । हे त्रिपुटी जया दृश्यमान, । आणि त्रिपुटीचें तये कारण, । भासावया. ॥ ३६ ॥

अयमदाह्यः

स्निग्ध आणि रुक्षजात, । दाह्यमात्र जें समस्त, । तें दृश्यस्थानीं वर्तत,। आत्मयातें ॥ ३७ ॥ दहन, दाहकु, ये दोन्ही । आत्मयां वेद्यस्थानीं, । वेत्ता तो ययापासूनि । वेगळा सदा. ॥ ३८ ॥ दाह्य, दाहकु, दहन, । त्रिपुटी हे जेणें भासमान, । अग्निस्वरूप, निर्गुण । जो, ते त्रिपुटीचें॥३९॥

अच्छेद्य.

छेद्य, छेदन, छेत्ता, । फुरे जयाचिया सत्ता, । आणि तयातें दृश्य. देखता । तो आत्माचि कीं. ॥ ४० ॥

अशोष्य एव च

शोष्य, शोषकु, शोषन, । ययें त्रिपुटीचें भान, । ते किरणा आगें जीवन । साच जैसें. ॥ ४१ ॥ त्रिपुटी जयाचिया सत्ता, । त्रिपुटीतें जो वेत्ता, । तो अशोष्यु आत्मा, मारुता । विषयो नव्हे. ॥ ४२ ॥ भूतभावनु, भूतभर्ता, । आश्रयो जो महा भूता । भूतसाक्षी, सत्यता । भूतातें जेणें, ॥ ४३ ॥ तो भूतभेदें न भेदेची, । भूत धर्मी नाकळेची, । गती जाणोनि ययाची, । कैसा असे ? ॥ ४४ ॥

नित्यः

भूतीं भूतें उपजती, । ते भूतीं भूतें नाशती, । नित्यु ऐसा, तैसा सुमती, । साक्षी आत्मा. ॥ ४५ ॥ पृथ्वीचिया गधा न लगे, । काठिण्यधर्म आर्गी न घे, । निश्च धरूनिया आगें, । वेगळाची. ॥ ४६ ॥ जळीं असोनि रसातें, । न लगेचि सारद्रता धर्मातें, । भिजेना, भिजवी तेथें, । ऐसा वर्ते. ॥ ४७ ॥ न स्पर्शतु रूप तेजीं, । ते मिळेचि उष्णते माजी, । पचन, प्रकाशन, सहजीं । जाणेचिना. ॥ ४८ ॥ पवनीं नाडळे स्पर्शातें, । चाचल्यधर्मी न वर्ते, । निहिरे प्रभजनु तेथें, । आत्मा विलक्षणु. ॥ ४९ ॥ गगनीं शब्दातें नेणे, । सच्छिद्रें न सटे गगनें, । अथवा अवकाशु देणे । आर्थीचिना. ॥ ९५० ॥ अहकारीं अहकारा । न स्पर्शे आत्मा, वीरा, । महत्तत्वीं असोनि पुरा, । तेंचि नव्हे. ॥ ५१ ॥ न स्पर्शतु प्रकृतिगुणा, । प्रकृतिगुणीं तो देखणा, । असगु तयाही द्रष्टेपणा, । जैसा तैसाची. ॥ ५२ ॥ भूतजात चराचर, । दृश्य, अनित्य, साकार, । स्वरूप, नित्य, निराकार, । गोचर नव्हे. ॥ ५३ ॥ आता तू ह्मणसील, पांडवा, । सर्वी असोनि नलगे सर्वा, । तरी सकळा या भूतभावा । कवण करी ? ॥ ५४ ॥

सर्वगत

तरी नित्यता नेदी मोडों, । तेथिचें साक्षित्वही विखडों । आणि सर्वी लागला पवाडों । कैसा तेव्हेळीं ? ॥ ५५ ॥ हा तरी धरणीतें गधु, । हा तरी

काठिण्यधर्म प्रसिद्ध । हा तरी भूतभेदु, । तिणें धरिजे. ॥५६॥ हा तरी जळीं रसुवर्ते, । हा तरी सारद्रता तेथें, । हा तरी जलक्लेदैतें, । होत असे; ॥५७॥ हा तरी रूप अनळीं रूप, । हा तरी तेज अमूप, । हा तरी उष्णता आपेआप, । प्रकटती जाली; ॥ ५८ ॥ हा तरी वचन प्रकाशन, । हा तरी पवनीं स्पर्शु जाण, । हा तरी आधी चलन, । विहरण हा तरी; ॥ ५९ ॥ हा तरी शब्दु नभातें, । सच्छिद्रताधर्म तेथें, । असे वहुवस हा तरि तें, । आकाश वापा; ॥ ६० ॥ हा तरी अहंकार उठी, । हा तरी मत्तहत्व किरीटी. । हा तरी मायादृष्टी, । अव्यक्त पडे; ॥ ६१ ॥ हा तरी तीन्ही गुण, । हा तरी प्रकृति जाण, । हा तरी पुरुष म्हणौन, । नाम जाले; ॥ ६२ ॥ हा तरी केवळ निरुपाधिक, । ब्रह्म ऐसेंही येक, । विण येणें भूतभौतिक, । काहींचि नसे. ॥ ६३ ॥ जळ तरीचि तरग । स्वर्ण तरीचि तें नग, । मही तरीचि स्वाग, । घट मठादिकाचे. ॥ ६४ ॥ सर्वत्र मृगजळीं किरण, । तरीचि तें गा जळभान, । शेखीं तयावेगळें किरण । तें जैसें तैसेंची ॥ ६५ ॥ तैसा सर्वज्ञ सर्वरूपी, । आत्मा वर्ते चिद्रूपी, । म्हणौनि सकळ हें मिथ्यारूपी, । साच जालें. ॥ ६६ ॥ सर्वगतत्व याखाणितां, । संपादे सर्वरूपता, । त्या सर्व दृष्टीं पाहतां, । चन्द्रु भासे; ॥ ६७ ॥ घटसगें घटावर, । तरगसगें जळ समुद्र, । मृगजळसगे सर्वत्र, । किरण हालवे. ॥६८॥ ते पाहाता सखोलें ज्ञानें, । अतरदृष्टी आत्मखुणें, । जालेनि चंचळें येणें, । शरीरें कैसें ? ॥ ६९ ॥

स्थाणुः

वरिवरी डोले सागरु, । परी न डोले तयाचा भीतरु, । मृगजळाचा वाहे पुरु, । तेथें किरण जैसे, ॥ ७० ॥ देश सजूनि भ्रमती, । घट ते घटचि होती, । तेथें करूनीहि वस्ती, । आकाश न चळे, ॥ ७१ ॥ तैसें वरिवरी स्थूळशरीर । मन, बुद्धि, इंद्रिय विकार, । पाहातां दीसती चर, । अचर निरजन. ॥ ७२ ॥ घटु भ्रमे देशांतरें, । परि ठावो न सोडिजे घटांबरें, । तैसें विचरतेनि शरीरें, । अढळ आत्मा. ॥ ७३ ॥ जेथवरी रूप फावे, । यया तेजाचेनि स्वभावें, । देखणें तेथवरी धांवे, । तया द्रष्टयाचें. ॥ ७४ ॥ तेथिचें सत्तास्फुरण, । स्फूर्तिमूळीं असे जाण, । प्रकटों लागे रूपज्ञान, । तें तयेचि ठाईं. ॥ ७५ ॥ यत्तदाकार म्या देखिलें ।

वाचेद्वारा प्रगट केलें, । तरि द्रष्टें तें जाणावें मुळें, । तये वाचेचिया ॥ ७६ ॥ सूर्यकिरणें धांवती, । देशुभरी प्रकाशती, । परि मंडळ तें वीरपति । जेथेंचि तेथें ॥ ७७ ॥ आकाश भरी विखुरे, । श्रवणु शब्दीं संचरे, । श्रोता तत्संगें न विचेरे, । तो असे ठाईंचि ॥ ७८ ॥ शब्दार्थी बोधलेपण, । वाचेद्वारा प्रकटी खूण, । तो स्फूर्तीचां मूळीं जाण, । श्रोता असे. ॥ ७९ ॥ बाह्यस्पर्शु शरीरा, । मृदु, कठिणांशु, वीरा, । शीतळ, उष्ण, जळ वारा, । लागता होये. ॥ ९८० ॥ तें तेथीचि परीक्षा जाणे, । प्रकट करी वचनें, । तो स्पर्शज्ञु अंगें तेणें, । जाणावा अंतरीं ॥ ८१ ॥ जळाचेनि सांघातें, । जाणे रसना रमातें । ते रसु कळे वाचेतें, । हे स्फूर्ती रसज्ञाची ॥ ८२ ॥ गंधावरि घ्राणु धावे, । कां घ्राणवरी गंधु पावे, । तोही परंतु जाणावे, । स्फुर्तीचा मूळीं. ॥ ८३ ॥ तैसीचि कर्मेंद्रियव्यापार, । स्फुरती वाचेद्वारा समग्र, । तरि वक्ताचि तो कर्ता, अंतर । येथ न दिसे. ॥ ८४ ॥ ऐसीं कर्मकरणें ज्ञानकरणें, । धांवती स्वप्रयोजनीं आपणें, । तथापि पुरुषु तो तेणें गुणें, । ढळेचिना ॥ ९८५ ॥ जें जें उठी करण, । करी अर्थाचें सेवन, । तयाची स्फूर्ती आणि चेतन, । तें ठाईंचि असे. ॥ ८६ ॥ म्हणौनि करणगुणसाक्षी, । विषयानुभउ अपेक्षी, । तो अनुभविता प्रत्यक्षीं, । वावरेचि ना. ॥ ८७ ॥ जेथूनि स्फुरे चेतन, । विषयानुभयाची खूण, । तो स्फूर्तीचां मूळीं जाण, । असे जेथिचा तेथें. ॥ ८८ ॥ संकल्पवातें उडालें, । दिगंतरा मन गेलें, । तथापि गेलें ऐसें कळे, । तें जेथिचे तेथेंचि. ॥ ८९ ॥ कोठूनि स्फुरे ते कल्पना ? । कोठूनि जाणवे आणी मना ? । कवणु तेथींचा देखणा ? । कें तो वसे ? ॥ ९९० ॥ वाचेद्वारा प्रकटी, । कल्पितु प्रपंचु जो किरीटी, । जाणे तयाचाचि पोटीं, । कल्पना विस्तारली. ॥ ९१ ॥ मनाची मना नाकळे, । ते वाचेतें कल्पना काय कळे? । म्हणौनि जाणावें स्फूर्तीमूळें, । अधिष्ठान तियेचें. ॥ ९२ ॥ निवांत ठातां जें पडे ग्रासीं, । जाणो कांहींचि नाहींसी, । आठवितां जैसी तैसी, । आठवोंचि लागे. ॥ ९३ ॥ तरी वाचे पैलां शेवटीं, । कल्पनास्फूर्तीचां पोटीं, । जये अधिष्ठानीं उठी, । तो आत्मा अढळु. ॥ ९४ ॥ चित्त करी अनुसंधान, । स्फूर्तिमुळीं तयाची खूण, । जाणे ध्येय, ध्याता, ध्यान, । जेथिचा तेथूनिची. ॥ ९५ ॥ बुद्धि प्रवर्ते विचारें, । ते स्फूर्ती जेथूनि पाझरे, । तें स्फुरणाचेनि अभ्यंतरें, ।

ठाइके स्वरूप. ॥ ९६ ॥ अहं ऐसें हें स्फुरण, । सांग उपजलें कोठून ? । कवण जाणे खूण, । तये अहंतेची ? ॥ ९७ ॥ कर्तृत्वातें मानितु, । उठिला अहंकारु व्यक्त, । तो स्थानीं कवणे सामावतु ? । तैर तें काये ? ॥९८॥ एवं अहंता स्फुरे, वोसरे, । तत्साक्षी अचरु, बारे, । जो असिलेनींही व्यापारें, । ठाइं का ठाई. ॥ ९९ ॥ सकळा वृत्ती सूटती, । मीं-तूं-पणें वितुळती, । तेथें उरे एकी ज्ञप्ती, । तिचें जो मूळ; ॥ १००० ॥ एवं सकळां द्रष्टां वृत्तींचा, । तो ययाही द्रष्टेपणाचा । तो आत्मा ठाई ठाईचा, । स्थाणु सर्वदा. ॥ १ ॥

अयम्.

हा कैसा काये बोलवे, । बोलतया विषयो नव्हे, । द्रष्टेपण ही स्वभावें, । आहाच जया. ॥ ८ ॥ दृश्य-दर्शन-संहारें, । द्रष्टेपण नव्हे कीं खरें, । आतां तयाचेनीचि अभ्यंतरें, । जाणावा तो. ॥ ३ ॥ वृत्तींची लगबग सांडीं, । गांठी दृष्टत्वाची सोडी, । मीपण विरे मग आवडी, । आपणपयां पाहे. ॥ ४ ॥ तेथें पाहाणें पाहे पाहातां, । न पाहाणें आथी पार्था, । केवळ पाहाणें सिद्धांता, । पावेचि ना. ॥ ५ ॥ मग सहजीं सहज सहज, । खुणे येतेंचि तत्व बुझ, । बुझावें पडे तें तूज । उमजा नये. ॥ ६ ॥ आतां तें कैसें आथी ? । सांगेन मीं तुजप्रती, । जाणावया योगी शकती, । अनुभवीहि जे. ॥ ७ ॥

अचलः

दृश्य-दर्शनाचाविलयीं, । द्रष्टृत्व ठाइकेंचि ठाई । विरोनि जाये, सन्मयीं । जैं स्फुरण मात्र, ॥ ८ ॥ तैं वृत्तिविशेषाचेनि मारें, । सहज जें स्वरूप उरे, । घेपे व्योमाचेनि पदरें, । गाळूनियां. ॥ ९ ॥ निःभ्रांतपणें सागरु, । अधूर्ध्वमध्य, निरंतरु. । परिपूर्णत्वें अपारु, । अचळु जैसा; ॥ १०१० ॥ सागरीं वर्ते सारद्रता, । आणि आंगाची अप्रकाशता, । तेथ नसती सरसता, । योग्यु तैं तो. ॥ ११ ॥ आडळेंविण परी भरला, । व्योमा ऐसा संचला, । तथापि तया निर्मळा, । नाथी उपमान. ॥ १२ ॥ सकळ गगन तें थोस, । माजि प्रपंचु यया परिस, । निःप्रपच, निराभास, । तें तत्व कैसें ? ॥१३॥ स्फटिकु कां काश्मीरु, गाभां । आंगची आंगाची प्रभा, । तिया भरलाचि रिता

हे शोभा । जेंवि दावी; ॥ १४ ॥ परि तो श्वेतादिवर्णरहितु, । स्वप्रकाशें सोज्वळु, अमूर्तु, । जैसा दर्पणु प्रतिभासतु, । निर्मळपणें. ॥ १५ ॥ असो, तें भिंगाचेनि गगन, । ग्रासूनि प्रपंचाचें भान, । प्रलयकाळीं जीवन । जैसें कां दाटे; ॥ १६ ॥ अंगाचेनि निर्मळपणें । दीपें जयाचें तया जाणणें, । मग तें विरालेपणें । सुखाकार उरे. ॥ १७ ॥ पाहातीये दृष्टी मोकळ, । आणि आपणपयां जें केवळ, । सन्मात्र, निवळ, निर्मळ, । निश्चल कोंदाटलें. ॥ १८ ॥ स्फूर्तीचा तरगु विरे, । वृत्ति जाणिवेची सहारे । सच्चिदानन्दमय उरे, । निश्चळ जें, ॥ १९ ॥

सनातनः

तेंचि आत्मा ऐसें जाण । स्वरूप, सत, सनातन, । गुणकार्याचें भान । विवर्तु जेथें; ॥ १०२० ॥ गुणाचिये स्पष्टदेशे, । जें जैसें तैसें स्वस्थ असे, । गुणोपसर्गें विसकुसे, । ऐसें नव्हेचि. ॥ २१ ॥ सकळा गुणांचां न्हासीं । पालटु नाथी जयासि, । तें आत्मस्वरूप निश्चयेंसीं । जाण आपणपयां. ॥ २२ ॥ अवधारीं, गा गुडाकेशा, । तो तू आत्मा आपणु कैसा ? । सकळ वृत्तीचिया न्हासा । करूनि पाहता ॥ २३ ॥

अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।
तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥

अयमव्यक्तः

साकार निरसलें स्थूळ, । आणि प्रपंचभान हें सकळ, । जागरावस्था निर्मूळ । अभ्यतरें. ॥ २४ ॥ साभास लिंगदेह दुजें, । तुझा ठाईं न देखिजे, । स्वप्न मनोरथ सहजें । न वर्ततीच. ॥ २५ ॥ मिथ्या अव्याकृतकारण, । विचारदृष्टी कें अज्ञान, । चिन्मात्रीं अविस्मरण, । विस्मरण कें ? ॥ २६ ॥ ज्ञानमय महाकारण, । तुरीयावस्था असत जाण, । तूतें तुझेंही स्फुरण । साहेचिना. ॥ २७ ॥ ऐसा सर्वाश्रयो, सर्वमूर्ति । सामावूनि आपुलिये व्यक्ती, । नव्हसी मन बुध्यादिकारणाप्रती । विषयो शुद्धा. ॥ २८ ॥

अचिन्त्योऽयम्

चिंतितां चेतन संहारे, । तरंगु चित्ताचा जेथ विरे, । अनंत अपरांपर उरे । आपणचि तेथें. ॥ २९ ॥ दुजेपणें न प्रकाशे, । एक एकपणातेंही रुसे, ।

वरी अप्रमित कैसें, । कवणें चितावें ? ॥ १०३० ॥ आठउ आठवणें विरोधी, । मीपणाहूनि जो मी आधीं । तेथें अनुसधान कें सधि। विशेषें नसे. ॥ ३१ ॥ चिंतिजे ऐसा गुण जया । नाथी, नाम, रूप, वर्णु, आत्मया,। अभावीं जयांचां, धनजया, । मायाभाव हे. ॥ ३२ ॥ चिंतिजे ऐसें तत्व नव्हे, । चिंतन वृत्तिहानी न फवे, । चिंती कवणु? तें स्वभावें । आत्माचि, अप्रमितु. ॥ ३३ ॥

अयमविकार्यः

गुण, भेद आणि विकार, । आत्मया वृत्तिविशेष समग्र । न वर्तती, जैसें अंबर । अंबराचां स्थानीं ॥ ३४ ॥ चळे ना ढळे अढळ, । उपजे ना मरे केवळ, । नव्हे अणु, ना स्थूल,। आपणपयां. ॥ ३५ ॥ असे ना उपजे, वाढे, । तरुण, वृद्ध, ना फुडें, । घडे अथवा मोडे, । यत्ना यत्नीं. ॥ ३६ ॥ जयातें चढु ना वोहटु, ॥ आदि, मध्यु, ना शेवटु, । नाहींसा नव्हे, एक दाटु । आपुलां ठाईं. ॥ ३७ ॥ दिसेना, केवळु न दिसे, । नभसे, ना भासे, ऐसा असे; । सारिखा रात्री दिवसें, । स्वप्रकाशमयु. ॥ ३८ ॥ देहें गुण, ना अवस्था, । स्थानें भोग, ना भोक्ता, । जीऊ ना ईश्वरु तत्वता, । ब्रह्महीं नव्हे. ॥ ३९ ॥ ऐसा सगुणु, ना निर्गुणु, । आत्मा हा विकारविहीनु, । प्रवृत्ति निवृत्ति सीणु । नाहीं जया. ॥ १०४० ॥

उच्यते

बोलिजे वेदीं शास्त्रीं, । पुराणीं, ब्रह्मसूत्रीं, । महानुभावांचां उत्तरीं । सिद्धांतु हा. ॥ ४१ ॥

तस्मात्

तयाकारणें, पांडुसुता, । श्रमतु आहासी तूं वृथा, । एकचि करीं सर्वथा, । सांगिजेल तें. ॥ ४२ ॥

एवम्

हा काळुवरी सांगितलें, । जैसें तत्व उपपादिलें, । साधन ज्ञानें सूचिलें । उपायें एणेंचि. ॥ ४३ ॥

एनं विदित्वा

जाणोनि घेईं आपणपया, । यया निर्विकारा आत्मया, । गुणेंसीं अविद्या माया । स्फेटण सिद्धी. ॥ ४४ ॥ मग तू देही, ना देहो, ऐसा । स्वस्तु, निर्मळु, जैसा तैसा, । वर्णु, आश्रमु, आपैसा । त्रिसरसील. ॥ ४५ ॥ तू मन, बुद्धि, ना अंत करण, । देहो, इंद्रियें, ना प्राण, । ज्ञान, अज्ञान, ना स्फुरण । मात्र काहीं. ॥ ४६ ॥ जागरादि चान्ही अवस्था, । तू, ना तूतें, या पार्था, । स्थान, भोगु, ना भोक्ता, । काहींचि तू. ॥ ४७ ॥ एकु, ना तू अनेकु, । आत्मा जगद्व्यापकु, । साध्य, साधन, साधकु, । सिद्धरूपा. ॥ ४८ ॥ जें जें काहीं दिसे, । तें तू ना, तुझा ठाईं वसे, । तूं एकुवाचूनु नसे । आन वस्तुमात्र. ॥ ४९ ॥ जें स्फुरण उठी पार्था, । तू ना, तूतें तें तत्वता, । जें तेंचि आहासी वस्तुता, । भूल झणे. ॥ १०५० ॥ जें जें भान जाणावया, । योग्य भासे आपणपया, । तत्साक्षी तू, वरि तया । नव्हसि साक्षित्वही, । ५१ ॥ ऐसा सहज स्थिती, नित्य, सिद्धु । होऊनि स्वविपईं प्रबुद्धु, । विचारिसी भूतभेदु । कैसा ते वेळीं ? ॥ ५२ ॥

नानुशोचितुमर्हसि

सकळ भूतचराचरीं, । मीचि सबाह्य अंतरीं, । हे खूण बरवया परी, । तूतें मानेल. ॥ ५३ ॥ तो मीं आत्मा अविनाशु, । मत्ता येरु तो मिथ्या भासु, । यये वचनीं विश्वासु । तूतें होईल. ॥ ५४ ॥ मग इतुलयावरि धनंजया, । ऐसा हा शोकु करावया, । योग्यु नव्हसी म्हणोनिया, । घेईं विचारु. ॥ ५५ ॥ देखिजे स्वप्न वाईट, । तरि जागृत होती सुभट, । तितुलेनीचि ते कष्ट । सर्व हरती. ॥ ५६ ॥ ऐसें आपुलेनि अज्ञानें, । जें घेतलें तुझेनि मनें, । तें मिथ्या, क्लेशा कारणें । कारण बापा. ॥ ५७ ॥ आता जाणोनि तू आपणा, । सहारीं प्रपंच महासिवणा, । मरे, मारी, तें असेना, । पहाता येथें. ॥ ५८ ॥

अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।
तथापि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥

वरी अप्रमित फँसें, । कवणें चिंतावें ? ॥ १०३० ॥ आठउ आठवणें विरोधी, । मीपणाहूनि जो मी आधीं । तेथें अनुसंधान कें संधि । विशेषें नसे. ॥ ३१ ॥ चिंतिजे ऐसा गुण जया । नाथीं, नाम, रूप, वर्णु, आत्मया, । स्वभावीं जयांचां, धनंजया, । मायाभाव हे. ॥ ३२ ॥ चिंतिजे ऐसें तत्व नव्हे, । चिंतन वृत्तिहानी न फवे, । चिंती कवणु ? तें स्वभावें । आत्माचि, अप्रमितु. ॥ ३३ ॥

अयमविकार्यः

गुण, भेद आणि विकार, । आत्मया वृत्तिविशेष समग्र । न वर्तती, जैसें अंबर । अंबराचां स्थानीं ॥ ३४ ॥ चळे ना ढळे अढळ, । उपजे ना मरे केवळ, । नव्हे अणु, ना स्थूळ, । आपणपयां. ॥ ३५ ॥ असे ना उपजे, वाढे, । तरुण, वृद्ध, ना फुडें, । घडे अथवा मोडे, । यत्ना यत्नीं. ॥ ३६ ॥ जयातें चढु ना वोहटु, ॥ आदि, मध्यु, ना शेवटु, । नाहींसा नव्हे, एक दाटु । आपुलां ठाईं. ॥ ३७ ॥ दिसेना, केवळु न दिसे, । नमसे, ना भासे, ऐसा असे; । सारिखा रात्री दिवसें, । स्वप्रकाशमयु. ॥ ३८ ॥ देहें गुण, ना अवस्था, । स्थानें भोग, ना भोक्ता, । जीऊ ना ईश्वरु तत्वता, । ब्रह्महीं नव्हे. ॥ ३९ ॥ ऐसा सगुणु, ना निर्गुणु, । आत्मा हा विकारविहीनु, । प्रवृत्ति निवृत्ति सीणु । नाहीं जया. ॥ १०४० ॥

उच्यते

बोलिजे वेदीं शास्त्रीं, । पुराणीं, ब्रह्मसूत्रीं, । महानुभावांचां उत्तरीं । सिद्धांतु हा. ॥ ४१ ॥

तस्मात्

तयाकारणें, पांडुसुता, । श्रमतु आह्मासीं तूं वृथा, । एकाचि करीं सर्वथा, । सांगिजेल तें. ॥ ४२ ॥

एवम्

हा काळुवरी सांगितलें, । जैसें तत्व उपपादिलें, । साधन ज्ञान सूचिलें । उपायें एणेंचि. ॥ ४३ ॥

एनं विदित्वा

जाणोनि घेई आपणपया, । यया निर्विकारा आत्मया, । गुणेंसीं अविद्या माया । स्फेटण सिद्धी. ॥ ४४ ॥ मग तू देही, ना देहो, ऐसा । स्वस्थु, निर्मळु, जैसा तैसा, । वर्णु, आश्रमु, आपैसा । विसरसील. ॥ ४५ ॥ तू मन, बुद्धि, ना अंत करण, । देहो, इंद्रियें, ना प्राण, । ज्ञान, अज्ञान, ना स्फुरण । मात्र कांहीं. ॥ ४६ ॥ जागरादि चाऱ्ही अवस्था, । तू, ना तूतें, या पार्था, । स्थान, भोगु, ना भोक्ता, । कांहींचि तू ॥ ४७ ॥ एकु, ना तू अनेकु, । आत्मा जगद्व्यापकु, । साध्य, साधन, साधकु, । सिद्धरूपा. ॥ ४८ ॥ जें जें कांहीं दिसे । तें तू ना, तुझा ठाईं वसे, । तू एकुवाचूनु नसे । आन वस्तुमात्र. ॥ ४९ ॥ जें स्फुरण उठी पार्था, । तू ना, तूतें तें तत्वता, । जें तेंचि आहासी वस्तुता, । भूल म्हणे ॥ १०५० ॥ जें जें भान जाणावया, । योग्य भासे आपणपया, । तत्साक्षी तू, वरि तया । नव्हसि साक्षित्वहीं, । ५१ ॥ ऐसा सहज स्थिती, नित्य, सिद्धु । होऊनि स्वविषई प्रबुद्ध, । विचारिसी भतभेदु । कैसा ते वेळीं ? ॥ ५२ ॥

नानुशोचितुमर्हसि

सकळ भूतचराचरीं, । मीचि सबाह्य अंतरीं, । हे खूण बरव्या परी, । तूतें मानेल. ॥ ५३ ॥ तो मीं आत्मा अविनाशु, । मत्ता येरु तो मिथ्या भासु, । यये वचनीं निश्वासु । तूतें होईल ॥ ५४ ॥ मग इतुल्यावरि धनंजया, । ऐसा हा शोकु करावया, । योग्यु नव्हसी म्हणोनिया, । घेई विचारु. ॥ ५५ ॥ देखिजे स्वप्न वाईट, । तरि जागृत होती सुभट, । तितुलेनीचि ते कष्ट । सर्व हरती. ॥ ५६ ॥ ऐसें आपुलेनि अज्ञानें, । जें घेतलें तुझेनि मनें, । तें मिथ्या, क्लेशा कारणें । कारण बापा. ॥ ५७ ॥ आता जाणोनि तू आपणा, । सहारीं प्रपंच महासिवणा, । मेरे, मारी, तें असेना, । पहाता येथें. ॥ ५८ ॥

अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।
तथापि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥

अथ च

असो, हें ऐसें मुख्य आतां । मत नचळे आमुचें, पार्था, । तूंही एयविपई जाणता । म्हणवीतासी. ॥ ५९ ॥

यनं नित्यजातं मन्यसे

गुरुप्रज्ञेचा अप्रकाशु, । वरि शास्त्रीं नाथी प्रवेशु, । आणि जाणपणाचा आवेशु, । तुझां ठाईं. ॥ १०६० ॥ नाइकोनि माझें वचन, । देहोचि आत्मा हें मानून, । नित्य उपजता, हें ज्ञान । सपादिसी. ॥ ६१ ॥ मातेपितया पासून, । माझें असे निर्माण, । कामु उत्पत्ती कारण, । योनिद्वारा ॥६२॥ शुक्ररक्ताचा समरसु, । तोचि मीं जाले पुरुषु, । ऐसाचि तुझा विश्वासु । असेल जरी, ॥ ६३ ॥

नित्यं वा मृतं मन्यसे

तरी अंतीं यया नाशु असे, । येथ म्हणसील तूं ऐसें, । जें नित्य मरणार आपैसें, । आत्मस्वरूप हें. ॥ ६४ ॥ सागरीं तरंगां आपैसें, । नित्य जन्ममरण असे, । पंचभौतिक हें तैसें, । उपजे, मरे. ॥ ६५ ॥ यया वेगळा तो मीं कवणु ? । विवेकु म्हणिजे अनुमानु, । प्रत्यक्ष दिसें कृशु, काणु, । हें कें मिथ्या ? ॥ ६६ ॥ क्षुधे तृषेची प्रतीति, । लपवावी आतां किती, । सुख-दुःख-भोग होती, । ते काय लटिकी ? ॥ ६७ ॥ माझें कुळ, माझें गोत्र, । माझा वशु, माझें क्षेत्र, । दिसे शरीर साकार, । हेंचि मी कीं; ॥ ६८ ॥ ऐसेचि राजे हे सकळ, । नित्य जन्ममरणशील, । ऐसें पापांड शबल । घेतलें तुवां; ॥ ६९ ॥

तथापि

तन्हीं आम्ही तवं, अर्जुना, । तुझें नव्हेसें म्हणोना, । तथापि पुसिलिया वचना । परिहारिजों. ॥ १०७० ॥

महाबाहो त्वं

देहोचि तूं, हें साचार, । जन्मुमरण मानु विकार, । ऐसेंचि भूतजात चराचर, । असो सुखें ॥ ७१ ॥ जळीं तरंग उठिती, । खेळती, विलया जाती, । पांच भौतिक स्फुरती, । देह तैसे. ॥ ७२ ॥

एवं शोचितुं नार्हसि

तरी येथ शोकु कासया । करितु आहासी ? धनंजया, । गेला देहो उपजावया, । पुडती नुरे. ॥ ७३ ॥ अनेक भूतात्में स्फुरती, । पुडती विळया जाती, । तें पंचभूतें मीनती । पांचां ठाईं. ॥ ७४ ॥ तेथें पाप पुण्य कवणें । मोगावें ? सांग वचनें; । स्वर्ग-नरक-पतनें । कवणासि गा? ॥ ७५ ॥ सहजचि भूतें पांचही । मीनती एके ठाईं, । कामास्तव देहीं । तये मतेचां. ॥ ७६ ॥ तो पिंडु पुडती जाण, । भूतवियोगें करून, । पावे काळें मरण । ऐसें जरी, ॥ ७७ ॥ सहज जन्मे, सहज मरे, । सहज असे, 'वात्रे, । देहांतीं कांहीं नुरे, । तें काय शोकु ? ॥७८॥ आतां तूं म्हणसील वचन, । मीं जीवरूपी असेन, । देहसंगें जन्मु, मरण, । नित्य पावतां; ॥ ७९ ॥ शुभाशुभें कर्मे करी, । मग तें भोगावया देहो धरी । तया देहाचां आकारीं,। मींचि आकारें. ॥१०८०॥ प्रारब्ध भोगूनि वोसरे, । तें देहऐक्यें मींचि मरे, । मग जीवरूपी उरे । कर्मसहितु. ॥ ८१ ॥ पुडती तें कर्म संचित. । प्राचीन होये निश्चित, । देह रचे तज्जनित, । तें मींचि होये ॥८२॥ एवं, जीर्णे, आणि मरणें, । हें बहुकाळ मजकारणें । लागलें आधीं, एणें । कर्मे करितां. ॥८३॥ बीजातेंचि वृक्षत्व, । आणि वृक्षातें बीजरूपत्व, । तैसें जीवा देहा एकत्व । अनादि असे. ॥ ८४ ॥ एणेंचि प्रकारें चराचर, । जीवरूप आधीं समग्र । जन्ममरण निरंतर, । येथें म्हणसी, ॥ ८५ ॥ तऱ्हीं तो शोकु करावया । योग्यु नव्हसी, धनंजया, । विषयो नाथी शोका तया, । म्हणौनि अवधारीं. ॥ ८६ ॥

जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।
तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥

जातस्य

पासाव क्षीयमाणाजाळें, । तैसेंचि तें प्राचीनत्वें अंकुरलें, । तें भोगावया जनलें, । स्थूळ शरीर हें. ॥ ८७ ॥ तया स्थूळातें निर्धारें, । जे वेळीं प्रारब्ध सरे, । विकारपंचक वोसरे, । भोगोनि जैं, ॥ ८८ ॥

ध्रुवो मृत्युः

तें मृत्यु होय आपैसा, । अढळु तो, गा वीरेशा, । हा बोलु माझा

अनारिसा। कवणें करावा? ॥ ८९ ॥ पावलाचि पुरे सकाळें, । मग श्रेष्ठयातेंही नटळे, । म्यांचि निर्मळा परी नाकळे, । मातें माझा. ॥ १०९० ॥ सृष्टिकाळीं जें आभासे, । विलयकाळीं तें सर्व नाशे, । मग आपणपयांहीं ग्रासे, । ऐसा अनिवारु. ॥ ९१ ॥ कर्तेनसीं जो आपणा । नुरवी प्रळयो, अर्जुना, । तयाचां मुखीं रचना। सृष्टीचीं हे. ॥ ९२ ॥ तो महाप्रळयो असाधारणु, । तया धाकला दैन्य दिनु, । तयातें सांवरी कवणु? । संहारकाळीं. ॥ ९३ ॥ ब्रह्मांडीं दोनी हे वर्तती, । तैसेचि पिंडीं दोनी आहाती, । निद्रा, मरण म्हणती, । एणें प्रकारें ॥ ९४ ॥ निद्रे प्रपंचु संहारे, । तो अज्ञानी सचला उरे, । मरण दुजें, तें नावरे । जन्मूनि सांघाती. ॥ ९५ ॥ उपजल्यापासात दीना, । प्रारब्ध भोगितां, अर्जुना, । प्रतिदिनीं क्षणक्षणा । क्षीण होये. ॥ ९६ ॥ प्रारब्धाची जे क्षीणता, । तोचि मृत्यु गा सर्वथा, । ते केवळ सरे, तैं दीसता । हाचि होये. ॥ ९७ ॥ ऐसा जन्मतांचि सांगाती, । देही वर्ते देहाप्रती । प्रकटु होये जै अतीं । तैं अनिवार तो. ॥ ९८ ॥

मृतस्य च

आतां दुर्वीयें एणें हार्ले, । मरणें देहा ग्रासिलें, । तथापि नाहीं खडलें, । पांडवा गा. ॥ ९९ ॥

ध्रुवं जन्मः

पडावेंचि आर्थी स्थूल, । तव तें देहज सकळ । येकवटोनि, शबल । देह करी; ॥ ११०० ॥ तये वासनामयें शरीरीं, । आधीं जाऊ रिघे, अवधारीं, । मग हें स्थूळ बाहेरी । सांडिता होये. ॥ १ ॥ या परी देह विसर्जिलें, । तैं जें वासनामय घ्येलें, । तें कर्मसग्रहो बोलिलें । पुरुषा बधन. ॥ २ ॥ ते यातना नाना दावी, । दैविक भोग भोगवी, । मग प्रारब्ध आपणा म्हणवी। तेव्हेळीं कैसें? ॥ ३ ॥ स्वर्गूनि आणी ससारा, । तये मातेचिया माजी उदरा, । नवां मासां बाहिरा, । आणी जन्म दशे. ॥ ४ ॥ जन्मोनि प्रारब्ध सारी, । तोचि मृत्यु आंगीं शेजारी । जन्मला, कर्मे करी, । तेंचि जन्मबीज. ॥ ५ ॥

अपरिहार्येऽर्थे

एवं जन्मादि सवें मरण, । सवेंचि मरणा जन्मु जाण, । हें अनादिसिद्ध, कवण, । परिहरूं शके ? ॥ ६ ॥ जन्ममरणाचें हें येसणें, । अर्जुना, दुःखगाऱ्हाणें । जयापासीं सांगणें, । तें तेंचि सांगे. ॥ ७ ॥ मीही आपुलां आंगीं, । तेंचि दावीं, पाहें जगीं, । बुद्धीतें म्हणे उगी । कार्या कारण. ॥८॥ ब्रह्मा, विष्णु, महेश्वरीं । घेतलें आधीं आंगावरी, । आतां कवणु निवारी । तुझें, ना यांचें? ॥ ९ ॥ अपरिहार्ये अर्थी इये । केला उपाओ वायां जाये, । ऐसेंचि साच जरी आहे । मत तुझें, ॥ ११० ॥

तस्मात्त्वम्

तरि आतां उगेंचि असावें, । स्वपक्षेंचि विचारावें, । अनिवार हें स्वभावें । आहे म्हणोनि; ॥ ११ ॥

शोचितुं नार्हसि

कवणाप्रती तूं सांगसी ? । कासया गा शोकु करिसी ? । केलेंनि शोकें, ययासी । प्रेतु आहे ? ॥ १२ ॥ जें जें गेलीं मेलीं, । तीं काय शोकें परतलीं ? । मा तूं येसणी उकळी । सामावीसना, ॥ १३ ॥ धांवतासि मूढ पक्षें, । तऱ्हीं शोकु तो फळदु न लक्षे, । आतां विचारु घेईं प्रत्यक्षें, । भूतें कैसीं. ॥ १४ ॥

अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।
अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥

भूतानि

चरें आणि अचरें, । स्थूळें आभासती साकारें, । पांचभौतिकें समग्रें, । भरें नाना. ॥ १५ ॥

अव्यक्तादीनि

तैं अव्यक्तापासाव जालीं, । नाना अव्यक्तेंचि व्यक्तें स्फुरलीं, । अव्यक्तप्रधानें बोलिलीं । महानुभावीं. ॥ १६ ॥ ते भूतांचि अव्यक्त स्थिति । जाणावी, विविध प्रकृति, । आइकें तियेची स्फूर्ती, । सांगेन ते. ॥ १७ ॥ कर्मद्वारां स्थूळें रचलीं, । तीं कर्मे लिंगदेहें निपजलीं, । तें लिंगदेह वर्ते मूळीं, । सूक्ष्म जें

का, ॥ १८ ॥ तें अव्यक्त जाणे पांडवा, । जाणे स्थूळाचिया भागाभागा, । प्रळयीं न मरे, तें जीवा । लागलें असे ॥ १९ ॥ तें अन्यथामात्र स्फुरण, । विस्तारलें गुणत्रय प्रधान, । कर्ता, कार्य, करण, । येणें आकारें ॥११२०॥ तया लिंगदेहाप्राग्देश, । स्वरूपाज्ञानमात्र असे, । तें कारणदेह परियेसें, । जीवाचें यया. ॥ २१ ॥ लिंगदेह तन्हीं साभास । अज्ञान केवळ निराभास, । तें आदिभूत देहद्वयास, । जाणावें अव्याकृत जें. ॥ २२ ॥ तयाही पहिलें अज्ञाना, । ज्ञान वर्ते, अर्जुना, । तें जाणता व्यक्त स्फुरेना, । म्हणौनि अव्यक्त. ॥ २३ ॥ सत्कार्य अज्ञान उठी, । तें यया विज्ञानाचा पोटीं । व्यक्ता शरीराच्या कोटी । आश्रयिल्या जेणें, ॥ २४ ॥ स्थूळीं जागृति ते व्यक्त, । लिंगीं स्वप्न अव्यक्त, । कारणीं सुषुप्ति निश्चित, । अव्यक्तचि ते. ॥ २५ ॥ महाकारणीं तुरीयावस्था, । ते अव्यक्त, पांडुसुता, । गुणअभिमानी वर्तता, । तद्वत तेथें ॥ २६ ॥ ऐसीं अनेका जीवा अनेकें । स्थूळें, चरें, अचरादिकें, । तेथें लिंगदेहें साभासात्मकें, । तें अव्यक्तें कीं. ॥ २७ ॥ कारणें, महाकारणें । व्यक्तें नव्हती जाणें, । अवस्था, गुण लक्षणें । तया विधेंची. ॥ २८ ॥ एव, अनंता यया भूतव्यक्ती, । त्या स्थूळा अंतरगतें समस्ती, । अव्यक्ता विषयो नव्हती, । यया बाह्यकारणा. ॥ २९ ॥ तेंही भूतें अव्यक्तें, । अव्यक्तापासाव जाण निरुतें, । आता अव्यक्त तूतें । सांगेन मीं. ॥११३०॥ अव्यक्ते प्रकृति अधिष्ठान, । निराकार, आत्मचैतन्य, । परब्रह्म, सनातन, , निरुपाधिक. ॥ ३१ ॥ जयातें गुण, देह, ना अवस्था, । प्रपंचु, परमार्थु। ना व्यवस्था, । तें आत्मस्वरूप यया भूता, । सर्वत्र एक. ॥ ३२ ॥ जेथें प्रकृति हा विवर्तु । गुणभेदें चतुर्धा स्फुरतु, । तोचि देहचतुष्टया भासु होतु, । व्यक्ताव्यक्त रूपें. ॥ ३३ ॥ गुणकृते देहभेदें, । अवस्थाभेदुही नादे, । मग तयाचेनि संबंधें, पुरुषीं भेदु ॥ ३४ ॥ एव देहावस्था गुण, । आत्मा ययाचें अधिष्ठान, । आता जालें ययांचें निर्माण । कैसें ? तें अवधारीं ॥ ३५ ॥ शुद्धसत्वप्रधानता, । प्रकृतिद्वारा आत्मसत्ता, । मीं आत्मा, हें वस्तुता । स्फुरण उठी. ॥ ३६ ॥ तेथिचें मात्र संवेदन, । तेंचि देह महाकारण, । तद्द्वारा स्वरूपानुसंधान, । ते शुद्ध तुरीया ॥ ३७ ॥ उभयाभिमानित्वें वर्ते । तो आ माचि प्रत्यगात्मा, हें निरुतें, । एव प्रकृतितें येणें मतें, । शुद्धसत्व ऐसें. ॥ ३८ ॥ अगा, निर्विकल्पा आत्मयाची । प्रकृति कळा आंगाची, । तिचेनि शुद्धसत्वें हाची । शबल मासे ॥ ३९ ॥

तेंचि प्रकृति गा चिन्मयी, । आपुल्या तमोगुणा आश्रयी, । मग दशा पालटी जाणई । पुरुषा अंतरस्थाची. ॥११४०॥ तमाचेनि प्रादुर्भावें, । स्वरूपस्फुरण मालवे, । मग तयाचि अज्ञाना, नांवें । देहकारण. ॥ ४१ ॥ तये कारण-देहीं अज्ञानीं, । अनुसंधान वृत्ति आटोनी । जाये, तेथें निदानीं । विस्मरण उरे. ॥ ४२ ॥ तया वृत्तिस्मरणा, नांवें । सुषुप्ति ऐसें ह्मणावें, । यया दोहींतें जाणावें, । तें आत्मेन स्वप्रभा. ॥ ४३ ॥ ययां दोहींतें जाणतां। प्रत्यगात्मा जो पूर्वीं होता । तोचि प्राज्ञ जाला, पार्था, । भेदें प्रकृति-गुणाचिया. ॥ ४४ ॥ पूर्वोक्त शुद्धसत्व, किरीटी, । तमप्रधान जें उठी, । तें अन्यथाज्ञाना प्रकटी । अधिष्टानीं तेथ. ॥ ४५ ॥ अज्ञानपूर्वक ज्ञान स्फुरे । स्वस्वरूपाचेनि विसरें, । तेंचि अंतःकरण आकारें, । वृत्तिचतुष्टयेंसीं ॥ ४६ ॥ संकल्परहित संवेदन । तें जाणावें अतःकरण, । संकल्पयुक्त स्फुरण, । मन जाणावें तें. ॥ ४७ ॥ निश्चयात्मकु वृत्यंकुरु, । तेचि बुद्धि, हा निर्धारु,। अनुसंधानमयु विकारु, । चित्त तें ते. ॥ ४८ ॥ अहतारूपें अहंकारु । उठी अंतःकरणवृत्तिविकारु, । ऐसा अन्यथाज्ञानप्रकारु, । तूतें निरोपिला. ॥ ४९ ॥ या वृत्तिपचकाची चपळता, । तें प्राणपचक, पार्था, । हेंचि बाह्यार्थज्ञानी वावरता, । पांचही ज्ञानकरणें. ॥११५०॥ कर्मीं प्रवर्ततां कर्मकरण, । अर्थु अवलंबिता विषय जाण, । एव पचवीस तत्वें मिळोन । लिंग देह, हे. ॥ ५१ ॥ विचारितां अन्यथाज्ञान, । तें ज्ञान मात्र अंत.करण । तयाचे वृत्तिविकार जाण, । तें ये तत्वें. ॥ ५२ ॥ तेथें विषयेंद्रियसंयोगें, । भोक्तया अंतःकरणा वेगें, । भोगवासनेचेनि अंगें । वृत्ति होती. ॥ ५३ ॥ ते मनोरथमात्ररचना, । स्वप्नावस्था, गा अर्जुना! जेथें वासनामय नाना । भोग भोगिजती. ॥ ५४ ॥ लिंगदेह, स्वप्नावस्था, । *उभयाभिमानी आत्मा भेत्ता । प्राज्ञु, प्रत्यगात्मा होता । तोचि तैजसु.* ॥ ५५ ॥ तेचि पुरुषाची प्रकृति । रजोगुण होये आश्रयिती, । तें त्या अंतःकरणवृत्तींप्रति । कर्मप्रवृत्ति स्फुरे. ॥ ५६ ॥ कर्ता—करण—कार्य—योगें, । कर्म तें उपजोंचि लागे, । मग वासनाशक्तीचेनि आंगें, । देह धरी. ॥ ५७ ॥ तें तें लिंगचि स्थूळाकारें । मातेचां गर्भीं अवतरे, । मग भौतिकें देहें साकारें । पावे जन्मु. ॥ ५८ ॥ कर्म, करण, गुणवृत्ति ।

आकारवंता दिसती, । ज्ञानेंद्रियें, सुभद्रापति, । भासती साकारें. ॥ ५९ ॥ प्राणपंचक चंचल, । तें वायोरूपीं होये केवळ, । मग अंतःकरणवृत्ति सकळ । संक्रमे तेथें. ॥११६०॥ अंतःकरण व्यान वेगें, । श्रवणा, वाचेमाजि रिघे, । शब्दीं प्रवेशलें उमगें । बाह्याकाशीं. ॥ ६१ ॥ मन समानाचेनि वडिवारें, । सकळें देहीं देहाकारें । होउनी, स्पर्शा बाहिरे । लागे जाणों. ॥ ६२ ॥ देहीं उपजे सुखदुःख, । तें आपणचि भोगी सकळिक, । लोहसंगतीं पावक । स्वरूप जैसें. ॥ ६३ ॥. करांचेनि व्यापारें, । तें मनचि सर्व वोसरे, । ती जी उदानाचेनि आधारें, । बुद्धि कैसी ॥ ६४ ॥ चक्षू, पादीं प्रवेशली, । नाना ते तें स्वयं जाली, । रूपातें जाणों लागली, । आपेआपर्ची. ॥ ६५ ॥ चित्त प्राणाचें लाहे बळ, । अपेक्षूनि रसु रसाळ । रसनें, शिश्नीं केवळ । अधिष्ठान करी. ॥ ६६ ॥ अहंता अपानाचेनि अंगें । घ्राणी पायूमाजि रिघे, । तेथूनि स्वविषई जागे, । गंधादिकीं. ॥ ६७ ॥ ऐसें चेष्टक, प्रकाशवंत, । कर्मकर्ते, ज्ञाते, अव्यक्त, । पांचभौतिकाकृती, व्यक्त । होतें जालें. ॥ ६८ ॥ तोचि पूर्वोक्त मनोरथु, । बाह्य प्रपंचीं जाला व्यक्तु, । इंद्रियद्वारा स्फुरतु, । तेव्हेळीं कैसा ? ॥ ६९ ॥ चक्षु जाणे रूपातें, । श्रोत्रु आइके शब्दातें, । त्वक् परीक्षी स्पर्शातें, । रसातें रसना. ॥ ११७० ॥ घ्राणु परिमळातें जाणे, । कर उठिती त्यागादानें, । आनंदैतव्य स्फुरे शिश्नें, । पायू विसर्गु. ॥ ७१ ॥ चरण लागती चलों, । वाचा अनुभूत सर्व बोलों, । अहंताममता गुणीं, डोलों । लागे स्थूळ. ॥७२॥ ऐसी अंतरस्थ कल्पना, । स्वप्न म्हणवी जे, अर्जुना, । तेचि बहिर्मुख ज्ञानकरणा । जागृति हे. ॥ ७३ ॥ स्थूळदेह जागरावस्था, । उभयाभिमानिलें वर्ततां । विश्व ऐसें सर्वथा, । आत्मया म्हणिजे. ॥ ७४ ॥ ऐसा आत्मा आत्मस्थिति, । अव्यक्त जाण, वीरपति, । तोचि प्रकृतिगुणसंगती । अनंतधा. ॥ ७५ ॥ तेथ प्रकृतिगुणसंगता । एकुचि अनेकु जाला होता, । तथापि अव्यक्त, तो व्यक्ता । सारिखा नव्हे. ॥ ७६ ॥

व्यक्तमध्यानि

प्रकृतिगुणांचेनि मेळें । आला, गेलाचि, परी न कळे, । इच्छाचारी, योगबळें । जाणावा तो. ॥ ७७ ॥ तो नायक वासनेद्वारा । आड दाऊनि

स्थूळ शरीरा, । लपलेपणें धनुर्धरा, । व्यवहारीं वर्ते. ॥ ७८ ॥ माझा माझा सकळें म्हणती । परी देहाभाड, तया नोळखती, । नष्ठु नाथें, वीरपति, । दावीं जगीं. ॥ ७९ ॥ आंगाचा मोहो लावी, । व्यक्त व्यक्तींचि मोहवी, । अव्यक्तु दिसेना, देखे दागी । लपालेपणें ॥ ११८० ॥ दारा, पुत्र, पशु, धन, । पुरुप, आश्रमु, ग्रह, वन, । हें परस्परापरि मौन । पाडिलें जेणें. ॥ ८१ ॥ कवण कवणाची हे माता, । कवणु कवणाचा सांग पिता ? । कवणु सुतु, कवणु वनिता ? । मी तो कवणु ? ॥ ८२ ॥ परस्परा मोहें भुलती, । परी येकमेकां नोळखती, । अतेव सकळ भ्राती निरुती, । निभ्रांतु आत्मा. ॥ ८३ ॥ नादेया अंगावरी वेपु । एकि दारा, येकु पुरुषु, । तेथें उभयत्तां प्रतिविशेषु । मिथ्या जैसा. ॥ ८४ ॥ अनवोळखी लंपटपणें । कीजती कमाचरणें, । वोळखी लाजिरवाणें । कैसें नवटे ? ॥ ८५ ॥ म्हणोनि व्यक्तीचें स्वांग, । तें देह दिसे बहिरंग, । मिथ्या मोहावया जग । अविद्या केलें. ॥ ८६ ॥

अव्यक्तनिधनान्येव

तें मिथ्यामात्र विनाशे, । अव्यक्त उरे जैसें तैसें, । जागृतें जेंवि माणुसें । स्वप्न विसरती. ॥ ८७ ॥ नट नाट्यकला विसर्जितां, । पुरुपा वेळु नाथी तत्वता, । आणि आपणपया सर्वथा, । हानि नेणें; ॥ ८८ ॥ तैसें व्यक्तीचें अवतरण, । फिटलें मात्र प्रावरण, । अव्यक्त, सत्य, सनातन, । तेंचि उरलें. ॥ ८९ ॥

हे भारत,

ऐसें हें, गा विचक्षणा, । मायालाघव, अर्जुना, । असती व्यक्तीची कल्पना । गेली हारपोनी. ॥ ११९० ॥

तत्र का परिदेवना

तेथें काय दुःख करणें ? ॥ काय पुनः पुनः आठवणें ? । देखिलीं नसतीं स्वप्नें, । तुवां काय ? ॥ ९१ ॥ परस्परा प्रीति जेथें, । देहीं वोळखी वर्ते, । तें तव जेथिंचें तेथें । असे शरीर. ॥ ९२ ॥ आता देह साडूनि गेलें, । तें काये होतें पहिलें ? । बा रे वोळखीहीण केलें । दुःख कव्हणी ? ॥ ९३ ॥ आमुची नाथी ठावा, । ते सीमा पुसतासी, पांडवा, । होसी विचारी तूं

बरवा । इतुल्यावरी ? ॥ ९४ ॥ भूतें तें भूतीं आहाती, । आणि अव्यक्त तें अव्यक्तीं । मेळें, तें काये तुज प्रती । दिसों आलें ? ॥ ९५ ॥ समस्तां देखतां गेला, । सकळीं गजबु केला, । आणि प्रेताचा धरूनी गळा, । मूर्खें रडती. ॥ ९६ ॥ तुमचा तो आथी स्वमावें । गेला, तो कव्हणाचा कांहीं नव्हे, । परस्परा वोळखी न संभवे । म्हणोनियां. ॥ ९७ ॥ सांगा, तो कवणाचा सुतु ? । कवणे कामिनींचा कांतु ? । कवणे कुळींचा अव्यक्तु ? । आत्मा जो कीं; ॥ ९८ ॥ काळा कीं गोरा, सांवळा, । नारी कीं नरु जो गेला ? । पार्था, तो नाहीं आइकिला, । देखिला कव्हणी. ॥ ९९ ॥ वेदां, शास्त्रां नसंपडे, । जाणतां योगियां कुवाडें, । तया अविनाशालागीं रडे, । तो महामूर्ख कीं. ॥ १२०० ॥ म्हणसी अविनाशु, हें साचार, । परि वियोगें दुःख अपार, । देहीं देहयोगें अपरांपर । प्रीति होती, ॥ १ ॥ तरी परस्परा देहदृष्टी । नवर्ते उभयतां भेटी । देह विविक्तां उठाउठी, । तेचि असे. ॥ २ ॥ गुणव्यतिरेकें पाहतां, । तो तो आपणुची, पार्था, । वियोगाची कथा, वार्ता । नाइकिजे श्रवणीं. ॥ ३ ॥ अभावीं देहांचा जवळिक, । देहभावीं वरी वेगळिक, । हें खूण नेणती मूर्ख, । हीनविवेक ते. ॥ ४ ॥ घट मठ-भावें गगनातें । भेदाचा अपवादु वर्ते, । घटमठाभावें येक तें । न भेदे गगन. ॥ ५ ॥ तेचि आत्मविचारणा । सांगेन तुजप्रति, अर्जुना, । जे कळतां अभावना । भेदबुद्धीची. ॥ ६ ॥ एतद्विषईं जाणावया । प्रवर्तले जे आपणपयां, । ते अधिकारभेदें, वीरराया, । कैसे ? अवधारीं. ॥ ७ ॥

आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।
आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥ २९ ॥

कश्चित्

साधनचतुष्टयसपन्न, । कव्हणी एक विचक्षण, । गुरुदास्यपरायण, । शास्त्रवादी, ॥ ८ ॥ ज्ञानवैराग्यें चोखडे, । शांतिबीज गुण मुडे, । सत्वाधिळें ज्ञान-दुरडे । विवेकाचें, ॥ ९ ॥ शास्त्रसंमतें, गुरुवचनें । स्वरूपानुभवाचें देखणें । जयां जालें, निरशनें । अविवेचेनी. ॥ १२१० ॥

एनं पश्यति

मग अविद्या-गुण-निराशीं, । द्रष्टादृश्यदर्शनग्राशीं, । स्फुरलिये स्फूर्ति न्हासीं । सहजें सहजा, ॥ ११ ॥ यया आत्मया पाहती । सच्चिदानंदा, वीरपती, । तें कैसें म्हणोन, तुजप्रती । सांगैन आतां:—॥ १२ ॥

आश्चर्यवत्

प्रथम प्रबोधाचि सरींसें, । कव्हणें एकें वृत्तिविशेषें, । महादाश्चर्य मानसें । उपजतें जालें, ॥ १३ ॥ निर्विशेषीं, निरजनीं, । निराभासमये, निर्गुणीं तया आश्चर्यालागूनी, । काये कारण ? ॥ १४ ॥ ऐसें म्हणसील, वीरा, । तरी अवधारीं, धनुर्धरा, । आश्चर्य उपजे योगेंद्रा, । तें अनारिसें नव्हे. ॥ १५ ॥ तेथें श्रवणा शब्दु नकळे, । श्रोत्रहीना तो कळे, । वेगळे करूनि डोळे । देखती योगी. ॥ १६ ॥ स्थूळ रूपालें गगनीं, । गगन हारपलें श्रवणीं, । श्रवण कीजे नयनीं । तें श्रोत्रां नेणवे, ॥ १७ ॥ श्रोत्रद्वारा दिसों लागे, । देखी तये दृष्टी मार्गें, । भोगिजे सर्वांग सर्वांगें, । रूपेंवीण । ॥ १८ ॥ शरीरावेगळ ठालेपणें, । अभावाचें एक देखणें, । अनंतें ब्रह्मांडें तेणें गुणें । दिसोंचि लागती. ॥ १९ ॥ देखिजे, तें नव्हे दिसणें, । यथातथ्य घेणें देणें, । मग अभावाचें वानें । प्रकट करी. ॥ १२२० ॥ रूपेंवीण रूप असे, । विणदृष्टी द्रष्टया दिसे, । मग द्रष्टेपण आपैसे । लागे गळों. ॥ २१ ॥ तेथें बधिर श्रवण करी, । श्रोता पडे बाहेरी, । अंधु देखे, बा रे, परी । डोळसु आंधळा. ॥ २२ ॥ आधीं खांडावी रसना, । मग रसज्ञान अर्जुना, । रसु जाणे तो नेणा- । माजी बैसविला. ॥ २३ ॥ षड्रसाची सोये न कळे, । तया रसनशून्या रस कळे. । डोळस केले आंधळे, । अनुभवें येणें. ॥ २४ ॥ आहे तें सर्व न दिसे, । नाहींचि केवळ तें दिसे,- । दिसणें, न दिसणें ग्रासे, । निवळे मग. ॥२५॥ ते असतचि असतयाचें, । नाहींपण रूपानामाचें, । मग आहेपण तेथिचें । तें जाणतचि नेणवे.॥२६॥ रसना रसनेतें चाखे, । डोळां आपणपयां देखे, । वोळखी सांडूनि वोळखे । आंग आंगा. ॥ २७ ॥ सर्वांग जाला रसना, । तेचि रूप कीजे नयना, । तेचि वाचा, अर्जुना, । तोचि श्रवणु. ॥ २८ ॥ निःशब्द हाक स्फुटे । ते त्रैलोकीं, वीरा, न सटे, । अनेकें ब्रह्मांडकुवंटें । जाती उतरोनियां. ॥ २९ ॥ निशीवीण दिनमान, । लोपे सूर्याचें किरण, । शशी, तारा, पावक, नयन ।

सेर्ये न संरतीचि. ॥१२३०॥ विणउदयें प्रकाशलें, । विणतेजें तेज फांकलें, । विणेंत्रिपुटिया देखिलें, । परि न बोलवेचि. ॥ ३१ ॥ ज्ञान ज्ञाना प्रतिकूळ, । परि अज्ञान तें निर्मूळ, । दुर्जेनिधीण सकळ, । सकळनाशें. ॥ ३२ ॥ होऊनि होइजे, तें होणें । नव्हे, मग तें न होणें । होये तें, पांडवा, होणें । पदार्थाचें. ॥ ३३ ॥ देहाचें अवघें हारपणें, । कीजे अनंता ब्रह्मांडाचें लेणें, । अर्जुना, आश्चर्य केसणें ! । मीं काय सांगों ! ॥ ३४ ॥ एणेंचि स्थूळें शरीरें । धरिजती भूतें चराचरें, । आणि लोकदृष्टी योगेंद्रें । आच्छादिलीं. ॥ ३५ ॥ उत्पत्तिस्थितिसंहारें । स्फुरणमात्र एक अंकुरे, । आणि जयाचें तो व्यापारें । नाथी स्पर्शिला. ॥ ३६ ॥ इंद्र होऊनि इंद्रातें, । नागवा आपुल्या देहातें, । पदार्थ भोगी पदार्थे, । सूटला सांता. ॥ ३७ ॥ भोगी, तैं कांहीं न भोगी, । न भोगी, तैं सर्व भोगी, । अभोगीं भोगी, भोगीं । अभोगचि, जैं. ॥ ३८ ॥ उठे अवघेनि साकारें, । जेव्हेळीं देखवें मेरे, । सिरकल्लाही खोंकरें, । न सिरके जनीं. ॥ ३९ ॥ जीवत्वाची साहे, वीरा, । तुटी मग, धनुर्धरा, । सकळा शरीरीं खरा, । स्वयंचि होये. ॥१२४०॥ जंव जव पाहे हारपों, । तंव तंव तो नेणें लपों, । कोठें न तपे तैं तपों । लागे सर्वत्रु, ॥ ४१ ॥ पवनाहूनि अति हळु, । गगनाहूनि पोकळु, । सर्वप्रारें केवळु । सागरु कल्पांतींचा. ॥ ४२ ॥ फोडूनि लोहत्व दर्पणाचें, । नसुधें निर्मळत्व जें तयाचें, । तें आकाशा येसणें जयाचें । ऐसें रूप. ॥ ४३ ॥ टकमक जाली करणा, । मना, बुद्धी, अंतःकरणा, । माओ नाकळे निजज्ञाना, । जयाचा तयाचिया. ॥ ४४ ॥ बोलतांचि नाठवे देह, । नांदतां नांदतेंही गेह, । हारपलेंचि आहे स्नेह, । असोनि वसे. ॥ ४५ ॥ करितां न वर्ते करणें, । न करितां तीं कर्तेपणें. । आश्रयो म्हणौनि उन्हें । कोमयलीं येती. ॥ ४६ ॥ प्रपंचा आंतु बाहेरी, । जयाचें रूप अवधारीं, । तें तितुलेंही देखणें परी, । डोळेनविण. ॥ ४७ ॥ धरितां मनोधर्में सुटे, । मनें सूटलेंनि मना भेटे, । भेटलेंपण वोखटें । भेटावया जया. ॥ ४८ ॥ उभा ना बैठा सचला; । आहिना, नाहींसा मरला, । स्फूर्तिद्वारा उलंडला, । तैं हाचि प्रपंचु. ॥ ४९ ॥ डोळांचें देखणें लपालें, । तें बुद्धी परपरीं देखिलें, । फुर्दतीं डोळा घातलें, । पहिलें नव्हे. ॥१२५०॥ तैं प्रपंचु डोळां हारपे, । डोळां प्रपंचेसीं लपे, । तें देखणें, याचें सोपें । कैसें म्हणावें ! ॥ ५१ ॥

चरअचरभूतजात, । द्रष्टादृष्टदर्शनाश्रित, । व्योमीं उपवी समस्त, । हारपों नेदी. ॥ ५२ ॥ यापरी पहिलेपण गेलें, । तया पहिलें तेंचि उरलें, । देखोनि आश्चर्य जालें, । महानुभावातें. ॥ ५३ ॥

तथैव चान्यः कश्चित्

तैसेचि आन, अवधारीं, । कव्हणी एक ससारीं, । सूटले चहू पदरीं । वासनेंचिया ॥ ५४ ॥ केलीं शास्त्रश्रवणें, । वैराग्यता, वनसेवनें, । परतु अपरोक्षसाक्षात्कारें तेणें- । वांचूनिया. ॥ ५५ ॥

एन वदति

वेदवादीं अति सादर, । शब्दब्रह्मीं निष्ठापर, । ते हा आत्मा चतुर । कैसा वाखाणिती ? ॥ ५६ ॥

आश्चर्यवत्

इदंतदित्यास्पदें, । बोलणीं जालीं विरुद्धें, । मग तेणें अतद्वादें, । तर्कु करिती. ॥ ५७ ॥ मग अतद्वादें निरस्त । तेंही तेंचि जाणती समस्त, । आता निराशवृत्ति साडित, । मौना आले. ॥ ५८ ॥ कीं इदत्व विषयत्वें हाले, । आणि नेति नेति म्हणणें सरलें, । मग पाठीं मौन उरलें । अवलंबावया. ॥ ५९ ॥ नाना न पवतीची करणें । उपराठता गेलीं प्राणें, । मन विरालें, कल्पने । मारु जाला. ॥ १२६० ॥ बुद्धि परतली गुणेंसीं, । आतां आत्मा कवण प्रकाशी ? । मग उगियाचि मौनेंसीं । योगी ठेले ॥ ६१ ॥ यापरि मात्रा गिळून, ॥ वाचा पोटीं घालून, । हातें दाविती खूण, । तेंही न घडे. ॥ ६२ ॥ मग करचरण आंवरिती, । गात्रे गोळा करिती, । स्वरूप अवाच्य म्हणती, । परस्परा. ॥ ६३ ॥ तैं एक म्हणती, स्वामी, । अवलंबिलें मौन तुम्हीं, । तरि गुरुशिष्योपदेशक्रमीं । काय करावें ? ॥६४॥ बोलता नये निश्चयेंसीं, । तरी स्वरूपोपलब्धि कैसी ? । शब्देंवीण उपदेशी । कैसें गुरु ? ॥ ६५ ॥ शब्देंवीण नाथी ज्ञान, । ज्ञानावीण प्राप्ति कवण ? । आणि प्राप्तिवीण मौन, । तें काय कीजे ? ॥ ६६ ॥ एव मौनाकारण ज्ञान, । ज्ञाना शब्दु श्रवण, । तरि बोलिजे ऐसी खूण, । काहीं असेचि कीं ? ॥ ६७ ॥ आता वाचे अनुभऊ नसता, । तरि शब्द कैंचा स्फुरता ? । मा सशयो त्या विनाशाता । सच्छिष्याचा; ॥६८॥ आणि श्रोत्रग्रासिमा ज्ञाना । स्वरूपानुभव

असेना, । तरि आइके अनुभउ खुणा, । त्या खुणे न याविया. ॥ ६९ ॥ एवं अनुभवाचें ज्ञान । तेणेंसीं अभिन्न श्रवण, । तें श्रवणातेंही खूण । कळलीचि कीं. ॥ १२७० ॥ दृष्टांत आणि समाधाना, । दृश्य पाहे मूळ खुणा, । म्हणोनि तत्व नयना, । कां कळलें नव्हे? ॥७१॥ इंद्रियें अर्थी उबगलीं, । उपराठींचि चालों लागलीं, । तरीं जाणावीं कीं रातलीं, । तया आत्मसुखा. ॥ ७२ ॥ सकळां संकल्पा विसरे, । सुखीं मन केवळ मरे, । परंतु सुख सांगावया उरे, । तें मनचि कीं.॥७३॥ संवकलया ठाया जाये,। इंद्रियसंगें न राहे, । तरी तें देखिलें कीरु आहे । एणें मनें. ॥ ७४ ॥ बुद्धीतें नसोंचि ठावें, । तरि मना कवणें कळावें? । स्वरूप आपुलें वोळखावें, । सच्चिदानंद. ॥ ७५ ॥ यापरि मन, बुद्धि, करणें, । ये जाणती आत्मयाकारणें, । तेथें काय पापवचनें । केलें आथी? ॥ ७६ ॥ तंव एरींही ते निरोधिले । ते श्वासहळूचि सोडिले, । मग परस्परां लागले । विवादु करूं ॥७७॥ सकळां इंद्रियां प्रकाशूनि, । आत्मा प्रकाशे त्यांचां गुणीं । पारु नेणती मौनी । नाडले ते. ॥ ७८ ॥ तंव एक म्हणती रहा, । वृथा काये बोलत आहां? । आत्मा अगोचरु हा । ऐसा जाणिजे. ॥ ७९ ॥ व्यापारीं वर्ते नयनु, । तो तया रूपातेंचि जाणु, । व्यापारशून्यावें नयनु । नयनु नव्हे. ॥ १२८० ॥ अवधान दीजे, श्रवणें । ते शब्दार्थचि त्याचें जाणणें, । निर्व्यापारीं तें कवणें । श्रोत्रु म्हणावा? ॥ ८१ ॥ यापरी मना इंद्रियांचे, । आणि व्यापार बुद्धीचे, । धर्मविक्षेपक गुणाचे, । आत्मया आत्मस्थिती. ॥ ८२ ॥ आतां आत्मया स्वरूपसिद्धी । साधन तें वृत्तिविरोधी, । म्हणौनि इंद्रियां, मना, बुद्धी । निर्व्यापारीं धरिजे. ॥ ८३ ॥ मग आंगाचिया प्रवृत्ती । मनबुद्धींद्रियें साचें होती, । तें पावतांचि निवृत्ति, । गेलीं हारपोनियां. ॥ ८४ ॥ चांचल्यता धर्मरहितु । गगनीं नुरे मारुतु. । कीं जळकल्लोळ उपशांतु, । कांहींचि नुरे. ॥ ८५ ॥ चळवळ सांडिजे मृगजळें । तेथें किरणचि तें असे संचलें । स्वरूप सांडितां निमालें । रागसमूह नभीं. ॥ ८६ ॥ तेंवि निर्विकल्पें स्वरूपस्थिती । मनेंद्रियेंसीं बुद्धि नायी, । तेथें स्वरूपें स्वरूपप्रतीती । येऊं लागे. ॥ ८७ ॥ यापरी तो तयां करणांतें, । आत्मा, बुद्धी, मनातें । नेणवे, आपुलेनि मतें । स्वसंवेद्यु तो. ॥ ८८ ॥ तें सहजें सहज

निवळे, । सहज सहजा सहज कळे, । अन्यदृष्टीं सहज न कळे, । आत्मस्वरूप जें. ॥ ८९ ॥ तंव एक म्हणती, भलें । स्वरूप तुम्हीं प्रतिपादिलें,। स्वरूप केवळ न कळे । बुद्धयादिकां.॥१२९०॥ तें आपणपयां स्वसंवेद्य, । अन्यदृष्टी अवेद्य, । साधकु, साधन, साध्य । निराशिलें हें. ॥ ९१ ॥ तरी परसंवेद्य नव्हे, । स्वसंवेद्य स्वभावें. । तें बोलती, ये वाचे ठावें । जालें कैसें? ॥ ९२ ॥ वाचेद्वारा मन वर्ते । आतां कळे कीं न कळे तेथें, । अहो, बुद्धी नपवे स्वमतें, । तरी विचारु कैंचा ? ॥९३॥ मनबुद्धयादिइंद्रियगणां । स्ववृत्ति जाणतां येना, । तो आपणु आपुलेनि आपणा । आत्मा जाणे. ॥ ९४ ॥ हें जाणणें मत कवणातें ? । आणि निर्व्यापारीं मनादिक तें । कांहींचि नवर्ततसें निरुतें, । देखे कवण ? ॥ ९५ ॥ निर्व्यापारीं निराशु । वृत्तीचा देखे न्हासु, । आपुलातें मनाचे विश्वासु । असे आमुचा. ॥ ९६ ॥ आपुल्या मरणाची खूण । सांगणें, हें अघटमान, । कां तें मायिक मेळेपण । काजा नये. ॥ ९७ ॥ गृहांतु सांगे वार्ता, । मीं येथ नाहींसें म्हणता, । तो जाणावा जाणता । आहे कीं नाहीं? ॥ ९८ ॥ तेंचि जरी साच असे, । तरी अनुभउ बाह्य न प्रकाशे, । समाधीची खूणऐसें । जल्पणें वाओ. ॥ ९९ ॥ समाधीचिये खुणेविण । नसतें लयविक्षेपही ज्ञान, । आणि कां लागतें निरशन । प्रवृत्तीचें? ॥ १३०० ॥ विणप्रवृत्तिनिरासें, । शुद्धेंचि शुद्ध प्रकाशे, । तरी पश्वादिकां ज्ञान नसे । ऐसें कां पां? ॥ १ ॥ शुद्धेंचि शुद्ध स्फुरे, । गुणाची वृत्ति न संचरे । तैं गुरुशिष्य, वेद, शास्त्रें, । पुराणें खोटीं. ॥ २ ॥ म्हणोनि आत्मा आइकावा, । आइकोनि मना आणावा, । मना मानला जाणावा । विशुद्धा बुद्धी. ॥ ३ ॥ तंव सकळ म्हणती हां हो, । येथ नाथी संदेहो, । तरि नित्यानित्यविचारें कां हो । अनारिसें? ॥ ४ ॥ असंतां संत नाकळे, । संतीं असंत नाडळे. । यां दोहींपेक्षां वेगळें । नसे तिसरें. ॥ ५ ॥ तरी असंत हें गुणभान । तदंशकें इंद्रियें, गुण, । मन, बुद्धि, ज्ञानाज्ञान, । विज्ञानादिक. ॥ ६ ॥ हें न वर्तावेंचि स्वरूपीं, । स्वरूप तें यांचां लोपीं । आतां अनुभवु निर्विकल्पीं । तो वर्ते कैंवि? ॥ ७ ॥ एवं शुद्धें अभाओ शबलाचा । आणि शबलें अनुभवु शुद्धाचा; । भलतेंचि बोलो वाचा, । परि न पालटे हें. ॥ ८ ॥ जाणिजे गुणोपसंहारा, । निर्गुणानुभवु तो खरा, । यया बोला दुसरा ।

काय म्हणे ? ॥ ९ ॥ आता निर्गुण निर्गुणी स्वभावें, । हें गुणा कैसेनि ठावें ? । योगी बोलती स्वानुभवें, । हेंही साचचि ॥१३१०॥ तरं एक करिती समाधान, । अवधारा, हो, वचन, । यया आत्मयाचें ज्ञान । ऐसें आहे. ॥ ११ ॥ मना बुद्धी इंद्रियाची । वृत्ति अर्थोन्मुख गुणाची, । तिया आत्मा तो न प्रकाशेचि । गोचरपणें. ॥१२॥ जो तया मन मनाचें, । साराग करणा बुद्धीचें, । जीनीं जीवन जीवाचें, । मीपणाचें तत्व. ॥ १३ ॥ म्हणौनि गुणवृत्ति अर्थोन्मुखा । त्या साडिजत्ती सकळिका, ।मग सहज निर्विकारता आइका। जे वेळीं उरे ॥१४॥ तेथें इंद्रियगण हारपले, । ते मनीं मनोरूपें उरले, । जे व्हेळीं व्यापार साडिले । तया सकळाचे. ॥ १५ ॥ निर्विकल्पा निजस्थिति, । सकल्पविकल्पाची शांति, । तेथें मन मनत्वें नाथी, । तें बुद्धीचि होये. ॥१६॥ विचारापासाव वोसरली । ते स्वरूपीं बुद्धी हारपली, । आता स्वरूपाकार उरली. । ते कवणे आगें ? ॥ १७ ॥ ज्ञेयाचेनि उपसहारें । ज्ञाताचि ज्ञान सचरे, । तेंचि नुरलेपण खरें । तया ज्ञानाचें. ॥ १८ ॥ विण ज्ञानें, ज्ञेयें, ज्ञाता । साडी आगींची ज्ञातृवता, । मग सहज सच्चिदैकरसता । उरे आनदमयु. ॥ १९ ॥ तेथें तदाकार सवेदन, । सुखोद्बोध लक्षण, । वर्तत असे अभिन्न । आत्मयासीं. ॥ १३२० ॥ तेचि प्रकृति चिन्मयी, । आत्मया पुरुषाचा ठाईं । वर्तत असता, काई । होत असे. ॥ २१ ॥ तेणें सर्ते हें भासमान, । इणें स्फुरे तयाचें ज्ञान, । सुखाचें एका सेवन, । उभय वर्गा. ॥ २२ ॥ सन्निधानें पुरुषाचेनि । आनदु जाला मिळणीं, । तो जाणितला तिचा गुणीं । तेणें पुरुषें. ॥ २३ ॥ एव सच्चिदानदैकरसु, । एथें आत्मा तो सत्यांशु, । प्रकृति बोलिजे चिद्विशेषु, । सयोगु ते सुख. ॥ २४ ॥ हे अनादि येकरसता, । प्रकृतिपुरुषाची असता, । अनुभवाची स्पष्टता । कळो लागे. ॥ २५ ॥ प्रकृतिचेनि अगें । गुणातें वृत्ति त्यागे, । मना, इंद्रिया, प्रसगें । बुद्धीतेंही. ॥ २६ ॥ आत्मेनसीं अभिन्नता, । अनुभवु आथी तत्वता, । जववरि ते सुलीनता । वृत्तीची असे, ॥ २७ ॥ वृत्तिसंन्यासु करणें, । तैं बुद्धीन आत्माचि होणें, । मग अनुभवाचिये खुणे, । पारे सवेद्यता. ॥ २८ ॥ विक्षेपकाळीं जागृतें, । तेंचि मनबुद्ध्यादिके येथें । होती मग अनुभवातें । लागती प्रगट. ॥ २९ ॥ एव द्वैतदृष्टी नकळे । तो अभेददृष्टी आत्मा कळे, । कळल्या भेद मावळे । तो यया सर्वांचा.

॥ १३३० ॥ तंव एक म्हणती, भलें । अनुभवा रूप केलें, । प्रकृतिपुरुषभाव मेळे । निर्गुणावस्थेसीं. ॥ ३१ ॥ प्रकृति अभिन्न पुरुषेसीं, । म्हणौनि तो कळे तियेसि, । कीं तो वेगळा इयेसीं, । म्हणौनि कळे; ॥ ३२ ॥ पुरुषेंसीं अभिन्नता, । प्रकृतिच्या निक्षेपु नसतां, । आणि विण तेणें प्रगटतां । काय. अनुभवु ? ॥ ३३ ॥ आतां वेगळी पुरुषीं करणें, । तें असंतें नुरावें येणें, । गुणसहित प्रकृतिभानें । सार्वकाळ. ॥ ३४ ॥ आतां हे व्यक्त अव्यक्ता जाणे, । कीं अव्यक्त अव्यक्तपणें. । असो, व्यक्ता अव्यक्तीं मिळणें । ऐसें तंव न घडे. ॥ ३५ ॥ आतां हे अव्यक्त म्हणावीं । तरि व्यक्त वर्ते गुणभावीं, । मग इंद्रियांकरवीं प्रकटवी । स्वरूपानुभवु. ॥ ३६ ॥ व्यक्तें अव्यक्त अनुभविलें । नाहीं, तें सांगों कैसें आलें ? । गुरुसंप्रदाय जाळिले । ते व्यक्तीचिपासाव. ॥ ३७ ॥ आतां संततें संत अनुभवी । कीं असंततें संत भासवी; । आश्रयितां उभयभावीं । प्रकृति कैसी ? ॥ ३८ ॥ असंततें दावी संत, । तरि असंत तें मिथ्याभूत, । आतां मिथ्याचि तें वर्तत । कव्हणी देखिलें ? ॥ ३९ ॥ संततें जाणे संतातें, । तरि हें जंव संत वर्ते । तंव सत्यानुभवु, कवणातें । दावा पां तो ?॥ १३४० ॥ अनुभवुचि नाथी म्हणा । तरि वेदशास्त्रापुराणां, । गुरुशिष्यांचिया वचना । कवणें निवरावें ? ॥ ४१ ॥ तंव अवघेचि म्हणती, । काये हे बोलचि उक्ति । पांगूळ जाली मति, । विपत्ति न चले. ॥ ४२ ॥ निर्धारें म्हणों निर्गुण, । तरि वेगळे न पडती गुण, । सगुण म्हणतां स्फुरण- । मात्र न साहे. ॥ ४३ ॥ प्रपंचावेगळें फुडे, । तरि प्रपंचु कैसा निवडे ? । इतुल्याचिसाठीं कुडें । जालें निःप्रपंचत्व. ॥ ४४ ॥ आतां सप्रपंच साच मावूं, । तरि तो दृष्टी कैंचा दावूं ? । कवणे ठेवणीं ठेवूं । निश्चयो हा ? ॥ ४५ ॥ अनुभवुं काय, कैसे ? । नानुभवुचि कैंचा बैसे ? । जें दिसे, न दिसेसें दिसे, । दिसेना, न दिसे. ॥ ४६ ॥ यापरी बोलतां भागले, । योगीं वाद सांडिले, । टकमकां वेडावले, । ठेले, पाहत. ॥ ४७ ॥ क्षणेकु वारले मौनें, । योगी उवगळे वचनें, । मग केलीं हास्यवदनें, । येकुदांचि तेंहीं. ॥ ४८ ॥ हां हो बोलतां बोलणें निषिद्ध, । आणि बोलिजे तेंही जें प्रसिद्ध; । येणें जिंकिलें विरुद्ध- । मात्रही हें. ॥ ४९ ॥ कव्हणा कहीं न बोलवे । तें सुखेंचि आतां बोलवें, । काय येकदेशीया मानावें । आम्हीं संकोच.

॥ १३५० ॥ अनुभवु म्हणतां कुवाडें, । तें अनुभवा मति पाडें, । नामस्मरणीं बोबडें, । तेंही जी कें. ॥ ५१ ॥ शास्त्रवादी आणि मुके । जयाचां गांवीं सारिखे; । खरें खोटें तुके । यंकोंचि पाडें. ॥ ५२ ॥ बोलों तितुकेंही असंत, । आणि कांहीं नव्हे अनुचित; । आतां ऐसाचि आत्मा एथ, । काइसा विस्मयो ! ॥ ५३ ॥ ऐसे अनुवादतां उबगले, । मग उबगोंही विसरले, । मृगजळीं लागले । क्रीडा करूं. ॥ ५४ ॥ क्षणेकु करिती वचनें, । क्षणेकु धरिती मौनें, । मग उभयपक्षें येणें । काज न देखती. ॥ ५५ ॥ मौनें, वचनें हीं सरती, । क्षणेकु विस्मयो करिती, । खुणा न बोलोनि बोलती, । मग बोलती स्पष्ट. ॥ ५६ ॥ ऐसें शाब्दिक वरि कुशल । प्रकाशिती वाग्जाळ, । कां अनुभवयुक्ती चपळ । चाळना करिती. ॥५७॥

अन्यः

तंव तेथेंचि कव्हणी एक । जन, अर्जुना, भाविक । श्रवणाधिकारी लोक, । आस्थाशीळ पैं, ॥ ५८ ॥ अनुभवु नाहीं हृदयीं । आणि शास्त्रविपत्तीही कांहीं; । परि भावो श्रवणाचां ठाईं । जेहीं ठेविला, ॥ ५९ ॥

एवं शृणोति

ते हा आत्मा यथाविधु, । ऐसा आइकों म्हणती शब्दु, । तंव तो एकपक्षी नादु । संपादेंचिना. ॥ १३६० ॥ निश्चयो शब्दीं न थरे, । आइकतां संशयो तो मरे, । कांहींचि हृदयीं खोंकरें, । थारेना आत्मा. ॥ ६१ ॥ वरि नेणपण लागों नेदी, । जाणीव जाणिवे विरोधी, । आइकतां कुठे बुद्धि, । मग ते कैसें ? ॥ ६२ ॥

आश्चर्यवच्च

म्हणती काय केलें आतां ? । जाणावें साम्हीं जाणतां ? । नपवे बुद्धि सिंव्हांता । एकही अंगें. ॥ ६३ ॥ डोळांचें देखणें काढावें, । स्फूर्तीचां मुळीं ठेवावें, । पोटीं श्रवणाचां रिघावें, । आरायिजोनि. ॥ ६४ ॥ पाहताचि केंवि न पाहिजे, । जाणोनिही शब्दु नेणिजे, । करूनि सर्व न कीजे, । हें आश्चर्य कीं. ॥ ६५ ॥ जीतचि पाहवें मरण, । गेलियापाठीं जालेपण, । देहचतुष्टय फेडून । सांडावें कैसें ? ॥ ६६ ॥ असतेनि भोगें अभोगु, । अभोगें तेणें सर्व भोगु, । सांडूनि मीपणाचा संगु, । मीचि होणें. ॥ ६७ ॥ व्योमीं प्रपंचु

सांठवावा, । स्फूर्तीचिमाजी तो दावावा, । जीतां जीवु जैं यथावा, । तैं आश्चर्य कीं! ॥ ६८ ॥ टपकरी गगन फाडावें, । पाठयीं आपणा बांधावें, । तेथेंही गळोनि जावें । हा शब्दचि न कळे. ॥ ६९ ॥ वाचेवीण वदावें दृष्टी, । श्रवणु पडला रसने पोटीं, । घ्राणु आला भेटी । तया ठायां. ॥ १३७० ॥ वाचा रूपातें देखे, । स्पर्शु श्रवणीं आइके. । असे, नसे तें तुके । सारिखें तुकीं. ॥ ७१ ॥ आपण आपणा विसरावें, । प्रपंचुनगर मोडावें, । दृष्टीचे दृष्टी पाहवें । देखणें केंवि? ॥ ७२ ॥ शून्याचें शोधावें मूळ, । तोडावें व्योमाचें फळ, । आकाशापरी पोकळ । होऊनि जावें. ॥ ७३ ॥ शब्द घ्राणा गाळावे, । रस श्रवणें चाखावे, । ब्रह्मांडाहूनि देखावें । परुतें केंवि? ॥ ७४ ॥ विण गमनागमनें । सर्वत्र कैसें पावणें? । चराचर आंगीं धरणें, । सामान्य नव्हे. ॥ ७५ ॥ उन्मेषें निमिषें करावें । जेणें लयोद्भव भावें, । तेणें आत्मया जाणावें, । हें केंवि साधारे? ॥ ७६ ॥ तंव एक म्हणती, जाणिजे । तें आत्मा नव्हे सहजें; । बरें मा सुखें नेणिजे, । तेंचि आत्मा. ॥ ७७ ॥ तरि ज्ञाना आत्मा विषयो नव्हे, । आणि अज्ञाना नाच्छादवे, । आत्मा आत्मया म्हणावें, । अघट हेंही. ॥ ७८ ॥ विषयो नव्हे वाचेप्रति, । आणि वीण तेणें नसे ते रिती, । मौन जयाचिये भ्रांती । घोडवतें होये. ॥ ७९ ॥ काये सांगावा हा ऐसा? । आणि नव्हे म्हणावा तें कैसा?। वेड लावी माणसा, । सुजाणातें.॥ १३८० ॥ पाहतां पाहतां पहाणें । हारपे न हारपलेपणें, । उपवासु तेंचि पारणें । मना विषयिकासि; ॥ ८१ ॥ उदया तें अस्तवणें, । अस्तमानीं उदय पावणें, । येकवाटलें जिणें, मरणें । तये बुद्धीसि. ॥ ८२ ॥ यापरी बोलतां बोल सरले, । श्रोते जन वेडावले, । टकमका पाहों लागले, । गुंपले सकळ. ॥ ८३ ॥ तंव वक्ते म्हणती, परियसा, । आत्मा ते तुम्हीचि असा, । येर म्हणतां कां हांसा? । नकळे म्हणौनि. ॥ ८४ ॥ आम्ही जरि आत्मा होतों । तरि ऐसे कां निवांत बैसतों? । मनुष्यामाजी वसतों । भाग्यहीनत्वें? ॥ ८५ ॥ तुमतें कां दिसतों आम्ही? । गुंपतों कां ह्या कर्मी? । सुखीं, दुःखीं, देहधर्मी । पिटतों ना. ॥ ८६ ॥ असती कां आम्हां क्षुधा? । तापत्रयाचा बाधा? । असो, तो आत्मा अंधा । आम्हां दुर्लभु. ॥ ८७ ॥ वक्ते म्हणती वचन, । सांडितां अवस्था देहें गुण, । विशुद्धपद निर्गुण. । तें तुम्ही आत्मा.

॥ ८८ ॥ तंव येर म्हणती नवळ, । ऐसेंही साच असैल । तरि जननचि जाळें सफळ, । आमुचें ये जगीं. ॥ ८९ ॥ पुढती अपूर्वचि वाटे, । ऐसेंही आणि साच घटे, । आइकतयां नवल मोठें । वाटे या परी. ॥ १३९० ॥

कश्चित्

तंव आन एक संसारी, । केवळ आसक्त व्यापारीं, । श्रवणीं अनाधिकारी, । आस्थाहीन, ॥ ९१ ॥ नाहीं सद्गुरूचें दर्शन, । नेणती वेद, शास्त्र, पुराण, । कर्मभक्तिज्ञानहीन, । पशुदेही जे, ॥ ९२ ॥

एवं श्रुत्वापि

रळिया विनोदु करिती, । कुशब्दीं काळु क्षपिती, । ते कन्हणें येके येती । प्रसंगें पुराणा; ॥ ९३ ॥ तेथें यया अश्रुता, अमूर्ता, । आत्मया आइकत असतां, । कैसे म्हणौनि ? पांडुसुता, । अवधारीं, ते ॥ ९४ ॥

न चैव वेद

भवया उचलूनि आइकती, । पातीं गोळा करिती, । सरिसे होऊनि बैसती, । तुकिती मान; ॥ ९५ ॥ तंव तें कांहींचि नकळे, । पाणियें पुसिती डोळे, । जवळी आणिती गळे । आइकावया; ॥ ९६ ॥ एक बैसोनि उंचीं । पानें पाहती पोथीचीं, । येक म्हणती रंगाचीं । वरी वेष्टणें; ॥ ९७ ॥ वक्त्याचें खाड हाले । तेथेंचि येक लोधले, । एकीं पाये पसरिले, । लागले डोलों; ॥ ९८ ॥ जांभया देतां मुख फाटे, । एकीं धरिलीं ललाटें, । एक म्हणती मोठें । पडलें राहाण; ॥ ९९ ॥ परस्परां स्वप्नें सांगती, । रळिया विनोद करिती, । एक ते उठूनि जाती । उबगोनियां; ॥ १४०० ॥ एक ते बैसले भिडा, । सांपडले एक वेढां, । एक म्हणती, घडघडां । वाचूनि जा. ॥ १ ॥ एक म्हणती, आइका कानीं, । एक म्हणती, जळो म्हणोनि, । अश्व राहिले रानीं । आणावे कवणें ? ॥ २ ॥ म्हणती मऱ्हाठें ना कानडें, । बोलीं बोलाप्रति कोडें, । लागलें आम्हा वेडें, । येथें आलों; ॥ ३ ॥ नाहीं नाम देवाचें, । नाहीं युद्ध रायां रायांचें, । मन रंगावें आमुचें । कवणें ठाईं ? ॥ ४ ॥ आइकिलेंनि काये येणें ? । नेणों कन्हणाचें गान्हाणें, । बापु, बापु ! उखाहरणें, । अंतःकरण निवे. ॥ ५ ॥ आजि सारिपाटु अंतरला, । येकु म्हणे होतों निजेला, । एकु म्हणे भुकेला । पाइ-

णा घरीं; ॥ ६ ॥ वडिलांतें पुसती सान, । अहो, हें कवण पुराण? । तंव ते म्हणती, आख्यान । आत्मनाथाचें; ॥ ७ ॥ तरि तया आत्मनाथा । कवण माता? कवणु पिता? । तंव एरु म्हणे, वक्ता । चुकला येथें; ॥ ८ ॥ कवणाचे उदरीं जन्मला? । कवणें कैसा वाढविला? । हें तो लिहिणारु चुकला । पुस्तकीं ययें. ॥ ९ ॥ पूर्वी आइकिला श्रवणीं । मार्कंडेयाचा पुत्र म्हणोनि, । द्रुपदी ययाची जननी, । नागकन्या. ॥१४१०॥ सुदाम याते गुरु, । परशुराम हा सहोदरु, । शंखासुराचा अवतारु । भवेंसेनि. ॥ ११ ॥ मग हा पसरला त्रिभुवनीं । आपुलया भक्तांलागूनि, । हे कथा रामायणीं । बोलिली असे. ॥ १२ ॥ ऐसा हा बोलु खरा । आला तुमचिया विचारा, । तव येर म्हणती, म्हातारा । बहुश्रुतु असे. ॥ १३ ॥ एक वक्तया पुसती, । आत्मा कैसा हो म्हणती? । तंव ते अंतरीं दाखविती । जाणावा म्हणोनि. ॥ १४ ॥ आतां अंतराचि तें कैसें? । घटाकाशाचिया ऐसें; । असो तो घटचि पुसें, । आधीं सांगा. ॥ १५ ॥ मग ते मृत्तिका दाखविती, । तंव ते तेचि पाखुडिती. । आत्मा सांडला म्हणती । पहा पहा. ॥ १६ ॥ आइकोनि देखणा ऐसा, । म्हणती, द्रष्टा म्हणिजेतो कैसा? । तंव घट सापेक्षु आपैसा, । उमजवूं जातां. ॥ १७ ॥ एकमेकातें लोटिती, । घटासि देह घालिती, । घटशकलें वेंचिती, । आत्मा म्हणोनि; ॥ १८ ॥ एक म्हणती दुर्घट, । आत्मा घेतां महाकष्ट, । झणें फुटे ललाट, । गुडघा, डोई. ॥ १९ ॥ एक उगेचि देती कान, । व्यवहारीं वाढ्वनि मन, । काय हें जालें पुराण । म्हणती एक. ॥ १४२० ॥ ऐसे अनुभवें एक धाले, । ते अंतरीं विस्मयो पावले, । पुढती संसारु विसरले, । यया पूर्वे. ॥ २१ ॥ एक शब्दवादलंपट, । बोलतां पावले कष्ट, । मन मौना मौनीं अनिष्ट, । विस्मयोचि करिती. ॥ २२ ॥ एकां अघटमान कळे, । विषमीं सम निवळे, । ते श्रवणमात्रेंचि पावले । विस्मयातें. ॥ २३ ॥ एक शृंगहीन पशु । नेणती आत्मा अविनाशु, । शब्दचि न कळे विशेषु । तर्कु घेती. ॥ २४ ॥ ते पृथ्वीवरील पाषाण, । खर, कां सूकर, श्वान, । मनुष्य नव्हती जन । विषयासक्त. ॥ २५ ॥ यापरी गा धनंजया । जाणतां अविनाशा आत्मया । महदाश्चर्य ज्ञानियां । वर्तत असे. ॥ २६ ॥ तेथें विरुद्धांही एकरसता; । काये आक्षे-

पिसी आतां? । आत्मा देहीं विविक्तता, । जाणावा साक्षी. ॥ २७ ॥ तो देहीं असोनि अदेही, । पुढती सांगेन आइकईं, । मग शोकु धरावया हृदयीं । योग्यु नव्हसी. ॥ २८ ॥

देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।
तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥

हे भारत

भरतकुळनिधाना, । आत्मा, बा रे, अर्जुना, । अजु, अव्ययो, गुणा-। पासाव विलक्षणु. ॥ २९ ॥ तो जाणतां, जाणतयां । अपूर्व वाचे बोलतयां । तो कें आथी? म्हणोनियां । जरि पुससील, ॥१४३०॥ तरि लयोद्भवस्थिति । जियापासाव, वीरपति, । गुणद्वारा निपजती । प्रकृति ते. ॥ ३१ ॥ तिचें आत्मा अधिष्ठान, । तो जेथिंचा तेथें असे जाण, । जयाचां स्वरूपीं भवभान । विवर्तु उठी. ॥ ३२ ॥ तो असर्वता सर्वरूपी । द्वैतभावनेचां लोपीं । ज्ञानाज्ञान स्वरूपीं । जयाचां न वर्ते. ॥ ३३ ॥ आतां तूं म्हणशील, सर्वरूपा । योगी केंवि जाणती सद्रूपा; । तरि अवधान देईं, बापा, । निरोपिजेल. ॥ ३४ ॥ जाणणें, नेणणें, बुद्धीचें । अनुभवणें तेथ मनाचें । धर्म नव्हती आत्मयाचे । तो अद्वैतु सदा. ॥३५॥ आपणपयां जाणे, भोगी, । ऐसा नव्हे जो गुणसंगी । आणि मनबुद्ध्यादिकां लागीं । विषयो नव्हे.॥३६॥ सर्वां पक्षीं अज्ञेयु, । आतां योगियां कैसा ज्ञेयु ? । सांगेन, आत्मा अद्वयु । पांडवा, मी. ॥ ३७ ॥ सकळे बुद्धीतें व्यापून, । बुद्धी आत्मा अधिष्ठान । मनीं मनत्व, मनपण, । जेणें स्फुरे; ॥ ३८ ॥ हाचि कारण समस्त, । करणद्वारा जें दिसत, । करणामुळीं निश्चित । स्वरूप जयाचें. ॥ ३९ ॥ ऐसा सर्वगतु स्वभावें, । द्वैतदृष्टी विषयो नव्हे, । म्हणौनि करणद्वारा जाणवे । तें विषयभान. ॥ १४४० ॥ यालागीं, ज्ञानवृत्ति । पदार्थोन्मुखा सांडिजती । तत्साक्षित्वें निवडिती । योगी तत्व. ॥ ४१ ॥ श्रोत्रादि ज्ञानकरणें । जाणती विषयाकारणें, । तेथें ज्ञेयभर्थ सांडणें, । दृश्य म्हणौनि. ॥ ४२ ॥ दृश्यु निरसे अनात्मा, । तंव करणसमूह मानिजे आत्मा, । मग दृश्यनिराशीं धर्मा । जाणावें तयाचिया. ॥ ४३ ॥ करणधर्म साक्षित्वें, । तें अनात्मस्थानीं वर्ते, । अंतरात्मा म्हणौनि तेथें । मनाचि जाणावें. ॥ ४४ ॥ तेंही

वृत्तिरूप कळे मन, । आनात्मा म्हणिजे म्हणौन, । मग तत्साक्षी संवेदन । ते बुद्धि आत्मा ॥ ४५ ॥ तियेही निज वृत्तींतें, । आपुलियें मूळ प्रकृतीतें, । अंतरंगु साक्षी वर्ते । पुरुष, तो आत्मा. ॥ ४६ ॥ तें तंवचि सार साक्षित्व । जंव आभासे गुणिक तत्व, । गुणऱ्हासें पूर्ण संतत्व, । जैसें तैसें. ॥ ४७ ॥ यापरी ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान, । हे भेदवृत्ति सांडून, । कीं स्वस्वरूपीं सामावून, । योगी जाणती. ॥ ४८ ॥ एवं गुणोपाधि गुणसाक्षी, । आत्मा मनबुद्ध्यादिकां लक्षी, । हें योगियांचें मन प्रत्यक्षीं । वेगळें होतां. ॥ ४९ ॥

अयं देही

म्हणौनि म्हणिजे हा देही, । येरव्हीं आरोपु जया नाहीं, । बाह्यांतरभाव कांहीं । जाणता कां ॥ १४५० ॥ प्रकृतिगुणीं रिघाला, । साक्षी नाम पावला, । देहाभिमानी जाला । अंतरस्थलें. ॥ ५१ ॥

सर्वस्य देहे

येक जैसा शरीरीं, । तैसा भूतजातचराचरीं, । अंतरस्थ, साक्षी, योगेश्वरीं । मानिला हा. ॥ ५२ ॥ एक म्हणती भूतात्मा, । एक म्हणती अंतरात्मा, । येक म्हणती जीवात्मा, । उपाधिभेदें. ॥ ५३ ॥ एक म्हणती क्षेत्रज्ञु, । येक म्हणती साक्षी विलक्षणु, । येक म्हणती जाणु । जाणिवेतें. ॥ ५४ ॥ येक म्हणती परोक्षु । येक म्हणती प्रत्यक्षु, । येक म्हणती दक्षु, । करणसाक्षी; ॥५५॥ देहावस्थागुणद्रष्टा, । येक म्हणती आत्मा सुभटा, । योगी पावतां निष्ठा, । आरोपु करिती; ॥ ५६ ॥ परतु तो आपणु जैसा तैसा, । यांचियाही सदा सरिसा । हेहीं सर्वां आपैसा । होये देही ही. ॥ ५७ ॥

नित्यमवध्यः

परंतु देह नित्य सविनाश, । नित्य आत्मतत्व अविनाश, । जें शून्य ना साभास, । आहे ना नाहीं. ॥ ५८ ॥ विरती आपुलां साठें, । की आटलेन तेणें आटे, । तें किरण जैसें न लोटे । मृगजळें तेणें. ॥ ५९ ॥ ऐसा नित्य, वध्यां शरीरा-। माजी अवध्य आत्मा समग्रा, । सर्वत्र, अविनाशु, निरंतरा । स्थिति देहीं. ॥ १४६० ॥

तस्मात्सर्वाणि भूतानि

तयाकारणें कौरवांतें, । आणि नासतील कीं सर्वे भूतें, । आत्मा मरेल

माझेन हातें । देहमारें, ॥ ६१ ॥ येणें मतें वीरा, । अवधारीं, धनुर्धरा, । यया भूतां चरां । अचरां करणें गा. ॥ ६२ ॥

त्वं शोचितुं नार्हसि.

शोकु करावया कारणें । योग्यु न होसी, तूं जाणें, । हा आत्मबोधु वचनें । येणें तूतें हो आतां. ॥ ६३ ॥ तो आम्हीं कथन केला, । उठीं, मानु देईं बोला, । नाश्रयीं अविवेकवला । आग्रहातें. ॥ ६४ ॥ तूं म्हणसील, मी संसारी, । नव्हें ज्ञानी, ज्ञानाधिकारी, । बोधेंविना उत्तरीं । सखोलां या. ॥ ६५ ॥ ज्ञानाचिये अप्राप्ती, । देहभावचि साच गमती, । शब्दमात्रेंचि तुटती । कैंवि संसार? ॥ ६६ ॥ आत्मा ऐसा आइकिला, । मनींही विश्वासु मानला, । तथापि नाहीं कळला । अपरोक्षु जंव. ॥ ६७ ॥ हां जी, अपरोक्ष भेदभान, । आणि परोक्ष तें आत्मज्ञान, । आतां देहबुद्धीचें निरसन । होये कैसें? ॥ ६८ ॥ प्रत्यक्ष मरों घातला, । तो अमृत म्हणतांचि जाला, । हें काये घडे, लागला । नयन भ्रमवूं. ॥ ६९ ॥ यापरी अधिकारशून्यु, । मी अपरोक्षज्ञानहीनु । साच माने अर्जुनु, । ऐसें जैं म्हणसी; ॥ १४७० ॥

स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि ।
धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते. ॥ ३१ ॥

स्वधर्ममपि चावेक्ष्य

तरि आतां तें असो, पार्था, । मीं अर्जुनु ऐसें म्हणतां । क्षेत्री, हें तन्हीं तत्वता । वोळखसी कीं? ॥ ७१ ॥ मज क्षेत्रियातें स्वधर्मु । नियमला आधीं संग्रामु, । जाला सुगमु ना दुर्गमु, । त्याज्यु नव्हे. ॥ ७२ ॥ इतुलेंही कळत असोन, । प्रत्यक्ष दृष्टी पाहोन, । धरितासि जरी पवित्रपण, । तरी तें ऐसें. ॥ ७३ ॥

विकंपितुं नार्हसि

एथ कंपित व्हावया, । स्वधर्मापासाव चळावया । योग्यु नव्हसी, धयंजया, । सर्वथैव. ॥ ७४ ॥ तया स्वधर्मातें नाशक । ममत्व धरिसी बाधक, । हें पाप नेणसी आइक । कैसा दिसतोसि. ॥ ७५ ॥ ढळढळां आसुवें ढळती, । चळचळां गात्रें कांपती, । मुळमुळां बोष्ठ स्पदती, । कांती सांडिलासि. ॥ ७६ ॥

क्षत्रियस्य
अर्जुना, क्षेत्री पवित्र, । निर्मळ जयाचें कुळ, गोत्र, । तयालागूनि शास्त्र । काये प्रतिपादी ? ॥ ७७ ॥

धर्म्याद्धि युद्धात्
उचितु आपला स्वधर्मु, । कराना नि:कपट संग्रामु, । ययापेगळें ते अधर्मु । पाप क्षेत्रिया. ॥ ७८ ॥ संग्रामें क्षेत्रियातें हित, । अकरणीं सर्व अहित, । हें श्रेष्ठ याचें मत विहित, । अनादि असे. ॥ ७९ ॥

श्रेयोन्यन्न विद्यते
म्हणौनि आणिक श्रेय । नाथी क्षेत्रिया पुण्यकार्य, । ऐसेंचि आमुचें तात्पर्य, । म्हणोनि अनधारीं. ॥ १४८० ॥

यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।
सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम् ॥ ३२ ॥

हे पार्थ
अर्जुना, उपदेशू काये ? किती ? । पुरे; तपीं, दानीं, सुकृतीं, । यज्ञादिकींही न पवती । एणेसीं समानता. ॥ ८१ ॥

ईदृश युद्धम्
युद्ध हें तुज दिसे सानें, । परि महिमा ययाची मी नेणें, । ठेंगणी केलीं अनुष्ठानें । एणें संग्रामें. ॥ ८२ ॥

स्वर्गद्वारम्
साचचि हें स्वर्गद्वार, । सकळा सुकृताचें शिखर, । प्रवेशकाळीं सुखकर, नाहीं आडकाठी. ॥ ८३ ॥

अपावृतम्
निशिकाळीं कपाटें देती, । दिवसकाळीं तें उघडिती, । स्वर्गद्वारीं ऐसीं रीति । वर्तत असे. ॥ ८४ ॥ सा मास तें दक्षिणायन, । कृष्ण पक्षु निशिमान । ते रात्रि, दिनमान । एतद्विपरीत जें. ॥ ८५ ॥ सा मास उत्तरायण, । आणि शुक्ल पक्षु दिनमान, । ऐसें अहोरात्री प्रमाण । तये स्वर्गीं. ॥ ८६ ॥ पूर्वोक्तें निशिसमयें । एकादा सुकृति जाये, । तो द्वारीं न सोडिती, ये । पुनरपि संसारा. ॥ ८७ ॥ दिनसमयें पावे सुकृति, । तो प्रवेशे द्वारीं, वीर-

वृद्धपण, । कला नाहीं तें वदन । जयापरी, ॥ १६ ॥ प्राणीं सांडिलें शरीर, । दीपकेंवीण मंदीर, । अमानें जिणें अपार । काये करावें ? ॥ १७ ॥ तैसा सकलधर्मभ्रष्टु, । स्वर्गी म्हणतांल, हा नष्टु, । मीं न म्हणें, माझा इष्टु, । म्हणौनि कर्थी. ॥ १८ ॥ येणें परलोकविरोधें । म्हणसील सुखें नांदें, । तरि अकीर्ति तत्संबंधें । जोडी जोडिसी. ॥ १९ ॥ इहलोकीं मानु नाथी, । तोही तूं नमनिसी चित्तीं, । तरि, अवधान देईं, पुढती । एक आहे. ॥ १९२० ॥

पापमवाप्स्यसि

अनेकें पातकें संचरती, । रोग जैसे क्षया अंतीं, । समस्तां सुकृतांची शांति । अतिशयें, गा. ॥ २१ ॥ स्वधर्मभ्रंशें पुण्यप्राप्तु, । पातकां नानांचा प्रवेशु, । तेणेंही मानिसी संतोषु, । तो व्यर्थ तुझा. ॥ २२ ॥ नाना यातना, नाना जन्म, । तेथेंही निपजे कुकर्म, । मग पुढतापुढती निःसीम । तेंचि पावसी. ॥ २३ ॥ 'न करीं' म्हणतासि जें, किरीटी, । तें करिसी जन्मांतरां पोटीं; । परी हें तंव तुझां अदृष्टीं । नेमलें असे. ॥ २४ ॥ 'पळों' म्हणतासि भयें जेणें, । तें स्वधर्माचेनि अकरणें, । देहांतरीं स्वार्थाकारणें । करूंचि लागसी. ॥ २५ ॥ असो, तें देहांतीं सकळ. । प्रस्तुत वर्ततां हें स्थूल, । लौकिकीं जिणें दुःखमूळ । मांडैल, अवधारीं. ॥ २६ ॥

अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम् ।
संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥

ते

प्रमुख देखोनि योद्धयां । मागे पुढें, धनंजया, । पाहों रिघसी पळावया, । तंव निघु न पुरे. ॥ २७ ॥ मग उगियाचे घेतां धांव, । उभयसैन्यीं गवगव, । ते आइकती, देखती कौरव । इतुलेनि तुझी. ॥ २८ ॥

अकीर्तिं चापि

नामाची आल्या गेली, । कीर्ति सांडूनि पळाली, । पुढें अकीर्ति उभी ठाकली; । ते कैसी ? आइकें. ॥ २९ ॥

अव्ययाम्

वाडें सानांप्रति कथिती, । तीं आइकतांचि द्वंद्वें होती, । मग आपुलियाही सांगती । पुत्रां, पौत्रां. ॥ १९३० ॥ तेही पुनरपि, वीरा, । तुझी अकीर्ति,

धनुर्धरा, । विस्तारूं लागती परंपरा । ययें सृष्टी. ॥ ३१ ॥ तेंचि होती पुराणें, । कथा गोष्टी आहाणें; । विनोद करिती मेहुणे । घरोघरींचे. ॥ ३२ ॥ मग जो शब्द ठसावला, । तो अधिक विस्तारोंचि लागला; । अविनाशु, अर्जुना, वाढला । तुझा अकीर्तिवादु. ॥ ३३ ॥

भूतानि कथयिष्यन्ति

नागरिकजन बहुवस, । तयां हेंचि रुचैल, परियस; । मग तुझेया नामाचें माणुस । देईल प्राणु. ॥ ३४ ॥ अर्जुना ऐसें एणें केलें, । रडोनि आपणा वांचविलें; । तंव एक म्हणती, धाकुलें । वाळक कीं. ॥ ३५ ॥ मुख पसरूनि बोभाये, । पळे, मागें पुढें पाहे, । ययाचें नाम काये? अर्जुनाचें असे ? ॥ ३६ ॥ युद्ध देखोनि पळाला, । धावतां अडखुळोनि मेला, । लोक म्हणती आला । अर्जुनु दुजा. ॥ ३७ ॥ नयनीं देखोनि अश्रुधारा, । म्हणती, अर्जुनपण कां करा? । तयां लोकां निंदकां समग्रां । कवण वारी ? ॥ ३८ ॥ कां अत्यंत शोकशीळां, । जन म्हणती, पार्थकळा । कां हो आली सुशीळां । तुम्हांलागीं ? ॥ ३९ ॥ ऐसा तूं मूर्तु अवकळेचा, । कुरठा नाना अकीर्तीचा । होऊनि, मनोधर्मु जनांचा । रंजविसील. ॥ १५४० ॥ मुहूर्ती, प्रवेशीं, निर्गमीं, । शुभकार्याचां उपक्रमीं, । तुझें नाम न घेती कामी, । प्रातःकाळें. ॥ ४१ ॥ न फोडी पापाणी पापणु, । तयातें तद्दिनीं अपमानु; । नाम घेतयाचा नयनु । आसुवें सांडी. ॥ ४२ ॥ तुझिये वंशीं जे वर्तती, । ते आपुला वंश न संगती । म्हणती, अर्जुनु आम्हांप्रति । केचा होता. । ॥४३॥ शीळातें लाजिरवाणें, । आपुलां वंशीं करणें, । जळो ! जळो ! तें जिणें । नपुंसकाचें ! ॥ ४४ ॥ उत्तमे कुळीं जन्मोनि । अवघेयां लंछन आणी; । तो सहस्रायु वांचोनि । काये कीजे ? ॥ ४५ ॥ धिग्य जालें जननीचें, । धिग्य गोत्र तयाचें, । साधुसंगमीं जयाचें । नामु न निघे. ॥ ४६ ॥ ऐसे पुढें विस्तारेल, । तें आतांचिपासूनि केवळ, । अकीर्तीचें फुटेल । दुपानें बिरुढें. ॥ ४७ ॥ तें आम्हींचि आइकोन श्रवणीं, । देखोनि ययाचि नयनीं, । त्रैलोक्य भरोनि अर्जुनीं । येईल भेटों. ॥ ४८ ॥

संभावितस्य च

तूं तंव मान्यु मानियांतें, । श्रेष्ठ सकळां कीर्तिमंतांतें; । महाजनसभे ते व्हेळीं तें । कैसें वाटैल? ॥ ४९ ॥

अकीर्तिर्मरणादतिरिच्यते

याहूनि मरण तें भलें, । परि जळो अकीर्तीचें जाळें; । मसीचें मुख घडिलें, । होईल सभे. ॥ १९९० ॥ तैं जों कारिसी क्रोधु, । तों तों अधिक विनोदु, । म्हणौनि आइकिला शब्दु । पोटींचि सामाविजे. ॥ ९१ ॥ तैं विष घोंटितां घोंटे, । परि अकीर्तीचा न घोंटे । शब्दु, जो श्रोत्रां भेटे । महावीरसभे. ॥ ९२ ॥ अर्जुना, जे साधुसज्जन, । तयांतें मरणाहीहून । अकीर्ति थोर मरण, । ऐसें मानें. ॥ ५३ ॥ कीर्ति तंवचि जीजे, । आणि कीर्तीकारणें मरिजे, । मरोनि कीर्तिमुखें जीजे । लोकत्रयीं. ॥ ९४ ॥ भाग्यवंतां हा नियमु; । भाग्य तयांतें ठाके, सुगमु । धर्मार्थु, पुरुषां, कामु, । हाचि संभावितां. ॥ ९५ ॥ भला तूं, म्हणौनि प्रस्तुत । सांगणें घडलें येथ, । क्षेत्री हेंचि देखत देखत । काये म्हणती? ॥ ९६ ॥

भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः ।
येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ ३५ ॥

महारथाः

देशोदेशींचे नृपाळ । असगे मीनले सकळ, । महारथिये, निर्मळ, । क्षात्रधर्मी. ॥ ९७ ॥ वडिलु भीष्मु, गुरु द्रोणु, । कौतुक जयाचें तो कर्णु, । कौरवभारु आनु । मीनला असतां, ॥ ९८ ॥ युद्ध होईल दारुण, । ऐसें स्वर्गा आइकोन, । कौतुक पाहों सुरगण । अंतरिक्ष ठेले. ॥ ५९ ॥

त्वां

ते देखती तूतें रुदतां, । मागें पुढें अवलोकितां, । युद्ध सांडूनि पळतां, । काय म्हणतील ? ॥ १९६० ॥

भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते

अर्जुनु गेला, रे, गेला; । आपुला प्राणु रक्षिला; । थोर पुरुषार्थु केला । पळोनि येणें! ॥ ६१ ॥ देखोनि भीष्माचें बळ । अर्जुनें सांडिली चळवळ, । मायिक आणिली कळवळ । मोहाची येणें. ॥ ६२ ॥ सारथ्य तुवां केलें, । तें आजिरवाणें आम्हां जालें, । साचचि भय घेतलें. । काय पां तुवां ? ॥ ६३ ॥ पळोनि जेथें जाणें, । तेथिंचे राये राणे । मीनले संग्रामें येणें, । देखिलें तेंहीं. ॥ ६४ ॥ मग तेथिंचे ते तूतें । निर्भंसितील निरुतें, ।

मग काय करिसील ? मागतें । गेलें तें युद्ध. ॥ ६५ ॥ मग लज्जा प्राणु देइजे, । का निर्लज्ज होऊनि जीजे, । थोरांचिये न वंचिजे । सभेप्रति. ॥ ६६ ॥

येषां च

दानीं, स्वधर्मी, समरंगणीं, । का सभेमाजी, सिंहासनीं, । वर्णिता ख्याति वचनीं, । ययांमाजी. ॥ ६७ ॥

त्वं बहुमतो भूत्वा

तू एकु उदारु, । तू स्वधर्मी निष्ठापरु, । तुजसीं नाथीं जुझारु । यये पुरत्रयीं, ॥ ६८ ॥ सभेमाजी तू श्रेष्ठु, । रणसंग्रामीं धीटु, । न साहे त्रिनयना चोटु । तुझा, पार्था. ॥ ६९ ॥ मागें अथवा मुखावरि । तूतें जे वर्णिती क्षेत्री, । तया समस्तामाझारी । श्रेष्ठ असता ॥ १५७० ॥

लाघवं यास्यसि

अति लघुत्व पावसील, । मग ते स्तुतिही निंदा मानैल, । आणि निंदा ते येईल । सहज वाटया. ॥ ७१ ॥ परस्पराही अपहास । करिती जन एकमेकास, । ते तू मानिसी उपहास । माझेचि म्हणौनि. ॥ ७२ ॥ तेथें दुणावैल कोपु, । वरवयाचाही सतापु, । तरं तंव तो आरोपु, । खराचि होईल. ॥ ७३ ॥ असो. बहुजनें निंदिता । कवणासि परजिजे, पार्था ? । अगा, पुढील चुकवावें आतां, । तरि शहाणेपण. ॥ ७४ ॥ तें असो, गा, पांडुनदना, । जयाची करितासि तू करुणा, । ते तुज पळाल्या अर्जुना । काय म्हणतील ? ॥ ७५ ॥

अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यन्ति तवाहिताः ।
निन्दन्तस्तवसामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥

तवाहिताः

तुझेनि, अहित जया, हितें, । हित तुझेनि अहितें, । आणि तू मूर्खु जो ययातें । बधु म्हणतासी. ॥ ७६ ॥ जन्मातरीं वैरी असती, । ते देहसबंधी होऊनि साधिती, । ते मयाचि कळों येती । प्रीतियोगें. ॥ ७७ ॥ कवणें कपटफास केले ? । द्यूतकर्मीं धर्मा जिंकिलें ? । राज्य कवणें हरिलें ? । साग पा, गा. ॥ ७८ ॥ कवरीं धरूनि द्रुपदीतें । सभे आणिलें सतीतें । वस्त्रहरणीं मातें । स्मरली पांचाळी. । ७९ ॥ तत्काळेंचि मीं अर्जुना । नाशु करितों

तुझ्या स्वजना, । परि अनृत्यता धर्मवचना । येईल म्हणौनि ॥ १९८० ॥ दुःखाची उकळी साहिली, । क्रोधाची कळा प्रकाशिली । वस्त्रेंचि तियेतें पुरविलीं । तये सभे. ॥ ८१ ॥ तें तूं विसरलासि काये ? । माझां हृदयीं कालविताहे । आतां मग उलंडोनि जाये, । ऐसें वाटे. ॥ ८२ ॥ लाखागृह कवणें केलें ? । भीमसेना विष दिधलें ? । गिरिकंदरीं लाविलें । कवणें तुम्हां ? ॥ ८३ ॥ ते म्हणतासि तूं स्वजन, । तरि मिथ्या तुझें ममत्व, मौन. । असो. अहित हें देखोन । काय म्हणती ? ॥ ८४ ॥

अवाच्यवादांश्च बहून्

ते तयांचे वाद अनुचित, । वाचा न बोलवती मातें एथ, । जे कुमनुष्यां विहित, । परस्परां भांडणीं. ॥ ८५ ॥ अगा, द्रुपदीचीं वस्त्रें हरिलीं, । तेंहीं देहशंका कांहीं घ्येली ? । तयां निर्लज्जांची बोली । कैसी म्यां बोलिजे ? ॥ ८६ ॥ कामातुरा परपुत्रें, । माता हें ज्ञान वर्ते ? । तैसीं कौरवांचीं मतें । नव्हती काये ? ॥ ८७ ॥ आइकतांचि जें वचन । न धरिजती दोन्ही श्रवण, । तैं सकळा मुक्तता खान, । पितृगण च्यवती. ॥ ८८ ॥ वाचे आलयां आळु-माळ, । न फिटे केलया सचिल, । ते अवाच्यवाद केवळ । संज्ञेनें जाणावे. ॥ ८९ ॥ ऐसीं पापियांचीं वचनें, । श्रोतयां वक्तयां पापकारणें, । तें बोलिजती एकेंचिजणें, । एकुदां एकांतीं. ॥ १९९० ॥ तैसें नव्हे हें, अर्जुना; । बहुतां ययां दुर्जना । काये आवडे मना, । गाळिया देतां ? ॥ ९१ ॥ अहो, येकेकातें सहस्र । मुखें असती अपारें, । तरि काये पांडुवांस भारें । देतां सिविया ? ॥ ९२ ॥ धणी न पुरे एके । वदनें, दे, देवा, अनेकें, । युद्ध सांडूनि सुखें । गाळिया देऊं. ॥ ९३ ॥ तंव एक म्हणती, विक्षेपु । कां करा आनु संकल्पु ? । एकसमयावच्छेदें कुजल्पु । अववेचि बोलों. ॥ ९४ ॥

वदिष्यन्ति

मग ते समुदाये सकळ, । जैसें जयाचें वाचाबळ, । तैसे निंद्यशब्द केवळ । बोलोंचि लागती. ॥ ९५ ॥ जेथें देखती तूतें, । ऐसेंचि बोलती तेथें तेथें, । मग तूं आंवरिसी क्षोभातें, । हें काय घडे ? ॥ ९६ ॥ तूं म्हणसील, हे स्वजन; । आइकतांही उणें वचन, । हें नमनी माझें मन । निश्चयें या. ॥ ९७ ॥ स्वधर्मापासाव च्यवावें, । मिथ्या अभिमानें वधावे । स्वजन, हें धर्मशास्त्र नवें । करूं पाहतासी. ॥ ९८ ॥

तव सामर्थ्यम्

निःसीम तुझेयां भुजांचें । सामर्थ्य जें क्षात्रवियेचें, । तया आच्छादन मोहाचें जालें असतां, ॥ ९९ ॥

निन्दन्तः

विहाला, हेंचि वाढविती, । परि कृपालु, ऐसें न म्हणती । भीष्मद्रोणही निंदिती । सामर्थ्य तुझें. ॥ १६०० ॥ म्हणती, "संग्रामरणवार्ता । रम्या वाटती आइकतां; । युद्धीं सन्मुख होतां । दुर्गम असे." ॥ १ ॥ ऐसी सामर्थ्यसामग्री । निंदिली असतां वैरीं, । आचार्या द्रोणातें भारी । उपजैल शंका. ॥ २ ॥ सामर्थ्यशून्य तुजप्रति । मुखींचे उगाल समर्पिती; । मुख पाहोनि हांसती । पामरें हीं. ॥ ३ ॥

ततो दुःखतरं नु किम्

मग इतुल्यानंतरें, । दुःख वाटैल अभ्यंतरें, । तें येणें ममत्वें अपारें । निरसे केंवि ? ॥ ४ ॥ मग हांसतयां निःशस्त्रियां । वधितां पुरुषार्थु गेला वायां, । आणि साहतां दुःखा तया । पारु नाथीं. ॥ ५ ॥ व्याकुळ होसी तेणें चित्तीं, । संग्रामु हा तंव नये पुढती, । ऐसें पूर्ण विचारूनि चित्तीं । करीं व्यवसावो. ॥ ६ ॥ आपुलेया मती तूतें । कार्य न उमजे एथें, । तरि मी सांगैन निरुतें, । हिता तुझिया. ॥ ७ ॥

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।
तस्मादुत्तिष्ठ कौंतेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥

हे कौंतेय

अवधारीं, कुंतीनंदना, । आलिया संग्रामार्थ रणा । केलेनि युद्धें दिसेना । विनाशु कांहीं. ॥ ८ ॥

हतो वा

विहितु धर्मु आचरतां, । युद्धीं परान्मुख नव्हता, । आगवणा भिडतां । निःकपटा बुद्धी, ॥ ९ ॥ जरि तूं एकला, हे बहुत । न जिंकवती वैरी येथ, । शस्त्रास्त्रघायीं प्रस्तुत । पडलासि रणीं ॥ १६१० ॥

स्वर्गं प्राप्स्यसि

तरि नाशु नाथी, गा, सर्वथा । आपुलां स्वधर्मी वर्ततां । स्वर्गातें पावसी, पार्था, । भर्वसेन. ॥ ११ ॥ तेथें भौम्य सुख किमात्मक । स्वर्गसुख तें अ-

लौलिक । पावसील, हें एक । शरीर वेंचितां. ॥ १२ ॥ कांचेसाठीं चिंता-मणि । जोडी मिळे, तैं कें हानि? । कामधेनूची दुमणी, । पल्लाळ साटीं. ॥ १३ ॥ नाशवंत देह न चुके । अविनाश जोडे जें येणें एकें, । तैं तुझें भाग्य न तुके । तुकितां आनेंसीं. ॥ १४ ॥

जित्वा वा

आतां तें न पडे शरीर, । सैन्य जिंकिलें अपार, । मारिले कौरववीर । निज पराक्रमें, ॥ १५ ॥ तऱ्ही तें तुझें करणें, । नाशु नेदी तुजकारणें. । आतां स्वर्गु नाथी मरणें–। वांचूनि म्हणसी, ॥ १६ ॥ तरि तूं एथेंचि असतां,–। अवधान देईं, पांडुसुता,–। आपुली कीर्ति जातां । देखसी स्वर्गा. ॥ १७ ॥ यशाचे पर्वत होताळि, । पुरत्रयीं कीर्ति पसरेल, । तुझया नामाचे सकळ । भाट नागरिक. ॥ १८ ॥ एवं, कीर्तिद्वारा त्रिभुवन । भोगिसी स्वर्गपद जाण, । आतां येणें शरीरें जाण । कैसें होईल ? ॥ १९ ॥

महीं भोक्ष्यसे

राज्य भोगिसी पृथ्वीचें, । श्रेष्ठत्व क्षत्रियाक्षत्रियांचें, । नाम होईळ पांडवांचें, । धर्माचें यथा. ॥१६२०॥ जे जे विषय पाहिजती, । ते ते प्रत्यक्ष वर्तती, । ऐसें बहुकाळ, वीरपति, । भोगीत असतां, ॥ २१ ॥ पुडती शरीराचा विनाशीं, । होसील स्वर्गनिवासी; । म्हणौनि स्वधर्मपरिनिष्ठासि । विनाशु नसे. ॥ २२ ॥

तस्मात्

तयाकारणें, अवधारीं, । आतां सांगिजैळ तें करीं. । अर्जुना, आम्ही काये वैरी, । सांगें, तुझे ? ॥ २३ ॥

युद्धाय कृतनिश्चयः

युद्ध न करितां विहित । मज न दिसे तुझें हित; । करितां श्रेय अद्भुत । गमत आथी; ॥ २४ ॥ म्हणौनि युद्धविपयीं । निश्चयो धरुनि हृदयीं, । दाक्षिण्य पाव व्यवसायीं, । पांडुकुमरा. ॥ २५ ॥ धनुष्यबाण घेत करीं । वैरियांतें पाचारीं, । अभ्यस्त विद्या पुरी । द्रोणा दावावया ॥ २६ ॥

उत्तिष्ठ

उभा ठाकें वहिला; । मानु दे आमुचिया बोला. । अर्जुनु आला, रे, आला ।

सकळ म्हणती." ॥ २७ ॥ इतुलें बोलिलें श्रीकृष्णें । तरि मौन घेलेंचि अर्जुनें; । तें हृदयस्थें नारायणें । जाणीतलें धर्म. ॥ २८ ॥ तू ऐसें अर्जुन मानिसी, । जें संग्रामीं नाशु क्षत्रियासि । नाहीं, हें मनीं निश्चयेसीं । बैसलेंचि कीं. ॥ २९ ॥ परि तें संग्राम आन, । येथ युद्धाकारें हें विघ्न । बोडवलें असे पतन, । वासुदेवा ! ॥ १६३० ॥ गुरुवधु, गोत्रवधु, । जये स्वधर्मीं कुळच्छेदु, । तो स्वधर्मु ना पापनदु । कैसा तरावा ? ॥ ३१ ॥ तरि, अवधारीं, पांडुसुता. । आधीं देखेन दोषु न लगता, । तरिचि होईं युद्धकर्ता । तूतें म्हणेन. ॥ ३२ ॥ युद्ध न करिती विहिताकारणें, । पापें जडती आगें दारुणें, । आणि केलेनि स्वधर्में येणें । हिंसादोषु, ॥ ३३ ॥ एन काय कीजे, कैसें ? । घेतलें तुझेनि मानसें । तरि येथ आम्हीं असे । पूर्वीचि निचारिलें. ॥ ३४ ॥ स्वधर्मु केला ऐसें घडे, । आणि गुरुवधें पाप न घडे, । देहातीं स्वर्गु जोडे, । जया रीती. ॥ ३५ ॥ गोत्रज सकळ मरती, । तीं पापें अंगीं नलगती, । वारि सुकृतें नाना वडती, । ऐसें वर्म. ॥ ३६ ॥ ऐसें आधीं निचारिलें । यया संग्रामाहूनि पहिलें; । लाखागृहीं विराचिलें । विवर ज्यापरी. ॥ ३७ ॥ हें सागानें तुवा येथं, । तरि न कळे काये आमुतें ? । चिंता न करीं; बा रे, तूतें । रक्षीन मी. ॥ ३८ ॥ सागैन नया युक्ती, । युद्ध करीं, वीरपति, । आपुला स्वधर्मीं नाथी । दोषु करणा. ॥ ३९ ॥ वृक्षाचीं आगें छेदिती, । समिधा होमीं हविती, । निरपराधी मारिती । यज्ञीं पशू, ॥ १६४० ॥ तेणें पावती स्वर्गातें । कीं विप्र हिंसादोषातें ? । म्हणौनि स्वधर्मीं बोलिलें, तें । पाप नव्हे. ॥ ४१ ॥ कृषि करिता वैश्यातें । हिंसा अप्रमितु वर्ते, । तेणें कवण बुडाला ? तें । सागोनि देई. ॥ ४२ ॥ तैसी क्षेत्रिया संग्रामीं । हिंसा विहितु स्वधर्मीं; । ती न करिता दोषु, आम्ही । ऐसें म्हणों. ॥ ४३ ॥ आता गुरुगोत्रवधु जाला, । दोषु असाधारणु आथिला, । परि स्वधर्मा तुझिया आवडला, । काये करिसी ? ॥ ४४ ॥ आता स्वधर्मपुण्यसागरीं । हिंसानदी प्रविष्ट जरि, । ते घेइजे पुण्याची वारी, । सागरदृष्टांतें. ॥ ४५ ॥ म्हणौनि विहिताचरणीं । न कल्पावा दोषु मनीं. । युक्ति सागेन तुजलागूनि । अर्थीं येये. ॥ ४६ ॥

अध्याय

सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।
ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥

सुखदुःखे

सकळपदार्थसंपूर्ति, । भौपत्यसाधनीं यश कीर्ति, । विषयोपभोगसंप्राप्ति, पांडवा गा. ॥ ४७ ॥ भोग्यविषय अनुकूळ, । लाहोनि मनेंद्रियबुद्धिबळ, । भोगिजत असतां, केवळ । सुख उपजे. ॥ ४८ ॥ भोगिलीं दुःखें प्रहरती, । चिंतेची घडे शांति, । अधिकाधिक चित्तीं । हर्षु वाढे. ॥ ४९ ॥ तेथें करणांतें सुरवाड, । मनातें तेचि होये चाड, । भोगितां आइकें वाड । आयुष्य होवावें. ॥ १६५० ॥ जंव जंव पदार्थसंप्राप्ति, । भोग अनुकूल, यश, कीर्ति, । तंव तंव असे उत्पत्ति । जयाची, तें सुख. ॥ ५१ ॥ मग तयाचेनि विनाशें, । तापत्रयाभिभूत असे, । भोगिजे अकीर्तीसरिसें, । तें दुःख जाणावें. ॥ ५२ ॥ सकळपदार्थहानि, । राज्यभ्रंश, कां देहपतनीं, । जे अनुभवितां मनीं । होती क्लेश. ॥ ५३ ॥ प्रतिकूळ अर्थ करणां । आडळती बुद्धी, मना, । तद्योगें उपजे, अर्जुना, । तें दुःख, बा रे. ॥ ५४ ॥ निमिषार्ध जयाचें तुळितां । वरुषा येसणें, पार्था, । तया दुःखाची व्यवस्था । अनुभवी जाणे. ॥ ५५ ॥ जयाहूनि गौल्य मरण, । विषाहूनि जें दारुण, । मनेंद्रियां देहपीडन, । करूंचि लागे. ॥ ५६ ॥ तें दुःख जाण वहिलें, । सुख जें मागां कथिलें, । यया दोन्हींमाजी सांपडलें । विश्व, बापा. ॥ ५७ ॥

समे कृत्वा

तीं दोन्हीं समें जाणावीं, । शुद्ध आत्मया नमनावीं, । असतें मिथ्या जाणावीं । शरीरसहितें. ॥ ५८ ॥ सुखा, दुःखातें देती । स्पर्श जयांचे, वीरपति, । ते विषय आन न होती, । भौतिक सर्व. ॥ ५९ ॥ कर्मकरणें कर्मकरें, । ज्ञानकरणें ज्ञानपरें, । येथें चेष्टा धर्मविकारें, । ते तया प्राणाची. ॥ १६६० ॥ एवं विषयपंचकु चांगु, । आणि हा पंचदशकरण-योगु, । येणवाटे तैं संयोगु । स्फुरे सुखदुःखत्वें. ॥ ६१ ॥ अंतःकरण-वृत्तिचतुष्टय, । तें भोक्तें येथिचें सामासमय, । सुखदुःखअनुभूय, । तें तयातेंचि. ॥ ६२ ॥ भोक्ता, भोग्य, भोगणें, । कर्ता, कार्य, करणें, । ज्ञाता, ज्ञेय, जाणणें, । ऐसी हे त्रिपुटी ॥ ६३ ॥ गुणांची वर्ते सामास, ।

गुण अविवेचे, परियस; । अविद्याभान निःशेप । मिथ्या आत्मया. ॥ ६४ ॥ स्वप्नीं पदार्थपडिभरें, । सुखदुःख वाटे खरें, । तें पातलेनि जागरें । कांहींचि न वर्ते. ॥ ६५ ॥ स्वप्न लटिक जागरणीं, । जागृति तेंविचि स्वप्नीं, । न वर्ते सुषुप्तीचां स्थानीं । अवस्थाद्वय तें. ॥ ६६ ॥ ते सुषुप्ति तुरिये न वर्ते, । एवं अवस्थाचतुष्टय आत्मयातें । परस्परसिद्धी आभासतें । नभसतें होये. ॥ ६७ ॥ अवस्थां चहूंचा, जाणु, । तत्तच्छरीर-विलक्षणु, । तत्तत्प्रपंचविहीनु, । सत्यु, साक्षी. ॥ ६८ ॥ तया सत्या असत्यभान । भ्रमास्तव भासे जाण, । येथ निर्धारीं तों साचपण । कांहींचि नसे. ॥ ६९ ॥ जेणें विभ्रमें गुणकृतें, । गोचरु सुखदुःख, भावीं वर्ते, । तोही भ्रमु प्रकृतीतें । आत्मया न घडे. ॥ १६७० ॥ जो प्रकृतीसीं अंतरंगु, । प्रकृतिसाक्षी, असंगु, । तो आत्मा देहद्वययोगु । ना जाणे सुखे, दुःखें; ॥ ७१ ॥ मग तें प्रारब्धें समूळें । सुखें, दुःखें घेइजती स्थूळें, । ते असंत-दृष्टी सकळें । जाणावीं तुवां. ॥ ७२ ॥ हानिलाभु जाला स्वप्नीं, । तो सारिखाचि मिथ्या जागरणीं, । तेंवि सुखदुःख अनात्मस्थानीं । तें मिथ्या आत्मया. ॥ ७३ ॥

लाभालाभौ

आतां सुखातें प्रसवे लाभु, । आणि दुःखातें तो अलाभु, । तयां दोहींचा परिक्षोभु । असंतु तोही. ॥ ७४ ॥ संता असंतें भानें घडे, । लाभु कीं अलाभु निवाडे, । असंत तें संतापुढें । न वर्ते साच. ॥ ७५ ॥ असतें तया असंता, । लाभालाभु सतें संता, । यापरी विचारूनि पाहतां । न वर्तेचि. ॥ ७६ ॥ भोगितां मनोराज्य अपार, । तेथींची सभूति, संभार, । लाभा अलाभा समग्र, । विपयो नव्हती. ॥ ७७ ॥ स्वप्नीं गज, रथ देखिले, । ते मिथ्या, नासोनि गेले; । तेथें लाभालाभ उपजले, । तेही तैसेचि. ॥ ७८ ॥ एवं प्राकृत गुणभान । असंत देह, ऐसें जाण; । असंता अवस्थाभोगसाधन, । तें साच न वर्ते. ॥ ७९ ॥ तेथें अर्थलाभु हे कल्पना; । अलाभु तैसाचि, अर्जुना. । संता आत्मया अभावना । यया द्वयाची. ॥ १६८० ॥

जयाजयौ

आतां लाभा कारण जयो, । अलाभा भावें अजयो, । ययेचि संग्रामीं विपयो ।

वर्ततु असे. ॥ ८१ ॥ सुखदुखसमत्वसिद्धि, । लाभालाभीं समबुद्धि, । करूनि जयाजय त्रिशुद्धी । सारिखे जाण. ॥ ८२ ॥ सर्व देहीं आत्मा संतु, । अनात्मा सकळु असंतु; । उभयदळीं सिद्धांतु, । वोळखें ऐसा. ॥ ८३ ॥ घटमठ मृत्तिकाविभेद, । अंतरीं गगन एकविध, । जें नेणे स्वपक्षें भेद । आवरणोपाधि. ॥ ८४ ॥ तैसीं भौतिकें साकारें, । दिसती स्थूळ शरीरें, । तें तें लिंगदेहें सविकारें, । तये ठायीं. ॥ ८५ ॥ अज्ञानें तेंविचि वहुतें । ज्ञानें जाण गा निरुतें । एवं देहचतुष्टयें जीवातें । जीवांप्रति. ॥ ८६ ॥ तयां देह चतुष्टयां अंतराळीं, । चहूं अवस्थांचां मूळीं, । आत्मस्वरूप येक न्याहळीं, । अखंड जें. ॥ ८७ ॥ तया अखंड चिदात्मया, । देहें गुणअवस्था या । दृश्या असंता भासलिया, । तन्ही विवर्तु जैसा. ॥ ८८ ॥ तेथें कवण कौरव, कवण । पांडव, कृष्ण, अर्जुन ? । चिन्मात्र सदा निरंजन, । आत्मस्वरूप जें. ॥ ८९ ॥ तेंहीं जिंकिलें आमुतें, । तारि आम्हीचि तेथें येथें, । मानावा जयाजयो मतें । कवणें, कवण ? ॥ ११९० ॥ म्हणों जयातें जिंकावें । तयांचें स्वरूप सद्भावें । आम्हांसि वेगळें नव्हे, । अतेव अखंडीं. ॥ ९१ ॥ जयाजयो न वर्ते संतु, । आत्मा सर्वदेहीं संतु, । नसे जया सांघातु । सगुणमायेचा. ॥ ९२ ॥ तेथें अरिमित्रभाव कवण ?। कैंचें धनुष्य ? कैंचे वाण ? । कवण योद्धे ? निरंजन । ब्रह्म सकळ. ॥ ९३ ॥ तेथें जयो तोही आपुला, । तेंविचि अजयो, गा शीळा. । येकुही अर्थु; वेगळा । आत्मया न पडे. ॥ ९४ ॥ आतां निर्मळा दृष्टी पाहतां, । जयाजयो प्रकृतिमाथां, । ते शुद्धीं न वर्ते सर्वथा । प्रकृति कहीं. ॥ ९५ ॥ ऐसा अन्वयें, व्यतिरेकें, । स्वरूप जाणोनि ठाइकें, । मिथ्या द्वैतें अविवेकें, । मायिकें न भुलतां, ॥ ९६ ॥ जाण मुखदुःख समज्ञेय, । लाभालाभ, जयाजय, । निर्विकार ब्रह्म अद्वय, । तेथें निष्टा करीं. ॥ ९७ ॥

ततः

मग इतल्यावरि, पांडवा, । साक्षित्वें एकेंचि सर्वी । जाणत असतां, करावा । संग्रामु, गा. ॥ ९८ ॥ तूं म्हणसील, जरि ऐसें । सम ब्रह्म सर्व असे, । तेथें संग्रामु हें पिसें । उचित नव्हे. ॥ ९९ ॥ तारि गुण वर्तती गुणीं, । तूं असंगु, गा, तये स्थानीं, । साक्षी, उदासीनु म्हणौनि, । कैसा, बापा ?

॥ १७०० ॥ जेथिंचा जो नव्हे। कर्ता, । तेथुलें कर्म सांडितां, । काये होईल तो, पार्था, । विचारी पां. ॥ १ ॥ सूर्याचेनि संन्निधानें, । मृगजळ वाहों जाणे, । तेथें सूर्यातें करणें, । न करणें नसे. ॥ २ ॥ स्फुरणोन्मुख अंतःकरण, । संकल्पात्मक मन, । निश्चयात्मक बुद्धि जाण, । स्वभावें असे. ॥ ३ ॥ अनुसंधान स्फुरे चित्तें, । अहंतव्य अहंतेतें, । हें वृत्तिपंचक निरुतें । सात्विकाचें. ॥ ४ ॥ व्यानु वायो अंतःकरणीं, । समानु जाणावा मनीं, । उदानु बुद्धीचां स्थानीं । वर्ततु असे. ॥ ५ ॥ प्राणु चित्तीं बोलिजे, । अपानु अहंकारीं बुझे, । ऐसें प्राणपंचक सहजें । म्हणिजे चेष्टाकरण. ॥ ६ ॥ अंतःकरणा शब्दज्ञान, । तें जाणावें, गा, श्रवण; । मना स्पर्शसंवेदन, । त्वगेंद्रिय तें. ॥ ७ ॥ बुद्धि रूपातें जाणे, । तें चक्षुरिंद्रिय जाण खुणे, । चित्त उठी रसज्ञानें, । तें रसनेंद्रिय. ॥ ८ ॥ अहंकाराची ज्ञानकळा, । तें घ्राणेंद्रिय जाणे परिमळा, । आत्मा साक्षी निराळा । येथ त्रिपुटीचा. ॥ ९ ॥ अंतःकरणाची कर्मवृत्ति, । ते वाचा वक्तव्य करिती, । करव्यापार निपजती । मनोधर्में. ॥ १७१० ॥ बुद्धिकर्मवृत्ति ते पाद, । चित्तीं शिश्न प्रसिद्ध, । अहंकारीं वर्ते गुद, । कर्मकरण पैं. ॥ ११ ॥ अंतःकरणवृत्तिपंचकु, । ज्ञाता, भोक्ता, कर्ता, साधकु, । बाह्यकरणां प्रवर्तकु । होये निजव्यापारीं. ॥ १२ ॥ दुजा प्राणांचा पंचकु, । आणि इंद्रियांचा दशकु, । पंचदशतत्वमेळापकु, । त्याचीं विषयसाधनें. ॥ १३ ॥ मग ज्ञाता, कर्ता जो वर्ते, । तो प्राणी पावे संयोगातें, । प्राणसंगें इंद्रियातें । व्यापूनि ठाये. ॥ १४ ॥ तेथें ज्ञानेंद्रियद्वारा । पावे अर्थसाक्षात्कारा, । कर्मकरणीं, वीरा, । कर्मे निपजवी. ॥ १५ ॥ मग ते इंद्रियांचे व्यापार । देहधर्म होती समग्र, । पापपुण्यविचार । तये ठायीं. ॥ १६ ॥ तये देहीं निजाचारु, । पावनु, मोक्षदु, परिकरु, । जेथ मी तूतें आदरु । धरूं सांगें, ॥ १७ ॥ तो परस्परा करणसिद्धी । निपजे, अर्जुना, त्रिशुद्धी, । आत्मा साक्षी तो कधीं । न लिंपे येणें. ॥ १८ ॥ एवं आत्मत्वें तूं अकर्ता, । जाणोनि जयाजयीं समता, । गुणीं गुणकर्म होतां, । देखें साक्षित्वें. ॥ १९ ॥

युद्धाय युज्यस्व

मग तयाचि युक्ती आचरें । विहितु संग्रामु बाह्याकारें, । समबुद्धी अभ्यंतरें, । आत्मत्वें जाण. ॥ १७२० ॥ आतां, इतुला अधिकारु । जया नाथी

विविक्तु विचारु, । तयां समेतचा प्रकारु, । तो येकु आधी. ॥ २१ ॥ मातेंचि सुख होआवें, । दुःख ययांवरि पडावें, । राज्य आम्हीं भोगावें, । मरावें येंहीं. ॥ २२ ॥ आम्हींचि जिकावें रणीं, । येंहीं जावें पळोनि, । विस्तारावी त्रिभुवनीं । कीर्ति आमुची. ॥ २३ ॥ बहुसाल जोडावा अर्थु, । हाचि मानसीं परमार्थु । धरूनि, स्वजनां घातु । करूं धांवसी. ॥ २४ ॥ येंहीं द्रुपदीतें हारिलें, । राज्यभ्रष्ट आम्हां केलें, । वैरी कौरव सांपडले । रणीं म्हणौनि. ॥ २५ ॥ घाओ घालिसी स्वजनां, । स्वार्थबुद्धी भीष्मा द्रोणा, । तेणें पापसागरीं, अर्जुना, । पडसील तूं. ॥ २६ ॥ सुखदुःखादि देहभोग, । लाभालाभ विभाग, । जयाजयाचे प्रसंग, । ईश्वरइच्छा. ॥ २७ ॥ जेणें हें विश्व रचिलें, । जीवांतें प्राचीन लाविलें, । तया अधीन ठेविलें । शरीर हें कीं ! ॥ २८ ॥ येथें रक्षिता आणि मारिता, । यशायश भगवंतु दाता, । एवं ईश्वरतंत्रें वर्ततां, । स्वार्थु न धरीं. ॥ २९ ॥ कां साच असे प्राचीन, । जें जया शरीरालागून, । तें सुखेंचि हो, आपण । एथ निराळा. ॥१७३०॥ ऐसी स्वार्थबुद्धि सांडीं, । वैरभावना सर्व सोडीं, । स्वधर्मु म्हणौनि वोढीं । कौरवां उजू. ॥ ३१ ॥

एवं पापम्

ऐसें निर्मळ, निराकुळ, । स्वधर्मीं चित्त निश्चळ । करूनि, मारिसी सकळ । कौरव जन्हीं, ॥ ३२ ॥ तन्हीं तें गोत्रवधाचें । आणि पाप गुरुवधाचें, । मित्रद्रोहा, हिंसेचें । आदिकरोनि ॥ ३३ ॥

नावाप्स्यसि

नपवसी, गा पांडुसुता, । केवळ धर्म कनिष्ठता, । स्वधर्मी ईश्वर कर्ता, । भोक्ता म्हणौनि. ॥ ३४ ॥ सकळइंद्रियनियंता, । अतेव ईश्वरचि युद्धकर्ता, । दोहीं दळीं समानता । ऐसी पाहवी. ॥ ३५ ॥ मग जया अंतीं, राज्यद्वारा, । जे भोग होती जया शरीरा, । तेथें मना अंतर्यामिलें खरा । ईश्वरचि भोगी. ॥ ३६ ॥ एथें मी तो असें कवणु ? । परतंत्रु, तदधीनु ? । कां शुद्ध आत्मा सनातनु, । उपाधी वेगळा ? ॥ ३७ ॥ ऐसें जाणोनि युद्ध करितां । महापुण्य घडे, पार्था; । नाशु होये संचिता । पापाचा येणें. ॥ ३८ ॥ येथ उपराठें पाप घडे, । तें अमृता मरण रोकडें, ।

सजीवें भूतें तोडावीं, । निर्जीवें शैलादिकें अर्चावीं, । ऐसीं दोषयुक्तें जाणावीं । कर्में हिएं. ॥ ९५ ॥ भूतमात्र चराचर । असे ईश्वराचें शरीर । तेथें दुःख देतां, समग्र । पावे सर्वेश्वरीं; ॥ ९६ ॥ नेत्रकमळें काढावीं, । जयाची तया समर्पावीं, । आंगें खांडूनि वावीं । भक्तीस्तव; ॥ ९७ ॥ गृही आश्रमु करिती, । पृथ्वीतें दुःख देती, । कीं खननीं मृत्यु पावती । प्राणधारी. ॥ ९८ ॥ नित्य सडे संमार्जनें, । तें एकातें होती विघ्नें, । एक ते धूम्रव्याकुळप्राण, । जीवें जाती; ॥ ९९ ॥ देवाळयीं दीप लाविती, । एक मंगळारतिया करिती, । तेथें कीट, पतंग मरती । वारि घाळूनियां; ॥ १७६० ॥ तेथें षोडश उपचार, । ते भूतवधचि समग्र; । आश्रमधर्म ते साचार । सदोष अवघे; ॥ ६१ ॥ एकां जीवातें वधिती, । अतीतां तृप्त करिती, । ते तेणें कर्में न सूटती । कर्मठजन. ॥ ६२ ॥ ऐसें सदोषकर्म त्यजिजे, । यज्ञादिक बोलिलें जें जें; । संन्यासग्रहण कीजे, । मोक्षहेतु ॥ ६३ ॥ शिखा, सूत्र विसर्जिलें, । भूतांतें अभय दिधलें, । यज्ञादिक कर्म सांडिलें । निःशेष पैं; ॥ ६४ ॥ वस्त्रें शोधूनि घेती जळ; । दृष्टि सूनि करिती पाउल; । सत्य, हित, शीतळ । वचन बोलती; ॥ ६५ ॥ एवं चराचरभूतहिंसा । त्यजिला कर्मीचि सरिसा, । देहो रक्षिती, गुडाकेशा, । भिक्षान्नें ते. ॥ ६६ ॥ तूं म्हणसील, धनुःपाणि, । प्रत्यवायो कर्माकरणीं, । तरि ज्ञानसंन्यासु एथूनि । सांगणें असे. ॥ ६७ ॥ नित्यानित्यवस्तुवेदनें । अनित्य सर्व सांडणें, । ज्ञानसंन्यासु तो जाणें, । ज्ञानें सूचिला. ॥ ६८ ॥ अनित्य तत्व बोलिजे, । तयातें अनात्मा म्हणिजे, । आत्मया संता दुजे, । जे दृश्यस्थानीं. ॥ ६९ ॥ पृथ्वी, आप, तेज, वायो, गगन, । हें भूतपंचक वेद्यमान, । पांचही येथींचे गुण, । तेही तैसेचि. ॥ १७७० ॥ शब्दु गुणु वर्ते गगनीं, । तो वेद्यु श्रोत्रांलागूनि; । शब्दु स्पर्शु गुणु पवनीं, । तो त्वचे, श्रवणातें. ॥ ७१ ॥ शब्द, स्पर्श, रूप, दहनीं, । तें श्रोत्रत्वक्चक्षूलागूनि । वेद्य; आता जीवनीं । शब्द, स्पर्श, रूप, रसु. ॥ ७२ ॥ श्रोत्र, त्वक्, चक्षु, रसना । जाणे गुणवर्ग तया जीवना; । मग पृथ्वीचां ठायीं, अर्जुना, । गुणपंचक वर्ते. ॥ ७३ ॥ शब्दयोगें श्रवणातें, । स्पर्शयोगें त्वचेतें, । रूपयोगें नयनातें । वेद्य धरणी. ॥ ७४ ॥

रसयोगें जाणे रसना, । गंधयोगें कळे घ्राणा, । यापरी भौतिकां गुणां । जाणिजत असतां, ॥ ७५ ॥ सकळु जाणिजे प्रपंचु, । जागरावस्थेचा संचु, । जये शरीरीं साचु । आभासतुसे, ॥ ७६ ॥ तें पंचभौतिक साकार । आत्मया स्थूळ शरीर; । वर्तती साही विकार । ठायीं जयाचां. ॥ ७७ ॥ अस्ति, जायते, वर्धते, । विपरिणमते, अपक्षीयते, । विनश्यति, हे जाणावे ते । विकार साही. ॥ ७८ ॥ एव, स्थूळ देह जागरावस्था, । आणि येथिचिया प्रपंचा जाणता, । तो आत्मा विश्वु भोक्ता । स्थूळां भोगातें. ॥ ७९ ॥ तये जागृतीं नेत्रस्थान, । एवं पंचविध ऐसें हें जाण, । रजोगुणाचें महिमान । वर्तत असे. ॥ १७८० ॥ हें आत्मया दृश्य वर्ते, । आत्मा विलक्षणु येथें, । स्वप्नीं कांहींचि न वर्ते । देहावस्थाभान. ॥ ८१ ॥ तें स्वप्न विचारितां । जागरावस्थेचा उठवा, । नाना मनोवर्तुचि स्फुरत्ता । होये तेणें आकारें. ॥ ८२ ॥ अतेव स्वप्नजन्य जागरु, । लिंग देहें स्थूळाचा आकारु, । तया लिंगदेहाचा विचारु । सांगैन मी. ॥ ८३ ॥ अंतःकरण, मन, जाण । बुद्धि, चित्त, अहंकरण, । हें कर्तृवृत्तीचें स्फुरण । पंचधा यापरी. ॥ ८४ ॥ व्यानु, समानु, उदानु, । प्राणु, पांचवा अपानु, । कर्तया वृत्तिपंचकापासूनु, । प्राणपंचक हा. ॥ ८५ ॥ श्रोत्र, त्वक्, चक्षु, रसना, घ्राण, । हें बाह्यविषयीं ज्ञानकरण, । कर्तया वृत्तिपंचका ज्ञान । विषयांचें जें. ॥ ८६ ॥ वाग्पाणि, पाद, पायु, शिश्न, । हें कर्तयापासाव कर्मकरण, । शब्द, स्पर्श, रूप, रसु, गंधु, जाण । विषयपंचकु हा. ॥ ८७ ॥ ऐसा पंचविसा तत्वांचा । योगु बोलिजे त्रिपुटीचा, । विस्तारु त्रिगुणे अहंतेचा । लिंगुदेहो. ॥ ८८ ॥ अवस्था येथिंची स्वप्न, । प्रविविक्तु भोगु कंठस्थान, । येथिंचा द्रष्टा, म्हणौन । आत्माचि, तैजसु. ॥ ८९ ॥ प्रकृतीचा हा सत्वगुण, । आत्मया दृश्यु साभासमानु, । ते येथिंचा द्रष्टा जाणु । असंगु वर्ते. ॥ १७९० ॥ यया देहद्वयाचें कारण । प्रसिद्ध आत्मविषयीं अज्ञान, । जेथ न उमजे भान । स्थूळसूक्ष्मांचें. ॥ ९१ ॥ तये शरीरीं कारणीं । सुषुप्ति अवस्था अज्ञानी, । प्रकटे हृदयाचां स्थानीं । आनदसहित. ॥ ९२ ॥ आत्मा येथिंचा जाणु । तयातें म्हणिजे प्राज्ञु, । एवं पंचप्रकारीं तमोगुणु । अविद्येचा हा. ॥ ९३ ॥

तयाही तमोगुणातें । आणि तत्कृतां प्रकारांते । आत्मा साक्षित्वें वर्ते, । म्हणौनि निराळा. ॥ ९४ ॥ तेंचि अवस्थात्रयाचें । आणि साक्षित्व तिहीं देहाचें, । प्रपंचास्थाना भोगाचें । तुरीया म्हणिजे. ॥ ९५ ॥ तुरीया एकि वृत्ति जियेची । ते जाणीव आत्मया स्वरूपींची, । देह महाकारण स्वभावेंचि । म्हणिजे, तें हें. ॥ ९६ ॥ अतींद्रियीं तयाचें स्थान, । आभासु भोगु ऐसें जाण, । येथिंचेंही आत्मया ज्ञान, । म्हणौनि प्रत्यगात्मा तो. ॥ ९७ ॥ हा पचविधु शुद्धसात्विकु, । प्रकृतींचा गुणु येकु, । येथिंचा आत्माचि ज्ञापकु, । म्हणौनि वेगळा. ॥ ९८ ॥ यापरी हे प्रकृति जाण, । जीचां आंगीं चारी गुण, । देहें, अवस्था, भोग, स्थान, । प्रपच तयाचे. ॥ ९९ ॥ तम, सत्व, रज हें गुणत्रय, । प्रकृतीचें जें ज्ञेय, । तेंचि म्हणती पादत्रय । प्रणवपुरुषाचें. ॥ १८०० ॥ मग शुद्धसत्व चतुर्थ, । तें पादत्रयाऊर्ध्व वर्तत, । त्रिपाद पुरुष वोलिजत, । सकळ शरीर. ॥ १ ॥ तेंचि गुणत्रय पुडती । शाखात्रय येक म्हणती, । शुद्ध सत्व तें कळविती । मूळ ययाचें. ॥ २ ॥ अधःशाखा गुणत्रय, । प्रणवाचें जें पादत्रय, । ऊर्ध्वमूळ, शुद्ध सत्वमय । तें अर्धमात्रा म्हणिजे, ॥ ३ ॥ तेंचि गुणयुक्त पुडती । शबल ब्रह्म म्हणती; । सगुण म्हणौनि वाखाणिती । महानुभाव. ॥ ४ ॥ तेंचि सविकल्पक अनात्मा, । तन्निरासें शुद्ध तो आत्मा, । हेंचि सारासार, वीरोत्तमा, । एक म्हणती. ॥ ५ ॥ यापरी प्रकृति विभागिती, । ते गुणभेदें चतुर्धा करिती, । देहे नाम ठेविती । तयातें की. ॥ ६ ॥ जें जें देह, ते ते अवस्था । गुणभेदें कल्पिती, पार्था; । तो तो प्रपंचु तत्वता, । वेगळाला तेथें. ॥ ७ ॥ ते ते भोग, तें तें स्थानें । यापरी प्रकृति वाटिती तेणें । गुणचतुष्टयाचेनि स्फुरणें । विवेकदृष्टी. ॥ ८ ॥ असगु वर्तता प्रकृती, । तो तो तेथें अभिमानी म्हणती, । प्रकृतीची संख्या करिती, । निरसावया. ॥ ९ ॥ तेथें अहता एक स्फुरण । उठी, जे महत्तत्वापासून, । अज्ञानपूर्वक संवेदन । जीवासि जें. ॥ १८१० ॥ तें त्रिगुणात्मक लिंगदेह, । मागा काथिलें निःसंदेह, । तें त्रिपुटीरूप तत्त्वमय, । दृश्य मानूनि, ॥ ११ ॥ ज्ञाता, ज्ञान, ज्ञेयजात, । भोक्ता, भोग्य, भोगणें समस्त, । कर्ता, कार्य, करण कृत । तेथोंचे आरोपूनि, ॥ १२ ॥ तयाचेनि दृश्यपणें ।

आत्मया द्रष्टया जाणणें, । जाणोनि तो, हें निरसणें । दृश्यमात्र. ॥ १३ ॥ मग चाऱ्ही देहें निरसावीं, । ते ते अवस्था नाश्रयावी, । गुणां चहूंचां अभावीं । आत्मया जाणावें. ॥ १४ ॥ ऐसा झाडितां दृश्यलेशु । गुणचतुष्टयनिरासु, । बोलिजे ज्ञानसंन्यासु, । तो येणें आकारें. ॥ १५ ॥ आतां ज्ञानयोगाचें लक्षण, । सांख्यसिद्धांत संपादन, । तयाची अनुभवें खुण । सांगेन, अवधारीं. ॥ १६ ॥ गुणकार्यांचेनि निरासें, । सकलवृत्तिसंन्यासें, । सहज उरे अनायासें, । ते तत्व जाणावें. ॥ १७ ॥ हातें सारूनि वाबुली । लागिजे जळीं निर्मळीं । तें गुणांचां निरासकाळीं । जाणावें शेष. ॥ १८ ॥ जाणोनि दृश्ये प्रकृतीतें, । द्रष्टया जाणावें तेथें, । तोचि घेऊनि, दृश्य तें । विसरावें, गा. ॥ १९ ॥ तें दृश्यसापेक्ष द्रष्टेपण, । अतेव करावें लीन, । मग सहज उरे, तें आपण । सहज असावें. ॥ १८२० ॥ वृत्तीचा कंपु वोसरे, । तें त्रिपुटी ठायींचि जिरे, । तेथें सहज निर्विकार उरे, । तेंचि आत्मा. ॥ २१ ॥ ऐसा प्रकृतिगुणीं वसे, । साक्षित्वें वेगळाचि जो असे, । तो आत्मा, गुणनिरासें । सांख्य जाणती. ॥ २२ ॥

ते

ते हे सांख्यांची निपुणता, । विविक्तात्मज्ञानकळा, पार्था, । अपूर्व, गा, हे तत्वता । म्हणौनि तूतें ॥ २३ ॥

अभिहिता

सांगितली म्यां भावार्थे. । पूर्वपक्षें सिद्धांतें, । आत्मा असंगु प्रकृतीतें, । येथे अर्थी. ॥ २४ ॥ हा सदसद्विचारु चोखडा । जो जाणे अनुभवें फुडा, । तया संसारु हा खुडा, । सापडवूं न शके. ॥ २५ ॥ असोनि परी परियसीं, । न शिरके नभपाशीं, । किरणें मृगजळा सरिसीं । लोटतीना. ॥ २६ ॥ पवनें न ढळे मेरु, । न वाहे सरिते सागरु, । वायो ऐसा पन्हणारु । बुडेल काये ? ॥ २७ ॥ तम न पडे दिनकरा, । न दही दाहकु अंबरा, । वाणु न कडतरे, वीरा, । पोकळीसीं. ॥ २८ ॥ छायाच (?) णी न गुपे, । जीवन तरंगीं न हारपे, । दोरु साच तो सर्पे । आनु नव्हे. ॥ २९ ॥ तैसा सांख्यमतें निपुणु, । जो विविक्तज्ञानें धन्यु, । तो अव्यक्तु, व्यक्तिअधीनु । कहींचि नव्हे. ॥ १८३० ॥

योगे तु

अवधारीं, गा वीरपति, । येसणा अधिकारु नाथी, । तरि योगमत पुढती । दुजें आहे. ॥ ३१ ॥

इमां श्रृणु

तेणें योगमतें वर्ततां, । जो कव्हणी योगवेत्ता, । तो कवणें युक्ती छेदिता । होये कर्मपाशु, ॥ ३२ ॥ ते योगबुद्धि मी सांगैन, । आतां देईं अवधान, । परंतु तियेचें महिमान । आधीं बोलों. ॥ ३३ ॥

यया बुद्धया युक्तः

जया बुद्धी वर्ततां, । अवधारीं, पांडुसुता, । सकळें कर्मे करितां, । कैसा सिल ? ॥ ३४ ॥

कर्मबंधम्

संचित, प्राचीन, क्रियमाण, । हें त्रिविध कर्म जाण, । कर्तया पुरुषा बंधन, । संसारदायक. ॥ ३५ ॥ जेणें साचार जीवदशा, । त्रिविधु तापु जेणें पुरुषा, । अनादि, न खंडे ऐसा । संसारु जेणें, ॥ ३६ ॥ विण छेदें जयाचिया । सुटिका नाथी प्राणियां, । नाशु जयाचा, धनंजया, । मोक्षु म्हणिजे. ॥ ३७ ॥ संसारदावणीचें हें बिरडें, । भववासियांचें बेडें, । सृष्टया तुगवे कुवाडें । जें विरिंची. ॥ ३८ ॥ त्रिविधकर्म, तिपट । बंधन अति वळिकट, । वज्रा ऐसें घनवट । न तोडी जया, ॥ ३९ ॥ ज्यालाचि जे गें न लाहे, । मरोनि मरों केंवि लाहे ? । आला तो जाय, गेला ये । येणें- चि सूत्रें. ॥ १८४० ॥ पाहतां तव लहान मोलें, । ब्रह्मांड जयामाजी गुं- पलें, । ते कर्मसूत्र आथिलें, । बंधन जें, ॥ ४१ ॥

प्रहास्यसि

तें योगबुद्धी तूं तिया । मधांचि तोडिसी, धनंजया, । कमळतंतु गजा तया, । जैसा सुलभु; ॥ ४२ ॥ घृतधारा पावकु, । वाढला होये अधिकु, । तैसा योगबुद्धी अधिकु । तूंचि होसी. ॥ ४३ ॥ कार्पासतंतुच्छेदनीं । श्रमु गो कव्हणीं सानीं ? । कीं अमृताचां भोजनीं । मरण सारितां ? ॥ ४४ ॥ पहाटींची घटिका सुटे, । येरजार तियेची कुंठे, । तैसें अनायासें घटे । या योगबुद्धी. ॥ ४५ ॥

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥

आतां हा कैसा योगु ? । सांगेन, अवधारीं प्रसंगु, । द्विविधु बुझावा चांगु । पूर्वोत्तरपक्ष. ॥ ४६ ॥ प्रथम कर्मयोगु म्हणिजे; । आतां तो कैसा आचरिजे ? । विहितु स्वधर्मु कीजे । आपुला देहीं. ॥ ४७ ॥ जे जे वर्णीं जें विहित, । जे जे आश्रमीं जें उक्त, । तें तें आचरावें समस्त, । पांडुपुत्रा. ॥ ४८ ॥ तेथ कर्मीं, कर्माकरणीं, । शास्त्र प्रमाण मानूनि । विहित आचरिजे, धनुःपाणि, । ऐसा कर्मयोगु. ॥ ४९ ॥ बहिरंगु संपादिजे, । मग ययाचें फळ लाहिजे; । ध्यानयोगु आचरिजे । तयापाठीं. ॥ १८५० ॥ तेथें विविक्तवासु बोलिला, । शुचिप्रदेशु योजिला, । पाहिजे आसनाचा केला । योगु तेथें; ॥ ५१ ॥ जये कीं शुचिप्रदेशीं । विक्षेपु नुपजे मानसीं, । भय न वर्ते, शंकेसि । कारण नसे. ॥ ५२ ॥ शीत, वातु, जळ, किरण, । करूनि ययांचें निवारण, । पाठीं स्थिराविजे आसन । तये स्थानीं. ॥ ५३ ॥ तळीं मांडिजे कुशासन, । वरी मृदु ऐसें अजिन, । धूतवस्त्र शुभ्रवर्ण । तयाहीवरि. ॥ ५४ ॥ तयावरि सिद्धासनें, । भद्रासनें, स्वस्तिकासनें, । कां बैसावें पद्मासनें । योगवेत्तां. ॥ ५५ ॥ निरोधु सांडिजे पवनाचा । आणि संकोचमाओ गात्रांचा, । निटाओ स्थूळ शरीराचा । राखावा कीं. ॥ ५६ ॥ कर्मेंद्रियांतें दमन, । ज्ञानेंद्रियां प्रत्याहरण, । अंतरीं आंवरूनि मन । स्थिर कीजे. ॥ ५७ ॥ तेथें संकल्प प्राशावे, । विकल्प वाटूनि प्यावे, । कामक्रोध मारावे । वैरी आधीं. ॥ ५८ ॥ रजोगुणु कीजे उणा, । तमोगुणु गाळिजे घाणा, । केवळ सत्व, अर्जुना, । तेंचि आश्रयिजे. ॥ ५९ ॥ आशेचा ठावो पुसावा, । तृष्णेचा थारा मोडावा, । प्रमादु, अलसु वधावा । योगवेत्तीं. ॥ १८६० ॥ नेदावीं करणें फुटों, । अंतरींचें मानस सुटों, । पदार्थस्फुरण उमटों । नेदावें योगीं. ॥ ६१ ॥ ऐसें निर्विकार, निर्मळ, । निर्विकल्प, मन निश्चळ । अंतरीं ठेवितां निराळ । चिदाकाश स्फुरे; ॥ ६२ ॥ तये चिदाकाशीं निर्मळें, । निर्विकल्पलें मावळे, । मग अनायासें सहज संचलें । उरे जें तत्व, ॥ ६३ ॥ तेथें वृत्तीचिया सुलीनता । प्रकटे अभेदावस्था । तेचि वाढवावी स्थिरता; ।

मंद मंद. ॥ ६४ ॥ जाला सांडावा विक्षेपु, । त्यजावा लयो पापरूपु, । लक्षीं न करावा आरोपु, । तये वृत्तीचा. ॥ ६५ ॥ अभेदीं असे जें स्फुरण, । स्वस्वरूपाचें अनुसंधान, । तेंहीकरूनि सुलीन, । निवांत असावें. ॥ ६६ ॥ सहजचि स्फुरे स्वरूपता, । सच्चित्सुखैकरसता, । नित्य, निर्मळ पूर्णता, । ठायींची ठायीं. ॥ ६७ ॥ तैसेंचि निर्विकार, स्वस्थ । मन कीजे समाहित, । ध्यानयोगाचें हें मत, । ऐसें आथी. ॥ ६८ ॥ निरावलंबीं न थरे, । बाह्यप्रपंचीं मन विखुरे, । तें आंवरितांही नांवरे, । ऐसें जयां, ॥ ६९ ॥ तेंहीं सावलंब कीजे ध्यान, । चिंतावें रूप सगुण, । मग षोडशां उपचारीं- करून । पूजावें तें. ॥ १८७० ॥ तो भक्तियोगु आचरतां । चित्तातें होये स्थिरता; । मग सांडावी सावलंबता । अनुक्रमेंचि. ॥ ७१ ॥ हस्त, पाद, अवयव । सांडूनि मूर्तीचे सर्व, । मुख मात्र जें अपूर्व । तेंचि चिंतावें. ॥ ७२ ॥ तोही अवलंबु सांडितां । केवळु उरे शून्यता, । तेंचि चिंतावी निरवयवता, । योगमार्गें येणें. ॥ ७३ ॥ तेथेंचि होतां स्थिरत्व । स्फुरे निर्मलत्व, पूर्णत्व; । मग सांडूनि दृश्यद्रष्टृत्व, । उगेंचि असतां, ॥ ७४ ॥ सहज जें तत्व उरे, । प्रपंचु जेथ संहारे, । सच्चित्सुखैकरसा, वा रे, । अभिन्न जें, ॥ ७५ ॥ तेथें मनत्व मावळोनि जाये, । पूर्णत्व आत्मत्वें राहे, । तद्रूप असणेंचि जें होये, । या नांव योगु. ॥ ७६ ॥ एक मनाचिया जया, । पवनु शिकवी, धनंजया, । आंवरितां पवनक्रिया । मन येकवाटे. ॥ ७७ ॥ कव्हणी येकि कुंडलिनी । ते चेतविती वज्रासनीं, । वोड्याना दृढ करूनि, । ढुढाविती ते. ॥ ७८ ॥ मग ते वळण साडी, । सुषुम्नेची वाट सोडी, । पट्चक्रें फुडाफुडी । मोकळीं पडती. ॥ ७९ ॥ तव रेचकु, पूरकु, कुंभकु, । ऐसा प्राणायामु एकु । करूनि, केला त्राहाटकु । अभ्यासियें. ॥ १८८० ॥ ऐसा प्राणायामु करितां, । पवनु जाला आंपैता, । तो प्रत्याहारें झाडितां, । सूक्ष्मु उरे. ॥ ८१ ॥ मग सुषुम्नानाळें तेणें । अधश्चोर्ध्व कीजे पणें, । पवना खांदीं मनें । बैसलें असतां, ॥ ८२ ॥ आधारीं कीजे प्रवेशु, । तंव तेथें देवता गणेशु, । रिद्धींसि अधिवासु । तये स्थानीं. ॥ ८३ ॥ तें आरक्तपणें कमळ । शोभत असे चतुर्दळ, । व, स, श, ष, केवळ, मात्राचतुष्टयें. ॥ ८४ ॥ लिंगप्रदेशीं स्वाधिष्ठान, । तें नीळवर्ण षट्कोण;

विरिंचि दैवत जाण । तये स्थानीं. ॥ ८५ ॥ व, भ, म, य, र, ल, ऐसें,। मात्राषट्क तेथें असे, । ते चिंतावें मानसें । मनोजयासि. ॥ ८६ ॥ मग नाभिस्थानीं मणिपूर, । तेथें विष्णु दैवत परिकर, । दशदळ, धूम्रवर्ण, साचार । कल्पावें, गा. ॥ ८७ ॥ ड आदि फ अंतीं, वीरा, । माजी दहाही मात्रा, । तेथ प्रतिपत्रीं, धनुर्धरा, । एकेकि धरिजे. ॥ ८८ ॥ हृदयीं अनहृ बोलिजे,। तें द्वादशदळ म्हणिजे, । अग्निवर्ण कल्पिजे, । रुद्र देवता. ॥ ८९ ॥ क आदि, ठ अंतीं,। द्वादशमात्रा असती,। त्या लक्षानिया, वीरपति, । पद्मन्यस्ता. ॥ १८९०।॥ कंठप्रदेशीं विशुद्ध, । षोडशदळ चक्र प्रसिद्ध, । शुभ्रवर्ण, यथाविध । चिंतावें कीं. ॥ ९१ ॥ तेथें षोडश स्वर वर्तती, । ते चिंतूनियां, वीरपति, । ईश्वरा नमस्कारु करिती । योगिश्रेष्ट. ॥ ९२ ॥ भ्रूमध्यें अग्निचक्र, । तें द्विदळ अति पवित्र, । पीतवर्ण परिकर, । हंसेति मात्रा. ॥ ९३ ॥ तेथें परमहस देवता; । ऐसीं षट्चक्रें हे, पार्था, । चिंतिती, चचला चित्ता । जीं नावें म्हणौनि. ॥ ९४ ॥ "नैक दळें" येक म्हणती, । नैकी मातृका ध्याती, । हाचि सिद्धांतु जे करिती । ते वचले प्राणी. ॥ ९५ ॥ षट्चक्राहूनि वरुतें, । सहस्रदळा ऊपर वर्ते, । नानावर्ण, निरालंब, तें । एक ध्याती. ॥ ९६ ॥ तें मनोजया कारण, । परि सिद्धांतु नव्हे जाण, । आतां तेंही निरालंब सांडून, । पुढें होतां, ॥ ९७ ॥ ब्रह्मरंध्र एक असे, । तेथें अनहतध्वनि विकासे, । शून्याकारीं समरसें । मनपवनेसीं. ॥ ९८ ॥ तये ध्वनीचा गजरीं, । महाशून्याचां अंतरीं, । ज्योति प्रकाशे एकसरी, । परम कळा जे. ॥ ९९ ॥ तेथें मनुपवनु मूर्च्छीवे, । आपणपयाही नेणवे, । कव्हणी एक उद्भवे । महासुख. ॥ १९०० ॥ तेंचि अमृतपान म्हणती, । अमर जालों भाविती, । परता सिद्धांतु नेणती । मंदभाग्य जे.॥ १ ॥ एक सिद्धासनीं बैसोनि, । आसनें आकोंचनें करूनि,। सहज वायो चढवूनि । नादीं राहिले. ॥ २ ॥ एका सहज ज्योतिध्यान, । एका लय लक्ष मुद्राबधन, । एक बहिर्मुखाचे मन । स्थिर करिती. ॥ ३ ॥ भूचरी, खेचरी, चाचरी, । सहजा, शांभवी, अगोचरी । हा लक्षयोगु, अवधारीं, । एकु वर्ते. ॥ ४ ॥ नासाग्रावरूनि घालिजे, । भूतरि दृष्टि न घालिजे, । माजिचें आकाश लक्षिजे, । ते भूचरी, गा. ॥ ५ ॥ तेंथे शून्यीं अति सूक्ष्म

दृश्य उठी अणूपम, । दृष्टियोगें मन सम । तेथेंचि करिती. ॥ ६ ॥ भ्रूमध्यें लक्ष्य धरितां, । ज्योति उपजे सूक्ष्मता, । तेही सांडूनि लक्षितां । केवळ गगन; ॥ ७ ॥ तेथें नाना तरंग दृश्याचे, । दीर्घ, वर्तुळ भ्रम दृष्टीचे; । जाती, मग परमाणूचे । अंश गमती. ॥ ८ ॥ तेथें सूक्ष्मात्सूक्ष्मतरें । गगन कोंदलें स्फुरे, । तेंचि मननयन अव्यापारें । व्यापारें पाहती. ॥ ९ ॥ ऐसी हे मुद्रा खेचरी । कल्पिली असे योगेंद्रीं; । मन जिकावें बाहेरि । यया हेतू. ॥ १९१० ॥ मग लावूनि दोन्ही पातीं, । तये समीं एक लक्षिती, । दृष्टि करूनि कंपती । भ्रूमध्यस्थानीं. ॥ ११ ॥ जेथें श्वेतपीतादि नाना वर्ण, । मन लाविती एक चिंतन, । तोचि सिद्धांतु न म्हण, । पांडुपुत्रा. ॥ १२ ॥ बहिरंग लक्ष्य देखिलें, । तेंचि अंतरा आणिलें, । मग सबाह्यअंतरीं कोंदाटलें । देखोंचि लागती. ॥ १३ ॥ एक बाह्याकाशींचि पाहती, । एक अंतरींचि ध्याती, । एक सहज सहज म्हणती, । तें सहज कैसें? ॥ १४ ॥ सांडूनि लक्ष्य एकदेशीं, । निरोधु न करितां दृष्टीसि, । सहज देखणें आकाशीं । घालूनियां. ॥ १५ ॥ तेथें आकाश भरलें दिसे । कल्हणे येकें सूक्ष्मांशें, । तेंचि लक्षिती अनायासें । सहज म्हणौनि. ॥ १६ ॥ यापरी योगमतें नाना, । अवधारीं, गा अर्जुना, । जिंकावया चंचला मना । योगीं कल्पिलीं. ॥ १७ ॥ तेथें मतींचे साधारण । नेणती वेद, शास्त्र, पुराण, । तेंहीं तोचि सिद्धांतु म्हणौन । संपादिजे. ॥ १८ ॥ मनोजयाचे हे प्रेत्न, । तथापि द्विविध ऐसें जाण, । ग्राह्याग्राह्यभेदें भिन्न । कैसे? अवधारीं. ॥ १९ ॥ शास्त्रप्रवीण योगवेत्ते । तेंहीं सूचिलीं जीं मतें, । वेदशास्त्रसंमतें । मनोजयासि, ॥ १९२० ॥ तें ग्राह्यें तुवां जाणावीं, । आतां मत्ता आइकावीं; । आइकोनि, जीवीं धरावीं । साधनहेतू. ॥ २१ ॥ बाह्य आचरावा कर्मयोगु, । विहितु निजाचारु चांगु; । वर्णी, आश्रमीं सांगु । जैसा सूचिला. ॥ २२ ॥ तेणें रजतममळु फिटे, । सत्वशुद्धि केवळ घटे, । मग सत्वनिष्ठ न फुटे । ठायींहूनि मन. ॥ २३ ॥ अथवा ईश्वरआराधन, । नवविधभक्तिसाधन, । करितां शुद्ध मन । निश्चळ होये. ॥ २४ ॥ ऐसा बाह्यकर्मयोगु, । तो तूतें कथिला प्रसंगु, । आतां अंतरीं ध्यानयोगु । उपासना भावें. ॥ २५ ॥ निर्विकार चित्त न थरे । निराव-

लंबीं निर्धारें, । तरि देवाचीं रूपें साकारें । ध्याना आणावीं. ॥ २६ ॥ निर्विकार, समाहित, ।जंव स्थिर बैसे चित्त, । तंववरि हें योगमत । ऐसें आश्रयावें. ॥ २७ ॥ येरें लयें, लक्ष्यें, धारणा, । हटनिग्रहो, अर्जुना, । मंदाची असे कल्पना, । म्हणौनि सांडावी. ॥ २८ ॥ वेदीं, शास्त्रीं, विरुद्ध, । तें नव्हे प्रमाणसिद्ध; । याळागूनि सुप्रसिद्ध । तेथें न प्रवर्ततीचि. ॥ २९ ॥ कांडत्रय जें वेदाचें, । तें प्रमाण सांख्या योगाचें, । अवधारीं, येथविपर्यीचें । वचन एक. ॥ १९३० ॥ ज्ञानकांड वेदाचें, । तें प्रमाण सांख्यशास्त्राचे, । तेंविचि द्विविधा योगाचें, । कर्म, उपासना. ॥ ३१ ॥ तें सांख्य मार्गी द्विविध, । कथन केलें यथाविध; । आतां योगमत प्रसिद्ध । सागतु असें. ॥ ३२ ॥ हा बहिरंग, अतरंगु, । भक्तियुक्तु कर्मयोगु, । चित्तैकाग्र्यताप्रसंगु । प्रसशिला. ॥ ३३ ॥ यये योगीं प्रवर्ततां, । अवधारीं, गा पांडुसुता, । कर्मशीळां सुभक्तां । ध्याननिष्ठा ते. ॥ ३४ ॥

अभिक्रमनाशः

उपक्रमु साधनाचा, । आपुलिया स्वधर्माचा । प्रारंभु उपासनेचा, । शमाचा ध्यानीं. ॥ ३५ ॥ जाहलाचि मात्रु पुरे, । दिनेदिनु आगळा, बा रे, । वाढेचि, परंतु एकसरें । नाशु ययाचा ॥ ३६ ॥

नास्ति

न वर्ते, गा धनुःपाणि; । पावकु जैसा तृणीं, । कीं सूर्योदयमानीं । वाढोंचि लागे. ॥ ३७ ॥ वृक्षाकार अंकुरलें, । तें बीज वाढोंचि लागलें, । कीं मागुतें बीजीं रिघालें । रोप काये ? ॥ ३८ ॥ उगमापासाव निघाली, । ते माजूनिचि गंगा मुरडली, । कीं सागरा मिळी, । जाली सागरु स्वयें. ॥ ३९ ॥ द्वितीये देखिली चंद्रकळा, । ते दिनेदिनु वाढेचि कीं, नृपाळा, । जंव पूर्णचंद्र तो डोळां । दिसों लागे. ॥ १९४० ॥ तैसी योगनिष्ठा अंकुरली, । ते दिनेदिनु वाढोंचि लागली, । परतु लोपें विसरली । माझारींचि जे. ॥ ४१ ॥ सत्कर्मानुष्ठानता । जाली जे, चित्तप्रसादता, । तिया जें कर्म, पार्था, । निपजों लागे, ॥ ४२ ॥ तें पूर्वीलाहूनि अधिक, । तेणें सत्वही तदात्मक; । पुडती सत्वें कर्म, कर्में आणिक । सत्व आगळें. ॥ ४३ ॥ भक्ति श्रद्धेतें प्रकटी, । श्रद्धा भक्तीसींचि उठी, । एवं उपक्रमु

किरीटी, । अमरु ययाचा. ॥ ४४ ॥ जव जव कीजे ध्यान, । तव तव चित्तस्थैर्य जाण, । मग चित्तस्थैर्ये अनुसधान । तें अधिकचि होये. ॥ ४५ ॥ निरावलंब कीजे मन, । तव तव कल्पना क्षीण, । मग निर्विकल्पत्वें जाण । अधिक स्थिरावे. ॥ ४६ ॥ एव मनचि जिंके मनातें, । करी कर्मचि कर्मातें, । ध्यान वृद्धिकर ध्यानातें, । भक्तीनें भक्ति. ॥ ४७ ॥

स्वल्पमप्यस्य धर्मस्य

ऐसा स्वल्पुचि हा धर्मु, । काही मातु उपक्रमु । घडलया, अर्जुना, श्रमु । वरी न पडे ॥ ४८ ॥ तृणें गादळिये वसुधरे । अशार्धमात्र अग्नि पुरे, । मग अयत्नें जैसा पसरे । तोचि तो, पार्था. ॥ ४९ ॥ कर्पूराचीं होतु शिखरें, । तेथ दीपकळी मात्र पुरे, । ते पेटवावी नलगे, बा रे, । उठी अनिवार. ॥ १९५० ॥

प्रत्यवायो न विद्यते

अर्जुना, म्हणसील वचन, । हिंसक, सदोष, म्हणौन । सांख्य सप्रदायें निरसन । केलें कर्माचें. ॥ ५१ ॥ एक पशु वधावे यज्ञीं, । वृक्षाचीं आगें हवनीं, । कडणीं, पेषणीं, मार्जनीं, । वधावे जीव, ॥ ५२ ॥ काष्ठसर्गे, जळसर्गें, । येणें आश्रमधर्मयोगें, । येक धान्यजीव अग्निसर्गें । पचावे कीं, ॥ ५३ ॥ एकाचीं गात्रें खाडूनि, । चदन अर्पावे पाषाणीं, । पत्रीं, पुष्पीं, फळीं, जीवनीं, । घडे भूतहिंसा ॥ ५४ ॥ तेंविचि सग्रामीं क्षेत्रियातें, । आणि कृषिकर्मीं वैश्यातें, । सेवाकर्मीं शूद्रातें, । हिंसाचि घडे. ॥ ५५ ॥ तरि जो वेदें निरोपिला, । वर्णाश्रमधर्मीं सूचिला, । विध्युक्तु हिंसा केला, । तो दोषु नव्हे. ॥ ५६ ॥

( यज्ञो वै विष्णुः )

यज्ञ विष्णूचें स्वरूप, । तदर्थु हिंसा नव्हे पाप । दोष निरसती अमूप । उपराठे येणें. ॥ ५७ ॥ स्रष्टेन रचिलीं भूतें, । तैं स्वधर्म, यज्ञ तयाते । निरोपिले वेदमतें, । पांडुकुमारा. ॥ ५८ ॥ पश्वादिकें यज्ञद्रव्यें, । धान्यें तदुलादिकें, गव्यें, । जें जें मानती, सेव्यें । तया देवा. ॥ ५९ ॥ मत्रार्थ केले ब्राह्मण, । वैश्वानुरु तो वदन, । कर्तेया नाथी पतन, । ते देवयज्वा. ॥ १९६० ॥

( यज्ञे सोमीयं पशुमालभेत )

म्हणौनि स्वधर्मु आचरातां, । सोमयागीं पशु मारावा, । हा दोषु नाहीं, पांडवा, । ते द्रव्यहोमीं. ॥ ६१ ॥ जेणें देव संतुष्ट, । आपुलां स्वधर्मी इष्ट, । तें पाप नव्हे, श्रेष्ट । सन्यासाहूनि. ॥ ६२ ॥

त्रायते महतो भयात्

संसारु महासागरु, । केवळु दुःखाचा पूरु, । अप्रमितु भयासुरु, । प्रांतशून्यत्वे, ॥ ६३ ॥ तयापासाव हा तारी, । पांडुपुत्रा, अनघारीं; । हा एकु घडे, गा, तरि । आयास न लागती. ॥ ६४ ॥ अमृता ऐसें सेविजे । आणि वज्राचे देह लाहिजे, । तैं अग्निमाजी रिघिजे, । भेओ नाहीं. ॥ ६५ ॥ वायो ऐसें शरीर । जोडी जोडिजे साचार; । मग पव्हतां सातही सागर, । मान न लगे. ॥ ६६ ॥ मनचि कल्पतरु जाले, । न उठी, तयाचें डिवाळें, । करतळीं स्थान केलें । चिंतामणीनें जैं. ॥ ६७ ॥ तयातें भयचि विहालें, । नेणो कवणीकडे तें गेलें, । पाप आगूनि पळाले, । ते दृष्टी न पडे. ॥ ६८ ॥ आपुलां स्वधर्मी तत्परु । यमु तयाचा किंकरु, । ज्ञणें हा होये ईश्वरु । म्हणौनि बिहे. ॥ ६९ ॥ सकळा देवा तो मान्यु, । स्वधर्मनिष्ठु जगीं धन्यु, । यालागीं असामान्यु । योगु की हा. ॥ १९७० ॥ म्हणसील, गा वीरपति, । स्वधर्मी दोषु नाहीं, । तरि सांख्य दोषु आरोपिती, । तें व्यर्थचि काये ? ॥ ७१ ॥

व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन ।
बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥

हे कुरुनंदन

तरि अवधान देईं, सुभटा, । कुरुकुलोत्तमा, श्रेष्टा, । यया योगाची निष्टा । सांगैन ते. ॥ ७२ ॥

इह

भक्तियुक्त कर्मयोगु, । विहितु, निजचारु, सांगु । आचरतां बहिरंगु । सत्वशुद्धि घडे. ॥ ७३ ॥ ते सत्वशुद्धि कैसी ? । रजतमदोष ग्रासी, । निर्मळ सत्व प्रकाशी । साधकांतें. ॥ ७४ ॥ आतां रज म्हणिजे तें कवण ? । कैसें तमाचें लक्षण ? । जाल्या दोहींचें निरसन, । सत्व तें कैसें ? ॥ ७५ ॥

ऐसा प्रसंगु विस्तारें । प्रथम सांगेन, बा रे; । मग ध्यानयोगु अभ्यंतरें । सूचिजैल. ॥ ७६ ॥ रज होये प्रकटतें, । तैं तये निर्मळे बुद्धीतें । विपयज्ञानस्मरण तें । हौंचि लागे. ॥ ७७ ॥ बुद्धि आधारें वावरे, । तये मनीं रज संचरे, । मग तें अर्थस्फूर्ति अभ्यंतरें । स्पर्शिलें सांतें ॥ ७८ ॥ घेऊनि उठे कल्पना, । भोगाची दृढवासना, । अर्थस्वार्थकामना । उठूंचि लागे. ॥ ७९ ॥ अभिलाषबुद्धिस्वभावें, । अर्थांचां ठायीं मन पावे, । मग तो पदार्थु न सोडवे । भोगिलेनविण. ॥ १९८० ॥ तया विषयभोगाचिये । सिद्धी, मन इंद्रिया ये, । मग बाह्यार्थाचें होये । ज्ञान तया. ॥ ८१ ॥ बाह्यार्थपरिज्ञानें । उपजती कर्मसाधनें, । तें मनचिपासाव, जाणें, । कर्मेंद्रियद्वारा. ॥ ८२ ॥ एवं मन, बुद्धि, इंद्रियगण । अर्थोपलब्धीलागून । निजव्यापारीं, जाण, । प्रवर्तो लागती. ॥ ८३ ॥ तेथें अवतरण कामाचें, । दंभा, दर्पा, अभिमानाचें; । आसक्ति, तृष्णा, कल्पनेचें, । टेंक फुटे. ॥ ८४ ॥ काम, राग, वळावती, । दंभु, लोभु, अशान्ति, । असूया, मत्सरु, अविरक्ति । उभी ठाके. ॥ ८५ ॥ रजोगुणाचेनि आधारें । मीनलीं इत्यादिकें अपारें, । आतां ययांचेनि संचारें । कैसीं मनबुद्धिकरणें ? ॥ ८६ ॥ करूं नये तें करिती, । नये भोगूं तेंचि भोगिती, । धर्माधर्मज्ञान नाथीं । भ्रांती भ्रमतां. ॥ ८७ ॥ आतां तमोगुणु प्रवर्ते, । तैं अप्रकाशु करी बुद्धीतें, । प्रमादें हाणे विवेकातें, । बुद्धी मौन पडे. ॥ ८८ ॥ जडत्व पावली बुद्धि, । आता मन तें तिचें संबंधी, । तेणें साडिली शुद्धि । संकल्पाची. ॥ ८९ ॥ मना अगें करणातें । जडत्वचि जाण वर्ते, । मग स्वप्रयोजनु तयांतें । आठवेचिना. ॥ १९९० ॥ मन, बुद्धि, इंद्रियगण, । ययांतें प्रवर्तलें अज्ञान, । तैं ज्ञानमात्राचें स्फुरण । जालें स्वभावें. ॥ ९१ ॥ आलस्य आलें भेटीं, । प्रमादु प्रसारे, किरीटी, । आगें निद्रेचेनि दाटी । हौंचि लागे. ॥ ९२ ॥ नित्य लागला विसरु, । अज्ञानें ज्ञाना नित्य मारु, । अहोरात्र अविचारु । भरलाचि असे. ॥ ९३ ॥ ऐसे ज्ञानवृत्तिलोपकर, । तमाचे फुटले अंकुर, । येणें मन, बुद्धि, समग्र । करण वेढाळिलें, ॥ ९४ ॥ तैं ज्ञान ना अन्यथा ज्ञान, । धर्मु ना अधर्म करण, । ऐसें तम अप्रकाशलक्षण । वोळखावें तुवां. ॥ ९५ ॥ ययां दोहींचा विनाशु । न वर्ते जंव,

जाणिजसु, । तंव शुद्धसत्वाचा प्रकाशु । प्रकटेचिना. ॥ ९६ ॥ म्हणौनि येणें कर्मयोगें, । भक्तियोगें, गा, सांगें । वर्तता, नाशती प्रसंगें । हे दोन्ही गुण. ॥ ९७ ॥ मग केवळ सत्व उरे, । तें कैसें जाणावें चतुरें? । आइकें, अर्जुना, सादरें; । सांगेन मी. ॥ ९८ ॥ सत्वें बुद्धिनिर्मळता, । सारासार-विषयीं निपुणता, । न सुटे स्वरूपसत्ता, । विचारें प्रज्ञा. ॥ ९९ ॥ बुद्धिचेनि निर्मळपणें, । संकल्प सांडिले मनें, । मग ते उपशमाकारणें । योग्य होये. ॥ २००० ॥ इंद्रियें नलगती अर्था, । लागोनि उठती परमार्था; । आश्रयो नाथी स्वार्था । तये स्थानीं. ॥ १ ॥ तेथें काम, क्रोध पळाले, । मद, मत्सर गळाले, । दंभ, प्रपंच नाहले । देशधडी. ॥ २ ॥ मनें सांडिली वासना, । पळोनि गेली ईक्षणा, । प्रवृत्ति आली रणा । निवृत्तीसीं. ॥ ३ ॥ मन जालें निर्विकार, । सांडिले करणीं व्यापार, । प्रकाशमान बुद्धि स्थिर । ठायीं बैसली. ॥ ४ ॥ प्रमादु जळाला वणवां, । अबोधु साडला अवना, । विसरु भेटों अभावा । गेला पहिलेंचि. ॥ ५ ॥ मौन, अज्ञान निमालें, । जडत्व नेणों काये जालें? । आळसाचें मूळ करपलें, । नये निद्रा. ॥ ६ ॥ एवं गुणद्वय तें तूं जाण, । एकें अज्ञान, एकें अन्यथाज्ञान; । एकें लयो, एकें जाण । विक्षेपु ऐसें. ॥ ७ ॥ एकें असंभावना तमें, । विपरीतभावना रजें गमे, । यया दोहींचेनि नामें । अभावो पीटला. ॥ ८ ॥ एवं भक्तियुक्तें कर्मयोगें । घडलेनि स्वधर्में सांगें, । सत्वशुद्धि प्रसंगें । जाली असतां, ॥ ९ ॥ अंतरीं ध्यानयोगु आचरतां । अत्यंत सुगमु जाण, पार्था; । स्वप्नीं नेणवे विक्षेपता । योगियांसि. ॥ २०१० ॥ निरावलंबीं समाहित, । स्वस्थानीं रमे चित्त, । तेथूनि काढितां बहुत । मानी श्रमु. ॥ ११ ॥ नलगत बाह्यकरणातें, । न करित मन संकल्पातें; । नावलंबितां पदार्थातें । स्थिरावे ठायीं. ॥ १२ ॥ सकळै वृत्तीचा मारु । जालिया, न पडे विसरु, । त्या गुणद्वयाचा संहारु । जाला म्हणौनि. ॥ १३ ॥ मग निर्विकारा, सहजस्थिति । समाधि वर्ते आइती, । ते योगी योगयुक्ती । पावोनि ठाले. ॥ १४ ॥ यापरी कर्में सत्व शोधे, । ध्यानयोगीं मन खोंधे, । पावोनि समाधि, वेधे । अनायासेंचि. ॥ १५ ॥ ऐसें जाणोनि मानसीं, । योगु साधन मोक्षासि । येथविषयीं निर्धारेसीं, । पांडुपुत्रा. ॥ १६ ॥

व्यवसायात्मिका बुद्धिः

प्रेत्नशीळ बुद्धि होये, । ते म्हणसील कैसी आहे? । तरि, अवधान देईं, अनुपायें । निरोपीन. ॥ १७ ॥

एकेव

ते एकाग्र, एकानिष्ट, । पदार्थी नव्हे लंपट, । जे साधावया कष्ट । पूर्वीचि केले. ॥ १८ ॥ करणगुणव्यापारें । न प्रवर्ते बुद्धि बाह्याकारें, । आणि असतेनि शरीरें । विविक्त स्फुरे. ॥ १९ ॥ इंद्रियां बाह्यार्थज्ञान, । जेथूनि स्फुरे कर्मकरण, । 'मी देहो' हे खुण । जेथ उमजे, ॥ २०२० ॥ संकल्पासहित उठी । जेथूनि मन, गा, किरीटी, । पडों लागे दृष्टी । जेथूनि, पार्था, ॥ २१ ॥ मग संकल्पवृत्तिविनाशीं । मन पडे जेथ ग्रासीं । मग अमनत्व प्रकाशी । जयेनि वळें, ॥ २२ ॥ अनुसंधानेंसीं चित्त । जेथूनि असे स्फुरत, । जये प्रकाशीं गमत । चित्त अभावलें. ॥ २३ ॥ अहं ऐसें एक स्फुरण, । जेथें उपजलें देखे भान, । मग तें जालया लीन, । जाण नेजे. ॥ २४ ॥ अंतःकरणा आठउ, । जेथूनि तयाचा उद्भउ, । विसरूही ये अनुभवूं । ऐसा जेथूनि. ॥ २५ ॥ आली अवस्था जेथ कळे, । गेली तेही जेणें निवळे, । तें ज्ञानमात्र सचलें । जेथींचें तेथें. ॥ २६ ॥ भिंती आधारें चित्र । जैसें दिसे विचित्र, । कीं तें खांवसूत्र । पुरुषाधारें. ॥ २७ ॥ चित्रमंडपींचा दीपकु, । नानाव्यक्तिप्रकाशकु, । परंतु स्वस्थानीं एकु । तो जैसा तैसाचि. ॥ २८ ॥ तैंवि बाह्यांतरस्थावृत्ति । जये प्रकाशीं, वीरपति, । स्फुरती, गमती, सामावती, । पुडती जें उरे, ॥ २९ ॥ तें ज्ञप्तिमात्र स्वस्थानीं । जैसें तैसेंचि, धनुःपाणि, । बुद्धि तयालागूनि । आम्ही म्हणों. ॥ २०३० ॥ वृत्तिमात्र येथूनि अंकुरे, । प्रकाशें येणेंचि वावरे, । तेथें तेथें तत्तदाकारें । जाणावें हेंचि. ॥ ३१ ॥ उठिलियां तरंगां अनंतां । सारद्रांशें व्यापी सरिता, । तैंवि एकि तेंचि वहता । बुद्धिकळा. ॥ ३२ ॥ आतां व्यवसायीं जे वर्ते, । रजतमातें न वर्ते, । इतुलेनि वृत्तिमात्र तेथें । तें आर्थीचिना. ॥ ३३ ॥ मग वृत्तीचिया शून्यता । सहजचि प्रज्ञानरूपता; । ते निर्विकारत्वें, पार्था, । कैसी वर्ते? ॥ ३४ ॥ प्रभंजनें हल्वलें । जळचि तरंगाकार जालें, । तें निश्चळदशे आलें । जैसें पुडती, ॥ ३५ ॥ तैंवि निर्विकारता निर्मळ, । स्वस्थ बुद्धि होये केवळ, । तेथें गुण-

द्वयभान आभाळ। निवळों लागे. ॥ ३६ ॥ देहादिप्रपंचु हारपे, । तम प्रकाशुशून्यता लोपे, । इतुलें रजोगुणाचेनि लोपें, । सहज होये. ॥ ३७ ॥ मग तमोगुणाचिया हानी । नेणीव नुरे तये स्थानीं, । मग निःप्रपंच सत्वगुणीं । निवळोंचि लागे. ॥ ३८ ॥ तेंहि शुद्धसत्वाची गुणीक । वुद्धि समावे, आइक; । तें सहज सचित्सुखात्मक । स्वरूप निवळे.॥ ३९ ॥ तेथें तन्मयाकारें असतां । वुद्धीतें नाहीं नानाकारता, । जे पावली एकरसता । तये अखंडीं. ॥ २०४० ॥ ध्यानावस्थेचां काळीं । बुद्धि ते ऐसी वोळिली, । जे ब्रह्मभूतत्वें जाली । एकनिष्ट. ॥ ४१ ॥ ययाचि युक्ती, पार्था, । कर्मयोगीं वर्ततां, । नाहीं वुद्धीतें आत्मता । चळन केव्हांही.। ॥ ४२ ॥ वाह्य निपजे कर्मयोगु, । परि अंतरीं नव्हे ध्यानभगु, । पूर्ण परिणमला योगु । जयासि, गा. ॥ ४३ ॥ अधिष्ठाननिष्ठे बुद्धी, । बाह्य कर्म नव्हे विरोधी, । निपजे परस्परा सिद्धि । करणद्वारा. ॥ ४४ ॥ कर्मयोगीं चचळ, । भक्तियोगीं हें स्थूळ, । अंतरीं मन, बुद्धि निश्चळ । योगियाची. ॥ ४५ ॥ योगु इतुला जव साधे, । केवळ सत्व शोधे, । तंव वाह्यकर्म विरोधें । वर्ते जयीं, ॥ ४६ ॥ तें साक्षित्व अवलंबूनि, । वुद्धि एकनिष्ठ अधिष्ठानीं, । वाह्ययोगु तो करणीं । सपादिजे. ॥ ४७ ॥ करणधर्मसाक्षित्वें, । मनोधर्मज्ञातत्वें, ।, वुद्धि न चळे आत्मत्वें, । तऱ्हि काये कनिष्ठ ते ? ॥ ४८ ॥ ऐसें निरावलंब ध्यान । साधकाप्रति न वर्ते, जाण, । जो करी मूर्तिचिंतन, । तयाचें कैसें ? ॥ ४९ ॥ तेथें करणवृत्ति न चरती, । मन न भ्रमे वाह्यार्थी; । अवलंबूनि ठेलें मूर्ति । एकाग्र मन. ॥ २०५० ॥ तेथें मनाचिया एकाग्रता । एकनिष्ट बुद्धि जाण, पार्था; । कंपु नाथी ध्यानस्था, । निर्वातीं दीपापरी. ॥ ५१ ॥ हेचि स्थिति इच्छकु । प्रथमावस्थे साधकु, । तो जाला प्रपूजकु । अतरीं जैं, ॥ ५२ ॥ तऱ्हि पूजाकारें एकनिष्ठ । मन तयाचें भक्तिपुष्ट, । वाह्यव्यापारीं लंपट । नव्हेचि कीं. ॥ ५३ ॥ पूजाकार मन जालें, । भक्ती एकनिष्ठा रगळें, । तें वुद्धीतें आधिलें । तें एकरूपत्व कीं. ॥ ५४ ॥ अंतरीं न वैसे मन । तयाचीचि आवडी धरून, । आरंभीं वाह्यसाधन । तो कैसा असे ? ॥ ५५ ॥ नवविधु भक्तियोगु । देहें आचरोनि सांगु, । ठेवूनि मनोभावो अभंगु । तये सर्वेश्वरीं, ॥ ५६ ॥ श्रवणीं, कीर्तनीं,

स्मरणीं, । ध्यानीं, सेवनीं, पूजनीं, । एकु परमात्मायाचूनि, । दुजा नेणे. ॥ ५७ ॥ करी नमस्कार, प्रदक्षिणा, । आठवी श्रीगुरु पुनःपुन, । निमिषार्धमात्र मना— । माजूनि न निसवे. ॥ ५८ ॥ न इच्छी कामु पादार्थिकु, । न म्हणे मी कर्ता एकु, । जाणे परमात्मा व्यापकु, । कर्ता, भोक्ता. ॥ ५९ ॥ एकनिष्ठ, दृढव्रती, । निष्काम आचरे भक्ति, । तयाची बुद्धि, वीरपति, । एकनिष्ठचि कीं. ॥ २०६० ॥ अथवा कर्मयोगु आचरता, । नमनी जो मी कर्ता, । ईश्वरपारतंत्र्यता । कर्म देखे. ॥ ६१ ॥ अथवा अकर्ता आत्मा जाणे, । प्रकृतिगुणाधीनें करणें, । येथील कर्तृत्व मी नेणें, । साक्षिभूतु, ॥ ६२ ॥ यापरी प्रकृतिपारतंत्र्यें, । कीं ईश्वराधीनत्वें, वा रे, । कर्म करी, परी न स्मरे । तेथें कर्तृत्व ॥ ६३ ॥ अकर्तात्मज्ञता आचरण, । तें करी ब्रह्मार्पण, । जयाचें कर्मफळीं मन । अनासक्त सदा. ॥ ६४ ॥ विविक्तज्ञानें विचारिता, । अनात्मया कें कर्तृरूपता ? । आणि आत्मया नित्या, सता, । तें भान्चि नसे. ॥ ६५ ॥ अकर्तात्मज्ञान निपजे, । आणि फळीं निराशा देखिजे, । तेणें कर्में न पविजे । संसारु, गा. ॥ ६६ ॥ तें सत्वशुद्धीचें कारण, । रजतमवृत्तिनिरसन, । जेणें निःशेषवृत्तिस्फुरण । बुद्धि एकनिष्ठ. ॥ ६७ ॥ इहामुत्रार्थफलभुक्ति । स्वधर्मी आपुला नाश्रयिती, । कर्ते न होऊनि करिती, । ते व्यवसायी जाण. ॥ ६८ ॥ तयाची कर्मी, कर्मफळीं, । अनासक्त बुद्धि स्थूळीं, । ते ब्रह्मप्राप्ति राहिली । आश्रयूनि. ॥ ६९ ॥ अनात्मभावातें नाश्रयी, । कर्मी ब्रह्म एक आश्रयी, । ते ब्रह्मैकनिष्ठ, जाणई, । मूळ प्रज्ञा. ॥ २०७० ॥ तेणें रजतमबीज करपे, । अज्ञान, अन्यथाज्ञान हारपे, । केवळ शुद्धसत्व तपे । योगनिष्पत्ति. ॥ ७१ ॥ तेथें बुद्धीची एकनिष्ठता, । पूर्वीचि कथिली, पार्था, । ऐसी व्यवसायिक तत्वता, । बुद्धि एकि. ॥ ७२ ॥

अव्यवसायिनाम्

आता अव्यवसायी जन, । तयाचें कैसें लक्षण ? । तें सांगन, मन सावधान । करूनि, आइकें. ॥ ७३ ॥ म्हणती, संसारा आलया, । विषयभोगु नाथी जयां, । ते जन्मोनि गेले वाया । सर्वकाळ ॥ ७४ ॥ म्हणौनि इहलोकु भोगावा, । परलोकु अनुभवावा, । मोक्षु तो कायें

करावा ? । अंध, मूकु. ॥ ७५ ॥ सत्वाची न करिती चाड, । रज, तम, जयां वाड, । विषयसुखचि गोड, । म्हणौनि रंगले. ॥ ७६ ॥

बुद्धयः

तयांची बुद्धि कामाकुळ, । समळ आणि व्याकुळ, । रजतमवातें चचळ, हालवली असे. ॥ ७७ ॥

हि

सत्वहीनत्वें आथिली, । रजतममूसे वोतली, । अतेव कैसी बोलिली । निर्धारें ते ? ॥ ७८ ॥

अनंताश्च

नानापदार्थाकारें फुटे, । नाना साधनीं वाटे, । नाना भोगीं तुटे । ठायींठायीं. ॥ ७९ ॥ जैसा प्रकृतिभेदु विस्तारला । तैसा तो भिन्नु भिन्नुचि, नृपाळा. । येका ईशाचिया अशकळा, । अनंत जीव. ॥ २०८० ॥ जे जे जयाची प्रकृति, । गुणीं स्वतत्र तीची याति, । ते ते तदाकारमति । बुद्धि जाणावी. ॥ ८१ ॥ आता तयांचिया मति । तिया कोण जाण किती. । पार्था, प्रापचिक व्युत्पत्ति । ते नैकविध, गा. ॥ ८२ ॥ अनंता बुद्धि सांगितलिया । माजी येकि तितुल्यां । निर्धारितां, वीरराया, । कैसी दिसे. ॥ ८३ ॥

बहुशाखाः

येके बुद्धीचे अवयव । पाहतां बहुसाळ पल्लव. । आतां मर्यादा करणें, हे हांव । पुरे जाली. ॥ ८४ ॥ गंगेचीं वाळू गणणें, । पृथ्वीचे परमाणु मेजणें, । तिया मेवधारा लक्षणें । किती म्हणौनि ? ॥ ८५ ॥ व्यापका मातें अनंता । त्या बुद्धि गणितां अमिता; । दुसरा संख्याकर्ता । आतां कवणु ? ॥ ८६ ॥ अनंतु संसार हा जितुला । नानाविधु भासला, । तो अवघाचि वेगळाला । विषयो जिये. ॥ ८७ ॥ जें जें भान, तें तें ज्ञान; । तया तयाचें जें साधन । तेंही बहुविध, जाण; । ऐसा बुद्धिभेदु हा. ॥ ८८ ॥ ऐसा बुद्धिभेद अप्रमितु, । परंतु अज्ञानेंचि परिवेष्टितु. । आइकें तद्विषयीं मातु । सांगिजैल. ॥ ८९ ॥ यज्ञनिर्णयालागूनि । पाचारूनि आणिले कीर्तनीं. । तेंहीं ताल सरसावूनि । श्रुति चढविलिया. ॥ २०९० ॥ आलापप्रलापप्रगर्जनें, । आपुलेनि सर्वज्ञपणें, । ते तया मूर्खत्वाचि कारणें ।

पात्र जाले. ॥ ९१ ॥ वैद्य पावले फुडाफुडी. । ते म्हणती दावा नाडी. । निघटनिदानें तेवढीं । पाशीं केलिया, ॥ ९२ ॥ तेथें जे जे कळा, ते अवकळा, । तो विचारुचि तेथिंचा वेगळा. । तव येकीं आणिलें गोपाळां । आखरे गावया. ॥ ९३ ॥ ज्योतिषी वेळा सावितीं, । तयाची तयातें तव त्ते युक्ति, । आता प्रेरिता यये अर्थी । प्रसरे मूर्खत्वा. ॥ ९४ ॥ वैदिक नेले कीर्तना, । वाद्यविशेषु तयातें साहेना, । ॐकारस्वरें गर्जना । करू प्रवर्तले. ॥ ९५ ॥ आता तयावरि नृत्य करणें, । ऐसें आरमलें तेणें क्षणें. । तें धडातेंचि पिसें । तेणें लागेल कीं. ॥ ९६ ॥ याज्ञिकाची कुशलता । ते धूळी मीनली सर्वथा. । कुडमडपाची कथा । तेथ काइशी ? ॥ ९७ ॥ सामगायन करणें । तरि उखाळाची मात्रा घेणें, । ऐसी जाणणीचि मूर्खपणें। आच्छादलीना ? ॥ ९८ ॥ क्षयरोगाचिये निवृत्ती । काय कहार्ने सगीतीं ? । वाद्यनिरोपाच्या पक्ति । सहस्र जन्हीं. ॥ ९९ ॥ धर्मशास्त्राचा प्रयोजनु । तेथें हाचि निबधु, म्हणौनु । साळोत्रशास्त्र आणूनु । पुढें कीजे, ॥ २१०० ॥ तें तिया जाणिवाचि नेणणें. । यापरी तीं अनतें ज्ञानें. । पुढती शाखाभेद तयाकारणें । अनत तेही. ॥ १ ॥ तेणें ज्ञानें युक्त। आता ते कैसे समस्त ?। हेंचि आधीं प्रस्तुत, । आइक, सागैन. ॥ २ ॥

यामिमां पुष्पितां वाच प्रवदन्त्यविपश्चितः ।
वेदवादरता· पार्थ नान्यदस्तीतिवादिनः ॥ ४२ ॥
कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।
क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥
भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।
व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥

हे पार्थ

अर्जुना, आइक निवाडें. । खरें तें जाणावया फुडें, । आधीं जाणावें रोकडें । कुडें तेंचि. ॥ ३ ॥

कामात्मान

तरि कामिकु जनु कैसा ? । आइक सागेन जैसा तैसा. । सर्वकाळ जीवीं आशा । अर्थाची जया. ॥ ४ ॥ ज्ञानेंद्रियमार्गें पाहता । जो जो अर्थु होये आडळता, । तो तो पाहिजेचि, चित्ता । ऐसें होये. ॥ ५ ॥ अर्थाभिलापें

तेणें तेणें । साधनांचा सागर तरे मनें. । उपाया सूची, जेणें । साधे तो अर्थु. ॥ ६ ॥ फोडी गोटा, चिंचोका. । न विसंबे सांपडला रुका; । झगझगिता निवडी थुंका । माणुसांचा. ॥ ७ ॥ आइकिलें श्रवणीं तें पाहवें, । पाहिलें मग वाटे घ्यावें. । न विचारी आपपरावें । कामिकु जो. ॥ ८ ॥ खादलें तें वैसलें जीवीं. । क्षणक्षणा तेंचि आठवी. । प्रेतालागीं श्रमवी । इंद्रियग्रामु. ॥ ९ ॥ श्रमलाचि परी न श्रमे, । कामातुरु ऐसा भ्रमे. । विवेकु हारपला कुकर्मे । दिवारात्रीं. ॥ २११० ॥ अर्जुना, हें मातें चांग । घायीं तुटेना कां आंग । परंतु कामें वेतलें जग । स्वार्थु न सोडी. ॥ ११ ॥ मासा आरंभु क्रियेचा, । तंव आजिचि संकल्पु फळाचा. । भोगु भोगूनि तेथिंचा । गुते मनें. ॥ १२ ॥ पापपुण्याचा कांटाळा । तो भारु नेवेचि गळां. । कामिकु जगु आपुला । कामुचि लक्षी. ॥ १३ ॥ भलेतैसें घडो कर्म, । परी स्वार्थु साधावा हेंचि वर्म; । हिंसादोषही ते धर्म, । आचार मानी. ॥ १४ ॥

आत्मैवेदमग्र आसीदेक एव, सोऽकामयत जाया मे स्यादथ प्रजायेयाथ वित्तं मे स्यादथ कर्म कुर्वीय.

अर्जुना, कामाचिये उत्पत्ती । ऐसें हें वेदवचन आथी. । तें मी आतां तुजप्रति । सांगेन, गा. ॥ १५ ॥ आधीं उपजला संसारीं । तो येकलाचि आपणु या शरीरीं. । तैं सबाह्याभ्यंतरीं । कामु तो नसेचि. ॥ १६ ॥ निष्कामें करणें व्यापारीं, । निष्काम मन संकल्पु करी. । वृथा चेष्टा, अवधारीं, । ते ते निपजे. ॥ १७ ॥ तैंचें कर्म तें निर्मळ; । अतेव शुभाऽशुभ फळ । तेथें नाहींचि केवळ, । ऐशी क्रिया. ॥ १८ ॥ मग तयानंतरें, वीरा, । आत्मकामु उपजला एकसरा; । मग तो तया शरीरा । वागविता होये. ॥ १९ ॥ आत्मार्थ पाहिजे सुख, । अलंकारु आणि वस्त्रादिक, । प्रिय अन्न रसिक, । प्रिय तें वचन. ॥ २१२० ॥ तया आत्मकामानंतरें । स्त्रीकामु उपजे येकसरें; । मग तया कामाचें वारें । अनिवार खेळे. ॥ २१ ॥ मातें पाहिजे वनिता, । ऐसें उपजे चिंता; । मग ते कामना समस्तां । कामांतें मोडी. ॥ २२ ॥ काय करूं म्हणे मिष्टान्नें. । धिग्य धिग्य माझें जिणें । । वस्त्रें आवडीचीं,

भूपणें, । खोंचती वाण ॥ २३ ॥ देवा, पक्षी तेंही मसारीं । येकट नसे वृक्षाग्रीं. । जोडाराचूनि वनांतरीं । हरण केंचें ? ॥ २४ ॥ मी वृक्ष, कीं पापाणु ? । जोडा नाहीं मजलागूनु । ऐसा हा शरीरीं प्राणु । असोनि कायें ? ॥ २५ ॥ येर विषयभोग सकळ । तें जालें केवळ हळाहळ. । अंतःकरण व्याकुळ । तळमळ करी. ॥ २६ ॥ दिवारात्रौ, अरवारीं, । अग्नि लागला शरीरीं । स्त्रीकामु ययापरी । अनिवार तो ॥ २७ ॥ मग प्रसंगें येकेंकरून । तयाचें होय लग्न । सकळ नश्चित तेथून । पुरुषु मानी. ॥ २८ ॥ अखंड अंगनेचें ध्यान, । तुपडती दोन्ही नयन । स्त्रीकामकर्दमीं मन । बुडोनि गेलें ॥ २९ ॥ भोगिता मग तो दारकामु । पुढती उपजला मनोधर्मु । पुत्रकामाचा उपक्रमु । होता जाला. ॥ २१३० ॥ म्हणे, जळो हा संसारु आपुला ! । पुत्रेविण वृथा गेला, । मन हें विश्रातीचिया स्थळा । पावेचिना ॥ ३१ ॥ दीपेंविण मंदिर, । पुत्रेंविण तैसें समग्र । पशु, संपत्ति आणि घर । कवणाचेंही. ॥ ३२ ॥ श्रमलियातें विश्राति । नाहीं, देवा, त्रिजगती. । शयनीं, भोजनीं सांगाती । पुत्र नाहीं ॥ ३३ ॥ ' वा, रे, ' म्हणोनि पाचारणें । आता म्या कवणाकारणें ? । कवण नाशीळ माणें । पुत्रेंविण ? ॥ ३४ ॥ आसनीं, भोजनीं एकला, । संसारु हा वाया गेला. । परतोनि पाहीं कवणाला । बाहेरि आता ? ॥ ३५ ॥ प्रदेशियें दोघें जणें, । मंदिर हे कवणाकारणें ? । हातीं पायीं लावणें । केवळ रक्षा. ॥ ३६ ॥ स्त्रीकाम इतुला । तो पुत्रकामें आच्छादिला. । यापरी पुत्रकामु आगळा । उपजला देहीं. ॥ ३७ ॥ ऐसी करिता सोसणी । पुत्र जाले तयालागूनि, । विश्राति पावला मनीं । त्याचेनि संगें. ॥ ३८ ॥ वासना होती येकगुणा, । प्रजा जालियाती दशगुणा । मग उपजली कामना । अर्थाची तेथें. ॥ ३९ ॥ कन्या, पुत्र अपार, । पोष्यातें न पुरे घर; । अन्नवस्त्राची मरमर । ते होंचि लागली. ॥ २१४० ॥ स्वल्प, रूक्ष, अळंवणी । अन्न भक्षी भोजनीं, । पुरे स्त्रीपुत्रालागूनि । ऐसी वासना. ॥ ४१ ॥ अनुपपत्ति देखोनि घरीं । क्रोधु उपजे स्त्रीशरीरीं, । मग तो तया भर्तारावरी । वाजता होये. ॥ ४२ ॥ पुरुषातें म्हणे वनिता, । 'पुरे हा संसारु आता. । दरिद्रदोषाची व्यथा । अगारजाळी. ॥ ४३ ॥ प्रजोत्पत्तीचे पुरती । दक्षता तुमतें आथी, । परंतु अर्थु पाहिजे हें चित्तीं । धराचिना. ॥ ४४ ॥

पुत्रांतें लाडवणें । हेचि विश्रांति तुम्हां मानें. । परि मागतील तेव्हां देणें । मांस काय ? ॥ ४५ ॥ भक्षावया नाहीं अन्न, । शरीरां उघडियां आच्छादन; । ऐसें कैसें पां मन । कठिण तुमचें ? ॥ ४६ ॥ कठिण बोलतांही परी । विषादु नुपजे शरीरीं. । उरली नाहीं उरी । उणिया बोलांची. ॥ ४७ ॥ कन्या जालिया लग्न, । तिया गंगेमाजी लोटाना ? । पुत्रां अन्नचि मिळेना, । मग विवाह कैंचे ? ' ॥ ४८ ॥ ऐसें शंकितां परोपरी, । देखोनि, अनुभवूनि शरीरीं, । अर्थकामु तयावरि । अपारु उपजला. ॥ ४९ ॥ देवा । अर्थहीनाचें जिणें, । तयाहूनि गोड मरणें. । उपवास देखावे करणें । बालकांचे ? ॥ २१५० ॥ देवा ! दे, गा, दे अर्थु, । पाहिजे तितुला पदार्थु. । दिवारात्रौ दुश्चितु । अर्थकामु जो. ॥ ५१ ॥ ऐसा अर्थकामें व्यापला, । क्रिया अपेक्षू लागला, । पापा पुण्याचा कांटाळा । साडिला मनें. ॥ ५२ ॥ चान्ही वेद अभ्यासिले, । शास्त्रांचे समह केले, । योग्यता दावी वाचाबळें । चाडा अर्थाचिया. ॥ ५३ ॥ तेणें नव्हे अर्थसाधन, । मग उद्यमावरि घाली मन. । बैल मेळवी, कोंकण । वाहों अपेक्षी. ॥ ५४ ॥ आयास करितां अपार । आंगींचें नव्हे दरिद्र, । मग तें सांडी मुसार; । करी चाटेपण. ॥ ५५ ॥ सातही वार भ्रमण, । उभें उभेंचि करी स्नान । । सध्यावर्जितु भोजन । शीघ्र संपादी. ॥ ५६ ॥ स्नानाचाही अभाओ, । वैश्वदेवा नाहीं ठाओ, । दिवारात्रौ उपाओ । ऐसा करितां, ॥ ५७ ॥ विसावा न मिळे घडीवरि, । मग खोटाचि आचरे शरीरीं; । लाभापरीस आशा भारी । भोळयाचीं. ॥ ५८ ॥ तथापि तें न तुटे दरिद्र. । आतां कैसा म्हणे रिघों घर ? । स्त्रीपुत्रादिकें मरमर । करितील कीं. ॥ ५९ ॥ मग साडूनि उद्यमातें । सेवाव्यापारीं प्रवर्ते. । नीचांचे पदरक्षातें । हातीं धरी. ॥ २१६० ॥ मस्तक ठेवी चरणीं, । दासत्वाचे भाव आणी, । तेथें निजाचारकरणी । विसरला ते. ॥ ६१ ॥ उगाळ हातीं झेली, । ऐसीही सेवा केली, । परंतु नाहीं फळली । अर्थकामें तया. ॥ ६२ ॥ देखे सेंदुराचा दगडु, । वाटेचा पिंपळु, वडु, । हिंवरुतरडि प्रचडु । तांदळा हो. ॥ ६३ ॥ नावेक तेथें बैसोन । भावें करी अराधन; । दे, देवा ! मातें, धन । अपार, ऐसें. ॥ ६४ ॥ नाना

देवांची उपासना, । आगम शोधी नाना, । तथापि रुकाविस्वा मिळेना, । बटी पोफळ. ॥ ६५ ॥ मग तस्करांमाजी मीनला, । अनाचारीं प्रवर्तला; । ययापरी नाशला । कामिकु पुरुषु. ॥ ६६ ॥ नाना कर्में करी देहीं, । आचारें सुटला अवघेनही. । मरण पावे, तया नाहीं । निवारण मग. ॥ ६७ ॥ मरणीं शरीर पडलें, । शुभाऽशुभ कर्म उरलें; । पोष्यांचें मुख चुकलें । सांपडेचिना. ॥ ६८ ॥ महर्पि यावे वोळगणे, । भांडारीं चौदाही रत्नें, । मनुष्यभाग्य तें केसणें । स्वर्गाहूनि. ॥ ६९ ॥ सर्वा यज्ञीं भोक्तेपण, । कर्म करावें मदर्पण, । ऐसें भाग्य असाधारण । तें पां साधावें. ॥ २१७० ॥ सुरा असुरांचा नियंता, । सर्वत्र मी एकचि कर्ता, । ऐसा पुरुषार्थु तो आतां । साधावा कीं. ॥ ७१ ॥ कर्मयोगवळें येणें । येसणें श्रेष्टत्व जैं पावणें, । तैं तें सांडूनि पराधीनपणें । भ्रमावें कां? ॥ ७२ ॥ देवतामय तें शरीर, । अमृतपान निरंतर, । विपयभोग अपार । इंद्रपदीं तये. ॥ ७३ ॥ देवांचेनि ईश्वरपणें । लोकेश्वरत्व भोगणें, । मानव्यें महीक्षतें येणे । राज्यें पुरे. ॥ ७४ ॥ ऐसा स्वर्गु पुरुपार्थ मानूनि । तत्पर जे कीं, धनुःपाणि, । ते आपणां म्हणविती ज्ञानी; । परंतु कैसे? ॥ ७५ ॥

अविपश्चितः

कवण पां माझें स्वरूप? । करीं पुण्य कीं पाप? । फळ सुखद कीं दुःखरूप । यया कर्माचें? ॥ ७६ ॥ ऐसें जयां कांहीं न कळे, । ते डोळस न म्हणावे, आंधळे; । वनीं वनचर दीपले । फांसीं पडती. ॥ ७७ ॥ कवण नित्य, अनित्य; । कवण सत्य, असत्य; । ऐसें चुकोनि याथातथ्य । जाणणें तें. ॥ ७८ ॥ दोपें घेतलिये दृष्टी । आभासु उपडे, गा, किरीटी. । तेथें आसक्ति ते खोटी । वाउगीचि. ॥ ७९ ॥ स्वप्नींचें देखोनि भान । तयाचां ठायीं साचपण । मानिजे, तें काये ज्ञान । कीं मूढपण, गा? ॥ २१८० ॥ डोळे पसरूनि पाहे । तो गर्भांधु देखे काये? । म्हणौनि जाणीव ते नोहे, । नेणीव खरी. ॥ ८१ ॥ निमिपांधकारीं भासलें, । तें चांदिणें नव्हे कांहीं केलें; । जाणपण वायां गेलें । तदंग जें. ॥ ८२ ॥ मयोरपत्रांचे हरिलें । नयन, ते आपुले केले, । रत्नें पारखूं आले । मूर्ख जैसे. ॥ ८३ ॥ अधें पाहिला दर्पणु । तैसा तो वहिर्मुखु जनु. । तया मुर्खासमानु । दुसरा

नसे. ॥ ८४ ॥ मृगजळाचे सागर । तरतीं, ते काय पोहणार? । खडकीं आदळे शरीर । घालितां उडी. ॥ ८५ ॥ अर्जुना, जो आपणां नेणें, । नेणोनि 'मी, मी,' ऐसें म्हणे, । तया मूर्खाचें जाणणें । क्षणें मानीं तू. ॥ ८६ ॥ ईश्वराचें मुळीं अज्ञान । पूजी तरुवर, पाषाण, । देवताचक्र सगुण । मायिक अथवा, ॥ ८७ ॥ तया मूर्खाचिये जाणिवे । जाणतीं कैसें मानावें? । जाणपणाचा स्वभावें । तो वावुगा चाळा. ॥ ८८ ॥ सत्यें येकें वाचून । अनवेंचि जाणें भान; । मग तदग सपादी ज्ञान । प्रापंचिक. ॥ ८९ ॥ तो आत्माज्ञानी पामरु, । मूर्ख मूर्खांचाही गुरु; । व्यर्थ वाचेचा व्यापारु । तयाचिये. ॥ २१९० ॥

वेदवादरताः

ऐसें जाणत जाणत । अज्ञान वेदवादीं रत; । ब्राह्मण पठण तेंचि तत्व । ज्ञान मानिती जे. ॥ ९१ ॥ अहो वेदवादी तो ब्राह्मणु, । येरु तो शूद्रासमानु, । स्पर्शो नये अन्नलक्षणु । सन्यासीही. ॥ ९२ ॥ वेदपाठचि ब्रह्मज्ञान, । वेदचि मोक्षाचें साधन, । वेदवाक्य तेंचि प्रमाण, । अप्रमाण येर. ॥ ९३ ॥

ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत । यावज्जीवमग्निहोत्रं जुहुयात् । अग्नीषोमीयं पशुमालभेत् । यज्ञो वै विष्णुः । इंद्र ज्येष्ठानि कर्माणि धत्ते । तमेन वेदानुवचनेन । एप पन्थाः ।

इत्यादिकें वेदवचनें । तीं मानूनिया प्रमाणें । तर्कु घेती जाणपणें । मूर्ख जे कीं. ॥ ९४ ॥ धर्मशास्त्रीं अति भरु । मानोनि वरी दढतरु । परमार्थु मानिती आचारु । शरीराचा. ॥ ९५ ॥ प्रत्यक्ष, अनुमान, उपमानें, । शब्दु, यीं सारिखींचि प्रमाणें. । येक येकाचेनि प्रयोजनें । नव्हे बळवत. ॥ ९६ ॥ प्रत्यक्षा दृश्याकारणें । कायिसीं तीं आप्तवचनें? । अंध तें अंध, आनें । रूपें न घडे. ॥ ९७ ॥ क्षुधा लागली कीं नाहीं, । हें कवणा पुसणें कायि? । गुडघा ते नव्हे डोई, । प्रत्यक्ष जो. ॥ ९८ ॥ असोनि ऐसें वर्तमान, । शब्देंवीण न मानिती प्रमाण. । नेघती पदार्थाचें अभिधान । प्राकृतें शब्दें. ॥ ९९ ॥ यये अर्थी प्रमाणा । इतिहास असती नाना; । परतु कथा येकि सुजाणा । सांगैन मी. ॥ २२०० ॥ धर्मपुरी नामें येकु ग्रामु. ।

तेथें धर्मात्मा द्विजु उत्तमु, । परम सात्त्विकु, निःकामु, । वसत असतां, ॥ १ ॥ तयातें देहपातु आरंभला, । नाडीं ठावो सांडिला, । तेणें काळें तो जाला । करिता काये ? ॥ २ ॥ दोघे पुत्र आणि स्त्री । तयातें समीप पाचारी, । येकयेकांचां पदरीं । घाली मोहें. ॥ ३ ॥ तें देखोनि ममत्व गहन, । समस्तांचे गहिवरें मन; । अवघींचि करिती रुदन, । ऐसें आरंभलें. ॥ ४ ॥ मग क्षणा येका व्यवधानें । वचन केलें ब्राह्मणें । तुम्हीं येकें येकाकारणें । ह्मणें सोडा. ॥ ५ ॥ आणिक एक करावें, । विद्याहीन तुम्हीं न व्हावें, । माझें नाम राखावें, । हे माझी वासना. ॥ ६ ॥ तें आइकोनि पितृवचन । तिघींही वाइली आण, । 'आम्ही तिघेही प्राण । येकें येकांचे.' ॥ ७ ॥ इतिला निश्चयो करूनि । पिता गेला देह सोडूनि; । मार्गीं आश्रमु तिघीं जणीं । चालविजतु असतां, ॥ ८ ॥ पुत्रांचीं जालीं लग्नें, । आश्रमीं नांदती पांचही जणें. । बुद्धि आगळी दिनेदिनें । जाली पुत्रांची. ॥ ९ ॥ तेहीं विचारिलें मानसीं । अमुतें विद्या होये कैसी ? । पाळावें तिये आज्ञेसि । पितयाचिये. ॥ २२१० ॥ पुनः पुनः हेचि संकल्प, । दिवस क्रमिले अमुप, । मग येके दिवशीं साक्षेप । दोघीं केले. ॥ ११ ॥ अंतःकरणीं विचारूनि । विद्याभ्यासालागूनि । मातेची आज्ञा घेऊनि । जाते जाले. ॥ १२ ॥ उत्तरे गेला ज्येष्ठु, । दिशे दक्षिणे कनिष्ठु; । संगु पाहोनि उत्कृष्टु । राहिले ते. ॥ १३ ॥ दिवसेंदिवस आगळी । विद्या ते येवोंचि लागली. । ज्येष्ठातें विद्या पूर्ण जाली । तो ग्रामा आला. ॥ १४ ॥ कनिष्ठुही संपूर्ण जाला, । परि विद्यामदें आग्ळा. । मानूं प्रवर्तला विटाळा । प्राकृताचिया. ॥ १५ ॥ नाइके प्राकृत आदरें, । बोले संस्कृतेंचि उत्तरें, । अभ्यासूनि सकळें शास्त्रें । मदा आला. ॥ १६ ॥ विद्या जाली संपूर्ण, । मग ग्रामाकडे प्रयाण । केलें, तंव विघ्न । आरंभलें पंथीं. ॥ १७ ॥ मार्गीं तस्कर आड जाले. । ते हरिती, हा न बोले; । प्राकृत म्हणौनि कांटाळे, । साहे घाये. ॥ १८ ॥ नागवूनि चोर पळाले, । ब्राह्मणें मनीं विचारिलें, । तस्करीं वित्त हरिलें । काये किजे ? ॥ १९ ॥ आतां मुखशांप करावे, । तेणें शीघ्र धांवणें पावे; । ऐसें विचारूनि जीवें । प्रवृत्ति करी. ॥ २२२० ॥ मग जाला विचारवंतु, । नये करूं स्वराघातु; । प्रणवु तो स्वयें अनंतु, ।

नादरूपी. ॥ २१ ॥ अकारें वासुदेवो बोलिजे, । तयावारि आघातु कैसा कीजे ? । वासुदेवातें न् दंडिजे । सर्वथैव. ॥ २२ ॥ आकारीं करावा आघातु, । तरि तो चतुराननु विख्यातु; । ईकारु विचारि घेतु । तंव ते लक्ष्मी. ॥ २३ ॥ इकारें कामु विख्यातु, । तोही लक्ष्मीचा अंकितु, । करूं नये आघातु । तयावरि. ॥ २४ ॥ उकारें शंकरु त्रिनयनु; । ऊकारें साधुत्वाचा गुणु; । देवमातामयु, सानु । ऋकारु नव्हे. ॥ २५ ॥ सर्वधातुमयु लृकारु, । करूं नये तयाचा मारु; । भूतवधु समग्रु । केला होये. ॥ २६ ॥ एकारें विष्णु सर्वोत्तमु; । ऐकारें शिव परमु; । ओकारें कमलासनु, । तो कैसा धमावा ? ॥ २७ ॥ औकारें तो अनंतु, । सचराचरीं सर्वगतु, । परमात्मा अच्युतु । पीट्टचि नये. ॥ २८ ॥ अंकारें परब्रह्म; । तें दंडिता पाप परम. । अःकारें पुढती नाम । त्रिनयनाचें. ॥ २९ ॥ ययापरी सकळ स्वर । देवरूपाचि ते हें साचार. । पीटितां अपराधु, पाप थोर । आंगा वाजे. ॥ २२३० ॥ आतां वेगळे ययां स्वरां । वर्ण जे असती मात्रा, । तयांचिया निर्धारा । करूनि पाहतां, ॥ ३१ ॥ ते स्वरींचि वर्ण भरले, । अतेव देवतामय सर्व जाले; । आने पर्खे अवलोकिलें, । तंव ते कैसे ? ॥ ३२ ॥ कादि क्षपर्यंत वर्ण । देववाचकचि ते सुलक्षण; । आतां करावें पीटण । तयातें कैसें ? ॥ ३३ ॥ कीं वाग्वादिनी मंत्रबीज । देवांचीं वीर्यें सहजें; । नादब्रह्म तें पीटिजे । कवणे अंगें ? ॥ ३४ ॥ ऐसा करिता विचारु । शंखा न दिसे आधारु. । मग क्षणा एका अंकुरु । उपजला बुद्धीचा. ॥ ३५ ॥ स्वरहीनें जीं व्यंजनें । व्यक्तें न स्फुरती वर्णगुणें, । तयातें सुखें पीटणें, । दोषु नाथी. ॥ ३६ ॥ अभिधानें ना तीं बीजें, । स्वरविरहितें सहजें. । *मोटका आरंभु कीजे । तंव व्याकरणें स्मरे. ॥ ३७ ॥ यया शब्दाचें* साधन । तें कैसें आहे, म्हणौन । विचारीं घालितां मन । आधारु न सांपडे. ॥ ३८ ॥ पकारु ना हा फकारु, । बकार ना केवळ मकारु, । वर्णु कवणु, निर्धारु । हाचि नलगे. ॥ ३९ ॥ असंस्कृतु शब्दु जाणोन । विचारीं प्रवर्तलें मन, । अबद्ध हें शंखाचें स्फुरण । कैसें करावें ? ॥ २२४० ॥ ऐशी चिंता सोशितां । दिनु गेला, विचारु करितां; । तव आन येकु स्फुर-

ता। विवेकु जाला. ॥ ४१ ॥ नि शब्दु शखु करणे । काये चाड तेथ व्याकरणें ? । आणि प्राकृतभाषेचीं दूषणें । नलगती आगीं. ॥ ४२ ॥ मोटका आरंभु करावा, । तव येक आठवलें जीवा. । प्रमाणातरें शोधावा । विचारु हा. ॥ ४३ ॥ सविकल्प शखकर्ते । पूर्वी बहुसाळ होते, । परतु निर्विकल्पे वोवेतें । प्रमाण नाथी. ॥ ४४ ॥ वेद, वेदार्थ, पुराणें, । स्मृति, निबध, आर्यवचनें, । निर्विकल्पा यथाकारणें । नेदिती आधारु. ॥ ४५ ॥ ऐसा क्षणेकु विचारीं पडे, । तव आठवलें जालें येक फुडें. । केलेनि येणें प्रचडें । प्रत्यवायो करणु ? ॥ ४६ ॥ तयेही अर्थी चाळना । करिता, दोपुही तेथ दिसेना. । मग सदेहोचि मना । कवळिता जाला. ॥ ४७ ॥ क्षणेकु माने करावा, । क्षणेकु माने शब्दु न करावा, । ऐसा सदिग्धभावो जीवा । कवळी प्रहरेकु. ॥ ४८ ॥ मग निश्चयातें धरूनि, । आगीं सत्व आणूनि, । मोकळेन मनें शखध्वनी । प्रवर्तता जाला. ॥ ४९ ॥ निर्विकल्प करिता आत्राटण, । क्रमेंचि सरलें रात्रिमान. । मार्गी चालती पाथजन । ऐसें प्रकाशलें. ॥ २२५० ॥ सभवता मिनला पाळा, । अपूर्व जालें पाथा सकळां, । मग तो वृत्तातु स्थळास्थळा । ग्रामातरा गेला. ॥ ५१ ॥ आसिपासींचे पाहों आले. । ते बोलविती, तो न बोले. । प्राकृत आइकोनि काटाळे, । उत्तर नेदी. ॥ ५२ ॥ मग दोघीं चौघीं उचलिजे, । ग्रामामाझारी आणिजे, । तेथेंही न बोले सहजें । प्राकृता वचनीं. ॥ ५३ ॥ तव कव्हणें एकें प्राकृतें । 'चुः' शद्बें धेनूतें । हाकिलें, आपुलेनि मतें । स्वाभाविक. ॥ ५४ ॥ तो आइकोनि शब्दु श्रवणीं । झोंबिनला तया चरणीं. । पुडतोपुडती आलिंगूनि । करी हास्य. ॥ ५५ ॥ याचें स्वाभाविक बोलणें । संस्कृतावारीं नेलें तेणें. । 'चु' 'शब्दें तयाकारणें । चोरु मानला. ॥ ५६ ॥ जन पूसती शूद्रातें. । हें वर्तमान साग आमुतें. । तो म्हणे, 'मी यथातें । जाणेंचिना.' ॥ ५७ ॥ नाना उपायें पुसती; । तो परिहारी, ये काकूळती. । दोघा येक स्थानीं बैसनिती । नागरिक ॥ ५८ ॥ ऐसियाचेनि संगें । शहाणयाही वेड लागे. । तया शूद्राहीपुढें मागें । बैसले लोक. ॥ ५९ ॥ तयामाजी आणिकु । पुसता जाला कव्हणी येकु. । भले मा, तुम्ही हा लोकु । वेडा केला.

॥ २२६० ॥ पूर्वी, तुम्हां नाहीं भेटी । तरि कां येणें धरिली घांटी? । आतां आहे तसी गोठी । उगेचि सांगा. ॥ ६१ ॥ 'घं'कार पडतां श्रवणीं । विप्र उठिला तेचि क्षणीं । धांवोनि लागला चरणीं, । झोंबों गळया. ॥ ६२ ॥ होये 'होये हा शाहणा, । द्विजु दावी हातें, खुणा । अपूर्व वाटलें तें जनां; । वैसविला तोही. ॥ ६३ ॥ 'घं'कारु बोलिजे हननीं । आणि घर्घराटाचां स्थानीं; । संस्कृतें तो तें मानी, । नेणती येर. ॥ ६४ ॥ घोपें गर्जतचि आले, । मातें भय उपजलें. । मग शस्त्र काढूनि हालें, । ऐसे साचार. ॥ ६५ ॥ एवं तिसरया तयातें । लोक म्हणती, 'सांग निरुतें.' । येरु म्हणे, 'मी येथें । आतां होतों. ॥ ६६ ॥ नाहीं आइकिला हा श्रवणीं, । आतां देखिला नयनीं, । आण प्रमाण येथूनि । देईन मी तुम्हां.' ॥ ६७ ॥ ऐसें देखोनि भयभीत । जन जाले पैं समस्त. । 'प्रकारु कवणु पां येथ । आरभला'? म्हणती. ॥ ६८ ॥ 'प्र'कार आइकतांचि श्रवणीं, । प्रशब्दें तो पंथु मानी. । मार्गी नागविलें होये म्हणौनि । शब्दें हुंकारला. ॥ ६९ ॥ वेगें उठूनि उभा ठेला. । तयाही सन्मुखु चालिला. । तें देखोनि पळ सुटला । नागरिकांतें. ॥ २२७० ॥ नगर हालवलें समस्त. । बाळकें तेही भयभीत. । ययापरी उद्वस समस्त । पांढरी पडली. ॥ ७१ ॥ येक म्हणती, "नव्हे माणुसु, । यिये ग्रामसीमे प्रवेशु । करूंचि नये." ॥ ७२ ॥ पांथ राती धावती, । येक ते मार्गु सांडिती. । ब्राह्मणु विचारी चित्तीं । कैसें करणें? ॥ ७३ ॥ तयां तस्करांचें गान्हाणें । कवणाप्रति आतां देणें? । मनुष्य नाडळे पथे येणें । दिवारात्री. ॥ ७४ ॥ मार्गीचा विटपु विस्तीर्णु । तयावरि वळंघला ब्राह्मणु. । अवलोकी येतां जातां जनु । दुरूनियां. ॥ ७५ ॥ तंव प्रसगें तेणें सुपंथें । वन्हाड झालें येतें । तें देखोनि तया विटपातें । अत्यंत मनोरम, ॥ ७६ ॥ ग्राम येसणा, विस्तारु, । पर्वता ऐसा थोरु, । शीतळछाया तरु, । तळीं उदक. ॥ ७७ ॥ तें देखोनि संतोपले; । वन्हाडी, विश्रांति पावले; । विचारु करिते जाले । थोर थोर. ॥ ७८ ॥ अहो हा ग्रामु उद्वसु. । येथें असे एकु राक्षसु. । तयाचा केवळ वेषु । मनुष्या ऐसा. ॥ ७९ ॥ ब्राह्मणु आणि मौनी, । निःशब्दें हातु हाणे वदनीं. । हुंकारशब्दें करूनि । ये रोपावेशा. ॥ २२८० ॥ धांवोनि ये आगावरि, । मग

आपणां ऐसें करी; । अथवा खवळे तैं संहारी । माणुसातें. ॥ ८१ ॥ येणें मार्गे येती, जाती, । ते दिवसा मार्गु न चालती; । निशिमानीं बोलांडिती । ग्रामु तें हा. ॥ ८२ ॥ ऐसे वर्तमानी आथी, । तरि येक करावें बहुतीं; । भय धरूनि चित्तीं । राक्षसाचें. ॥ ८३ ॥ येथेंचि दिवसु क्रमावा, । मग रात्रीं पंथु चालावा; । तंव समस्त म्हणती बरवा । विचारु ऐसा. ॥ ८४ ॥ अहो, वडिलांचें हेंचि करणें; । बुद्धि सानयां उपदेशणें, । तेंहीं तयांची करणें । आज्ञामात्र. ॥ ८५ ॥ तरि तुम्हीं सांगितला जो मंत्रु, । तोचि समस्ताचा विचारु; । ऐसें बोलोनि भारु । उतरिला स्वारियांचा. ॥ ८६ ॥ माध्यान्हिक कर्म सारिलें, । भोजनादिक संपादलें, । तेणेंचि व्यवसायें पावलें । अस्तमान सूर्याचें. ॥ ८७ ॥ मोटकी जाली झांझडां, । निघावयाची करिती तांतडी, । तंव तेचि वेळा, तेचि घडी । काये वर्ततें जालें ? ॥ ८८ ॥ तिये ग्रामींचे जन । चौर्य करिती देहरक्षण, । मार्गी पाहती सधन । मनुष्य येते, जाते; ॥ ८९ ॥ तेहीं तें वऱ्हाड देखिलें, । अपारा सामग्रिया भरलें; । मग तयावरि मीनले । तस्कर ते. ॥ २२९० ॥ भारु स्वारियांचे संयोगिले, । वऱ्हाडी सिद्ध जाले, । तंव तयांवरि येऊनि पाडिले । अवचटें चोर. ॥ ९१ ॥ झळझळितें शस्त्रें देखोनि । पळ घेतला ब्राह्मणीं । येकांतें मार्गु झडकरूनि । सांपडेचिना. ॥ ९२ ॥ येक ते पडोनि राहिले, । झाडीं झुडपीं लपाले; । येक ते हातीं सांपडले, । यातना भोगिती. ॥ ९३ ॥ भागले हरितां तस्कर । उदंड जाले भार; । तंव दुरावले वऱ्हाडी येर, । तेंहीं शख केले. ॥ ९४ ॥ महाशंखाचेनि श्रवणें । वृक्षाग्रस्थें ब्राह्मणें । हुकारा दिधला अतिमानें । योग्यतेचा. ॥ ९५ ॥ ब्राह्मणु विचारी अंतःकरणीं, । येंहीं आघातिला जो ध्वनि । तो देवतामयु, म्हणोनि । अयोग्य हें. ॥ ९६ ॥ प्राकृत शब्द चोरांचे । हरण साच काये यथांचें ! । उगेंचि सोडिलें हातींचें । वित्त, पाहा. ॥ ९७ ॥ सनाद केले मुखशंख, । ब्राह्मण होत्सांते महामूर्ख, । अशास्त्रज्ञ लोक । ते हे ऐसे. ॥ ९८ ॥ कवणु शब्दु, कवणु धातु, । कैसा साधे, कैसा अर्थु, । कांहींचि नेणती पंथु । योग्यतेचा. ॥ ९९ ॥ तस्करीं हरिलें म्हणोन । समासांत शंखध्वन । परंतु अवैदिक म्हणौन । विस्वर गेलें. ॥ २३०० ॥ करपृष्ठें संपादिती, । एवं निबंधीं ज्ञान नाथी. ।

अहो, निर्णयो कैसा आथी । धर्मशास्त्रें येणें ? ॥ १ ॥ यज्ञादानादि सकळ
क्रिया । करतळें विधु विप्रां ययां । आणि करपृष्टें आरंभु ययां । शंखां करिती.
॥ २ ॥ ऐसें पूर्वी आम्हां घडलें, । तेंच आम्हीं निर्णीत केलें. । सकळां मतीं
उतरलें । आमुचें कर्तव्य. ॥ ३ ॥ अवैदिक, अशास्त्रज्ञ, । वैयाकरण-
ज्ञानहीन, । विधनिषेध, अनुसंधान । नेणती कांहींचि. ॥ ४ ॥ ऐसे मूर्ख
तारावे । तरि लागेल आतां उपदेशावें. । निःशब्द शंख दावावे । करूनियां.
॥ ५ ॥ ऐसें विचारूनि मानसीं, । हुंकारें वारूनि तयांसि, । निर्विकल्पा
शंखासि । प्रारंभु केला. ॥ ६ ॥ वन्हाडियां आणि चोरांतें । राक्षसभय
पूर्वींचि होतें. । तेंहीं आइकोनि हुंकारातें । विसरले वैर ॥ ७ ॥ अववेचि
वरुते पाहती, । तंव देखिली त्याची मूर्ति । मुख.पिटी दोहीं हातीं ।
निर्विकल्प. ॥ ८ ॥ आवेशाहूनि आवेशु । देखिला राक्षसाचा रोपु ।
भयकंपु असमसासु । उपजला सकळां. ॥ ९ ॥ पूर्वीं तस्करीं देखिला ।
होता, तैसाचि दृष्टी पडला. । 'होय होय' म्हणती, 'आला । राक्षसु हा.'
॥ २३१० ॥ सांडूनि शस्त्रें, वस्त्रें, । तस्कर पळाले दिगंतरें. । 'प्राण
वांचले थोरें । प्राचीनें' म्हणती. ॥ ११ ॥ वन्हाडीं जैसा आइकिला, ।
तसाचि हृदयीं ठसावला. । 'तेणेंचि आकारें देखिला । होये' म्हणती.
॥ १२ ॥ देखोनि तस्करांचें चिन्ह । सत्यचि जालें तें दाटून. । भयें
झांकोळलें मन । पथु न कळे. ॥ १३ ॥ पायातें आढिया वेंगडी, । मुखीं
वळे मौन बोबडी, । हृदयीं धकधक केवढी, । ते काये सांगों ? ॥ १४ ॥
येक म्हणती, 'घोडें, घोडें.' । येक म्हणती, 'पळा पुढें; । मागें पात्रलें
बिरडें । राक्षसांचें.' ॥ १५ ॥ झाडें झुडपें देखती । तितुलेंही तेचि मानिती. ।
पळतयापाठीं धांवती । दिसे ऐसें. ॥ १६ ॥ येक म्हणती 'कंठाळी.' ।
येक म्हणती, 'ते जळाली. । आम्हीं धोकटी सांडिली । अळंकारांची.'
॥ १७ ॥ येक सांभाळिती कुमरें; । येक पाहती वधुवरें; । येकीं
सांडिलीं वस्त्रें । धोत्रेंसीं पळती. ॥ १८ ॥ येक निखळ दिगंबर, ।
शंकामुक्त जाले नर. । स्त्रिया सांवरावे पदर । विसरलिया तें.
॥ १९ ॥ येक पाहती बैसोनि, । तंव झाडें राक्षस भासती नयनीं; ।
निर्धारु करिती मनीं । सत्यत्वाचा. ॥ २३२० ॥ चाळतया सवें

चालती, । धांवतया सर्वे धांवती, । उभया सर्वे ठाती । तटस्थें तीं. ॥२१॥ ऐसीं खुसुपें देखोनि, । हातींचें सिद्ध मूर्खजनीं । वित्त तेथेंचि सांडोनि, । देती धांवा. ॥ २२ ॥ उजेडे तंव पळाले, । स्थळांतरप्रति गेले, । बोलती चोरीं हरिलें । आमुचें सर्वस्व. ॥ २३ ॥ सर्व हरिलें तस्करीं, । पळतां इतुलयावरि । अनंत राक्षस आम्हांवरि । उठिले झाले. ॥ २४ ॥ चोरां हातींचे सुटलों, । राक्षसांपासूनि वांचलों, । जाणों पुढती जन्मलों । मातेचां उदरीं. ॥ २५ ॥ गेल्याचें नाहीं दुःख, । प्राणें वांचलों हेंचि सुख; । तें वृत्त आइकोनि लोक । भयचकित जाले. ॥ २६ ॥ पुनः पुनः पुसती. । " अहो, राक्षस देखिले किती ? " । तंव येर म्हणती, " पंक्ति । अनंता देखिलिया. " ॥ २७ ॥ " प्रत्यक्ष देखिले नयनीं ? " । पुसिजत असतां ऐसें जनीं, । अवघेचि आणा वाऊनि । भाषा देती. ॥ २८ ॥ आतां कैसें वसावें ? । भय घेतलें लोकांचेनि जीवें. । मग देशुचि अवघा स्वभावें । उद्वसु जाला. ॥ २९ ॥ केवळ मार्गु न चले. । अरण्य भयंकर वाढलें. । व्याघ्र, रीस, वसों लागले । तये ठायीं. ॥ २३३० ॥ चुकोनि येकाधा जाये, । तो श्वापदां वरपडा होये. । प्राणें वांचों न लाहे, । ऐसें जालें. ॥ ३१ ॥ श्वापदांचेनि मुखें मेला, । तो मानिती राक्षसीं घेतला; । यापरी सत्य निश्चयो जाला । देशोदेशीं. ॥ ३२ ॥ ऐसें इकडे वर्त्तलें; । तंव राक्षसाकडे काये जालें ? । तें सांगिजत असे वहिलें, । चित्त देइजो ॥ ३३ ॥ विप्रु उतरला वृक्षावरूनि. । मनुष्यमात्र न देखे नयनीं. । द्रव्य सकळ सांडूनि । पळोनि गेले. ॥ ३४ ॥ मग तीं अश्वें पालाणितु, । स्वारियांवरि भार वातु, । घेऊनि निघाला त्वरितु । गावामाझारी. ॥ ३५ ॥ गांवामाजिची सामग्री । हेही जाली तयावरि; । तेणें शरीरनिर्वाहातें करी । ब्राह्मणु तो. ॥ ३६ ॥ कवणे येके दिवसीं । ब्राह्मणु विचारी मानसीं. । माझें भय ययां लोकांसि । किंनिमित्त पां ? ॥ ३७ ॥ दर्पणीं पाहे रूप, । तंव तें यथापूर्वस्वरूप; । पूर्वगुणांचे लोप । कांहींचि न देखे. ॥ ३८ ॥ मग आपणुचि हास्य करी. । म्हणे, " मूर्खत्व हेंचि शरीरीं. । आपणांपासीं सामग्री । अपार ग्रंथांची. ॥ ३९ ॥ तेथें विचारून करणें. । दर्पणीं काय पाहणें ? । शब्दां ऐशीं प्रमाणें । आनें दुजीं ? "

॥ २३४० ॥ मग निबंध सोडिले, । वर्णेवर्ण अवलोकिले, । कारण कोठेंचि नाडळे । आत्मभयाचें. ॥ ४१ ॥ निघंट पाहे पुडतोपुडती, । शास्त्रें आणी प्रतीतीं, । पुराणें सरलीं, संस्कृतीं । कारण नसंपडे. ॥ ४२ ॥ मग भरंवसयाचा वेदु, । तयाचा आरंभीं अनुवादु. । अर्थूनि पाहे शब्दु, । कारण नसंपडे. ॥ ४३ ॥ वैयाकरणयुक्तिवळें । बोले जें मती आकळे; । परंतु आंगीं भयदत्व नाडळे । कोठेंचि तें. ॥ ४४ ॥ ऐसा श्रमोनि उगा ठेला. । क्षणा येका तें विसरला; । आतु येकु आठवला । विचारु तेथें. ॥ ४५ ॥ दैवदत्त हे सामग्री । अपार माझा घरीं. । ययाचीं भोक्तीं सोइरीं । आणूंना कां ? ॥ ४६ ॥ इष्टमित्र जे जे येती, । तयां उदडें मदिरें आइतीं. । कृषिधर्मी संपादिती । आपुलाले निर्वाह. ॥ ४७ ॥ शक्तीं ग्रामु सुखें करणें, । कृषि अशक्ताकारणें, । येरही व्यापार तेणें गुणें । बहुसाल चालती. ॥ ४८ ॥ देशुचि आपुला भिन्न, । ऐसा तो नादैल स्वजनु. । असो आता अनुमानु । नसे ये अर्थी. ॥ ४९ ॥ मनुष्य पाठवूं पाहे, । तंव तें दृष्टी पडों नये. । ग्रामीं ना देशीं सोये । द्विपदा नराची. ॥ २३५० ॥ विचारी आपुलां मनीं. । मनुष्य न दिसे नयनीं. । आतां हा देशु सांडोनि । जावें अन्य देशा. ॥ ५१ ॥ मग तेथूनि येकाधा वेगवतु । ब्राह्मणु अथवा दूतु । पाठवावा त्वरितु । देशा आपुलिया. ॥ ५२ ॥ ऐसा विचारु मानला; । मग सामधि करूं लागला; । वन्हाडियांचा पालाणिला । थोरला अश्वु. ॥ ५३ ॥ तींचि वस्त्रें, ते अलंकार । अपूर्व लेइला समग्र. । धनुष्यबाण, हातियेर । घेतलें सर्वे. ॥ ५४ ॥ सर्वे प्रथांची सामग्री । आणि येती जाती सिदोरी । घेऊनि निवाला बाहेरि । वेगत्तरु. ॥ ५५ ॥ सांडिला ग्रामु आणि ते सीमा, । अरण्या उल्लंघीतु परमा, । आला वसतिया देशा, ग्रामा– । उतरला बाहेरि. ॥ ५६ ॥ पाणवथां वैसला निवांतु. । आतां विचारावा दूतु ; । तंव तो जनु प्राकृतु, । संस्कृत नेणे. ॥ ५७ ॥ तेथें कव्हणासीं कांहीं बोलणें, । हे चाड सांडिली मनें. । दृढें वाचेचेनि मौनें । ध्यानस्थु ठेला. ॥ ५८ ॥ सभंवते मिळाले लोक. । पाहती टकमकां त्याचें मूख. । मौन देखोनि सकळैक । म्हणती, 'योगी.' ॥ ५९ ॥ योगी म्हणौनि निर्धारिती, । तंव शास्त्रसंग्रहो देखती; । विद्वांसु म्हणौनि म्हणती ।

कन्हणी येक. ॥ २३६० ॥ विद्वांसु ऐसा सिद्ध केला, । तंव शास्त्रसंग्रहो दृष्टी पडला; । धनुष्यबाणवंतु कल्पिला. । क्षेत्री काये ? ॥ ६१ ॥ क्षत्री तरि कां हें ध्यान ? । योगी तरि कां धनुष्यबाण ? । यापरी संदेहा कारण । जालें लोकांसि. ॥ ६२ ॥ ग्रामामाजी वार्ता गेली. । तेथूनि मांदी अपार आली. । अपूर्वता पाहों लागलीं । सानीं, थोरें. ॥ ६३ ॥ मग तयांमाजी ग्रामस्थां । पूर्वीचा वन्हाडी येकु होता; । चोरीं नागविला बहुतां । समागमें जो. ॥ ६४ ॥ तेणें अश्व आपुलें । मवांचि दूरूनि वोळखिलें. । हातु घालूनि धरिलें, । न धरितां शंका. ॥ ६५ ॥ अश्व घेऊनि त्वरितु । जेथें तो होता ध्यानस्थु । तेथें आला, हातु । घालावया. ॥ ६६ ॥ तंव आपुलींचि कर्णभूषणें, । माळाआदि सर्व लेणें; । तें सर्व देखोनि तेणें । गजांबु केला. ॥ ६७ ॥ हात घातले अंगावरि, । परि तो उत्तर न करी. । " प्राकृतेंसीं, " विचारी, । ' कैसें बोलावें ? ' ॥ ६८ ॥ लोक म्हणती, " काय जालें ? " । वन्हाडियें पूर्ववृत्त सांगितलें. । " आम्हां तस्करीं नागविलें । होतें पूर्वीं, ॥ ६९ ॥ तेंचि हें माझें सकल वित्त; । अश्वआदिकरूनि येथ, । ययापासीं. समस्त । चिन्ह उमगलें. ॥ २३७० ॥ येर पुसती ध्यानस्था. । तंव तो न वोले सर्वथा । निर्धारु उपजला समस्तां । तस्करु ऐसा. ॥ ७१ ॥ धनुष्यबाण हे सामग्री, । वरि वेषु मैदापरी; । ग्रंथ दावूनि मोहरी । माणुसातें. ॥ ७२ ॥ ध्यानस्थु देखों यावें, । ग्रंथ आइकोनि बैसावें, । यापरी मनुज विश्वासावें, । ऐशी भाव. ॥ ७३ ॥ पासिला हाणे शस्त्रें, । दूरिला विंधे तीरें, । ऐसा चोरु परि अभ्यंतरें । महामायकु. ॥ ७४ ॥ बोलितें उत्तर न दिसे, । मग मौन आणिलें पहा कैसें ? । घाय साहे, परि, ' मी नव्हें, ' ऐसें । न बोले वचन. ॥ ७५ ॥ इतुल्यावरि उचलिला, । हातीं पायीं जनीं धरिला, । राजसभे आणिला. । तस्करु म्हणती. ॥ ७६ ॥ सभानायक बोलविती. । 'तूं कवणु ?' ऐसें पुसती; । तथापि तो नेघे चित्तीं । प्राकृत वचन. ॥ ७७ ॥ संस्कृताचि आइकावें, । संस्कृतेंचि उत्तर द्यावें, । प्राकृतें सर्वथा न व्यवहारावें, । ऐसें अपेक्षी. ॥ ७८ ॥ न बोले देखोनि तस्करु, । मग करूं लागले मारु. । कैसा साहेल द्विजवरु । सात्विकु तो ? ॥ ७९ ॥ हातीं पायीं धरिला, । मग तो चौपद्रा केला, । काळांचा

हातीं पडला, । लागले मारू. ॥ २३८० ॥ फोक, चर्म, दंड तामस । आंगीं वाजती असमसास; । परि प्राकृतें शब्दें 'इस्स' । ऐसें न म्हणे. ॥ ८१ ॥ उताणा, पालथा वळतु, । मौनेंचि आळेपिळे देतु, । परंतु न धरी तिये सांगातु । प्राकृते वाणीचा. ॥ ८२ ॥ प्राकृतें शद्बें बोळवितां । म्हणे, "ययासि उत्तर देतां । ययां मूर्खांसीं समानता । होईल आपणां." ॥ ८३ ॥ होईल! तरि हो मरणें, । परि प्रतिष्ठा आपुली वांचवणें. । संस्कृतेंवांचूनि न बोलणें । बोळवितां ही. ॥ ८४ ॥ ऐसा मानूनि निर्धारु, । प्रतिष्ठाकामु तो द्विजवरु । आंगीं साहे मारु । तस्करपणें. ॥ ८५ ॥ त्वचा नाशो अघवी, । परि मानीं प्रतिष्ठा राहवी. । नाशिका जाये तरि बरवी, । परि प्रतिष्ठा राहो. ॥ ८६ ॥ करांचा हो सुखें छेदु । आणि श्रवणां दोहींचा उच्छेदु, । परंतु प्रतिष्ठा राहो. शब्दु । प्राकृतु नेघें. ॥ ८७ ॥ ऐसें मानूनि मानसीं । साहे केळिये यातनेसि. । प्रतिष्ठाअप्रतिष्ठेची राशी । जोडि जोडी. ॥ ८८ ॥ शरीराकडे पाहे. । म्हणे, " हें जालें काये? । ऐसिये यातने आहे । कोठें प्रमाण? ॥ ८९ ॥ अबाधित माझें वचन, । अष्टविध जाणें वैयाकरण, । वरि वेदशास्त्रपुराण । निर्णीत असतां, ॥ २३९० ॥ प्राकृतें येणें बाधावें, । ऐसया देह योग्य नव्हे; । परंतु घडे, हें मानावें । सत्य कीं मिथ्या? ॥ ९१ ॥ अमान्य मानवतें मानितां, । तेणेंसीं होये समानता; । मग मानहानि ते तत्वता । अपाडावी. ॥ ९२ ॥ मक्षिकेचा चरणघातु । अप्रतिष्ठे नव्हे हेतु; । मानिजे तैं मानवंतु । अमानु पावे. ॥ ९३ ॥ जळचराचें पायवणी । जाणता कव्हणी मानी? । तैसी मूर्खांची करणी । मानूं नये. ॥ ९४ ॥ ऐसें मानूनि मानसीं, । गर्वें न बोले तयांसि, । न पाहे, दृष्टि ऐसी । काणी करी. ॥ ९५ ॥ बहुसाळ पीडिला देखोन । कांटाळले सभासद जन, । म्हणतीं, " पहा, कठिणपण । कैसें! ययाचें!" ॥ ९६ ॥ आतां इतुल्यावरि मारणें, । तें केवळ प्राणु घेणें. । मा शूळावरि बैसवणें । हेंचि कां न कीजे? ॥ ९७ ॥ तंव समस्त म्हणती, "बरें. । आतां हेंचि इतुल्यानंतरें. । सुळीं घाला साचोकारें । उभाचि हा." ॥ ९८ ॥ ऐसा निर्धारु करूनि, । शूळ आणिला तासूनि, । तयाचां खांदीं देऊनि ।

मिरविते जाले. ॥ ९९ ॥ माथा सेंदुरें डंवरिला, । गळां पुष्पांचिया माळा, । अपूर्व पहावया लागला । समागमें जनु. ॥ २४०० ॥ न वोले बोलवितां वचन, । न करी देवाचें स्मरण, । यासि आलें मरण, । साच नमनी. ॥ १ ॥ ग्रामाबाहेरि काढिला, । मरणभूमिके आणिला, । तंव ग्रामस्थां ब्राह्मणां उपजला । महाभेवो. ॥ २ ॥ अहो, हा तस्करु साचोकारें, । परंतु ब्राह्मणु हें तंव खरें; । ब्रह्महत्या येणें प्रकारें । ग्रामावरि. ॥ ३ ॥ ब्रह्महत्येचेनि पातकें । कवणाचें होईल निकें ? । आतां हें सर्वथा चुके । ऐसें करावें. ॥ ४ ॥ ब्राह्मण अवघे मीनले, । राजसभेप्रति आले, । नाना प्रकारीं बोधिलें । कर्तयातें. ॥ ५ ॥ एक म्हणती, "अवधारा. । अभय देतां तस्करा, । वरपड होइंजे सागरा । पापाचिया." ॥ ६ ॥ तयां हे देती उत्तर. । "अहो, ते अन्य यातीचे तस्कर, । हे ब्रह्महत्या; धर्मशास्त्र । निवारूं न शके." ॥ ७ ॥ ऐसां संदेहीं पडिले, । तंव एक आठवलें. । तेंचि समस्तां मानलें. । "करा," म्हणती. ॥ ८ ॥ ययाचें छेदावें घ्राण । आणि खांडावे दोन्हीं श्रवण, । उजवें मणगट घेऊन । मोकळा करावा. ॥ ९ ॥ ऐसें विचारूनि समग्रीं । तयातें पाचारिलें झडकरी. । तेथें ग्रामाचिबाहेरि । घेतलिया कला. ॥ २४१० ॥ डावा पावो, उजवा हातु, । दोहीं कानांचा संघातु, । घ्राणदेशु त्वरितु । घेऊं आरंभिला. ॥ ११ ॥ मोटकें छेदन करावें, । तंव येक आठवलें स्वभावें. । यया ब्राह्मणातें मारावें । उपायें येकें. ॥ १२ ॥ हत्या न पडे ययाची । आणि केली घडे स्वभावेंचि, । ऐसा प्रेरु येकुचि, । अवधारा पां. ॥ १३ ॥ येथूनि ब्राह्मणु हा न्यावा, । राक्षसवनीं सोडावा, । अथवा ठाके तैं घालावा । तया ग्रामाआंतु. ॥ १४ ॥ नातरि तये वटवृक्षासि । नेऊनि बांधावें ययासि. । हा घेइजैल राक्षसीं, । संदेहो नसे. ॥ १५ ॥ ऐसा विचारु कराल । तरि हा वधिला होईल; । आणि ब्रह्महत्या चुकैल । आम्हांवरची. ॥ १६ ॥ ऐसें येकीं उपदेशिलें, । तें वचन सकळां मानलें. । काय कारिते जाले । तयावरि ते ? ॥ १७ ॥ पालाणूनि अश्वातें । विचारिती जंव भृत्यातें, । तंव राक्षसस्थळ समस्तातें । ठावेंचि असे. ॥ १८ ॥ प्राणावरि आलेंहीपरी । अंगिकारु कव्हणी न करी. । शूद्रु, ब्राह्मणु, भिकारी । कव्हणी नवचे. ॥ १९ ॥ मग दुर्बळ, विदेशी,

पांधु, । जो नेणे राक्षसांचा वृत्तांतु, । तो सांपडता जाला अकल्पितु । तेणेंचि क्षणें. ॥ २४२० ॥ वित्त देऊनि तयातें । त्वरितु दीधला सांगातें. । झणें कळे ययातें । ऐशी आशंका. ॥ २१ ॥ मार्गी लागले दोघेजण, । लंघिती वन, उपवन. । क्रमेंचि ग्रामसीमा टाकून । आनंदते जाले. ॥ २२ ॥ ग्रामीं प्रवेशला द्विजवरु, । विस्मितु जाला शूद्रु. । उद्वसु ग्रामु समग्रु । देखोनियां. ॥ २३ ॥ पारि तेणें कवणा पुसावें? । ब्राह्मणु न बोले स्वभावें. । मग क्षणा येका अघवें । विसरला तो. ॥ २४ ॥ ब्राह्मणु विचारी मानसीं । आतां नये सोडूं यया ग्रामासि. । यत्नें रक्षावें प्राणासि । आपुलिया ययां. ॥ २५ ॥ आतां सर्वाचें कारण । कैसें भेटतें स्वजन ? । तयां हें माझें पुण्यस्थान । कळे अंगें कवणें ? ॥ २६ ॥ ययाचि भृत्याकारणें । कांहीं वित्त देणें, । आपुलिया ग्रामा पाठवणें । त्यांचिये शुद्धी. ॥ २७ ॥ सहजचि हा विदेशी, । भ्रमणशीळ, प्रवासी; । प्रसंगें जाणें ययासि । तियेचि दिशे. ॥ २८ ॥ यया विनाशाचें कारण । लाभुचि जाला म्हणौन, । संतोषवी आपुलें मन, । तंव येक आठवलें. ॥ २९ ॥ येणेंसीं प्राकृत बोलावें, । हें नीचत्व कवणें सहावें ?। ययातें नये स्वभावें । संस्कृत जें. ॥ २४३० ॥ इतुलें मानसीं विचारूनि । उगाचि ठेला मौनी. । दूतु निघाला तेथूनि । आपुलेनि पथें. ॥ ३१ ॥ तो विदेशीं नित्य भ्रमतां, । उदारार्थी शूद्र तत्त्वता । जाला तीर्थयात्रा करिता । भिक्षावृत्तिपर. ॥ ३२ ॥ ऐसें वर्तमान असतां, । विप्रग्रामीं काये व्यवस्था । वर्तली, ते आतां कथा । सांगिजैल. ॥ ३३ ॥ ज्येष्ठ बंधु ग्रामीं होता. । तयातें उपजली चिंता. । मग तो बैसवूनि माता । विचारु करी. ॥ ३४ ॥ पुत्रु म्हणे जननीतें, । "दिवस लागले बंधूतें. । घेतलें माझेन येणें चित्तें । जाणें शुद्धी." ॥ ३५ ॥ माता म्हणे, "रे कुमारा, । तो येकु गेला, तूं दुसरा; । मागां मी यया शरीरा । केंवि राखों ? ॥ ३६ ॥ अवश्य तुवां शुद्धी जाणें । परि मातें नाहीं राहणें. । सांगातियें संसारें येणें । आम्ही इतुलींचि. ॥ ३७ ॥ कवणाचा ग्रामु, देशु, । गृह, आश्रमु, पशु ? । सकळा संसाराचा कळसु । दोघे मातें. ॥ ३८ ॥ तयाचें बोख देखोन । तूं तंव न येसी परतोन; । मग माते प्राणधारण । कैसें करवैल ? ॥ ३९ ॥ येक आयुष्य तिघांचें; । मरणें झणें हो वियो-

ागाचें. । संगती जाणें संतोषाचें । मातें मानें. ॥ २४४० ॥ सुना घाळूनि माहेरीं, । आम्हीं जावें शुद्धीवारीं. " । तो शब्दु जिव्हारीं । लागला दोघींतें. ॥ ४१ ॥ सुना म्हणती, " मामी, । ऐसें झणें विचारा तुम्ही. । राहणें नाहीं आम्हीं । तुम्हां वेगळें. ॥ ४२ ॥ तुम्हां तिघां येकि गति, । येकु प्राणु, येकि मूर्ति, । वरवें तरीचि परतीं । आम्हीं देखावीं. ॥ ४३ ॥ वाइटें पर्खे नाहीं येणें, । मग आम्हीं कैसा प्राणु ठेवणें ? । विचारूनि पहा मनें । आपुलेनि. ॥ ४४ ॥ प्राण गेलया शरीर । जैं हें राहेल साकार, । तरीचि तुम्हांमागें हें घर । आम्हीं वसवूं. ॥ ४५ ॥ तुमतें बंधन मोहाचें । परंतु नव्हे स्वधर्माचें. । आम्हां असे दोहींचें, । सुखाचें तिसरें. ॥ ४६ ॥ सांगातें दोघींतें नेणें, । नातरि विष देऊनि जाणें, । मना मानेल तें करणें । इतुलयावरि. " ॥ ४७ ॥ एव एकमेकांचां पदरीं । झोंबों लागलीं ययापरी; । कव्हणी कव्हणातें दूरी । राहों नापेक्षी. ॥ ४८ ॥ मग पुत्र म्हणे मातेतें, । " अवघींचि जाऊं सांगातें. । भिक्षावृत्ति देहातें । रक्षण करूं. ॥ ४९ ॥ थोडाचि पंथु चालणें, । श्रमु होतांचि राहणे, । ऐसेनि प्रकारें येणें । भ्रमों महीमंडळ. " ॥ २४५० ॥ ऐसें वचन आइकोनि । अवघींचि संतोषलीं मनीं. । क्रमेंचि सामग्री करूनि । वाटा लागलीं. ॥ ५१ ॥ सांडूनि ग्रामु, ग्रामसीमा, । देशु आणि ते महिमा, । पाल्टूनि रूपां, नामां, । भ्रमण करितें. ॥ ५२ ॥ येक देखोनि श्रमित । अवघेंचि राहती तेथ; । प्रीतीचें भरितें बहुत । म्हणौनिया. ॥ ५३ ॥ त्रासलींही परी । येक न कोपे येकावरि. । दिशा भ्रमती ऱ्यान्ही । येणेंचि प्रकारें. ॥ ५४ ॥ मग कित्यां येकां काळां । तो ग्रामु तयां उमगला, । विद्याभ्यासु होता केला । जेथें तेणें. ॥ ५५ ॥ मग तयाचिया आश्रमाप्रति । चौघेंही जालीं जातीं. । पुनः पुनः पुसती । तयाचें वृत्त. ॥ ५६ ॥ मग ते सांगती ब्राह्मण. । तयाचें रूप, अभिधान, । गोत्र, ग्रामु, स्वजन, । जें आइकिलें होतें. ॥ ५७ ॥ तें आइकोनि बोलणें, । अवघेंचि आलें खुणे. । आनंदलीं अंतःकरणें, । पुनः पुसती. ॥ ५८ ॥ आतां सांगावें झडकरूनि । तो कोठें आहे म्हणौनि. । उतावेळें मनीं । समान चौघें. ॥ ५९ ॥ ब्राह्मण बोलती, " अवधारा. । विद्याभ्यासु केला पुरा; । मग तो येथूनि येकसरा । गेला आपुलया ग्रामा. ॥ २४६० ॥

अमुका दिवसु, मासु, । संवसरु, काळविशेषु, । सांगते जाले उद्देशु । ग्रामाचा तया. ॥ ६१ ॥ आइकोनि तें समग्र । पाहती संवत्सरें संवत्सर; । तंव दिवस जाले अपार, । शुद्धि नाहीं. ॥ ६२ ॥ निजग्रामा यावया । इतुके काळ कां तया । लागावे, म्हणौनि वरवया । कारण न दिसे. ॥ ६३ ॥ दुःख वाटलें बंधूतें. । तेणें सावरिलें आपणातें. । दुःखिता देखोनि मातें । अधैर्याचीं हीं ॥ ६४ ॥ अवधींचि देती प्राणु, । म्हणौनि सांवरिला निज मनु. । धैर्यवचनींकरूनु । संबोधी येरा. ॥ ६५ ॥ आम्हीं केलें तें किती भ्रमण ? । अद्याप देश असती आन । मवांचि तयाचें ज्ञान । होईल आम्हां. ॥ ६६ ॥ अवधींचि मनीं खोंचलीं । परंतु तद्वचनीं धैर्य राहिलीं; । गेली जीवनकळा परतली । अमृतें जैसीं. ॥ ६७ ॥ पुढती करिती भ्रमण. । न रुचे उदक, अन्न; । तव माता बोले वचन । तेणें पुत्रेंसीं. ॥ ६८ ॥ "बा रे, तुवा चिंता न करणें. । आम्हीं पालवीं बाधिलीं मरणें, । परतु देह सांडावे भ्रमणें । उद्देशें तयाचिया." ॥ ६९ ॥ स्त्रिया बोलती वचनें. । "जैं निघालों चौघे जणें । तैंचि समर्पलों प्राणें । ऐसें जाणा. ॥ २४७० ॥ ऐसेयावरि भ्रमता । आमुतें काइसी चिंता, । प्राणविमुक्ता प्रेतां, । पुनर्मरणाची ? ॥ ७१ ॥ तद्दर्शनामृतपानें । मृतां आम्हां पुनः जीणें; । अन्यथा सत्य मरणें, । तें पूर्वींचि पावलों." ॥ ७२ ॥ ऐसें येकमेकां धैर्य देती. । सांगातु कव्हणी न सोडिती. । श्रमु नमनूनि भ्रमती । देश, नगरें. ॥ ७३ ॥ तीं कव्हणें येके देवस्थानीं । राहिलीं असतां निसिमानीं, । तेथें तो शूद्रु तये क्षणीं । वसों आला. ॥ ७४ ॥ तयांचिपासीं तो उतरला । शूद्रु, जो मागां कथिला, । विप्रासमागमें गेला । राक्षसग्रामा. ॥ ७५ ॥ तो पुसे तयातें. । " कोठूनि येणें तुमतें ? " । तीं सांगती निरुतें । ग्रामाचें नाम. ॥ ७६ ॥ रिकामा अवकाशु फावला, । म्हणौनि सर्व वृत्तातु सागितला. । तया शूद्रातें आठवला । ब्राह्मणु तो. ॥ ७७ ॥ आइकोनि तयाचें वर्तमान, । शूद्र बोले वचन. । " माझें उदरार्थ भ्रमण, । वरि तीर्थयात्रा. ॥ ७८ ॥ भ्रमतां बहु काळ गेले, । सांप्रत अपूर्व देखिलें, । अमुके ग्रामीं वर्त्तलें, । तेंचि आइका. ॥ ७९ ॥ चोर म्हणौनि धरिला । ब्राह्मणु, बहुत मारिला; । परि तो नाहीं बोलिला । कव्हणेंसीं कांहीं. ॥ २४८० ॥ मग तया सुळीं

घाळावें, । तंव ग्रामक रिघाले आटवे. । वांचवूनि तयातें जीवें । सोडिला वनीं. ॥ ८१ ॥ अश्वावरि घाळूनि, । मार्ते समागमें देऊनि, । सोडिला उद्वसे वनीं, । महाभयंकरें. ॥ ८२ ॥ भयंकर अवघें वन, । माजी उद्वस येक गव्हाण; । तेथें म्याचि सोडून । दिधला तो पुरुषु; ॥ ८३ ॥ परि तो तेथें सुखें आहे । अनुमानें ऐसें जाणवों ये. । स्वस्थळीं नरु राहे, । तैसा तो तेथें ॥ ८४ ॥ आइकोनि वचन शूद्राचें,। प्राण परतले चौघांचे. । पुडतोपुडतीं तयाचें । रूप पुसती. ॥ ८५ ॥ शूद्र सांगे खुण. । "नेणें" म्हणे, 'मी अभिधान; । तयातें नित्य मौन । म्हणौनिया." ॥ ८६ ॥ रूपाचिया खुणा येती; । परतु मौन कां? ऐसें मानिती. । वोसे ग्रामीं वसती । किंनिमित्त तया? ॥ ८७ ॥ ऐसे रात्रिमान क्रमलें, । झांजड झांजड उजेडलें, । शूद्रें मनीं योजिलें, । करणें प्रयाण ॥ ८८ ॥ तव तीं विचारिती मानसीं, । आता कवणे जाणें दिशेसि ? । तंव वासना होती मानसीं । येकिचि चौघां. ॥ ८९ ॥ जेथें तो असे द्विजोत्तमु । तो ठावो जऱ्ही दुर्गमु, । तऱ्ही पाहवा मनोधर्मु । ऐसा स्फुरे. ॥ २४९० ॥ पुत्रु म्हणे मातेतें, । "जाऊं ना कां चौघें तेथे?। वाधी सशयो मनातें, । फेडावा तो. ॥ ९१ ॥ भ्रमणें काळु क्षपावा, । हा सिद्धांतु आथी बरवा; । तरी तो ठावो न पहावा, । ऐसें कासया?" ॥ ९२ ॥ माता म्हणे. "रे कुमरा, । ऐसेंचि ये माझया विचारा." । स्त्रिया म्हणती, करा । हाचि निर्धारु ॥ ९३ ॥ देशु उद्वसु, वरि वन, । आम्ही नेणों ग्रामखुण, । तया मार्गाचें ज्ञान । होये कैसेन ? ॥ ९४ ॥ पुरुषु म्हणे, " अवधारा. । सांगातें घेऊं यया शूद्रा- । सवें मार्गाद्दा वरा । पथु जाणता. ॥ ९५ ॥ कर्णमात्रा यया देणें, । मृत्या ऐसा हा करणें, आमुचेनि संन्निधानें । असावा हा. " ॥ ९६ ॥ निर्धारु करूनि ऐसा, । शूद्राचा घेती भरवसा. । तव तो वांधला अर्थाशा, । 'बरें' म्हणे. ॥ ९७ ॥ काढूनि कर्णीचें सुवर्ण, । तयाचां करीं तें देऊन, । निघतीं जालीं तेथून । वेगवत्तरें. ॥ ९८ ॥ सवें मार्गु चालती; । श्रमलीं, श्रमु नमनिती; । देशदेशांतरें लंघिती । चौघेंही तीं. ॥ ९९ ॥ मग तया देशा आलीं. । भयंकर वन प्रवेशलीं. । शंका मरणाची गेली, । भीतीचि ना ॥ २५०० ॥ दुरूनि देखिला ग्रामु, । संतोषला समस्तांचा मनोधर्मु. ।

आजिचा दिनु उत्तमु । कैसा म्हणती. ॥ १ ॥ ग्रामामाजी प्रवेशलीं, । तया मंदिराप्रति आलीं; । तंव तेथें देखतीं जालीं । तया ब्राह्मणाते. ॥ २ ॥ दृष्टी पडतांचि वोळखिला. । मातेनें पुत्र आलिंगिला. । बंधु बंधूनें कंवळिला. । शंकली स्त्री. ॥ ३ ॥ समस्तें करिती रुदन, । परंतु तयातें मौन. । बंधु अवलोकूनि तें चिन्ह । बोलता जाला. ॥ ४८ ॥ "बहुता काळांचीं भेटी । आणि तूं न करिसी जे गोष्टी, । तें प्रीति नाहीं पोटीं, । जाणवे ऐसें. ॥ ५ ॥ प्रीति नसावया कारण । काय घडलें आम्हांपासून ? । तेंचि एक साच वचन । बोल पां, गा. ॥ ६ ॥ बहुसाल भाग पडला, । हाही प्रसंगु नाहीं घडला. । तुवां कांटाळा घेतला. । भेटीचा कां? ॥ ७ ॥ मातेहूनि, अवधारीं, । दुर्लभ नाहीं ससारीं, । नव मास आत्मोदरीं । वाहिलें जिया. ॥ ८ ॥ आतां प्रीतीचेनि वचनें । तीचा तो श्रमु न हरणें, । तें पात्रभूत नरकाकारणें । कैसें न होइजे ? ॥ ९ ॥ मरणकालीं पितृवचन, । करीं पां तयाची आठवण. । आज्ञाभंगाचें कारण । मौन हें तुझें. ॥ २५१० ॥ कंठीं धरूनि प्राणातें, । शरीर समर्पून श्वापदांतें, । न मनून आलया मरणातें. । क्लेशां वरि पडल्या, ॥ ११ ॥ शीतोष्ण साहिलें शरीरीं, । चौघें आलों ययापरी. । भेटि जालिया दूरी । होईल श्रमु, ॥ १२ ॥ ऐसी वासना चित्तीं । आमुतें जे कांहीं होती, । ते वायां गेली, पुडती । श्रमुचि वाढला. ॥ १३ ॥ माता पावोनि खेदातें । वचन न बोले येथें. । कवण तप हें तूतें । फळा येईल ? ॥ १४ ॥ मातृपितृद्रोही जाण, । तयाचें मुखावलोकन । करितां, पाप दारुण । कर्तयासि. ॥ १५ ॥ तूं न बोलसी वचन, । आम्हीं न करूं तुझें अवलोकन; । ऐसिया कार्य-कारण, । तेंचि अवधारीं. ॥ १६ ॥ पितृद्रोहो तुझां शरीरीं, । तुजसीं करितां आम्हीं मैत्री, । तेंचि पाप आम्हांवरि । येऊनि पडेल. ॥ १७ ॥ इतुलयावरि न बोलसी, । तरि मैत्री काये, सांग, तुजसीं ? । जीकारितां पितृलोकासि । अंतर पडे." ॥ १८ ॥ इतुलें बोलोनि निवांतु । ज्येष्ठु ठेला तटस्थु; । तथापि येरु गर्वितु, । वचन न बोले. ॥ १९ ॥ मानसीं मानी ऐसें, । " मीचि येकु धन्यु असें ! । प्राकृतें काय माणुसें ? । श्वापदें मानावीं. ॥ २५२० ॥ माता, पिता ना ज्येष्ठ बंधु; । परि अयोग्यांचा पुरे संबंधु, । कव्हणी येकु ऋणानुबंधु ।

होता ययांसीं. ॥ २१ ॥ रत्नें सांठविलीं पेटिये । तीं काये सोइरीं होती तिये ? । याति याती मिळों नये । म्हणौनियां. ॥ २२ ॥ भूसा, कणवट यां कारण । येकचि बीज सनातन; । तथापि यातिगुणें भिन्न । स्वभावेंचि. ॥ २३ ॥ घृता गोमय सोइरें, । घडे हें कवणें विचारें ? । ययांसीं बोलतां, चतुरें । आम्हा शंकिती. ॥ २४ ॥ कंथठखुरडीचें काइ ? । घृता, तका मिळणी नाहीं. । रसा, चोपे काये कांहीं । संबंधु असे ? ॥ २५ ॥ आमुचें संस्कृत बोलणें, । ययांचें प्राकृत अनुवादणें, । ऐसेनि भेदें येणें । हीं काये आमुचीं ? " ॥ २६ ॥ ऐसें विचारूनि मानसीं । कनिष्ठु न बोले ज्येष्टेसीं. उभयशरीरीं प्रीतासि । आश्रयो तुटला. ॥ २७ ॥ मग अप्रीतीचेनि गुणें । ज्येष्ठु बोले वचनें. । " चिन्ह जाणितलें अनुमानें । तुझें आम्हीं. ॥ २८ ॥ साध्य नाहीं जया विद्या, । तेणें आश्रयावी अविद्या, । जीचेनि गुणें वंद्यां । वंद्य होइंजे. ॥ २९ ॥ जया हृदयीं नाहीं ज्ञान, । तेणें धरावें वाचे मौन; । ना तरि विद्याहीनें । तेणेंकरूनि महिमान । कांहीं उरे. ॥ २५३० ॥ आणावीं मुक्तांचीं चिन्हें. । कांहीं प्रतिष्टा तेणें गुणें । राहे शरीरीं. ॥ ३१ ॥ मौन, मुद्रा, आसन, । अथवा आणावें विकळपण. । नव्हे ऐसें प्रतिवचन । द्यावें कांहीं. ॥ ३२ ॥ कां शांति आणावी शरीरीं, । उदासीनता ज्ञानाकारें, । समता जैसी योगेश्वरीं । आश्रयिली असे. ॥ ३३ ॥ सेवावें अटव्य वन, । मोहावें कापव्यें जन, । वाउगेंचि धरावें ध्यान, । साहवें दुःख. ॥ ३४ ॥ निर्लज्जपणें शब्दु साहिजे, । क्षणक्षणा हास्य कीजे, । इतुलेनिचि भोगिजे । महत्व जनीं. ॥ ३५ ॥ मूर्खामाजी महंती । आणितां आयासु नाहीं; । परंतु चतुरां मानें, ते रीति । दुर्गम, बापा. ॥ ३६ ॥ तुवां वसविलें वन । आणि धरिलें वाचेचें मौन, । धरितासि धारणा, ध्यान । ते मायिक मुद्रा. ॥ ३७ ॥ विद्याहीनाचीं चिन्हें । शोभविती तुजकारणें. । सर्वज्ञतेचेनि अभिमानें । क्षणें फुंज. ॥ ३८ ॥ आमुचिया वचना प्रमाण । नैय्यायिकमतें आथी, जाण. । सावधान करीं अंतःकरण, । सांगिजैल. " ॥ ३९ ॥ ऐसें वचन बोलोनि । अनुमानखंड तेथूनि । आरंभिलें, तें श्रवणीं । पडिलें तया. ॥ २५४० ॥ संस्कृत आइकोनि वचन । उठिला वेगेंकरून; देता जाला आलिंगन । ज्येष्टा बंधूतें. ॥ ४१ ॥ शास्त्राचिया युक्ती । संस्कृ-

तेंचि दोघे अनुवादती; । तेथ परस्परां प्रतीती । आली योग्यता. ॥ ४२ ॥ चौदावसानीं मऱ्हाटी । पुसतां व्यवस्था, सुखगोष्टी, । मिठी घातली वोंठीं, । न बोले येरू. ॥ ४३ ॥ ज्येष्टा जाणवलें चिन्ह, । हा न बोले संस्कृतें-वांचून, । मग प्राकृत तें सांडून । दिधलें तेणें. ॥ ४४ ॥ सस्कृतेंचि पुसे, वृत्तांतु, । पूर्वसमाचार समस्तु, । प्रीतियोगाचा अत्यतु । भावो परतला. ॥ ४५ ॥ मार्गी तस्करीं हारिलें, । तें वृत्त कथन केलें. । तयावरि जें वर्त्तलें । ग्रामाआंतील. ॥ ४६ ॥ आगा आलें राक्षसपण, । तयाचें कळलें कारण. । लोक पळाले ग्रामातून । तेंही कळलें. ॥ ४७ ॥ विटपाजवळींचा वृत्तांतु । तो सांगितला समस्तु. । द्रव्यादि पदार्थ गांवांतु । सर्व आणिले. ॥ ४८ ॥ म्हणे, 'भोगितां सुख सुखाड । तुम्हावीण नलगती गोड. । धरूनि भेटीची चाड । प्रेत्न केला. ॥ ४९ ॥ तेणेंचि विपरीत जालें. । मी प्राकृतेंसीं न वोलें, । तस्करत्व आंगा आलें । तऱ्ही परतु. ॥ २५५० ॥ अपार यातना केली, । मग घाल्रावया नेलें सुळीं, । हातीं पायीं काळ-घेतली । शस्त्रें खांडावया. ॥ ५१ ॥ नाक्त कानावरि आलें । होतें, तें अरिष्ट चुकलें, । पुडतीं हें येणें काळें । देखिलें स्थळ. ॥ ५२ ॥ अपार भोगिली अवकला, । परतु अभिमानु जो आपुला । तो वरवयापरी रक्षिला । गौरवेसीं." ॥ ५३ ॥ ज्येष्ठ बोले वचन. । "गेलें असतें आजि प्राण; । मग अभिमानु, लज्जाधन । तें काय उरतें" ? ॥ ५४ ॥ कनिष्ठु बोले वाणी. ॥ "प्रतिष्टा काय असे प्राणीं ? । विचारूनि पहा मनीं । ग्रंथीं, ग्रंथांतरीं. ॥ ५५ ॥ उपाधि होता जो घ्राणीं, । तो वरिचा गेला, वांचूनि । छिद्रें उरलीं दोन्हीं । तीं सांडिती श्वासातें. ॥ ५६ ॥ घ्राणोपाधिवराहातें, । पहा, पां काहीं वर्तें ? । आणि कवण कार्य तयातें । छिद्रीं न करवे ? ॥ ५७ ॥ वराहें धरिली धरणी, । हे महत्व तयाचिलागूनि. । आतां सांगा असे घ्राणीं । कैसी प्रतिष्टा ? ॥ ५८ ॥ म्हणौन आम्हीं युक्त केलें, । महत्व आपुलें वांचविलें. । घ्राणोपाधीविण गुतलें । कांहींचि नसे." ॥ ५९ ॥ श्रेष्ठु बोले वचन. । "जाते जै दोन्ही श्रवण, । तरि माणुसांआंतु वदन । कैसें दाखवितासि ?" ॥ २५६० ॥ कनिष्ठु बोले वाणी. । "श्रोत्रसंबधु काये वदनीं ? ॥ येक येकालागूनि ।

भेटताचि नसे. ॥ ६१ ॥ श्रोत्रधर्मु नसे वदना, । वदनधर्मु तयां श्रवणां; । म्हणौनि न दरावया वदना । कवण कारण ? ॥ ६२ ॥ श्रवणां दोहींचा अभावीं । प्रतिष्ठा गेली नमनावी. । दोहीं छिद्रांचा भवीं । उपाधि ते आगळी. ॥ ६३ ॥ पृथ्वी धरिली शेपें. । श्रवणोपाधि तया असे ? । यालागीं उपाधीचेनि नाशें, । न वचे प्रतिष्ठा. " ॥ ६४ ॥ श्रेष्ठु बोले विचारु. । "आजि जाता जैं येकु करु, । तैं तितुलेनि व्यापारु । कैसा चालता ? ॥ ६५ ॥ महत्व जातें समूळ, । मसी भरतें मुखमंडळ, । शरीरसंबंधी सकळ । काय म्हणते ?" ॥ ६६ ॥ कनिष्ठु बोले विचारु, । "गेला असतां येकु करु, । महत्वा नाशु समग्रु । कैसा होईल ? ॥ ६७ ॥ आणि व्यापाराची क्षीणता । ते कां होईल ? पाहतां, । येकु हस्तु जातां । अलंकारुचि तो. ॥ ६८ ॥ सोइरयांमाजी जाऊन । मिरवावें तेंचि भूषण. । जया आथी चतुरपण । तो तें मानील. ॥ ६९ ॥ अमृतापासाव जाला, । अमरलोकीं राहिला, । तो ऐरावति आइकिला । असैल श्रवणीं. ॥ २५७० ॥ येकेंचि शुंडादडें । कायें करी उदंडें. । तया दुजा करु, निवाडें । पहां, कोठें असे ? ॥ ७१ ॥ याउपरी व्यवहारु न कुठे । आणि महत्व आंगीं उमटे, । ऐरावतींसी घटे । समानत्व जैं. ॥ ७२ ॥ थोंट दाटूनि दावावें, । ऐरावतित्व प्रकट करावें, । जाणतीं जनीं मानावें । देवमनुष्य तें. ॥ ७३ ॥ आणिक येक भूषण । थोंट म्हणिजे असाधारण. । पुढें करितां शोभन । गजदंतापरी. ॥ ७४ ॥ प्रवाळा ऐसा गजदंतु । तो न शोभे जना आंतु ? । तया गजदंतापरी हातु । पुढें करितां. ॥ ७५ ॥ दोन्ही मणगटें जातां, । मग केवळ आली समानता. । दोन्ही पुढें करितां । साम्यता गजाची. " ॥ ७६ ॥ ज्येष्ठु बोले विनोदु. ॥ "जाता पां तुझा येकु पादु, । तैं सुहृदांमाजी शब्दु । काय सांगावा ?" ॥ ७७ ॥ कनिष्ठु बोले, "अवधारा. । येकु पादु असे तरुवरां. । तयांचिया आकारा । कवणें दूषिलें ? ॥ ७८ ॥ येकपादा महत्व चंदनाचें, । कवणा ये सुरतरूचें, । पारिजातका श्रीमंतकाचें । मनुष्यांमाझारीं. ॥ ७९ ॥ फुकासाठीं तें आलें, । तैं महत्व मानावें आगळें. । देवमनुष्य काय न कळे । पंडितांतें ? ॥ २५८० ॥ ज्येष्ठु बोले वचन, । "केवळ जाते कर, चरण; । तरि मनुष्यांमाजी वदन ।

दानितासि केसें? ॥ ८१ ॥ कनिष्ठु बोले पुडती. । ' अजी, ते आगळी म्हती. । कर, पाद सर्वांप्रति । असती कांहीं? ॥ ८२ ॥ जै मी करपादविहीनू, । तैं सर्वांसीं होतों समानु. । माझें ऐणें त्रिनयनु । करूनि शोभता. ॥ ८३ ॥ विष्णु भजता शेषशायी. । धिग्य जिर्णे जें तैसें नाहीं! । इष्टमित्र मग ते ठायीं । देवचि आमुचे. ॥ ८४ ॥ ज्येष्ठु बोले विनोदीं. । "कैसा घेतला शूळु खादीं? । मिनली जनाची मांदी । तें काय म्हणती, पा? ॥ ८५ ॥ कनिष्ठु बोले बोलणें । "आता तें भाग्य काये सांगणें? । प्रतिष्ठा वाढली बहुगुणें । तये काळीं ॥ ८६ ॥ खादीं शूळ, जाली शूळी, । येक म्हणती, ' चंद्रमोळी.' । शिवेसीं समानता आली । म्हणोनिया. ॥ ८७ ॥ माथा सेंदुर घरबरितु, । येक म्हणती, 'गणनाथु.' । पुढां करूनि हातु । भिक्षा मागें, ॥ ८८ ॥ तें येकदंतु ऐसा दिसे, । मग तेंचि भाविती माणुसें, । अहो प्रत्यक्षा येसणें नसे । प्रमाण दुसरें. ॥८९॥ गळां पुष्पाचिया माळा, । येक म्हणती, 'विष्णु आला.' । कवणीं सुभक्तीं पूजिला । ऐसें भाविती. ॥ २५९० ॥ चर्म निघालें आगींचे, । ते चिन्ह महाभाग्याचें. । केळानारिळे सालींचें । कवण महत्व? ॥ ९१ ॥ सालि कैंची कापुरातें? । तेंविचि त्वचा पानफातें? । एव निजरूप माझें तें । तें प्रकटलें. ॥ ९२ ॥ नागारिकीं परिवारल्या, । बाहेरि जेव्हेळीं निघला, । लोक मानिती आला । राजा विहारिके. ॥ ९३ ॥ बहुसाल असो बोलणें. । तुम्हा वडिलांचें नाम राखणें, । म्हणोनि पडलें करणें । आयासु येसणा. ॥ ९४ ॥ सर्वस्व हातींचें गमवानें, । परतु भानु, महत्व राखानें, । पूर्वजाचें नाव करावें । जतन जैं, ॥ ९५ ॥ म्हणौनि तें आम्हीं केलें, । महत्व यत्नें राखिलें, । जनामध्यें जोडिलें । अभिमानधन." ॥ ९६ ॥ "इतुलें असता घडलें, । महत्व तें कवण राखिलें?" । ज्येष्ठु म्हणे, "बोलें, । सांग पा, गा." ॥ ९७ ॥ कनिष्ठु बोले वाणी. । "न बोलें प्राकृता वचनीं. । महत्व तें येणेंकरूनि । किती सांगावें? ॥ ९८ ॥ संस्कृत वाणी देवाची, । वेदरूपें ईश्वराची । आणि सकळा ऋषेश्वराची । स्वर्गवासियां. ॥ ९९ ॥ तेचि आपण बोलता । तयाची पात्रिजे समानता. । देवमनुष्य तत्वता । होइजे कीं. ॥ २६०० ॥ प्राकृता वाणी बोलणें । मा-

नवीं, मूर्खीं, मूर्खपणें; । वेद, शास्त्र, नेणणें । वैय्याकरण जेंहीं. ॥ १ ॥ आपण तयासीं अनुवादतां । अथवा शब्दें तेणें बोलतां, । तयां पामरांची समानता । आंगीं वाजे. ॥ २ ॥ देखोनि वायसाचिये सभे । हंसें न राहिजे तेथ उभें; । समानता आंगीं शोभे । तयां मूर्खांची. ॥ ३ ॥ कंबळ-पटेसीं जोडिलें, । तें पट्टकूळ मोला तुटलें; । पायांतळीं पडिलें । जनांचिया. ॥ ४ ॥ लसनाचिये संगती । कापुरा दोष लागती; । म्हणौनि हीनाची संगती । सांडिली आम्हीं. ॥ ५ ॥ देवशब्देंचि 'वो' म्हणणें; । देवशब्देंचि अनुवादणें; । मानिती आठही वैय्याकरणें । जया बोला. ॥ ६ ॥ वरि वेद, शास्त्र, पुराण, । निबंध करूनि प्रमाण, । कार्याकार्यी प्रवर्त्तन । नित्य आमुचें. ॥ ७ ॥ ऐसा हा देवमान्यु । यया संस्कृताचा अभिमानु; । तोचि महत्वालागूनु । आम्हीं जोडिला." ॥ ८ ॥ इतुकें आइकोनि बोल्णें । हास्य केलें ज्येष्ठें तेणें. । म्हणे, "ऐसिये सर्वज्ञतेकारणें । दृष्टांतु नसे." । ॥ ९ ॥ ज्येष्ठु बोले मृदें बोलें, । "हा काळुवरि तुझें आइकिलें; । आतां माझारि युक्ति न बोलें, । आइकें उगाचि. ॥ २६१० ॥ अवधारीं, गा सुमति, । शब्दैक्यें समानता येती, । तरि योगी योगाभ्यासें श्रमती । हे पां कासया? ॥ ११ ॥ येकेचि भाषेकरून । व्यवहारती च्यान्ही वर्ण, । मग तयां-चिया भेदालागून । विनाशु कैसा? ॥ १२ ॥ कोकिळे ऐसें काळेपण । वायसु पावला, म्हणौन । वसंतकाळीं गायन । प्रवर्त्तला करूं; ॥ १३ ॥ तंव तो कर्कशु आपला । तोचि शब्दु तया आला, । कीं कांहीं पालटला, । ऐसें साग, पां. ॥ १४ ॥ पयाचेनि वर्णें । तक्रें गर्वु न धरणें. । तें आगळें सहजगुणें । अंतरींचेन गा. ॥ १५ ॥ वज्रा ऐसा सिरगोळा । अथवा तयाहीहूनि आगळा; । परंतु श्रीमंत काये गळां । बांधिती तया? ॥ १६ ॥ कस्तूरी जिंके वर्णें, । कज्जळ कृष्ण अतिमानें; । तथापि चर्चिलें कवणें? । सांग पां तें. ॥ १७ ॥ मनुष्यांचेनि वचनें । पक्षी बोलती, परि, जाणें, । विवेकाचें जें करणें, । तें तेथें दुर्लभ. ॥ १८ ॥ ईश्वरेसीं समानता । ज्ञानेंविण नाहीं सर्वथा. । शब्दु जाणिवेपुढें मांडितां । कैसा होईल? ॥ १९ ॥ सर्वात्मा, सर्वेश्वरु, । तयाचा करितां निर्धारु, । प्रथम शब्दगोचरु, । पदार्थु टाकावा. ॥ २६२० ॥

¹ यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह । नेति नेति । वाङ्न वेद । मनसेवानुद्रष्टव्यम् । मनसैवाप्तव्यम् । नानुध्यायात् बहूञ्छब्दान् ।

इत्यादि वेदवाक्यप्रमाणें । सरले हें जेथ बोलणें, । तेंचि ब्रह्म अनुभवणें । आत्मत्वें निर्विकल्प. ॥ २१ ॥ जेथें इंद्रियें गळालीं, । मनाची स्फूर्ति निमाली, । तरंगापरी विराली । बुद्धि जेथें, ॥ २२ ॥ अवस्थां चहूं ते पर, । तेथें कैचें सरे उत्तर ? । संस्कृत, प्राकृत समग्र । समान वावो. ॥ २३ ॥ व्याहाळा आणि चंदनु, । सारिखेचि जाळी दहनु, । तैसा ज्ञानात्मा परिपूर्ण, । निर्विकल्पु जो. ॥ २४ ॥ कीं नाना तरंग उपजति, । ते कारणींचि जैं सामावति । तैं तेथें भेदु पुडती । तो कैंचा उरे ? ॥ २५ ॥ तेसें निर्विकल्पापासून. । चेतन्यांशें उपजे स्फुरण । तें नादब्रह्म समान, । सर्वत्र सम. ॥ २६ ॥ निर्विकल्पें स्वरूपस्थिति, । माळवे मीपणाची स्फूर्ति, । तेथें शद्बसमूह पुडती । उरेना भिन्न. ॥ २७ ॥ संस्कृत अथवा प्राकृत । जे जे भाषा जेथ जेथ, । ते ब्रह्मात्मस्थिति, समस्त । ब्रह्माची होये. ॥ २८ ॥ शद्बाचेनि, गा, आकारें । चिन्मात्र आत्माचि आकारे, । नानाभाषारूपें स्फुरे । वेगळा जन्हीं, ॥ २९ ॥ निर्विकल्पें स्वस्थिति । प्रासूनि राहे स्फूर्ति । तैं सकळां तसदां शांति । तेथेंचि होये. ॥ २६३० ॥ अलंकाराकारें आकारें । खोटीशकीं सोनेंचि स्फुरे, । तेथें भेदु मानावा विचारें । कवणे आतां ? ॥ ३१ ॥ रूप ब्रह्मचि नादाकारें, । नादु स्फुरे ब्रह्माकारें, । तेथें भाषांचे भेद साचोवरि । न उरतीचि. ॥ ३२ ॥ संस्कृत आणि प्राकृत, । समान ब्रह्मचि महत्, । अथवा निर्विकल्पीं, निश्चित । कांहींचि नसे. ॥ ३३ ॥

ब्रह्मैतद्धि निर्वाणि नामानि बिभर्ति.

ऐसें वेदाचे वचन, । शब्दां ब्रह्मत्व समान, । चतुरांचें सर्वज्ञपणें । एस आहे. ॥ ३४ ॥ म्हणौनि, ब्रह्मात्मविज्ञान, । तें सर्वत्राभेददर्शन, । देवांसीं समानपण । आते देहीं. ॥ ३५ ॥ तया ब्रह्मज्ञानाचिये संप्राप्ती । शद्बें काश कांहीं नाथी, । प्रवृत्ति करूनि अर्थी । आचरिजे क्रिया. ॥ ३६ ॥

ब्रह्मविदाप्नोति परम् । ब्रह्मविद्ब्रह्मैव भवति ।
सर्वं खल्विदं ब्रह्म । एकमेवाद्वितीयं ब्रह्म ।
सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म । प्रज्ञा प्रतिष्ठा प्रज्ञानं ब्रह्म ।
विज्ञानं ब्रह्म । आनंदो ब्रह्म ।
ब्रह्मैवेदमग्र आसीत् । आत्मैवेदमग्र आसीत् ।

इत्यादिकें वेदवचनें । नाना असती प्रमाणें, । शब्दें प्रयोजनु ना श्रवणें । शब्दाचिन. ॥ ३७ ॥ प्रयोजनु शब्दीं नाथी, । तो अर्थज्ञानें कांहीं आती, । तत्वता, ब्रह्मप्राप्ति । गुरुवीण नसे. ॥ ३८ ॥ गुरुमुखें वर्म आइकणें, । मग तो योगु संपादणें, । निर्विकल्पत्वें जाणणें । आत्मत्वे ब्रह्म. ॥ ३९ ॥ आतां ब्रह्मज्ञानाचें साधन । तेंही शाब्दिक नव्हे जाण, । कर्म-भक्ति-योगाभ्यसन । वैराग्यादिक, ॥ २६४० ॥ यज्ञादि क्रिया संपादणें, । तेथें पाहिजे करणें, । बोलचि बोलतां त्राणें । यागु नव्हे. ॥ ४१ ॥ संध्या, संध्या म्हणतां, । संध्या नव्हे, गा, तत्वता; । यागु, यागु बोलतां, । यागु न संपादे. । ॥ ४२ ॥ भक्तीचिया गोष्टी, । ते वाउगीचि तोंडपीटि, । परमेश्वरेंसीं भेटि. । तेणें नव्हे. ॥ ४३ ॥ त्यागाचिया सांगे वार्त्ता, । तो वैरागी नव्हे सर्वथा; । केवळ हातींचिया अर्था । सोडावें कीं. ॥ ४४ ॥ वन म्हणतां वनवासु । साच मानी, तो पशु; । यालागीं विरक्तां त्रासु । बहुसालां बोलांचा. ॥ ४५ ॥ अभ्यासवार्ता सांगती, । तितुलेन योगी न होती, । मनाचें शमन करिती, । तेचि धन्य. ॥ ४६ ॥ व्योमाकार शरीर । आणि भान, हें समग्र । प्रत्यक्ष दिसावें गोचर, । तरीचि योगु. ॥ ४७ ॥ असो, पाकाचिया वार्ता । येकु सांगे, येकु आइकता, । परतु पाकु सिद्ध आइता । दृष्टीं न देखती. ॥ ४८ ॥ भोजन म्हणतां ढेंकरु । दे, ऐसा कवणु नरु ?। पावे शब्देंचि परपारु । महानदीचा ? ॥ ४९ ॥ रोगाचिये निवृत्ती । शब्द प्रयोजना न येती, । आतां तूं आपुली प्रतीति । सांग पां, गा. ॥ २६५० ॥ पादीं कां करिसी गमन ? । शब्देंचि पाव परस्थान; । रूपीं घालावया दर्शन । काजचि नसे. ॥ ५१ ॥ सुखदुःखाचें भोगणें, । शरीरा कां पडे साहणें ? । शब्देंचि होये पारणें. । महासुखाचें. ॥ ५२ ॥ रसनाची चाड कासया ? । रससाधनीं प्रेत्नु वांया. । आतां सांडीं मूर्खपणा तया, । वचन आइक. ॥ ५३ ॥ अवबोधन क्रियेचें । आणि अभिधान पदार्थाचें, । लक्षण कळावें वस्तूचें । इतुलें मात्र ॥ ५४ ॥ शब्दाचें असे कारण; । शब्दु तयाचें साधन; । तथापि भाषे येकीचें प्रमाण । कायि तेथें ? ॥ ५५ ॥ जिया भाषा जें अभिधान, । तियाचि भाषा त्याचें ज्ञान, । येर शब्द अप्रमाण । तये अर्थी. ॥ ५६ ॥ जिया भाषा कळे क्रिया । तेचि कारण तेय

कर्तया; । येरीं अपारा जालिया । व्यर्था होती. ॥ ५७ ॥ पसाराचें काहीं घेणें । तें काळे शब्दें जेणें, । तोचि शब्दु बोलणें । तये ठायीं ॥ ५८ ॥ वस्तु आलिया हाता, । मग नाना भाषी ते वदता । कांहीं प्रयोजनु ? कीं वक्ता । श्रमातें पावे ? ॥ ५९ ॥ संस्कृत असती ग्रंथ । तयाचें जाणावें मंत, । ऐसें जैं आर्त । उपजे जिवा, ॥ २६६० ॥ तरीचि तें अभ्यासावें, । अभ्यासूनि तत्त्व जाणावें, । मग शब्द अवघे साडावे, । न व्हावें आसक्त. ॥ ६१ ॥ कणु घेऊनि, भूस । देइजे जैसें प-श्वादिकास, । तत्व जाणोनि, शब्दास । तैसें साडावें. ॥ ६२ ॥ अथवा उ-दरपूर्तीकारणें, । योग्यतेचेनि गुणें, । मूर्खी लोका ठकणें, । ऐसें जैं, ॥ ६३ ॥ तैं शास्त्रें समग्रें शिकावीं, । अपार वटवट करावी, । नाना उपायीं आणावी । आपणा योग्यता. ॥ ६४ ॥ नाना विद्या जाणो-नि, । नाना मतें शिकोनि, । नानाविध जिंकोनि । वादीं लोक, ॥ ६५ ॥ आगीं योग्यता आणावी, । मग ते अभिमानें पोषावी, । ससारिकाप्रति दावावी, । साधावा रुका ॥ ६६ ॥ अर्थप्रयोजनु जया असे, । तया क्रियेची चाडचि नसे, । स्वहित स्वप्नीं न दिसे । तेणें शास्त्रें. ॥ ६७ ॥ अर्थार्थी जनु पडितु, । तोही अर्थु साधता पाहतु, । मग प्रसगींचि आणी-तु । आपुलें संस्कृत. ॥ ६८ ॥ आता आला रुका पुरे, । मग सांडी संस्कृतें उत्तरें, । प्राकृता वाणी विचरे । ससारमार्गी. ॥ ६९ ॥ परतु तें भाषाचि परम, । ऐसें नमनी कव्हणी वर्म, । प्रयोजनु मात्रुचि काम । आपुलें सपादिती. ॥ २६७० ॥ ससारनगरपेठे. । नाना भाषाचें नाणवटें, । येका खरें, तें खोटें । आना येकां. ॥ ७१ ॥ येथें संस्कृतचि केवळ । न सरे नाणें सकळ, । कोण्ही येक स्थळ । ऐसें आहे. ॥ ७२ ॥ संस्कृतें घटु म्हणतां, । आता तयाचे भेद किती ? । करणा घटाची प्राप्ति । पावावी तेणें ? ॥ ७३ ॥ हारा, डेरा, राजणु, । मुढा, पडगा, आनु । सुगड, तौली, सुजाणु । कैसी बोलैल ? ॥ ७४ ॥ घडी, घागरी, घडौली, । अलर्दे, वाचि कें वौळी । चिटकी, मोरवा, पातली, । सांजवणें तें, ॥ ७५ ॥ ऐसे प्रतिभाषे वेगळाले । घट असती नामाधिले, । एकें संस्कृतें सर्व काळे, । ऐसें कैसेन ? ॥ ७६ ॥ सनवट, चोपण, गव्हाळी, । चिकणी. पन्हवट,

मळी, । चुनवट, माळवट, खळी, । खळगा, खात, ॥ ७७ ॥ उर्ते, गोटल, खडाळ, । पांढरी, सेड्ढ, मुरुंबाळ, । तांबट, काळी, करळ, । भेद मृत्तिकेचे. ॥ ७८ ॥ नदु, नदी, वोहळ, । झोति, झिरपें, खळाळ, । धार, घाळणी, पीळ, । भंवरा धोधें. ॥ ७९ ॥ टांकें, बावि, पोखरणी. । बारव, विहिरि, अडु, धरणी. । विहिरा, तळें, रानी, । हळता, घुमें, ॥ २६८० ॥ ऐसे भेद जळस्थानांचें; । येक येक बहुतां नामांचे; । सारीं प्रयोजन तयांचें । संस्कृत कैसें ? ॥ ८१ ॥ जाडी, घोंगडें, चवाळें, । कंबळशब्दें कैसें कळे ? । कांबळा, आसन, गवाळें, । खोगीर, जेन, ॥ ८२ ॥ चोगा, आंगडें, दुताई, । कडां, गडेंट, कोचा, पाहीं । ऐसे भेद, ठायीं ठायीं, । नामें वेगळालीं. ॥ ८३ ॥ येणेंचि विचारें पाहें, । पदार्थभेदां मिति आहे ? । आतां तयांचें नाम काये । येकचि सर्वत्र ? ॥ ८४ ॥ कोठें कोठें पुरवावें । संस्कृतें भेद प्रकाशावे, । व्यवहारा योग्य नव्हे । म्हणौनियां हे, ॥ ८५ ॥ चौपाळां जेन घातलें, । चौधरियें सुख केलें, । इतुलेचि बोल बोलें । संस्कृतें तूं. ॥ ८६ ॥ पासीं तिवासी जंवखाना । चौगलिया पाल आसना, । ऐसे बोले, तो शाहणा । अभिधानपूर्वक. ॥ ८७ ॥ सोंडगें, तांगडी नेती, । आटाल्यापासीं ठेविती, । कुठे बकम घालिती, । ऐसें बोल, पां. ॥ ८८ ॥ तोंडीं घालूनियां फोंडि, । घेइजे विडीपाठीं विडी, । ऐशी विड्याची परवटी । म्हणौन बोल. ॥ ८९ ॥ जुंग, तारूं कीं होडें ? । ऐसा संदेहो पडे, । तैं संस्कृत निवाडें । कैसें बोलैल ? ॥ २६९० ॥ सिट, मासिटें, कापलग, । खाराउं झुणे, दुरंग, । सेला, पासोडी, सांग । पातळ म्हणिजे. ॥ ९१ ॥ पडदा, पडम, पडदणी, । झिळ, विरळ, सागरवानी. । कर्सादेविणकरीचें म्हणौनि । काय म्हणसी ? ॥ ९२ ॥ देशोपाधि नामभेद, । त्रियाभेद बहुविध, । पटु म्हणतां नैकविध । ते जाणावे कैसे ? ॥ ९३ ॥ ऐसे शद्व बोलतां, । जन्मु न पुरे सर्वथा; । न प्रकाशवती संस्कृता । पापाणही परि. ॥ ९४ ॥ गोटा, गोटलि, घोंटाळा, । चिरा, बंडा, सिरसाळा, । कोदवा, किनरी, म्हैसाळा, । रत्न नीलु, ॥ ९५ ॥ . खवला, मुरुंबाळा, कुरुडु, । सेद्ध, गारगोटी, हेदु. । ऐसा पापाणांचा भेदु । बोल बोल पां. ॥ ९६ ॥ आतां असे हें बहु भापण. । किती करावें वाग्पीटण ? । व्यवहारु येणेंकरून ।

न चले तुझा. ॥ ९७ ॥ परिग्रहो कैसा पाळिसी ? । कैसा पोप्यांसीं बोलसी ? । दाता सतुष्ट करिसी । कवणें उपायें ? ॥ ९८ ॥ निद्रा, भोजन संस्कृत, । ना तें जैसे प्राकृत, । तैसें देहरक्षण समस्त, । विचारें घेतां. ॥ ९९ ॥ धर्मु, अर्थु, कामु, मोक्षु, । सारिखाचि अवघा पक्षु, । स्वप्रयोजनीं जो दक्षु । जाणु तोचि. ॥ २७०० ॥ प्रतिष्ठा जे तुवां मानिली; । ते कल्पनाचि मात्र केली, । परतु, लोकप्रणीत आथिली । ऐसी नव्हे. ॥ १ ॥ इतुल्याचें साचपण । हेंचि आवां येथून । तूतें आलें तस्करपण । जये ठायीं. ॥ २ ॥ जाऊनि पाहों तया स्थळा, । कैसा मान्यु होसी सकळां ? । आतां सांडीं हा चाळा । यया संस्कृताचा. ॥ ३ ॥ ऐसा ज्येष्ठें शकिला, । मग तो उमजु पावला, । प्राकृत बोलों लागला । तयेंचि क्षणीं. ॥ ४ ॥ मग बैसोनि पांचही जणें । विचारु करिती तेणें क्षणें, । आतां हे वित्त येसणें । कैसें साडावें ? ॥ ५ ॥ धन, धान्य, रुपें, सोनें, । राशी दाविलिया कनिष्ठ तेणें. । ज्येष्ठु म्हणे, " राहणें । येथ अनुचित." ॥ ६ ॥ येथ राहतां यये ग्रामीं । सत्य राक्षसें जाली आम्ही. । पुढें वर्ततां आश्रमधर्मीं । होतील प्रजा. ॥ ७ ॥ मग आपुलियां पुत्राकारणें । कन्या कवणाचिया मागणें ? । आणि आपुलिया त्या देणें । कवणा मग ? ॥ ८ ॥ न करीत लग्नें असोन । तैं सत्यचि राक्षस होऊन, । जितां, मेलियां आन । गतिचि नसे. ॥ ९ ॥ नातरि मत्रवादी भेटे, । तै पळावें मग कोठें ? । देशु अवघा येकवाटे । पाठि येण्हार. ॥ २७१० ॥ यालागी येथूनि जाणे, । स्वजनामाजी वसणें, । महत्वें काळ क्रमणें । तरि हें ऐसें. ॥ ११ ॥ कनिष्ठु बोले वचन, । " साडू नये हें धन, । द्रव्यचि पुरुषार्थें जीवन । म्हणौनिया. ॥ १२ ॥ कव्हणाचें नाहीं हरिलें, । स्वभावें ईश्वरें दिधलें, । सर्वथा पाहिजे नेलें । सर्व हें. ॥ १३ ॥ आइतीं अश्वें पालाणं, । आइते वैल पन्हवाणे, । नेऊं म्हणतां, येकेंचि क्षणें । जाईल हें. " ॥ १४ ॥ ज्येष्ठु वचन काये बोले, । " पूर्वी तुवां होतें नेलें, । तें कवणें फळें फळलें ? । सांग पा, गा. ॥ १५ ॥ तैसेंचि मार्गी वोळखती, । चोर म्हणौन आम्हां धरिती, । मग प्राणांवरि उठिती । जन आमुचिया. ॥ १६ ॥ यालागीं परवित्त नेणें, । हें सर्वथा मातें नमने; ।

जाईल सहित प्राणें । आमुचेन हें. ॥ १७ ॥ चोरिलें नव्हे कव्हणाचें, । तन्ही हें नव्हे आमुचें; । घेतां, कारण पापाचें । होईल कीं, " ॥ १८ ॥ कनिष्ठ बोले वचन, । " माझें न निघे येथूनि मन, । येणें अर्थे राक्षसपण । संप्राप्त हो. ॥ १९ ॥ यया द्रव्याची वासना, । मातें बहुसाळ कल्पना, ॥ ते मेल्याही सुटेना, । ऐसी आहे. ॥ २७२० ॥ मरणांतीं राक्षस होणें, । मग ययेचि स्थळीं भ्रमणें, । ऐसें सहज येणें गुणें । घडैल मज; ॥ २१ ॥ ते जितांचि पावैन दशा, । परि न सोडीं या द्रव्यांशा, । तुम्हीं जावें देशा । समग्रीं जणीं. ॥ २२ ॥ स्त्रीची मातें नाहीं चाड, । गेली वडिलांचीही भीड, । धर्मशास्त्राचिया कवाड । घातलें घरा. " ॥ २३ ॥ ज्येष्ठ विचारी मानसीं. । न सोडी हा यया द्रव्यासि, । आसक्ति अपार; ऐसियासि । काय करणें ? ॥ २४ ॥ शब्दपाशाव सोडविला, । अर्थ दाखवूनि डोळां; । तंव हा अर्थींचि गुंतला, । कैसें कीजे ? ॥ २५ ॥ युक्ति विचारूनि मानसीं । ज्येष्ठ बोले कनिष्टेसीं, । " आम्ही नेऊं यया द्रव्यासि । भर्वसेन; ॥ २६ ॥ परंतु चोरपण आंगा नये, । प्रकट द्रव्य नेतां ये, । ऐसेन नेइजे उपायें । तो उपावो करूं. ॥ २७ ॥ यया द्रव्याचा जो नाथु, । तो दे दानबुद्धी समस्तु, । तरि हा नेतां पदार्थु । फावे आम्हां." ॥ २८ ॥ कनिष्ठ बोले विचारा, । "मा ऐसाचि योगु करा, । आम्ही तुमचिया उत्तरा । उल्लंघूंना. " ॥ २९ ॥ ज्येष्ठ बोले बोलणें, । " तुवां येथेंचि ऐसें असणें. । आम्ही जाऊन चौघें जणें । आलों तैसीं. ॥ २७३० ॥ मग तूतें तस्कर जेथें केलें, । जेथें वऱ्हाडियें देखिलें, । यये ग्रामींचे राहिले । लोक जेथें, ॥ ३१ ॥ तेथें आम्हीं जाऊन, । मंत्रवादी होऊन, । तुज राक्षसा काढून । ग्रामाबाहेरि, ॥ ३२ ॥ मग नेऊनि दूरि देशा, । राक्षसु कुंठूं हा ऐसा, । नेमु करूं, भरंवसा । देऊं सकळां. ॥ ३३ ॥ तें दक्षिणेचारी । मार्गों वरील सामग्री, । तेणेंयोगें चोरी । ऐसी नव्हे. " ॥ ३४ ॥ ऐसा विचारु ज्येष्ठें केला, । तो शम्बु येरा मानला, । मग गमनारंभु विचारिला । रोकडाचि. ॥ ३५ ॥ ग्रामीं ठेवूनि कनिष्ठु, । सपरिवार तो ज्येष्ठु, । निघता जाला प्रकटु । तेणें पंथें. ॥ ३६ ॥ आइकिली मार्गाची खूण, । तैसेंचि नित्य प्रयाण । करितां करितां, तें स्थान । पावता

जाला. ॥ ३७ ॥ ग्रामाचां बाह्यप्रदेशीं । जेथ पीडा जाली बंधूसि, । जाणोनि तया स्थळासि । तेथेंचि बैसला. ॥ ३८ ॥ दंड, कमंडलु, कडासन, । बैसला घालूनि पद्मासन; । मौन, मुद्रा, बंधन, । दम इंद्रियांचे, ॥ ३९ ॥ दिवा रात्रौ वसति, । तेथेंचि केली स्थिति । आन्हिककर्मयुक्ती । चालविता जाला. ॥ २७४० ॥ प्रातःकाळीं प्रातःस्नान । संपादी दीर्घतंत्रेंकरून, । नाहीं तें क्रियाविधान, । वैदिकां मंत्रीं. ॥ ४१ ॥ स्नानांतीं संध्यावदन, । अग्निहोत्रऔपासन, । अंतीं आगममंत्रानुष्ठान । आचरे कैसें ? ॥ ४२ ॥ नानापरींचे न्यास, । विचित्र मुद्रांची भाप, । अश्रुतादृष्ट जनांस । तैसियापरी. ॥ ४३ ॥ न्यासांतीं करी ध्यान, । ध्यानांतीं मत्रानुष्ठान, । अनुष्ठानावसानी बैसोन । तियाचि मुद्रा. ॥ ४४ ॥ क्षणेकु हांसे गदगदां, । क्षणेकु करी अनुवादां, । क्षणेकु करी निंदा । आपुली आपणु. ॥ ४५ ॥ सभंवतें नागरिक जन । नित्य बैसती येऊन; । मग दूरूनि अभिवदन । करूनि जाती. ॥ ४६ ॥ मग तयां नागरिकांतें देखोनि । अधिकाधिक छंद आणी; । डोले, हांसे प्रतिक्षणीं, । चिंताळू होये; ॥ ४७ ॥ अनुवाद करी परोपरी, । लक्ष्य ठेवूनि अंबरीं; । तयां जनांची न करी । कांहीं चाड; ॥ ४८ ॥ तें देखोनि चिन्ह तयाचें. । मन मोहलें नागरिकांचें, । भाव उपजले भक्तीचे । कामिकांसि. ॥ ४९ ॥ देवा, हा बोलैल वचन, । देवा, हा देईल दर्शन, । ऐसें मानूनि, च्यान्ही वर्ण । बोळगे येती. ॥ २७५० ॥ नाना पदार्थ समर्पिती, । ते व्यर्थचि वांया जाती, । अंगीकार न करी, वृत्ति । न घाली तयांवरि. ॥ ५१ ॥ न करी अंगीकार पूजेचा, । नाइके शब्दु जनांचा, । न बोले वचन, संगाचा । त्रासु मानी. ॥ ५२ ॥ लोक म्हणती संपूर्ण, । "जीवन्मुक्ताचें आथी चिन्ह, । ययाचें घडे पूजन । कवणें उपायें ? ॥ ५३ ॥ देवो भक्ती आराधावा, । हाचि उपावो बरवा । मानूनि अंतरें, सेवा । करिते जाले. ॥ ५४ ॥ अपार देखोनि भजन, । तयांचें करी अवलोकन; । क्षणा येका हास्यवदन । करूनि बोले. ॥ ५५ ॥ मृदें, मंजुळें, प्रीतिपरें, । बोले प्राकृतें उत्तरें, । क्षेम पुसे तदनंतरें, । दे आशीर्वाद. ॥ ५६ ॥ इतुलें जयांतें घडलें । तयां अपार सुख जालें; । जनीं महत्व पावले । श्रेष्ठतेचें.

॥ ५७ ॥ ऐसेनि भजनोपायें जन । प्रीति पावले तयापासून. । समानु अधिकारु पावोन । प्रार्थिते जाले. ॥ ५८ ॥ "देवा, आम्ही अकिंचन, । संसारी, मूर्ख, अज्ञान; । आमुतें तारावें;" म्हणौन । प्रार्थना करिती. ॥ ५९ ॥ प्रेमपरें वचनें । बोलती "आम्ही दीनें." । पुनः पुनः अभिवदनें । तोषविते जाले. ॥ २७६० ॥ देखोनि भावार्थु सकळांचा, । बोलु बोलिला अनुग्रहाचा, । "काये अभिप्रावो तुमचा । तो सांगा," म्हणे. ॥ ६१ ॥ जन बोलती वचन, । "आम्ही नापेक्षूं कांहीं आन, । नित्य करूं पूजन, । तेंचि अंगीकारावें." ॥ ६२ ॥ आइकोनि तयांचें बोलणें, । कांटाळला आपुलेनि मनें. । म्हणे "पहा, अरिष्ट केसणें । अनुष्ठानासि ? ॥ ६३ ॥ नित्य देवांसीं संभापण, । नित्य दर्शन, स्पर्शन, । इंद्रा, वरुणाची बोळगण । नित्य असतां ॥ ६४ ॥ पूजेचा प्रेत्नु करिती, । नित्य गंधर्व भेटी येती, । परतु अंगीकारु केला नाथी । त्यांचिया द्रव्याचा; ॥ ६५ ॥ आतां, हें मनुष्यांचें पूजन । अंगीकरावे कैसेन ? । कोठें पा आमुचें वचन । गुंतलें आधीं ? ॥ ६६ ॥ शब्दु बोलावा खडतरु, । तरि आमुचाचि ययां आधारु; । देवो भक्तांचें तारूं । यये संसारार्णवीं." ॥ ६७ ॥ ऐसें बोलोनि, विचारवंतु । क्षणेकु पडिला दुश्चितु, । मग भिडावला ऐसा, "अस्तु, । करा." म्हणे. ॥ ६८ ॥ आइकोनि ऐसी उक्ती, । सकळ लोटांगणीं येती, । आनंदें नृत्य करिती । प्रेमवत. ॥ ६९ ॥ तत्काळें आणूनि सामग्री, । पूजा करिती परोपरी; । कीर्तनें, जागरणें, नगरीं । तयाचेंचि स्मरण. ॥ २७७० ॥ अपार काळ ऐसे गेले, । पुडती भक्तीं विनविलें, । "देवा, आमुचें दुःख हरिलें । संसारिक तुवां; ॥ ७१ ॥ परतु नेणतां देहाभिधान, । कैसें करावें, जी, स्मरण ? ॥ व्यर्थ जात असे वदन, । तारावें तया. ॥ ७२ ॥ सकळ करणगण । वादा प्रवर्तले आपण, । ते काये म्हणती वचन ? । तेंचि अवधारा. ॥ ७३ ॥ नयन म्हणती "आम्ही थोर, । आम्हा दर्शन निरंतर." । तयातें बोलती कर, । "तुम्ही दूरील. कां ॥ ७४ ॥ आमुचें कर्तव्य केसणें ? । पूजाकाळीं स्पर्शणें." । चरण म्हणती, "प्रेमहीनें । काइसीं रे, तुम्ही ? ॥ ७५ ॥ प्रेमाचेनि रसें संपूर्ण । नित्य करूं आम्ही नर्तन, । यात्रा, प्रदक्षिणा; म्हणौन । आम्ही श्रेष्ठ." ॥ ७६ ॥

श्रवण म्हणतां सकळांतें । "देवाचें हृदय तुमतें । न कळे, म्हणौनि समस्तें । दूरी तुम्ही. ॥ ७७ ॥ हृदयसार ज्ञानामृत । देवमुखें जालें नादाकृत, । अव्यक्त देवरूप व्यक्त । तेणें आकारें. ॥ ७८ ॥ तेणें चिदानंदेकरसें, । आमुचें हृदय पूर्ण असे, । तें सुख तुम्ही आरुषें । जाणाचिना." ॥ ७९ ॥ ऐसे वाद आइकोनि, । वाचा जाली काजिरवाणी. । म्हणे, "धिग्य! धिग्य! मी पापिणी । गेलियें वांया". ॥ २७८० ॥ "तिचें दुःख परिहरणें । देवेंविण आतां कवणें? । ययालागीं सांगणें । देहाभिधान. ॥ ८१ ॥ अजी, तरि ते कां सृजिली? । सृजूनि, वांया दवडिली, । किमाश्रिता येकली । असैल ते?" ॥ ८२ ॥ ऐसें आइकोनि बोलणें, । हांसोनि, देवो तयां म्हणे, । "हो कां माझेनि अभिधानें । कृतकृत्य वाचा. ॥ ८३ ॥ तरि अभिधान यया देहाचें । देवात्मा जाणा, साचें; । मंत्रा ऐसें ययाचें । स्मरण करा. ॥ ८४ ॥ हाचि तुम्हां बीजमंत्रु, । हाचि हा उपदेशव्यवहारु, । होये नित्य साक्षात्कारु । जेणें अभिधानें." ॥ ८५ ॥ ऐसें अभिधान सांगीतलें, । देवें तत्व उपदेशिलें, । सकळ भक्त आनंदले । तेणें काळें. ॥ ८६ ॥ स्मरण, कीर्तन, पूजन, । करिती सेवा, पदार्थदान, । भक्ती लागले जन । समग्रही. ॥ ८७ ॥ कित्यायेकां काळा, । भक्तांतें भावो उपजला, । जें देवाचें चरितलीला, । ज्ञान होआवें. ॥ ८८ ॥ आशंका धरूनि मानसीं, । मग ते विनविती देवासि, । "देवा, तारिलें आम्हांसि । संसारापासाव. ॥ ८९ ॥ सर्व जालें संपूर्ण । भजनांगक्रपेकडून, । तथापि; येकि चिंता आमुचें मन । बहुसाल करी. ॥ २७९० ॥ नित्य चरित देवाचें । आइकावें, महिमान गुणाचें; । तेणे मूळ प्रेमाचें । पुष्ट होईल. ॥ ९१ ॥ आइकोनि दोहीं श्रवणीं, । मग तें धरूनि अंतःकर्णीं; । विश्रांति पावों मनीं । तयेचि ठायीं ॥ ९२ ॥ इतुलें मनोगत पुरवावें, । देवें कृतकृत्य करावें, । नित्य चरित सांगावें । देवांमार्जाचें." ॥ ९३ ॥ इतुलें आइकोनि वचन । देवो म्हणे, "हें बंधन, । तुमचें हें केलें भजन । आम्हांसि होये. ॥ ९४ ॥ पूर्वीचि भक्तु नसावा । येकलाचि देवो बरवा । माया मोहो, अथवा । भस्म होये. ॥ ९५ ॥ दुसरा मिनलयां सुभक्तु । सत्यवादी प्रेमवंतु, । निश्चयाचा आसक्तु । काये होये? ॥ ९६ ॥ तयाची

स्नाना, संध्येसि । अरुणोदयाचां प्रकाशीं । काय करिता जाला ? ॥ १७ ॥ वामकनिष्ठिकाग्र पूर्वे दिशे । दावूनि बैसला, हांसे; । तव ग्रामांतूनु आलीं माणुसें । तेंहीं देखिला. ॥ १८ ॥ म्हणती, " काय पां अपूर्व । आजि हें देखती देव ? । सांडूनि स्नानादि सर्व । हें काय करिती ? " ॥ १९ ॥ थोर थोर आइकोनि आले, । तेंहीं समस्तीं देखिलें, । मग उदयमान पातलें । तया सूर्याचें. ॥ २८२० ॥ मग ते देखोनि नयनीं, । नेटें हुंकारा देऊनि, । उठिला स्नानालागूनि । देवात्मा तो. ॥ २१ ॥ आपुलें कर्म संपादे, । तव कव्हणेंसीं कांहीं न वदे; । तें कर्मानुष्ठान सावधें । चित्तें केलें. ॥ २२ ॥ जनां उत्कठा अपार. । बैसले न उठती समग्र. । जपांतीं पुसों समाचार । यया हेतू. ॥ २३ ॥ क्रमेंचि अनुष्ठान सरलें, । अवसानीं जन अनुवादले. । "देवें पाहिजे सांगीतलें । आजिचें वर्त्तमान. " ॥ २४ ॥ देवात्मा बोले वाणी. । " अपूर्व देखिलें आजि नयनीं. । आपुली थोरींव आत्मवचनीं । प्रकाशूं नये. ॥ २५ ॥ आपुलें बोलतां थोरपण । आणि तया नाथीं जैं प्रमाण, । तैं तें अप्रतिष्ठेहूनि मरण । साहिजैसें. ॥ २६ ॥ स्वमुखें आपुली महंती । मूर्ख ते जे बोलती. । सहज तयाची प्रतीति । येईल दिसों. ॥ २७ ॥ येथूनि आम्ही जातां पुरे । मग ते घडैल एकसरें, । राक्षसभय साचोकारें । ये देशीं. " ॥ २८ ॥ आइकोनि वचन देवाचें; । पूर्वींचि भय राक्षसाचें । मन भयभीत जनाचें. । तें पुनः पुनः पुसे. ॥ २९ ॥ पुडतोपुडतीं नमस्कारिती, । देवातें "सांगावेंच" म्हणती, । "अपार भय चित्तीं । उपजलें आम्हां." ॥ २८३० ॥ आइकोनि भक्तांचें निनवणें, । देवात्मा बोले वचनें. । "आजि यया सूर्याकारणें । रक्षिलें आम्हीं. ॥ ३१ ॥ हे पूर्व दिशा उद्वस, । येथें वसती राक्षस, । तयातें बहुत उपवास । आहारेंवीण ॥ ३२ ॥ ते समस्त मीनले, । मीनोनि ऐसें विचारिलें, । येणें सूर्यदर्शनें चाले । सकळ कर्म. ॥ ३३ ॥ तयां कर्मिष्टांमाझारीं । येकाधा देवमनुष्यु, ससारी, । असैल तो निजाचारीं । वर्ततु असतां ॥ ३४ ॥ तयाचेनि कर्मसामर्थ्यें । क्षयो आला आमुतें. । न देखों आम्ही आहारातें, । सुखातेंही. ॥ ३५ ॥ तरि यया सूर्यातेंचि ग्रासणें, । मग अजघेन रात्रिमानें । कर्मलोपवलें तेणें । क्षिती पसरों. ॥ ३६ ॥ ऐसा करूनि निर्धारु, ।

मोटका आसावा दिनकरु, । तंव आमुतें जागरु । पूर्वींचि होता. ॥ ३७ ॥ सूर्याचां अभावीं केवळ । आमुचें कर्म राहेल, । म्हणौनि रक्षावें सूर्यमंडळ । हे वासना उपजली. ॥ ३८ ॥ मग वामकनिष्ठाग्र दावून । राक्षसां केले दमन; । ते भयाभीत तेणेंकरून । स्वस्थाना गेले. ॥ ३९ ॥ देखोनि सूर्यो उदैजला, । अभिमानु नेवटा गेला, । मग हुंकारा जो दिधला, । तो आइकिला असैल. " ॥ २८४० ॥ इतुलें आइकोनि वचन । जनातें मानलें प्रमाण. । " अहो, हे राक्षसवन । स्वभावें खरें. " ॥ ४१ ॥ सहज आपुलेनि काळें । लोक तेथूनि उठिले, । विचारु कर्ते जाले. । तोचि कैसा ? ४२ ॥ सभा करूनि समस्तीं । ऐकमेकां अनुवादती. । " अहो, हे देवाची उक्ति । कैसी मानली ? " ॥ ४३ ॥ येक म्हणती, "प्रमाण । आहे कीं राक्षसवन. " । येक म्हणती, " गुरुवचन । अन्यथा नव्हे. " ॥ ४४ ॥ येक म्हणती येकांतें, । " हा पूर्वींचि निश्चयो आमुतें; । भ्रांति होती तुमतें, । तेचि निवारली. ॥ ४५ ॥ येक म्हणती, "आइका वचन. । पुढें पुसों राक्षसांचेंचि वर्तमान; । आरंभापासूनि ज्ञान. । अवघें कारितां ॥ ४६ ॥ आली घडघडां प्रतीति, । तरि अवघीचि खरी उक्ति; । मग परिहाराची युक्ति । तयाचिया. ॥ ४७ ॥ आतां तें प्रकट न बोलावें, । देवातेंचि सर्व पुसावें, । आमुचें सांगीतलें करावें । इतुकें येक. " ॥ ४८ ॥ हें ग्रामकश्रेष्ठ बोलिले, । जे भक्त न होती त्यां वेगळे. । भक्तजन कांटाळले । आइकोनि तें; ॥ ४९ ॥ परंतु भिडेने भिडावले. । ' हो ' म्हणौन उठिले. । कव्हणी कव्हणेसी न बोले, । ऐसें असतां ॥ २८५० ॥ तदपर दिनीं मिळोन । ध्यावया देवाचें दर्शन । आले नागरिक जन । समुदायेंसीं. ॥ ५१ ॥ अनुष्ठानाचां सेवटीं । प्रसंगेंचि करिती गोष्टी, । चरित पुसावयाची मोठी । आस्था धरूनि. ॥ ५२ ॥ तेणेंचि अंगें पुसती. । " देवा, सर्वसुरात्ममूर्ति, । तयां राक्षसांची स्थिति । पुनरपि विचारावी. ॥ ५३ ॥ -राक्षसु येकु कीं ते अनेक ? । सर्व समान, कीं, सेव्य, सेवक ? । कोठूनि आले सकळैक ? । पुढें काय करितील, जी ?" ॥ ५४ ॥ आइकोनि ऐसें बोलणें, । देवदेवेश्वरु तो म्हणे. । " आतां हें तुमतें मानें । ऐसें कीजैल. ॥ ५५ ॥ अश्वत्यशाखाग्रस्थानीं । राक्षसु आणावा आवाहनूनि, ।

मग तयाप्रति सर्व पुसोनि । सांगावें तुम्हां." ॥ ५६ ॥ सकल म्हणती, " चांग. । ऐसेंचि करावें, जी, सवेग. " । ते आइकोनि मग । तेणें देवात्मेन ॥ ५७ ॥ घातलें विटंक आसन, । मांडिलें न्यासक्रियाविधान, । जयां मुद्रांतें प्रमाण । कोठेंचि न दिसे. ॥ ५८ ॥ भार जपोनि मंत्राकारें, । सुटलें देखोनि कांहीं वारें, । अश्वत्थु वामकनिष्टाग्रें । दाखविला न बोलोनि. ॥ ५९ ॥ मग वरि अक्षता टाकूनि । सिंपता जाला पाणी. । तीनि आवरणे दर्भेंकरूनि । केली अश्वत्था. ॥ २८६० ॥ भक्तांप्रति बोलता जाला । " अश्वत्थीं राक्षसु आणिला. । आतां पुसों कीं कायें, बोला. । वृत्त ययातें. " ॥ ६१ ॥ समस्त बोलती वचन, । " केव्हां जालें आगमन । यया राक्षसाचें, ते खूण । असे कांहीं ? " ॥ ६२ ॥ देवात्मा वाक्य बोलिला. । जेव्हेलीं वायो सूटला । आणि हा अश्वत्थु झडझडिला । क्षणीं जिये, ॥ ६३ ॥ तिये क्षणीं एकसरा । आला राक्षसु, अवधारा; । पुरे केलें मंत्रा । जेव्हेलीं म्यां. " ॥ ६४ ॥ नागरिक बोलती वचनें. । " आतां तयातें देवें पुसणें. । पूर्वीं कोठूनि जालें येणें । राक्षसा " म्हणौनियां. ॥ ६५ ॥ अक्षता मंत्रूनि टाकितु, । क्षणेकु राहिला तटस्थु; । मग हासे मान हालवितु, । देतु हुहुकार. ॥ ६६ ॥ क्षणेकु ते भाव दाखविले, । मग जनांप्रति बोल बोले. । " कांहीं कांहीं पुसिलें । वृत्त आम्हीं. ॥ ६७ ॥ बिभीषणाचा हा दूतु । लंकेमाजी होता विख्यातु. । यया अधीनु अनतु । परिवारु असतां ॥ ६८ ॥ मग कव्हणें येकें सुदिनें । लंकानाथें बिभीषणें । आज्ञा ययाकारणें । ऐसी दीधली. ॥ ६९ ॥ 'अयोध्येसि तुवां जाइजे, । रघुनाथदर्शन काजे, । हें आमुचें पत्र पावविजे, । आणिजे प्रत्युत्तर.' ॥ २८७० ॥ ऐसें बिभीषणें आज्ञापिलें, । हातीं पत्र दिधले, । मग येणें उड्डाण केलें । तेथूनियां. ॥ ७१ ॥ आकाशीं उसळला दूरि. । होतें पत्र बांधलें शिरीं. । शिरो वेष्टणा पदरीं । आहाच ऐसें. ॥ ७२ ॥ वातें शिरोवेष्टण उडालें, । तें सागरीं जाऊनि पडिलें. । येणें 'हा! हा!' शब्द केले. । न चले प्रेत्नु. ॥ ७३ ॥ उड्डाणवेगु पूर्ण जाला. । राक्षसु अरण्यामाजी पडला. । अपराधु आपुला जाला, । ऐसें जाणे. ॥ ७४ ॥ आतां कैसें जावें अयोध्येसि ? । परतोनि कैसें लंकेसि ? । मग मध्येंचि

महादुःखासि। करितु ठेला. ॥ ७५.॥ कन्हणेंसीं न बोले वचन. । दुःखें करितां मुखपीटण । मार्गी चालतां पांधजन । देखिला तेंहीं. ॥ ७६ ॥ उचलूनि ग्रामांतु आणिला, । सभंवता जनीं परिवारला, । नागरिकीं आक्षेपिला, । प्रवर्त्तले पुसों. ॥ ७७ ॥ न बोले कन्हणेंसीं वचन । आणि अत्यंत उपद्रविती जन, । मग माने येकाचिये जाऊन । झोंबता जाला. ॥ ७८ ॥ देखोनि शूद्र कुश्चिळ । नेघेचि तयाचें स्थूळ; । तथापि लोक सकळ । बाधूंचि लागले. ॥ ७९ ॥ मग दूसरेयातें घ्येलें, । तेंही शूद्र म्हणौनि सोडिलें; । तथापि जन पाठीं लागले, । ते न सोडितीचि. ॥ २८८० ॥ मग हुंकारला तिसरेन । अवघेचि ग्रासावे जन, । च्यान्ही भूतग्राम, च्यान्ही वर्ण, । ऐसा आवेशला. ॥ ८१ ॥ तंव लोकीं चांग विचारिलें. । तेचि क्षणीं तया सोडिलें. । ग्रामु सांडूनि पळाले । विचारवंत. ॥ ८२ ॥ आपुलेनि दुःखें तो दुःखितु । न करी कन्हणाचा घातु. । तेथेंचि तो चिंताग्रस्तु । पडोनि ठेला." ॥ ८३ ॥ इतुलें सांगितलें वर्तमान. । "पुढेंही असे," म्हणे "आन. । असत पुसावया कारण । काये आमुतें ?॥ ८४ ॥ मग तयातें बहुडा दिधला. । तो आपुल्या स्थळा गेला. । भोजनातें विलंबु जाला । उठा आतां." ॥ ८५ ॥ नागरिक उठिले तेथून, । बैसले पारीं येऊन, । मिळोनियां थोर, सान, । करिती चाळणा. ॥ ८६ ॥ "कां, हो, हें कैसें माने । देवात्मगोसावियाचें सांगणें" ? । येक म्हणती, "खुणे । आलें आम्हां. ॥ ८७ ॥ परतु तिये ग्रामींचे सकळैक । मेळवाना कां लोक ? । सत्य कीं सांगणें फोक, । ऐसें जाणवैल." ॥ ८८ ॥ मानूनि तया वचनातें, । आसिपाशी पाठवूनि भृत्यांतें, । बोलावूनि आणिलें लोकांतें । तत्रस्थां सकळां. ॥ ८९ ॥ हे जन पुसती वार्ता. । "अहो, राक्षसाची कैसी व्यवस्था ?। तेंहीं वर्त्तमान सांगतां, । तैसेंचि आलें. ॥ २८९० ॥ विश्वासु उपजला चित्तीं; । दांतें आंगोळी चाविती, । कान धरूनि, म्हणती, । "सत्य देवात्मा. ॥ ९१ ॥ आम्ही अपराधी, चुकलों. । अभावो धरू प्रवर्त्तलों. । आतां नये उणें बोलों । येथून कांहीं." ॥ ९२ ॥ ऐसा तो दिनु क्रमला. । अपर दिनु प्रवर्त्तला. । लोकांतें संदु लागला । राक्षसाचा. ॥ ९३ ॥ अवघेचि मिनले पुढती. । आले देवदर्शनाप्रति; । मग

जपानुष्ठाना अर्ती । प्रसगु केला: ॥ ९४ ॥ " देवा, देवदेवा, देवोत्तमा, । अगम्य तुझी न कळे महिमा. । कृपया रक्षीं आम्हा । अपराधियातें. ॥ ९५ ॥ तया राक्षसाचें वर्तमान, । अपार आहे जे आन. । तेंही, देवेंचि आपण । विचारावें. " ॥ ९६ ॥ हासोनि बोले देवात्मा. । " तेणे प्रयोजनु तुम्हा. । आम्हा काये असे तो दुरात्मा । कैचा राक्षसु ? " ॥ ९७ ॥ जन बोलती वचन. । " देवेंसीं करणें सभापण, । हेंचि थोर साधन । आहे आमुतें. ॥ ९८ ॥ आता ब्रह्मज्ञानाचिया वार्त्ता । आमुतें न येती पुसता; । सांगीतल्याही चित्ता- । माजी न प्रवेशती. ॥ ९९ ॥ म्हणौनि कथानुसधानें । देवेंसीं नित्य बोलणें, । दर्शन, स्पर्शन, सभापणें । तरों भवसागरु. " ॥ २९०० ॥ देवात्मा बोले, " हो का ? । जें तुम्हा मानें लोकां, । तेंचि करावें. मूर्खा । न कळे आन. " ॥ १ ॥ ऐसें बोलोनि वचन, । टाकी अक्षता, प्रोक्षी जीवन, । न्यास, मुद्रा, मत्रानुष्ठान, । ध्यान करूनि. ॥ २ ॥ मग क्षणा येका पिंपळीं । दावी डावी करागोळी. । तीनि आवरणें तळीं । करी दूर्वोदकाचीं. ॥ ३ ॥ वाउगीचि हालवी मान. । हुकारें बोले प्रतिवचन. । मग क्षणा येका आपण । बोलता जाला. ॥ ४ ॥ " अवधारा." म्हणे समस्ता. । " तये ग्रामीं राक्षसु असता, । तें जाणवलें लंकानाथा । बिभीषणातें. ॥ ५ ॥ क्रोधा आला लंकेश्वरु; । मग तया राक्षसाचा परिवारु । बाहेरि घातला समग्रु । परिग्रहेंसीं. ॥ ६ ॥ अवघेचि तेथून निघाले, । आकाशमार्गे चालिले, । ते मग अवघे मीनले । ययापासीं. ॥ ७ ॥ आहारेंवीण व्याकुळता । तयातें जाली असता, । ग्रामामाजी सर्वथा । प्रेतु न दिसे. ॥ ८ ॥ मग ते अवघेचि निघाले, । अरण्याप्रति येते जाले; । तव मार्गीं विस्तीर्ण देखिलें । वटवृक्षा तया. ॥ ९ ॥ श्रेष्ठु बैसला वृक्षाग्रीं. । येर गेले दिशा च्यान्ही. । आसक्त आपुलाला आहारीं । करिती प्रेतु. ॥ २९१० ॥ मग कव्हणे येकें काळें । वडाखालीं वन्हाड आलें. । रात्री देखोनि उतरलें । विचारवत. ॥ ११ ॥ म्हणती राक्षसाचेनि भयें । दिवसा येथ जाता नये. । रात्रीं आनु घोलाइ ये, । नाहीं शका. ॥ १२ ॥ ऐसा करूनि निर्धारु । उतरिला पन्हवाणांचा भारु. । भोजनविधु समग्रु । सारिला तेंहीं. ॥ १३ ॥ तयेचि क्षणीं तेणें । राक्षसें ययातें घेणें; । परतु

तो दुःखी, गुणें । आपुलेन, असतां ॥ १४ ॥ कऱ्हणाचें कांहीं न करितां । स्वमुखचि जाला दंडिता; । तंव अस्तमान पावतां । तया सूर्याचें. ॥ १५ ॥ तास्कर आले बहुत. । हरिलें वऱ्हाडियांचें वित्त. । घायें पाथरें समस्त । वऱ्हाडी दुखावले. ॥ १६ ॥ येक ते दूरि पळाले, । तेंहीं महाशब्द केले; । येक ते दडोनि ठेले । झाडीं झुडपीं; ॥ १७ ॥ येक सांपडले हातीं, । ते यातनेतें भोगिती; । ऐसी झांजडि जाली राती । तये क्षणीं. ॥ १८ ॥ वरिल राक्षसु हुंकारला,। परिवारु पासीं पाचारिला, । स्वजनु होता भुकेला । यया हेतू. ॥ १९ ॥ तस्करीं वऱ्हाडी नागविले. । येक वायाळ, येक पडिले; । ते राक्षसं खातु विचारिलें । राक्षसें तेणें. ॥ २९२० ॥ आइकोनियां हुंकारातें । चोरीं पाहिलें वरुतें, । तै देखोनि राक्षसातें । पळाले भयें. ॥ २१ ॥ तिकडे चोर, इकडे वऱ्हाडी । पळों लागले तांतडी; । तंव राक्षसांचीं बिरडीं । पडलीं तयां. ॥ २२ ॥ तें ते समस्त चुकले. । थोरा अदृष्टाचे वांचले. । राक्षस आहारें पूर्ण जाले, । वरपडतीचिना." ॥ २३ ॥ ऐसा सांगीतला वृत्तांतु. । "पुढेंही आहे अप्रमितु. । तें पुसोन वृत्त, हेतु । काये आमुतें? ॥ २४ ॥ भोजना उसिरु जाला, । आम्हीं तया बहुडा दिधला. । तुम्हींही व्यापारु आपुलाला । सपादावा." ॥ २५ ॥ ऐसी आज्ञा पावोन । जन निघाले तेथून; । बैसले येकत्र होऊन । अवघे पारीं. ॥ २६ ॥ येक येकातें पुसती. । "कैसी, हो, आजिची उक्ती?" । तंव तयांमाजी अनुवादती । थोरथोर. ॥ २७ ॥ "ते वऱ्हाडी, ते चोर । ठाउकेची असती समग्र. । तयांतें करूनि निर्वेर । येथें पाचारा. ॥ २८ ॥ मग वृत्त पुसों तयांतें । वेगवेगळें येकयेकातें; । मग साच असेल, तें तेणें मतें । येईल कळों." ॥ २९ ॥ आइकोनि ऐसा विवेकु, । बोलाविला येकु सेवकु. । तया पाठावीं तो लोकु । आणिला पाचारूनु. ॥ २९३० ॥ शब्दें, विचारें वेर । तयांचें तोडिलें समग्र. । मग बैसवूनि एकत्र, । वार्ता पुसिली. ॥ ३१ ॥ येकयेकु तयांमाजिचा । वेगळा नेऊनि, राक्षसाचा । समाचारु घेतां, अवघेयांचा । शब्दु येकु जाला. ॥ ३२ ॥ देवात्मेन जें सांगीतलें । तया नसे उणें, आगळें. । वापु दैवत जोडलें । सुभक्तातें. ॥ ३३ ॥ मग ते तद्भक्ता पाचारिती. । आपुलिया

पाया काढिती, । केशीं पाय झाडिती, । करिती नमस्कार ॥ २४ ॥ जुन चोलती समस्तातें, । "थोर दैवत जोडलें तुमतें, । आता आजिपासूनि, आमुतें । तुम्हीचि गुरु." ॥ ३५ ॥ भक्त बोलती वाणी, । "निर्धार जो आमुचा मनीं, । तो चतुराननुही येऊनि । पालटू न शके. ॥ ३६ ॥ तुमतें संदेहो होता. । तुम्हींचि निवारा आता । सत्य, मिथ्या तत्वता । वचन देवाचें." ॥ ३७ ॥ लोक म्हणती, "साचार । आम्ही भाग्याचे थोर." । तया पुसती समग्र । वऱ्हाडी जे का. ॥ ३८ ॥ तयाप्रति सर्व सागता, । सकळा उपजली आस्था । चोरा, वऱ्हाडिया येकामता । जाली तेणें. ॥ ३९ ॥ केधवा दिवसु माळवैल, । केधवा आणिकु उगवैल, । ऐसी कल्पना रतानिळ । करिते जाले ॥ २९४० ॥ ऐसी करिता सोसणी । अस्तमान पडलें नयनीं, । निद्रया रात्रिमान सारूनि । पाहटा उठिले. ॥ ४१ ॥ मग देवात्मयाचिया स्थाना । समुदायें आले दर्शना, । तव तो प्रवर्तला अनुष्ठाना । नित्यप्रकारें ॥ ४२ ॥ तें देखोनि वर्तमान, । उगेचि वैसले पासीं जन, । तव क्रमेंचि अवसान । पावलें जपाचें. ॥ ४३ ॥ मग जपाचा अवसानीं । अपार स्तुति करूनि, । पुसते जाले, निद्वानीं । वर्तमान राक्षसाचें. ॥ ४४ ॥ मग तो देवात्मा मागुतेन । आचरे मन्त्रादि विधान, । न्यास, मुद्रा, अनुष्ठान, । पूर्वील्प्रकारें. ॥ ४५ ॥ जपोनि मन्तु, अवसानीं । वामकरकनिष्ठिका दावूनि, । वृक्षु तीं आवरणीं । परिस्तृत करा. ॥ ४६ ॥ लावी, उघडी नयन, । मायिक दे अवधान. । मग करी हास्यवदन, । काटाळे शरीरें ॥ ४७ ॥ ऐसी अवलंबूनि ते दशा, । बोलता होये आपैसा । "आम्ही पुसिलें राक्षसा, । सागीतलें तेणें. ॥ ४८ ॥ तया तस्करामाजिलु । विप्रु तस्करु शेवटीलु । भेदु, मायावी, कुटिलु । येके काळें ॥ ४९ ॥ तेंचि द्रव्य, वस्त्रें, भूषणें, । अश्व तयाचेंचि येक येसणें । घेऊनि व्यापाराकारणें । निघाला आपुलिया ॥ २९५० ॥ तो ययाचि ग्रामा आला, । ययाचि वृक्षातळीं वैसला, । येहींचि लोकीं देखिला, । वोळखिला चोरु ॥ ५१ ॥ मायावी धरिलें मौन, । मायावी सहनशीळपण, । द्यावया नाहीं वचन । म्हणोनिया. ॥ ५२ ॥ येथें अपार पीडिला, । मग तो ग्रामामाजी नेला, । फोकनरी मेतला, । बोलेचिना. ॥ ५३ ॥ मग शूळारूढ

करणें। म्हणौनि मिरविला अमानें. । समस्त म्हणती प्राणें । घ्यावाचि हा. ॥ ९४ ॥ माथां सेंदूर लखलखितु, । खांदीं शूळु शोभतु, । गळां माळा मिरवतु, । बाहेरि आणिला. ॥ ९५ ॥ मोटका घालावा शूळीं । तंव ग्रामस्थां विप्रां कृपा आली; । आणि भीतिही उपजली । ब्रह्महत्येची. ॥ ९६ ॥ मग तेथूनि परतविला, । हातीं, पायीं बांधिला. । अंगहीनु पाहिजे केला । लोक म्हणती. ॥ ९७ ॥ मग तेंही चुकविलें जनीं, । ब्रह्मद्रोहो पाप म्हणौनि. । मग तयाचिया वधालागूनि । उपावो केला; ॥ ९८ ॥ सांगातें देऊनि शूद्रातें । विदेशिया, अनभ्यस्तातें, । आणि दुर्बळ अत्यत ऐसें तें । अश्व येक. ॥ ९९ ॥ मग ते निघाले दोघेजण, । तिसरें अश्व, तेथून; । टाकिलें तें राक्षसवन, । ग्रामु प्रवेशले. ॥ १९६० ॥ बहुतां दिवसांचा भुकाळु, । राक्षसें केला येकुचि कवळु । ऐसा कन्हणी येकु खेळु । भागां जाला. ॥ ६१ ॥ ऐसें बोलणें आइकिलें । राक्षसा आम्हीं वारिलें, । भोजनकर्म संपादिलें । पाहिजे म्हणौनि. ॥ ६२ ॥ बहुडा दिधला तयातें, । आतां आज्ञा हेचि तुमतें; । तुम्हीं आपुल्या व्यापारातें । जावें येथूनि." ॥ ६३ ॥ ऐसी आज्ञा पावोनि । लोक निघाले तेथूनि; । येक स्थानीं बैसोनि । काय बोलती ? ॥ ६४ ॥ "अहो, अद्यापि काय पाहणें ? । आतां संदेहो न करणें, । प्रत्यक्ष प्रमाण येसणें । म्हणौनियां. ॥ ६५ ॥ ठावें थोरां, सानयांसि. । आतां अविश्वासमति काइसी ? । ईश्वर देवात्मा; ययासि । नित्य भजावें. ॥ ६६ ॥ देवात्मा तो विश्वात्मा । भाग्यें जोडला आधी आम्हां. । कवण जाणे महिमा । यया पुरुषाची ? ॥ ६७ ॥ वचन तें प्रमाणपूर्वक; । नाहीं उणें अथवा अधिक. । मूर्ख, पामर आम्ही लोक, । जे विकल्पु धरूं." ॥ ६८ ॥ ऐसेंति भक्तिभावें कव्हन । क्रमला दिव्रसु, रात्रिमान. । अपर दिनीं मागुतेन । जन मीनले. ॥ ६९ ॥ करिते जाले संप्रधारु. । आतां येकु पुसणें विचारु. । "पुढें काय कारणहारु । राक्षसु तो ? ॥ १९७० ॥ न फळतां पुढील आचरण । चितेचें आधी कारण. । सीवसेजारीं विघ्न । बरवें नव्हे." ॥ ७१ ॥ ऐसें एक अनुवादले, । तें समस्तांतें मानलें; । मग यथाकाळीं आले । दर्शना देवाचिया. ॥ ७२ ॥ मंत्रानुष्ठाना अवसानीं । पुसते जाले मागुतेनि, । आधीं स्तवन करूनि । प्रेमपडिभरें. ॥ ७३ ॥

" जें जें आम्हीं पुसिलें, । तें तें देवें सांगीतलें; । परतु येक आथी उरलें । पुसावया, जी. ॥ ७४ ॥ पुढें तो निशाचरु । काय असे करणहारु ? । तया हृदयींचा विचारु । प्रकट करावा." ॥ ७५ ॥ देवात्मा बोले वाणी. । " शंका सांडिली तुम्हीं जनीं. । क्षणक्षणा येऊनि । हेंचि पुसा. ॥ ७६ ॥ नाहीं देवाचें अनुसरण, । नव्हे कर्मभक्तियोगसाधन; । वृथा करा, करवा पींटण । इये वाचेचें. ॥ ७७ ॥ अमोल्य नरदेह पावोन । आणि आयुष्य प्रमित जाणोन, । व्यर्थ कालाचें क्षपण । करा, करवा. ॥ ७८ ॥ बाळत्व गेलें खेळणें, । हास्यें, विनोदें, मनोरंजनें. । तारुण्य मदें तेणें । इंद्रियांचिया. ॥ ७९ ॥ विषयकामु अनुभवितां, । विषयाचारु करितां, । मदें, मत्सरें सर्वथा । गेलें यौवनत्व. ॥ २९८० ॥ आता पावले वृद्धपण, । तें करा ऐसें काळक्षपण; । ययापुढें मरण । ते अनिवार असे. ॥ ८१ ॥ जंव तें नाहीं पावलें, । तवचि हित साधावें आपुलें; । अस्तमान तवचि दुर्बळें । चालावा पंथु. ॥ ८२ ॥ मरणकाळाची मिठी । जव ते न पडे दृष्टी, । तवचि हिताची भेटि । गोष्टि आहे. ॥ ८३ ॥ धर्मार्थकाम हीं सकळ । संसारपोषकत्वें विफळ; । येके मोक्षेंवीण टवाळ । काय करावें. ॥ ८४ ॥ आता वचन आइकावें. । वृथा काळक्षपण न करावें. । पारमार्थिक बोलावें, । पुसावें वचन. ॥ ८५ ॥ कवणाचें वित्त, गोत्र, जन, । स्त्रीपुत्रादि, पशु, धन, । जेव्हेलीं देहचि साडून । जाणें पडे ? ॥ ८६ ॥ कवणाचे मित्र, वैरी ? । कैंचे सुखदु:खभोग शरीरीं ? । जीर्णें हें स्वप्नापरी । दों चौं दिसाचें. ॥ ८७ ॥ उसिणें किंवा जाइजणें, । वया क्षीण क्षणक्षणें; । मूळ पाठविलें मरणें । वार्धक्य हें. ॥ ८८ ॥ आता इतुला उपदेशु । नाइकाल तुम्ही पशु, । तरि आम्हां तंव त्रासु । आला येणें. ॥ ८९ ॥ हें येक तुमचें काज । आम्ही संपादू सहज; । मग यावरि मज । न लागावा शब्दु."
॥ २९९० ॥ आइकोनि इतुलें वचन, । बोलती अवघे जण. । " देवा, हेंचि येथून । प्रमाण आमुचें. ॥ ९१ ॥ इतिलेंचि सांगा, मग पुरे. । पुसों परमार्थाचींचि उत्तरें. । चाड नाहीं संसारें, । शरीरें आम्हां. ॥ ९२ ॥ इतुलें नमनूनि पुडती । येईल पुसों तुम्हांप्रति, । तो शापूनि, देवमूर्ति, । भस्म करावा." ॥ ९३ ॥ ऐसें प्रमाणपूर्वक बोलणें । आइकोनि, देवात्मा

' साधु ' म्हणे. । मग मंत्रयोगानुष्ठानें । आवाहनी तया. ॥ ९४ ॥ विकट न्यास, विकटा मुद्रा, । विटंकु जपु तो जाला पुरा; । मग वामकनिष्टिकाग्रा । दावूनियां, ॥ ९५ ॥ वृक्षीं राक्षसातें आणून, । आवरणत्रयें करी बंधन, । मग तेणेंसीं संभाषण, । जाणों, करी. ॥ ९६ ॥ एसे हावभाव दावुनि । बोलता जाला तेथूनि. । लोकांतें म्हणे, " श्रवणीं । ठेवा भावो. ॥ ९७ ॥ जये स्थानीं असे निशाचरु, । आणि तयाचा परिवारु । तो तेथें मीनला येकत्रु । काळें येकें. ॥ ९८ ॥ तयांमाजीलु श्रेष्ठु, । जो किं राक्षसु उत्कटु, । वृक्षाग्रीं जो येकटु । बैसला होता, ॥ ९९ ॥ तो समस्तीं येरीं स्तविला, । स्तवूनि प्रसन्नु केला; । मग तयाप्रति आपुला । भावो बोलती. ॥ ३००० ॥ " स्वामी, आम्ही निशाचर; । क्षुधा आमुतें अपार; । दृष्टी तरुवर, पाथर । तेही नुरती. ॥ १ ॥ पक्षांदिकाचा आहारु, । श्वापदाचा फळाहारु, । मनुष्य सांपडे तें थोरु । सणुचि आम्हां. ॥ २ ॥ ऐसयां आम्हांलागून । कैसें हें पुरवे वन ? । येथ उरले पाषाण । मात्र केवळ. ॥ ३ ॥ श्वापद न पडे नयनीं, । पशु तो न दिसे स्वप्नीं, । मा मनुष्य सांपडे, हें ये स्थानीं । न घडे सर्वथा. ॥ ४ ॥ तरि आम्हीं काय, जी, करावें ? । उपवास किती काढावे ? । शरीर तऱ्ही सोडावें । ऐसें जालें. ॥ ५ ॥ आमुतें जालें च्यवन । तये लंकापुरीपासून; । तें येक तुटलें बंधन । एकदेशिवाचें. ॥ ६ ॥ आतां नियमु तो काइसा ? । आम्ही भ्रमों दहाही दिशा. । स्वभावें मनुष्यलोकु आपैसा । सांपडला असतां. ॥ ७ ॥ सकळां बंधनीं सुटलों, । परि एकें सदृढ बांधलों; । जे तुम्हांपासाव चलों । हें मानस नेघे. ॥ ८ ॥ तुम्हांचिजवळि असावें, । योजनत्रयचि जावें, यावें, । निशीकाळीं मिळावें, । तुम्हांचिपासीं. ॥ ९ ॥ ऐसा आमुचा निर्धारु । यालागीं नापेक्षूं आहारु; । म्हणौनि निदान पावलें, सहारु । होईल सर्वांचा. ॥ ३०१० ॥ तुवां ईश्वरेंवांचून । आमुचें गोमटें विचारी कवण ? । आतां आमुचें मरण । निवारावें. " ॥ ११ ॥ इतुलें आइकोनि बोलणें । राक्षसेश्वरु तयां म्हणे. । " तुम्ही चिंता करा क्षणें । मातें असतां. ॥ १२ ॥ न मिळे आहारु यये स्थानीं, । तरि यावें आतां हें सांडूनि. । उत्तम स्थळ तुम्हांलागूनि । आधीं विचारिलें. ॥ १३ ॥ आतां तें कवण ? पुसाल, ।

तरि देवात्मा आहे तें स्थळ. । द्विपदीं मनुष्यीं सकुळ । अपाडेसीं. ॥ १४ ॥ नित्य सात पांच योहरें । आणि सानीं लेंकुरें सकुमारें. । काय कराल वनचरें, । मानवें असतां ? ॥ १५ ॥ न होतें पूर्वी देखिलें, । सहज ऐसें घडलें; जे तेथिचें नित्य जोडलें । जाणें, येणें. ॥ १६ ॥ तें कवणें येकें कौतुकें । किंवा गतवार्तेचेनि सुखें । नित्य नेती मंत्रमुखें । पाचारूनि. ॥ १७ ॥ भाग्य तुमचें आगळें, । म्हणौनि ऐसें घडलें; । जे आमुतें दृष्टी पडिलें । सुरवाडी स्थळ. ॥ १८ ॥ यया विटपाहूनि आगळा । अश्वत्थु सुरवाडी तेथ आ- थिला. । राहता ठावो विचारिला । आपुला आम्हीं. ॥ १९ ॥ पुढें आम्ही जाऊन । तया वृक्षा वळँघों; । तुम्हीं यावें मागून । अवघींचि जणीं ॥ ३०२० ॥ प्रथम जाता समस्तीं । देखोनि मानव पळती; । तथापि कोठें जाती । आम्हांपुढां ? ॥ २१ ॥ तयां गति चरणांची; । आम्हां, मना, पवनाची. । पाठि घेऊन तयांची । धरू टिशूनि. ॥ २२ ॥ परंतु बुद्धि कां न करावी ? । तरि हे गोष्टि आइकावी; । यापरी बैसविलें जीवीं । सकळै- काचे. ॥ २३ ॥ आतां तो येथें येईल, । येचि पिपळीं बैसेल. । प्रयक्ष मूर्तिमतु प्रकटेल, । ऐसें आहे. ॥ २४ ॥ इतुलें आजिचें वर्तमान । सागी- तलें भविष्यचिन्ह. । आता आमुचें अनुष्ठान । भगू नका. ॥ २५ ॥ हा काळु केली वटवट, । तेणें जालें जीवा कष्ट; । आता येथूनि कपाट । मेवू आम्हीं." ॥ २६ ॥ इतुलें वचन बोलोनि । प्रवर्तला भूमिखननीं; । आयासें अपारें करूनि । तळघर केलें. ॥ २७ ॥ सदृढ तयाचे कपाट, । नाकड येकपाउली वाट, । चोरखीळि वळकट; । तेंचि कैसी ? ॥ २८ ॥ आतुनि का बाहेरूनि घालिजे, । मग काढिते अग नुमजे; । ऐसी कळा सहजे । केली द्वारा. ॥ २९ ॥ मग भोजनादिक सपादूनि । अतरीं बैसला जाऊनि. । बाह्य व्यापार सांडूनि ॥ प्रवर्तला योगीं. ॥ ३०३० ॥ पूर्वरात्रि ऐसी क्रमूनि, ॥ लोकाचीं दृष्टि चुकवूनि, । बाहेरि आला तेथूनि, । काय करी ? ॥ ३१ ॥ मार्गीची सामग्री घेऊन । तेणेंचि क्षणें केलें गमन, । द्वार सुबद्ध घालून । नुघडे ऐसें. ॥ ३२ ॥ शीघ्र पशु चाले गती. । आला कनिष्ठा बंधूप्रति. । भेटि जाली मग अती । सांग वर्तमान. ॥ ३३ ॥ ऐसें इकडे वर्तलें; । तव येरीकडे काय जालें ? । जन तेथून उठिले, ।

विचारु करिती. ॥ ३४ ॥ वैसोनि अवघे येके स्थानीं । बोलते जाले वचनीं. । दचकु पडला मनीं । राक्षसाचा. ॥ ३५ ॥ येक म्हणती, "आइकिलें, । उपरातें हें कैसें जालें ? । आम्हीं कासया, हो, पुसिलें । राक्षसाचें वर्तमान ? ॥ ३६ ॥ का पाचारिला तो येथें ? । तेणें देखिलें यया स्थळातें. । जळो हे गोष्टींचें तुमतें । वहुसाल व्यसन ! " ॥ ३७ ॥ एक म्हणती तये वेळीं, । " तुमचीचि जिव्हा वळवळी, । खटीं पडली अळी । जयापरी. ॥ ३८ ॥ तुम्ही का पुसिलें चरित ? । काय निववलें होतें तेथ ? । आणिले कीं आम्हा दुश्चित । अवघेयासि. ॥ ३९ ॥ रिकामी असता वखरी । खडीचा भारु होये शरीरीं, । ऐसाही येकाधे नरीं । स्वभावो असे. ॥ ३०४० ॥ हृदय दाटे बहुसाल, । वाटे भारावले स्थूळ, । गोष्टीवीण केवळ । ऐसें होये ॥ ४१ ॥ मग घरोघरीं भ्रमतु, । दुजा पाहे सागातु, । मातुवरि काढी मातु, । सरो नेदी ॥ ४२ ॥ वाटे जातया वैसवी, । कथेचें अनुसधान लावी, । भेटला म्हणिजे राय गोवीं । मनुष्यातें. ॥ ४३ ॥ मनुष्य न पडे दृष्टी, । मग बाळाप्रति सागे गोष्टी, । नातरि आपणुचि पटपटी । आपणामाजी " ॥ ४४ ॥ परतोनि ते अनुवादती, । " अपार खोडी तुम्हाप्रति । कुचरपण तें किती । आता सागावें ॥ ४५ ॥ कार्यप्रसगीं न बोलणें, । चुकल्या दोषु आरोपणे, । इतिहासें वर्म प्रकाशणें । माणुसाचें. ॥ ४६ ॥ तुम्हीं का म्हणितलें 'हु हु' ? । आइकावयाचें तुम्हा बहु, । अवधान ना दिशा चहूं । श्रोत्रेंद्रियाचें. ॥ ४७ ॥ येक येकाची खोडी । शब्दश्रवणाचिया आवडी । श्वान याळेरा फडफडी । तेंचि आइके. ॥ ४८ ॥ न म्हणे रुदन, गायन, । प्रेतेंसीं लावी कान, । का खळाळींचें जीवन । बोल्तें आइके.' ॥ ४९ ॥ ऐसें येक येका वोल्ती, । सिविवयागाळीवरि येती । हसनक्रियेचा अतीं । मोडविती येक ॥ ३०५० ॥ एक म्हणती, पुसिलें । हे येक वरवेंचि जालें, । अनागत अरिष्ट कळलें । तेणें उपायें." ॥ ५१ ॥ येक म्हणती "करा श्रवण, । कथारसामृतपान, । जळो तुम्चें वडिलपण । बुद्धिहीनाचें !" ॥ ५२ ॥ येक वोल्ती. "निम्तें । आमुच्या मनातें येत न होतें, । उगेंचि पडोनि भिडेत । आम्हीं हो म्हणों." ॥ ५३ ॥ येक म्हणती "पळावें" । येक म्हणती. "कें जावें ? । पाठि

घे तें नागवे । राक्षसु तो. ॥ ९४ ॥ देवालयाचिपासीं असतां । प्रेतु आहे वांचता. । ययातें सोडूनि जातां । रक्षी कवण ? ॥ ५५ ॥ भक्ताकारणें पावेल, । आमुचेंही काज होईल, । आतां सोडूं नये स्थळ । देवाजीचें." ॥ ९६ ॥ ऐसा तर्कु करिती जन, । मध्यें मध्यें होये भांडण, । अनिवार शब्ददान, । अवाच्यवाद. ॥ ९७ ॥ अवचटे आघातु आइकती, । येकावरि येक पडती. । "आला, आला, रे," म्हणती । " राक्षसु तो." ॥ ९८ ॥ सर्वेचि येती समाधाना. । समुदायें विचारिती प्रेन्ना. । येतयां मार्गस्था जनां, । जातया पुसती. ॥ ५९ ॥ " नाहीं की देखिला येतां । राक्षसु ? सांगा तत्वता. । ते हांसती अपूर्वता । आइकोनि बोलाची. ॥ ३०६० ॥ ते जैसे ययां देखोनि । हांसती, हेही तयांलागूनि. । मुर्खी ययांतें कानीं । पडलेंचि नाथी. ॥ ६१ ॥ प्रतिदिनीं प्रातःकाळीं, । माध्यान्हीं आणि सायंकाळीं । जन पाहती पिपळीं, । तळीं, सेंडां. ॥ ६२ ॥ सातपांच दिवस क्रमले, । लोकांचे भय क्षीण जाले; । साच कीं मिथ्या ? लागले । तर्कु करूं. ॥ ६३ ॥ येक म्हणती, 'साचार.' । येक म्हणती, 'मिथ्या समग्र. । भूतभविष्य अपार । सांगती जन. ॥ ६४ ॥ तयांमाजी दोहों वचना । भूत तें फळे सुजना, । म्हणौन सत्य तें, ऐसे मना । आमुचया आलें. ॥ ६५ ॥ भविष्य येकाधा बोले, । परी अद्यापि सत्य नाहीं जालें. । चरहृदयींचें न कळे । कव्हणासिही." ॥ ६६ ॥ भयाची वृत्ति गेली, । परतु निःशेष नाहीं जाली; । नित्य यात्रा पिपळीं । करीत असती. ॥ ६७ ॥ ऐसें इकडे वर्तलें. । तंव येरीकडे काय जालें ? । दोघे भाऊ बैसले. । विचार करिती. ॥ ६८ ॥ ज्येष्ठ सांगीतला वृत्तांतु. । तो कनिष्टें आइकिला समस्तु. । म्हणे, " तुझिये युक्तीचा अतु । कवणें जाणावा ? ॥ ६९ ॥ आमुचें हेंचि करणें, । जें आर्यवचन पाळणें; । नलगे आम्हां पुसणें । वेगळेंचि." ॥ ३०७० ॥ ज्येष्ट बोले, "चालावें. । आम्ही दोघीं तेथे जावें. । पूर्विला ऐसें तुवां करावें । बैसोनि पिंपळीं. ॥ ७१ ॥ मी प्रवेशैन तळवरीं, । तो सहसा न निघे बाहेरी । मग पुढील युक्ति शरीरीं । असे वेगळीची." ॥ ७२ ॥ ऐसा विचार करूनि । दोघे निघाले तेथूनि. । स्थळ पावले रातिमानीं । आपुलें तें. ॥ ७३ ॥ ज्येष्ठु भुयेरां रिघाला, । द्वारनिग्रहो बरवा

केला. । कनिष्ठु शाखा वळघला । अश्वत्थाची. ॥ ७४ ॥ ऐसें क्रमलें निशिमान। मग पाहलें क्रमेंचिकरून. । दुश्चित आपुलाले जन । ठायीं ठायीं. ॥ ७५ ॥ कितुलेनि एकें काळे । दोघ, चौघ आले मेळे. । चुकवूनि वृक्षाचें आळें, । बैसले तळीं. ॥ ७६ ॥ मग त्याचि वार्ता करिती, । राक्षसातें निंदिती, । तव प्रसंगें सहज वरुती । दृष्टि गेली. ॥ ७७ ॥ अवचट देखिला नयनीं, । जैसा ठसावला होता मनीं; । दचकु गेला अंत करणीं, । भूलि जाली. ॥ ७८ ॥ श्रवणीं बैसली टाळी, । शरीर पडले भूमंडळीं, । गात्रें कापती, हृदयउखळीं । काढिती प्राण, ॥ ७९ ॥ नयनीं पडली झापडी, । कढती सर्वांगींच्या नाडी, । रसनेची जाली घडी. । शब्दु हारपला, ॥ २०८० ॥ बोबडी पडली वाचेते, । शब्द नाठवती वचनाते, । शक्तिहीन करचरणातें । शरीर नुचले, ॥ ८१ ॥ उठिताचि वळे वेंगटी, । चाळता पायां पडे अढी, । हृदया ऐसे मुरवाडी । साडिले मने. ॥ ८२ ॥ बुद्धि न स्फुरे भयाकारे, । दिवसाचि जालें आधारें, । पूर्व, पश्चिम, साक्षात्कारें । दिशा न कळे. ॥ ८३ ॥ ग्रामाची सोये चुकली, । आवाट, वटेपरी भासली, । विसरोनि धावे, चालीं. । गडबड्चि लागले. ॥ ८४ ॥ आगाचा करूनि गाटा । पैलथडि गेले गडवडा. । मग उठिले मागा पुढा । पाहत पाहत. ॥ ८५ ॥ हळू हळू पाऊल करिती, । जान्‌ घेता शकती, । साचलु होऊ नेदिती । शरीराचा. ॥ ८६ ॥ आघातु आइकोनि पडती; । पडले मागुते उठिती; । दक्षिणे ग्रामु, चालती । उत्तरेकडे. ॥ ८७ ॥ तयाचें देखोनि चिन्ह । धावत आले दोघ. चौघ जन. । वार्ता पुसती; परि वचन । न फुटे येरा. ॥ ८८ ॥ कितुलेनि येकें काळें । तयाचे वृत्त कळों आलें. । मग तेही सलेन पडिले, जाले । तया ऐसे. ॥ ८९ ॥ ययापरी जो पावे, । तो तैसाचि होये स्वभावें, । पाळा पडिला, तो भवे । तेथेंचि भवता. ॥ २०९० ॥ मग कितुलेन येकें काळें । उमजोनि गावातु आले; । कापत कापत सांगातलें । वृत्त सकळ. ॥ ९१ ॥ आइकोनि श्रवणीं वार्ता । समस्ता आली व्याकुळता. । 'आला. आला.' हें समस्ता । कळों आले. ॥ ९२ ॥ येक बैठेचि व्याकुळ, । विसरले आपुलें स्थूळ, । मुखें द्रवे लाळ, । ऐसे जालें ! ॥ ९३ ॥ येकाची मेटें

वळलीं, । मुखातें कोरडि पडली, । खापरा ऐसी जाली । निबर जिव्हा. ॥ ९४ ॥ येक ते देती हांका. । धैर्य गेलें सकळैकां. । शरीरें सोडिली शंका. । काय करिती? ॥ ९५ ॥ उठिती, बैसती, धांवती, । जाती घराबाहिर, येती, । कोठेंचि नाहीं विश्रांति, । ऐसें जालें. ॥ ९६ ॥ क्षणक्षणा वाटे लघुशंका, । क्षणक्षणा ते दीर्घशंका, । मग ते सांडूनि लोकशंका । तेथेंचि बैसती. ॥ ९७ ॥ येकाचें धोत्र भरलें, । येकाचें गळोंनि गेलें, । येका हातींचें सुटलें, । सांभाळेविना. ॥ ९८ ॥ राक्षसभये भीती, । लेंकुरें झोंबो येती, । तयां उबगले मारिती, । नेदिती लागों. ॥ ९९ ॥ स्त्रिया येती काकुळती, । तें देखोनि पुरुष रडती; । आसक्त ते गुंपती, लागती । शोकु करूं. ॥ ३१०० ॥ येक जाले उदासीन, । सांडूनि स्त्रिया, पुत्र, धन; । पळों लागले नग्न । दिशा च्यान्ही. ॥ १ ॥ गाई, वांसुरें चुकलीं, । 'हंबा'-शब्दें गर्जो लागलीं; । कोळाहळ मांडिले मूलीं, । रडती स्त्रिया. ॥ २ ॥ पुरुष देती हांका, । येक बोंभाती येकां, । येकुचि जाला असका, । राष्ट्र तयांचा. ॥ ३ ॥ कानीं पडले भाइकवें, । खालीं पडलें नेधवें, । काय करावें नेणवे, । उगेचि धांवती. ॥ ४ ॥ हृदयीं कालवे कायें, नेणों. । येक ते लागले खणों; । मग उगेचि बुजीती, जाणों । पुरिलें कांहीं. ॥ ५ ॥ येक ते मोटळीं बांधिती, । वाड्याबाहिर टाकिती, । तयांतें चोर नेती । ऐसें क्वण! ॥ ६ ॥ माणुस माणुसा अडखुळे, । माणुसा देखोनि माणुस पळे, । माणुस माणुसा न कळे । आपपरानें. ॥ ७ ॥ आपुलें विसरले नांव, । मा परावें विसरती; काय अपूर्व? । वाटेवरि पटले देव । अडखुळती तयां. ॥ ८ ॥ समस्त मुक्तकेश धांवती, । त्यामाजी बोडिके वागती; । गृहस्थ आणि यति । येकवाट जैसे. ॥ ९ ॥ पाणी वोतूनि माजिघरीं, । रितिया कळसिया आपरी. । तरें, सांपायें तियांभीतरीं । व्याळूनि पाहती. ॥ ३११० ॥ नसमाने देखोनि साडिलें. । आंगणींचें घोडें सोडिलें, । मग तें धांवे बुजालें । च्यान्ही दिशा. ॥ ११ ॥ अश्व धरावयाची त्वरा, । माजिचा काढूनि कडदोरा, । खुंटीसि घालिती; उबरा । दाराचा उचलिला. ॥ १२ ॥ आणावया जाये कुदळी, । तंव आणी सहाण वाटोळी. । बुवत्ता न माये. मग ठेविली । तैसीचि ते. ॥ १३ ॥ स्वयंपाकपात्रें विटाळिलीं, । नेऊनि

पायखोळां ठेविलीं; । पुस्तकें अडीं घातलीं । जतनेलागीं. ॥ १४ ॥ बाळकांसि दोरीकारणें । दावीं सोडिलीं येकें जणें. । गाड चाकाचें संदणें । बांधों लागला. ॥ १५ ॥ तांतडी काढावें पाणी, । म्हणौनि घेतला वन्हि. । लेंकरूं म्हणौनि आंथुरणीं । निजविला तो. ॥ १६ ॥ भडका शांतु करणें, । म्हणौनि पेवें खाणें. । माजी रिचवूनि दुधाणें, । माती घातली. ॥ १७ ॥ चोळी बांधे खिळेरां, । पालाणावयाची त्वरा. । रांजणांतील मातेरा । बाहेरि काढी. ॥ १८ ॥ आतां तो चोखटु करणें, । म्हणौनि फोडिलें संदणें; । काठेपरा खुंटिये घालणें, । ऐसिया प्रवर्तला. ॥ १९ ॥ डोये घेऊनि पोटीं । उठिला वैसे; वैसला उठी. । घोडें लावूनि वोठीं । प्राशी ताक. ॥ ३१२० ॥ अवघेचि जन लगबगिले. । काये करावें तें न कळे. । मग काष्ठी होऊनि वैसले । आपेआप. ॥ २१ ॥ येकाची त्वरा देखती, । मग अवघेचि लगबगिती; । नव्हे तें कार्य करिती, । बुद्धी सूटले. ॥ २२ ॥ येकांतें देखती निवांत, । अवघेचि होती तटस्थ. । हांक आइकोनि समस्त । हांका देती. ॥ २३ ॥ यापरी क्षणेकु निश्चळता, । क्षणेकु उठीं चंचळता, । क्षणेकु हाका, निर्विकल्पता । क्षणेकु होये; ॥ २४ ॥ ऐसे जनीं डहुळलें, । क्षणा येका तें राहिलें, । मग विचारु करूं लागले । थोर थोर जन. ॥ २५ ॥ येक म्हणती, "पळावें." । येक म्हणती "तें न फवे." । राक्षसु पाठीं धांवे । तेव्हेळीं कैसें? ॥ २६ ॥ येक बोलती वचन । "रिघा देवात्मया शरण, । तो वांचवील प्राण । निर्धारेंसीं." ॥ २७ ॥ येक म्हणते जाले । "आतां तो आम्हासीं न वोले, । कपाट असे सेविलें । नये बाहेरि. ॥ २८ ॥ आजि पक्षु पूर्ण जाला, । देवात्मा नळघरीं रिघाला, । टाळी लावूनि वैसला । उठी केंवि?" ॥ २९ ॥ येक म्हणती आदरें, । "तेथ जाणें हे तंव खरें, । आणीकु प्रेत्नु निर्धारें । आथीचिना. ॥ ३१३० ॥ हाका देऊनि बोवातां । सहज पावे विक्षिप्ता, । मग आले देखोनि भक्तां । बाहेरि निघैल." ॥ ३१ ॥ येक वचन बोलती, । "नेमु केला आथी, । व्यवहारिक पुडती । न पुसावें, ऐसा. ॥ ३२ ॥ तया नियमा जो चुके । त्यातें शापा तुम्हीं मुखें, । ऐसें आमुचेनिचि मुखें । निश्चित जालें." ॥ ३३ ॥ येक म्हणों लागले, । "प्रथमींचि ऐसें कां नासिलें? । आतां कपाळ घ्या आपुलें, । पिटा वदन.

॥ ३४ ॥ येक म्हणती, "आलें मरण । तरि सांडावें सत्य आपण, । बोंबातां नेटें आंतून । येईल बाहेरि तंव. ॥ ३५ ॥ मग तो अनाथां कृपा करू, । अथवा शापू, मारू, । परंतु वांचावया विचारु । आणीकु नसे." ॥ ३६ ॥ येक म्हणती "जावें कैसें? । तेथेंचि पाशीं राक्षसु असे, । बोंबातां "देवा ऐसें" आइकैल तो. ॥ ३७ ॥ मग तळीं उतरैल । येकेंचि ग्रासें घेईल, । देवात्मा केव्हां आइकेल । कवण जाणे?" ॥ ३८ ॥ येक म्हणती, "लपत जाणें । हळूहळूचि बोबाणें । राक्षसा काळों ने देणें । आपुलें चिन्ह." ॥ ३९ ॥ दुसरा प्रेग्नु नाथी । म्हणौन अवघे, "हो" म्हणती. । मग भक्तांतें घेती । आपणांसवें. ॥ ३१४० ॥ हळूहळूचि चालती, । सांचळ तोहीं नेदिती, । यापरी स्थळाप्रति । पावते जाले. ॥ ४१ ॥ तळघरापासीं आले । आडसें पाहोनि बैसले, । मग ते स्मरण करूं लागले । तया देवाचें. ॥ ४२ ॥ "देवा, देवा, देवा, । देवोत्तमा, आदिदेवा, । देवात्मया श्रीशिवा, । पाव, पाव." ॥ ४३ ॥ ऐसें वेळोवेळां बोंबातां । प्रतिउत्तर नपवतीं, । मग चढवूनि कंठश्रुति । करिती स्मरण. ॥ ४४ ॥ "देवा, देवेशा, लोकनाथा, । देवात्मया, अनंता, । पाव, पाव, आतां । मरण आलें." ॥ ४५ ॥ ऐसेंहीं करितां स्मरण । नपवति तयाचें प्रतिवचन. । म्हणती, "ऐसे कैसें ध्यान । देवात्मयाचें?" ॥ ४६ ॥ मग ते त्याहूनि नेटें । बोंबाते जाले परिपाटें; । तसी तैसी शंका फिटे । राक्षसाची. ॥ ४७ ॥ मग मोटेन शब्दु करिती, । अवघेचि हांका देती, । कृपा उपजे जिया रीती । देवात्मयातें. ॥ ४८ ॥ "देवा, आम्हीं पीडलों, । गेलों, मेलों, बुडालों, । राक्षसांमुखीं सांपडलों । तुझे भक्त." ॥ ४९ ॥ नाना करुणा भाषितां । उत्तर नपवतीं सर्वथा; । मग म्हणती, "वृथा । प्राणें गेलों." ॥ ३१५० ॥ मग आठवली युक्ति. । व्यावहारिकें वचनें श्रुती । देव जागृत न होती । तेणें पूर्वनिश्चयें. ॥ ५१ ॥ मग पारमार्थिकें प्रसंगें । बोलों लागले अवघे, । "देवा, देवा अगें । मतीचेन. ॥ ५२ ॥ अहो तें ब्रह्म कोटें? । देवा, देवा, भय वाटे, । बोलतां नये नेटें, । आमा सांगा. ॥ ५३ ॥ अहो, अहो, गोंसावी, । सृष्टी अवघी मायावी; । आजि आमुचां गांवीं । राक्षसु आला. ॥ ५४ ॥ देवा, तें ब्रह्म देखिलें, ।

आतां बाहेरि या वहिलें; । राक्षसें आम्हां ग्रासिलें । धांव घ्या, पां. ॥ ५५ ॥ देवा, जे ब्रह्म होतें । तें राक्षसें नेलें आइतें, । पोतलें पडलें रितें । आम्ही नेणों. ॥ ५६ ॥ अहो, सांगा ब्रह्मज्ञान; । आमुतें आलें मरण, । जळालें तुमचें ध्यान । उठाना कां ? " ॥ ५७ ॥ ऐसें कठीण बोलोनि, । मग प्रवर्तले शंखध्वनी । येकु आगळा येकाहूनि, । ऐसे प्रवर्तले. ॥ ५८ ॥ तें तेणें राक्षसें देखिले, । तया आपुलें पूर्व स्मरलें, । नेटें हास्य केलें । सांभाळेचिना. ॥ ५९ ॥ ते आइकोनि हास्य श्रवणीं, । प्राणचि सांडिले जनीं. । मग "राक्षसा, बापा." म्हणौनि । स्तवन करिती. ॥ ३१६० ॥ " ब्रह्मदेवात्मया, राक्षसा, । बापा, रक्षीं आपुलया दासा, । आत्मा, परमात्मा, मरणदशा । पावलों," म्हणती. ॥ ६१ ॥ "राक्षसा, देवा, आत्मया. । ब्रह्म, गा, ब्रह्म देवात्मया । आमुतें रक्षीं, तुझयां । पायां लागों. ॥ ६२ ॥ अविद्या, अविद्या, माया; । राक्षसां पाव देवात्मया; । ब्रह्म सांग, जीवा यया । मरण आलें. ॥ ६३ ॥ वैराग्य राक्षस जाले; । ब्रह्म सांगा, मरण आलें; । आतां इतुलयावरि बोलें । कवणे याल ? ॥ ६४ ॥ तुमतें आण गुरूची, । आपुलिया सुकृताची, । देवा, पितया, मातेची; । ते ते पाळाल. ॥ ६५ ॥ आमुते राखा, राक्षसु । ब्रह्म मांडला जासु. । आमुचिये हत्येचा दोषु । तुम्हांवरि." ॥ ६६ ॥ इतुलें निर्वाण आइकोनि । देवात्मा "कां, रे ?" म्हणौनि । उभा राहिला तेचि क्षणीं । येऊनि बाहिरा. ॥ ६७ ॥ तुमतें कवणें, रे, पीडिलें? । सांगा शीघ्र काये जालें? । यया प्रापंचिका वेगळे । पारमार्थिक बोला. ॥ ६८ ॥ मग देवात्मयाते देखोन । अवघे करिती रुदन, । दुःख आठवलें गहन । पूर्वील तयां. ॥ ६९ ॥ व्याघ्रा मुखींचें सुटे । तया जनकु, का जननी भेटे; । तैं उवसे पोट फुटे, । प्रकटे रुदन. ॥ ३१७० ॥ मरणापासाव सुटिजे । आणि स्वजना देखोनि उपजे । तैसे जाले कींजे । म्हणौनि रुदन. ॥ ७१ ॥ कीं वैरियां हातीं पडिला, । तेथं कुनांसा जैं पावला, । तैं अधरस्पदु उपजला । सांटेचिना. ॥ ७२ ॥ ऐसें जनातें वर्तलें, । मग विनवूं लागले; । क्षणेकु तें दु.ख गेलें, । तया राक्षसाचें. ॥ ७३ ॥ "देवा, तुम्हीं जें सांगितलें । तें साचार प्रतीती आलें, । प्रत्यक्ष आम्हीं देखिलें । राक्षसातें. ॥ ७४ ॥ पैलु पिंपळीं बैसला, । आमुतें ग्रासूं प्रवर्तला, । तेणें भयें आम्हीं केला ।

धांवा तुमचा; ॥ ७५ ॥ आर्ता आश्रितां रक्षावें, । यया दुष्टातें मारावें, । सकळां अभय द्यावें, । हेंचि मागों." ॥ ७६ ॥ आइकोनि ऐसीं वचनें । देवात्मा तो काय म्हणे, । "तुम्हीं व्यवहारु न बोलणें, । ऐसा नियमु ॥ ७७ ॥ पूर्वी केला असोनि, । आतां चुकलेति ते क्षणीं । आमुतें शापु येथूनि । लागेल देणें. ॥ ७८ ॥ आमुचा शापु अनिवारु, । परि राक्षसु हा असंवरु, । जीणत्यां तुमचिया आधारु । कवणु आतां ?" ॥ ७९ ॥ ऐसे तापसें बोलिलें, । हातीं उदक घेतलें, । सांडावें, तंव आले । सकळ काकुळती. ॥ ३१८० ॥ "देवा, आम्हीं अज्ञान, । नाठवे पारमार्थिक वचन, । रक्षा आतां, येथून । तेंचि बोलों. ॥ ८१ ॥ आत्मा राक्षसु चिन्मात्र; । ब्रह्म, मेलों देवा समग्र; । सर्व माया, हें थोर । अरिष्टु चुकवावें. ॥ ८२ ॥ चैतन्यानंदघन, । लेंकुरां नाहीं अन्न, । शुद्ध ब्रह्म, निरंजन; । सोडवा, जी. ॥ ८३ ॥ अद्वैत ब्रम्ह निखळ; । शरीर जातसे विकळ । नेति, नेति, केवळ । शरण आलों." ॥ ८४ ॥ ऐसें समिश्र वचन आइकोनि । देवात्मा हासे मनीं; । मग अभयहस्तु उचलुनि । बोलता जाला, ॥ ८५ ॥ "माझेनि तुमतें अभय, । झणे धरा तुम्हीं भय, । असाधारण मंत्रवीर्य । असे मजपासीं. ॥ ८६ ॥ जीतुचि राक्षसु धरीन, । कान धरूनि नाचवीन, । तुम्हां हातीं देईन । बांधोनियां. ॥ ८७ ॥ राक्षसभय न धरणें, । आश्रमा आपुलिया जाणें. । हा राक्षसु मीं जाणें; । परि एक असे. ॥ ८८ ॥ करीन मंत्राचें अनुष्टान । तुमचें निरसावया विघ्न; । तेथें द्रव्याचें बलिदान । बहुसाल पाहिजे. ॥ ८९ ॥ ग्रामाबाहेरि वाळणें । तरि थोडेनीचि निधानें, । थोडेनि द्रव्यसाधनें । संपादेल तें. ॥ ३१९० ॥ देशाबाहेरि घालितां । विधि लागती बहुता, । द्रव्यबळ विचारितां । तैसेंचि तेथें. ॥ ९१ ॥ हा केवळ मारावा, । नव्हताचि ऐसा होआवा, । राक्षसु मिथ्या करावा । ज्ञानयोगबळें. ॥ ९२ ॥ तरि तैसेंचि वित्त पाहिजे; । आतां विचारु करा सहजें; । टाकेल तें वित्त आणिजे, । तैसी क्रिया. ॥ ९३ ॥ आजि करावी विचारणा, । उदैक यावें यया स्थाना; । मागें परतोनि पहावें ना, । उठा वेगीं." ॥ ९४ ॥ ऐसी आज्ञा पावोनि । जन उठिले तेथूनि, । मग ग्रामामाजी येऊनि । विश्रांति पावले. ॥ ९५ ॥ सकळ संग्रह विसंचले. ।

म्हणती, "हें कवणें केलें? । देव आंगणीं पडिले । आडळती पायीं. ॥ ९६ ॥ सवत्सा गेलिया गाई. । अर्थे तीं जालीं काई ? । लेंकरें कवणें ठायीं ? । ऐसें सांभाळिती." ॥ ९७ ॥ ऐसी करूनि विचारणा । स्वस्थ जाले येका क्षणा, । संतोषें घेऊनि अन्नपाना । निसिमान क्रमिलें. ॥ ९८ ॥ प्रातःकाळाचां समयीं,। अवघे मिनले येके ठायीं; । विचारु करिती " कैसें, काई । आतां करणें? ॥ ९९ ॥ अरिष्ट कालिचें चुकलें, । देवें भक्तातें रक्षिलें, । आतां पुढील हित सांगितलें; । तयाचें कैसें? ॥ ३१०० ॥ यया राक्षसाचा परिहारु । करावा, हा तंव निर्धारु; । आपुलाला अर्थु समग्रु । आम्हीं देऊन ॥ १ ॥ प्राणेंसीं वेगळें होणें, । सकळ वित्त देवासि देणें, । परंतु अत्यंताभावोच करणें । राक्षसाचा. ॥ २ ॥ प्राणधन वांचलें पुरे, । मग प्रेत्नाचेनि द्वारें । अर्थ अपार साचोकारें । साधूं येती." ॥ ३ ॥ ऐसी करूनि विचारणा, । घेऊनि आणा, प्रमाणा, । तया देवात्मयाचिया स्थाना । लोक आले. ॥ ४ ॥ तंव जैसा तैसाचि तो राक्षसु । अश्वत्थीं जयाचा निवासु, । आणी देवात्मा तो उदासु । अनुष्टानीं बैसला. ॥ ५ ॥ देखोनि ऐसें वर्तमान । देवात्मयामागें जन । बैसले निःशंक होऊन । स्मरणशील. ॥ ६ ॥ मंत्रानुष्ठानावसानीं । विनविती देवात्मयालागूनि- । "देवा, तुवां निदानीं । रक्षिलें आम्हां. ॥ ७ ॥ तया, तुझया उपकारा । उतराई न हों, सर्वेश्वरा; । देवो, आत्मा, गुरु, सोयेरा । तूंचि आमुतें. ॥ ८ ॥ मृतां सकळां जियविलें । अमृतोपमें बोलें, । तरी आतां येथूनि केलें । तें न्यावें सेवटा. ॥ ९ ॥ यया राक्षसाचा परिहारु । देवें करावा, हा प्रकारु, । यये अर्थीं निर्धारु । आमुचा ऐसा. ॥ ३२१० ॥ आम्हीं प्राणेंसीं आपुलाले । स्वतंत्र जालों; वेगळे । येर वित्त समर्पिलें । देवाचां पायीं. ॥ ११ ॥ काया, वाचा, मनसा, । आमुचा संकल्पु तो ऐसा; । उदक घ्या, जी, महेशा, । आपुलं करीं." १२ ॥ अवघेचि ऐसें म्हणती; । पागा काढूनि उभे ठाती; । तें देखोनि द्विजमूर्ती । हांसें आलें. ॥ १३ ॥ देवात्मा बोले वचन, । "पावलें हें तुमचें भजन, । तुमचें वित्त जतन । तुम्हीं करा. ॥ १४ ॥ जें राक्षसा हातीं पडलें, । तये ग्रामीं जें राहिलें, । तेंचि वित्त आपुलालें । समर्पा तुम्हीं." ॥ १५ ॥ जन बोलती तेणें काळें, । तें आम्हां-

पासाव तैंचि गेलें, । चोरां हातीं पडिलें, । तें आपुलें काय? ॥ १६ ॥ तस्करें नेलें धन, । तयाचें करितां दान, । अंतीं कैसें ब्रह्मार्पण । करितां वाटे? ॥ १७ ॥ मृत गौ दीजे ब्राह्मणा, । चोरें नेलें ती दक्षिणा, । हारपल्याचा पुनः । संकल्पु काइसा? ॥ १८ ॥ ग्रामीं असिलें अथवा नेलें । तें आम्हांपासाव तैंचि गेलें । दान तयाचें केलें । तें काय साचार? ॥ १९ ॥ देवात्मा बोले सहजें । "आमुतें तेंचि पाहिजे, । तुम्हीं संकल्पविधानें दीजे, । तरिचि घेणें. ॥ ३२२० ॥ मग "हो" म्हणौन उठिले । अवघेचि उभे राहिले, । संकल्पविधानें समर्पिलें । आपुलालें वित्त. ॥ २१ ॥ मग दानाचां अवसानीं । देवात्मा वैसला आसनीं, । न्यास करी तेचि क्षणीं । विपरीत जे. ॥ २२ ॥ हातीं, पायीं, पर्वी पर्वी, । नखीं नखीं, स्वभावीं । झाडोझाडीं हात ठेवी, । करी न्यास. ॥ २३ ॥ मुद्रा परोपरीचिया । बोला घाली वरि तया । सर्वांगें आळिपिळिया । देता होये. ॥ २४ ॥ ध्यान धरी तें विटंक, । खवाटां ठेवूनि मुख, । खेचरी मुद्रा आणिक । आसन उवडें. ॥ २५ ॥ आतां जपाची करणी, । उंचीं माळिका लांवूनि, । दोहीं हातीं वोढी मणि । पावो होणें. ॥ २६ ॥ जपावसानीं पटपट । करूनि आराइला स्पष्ट, । मग तीनि वेळ खटखट । हाणे काष्ठ काष्ठीं. ॥ २७ ॥ ऐसी चेष्टा करूनि, । हातीं अक्षता घेऊनि, । राक्षसा हाणे तेथूनि, । 'उतर' म्हणे. ॥ २८ ॥ आंगीं लागतांचि अक्षता, । राक्षसु जाला उतरता । हात जोडूनि पुढारता । उभा ठेला. ॥ २९ ॥ तें देखोनि नागरिक । संतोषु मानिती लोक, । म्हणती, "जालें काळें मुख । यया राक्षसाचें." ॥ ३२३० ॥ पुडती घेऊनि अक्षता । देवात्मा होये हाणता, । "वैस" म्हणे, "परुता," । राक्षसातें. ॥ ३१ ॥ तेणेंचि क्षणें तेणें मिसें । निशाचरु दूरि वसे, । देवात्मा पाहे आवेशें । "चाल, ये," म्हणे. ॥ ३२ ॥ तेणेंचि क्षणें तो शांतु । होऊनि, पासीं ये धांवतु, । दिसों लागला भयभीतु । देवात्मया पुढां. ॥ ३३ ॥ मग मंत्रयोगबळें करूनि । करिता जाला खिळणी, । हातीं, पायीं, वदनीं । स्पर्शे राक्षसातें. ॥ ३४ ॥ खिळूनि तया राक्षसातें, । देवात्मा बोले जनातें, । "पासीं येऊनि ययातें । पहा," म्हणे. ॥ ३५ ॥ "राक्षसु तो हा कवणु? । तोचि होये? कीं आनु? । भय सांडा."

म्हणती, "हें कवणें केलें?। देव आंगणीं पडिले। आडळती पायीं.॥ ९६ ॥ सवत्सा गेलिया गाई. । अर्थें तीं जालीं काई?। लेंकरें कवणें ठायीं?। ऐसें सांभाळिती." ॥ ९७ ॥ ऐसी करूनि विचारणा । स्वस्थ जाले येका क्षणा, । संतोषें घेऊनि अन्नपाना । निसिमान क्रमिलें. ॥ ९८ ॥ प्रातःकाळाचां समयीं,। अवघे मिनले येके ठायीं; । विचारु करिती "कैसें, काई । आतां कवणें? ॥ ९९ ॥ अरिष्ट काळिचें चुकलें, । देवें भक्तातें रक्षिलें, । आतां पुढील हित सांगितलें; । तयाचें कैसें? ॥ ३२०० ॥ यया राक्षसाचा परिहारु । करावा, हा तंव निर्धारु; । आपुलाला अर्थु समग्रु । आम्हीं देऊन ॥ १ ॥ प्राणेंसीं वेगळें होणें, । सकळ वित्त देवासि देणें, । परंतु अत्यंताभावोच करणें । राक्षसाचा. ॥ २ ॥ प्राणधन वांचलें पुरे, । मग प्रेत्नाचेनि द्वारें । अर्थ अपार साचोकारें । साधूं येती." ॥ ३ ॥ ऐसी करूनि *विचारणा, । घेऊनि आणा, प्रमाणा, । तया देवाल्मयाचिया स्थाना । लोक* आले. ॥ ४ ॥ तंव जैसा तैसाचि तो राक्षसु । अश्वत्थीं जयाचा निवासु, । आणी देवात्मा तो उदासु । अनुष्ठानीं वैसला. ॥ ५ ॥ देखोनि ऐसें वर्तमान । देवात्मयामागें जन । बैसले निःशंक होऊन । स्मरणशील. ॥ ६ ॥ मत्रानुष्ठानावसानीं । विनविती देवात्मयाल्मगृनि- । "देवा, तुवां निदानीं । रक्षिलें आम्हां. ॥ ७ ॥ तया, तुझया उपकारा । उतराई न हों, सर्वेश्वरा: । देवो, आत्मा, गुरु, सोयेरा । तूंचि आमुतें. ॥ ८ ॥ मृतां सकळां जिवविलें । अमृतोपमें बोलें, । तरी आतां येथूनि केलें । तें न्यायें सेवटा. ॥ ९ ॥ यया राक्षसाचा परिहारु । देवें करावा, हा प्रकारु, । यये अर्थीं निर्धारु । आमुचा ऐसा. ॥ ३२१० ॥ आम्हीं प्राणेंसीं आपु- *लाले । स्वतंत्र जालों; वेगळे । येर वित्त समर्पिलें । देवाचां पायीं. ॥ ११ ॥* काया, वाचा, मनसा, । आमुचा संकल्पु तो ऐसा; । उदक घ्या, जी, महेशा, । आपुलां करीं." १२ ॥ अवघेचि ऐसें म्हणती; । पागा काढूनि. उभे ठाती; । तें देखोनि द्विजमूर्ती । हांसें आलें. ॥ १३ ॥ देवात्मा बोले वचन, । "पावलें हें तुमचें भजन, । तुमचें वित्त जतन । तुम्हीं करा. ॥ १४ ॥ जें राक्षसा हातीं पडलें, । तये ग्रामीं जें राहिलें, । तेंचि वित्त आपुलालें । समर्पा तुम्हीं." ॥ १५ ॥ जन बोलती तेणें काळें, । तें आम्हां-

पासाव तैंचि गेलें, । चोरां हातीं पडिलें, । तें आपुलें काय? ॥ १६ ॥ तस्करें नेलें धन, । तयाचें करितां दान, । अतीं कैसें ब्रह्मार्पण । करितां वाटे? ॥ १७ ॥ मृत गौ दीजे ब्राह्मणा, । चोरें नेलें ती दक्षिणा, । हारपल्याचा पुनः । संकल्पु काइसा? ॥ १८ ॥ ग्रामीं असिलें अथवा नेलें । तें आम्हांपासाव तैंचि गेलें । दान तयाचें केलें । तें काय साचार? ॥ १९ ॥ देवात्मा बोले सहजें । "आमुतें तेंचि पाहिजे, । तुम्हीं संकल्पविधानें दीजे," । तरिचि घेणें. ॥ ३२२० ॥ मग "हो" म्हणौन उठिले । अवघेचि उभे राहिले, । संकल्पविधानें समर्पिलें । आपुलालें वित्त. ॥ २१ ॥ मग दानाचां अवसानीं । देवात्मा बैसला आसनीं, । न्यास करी तेचि क्षणीं । विपरीत जे. ॥ २२ ॥ हातीं, पायीं, पर्वीं पर्वीं, । नखीं नखीं, स्वभावीं । झाडोझाडीं हात ठेवी, । करी न्यास. ॥ २३ ॥ मुद्रा परोपरीचिया । बोला घाली वरि तया । सर्वांगें आळिपिळिया । देता होये. ॥ २४ ॥ ध्यान धरी तें विटक, । खवाटां ठेवूनि मुख, । खेचरी मुद्रा आणिक । आसन उबडें. ॥ २५ ॥ आतां जपाची करणी, । उंची माळिका लांबूनि, । दोहीं हातीं वोढी माणि । पावो होणें. ॥ २६ ॥ जपावसानीं पटपट । करूनि आराइला स्पष्ट, । मग तीनि वेळ खटखट । हाणे काष्ठ काष्ठीं. ॥ २७ ॥ ऐसी चेष्टा करूनि, । हातीं अक्षता घेऊनि, । राक्षसा हाणे तेथूनि, । 'उतर' म्हणे. ॥ २८ ॥ आंगीं लागतांचि अक्षता, । राक्षसु जाला उतरता । हात जोडूनि पुढारता । उभा ठेला. ॥ २९ ॥ तें देखोनि नागरिक । संतोपु मानिती लोक, । म्हणती, "जालें काळें मुख । यया राक्षसाचें." ॥ ३२३० ॥ पुडतीं घेऊनि अक्षता । देवात्मा होये हाणता, । "बैस" म्हणे, "परुता," । राक्षसातें. ॥ ३१ ॥ तेणेंचि क्षणें तेणे मिसें । निशाचरु दूरि बसे, । देवात्मा पाहे आवेशें । "चाल, ये," म्हणे. ॥ ३२ ॥ तेणेंचि क्षणें तो शांतु । होऊनि, पासीं ये धांवतु, । दिसों लागला भयभीतु । देवात्मया पुढां. ॥ ३३ ॥ मग मंत्रयोगबळें करूनि । करिता जाला खिळणी, । हातीं, पायीं, वदनीं । स्पर्शे राक्षसातें. ॥ ३४ ॥ खिळूनि तया राक्षसातें, । देवात्मा बोले जनातें, । "पासीं येऊनि ययातें । पहा," म्हणे. ॥ ३५ ॥ "राक्षसु तो हा कवणु? । तोचि होये? कीं आनु? । भय सांडा."

म्हणौनु । रक्षा लावी. ॥ ३६ ॥ मग तिये रक्षेचेनि । वळें निःशंक होऊनि, । राक्षसापासीं येऊनि । जन उभे ठेले. ॥ ३७ ॥ येक म्हणती, "पापिष्टा, । जासी आमुचिया वाटा, । वहू स्वार्थु वोखटा, । विनाशकु." ॥ ३८ ॥ येक म्हणती, "राक्षसगणीं । भय नवटे आम्हां मनीं." । राक्षसु धरिती कानीं । धावोनियां. ॥ ३९ ॥ येक म्हणती, "इतुलें । येथ भय तें कां आलें? । आम्हां धाकुलीं असतां मुलें । भूतें धरु." ॥ ३२४० ॥ येक ते जाले सामोरे. । आम्हीं "हनुमंताचे पुजारे । यिये भूतबाधेचें वारें । नेणों स्वप्नीं." ॥ ४१ ॥ येक रामरक्षा जपती, । येक आंगवळेंचि येती, । अवघे मिळोनि डंवचिती, । वोलती कठिण. ॥ ४२ ॥ "येसील आमुचिया ग्रामा? । वोलांडिसी आमुची सीमा? । आइकिला नव्हता देवात्मा । काई, रे, तुवां? ॥ ४३ ॥ अरे, अरे मंदमति, । पुढें तुझी कैसी गति"? । ययापरी निभ्रंशिती । नागरिक. ॥ ४४ ॥ येक म्हणती, "रहा, रहा; । तैंचा होये कीं नव्हे हा?" । मिळोनि सात, पांच, दहा, । पासीं आले. ॥ ४५ ॥ पहिलेंचि जया झोंबिन्नला । तेणें तत्वता वोळखिला, । मग दुसरयातें दाविला । तो "होये," म्हणे. ॥ ४६ ॥ जे जे होते पासीं । खूण आली तयां सर्वांसीं; । म्हणती, "का, रे, कैसी । तैंची व्यवस्था? ॥ ४७ ॥ विटपावरि जेहीं देखिला । तेहीं वरवा वोळखिला, । "होये होये हा संचला । तैंचा राक्षसु." ॥ ४८ ॥ ऐसें समग्र वोलती, । तंव आन येक पाहाती । जेहीं चोरु म्हणौनि हातीं, । पायीं वांधिला. ॥ ४९ ॥ ते म्हणती, "हा तस्करु, । तैं जैया केला मारु; । धरूनि होता कपटाचारु । तो हा नव्हे? ॥ ३२५० ॥ खांदीं देऊन शूळातें, । आम्हींचि भ्रमविलें ययातें, । आंगीं वण प्रत्यक्ष ते । माराचे पहा," ॥ ५१ ॥ येक म्हणती, "चोरु." । येक म्हणती, "निशाचरु." । ऐसा संदेहात्मकु विचारु । जाला प्रवर्तता. ॥ ५२ ॥ राक्षसु तोचि तस्करु, । ऐसा येक करिती निर्धारु, । तयां देखोनि जनु चतुरु । हांसों प्रवर्तला. ॥ ५३ ॥ चोरु होता हो निशाचरु, । तरि करूं शकतेति तया मारु? । न करिता कां संहारु । आम्हां सकळांचा? ॥ ५४ ॥ राक्षसु चोरु होता । तैं इतुका मारु कां साहता? । यालागीं वोलणें सर्वथा ।

अप्रमाण तें. ॥ ५५ ॥ चोरु तो न घडे निशाचरु, । नव्हे निशाचरु तो चोरु, । विरुद्धभावो तो येकत्रु । कैसा घडैल ? ॥ ५६ ॥ आतां परीक्षा धरावी । उजू मागुती करावी, । यया जनांची निरसावी । संदेहभूलि." ॥ ५७ ॥ मागुता पाहती सावकाशें । तंव तो दोहीं पक्षीं दिसे, । वेडीं जाळीं माणुसें । अवघीं चिचीं. ॥ ५८ ॥ मग करिती विचारु, । देवात्माचि करू हा निर्धारु; । केवळ तस्करु, कीं निशाचरु । हा होये म्हणोनि. ॥ ५९ ॥ मग ते सकळ विनविती, । "अहो, जी देवा, मंत्रमूर्ति, । आमुची निरसावी भ्रांति । सर्वथैव." ॥ ३२६० ॥ देवात्मा बोले वचन, । "तस्करु हें जयांचें ज्ञान । ते अवघेचि पाचारून । आणा पुढें." ॥ ६१ ॥ आइकोनि इतुलें वचन, । उभे ठाले पुढें येऊन । तस्करवादी जन । देवात्मयाप्रति. ॥ ६२ ॥ देवात्मा पुसे तयांतें, । "हा तस्करु हें निरुतें ?" । येरू म्हणती, "हातें । रवा काढूं." ॥ ६३ ॥ मग तो देवात्मा बोले, । "येणें कवणाचें काये हरिलें ? । तेंचि सांगा बहिलें, । येर असो." ॥ ६४ ॥ परद्रव्यहरणेंवीण । मानूं नये तस्करपण, । तंव समस्त म्हणती, "प्रमाण । बोलणें हें." ॥ ६५ ॥ मग जेणें बोळखिलें । घोडें, तयातें पुढें केलें, । देवात्मयाप्रति विनविलें । तें कैसें वृत्त ? ॥ ६६ ॥ बऱ्हाडी वचन बोले, । "माझें अश्व म्यां वोळाखिलें, । आणि अर्थ पदार्थ आपुले । ययापासीं. ॥ ६७ ॥ इतुलेनि हा तस्करु । ऐसा केला निर्धारु, । इतुलयावरि मारु । बहुसाल केला. ॥ ६८ ॥ बोळवितां न बोलेचि, । जाला तस्करु स्वभावेंचि, । इतुली व्यवस्था तईची । देखिली आम्हीं." ॥ ६९ ॥ देवात्मा बोले वचन, । "नये मौनें तस्करपण; । आतां तुम्हीं चिन्ह । वोळखिलें जें, ॥ ३२७० ॥ तेणेंही परंतु चिन्हें । हा तस्करु न घडे म्हणणें; । येकें केलेंनि परद्रव्यहरणें । वांचूनियां. ॥ ७१ ॥ हरूनि तस्कर तुमतें । ते गेले जेणें पंथें, । मौनव्रती हा तेथें । तापसु होता. ॥ ७२ ॥ करूनि ययाचें वदन, । तेंहीं केलें पदार्थदान; । हा तीर्थयात्रेलागून । निघाला असतां, ॥ ७३ ॥ येथें राहिला हें साचारें, । तुमचे पदार्थ, हेंही खरें. । मौनव्रती तो मारें । बोलेचिना; ॥ ७४ ॥ ऐसें न घडावया कारण । आहे तें सांगा कवण ? । यालागीं द्रव्यहरण । लावा आंगीं ?" ॥ ७५ ॥

जन बोलती, " हें यथार्थ; " । तंव वन्हाडी होते समस्त । तयांतें पाचारिलें तेथ । तये क्षणीं. ॥ ७६ ॥ देवात्मा बोले वाणी, । " येणें हरिलें, हो, तुम्हांलागूनि ? " । ते म्हणती, " हा नयनीं । देखिलाचि नव्हता." ॥ ७७ ॥ मग बोलावूनि तस्करांतें । देवात्मा पुसे तयांतें, । " हा तुमचेनि सांगातें । होता तैं ? " ॥ ७८ ॥ तस्कर बोलती वचन, । " ययाचें नाथीं आम्हां ज्ञान; । परंतु येकि आहे खूण । ययापासीं. ॥ ७९ ॥ वटवृक्षाग्रीं जो होता, । तो राक्षसु हा होये, सर्वथा; । परंतु ' चोरु ' ऐसी वार्ता । नये अनुवादों. " ॥ ३२८० ॥ देवात्मा बोले निरुतें । तयां सकळां वन्हाडियांतें, । " वृक्षाग्रस्थें तुमतें । हरिलें काये ? " ॥ ८१ ॥ तंव ते बोलती तये समयीं, । "तो होता आपुलां ठायीं; । आमुतें येणें नाहीं । हरिलें, देवा." ॥ ८२ ॥ देवात्मा बोले वचन, । " मिथ्या जालें चोरपण, । तरि राक्षसु म्हणौन । निश्चयो करावा. ॥ ८३ ॥ तरि मारिला हें साचारपण, । आंगीं दिसती वण, । इतुलें कैंचें सहन । राक्षसातें ? ॥ ८४ ॥ असो; हा खरा राक्षसु, । तरि कवणाचा केला नासु ? । कवणें देखिला ? तो पुरुषु । पुढें करा." ॥ ८५ ॥ मग जे होते तस्कर । ते उभे राहिले समग्र. । बोलते जाले उत्तर । देवाप्रति. ॥ ८६ ॥ म्हणती, " शाखाग्रीं देखिला । तो पूर्वीचा ऐसा वोळखिला । राक्षसु, जया करितां जाला । ग्रामु उद्वसु. ॥ ८७ ॥ देखोनि तैसिया तयातें, । शस्त्रेंही सांडिलीं आम्हीं तेथें । आणि ययां वित्तें । वन्हाडियांचीं. ॥ ८८ ॥ भय उपजलें मानसा, । मग पळालों च्यान्ही दिशा; । वरकड वन्हाडियां पुसा । कवण खादले ? " ॥ ८९ ॥ वन्हाडी वचन बोलिले, । "आमचे नाहीं कव्हणी खादले; । ययांतें पळतां देखिलें; । पळालों आम्ही. " ॥ ३२९० ॥ देवात्मा बोले वचन, । "अनंत राक्षस ते कवण ? " । येरू म्हणती, " ते दुरून । आभास देखिले, " ॥ ९१ ॥ देवात्मा बोले वाणी, । " येणें भक्षिलें नसतां कोण्हीं । ययातें राक्षसु म्हणौनि । कैसें मानावें ? " ॥ ९१ ॥ आतां, ग्रामामाजी देखिला; । जेहीं राक्षसु भाविला, । तयांतें म्हणे " बोला तुम्हीं वचन. ॥ ९३ ॥ कवण भक्षिले येणें ? । राक्षसु म्हणितला गुणें कवणें ? । तें आम्हांप्रति सांगणें । सकळ चिन्ह. " ॥ ९४ ॥ ग्रामक लोक अनुवादती, । " येणें कव्हणी

भक्षिलें नाथीं; । परंतु चिन्हांवरूनि भीति । उपजली आम्हां. ॥ ९५ ॥ आतां तें चिन्ह कैसें? । विचारा, पां, मानसें; । सांगिजैल तें अवकाशें, । करावें श्रवण." ॥ ९६ ॥ जन बोलती वचन, । " घनीं करितां मुखपीटण । देखते जाले जन । मार्गु चालते; ॥ ९७ ॥ तेहीं सांगीतली वार्ता । यया ग्रामावरूनि जातां, । आम्हीं पाठवूनि बहुतां । आणिलें येथ. ॥ ९८ ॥ तंव, तो न बोले वचन, । नसंडी स्वमुखप्रपीटण, । आम्हां विपरीत चिन्ह । जाणवों लागलें. ॥ ९९ ॥ इतुलयावरि येकु जनु । 'चुः'शब्दें हांकीतु धेनु, । पासीं आला देखोतु, । येणें काय केलें ? ॥ ३३०० ॥ टपकरूनि उभा ठेला, । धांवोनि चरणां लागला, । गळ्यां झोंबोनि बैसला । पुडती मौनी. ॥ १ ॥ मग, आम्हीं तया गोंवळा । पाहिजे तैसा प्रश्नु केला, । परंतु ग्रामस्थु तो ययाला । जाणेचिना. ॥ २ ॥ आम्हीं मति केली कैसी? । तोही बैसविला ययापासीं. । घटिका क्रमली ऐसी । तंव येक जालें. ॥ ३ ॥ आनु येकु शूद्र आला, । पासीं उभा ठाकला, । प्रसंगेंचि तो बोलिला । वचन येक. ॥ ४ ॥ शूद्र पुसे गोंवळातें, । ' तूं नेणें म्हणतोसि जरि ययातें, । तरि पूर्वमैत्रीचे भाव येथें । ते कां प्रकटले ? ॥ ५ ॥ तुझीं पाउलें वंदिलीं, । कां येणें घटिका धरिली ? । यालागीं वार्ता जे आथिली । तेचि सांग. ' ॥ ६ ॥ पडतांचि तो शब्दु श्रवणीं, । धांवोनि लागला यया चरणीं । हुंकारें स्वरेंवांचूनि । शब्दु न बोले. ॥ ७ ॥ मग आम्हीं बहुतीं काये केलें ? । तयातेंही बैसविलें. । पुसतां मानस भागलें । पारि तो तया नेणे. ॥ ८ ॥ इतुलें जालें वर्तमान, । कांहीं भयचकित मन । जालें, तंव वचन । तिसरेन केलें. ॥ ९ ॥ कन्हणी येकु नरु । बोलता जाला भयातुरु, । " कवणु, हो, हा प्रकारु । मांडला येथें ? ' ॥ ३३१० ॥ आइकोनि तयाचें बोलणें, । मोटकी धांव घेतली येणें, । तें देखोनि, पुरुषें तेणें । केलें पलायन. ॥ ११ ॥ यापरी प्रत्यक्ष उठी;। धावोनि मनुष्या घाली मिठी, । तें देखोनि, भय पोटीं । रिघालें सकळां. ॥ १२ ॥ येक पळती येकापुढें, । यापरी वोस झालें खेडें; । परंतु मनुष्य भक्षिलें येवढें । घडलें नाहीं." ॥ १३ ॥ देवात्मा बोले वचन, । " मौनें न ये राक्षसपण । मनुष्यभक्षणेंवांचून । सर्वथा, कीं-

॥ १४ ॥ दुजयां न करितां दंडण, । पीटी तें आपुलेंचि वदन, । हें इतुलेंचि तंव चिन्ह । नव्हे राक्षसाचें. ॥ १५ ॥ मौनव्रती, तापसी, । आणि दुःख जालें तयासि, । तेणें पीटितां स्वमुखासि । कवण विपरीत? ॥ १६ ॥ धांवोनि लागे चरणां, । इतुलेन राक्षसु नमना; । मानवे तयाचिया वचना । हेंचि जाणावें. ॥ १७ ॥ गळां झोंबावया कारण, । तेंचि येक सत्य प्रमाण. । अनुकूलें वचनेंकरून । मैत्री दावी. ॥ १८ ॥ राक्षसुचि जरि होता, । तरि संहारुचि कां न करिता? । मौनी, तापसी, तो; सर्वथा । राक्षसु नव्हे. ॥ १९ ॥ आतां तया पुरुषाचें वचन । कैसें अनुकूल ययालागून । जालें, तेंचि विचारून । पहाना कां? ॥ ३३२० ॥ 'चुः' शब्दें हाणिजे घेनु, । हा शास्त्राचारु नव्हे कवणु, । ऐसिया अर्थी विचक्षणु, । शास्त्रज्ञ मानी. ॥ २१ ॥ 'चुः' शब्दें चोरु मानणें । ऐसें हें शास्त्रीं बोलणें, । तोचि चोरु देखिला, येणें । मौनस्थें जो. ॥ २२ ॥ मौनें चोरु न प्रकाशवे । तो 'चुः' शब्दें प्रकाशला स्वभावें; । यालागीं हा मित्रभावें । झोंबिन्नला तया. ॥ २३ ॥ घटिका, घांटी, हें बोलणें । प्राकृतां मूर्खांचें करणें, । परंतु अर्थु तैसा न मनणें । शास्त्रवेत्तां. ॥ २४ ॥ घंकारें घातु मानावा, । घर्घराटु शब्दु जाणावा; । तरि तो शब्दु यया अनुभवा । कैसा आला? ॥ २५ ॥ घर्घराट शब्दें आले, । चोरीं आपणा घाये केले, । हें मौनवंता बोलें । नये अनुवादतां. ॥ २६ ॥ घंकारु पडतां श्रवणीं, । जो अर्थु होता मनीं । तो प्रकाशला म्हणौनि । दावी मैत्री. ॥ २७ ॥ 'प्रकारु कवणु मांडला'? । ऐसा शब्दु येकु बोलिला, । तो यया कैसा कळला, । हेंचि विचारावें. ॥ २८ ॥ प्रशब्दें जाणावा पंथु । तरि पंथीं चोरीं केला आघातु; । ऐसा ययाचा भावार्थु । जीवीं होता. ॥ २९ ॥ तो न प्रकाशे तेणें मौनें, । सहज प्रकाशला परवचनें, । यालागूनि मैत्रीकारणें । धांविन्नला हा. ॥ ३३३० ॥ ऐसें सत्य कां न घडावें? । राक्षसु हेंचि कां मानावें?" । सकळ म्हणती "देवें । खरें सांगितलें." ॥ ३१ ॥ देवात्मा बोले युक्ति, । "पुरुषु तो दुसरा नाथी; । चिन्हभेदुचि भेदाप्रति । कारण असे. ॥ ३२ ॥ तेणें चिन्हें हा राक्षसु, । तयेंचि ययाचा वासु, । मांनी, ब्राह्मणु, तापसु, । परम शांतु. ॥ ३३ ॥ वन्हाडीं सांडिलों निरें ।

तीं घेऊनि आलों येके मतें, । तयावरूनि ययातें । आलें चोरत्व. ॥ ३४ ॥ म्हणौनि राक्षसु तोचि तस्करु, । शेखीं तस्करु ना निशाचरु; । मौनव्रती, द्विजवरु, । तापसु, हा." ॥ ३५ ॥ ऐसें आइकोनि बोलणें, । जनु बोले पाप केसणें । आम्हां आमुचेनि अज्ञानें । घडत गेलें. ॥ ३६ ॥ "देवा, देवा, देवदेवा, । हें निवडिलें सत्य तुवां । नेणती तुझिया प्रभावा । ब्रह्मादिक." ॥ ३७ ॥ देवात्मा बोले वचन, । "मिथ्या जें हें राक्षसपण, । तेंचि उडालें देवपण । आम्हां आंगींचें. ॥ ३८ ॥ हें वेगळेंचि कांहीं असे, । दुःख झालें येकें दोषें, । सागतां बहुसाल असे । पुराणापरी. ॥ ३९ ॥ तो आरोपु दूरि करणें । देवत्व धरिलें ययाकारणें. । आम्हीं बधु मानणें । दोघेही जण." ॥ २३४० ॥ ग्रामक बोलती वचन, । "तें कैसें पूर्ववर्तमान ? । तयाचें करावें ज्ञान । सर्वथैव." ॥ ४१ ॥ देवात्मा बोले निर्धारें । "अवधारा वचन पुरें; । पूर्ववृत्त साचोकारें । सांगैन मी. ॥ ४२ ॥ धर्मपुरी ग्रामु आमुचा, । धर्मात्मा ब्राह्मणु तेथींचा, । भारद्वाज गोत्रींचा, । महापवित्रु. ॥ ४३ ॥ अवधारा, तो पिता आम्हां; । माझें नांव सत्यग्रामा, । मज धाकुटा हा सुवर्मा, । माझा बधु. ॥ ४४ ॥ सत्यवती माता आमुची । ते प्रत्यक्ष आहे येथेंचि, । वैदिक वृत्ति आमुची; । ऐसें असतां ॥ ४५ ॥ पिता पावला लयातें; । तेणें आज्ञापिलें आमुतें, । 'तुम्हीं अभ्यासा शास्त्रांतें, । नाम रक्षा.' ॥ ४६ ॥ तें वचन करूनि प्रमाण, । करावया विद्याभ्यसन । आम्हीं केलें प्रयाण । विदेशासि. ॥ ४७ ॥ मातेची आज्ञा घेऊन । निघालों दोघेही जण. । एक स्थानीं शास्त्राभ्यसन । नाहीं केलें. ॥ ४८ ॥ म्यां उत्तरा दिशा आश्रयिली, । भागीरथीतीरीं वसति केली, । तेथें विद्या साधिली । शाब्दिक हे. ॥ ४९ ॥ दक्षिणा पथें याचें गमन, । कावेरीतीरीं केलें स्थापन; । तेथें सत्संगु ब्राह्मण । पूर्ण होते. ॥ २३५० ॥ आश्रयो करूनि तयांचा, । केला अभ्यासु शास्त्रांचा. । विद्याकामु आमुचा । संपूर्ण जाला. ॥ ५१ ॥ माझें नाम सत्यधामा, । तो मी आधीं आलों ग्रामा. । पावोनि शास्त्राची सीमा । पूर्णत्व पावलों. ॥ ५२ ॥ मग क्रमेंचि यथाकाळीं, । ययातेंही विद्या पूर्ण जाली; । सकळ शास्त्रीं प्रकाशली । प्रज्ञासावित्री. ॥ ५३ ॥ विद्येचेनि आगळे-

पणें । गर्वु धरिला याचेनि मनें, । आपणासमान दुजें नमने; । ऐसें जालें. ॥ ५४ ॥ संस्कृतेंवांचूनि न बोलणें । शास्त्रप्रमाणेंचि घेणें, देणें; । अनंत ग्रंथ संग्रहिले येणें । तयाचि हेतु. ॥ ५५ ॥ संस्कृत वाणी देवांची, । वेदरूपें सर्वेश्वराची, । आपण आश्रयूनि तेचि, । पावला तत्समानता. ॥ ५६ ॥ प्राकृत लोकांचें बोलणें । तें केवळ सांडिलें येणें । आपुलेनि सर्वज्ञपणें, । मदें योग्यतेचेन. ॥ ५७ ॥ प्राकृतें बोलविलाहीं न बोले; । आइकोनि प्राकृत कांटाळे; । 'हें श्रोत्रद्वारा कां प्रवेशलें?' । म्हणे अंतरीं. ॥ ५८ ॥ येणें वासना मळली । म्हणौनि संस्कृतें चोखाळी, । प्राकृतें रचना केली । नमनी तीतें. ॥ ५९ ॥ प्रबंध, कवित्वरचना । प्राकृत केली, ते मानीना; । मती करावी दोषारोपणा । नाना युक्ती. ॥ ३३६० ॥ कवित्व नावडे प्राकृतांचें; । तैसेंचि सकळ कर्तव्य तयांचें । सत्य नमनी; यथार्थे । ऐसें मत. ॥ ६१ ॥ मग हा तेथूनि निघाला, । पंथीं तस्करीं हरिला, । अपार दाटिला, पीटिला, । न बोलेचि. ॥ ६२ ॥ तीव्र मुखशंख करणें, । तंव आगमु पाहिला होता येणें, । निघंट, निबंध, मनें । टागले स्मरों. ॥ ६३ ॥ अबाधकु करावा शब्दु, । तारें नये करूं स्वरबाधु, । केला होये देववधु । तेणें कर्में. ॥ ६४ ॥ अबाध्य बोलावें वचन । तैसेंचि शास्त्राचें स्फुरण; । म्हणौनि अष्टविध वैयाकरण । तेथें पाहे. ॥ ६५ ॥ प्रमाणपूर्वक कर्म करणें । म्हणौनि पूर्वाचारु पाहिजे येणें; । विधिनिषेधपंक्ति उतरणें । पडला शब्दु. ॥ ६६ ॥ ऐसी विवंचना करितां । नासा नये अबाधकता; । मग निर्नाद शंख करिता । जाला ते व्हेळीं. ॥ ६७ ॥ मग तें देखिलें पांथीं, । वार्ता आली तुम्हांप्रति; । प्राकृतें जन बोलविती, । न बोलेचि हा. ॥ ६८ ॥ मग 'चुः' शब्दु आइकोन । संस्कृतें तस्करु मानून, । ययातें कळे म्हणौन । संतोषला. ॥ ६९ ॥ 'घकार' पडतां श्रवणीं । संस्कृतें धातु मानी, । चोरीं काय केलें म्हणौनि । भावार्थु प्रकाशला. ॥ ३३७० ॥ 'प्र' शब्दु श्रवणीं पडिला । तो येणें पंथावरीं नेला; । "पंथीं चोरीं हरिला, । मारिला," म्हणे. ॥ ७१ ॥ प्रसंगीं कां जनवचनीं । आपुला भावो प्रकाशूनि । तुमतें कळलें म्हणौनि । सिद्धांतु केला. ॥ ७२ ॥ ययाचा भावो तुमतें, । तुमचा भावो ययातें । न कळेचि; म्हणौनि तेथें । विपरीत

वर्तलें. ॥ ७३ ॥ आंगा आलें राक्षसपण, । परस्वस्त्र्यादियाचें हरण । जेहीं केलें, ते जन । चोर वेगळे. ॥ ७४ ॥ तें चिन्ह येणें धरिलें, । तेणें चोरपण आंगा आलें, । मौनें याचेनि सत्यावलें । तेंचि दृढतर. ॥ ७५ ॥ ययातें करूनि यातना, । पाठविला पूर्वस्थाना; । राक्षसयोनी कालक्रमणा । येणें केली. ॥ ७६ ॥ तंव आम्ही चौघेंजणें । याचिये शुद्धीकारणें । भ्रमत असतां, येके दिनें । मार्गु लागला. ॥ ७७ ॥ येणें केलें विद्याभ्यसन । तें कळलें आम्हां स्थान; । तंव हा गेला तेथून । ऐसें जाणवलें. ॥ ७८ ॥ पुनरपि भ्रमण करितां । येकु शूद्र जाला भेटता, । तेणें सांगोनि वृत्तांता । नेलें ठायां तया. ॥ ७९ ॥ आम्हां यया भेटि जाली; । परंतु न बोले कांहीं बोली, । प्राकृतवाणी आइकिली । आमुची म्हणौन. ॥ १३८० ॥ मग प्रसंगें येकें, कव्हणें । लागलें संस्कृत बोलणें, । तें आइकोनि, वाचा येणें । मोकळी केली. ॥ ८१ ॥ मग तियाचि वाणी वदतां । जाणितलें पूर्ववृत्तांता, । त्यावरि आम्ही निश्रशिता । बहुसाल जालें. ॥ ८२ ॥ मज विद्याबळ समान । वरि अध्यात्मविषयीं ज्ञान, । व्यावहारिक चतुरपण । आगळें तें. ॥ ८३ ॥ म्हणौनि हा उमजला, । प्राकृत बोलों लागला, । परंतु अर्थासक्ती गुंतला, । न सोडी स्थळ. ॥ ८४ ॥ अधर्मसाध्य तें नेघणें । आणि तें तंव सर्व नेणें, । ययाचिये वासनेकारणें । प्रवर्त्तलें ऐसें. ॥ ८५ ॥ ऐसया उपावो रचिला, । हा तयेचि ठायीं ठेविला, । आम्हीं नाथिलेंचि गळां । घेतलें देवपण. ॥ ८६ ॥ तेणें योगें तो अर्थु । आम्हीं साधिला समस्तु; । तथापि तो अपरमार्थु, । म्हणौनि आइका. ॥ ८७ ॥ तें आम्ही नेघों सर्वथा, । करील तें पुढें अनर्था, । अधर्मार्जित तत्वता । म्हणौनियां." ॥ ८८ ॥ आइकोनि ऐसें श्रवणीं, । बोलिलें अवघींचि जनीं, । "तें द्रव्य निदानीं । कवणाचें कार्य? ॥ ८९ ॥ उपजणें, मरणें, येकट; । मध्यें संसारु, हे खटपट; । ममतायोगें कष्ट । तेचि भोगावे. ॥ १३९० ॥ म्हणौनि दिधलें तें दिधलेंचि, । आणिक देणें असोचि, । स्वामींनीं तया अर्थाची । चाड न सांडावी. ॥ ९१ ॥ आम्हां ब्रह्मद्रोहो घडला; । ऐसियां दुष्टां, चांडाळां, । स्वर्गाचा पथु मोकळा । कैसा होये? ॥ ९२ ॥ कैसे तरों सांगा आम्ही । पापसागरीं दुर्गमीं? । अनुग्रहो करावा तुम्हीं ।

महापुरुषीं;" ॥ ९३ ॥ ज्येष्ठ बोले वचन, । "हें कर्तव्य पहा विचारून । कवणें केलें, म्हणौन । पापरूपें. ॥ ९४ ॥ ययाचेनि अभिमानें, । संस्कृतें आणि मौनें, । बहुतां आणिलीं वेडेपणें, । केली पीडा. ॥ ९५ ॥ ययाचेनि गुणें हा राक्षसु, । ग्रामु जाला उद्वसु, । तुमतें तुटला देशु । किती काळ? ॥ ९६ ॥ किती बुडालिया वृत्ति? । शीतोष्णें पीडिले किती? । वनवास बाळकांप्रति । होते जाले. ॥ ९७ ॥ ययाचेनि यया चोरपण, । जळो तें याचें मौन! । संस्कृतेंचि वेडपण । लागलें यया. ॥ ९८ ॥ ययाचेनि वेडेपणें, । तुमतें वेड लागलें केसणें? । ग्रामु, देशु, गोधनें, । वित्तें साडिलीं. ॥ ९९ ॥ नाथिला करूनि निशाचरु । भयें जो केला व्यापारु, । तो आइकोनि जनु चतुरु । काय म्हणेल? ॥ ३४०० ॥ तुमचेनि वेडें वेड । आमुतेंही लागलें उदंड, । खोटी, खरी बडबड । बहुसाल केली. ॥ १ ॥ झाडोझाडीं न्यास करणें, । ऐसें कर्तव्य वेडेपणें, । मुद्रा म्हणिजे खेळणें । तें येक कोल्हांट. ॥ २ ॥ कपटाचारु तें ध्यान, । असत्य बोलणें प्रमाण, । ऐसें अघट जाणपण । आमुचें कीं. ॥ ३ ॥ कवणें कवणातें हसावें? । कवणें कवणा निषेधावें? । समान मूर्खत्व अवघें । सप्रतिष्ठें असतां? ॥ ४ ॥ यया संस्कृताचा अभिमानु, । तेणेंचि नाशला हा जनु, । पुढेही येणेंकरूनु । विनाशु असे. ॥ ५ ॥ राक्षसु केलें ययातें, । तैसेंचि येणें शास्त्रपंथें । विद्यामदें ब्राह्मणांतें । होईल जाणा. ॥ ६ ॥ तंव आंगीं गुण । ते राक्षसांचेचि वर्धमान, । विद्याचि तयाचें कारण । प्रसिद्ध असे. ॥ ७ ॥ विद्येपासाव मत्सरु, । मदु उपजे अनिवारु, । अभिमानु तो मेरु । तुळये मशकां. ॥ ८ ॥ जंव जंव शास्त्रव्युत्पत्ति. । तंव तंव आटे शांति, । क्षमा, भूतदया, निवृत्ति । भस्म होये. ॥ ९ ॥ जव जंव शास्त्र आगळें, । तंव तव वादाचेनि बळें । पुंटे क्रोधाचें तळें, । काय नागी. ॥ ३४१० ॥ शास्त्रज्ञा कैंची समता? । आंगीं पिसें सर्वज्ञता; । ते विश्राति पावों म्हणतां । अरिष्ट करी. ॥ ११ ॥ शास्त्राचेनि अभिमानरसें । समता बुडाली, न दिसे, । म्हणौनि जिताचि पिसें । राक्षसपण. ॥ १२ ॥ क्रोधु, कामना, अशांति, । आग्रहो, मत्सरु, आसक्ति, । निंदा, द्रोहो, अविरक्ति । आगळी होये. ॥ १३ ॥ राक्षसी प्रकृति हे जितां । लागली शास्त्रवादियां समस्तां; । पुढें मरणातें पावतां ।

तोचि होये. ॥ १४ ॥ ब्रह्मग्रहो, राक्षसु । ग्रामु, घरटा पाडी वोसु, । वडीं, पिंपळीं निवासु । ऐसाचि करी. ॥ १५ ॥ जिता, मेलिया राक्षसपण । शास्त्रमदें येणेंकरून, । लोकांतें होये चोरपण । तैसेंचि संप्राप्त. ॥ १६ ॥ परलोकीं गेला पुरे, । मग तेथें यया नाहीं बरें, । यमदूताचे साचोकारें । हात लागती. ॥ १७ ॥ 'वेद, शास्त्र, पुराण, । हें कवणाचे, रे' म्हणती 'ज्ञान, ? । तुना शरीरपोषण । जेणें केलें ॥ १८ ॥ शास्त्रें परमात्मा जाणाना, । कीं मदु आपुला सपादाना ? । अभिमानु देहीं मिरवावा । योग्यतेचा ? ॥ १९ ॥ फोडूनि स्वामीचें भाडार । आपण लेती अलकार, । ते यमलोकीं तस्कर । तैसे घेइजति. ॥ ३४२० ॥ शास्त्र ईश्वराचें ज्ञान, । भजन प्राप्तीचें साधन, । तेणें केलें साधुपीडण । वादियें येणे. ॥ २१ ॥ शस्त्र घेऊनि स्वामीचें । बाळक हाणे जो तयाचें, । तो हातीं पडला, वाचे । कैसिया परी ? ॥ २२ ॥ भक्तारिष्टनिवारण । शस्त्ररूप हें ज्ञान, । येणे का, रे, साधुजन, । भक्त हाणितले ? ॥ २३ ॥ येणें पवित्रु योगु नाशिला, । जाणों तीर्थीं शौचु केला, । सर्वथा पाहिजे दंडिला । तस्कराहूनि. ॥ २४ ॥ येणें तारू भगिलें, । ईश्वरीं खान घेतलें, । देवाल्य भगिलें,' । ऐसे म्हणती. ॥ २५ ॥ येथ आलें चोरपण । जैसें मयालागून, । तसें परलोकीं विघ्न । पडितातें. ॥ २६ ॥ हा घेतला जैसा मौनी, । तैसेंचि तया ते स्थानीं, । यालागीं शास्त्राभिमानीं । दोषु हा सकळ. ॥ २७ ॥ अभिमानु, मदु, मत्सरु, । ययाचाही हा बडिवारु, । तुमतें अपराधु अणुमात्रु । लाविता नये. ॥ २८ ॥ तया मदमत्सरदंभयुक्ता । अभिमाना, राक्षसा अद्भुता, । आम्हीं मारिलें तत्वता । नि शेष तया. ॥ २९ ॥ पूर्वीं केली प्रतिज्ञा ऐसी, । ज्ञानें मारावें राक्षसासि, । तरि तो मारिला निश्चयेसीं । येणें काळें ॥ ३४३० ॥ ऐसाचि समस्तीं माराना, । ज्ञानमदु नव्हे बरवा, । हें नावडेचि दैवा । येकाधयातें. ॥ ३१ ॥ तो आइकोनि हा इतिहासु । आपणुही होये राक्षसु, । क्रोधु करी, त्रासु । मानिसीं कवणेचा ? ॥ ३२ ॥ तो तैसाचि मत्सरें तेणें । गर्वे आणि अभिमानें, । 'मरो, जियापरी श्वानें । प्रेतावरिचीं." ॥ ३३ ॥ ऐसें ज्येष्ठु अनुवादला, । मग उठूनि उभा ठेला, । कनिष्ठु बधु आलिंगिला । बहुता प्रीति. ॥ ३४ ॥ मग ते पुत्र दोघेजण । करिती मातेचें वदन. । तिचाचें नागरिक जन । चरित पाहानि ॥ ३५ ॥

प्रेमें करिती पूजन,। आणिक द्रव्यसमर्पण, । तेंही देते जाले आणून। सकळ वित्त. ॥३६॥ मग तें आणि हें अपार। वित्ताचे संयोगिले भार,। पन्हवाणावरि समग्र। वाहूनियां. ॥ ३७ ॥ अपार भृत्यसामग्री। सांगातें देऊन पुरीं, । तयां पांचांतें गांववरि । पावविते जाले. ॥ ३८ ॥ तें देखोनियां साविस्मित । सुहृद जाले समस्त. । अहो, हें अपार वित्त। जोडिलें येहीं ! ॥ ३९ ॥ पिता तंव होता साधारणु, । परंतु निजाचारी, सुब्राह्मणु । तयाचा भाग्योदयो कवणु; । जैं पुत्र ऐसे ? ॥ ३४४० ॥ विद्या, वित्त, विनयो। ययांतें हेंचि आश्रयो; । लक्ष्मीचा न व्हावा क्षयो। धर्माचेनि बळें. ॥ ४१ ॥ धर्मु लक्ष्मीचें कारण, । धर्मु लक्ष्मीचें रक्षण, । धर्महीनाचें धन । व्यर्थ जाये. ॥ ४२ ॥ ऐसा वेदवादरतांचा। स्वभावो शास्त्रज्ञांचा। सांगितला कथेचा। आरंभु करूनि. ॥ ४३ ॥

नान्यदस्तीति वादिनः

कामात्मे बोलती वचन, । " ब्रह्म हें वेदाचें अभिधान, । यालागीं सगुण आणि निर्गुण । ब्रह्म वेदरूपें. " ॥ ४४ ॥ " वेदावेगळें ब्रह्म असे " । ऐसें बोलती ते अविदुषें, । पापांडिये, राक्षसें, । मनुष्यें न होती. ॥ ४५ ॥ शास्त्रें, इतिहास, पुराणें, । वेदापासाव आर्षवचनें। आरुतीं, म्हणौनि मानणें। वेदुचि ब्रह्म. ॥ ४६ ॥ येक बोलती अधम, । " गुरुवाक्यें जाणावें ब्रह्म. " । तया मूर्खांतें ज्ञानवर्म । सर्वथा न कळे. ॥ ४७ ॥ गुरु मनुष्य साचोकारें, । देह तयाचें कर्माधारें, । जन्ममरणाचें वारें । साहे आंगीं. ॥ ४८ ॥ वातपित्तकफादिक। शरीरीं रोग अनेक, । तयाचें वचन अधिक। कैसें वेदाहूनि ? ॥ ४९ ॥ भूत, भविष्य, वर्त्तमान, । वेदीं ययांचें असे ज्ञान.। आणि गुरु मनुष्य, तया मरण । आपुलें न कळे. ॥ ३४५० ॥ गुरूतें पूर्वीं आधीं जन्मु, । वर्णु, आश्रमु, वैदिकु धर्मु; । तो वेदाहूनि परमु, । हें कैसें घडे ? ॥ ५१ ॥ वैदिक कर्म न करितां। अवघी जाये ब्राह्मणता, । मग अब्राह्मणु तो सर्वथा। असेन्यु गुरु. ॥ ५२ ॥ वेदाहूनि गुरु समर्थु, । तरि कां न कळे वेदार्थु ? । सकळां शास्त्रांचा सिद्धांतु। आकळेचिना ? ॥ ५३ ॥ वेदाहूनि यया श्रेष्टता, । तरि स्वतंत्र वेद करू

आतां; । येक पदमात्र योजितां । वीळु न पुरे. ॥ ५४ ॥ वैदिकें मत्रानुष्ठानें । पुनः सृष्टीचें होये करणें, । मेल्या मनुष्यातें जिणें, । जितां मरण, ॥ ५५ ॥ अकाळीं मेघु वर्षावा, । इंद्र, वायो प्रत्यक्षु होआवा, । सोमु, सूर्यो आणावा । वरुणु, अग्नि. ॥ ५६ ॥ वेदा अधीन देव सकळ, । देवबळाहूनि मंत्रबळ । श्रेष्ठ, म्हणौनि केवळ । वेदुचि ब्रह्म. ॥ ५७ ॥ गुरूचेनि येकें वचनें । न तुटती वृक्षाचीं पानें, । आड पडलीं तृणें । वारतीचिना. ॥ ५८ ॥ सर्वारिष्टनिवारण । वैदिकें मंत्रेंकरून, । तें सामर्थ्य असाधारण । कैंचें गुरुवचनीं ? ॥ ५९ ॥ ययाप्रति यावा इंदु, । शब्दें लोटावा मेरु; । असो, घरींचा काळा मांजरु । पांढरा हो पा. ॥ ३४६० ॥ असो. तें मत मूर्खांचें , । वेदु ब्रह्म, हें साचें; । सामर्थ्य आगळें मन्त्राचें । म्हणौनिया. ॥ ६१ ॥ येक ते बोलती वचन, । " वेदु 'तो शब्दुमात्र ज्ञान, । परंतु ययातें ब्रह्मपण । घडे कैसें ? ॥ ६२ ॥ वेदु स्तवी कर्मातें, । तरि कर्मचि ब्रह्म, हें निरुतें, । जयापासाव सृष्टीतें । होणें आहे. ॥ ६३ ॥ कर्मापासाव याग, यज्ञ; । कर्म वेदाचें कारण; । सकळां देवांचें प्रसन्नपण । कर्मेंचि हो. ॥ ६४ ॥ चौदा रत्नें इंद्राचीं । सागरीं पडलीं कर्मेंचि, । प्रौढी वेदसामर्थ्याची । काइसी कर्मापुढां ? ॥ ६५ ॥ कर्मेंचि तपे दिनकरु, । कर्मबळेंचि भासे इंदु, । कर्मयोगबळें सागरु । शोषिला कार्मिष्ठें. ॥ ६६ ॥ कर्म वर्षवी पर्जन्यातें, । उपजवी धान्या, औषधींतें, । कर्मापासाव भूतांतें । उत्पत्ति असे. ॥ ६७ ॥ कर्मेंचि स्थिति समग्रां, । कर्मेंचि प्रळयो चराचरां, । कर्म निवारी दुस्तरां । पातकांतें. ॥ ६८ ॥ कर्माहूनि आगळा गुरु । ऐसा हा मूर्खांचा विचारु; । सांडी जैं आपुला आचारु । तैं गुरुचि नव्हे. ॥ ६९ ॥ कर्म भोगाचें कारण, । कर्में मोक्षु, कर्में बंधन, । गुरु श्रेष्ठु, तैं निवारण । तयाचें न करी. ॥ ३४७० ॥ आलया भोगा चुकवी, । हें सामर्थ्य जै गुरु दावी, । तरि श्रेष्ठता तेथ बरवी । कर्माहूनि. ॥ ७१ ॥ सचित, प्राचीन, क्रियमाण, । न तुटे गुरूतें स्मरण, । आंगा आलें वार्धक्यपण । दूरि न करवे. ॥ ७२ ॥ असो. कर्मतंत्रें वर्ततां । तो श्रेष्ठु नव्हे गुरु सर्वथा, । म्हणौनि वेदिका समर्थता । आधीं कर्मा. " ॥ ७३ ॥ ऐसें मत आइकोनि । बोलों प्रवर्तले कव्हणी, ।

" अहो, कर्मा समर्थपण कासेनि ? । ऐसें विचारा, पां. ॥ ७४ ॥ वैदिक कर्म परि तें कैसें ? । देवताराधनरूप ऐसें; । म्हणौनि तयांहूनि काइसें । थोरपण यया ? ॥ ७५ ॥ कर्म देवांचें आराधन, । ययालागीं हेंचि प्रमाण, । कर्मांगदेवतांचे श्रेष्ठपण । नये कवणातें. ॥ ७६ ॥ देव कर्में आराधावे, । यागें, यज्ञें पूजावे, । तेंहीं लोक पाळावे । सर्वथैव. ॥ ७७ ॥ यज्ञद्वारा आराधिती । भूतें देवांतें भजती, । पर्जन्यद्वारा पाळिती । देव तयांतें. ॥ ७८ ॥ पासाव पर्जन्या उपजणें, । जिणें भूतांतें, मरणें, । मरोनि तेथेंचि वसणें, । जन्मणें पुनः. ॥ ७९ ॥ ऐसें सृष्टीचें सृजन । देव करिती आपण, । यालागीं तयांचें थोरपण । कर्मा नये. ॥ ३४८० ॥ आराधनरूपमात्र । कर्म देवांचें साचार, । म्हणौनि हें देवताचक्र । ब्रह्म म्हणावें. ॥ ८१ ॥ सूक्तें तीं-स्तवनें देवांचीं, । कर्में आराधनें तयांचीं, । म्हणौनि महिमा आणिकाची । बोलों नये. ॥ ८२ ॥ कव्हणा मूर्खांचा विचारु । देवांहूनि श्रेष्ठ गुरु ? । तयांचिये अंधकारु । जाणा प्रज्ञे. ॥ ८३ ॥ गुरु मनुष्य मोटकें, । भूतां, राक्षसांचें भातुकें, । राक्षस देवांतें मुखें । दावूंचि न शकती. ॥ ८४ ॥ देवकरणी मानवांतें । ये, हें वडे कवणें मतें ?- । आतां प्रत्यक्षानुभव, येथें । तो किती बोलावा ? ॥ ८५ ॥ गुरु तपो सूर्याकारें, । भासो चंद्राचेनि प्रकारें, । पावकापरी साचोकारें । धगधगू, पां; ॥ ८६ ॥ सृष्टीवरि करू वृष्टि, । मेळें उठवू मनुष्य दृष्टी, । विष धरूनियां कंठीं । वांचो पां गुरु. ॥ ८७ ॥ येणें वडवाग्नि संप्राशावा, । गोवर्धनु करें उचलावा, । अनंतां रूपीं दावावा । आपला देहाभासु. ॥ ८८ ॥ गुरु मंथील सागरातें, । गुरु धरील मेदिनीतें, । गुरु मारील दैत्यांतें । अव-तरोनि ? ॥ ८९ ॥ म्हणौनि देवांची समानता । नये, मा कैंचीं आधिक्यता ? ।, येर सामर्थ्य असो, आतां । येक आहे. ॥ ३४९० ॥ अन्नें-उदकें-वांचून । करू आपुलें देहरक्षण, । अग्निमाजी आसन । घालू गुरु. ॥ ९१ ॥ असो.

भाविती येकजण, । ऐसे मतभेद आन आन, । शाक्त, गाणाधिपति ज्ञान । आपुलें संपादिती. ॥ ९५ ॥ येक म्हणती, "निश्चित । देव हे जेथें आसक्त, । तें स्वर्गसुखचि समस्त । ब्रह्म साचोकारें. ॥ ९६ ॥

आनंदो ब्रह्मेति व्यजानात्

ऐसें हें वेदाचें वचन । तरि आनंदुचि ब्रह्म सनातन; । आनंदेसीं समान । आन तें आयीचिना. ॥ ९७ ॥ आनंदें भूतें होती, । आनंदु तयचि जिती, । आनदीं लयो पावती । सार्वकाळ. ॥ ९८ ॥ अंशांशें आनंदु भूतांतें । विपयभोगाचेनि मतें, । . ययांहूनि देवांतें । असे अपारगुणा. ॥ ९९ ॥ म्हणौनि स्वर्गस्थां जो आनदु । तोचि ब्रह्म परमानंदु, । यया वेगळा अनुवादु । करूंचि नये." ॥ १९०० ॥ ऐक बोलती वचन, । "ऐसिया आनंदाचें स्थान । तें स्वर्गचि ब्रह्म; खुण । जाणावी ऐसी. ॥ १ ॥ भेदितां स्वर्गाचीं मडळें । मनुष्यानंदा रूप केलें, । तयाहूनि शतगुणा आगळें । ऊर्ध्वपदीं सुख. ॥ २ ॥ तयाहूनि जें वरुते । शतगुणा आनंदु तेथें, । चालतां ऊर्ध्वपथें । शतगुणा तसेंचि. ॥ ३ ॥ एव प्रजापतिलोकपर्यंत । शतगुणा शतगुणा समस्त, । तयावरि सत्यलोकु तेथ । तच्छतगुणा असे. ॥ ४ ॥ ब्रह्मलोकाहूनि वरि । पद नाहीं जाणा निर्धारीं, । वेदवाणी वरवी यापरी । प्रमाण असे. ॥ ५ ॥ म्हणौनि ब्रह्मयाचा आनंदु । तोचि जाणावा ब्रह्मानंदु; । मनुष्यगुरु तो अधु । जेथ जाणावया. ॥ ६ ॥ तयाही आनदाचें स्थान । सत्यलोकु ब्रह्म सनातन; । येणेंसीं अधिक, समान । दुसरें नाहीं. ॥ ७ ॥ स्वर्गुचि ब्रह्म निरंजन, । ऐसें जाणणें हेंचि ज्ञान, । वेदु परम प्रमाण । ययें अर्थीं. ॥ ८ ॥ ययाहूनि वरुतें काई ? । सत्याहूनि पद नाहीं; । गुरु तो श्रेष्ठु कवणे ठाई । अपरु पडला ? ॥ ९ ॥ वेद, शास्त्रें, पुराणें, । सत्यलोका अपर, सर्व जाणें." । ऐसें कामिकांचें बोलणें, । "श्रेष्ठु ब्रह्मलोकु. ॥ १९१० ॥ ऐसें वेदाचें वचन । यया अर्थी असे प्रमाण, । सत्यलोकाहूनि पुढें आन । नसे पद. ॥ ११ ॥ सत्यलोकाची संप्राप्ति । याहूनि पुढें नाहीं गति, । ऐसेनि आहे म्हणती, । तेचि वेदबाही. ॥ १२ ॥ वेदबाही मूर्ख जन । तयांचें करणें अप्रमाण; । बोलणें तें अघटमान । ऐसें आहे. ॥ १३ ॥

वेदोक्त तेंचि ज्ञान । वेदुचि ज्ञानाचें साधन. । वेदा दुसरें प्रमाण । तें बोलोंचि नये." ॥ १४ ॥ ऐसें अर्जुना, अवधारीं, । कामिकजन संसारीं, । स्वर्गपरायण, निर्धारीं । अचळचित्त. ॥ १५ ॥ अज्ञान स्वरूपविषयीं । रत वेदवादांचांचि ठाईं, । यया संस्कृताचें देहीं । वारें जयां. ॥ १६ ॥ स्वर्गाहूनि परुतें । कांहीचि नसे जयाचेनि मतें, । गुरु, शिष्य, हें आरुतें । मृत्युलोकीं कर्म. ॥ १७ ॥ ऐसें जे अनुवादति, । तयांची कैसी उक्ति ? । ते सांगेन तुजप्रति, । अवधारीं, पां. ॥ १८ ॥

पुष्पितां वाचम्

तीर्थ अथवा देवस्थान । वेधक जनसभा पाहोन । येक सांगती पुराण; । तेंचि कैसें ? ॥ १९ ॥ पीतगंध ललाटीं, । वारि कस्तुरीची द्विबोटी, । आरक्ताक्षता निहटीं । रेखिलिया जाणों, ॥ ३९२० ॥ श्वेतचंदनें ङवरिले, । सर्वांग उदे धूपिलें, । मस्तक भरूनि फुलें । चंपकाचीं, ॥ २१ ॥ केतकी-दळें ठाईं ठाईं । आरोपित कपोलीं दोहीं, । पुष्पघोंस ते जेंहीं । श्रीमुख शोभे, ॥ २२ ॥ नानावर्णा पुष्पमाळा । तिया घालूनियां गळां, । बुका सर्वांगीं उधळिला, । श्रोत्रीं गंधराजु, ॥ २३ ॥ कडेल पीतांबर सोनेसला, । कडेलु श्वेतु वरि पाधुरला, । मध्ये मुक्ताफळें, अक्षमाला । शोभती कंठीं. ॥ २४ ॥ शुद्ध कोंदणाचे खिळे । प्रतिदंतीं वेगळाले, । बोलु बोलतां आगळे । झळकती वीजूहूनि. ॥ २५ ॥ कर्णमात्रा झळकती । मुखावरि पडे ते दीप्ति, । तेणें शोभे गौरकांति । तया मुखाची. ॥ २६ ॥ श्रोत्राचें तेज आगळें । दशनांचिया तेजा मिनलें, । उभय तेज फांकलें । मुखावरि. ॥ २७ ॥ तेणें मुखाचा गौरवर्णु । दिसों लागे शोभायमानु, । वारि सुंदरतेचा गुणु । तारुण्य आगळें. ॥ २८ ॥ पासीं झारी सुवर्णवर्णा, । वरि चोख घडी उपरणा, । नाना वर्णांचिया वेष्टणां । उपमा नाथी. ॥ २९ ॥ वामदक्षिणभागीं ग्रंथ । वेष्टणीं दिसती सुशोभित, । मध्यें पुस्तक घवघवित, । विचित्रें पानें. ॥ ३९३० ॥ पुढें सभा श्रोतयांची, । मागें तयां विद्यार्थियांची, । मग प्रारंभणा कथेची; । तेंचि कैसी ? ॥ ३१ ॥ मृदांगु येकु वांचूनि । आणि टाळु वीणा तये स्थानीं । उपांग आणि श्रुति दोन्हीं । लाविलिया तत्काळें. ॥ ३२ ॥ मग ते पाहोनि मुमेळा । क्रमेंचि आलापु;

केला. । तदंगन्यासकला ।। संपादी कुशलत्वें. ॥ ३३ ॥ भ्रूद्वयीं आणी ठेव, । दावी स्वरानुसार करपल्लव, । तेणेंचि अंगें वरव । दिसों लागे. ॥ ३४ ॥ कर्णभूषणें झळकती, । दंततेजकीळ फांकती, । हस्तमात्राचिया पंक्ति । दावी प्रेत्नें. ॥ ३५ ॥ कंठाचें माधुर्यपण । तेथें लोधले येक जण, । जयां नाहीं ज्ञान । रागमाळेचें. ॥ ३६ ॥ आलापाचे जाणते । ते लोधले जन तेथें; । विश्रांति पावले चित्तें । तितुलेनिचि. ॥ ३७ ॥ दोहीं विषयीं अज्ञान । ते मुखाचि पाहती जन. । रूपलें नूपडती नयन । कांहीं करितां. ॥ ३८ ॥ अधरोष्ट येक लक्षिती, । कर्णभूषणें येक पाहती, । करपल्लवेवेलीं जाती । तोचि येक. ॥ ३९ ॥ मग आलापाचां अवसानीं । प्रवर्ते मंगळाचरणीं, । आलापरूपेंचि मांडणी । तयाची करी. ॥ १५४० ॥ मंगळाचरण सपादलें, । क्षणेकु नयन लाविले, । जैसे गुरुध्यानीं गुंतले । सुभक्त जन; ॥ ४१ ॥ तैसेंचि भाव आणून । सजळ करी नयन, । मग क्षणा येका सांवरून । श्लोकु आरंभी. ॥ ४२ ॥ आलापाचिवरि घोळितु । श्लोकु बोले समस्तु, । मग पदमोडी करितु । ते वैयाकरणशुद्ध. ॥ ४३ ॥ पदान्वयें बोले अर्थु । परि आलापाचिवरि समस्तु; । आला शब्दु प्राकृतु । तानेचि संपादी. ॥ ४४ ॥ अर्थी घालूनि अंतःकरण । शरीर करी दोलायमान, । लावी, उघडी नयन; । प्रेम आणी. ॥ ४५ ॥ अर्थानुसार देहभाव, । अर्थानुसार न्यासमुद्राअंगपल्लव, । अर्थानुसार गौरव । आणी शरीरीं. ॥ ४६ ॥ अर्थानुसार हास्य, रंजन । अर्थानुसार लावी नयन, । अर्थानुसार मान, । मस्तक हालवी. ॥ ४७ ॥ "बापु, बापु; कैसा, कैसा ?" । क्षणक्षणं शब्दु ऐसा । अनुवादे, माणुसा । लावी वेधु. ॥ ४८ ॥ प्रसगु निघे युद्धाचा । तरि आवेशु आणी वीराचा, । रोपावेशु तेथिंचा । संपादूनि दावी. ॥ ४९ ॥ भुजा, दंड पीटितु, । मागें, पुढें अवलोकितु, । घ्याघ्याकारें गर्जतु, । मुद्रा दाखवी. ॥ १५५० ॥ श्रोतयां अर्थाची अचाड; । वाचाचि लागे त्याची गोड, । देहचार उदड । तेंचि आवडती. ॥ ५१ ॥ विरावें आणूनि दावी, । तें श्रोतयां आंगीं खेळवी, । धडातें वेड लावी । आवेशाचें. ॥ ५२ ॥ येथेंचि जाणों वैरी, । होईल जाणों मारामारी, । ऐसा आवेशु शरीरीं । संचरे श्रोतयां. ॥ ५३ ॥ वैराग्याचा निघे प्रसगु, ।

तें न्यासें दावी वीतरागु, । विसरवी संसारमार्गु । श्रोतयांतें. ॥ ५४ ॥ संसारदुःखदर्शन । जैसें बोले वचन, । तैसोंचि करी वदन, । शरीर तैसोंचि. ॥ ५५ ॥ अरे रे! मना, मर्कटा, । वृथा भ्रमसी दहा वाटा! । वाउगा गेला, कटकटा! । नरदेहो हा. ॥ ५६ ॥ जनाप्रति बोले वचन, । "किती कराल पिंडपोषण? । आजि कीं पाहें मरण । पासीं आलें. ॥ ५७ ॥ किती कराल, रे, आयासु? । तुम्ही मनुष्यें नव्हां, पशु; । विषोपमु विषयरसु । किती सेवाल? ॥ ५८ ॥ किती योनिमुखें देखाल? । कित्यांचे स्तन प्राशाल? । कित्यांचे पुत्र होआल, । पापिष्टहो? ॥ ५९ ॥ मळमूत्र आपुले शरीरीं । पोष्यांचें घे तयावरि । पडलेति नरकसागरीं, । दुरात्मेहो! ॥ ३५६० ॥ मळमूत्राचें भांडार । येथें वातपित्तकफपाझर; । अस्थि, रक्त, मांस समग्र । येकवाटलें असे. ॥ ६१ ॥ ऐसिया देहाचा कांटाळा । कैसा पां नये, चांडाळा? । यया कुश्चिळा, अनिर्मळा । निर्मळ करिती. ॥ ६२ ॥ स्त्रीसुख तें किमात्मक? । परि तेणेंचि हें सर्व दुःख, । विचारें नेघती मूर्ख, । आसक्त होती. ॥ ६३ ॥ लोकहो, तुम्हीं कावाडी, । नेघां विश्रांति येकि घडी. । जळो जळो हे खोडि! । सांडा वेगीं." ॥ ६४ ॥ हाहाशब्दें म्हणे, "गेलें, । नरदेहरत्न हारपलें, । दिवसाचि खान पडलें । कव्हणा न कळे. ॥ ६५ ॥ बुडालें, रे! हें बुडालें, । नरदेहतारूं भंगलें, । ज्ञानवित्त वायां गेलें, । नागवलेत. ॥ ६६ ॥ धिग्य धिग्य तुमचें जिणें! । स्वहित तें न साधेचि जेणें, । आजन्म आइकतां पुराणें । नुपजे त्यागु. ॥ ६७ ॥ गणणा जाली रे जाली! । आयुष्यें वेंचलीं, वेंचलीं! । पाठीं मरणें लागलीं! । पहा परतोनि. ॥ ६८ ॥ कटकटा, कैसें जालें? । नकळत विष प्राशिलें, । करूं नये तें केलें । क्रियमाण कीं. ॥ ६९ ॥ कैसें रुचे तुम्हां अन्न? । कैसें दे सुख जीवन? । क्षयाचा परिहार येथून । कैसा न करा? ॥ ३५७० ॥ अस्तमाना दिनकरु । गेला, जाणा निर्धारु, । मरणा ऐसा अंधकारु । पडेल पुढां. ॥ ७१ ॥ वन्हि लागला, रे, मंदिरा. । किती पाखुडाल मातेरा? । येथें तंव नसुधा धुळोरा, । काणु नाहीं. " ॥ ७२ ॥ घ्याघ्याकारें गर्जतु, । मार्गे, पुढें पाहतु, । "अपारु पावला संघातु । चोरांचा" म्हणे. ॥ ७३ ॥ "कामु, क्रोधु आणि मत्सरु, । दंभु, प्रपंचु

तस्करु, । ययांचा नेकरवे संहारु, । पावले कीं. ॥ ७४ ॥ हृदयमंदिरीं निघाले, । शांतिक्षमावित्त नेलें, । विवेकावरि घाय केले, । पडैल तो. ॥ ७५ ॥ वापु, वापु! भला, भला! । धरिला, रे, चोरु धरिला! । मीचि मी! मातें येकसरा । सांपडला हातीं. ॥ ७६ ॥ आतां ययाते जै नमरा, । तै वळ बहुत अहंकारा, । वंचाल हिता समग्रा; । ऐसें होईल." ॥ ७७ ॥ यापरी आणूनि आवेश । वैराग्याची दाविती भाप, । श्रोतयांचें मानस । दुखंड करिती. ॥ ७८ ॥ आपण होती दु:खाचे, । विरक्त मन श्रोतयांचें, । मध्यें मध्यें शब्दाचें । कैसें स्फुरण? ॥ ७९ ॥ तारें करितां अनुवादन । मंदिर घेती टपकरून, । मध्यें मध्यें स्थान । तया घोपातें. ॥ ३५८० ॥ तारमदिरघोपेंकरून । वरि स्वराचें माधुर्यपण, । हावभावें लोकरंजन । करिती मूर्ख. ॥ ८१ ॥ भक्तीचा निघे प्रसगु, । तें रडविती, हांसविती जगु, । मूर्खीतें स्वरयेगु । दावूनि रंजविती. ॥ ८२ ॥ विश्वात्मया, विश्वनाथा, । विश्वव्यापका, अनंता, । कैसा विसरलासि आतां । यये संसारीं? ॥ ८३ ॥ आठवीं पूर्वीचा विवेकु; । तूंचि जननी, तूंचि जनकु, । इतरु हा पारिखा लोकु; । कवणाचा, काई? ॥ ८४ ॥ तूतें नेणोनि कर्म केलें । तें देहाकारें साकारलें, । देह तें योनी उपजलें । कव्हणे येके. ॥ ८५ ॥ तेथिचीं मातापितरें, । पुत्र, स्त्री, पोष्यें अपारें, । तीं संबंधिवरि साचारें । जंव तो देहो. ॥ ८६ ॥ ऐसीं अपारें शरीरें, । तीं तीं मातापितरें, । संख्या नाहीं गोत्रें, । याती, वर्णें मज. ॥ ८७ ॥ मागिलाचा पडे विसरु, । पुढिलांचा ने कळे निर्धारु, । वर्तमानांचा ठाई थोरु । योगु ममतेचा. ॥ ८८ ॥ तेंही गेलियावरि । येंही पुरि जालीं दूरि, । निर्वाणीं तू येकु, श्रीहरि, । देवराया. ॥ ८९ ॥ कवणाचिया गळां झोंबावें? । कवणा माझें, माझें म्हणावें? । शरीरंचि सांगातें नवें नवें । स्वजन हें. ॥ ३५९० ॥ माझा म्हणतां बहुतें; । निर्वाणीं कवण सोडवितें? । विसरलों, देवा, तुमतें; । ऐसें जालें. ॥ ९१ ॥ पडैल मिठी काळाची, । आणिक तया मरणाची, । तेव्हेळीं वास कवणाची । पाहों, देवा?" ॥ ९२ ॥ ऐसा आपणपयां अनुवादतु; । जनातें प्रेम उपजवितु, । अनन्यभाव दावितु, । रंजवी लोकां. ॥ ९३ ॥ म्हणे, "हें कवणाचें, रे, वित्त? । तुम्ही कां येथ

आसक्त? । ईश्वराधीन समस्त । ऐसें असतां. ॥ ९४ ॥ येथ धरूं नये ममता; । स्वामीद्रव्य हें सर्वथा, । देहेंसींही स्वतन्त्रता । नसे तुम्हतें. ॥९५॥ न धरा, रे, देहीं अहंकारु, । परमात्मा देहीं ईश्वरु; । का, रे, वाहा भारु । संसाराचा? ॥ ९६ ॥ विचारा पोष्यें कवणाचीं? । येथें आळी कैचीं? । गति ऋणानुबंधाची । जे संगु परस्परा. ॥ ९७ ॥ परमात्मा ययाचा नियंता, । अति समर्थु प्रतिपाळिता; । तुम्हीं कां करा चिंता । वाउगीचि? ॥ ९८ ॥ अचैतन्यरूपा शरीरा । चैतन्य कवणें, विचारा; । कासया स्वामित्व धरा । ईश्वरु असतां? ॥ ९९ ॥ विश्वोत्पत्ति तुम्हीं केली? । सृष्टि स्वाश्रयें राखिली? । तुम्हीं राखाल प्रलयकाळीं । विश्व काय, पा? ॥ ३६०० ॥ देहातें साडूनि जाता । राया, रंका समता; । सुरांचा देहो पडतां । तेंही तैसीच. ॥ १ ॥ अहंममता हें अरिष्ट; । चिंता, शोकु, वृथा कष्ट; । कल्पना साडा, रे! येकट; । भजा देवीं. ॥ २ ॥ सर्वत्र साडूनि ममता । आठवा ना का श्रीअनंता? । वाउगा श्रमु भोगितां, । अपराधु हा. ॥ ३ ॥ अंतकाळींचें तारूं, । तेय का घाला पाथरु? । बुडतां तारूनीं समग्र । अर्थु ठेवा." ॥ ४ ॥ हाहाकारें गर्जतु, । "वन्हि लागला, रे!" म्हणतु, । जळते घरींचा अर्थु । काढा कांटीं. ॥ ५ ॥ स्वामीद्रोहो किती कराल? । जयाचें तया वचाल? । अतीं केउतें पळाल, । तस्कर-हो? ॥ ६ ॥ नाना तुम्हीं आत्महन; । विष घेऊनि करा शयन, । परंतु नामामृतपान । न करा फुकाचें. ॥ ७ ॥ माझें म्हणौनि सकळ । जोडिलें, परि कैसें न्याल? । जातां आपुलेंही स्थूळ । नये सांगातें. ॥ ८ ॥ उभा धसु घालिजे धनी । तो जैसा तैसाचि निदानीं । काहींचि आपुलें मरणीं । नव्हे तैसें. ॥ ९ ॥ आला, रे! आला, आला, । पीयूषघनु वोळला, । पर्तु आड केला, । पापिष्ठहो! ॥ ३६१० ॥ नामामृतरसघनु । वोळा याचेचा गुणु । तो व्यवहारु आडकरूनु । वचलेति. ॥ ११ ॥ शब्दाचे विश्वासें घ्याल, । तरि अक्षयी स्वर्ग भोगाल, । कष्ट न करितां बहुसाल । रोकडी गति. ॥ १२ ॥ श्रवणाचेनि व्यापारें । स्वर्गाचीं उघडलीं द्वारें, । डोळे लावूनि आंधारें । वळें कां करा? ॥ १३ ॥ देवदर्शन नित्य यात्रा; । फुकाचें हें कां न करा? । करूनि नयनव्यापारा । पावा मोक्षु. ॥ १४ ॥

पासीं आलें निधान, । बळें नेत्र लावून । कां, रे, अंधाचें लक्षण । प्रतीती आणा? ॥ १५ ॥ करव्यापारेंकरून ।' करितां देवाचें भजन । स्वर्गसुख असाधारण । असे रोकडेंचि. ॥ १६ ॥ मनचि देवीं लावितां, । फुकाची कल्पना करितां । स्वर्गु जोडैल बहुतां । भर्वसेन. ॥ १७ ॥ कर्मेंवाचूनि करणातें । नसवे हें सत्य निरुतें; । यालागीं कर्तव्य भलयतें । करावेंचि. ॥ १८ ॥ तोचि देवसंबंधीं आचारु । करितां इंद्रियांचा व्यापारु । स्वर्गु पावाल निर्धारु । फुकासाठीं." ॥ १९ ॥ ऐसे रसिक बोल बोले, । सर्वांगें आपणु डोले, । प्रेमाश्रु आणी, कांटाळे । विषयस्फूर्ती. ॥ ३६२० ॥ ऐसें रडोनि रडवणें, । हांसोनि जन हांसवणें, । नाना प्रकारीं मोहणें । ऐसिया प्रवर्तला. ॥ २१ ॥ देखोनि अंगचारातें । येक ते लोधले तेथें, । येक मनोरमें वाचेतें । गुंपले लोक. ॥ २२ ॥ येक रागरचना पाहती, । येक नादलुब्ध होती, । येक अर्थाचां ठाईं रमती । निर्मळें मनें. ॥ २३ ॥ जैसा वैसला पुराणीं । तैसाचि शास्त्र वाखाणी, । फांकी बोले ठेवणी । शब्दरचनेचिये. ॥ २४ ॥ वेदांचेंचि करी अध्ययन । तैं स्वर तेंचि जाणों गायन, । आणी ऐसें कुशळपण । वाचेचां ठाईं. ॥ २५ ॥ फुगे तैं भातयापरी, । कां वेळीं जाये तैं अंबरीं; । बोले तें अमृतापरी । वचनचि गोड. ॥ २६ ॥ अर्थचाड श्रोतयां थोडी, । परंतु शब्दीं, रूपीं त्यांची आवडि, । च्यारि प्रहर ते घडी । येकि होये. ॥ २७ ॥ जैसी रमणीय सरांटी । पुष्पित पडे दृष्टी, । अलंकाररूप, किरीटी, । तैसी वाणी. ॥ २८ ॥ कमळीं शोभे सरोवरु, । तैसा तिया वाचा तो नरु; । इंद्रावणाचा आकारु । बरवा जैसा. ॥ २९ ॥ रमणीयपणें ऐसी. । आतां अर्थाकारें वाचा कैसी? । तेचि अवधारीं निश्चयेंसीं । सांगिजैल. ॥ ३६३० ॥

क्रियाविशेषबहुलाम्

कामात्मा सांगे पुराण । लोकांवरि ठेवूनि मन. । म्हणे, "कर्मा येवढें थोरपण । नाहीं कव्हणातेंही. ॥ ३१ ॥ क्रिया मोक्षु दे रोकडा, । क्रिया दुःखाचा दवडा, । क्रियायोगें फुडा । पाविजे स्वर्गु.' ॥ ३२ ॥ तिये क्रियेचें ज्ञान । नाहीं कवणातें संपूर्ण; । अत्यंत भेद गहन । तिये क्रियेचे. ॥ ३३ ॥ शौचुचि आधीं कैसा? । कव्हणी नेणती हा भर्वसा, । तरि ऐसा, ऐसा,

ऐसा, । आइका तुम्ही. ॥ ३४ ॥ ब्रह्मचर्यें ऐसा कीजे, । गृहस्थें ऐसा जाणिजे, । वानप्रस्थाश्रमीं बोलिजे । तो ऐसा शौचु. ॥ ३५ ॥ संन्यासियें ऐसा करणें, । हा शौचु जाणावा ब्राह्मणें, । दिवसा ऐसा, रात्री येणें । प्रकारें जाणावा. ॥ ३६ ॥ शौचुहीनु तो कुश्चिळ । ब्राह्मणु न म्हणावा अमंगळ, । गंडूषविधि केवळ । अतिसूक्ष्मु तो. ॥३७॥ स्नानचि येक पाहतां । कव्हणा न कळे हें तत्वता, । उगेंचि उदकीं बुडतां । स्नान न संपादे. ॥ ३८ ॥ जळीं दर्दुर उदंड । पाषाण असती प्रचंड, । मत्स्य, कूर्म निविड । दिवा रात्रौ. ॥ ३९ ॥ तें काय स्नान मानावें ? । आतां, ब्राह्मणें तैसें न करावें, । ऐसें ऐसें आचरावें, " ।.मुखें सांगे. ॥ ३६४० ॥ प्रायाश्चित्तांग तें वेगळेंचि, । नैमित्तिक तें अनारिसेंचि, । कुशळता नित्यस्नानाची । चातुर्यें जाणावी. ॥ ४१ ॥ मंत्रमृत्तिकाविधान । दूर्वा आणि जीवन, । ययांचां योगीं स्नान । शारीरी तें. ॥ ४२ ॥ येक तें भस्मस्नान जाणावें, । मंत्रस्नान येक वरवें, । अंतरस्नान स्वभावें । वेगळेंचि. ॥ ४३ ॥ गोरजस्नान पवित्र, । तीर्थस्नान समंत्र, । जळस्नान सर्वत्र । केवळ येक. ॥ ४४ ॥ ऐसे स्नानाचेचि किती प्रकार, । संध्येचेही भेद अपार, । शाखाभेदें साचार, । वरि जपमुद्रादिकीं. ॥ ४५ ॥ अमुकां कल्पीं ऐसें, । अमुकां कल्पीं अनारिसें, । जपलक्षण पुरवें । ब्राह्मणें जाणावें. ॥ ४६ ॥ धर्माधर्मविचारणा । जाणोनि कवणु शहाणा ? । मुख्य पाहिजे ब्राह्मणा । तोंचि नाहीं. ॥ ४७ ॥ कैसें करावें आचमन ? । कैसें करावें स्नान ? । कैसें करावें आपोशन ? । भोजन कैसें ? ॥ ४८ ॥ हें कंद, मूळ, शाखा, फळ, । ग्राह्य भक्षूं ये केवळ; । हें अग्राह्य, अमंगळ । भक्षूंचि नये. ॥ ४९ ॥ अमुकेंचि अन्न भक्षावें, । ऐसें ऐसें स्वभावें, । उदक भलेतैसें नेवावें । भलयतेंचि. ॥ ३६५० ॥ कवणें काळीं, कैसें ? । शयन करणें नियमु असे, । जागणेंही तैसें । जाणावें काळीं. ॥ ५१ ॥ गर्भाधानापासूनि । निर्वाणपर्यंत ब्राह्मणीं । सोळा कर्में विचारूनि । सर्वथा करावीं. ॥ ५२ ॥ केवळ जो वेदविहीनु । तो नव्हे सर्वथा ब्राह्मणु, । वैदिकु, वेदाचारसंपन्नु । तोचि मानावा. ॥ ५३ ॥ नाना याग करावे, । आणिकां करवीं करवावे, । क्रियाप्रयोग जाणावे । तेथिंचे नाना. ॥ ५४ ॥

कुंडक्रिया अति दुर्गम, । वेदिकामंडपांचे नियम, । उपकरणसामग्री परम । जाणतां कष्ट. ॥ ५५ ॥ होते, प्रोते, उद्गाते, । कवण धर्म कवणातें ? । कवणें अंगें पुरतें । कैसें संपादावें ? ॥ ५६ ॥ कवणु यागु कैसा करणें ? । मांत्रिकें, तांत्रिकें विधानें, । द्रव्यनियमाचीं प्रमाणें । तीं ऐसीं ऐसीं. ॥ ५७ ॥ अमुकेंचि व्रत उच्चारी, । मग त्याची क्रिया परोपरी, । सांगे तयाची वैखरी । कासयाची, पां ? ॥ ५८ ॥ व्रतांचीं नामें बहुसालें । घे पाठाचेनि बळें, । मग त्याचें त्याचें बोले । क्रियाविधान. ॥ ५९ ॥ तीर्थांचीं अनंतें अभिधानें । पाठेंचि जयाकारणें, । तेथिलीं तेथिलीं विधानें । शब्देंचि संपादी. ॥ ३६६० ॥ देवांचि कोण ? किती ? । उच्चारी ऐसी स्फूर्ति, । उपासनांग व्युत्पत्ति । सांगे क्रियेची. ॥ ६१ ॥ जें जें दैवत, ते ते उपासना, । ऐसिया क्रिया नाना, । पाठाचि, पांडुनंदना, । पुराणिकातें. ॥ ६२ ॥ नद्यांचि वर्णी तैं वीळुवरि; । प्रहरेंकु वृक्षचि उच्चारी; । काव्यमुद्रेची कुसरी । बोले पदरचना. ॥ ६३ ॥ साहित्य आणि संगीत । अवलंबूनि हें मत, । क्रियाभेद बहुत । प्रकट करी. ॥ ६४ ॥ जे कीं वाचा आइकतां । आइकोनि अर्थु घेतां, । क्रियाभेदु तो सर्वथा । आकळेचिना. ॥ ६५ ॥ अर्थांगें क्रिया बहुल । आतां तिचें कवण फळ ? । कवणा अर्था मूळ । वाचा होये ? ॥ ६६ ॥

जन्मकर्मफलप्रदाम्

जन्मु म्हणिजे उपजणें, । कर्म म्हणिजे करणें, । फळ म्हणिजे भोगणें । क्रियेचें फळ. ॥ ६७ ॥ आधीं जन्मातें पावावें, । पावोनि कर्म करावें, । करूनि फळ भोगावें । यथाप्राप्त. ॥ ६८ ॥ भोगें कर्म केवळ सरे, । मग भोगु तो शरीरेंसीं नुरे, । प्राण न धरती खोंकरें । पंचभौतिकें स्थूळीं. ॥ ६९ ॥ प्राणमुक्त शरीर । तेंचि मरण साचार, । भोगूनि आयुष्य दढतर, । ऐसें जाणावें. ॥ ३६७० ॥ एवं, जन्मोनि कर्म करावें, । फळ भोगूनिया मरावें, । मरोनि पुढती उपजावें, । करावें कर्मचि. ॥ ७१ ॥ ऐसें उपजणें, करणें, भोगणें; । मरणें, उपजणें, करणें, । भोगणें; पुनः मरणें, । पुनः पुनः पैं. ॥ ७२ ॥ ऐसिया अर्थातें देती । हे वाचा, गा, वीरपति ! । मोक्षाकारणें सवंगति । अवाट हे. ॥ ७३ ॥ उपजणें, कर्म

करणें, । फळ भोगूनि तें सारणें, । पुनः मरणें, उपजणें, । करणें कर्म. ॥ ७४ ॥ हें संसारचक्रीं भ्रमण । कैसें ? आइक, सांगेन. । दृष्टांतमुखें येथून, । पांडवा, गा. ॥ ७५ ॥ घाणयाचि भंवता विळुवारें । वैलु भ्रमे जयापरी, । विश्रांति नाहीं क्षणुभरि । अथवा मार्गु. ॥ ७६ ॥ वळणीं पडलें पेटें । तें भ्रमे, बुडे, उमटे; । वळणावाहेरि न फुटे । मार्गु तयातें. ॥ ७७ ॥ वाहाटुळीं पडलें पान । अव्हासव्हा करी भ्रमण, । उपजणें, भोगणें, मरण । तैसेंचि हें. ॥ ७८ ॥ वावुळखोडीं मांकोडा । जैसा जाये सेंद्या बुढा, । एका चक्राचा गाडा । चालवितां जैसा. ॥ ७९ ॥ जितुलाचि चाले पुढारां । तितुलाचि ये माघारा, । वीळुवारें करी येरझारा । मोटेचा वैलु. ॥ ३६८० ॥ संसारचक्रीं आरोहण । तें हें त्रिविध सत्य जाण, । मोकळें वाटे, परि बंधन । बहुत काळ. ॥ ८१ ॥ वाड्यामाजी गंवसलें । वोढाळ केउतें पळे ? । भ्रमण करी पोळें । मार्गु नाहीं. ॥ ८२ ॥ कोसलां किटकुलें गुपे, । कर्दमीं कुंजरु रुपे, । कीं दीपीं पतंगु दीपे, । नपवे निर्गमासि. ॥ ८३ ॥ वाघुरकीं हे पांगडी । जोडावी, पार्था, जोडि, । तरि तयाची वाचा आवडी । आइकावी श्रवणीं. ॥ ८४ ॥ भैदाचें जें जें दावणें । मनोरंजन तें मुलवणें, । न गुपे माणुस शाहणे । तये ठाईं. ॥ ८५ ॥ मधुर लागे मीनास । परि गळींचें आमिष विष, । तैसें क्रियाफळ बहुश । परंतु खोटें. ॥ ८६ ॥ सांपळा सांपडली सिंदोरी । मुखकातें तेचि मारी, । आपणुचि नळिका धरी । गुपे पुसा. ॥ ८७ ॥ जन्मु, कर्म, आणि फळ, । संसारवधन हेंचि केवळ, । मधुर वाटे, परि हलाहल । केवळ जें. ॥ ८८ ॥ ऐसिया फळातें प्रसवती । ते वाचा क्रियेचां अंतीं; । अवधारीं, वीरपति । अर्जुना, तूं. ॥ ८९ ॥ पाहतां रूप नयनीं । तें रमवी मानसालागूनि, । वाचा आइकतां श्रवणीं । चित्त गुंते. ॥ ३६९० ॥ अर्थु आणतां, पांडुसुता, । रंजवी क्रिया कुशलता, । फल मधुर भोगितां । सुखचि वाटे. ॥ ९१ ॥ अवघेंचि मनोरंजन । हें मायावी संसारमोहन, । कैसें आर्धी आचरण, । तया मूर्खाचें. ॥ ९२ ॥ रूप देखोनि दीपला, । दीपीं पतगु पडिला, । नादें सर्पु भुलला, । हरणु दुसरा. ॥ ९३ ॥ क्रियेनें गुंपला पुंसा, । मीनु जैसा त्या आमिषा; । फळभोगीं पुरुषु तैसा । आसक्तु होये.

॥ ९४ ॥ जन्मता जें जें दुःख । तें अनुभवा ये सकळैक; । परंतु अज्ञानवैरी तें, आइक, । दिसों नेदी. ॥ ९५ ॥ क्रियादुःख तें, पार्था, । किती सांगावें आता ? । परतु या अज्ञानाकरितां, । प्रत्यक्ष न कळे. ॥ ९६ ॥ सकळां दुःखाचें कारण । कर्मफळ दुःख गहन; । परतु आपुलें कैसें अज्ञान, । जें दावी सुखाकारें ? ॥ ९७ ॥ अफळकर्म ये साहों, । अकर्में जन्मु होंथे, तारें हो; । परतु कर्मफळसग न हो । प्राणियांतें. ॥ ९८ ॥ ऐसी वाचा, वीरपति, । मोहक, गा, त्रिजगतीं; । परंतु ते प्रवर्तविती । दावूनि विषयो. ॥ ९९ ॥ जन्मु, कर्म आणि फळ । असोनि हें दुःखमूळ, । सुखाचि ऐसें केवळ । करूनि सागती. ॥ ३७०० ॥ नाना ते कामिक जन । पशुदेही अज्ञान, । अहिताहिताचें ज्ञान । नाहीं जयां. ॥ १ ॥ मी कवणु ? हें काई ? । आचरे तें कैसें देहीं ? । येणें गति कवणे ठाई । होईल, मातें ? ॥ २ ॥ आत्महित तें कवण ? । कासेन मोक्षु ? कैसें बंधन ? । ऐसें केव्हांही ज्ञान । उपजेचिना. ॥ ३ ॥ मरणापुढें कवण गति ? । ऐसें आत्महित नेणती, । भोगवासनाचि सपादिती । म्हणौनि पशु. ॥ ४ ॥ नकळे आपुला, पराना, । देखिला चारु तो चराना, । मग तेणें यया जीवा । भलयतें हो. ॥ ५ ॥ आंगावरि साहे काठी । परि चुकवूनि तयाची दृष्टि । तेथेंचि निघैन, हे पोटीं । वासना बहू. ॥ ६ ॥ चारुचि चरावा जाणे, । परि मरणपर्यंत कष्ट तेणें । ऐसें देखत देखत नेणें । पामरु पशु ॥ ७ ॥ वळ तव उडे आवारु, । वळ तंव साहे मारु, । वळ तव व्यापारु । करी वोढाळ. ॥ ८ ॥ ना तें कव्हणाचेंचि, नव्हे; । ग्रामां अवघियामाजी भवे । घर ना ठावो-स्वभावें । सुनाट ढोर. ॥ ९ ॥ हाणोनि पावो मोडिला । परि नसंडी गुणु आपुला, । उचित पळे, मग गळां । बांधी टोणपा; ॥ ३७१० ॥ तेंही तैसेंचि वोढी, । परंतु नसडी खोडी, । चारु देखोनि उडी । घाली करमठी. ॥ ११ ॥ ढोंपरावरि घाये पडती, । पिकती, फुटती, गळती, । तथापि सांडि नाधी । स्वभावातें. ॥ १२ ॥ मग त्यान्ही मोडले पाये, । न चालवे ऐसें होये, । वाटेचिवरि साहे । पडोनियां. ॥ १३ ॥ काउळे बैसले पाठीवरि । नवजाती वारितां दूरि, । अशुद्ध वाहे भूमिवरि, । पसरे मग. ॥ १४ ॥

पसरलें देखोनि तयासि । श्वानें येती पासीं, । मग तीं जितचि तयासि । लागती तोडूं. ॥ १५ ॥ येकु नाहीं ईश्वरु, । कवणें करावा परिहारु ? । नवचे प्राणुसमीरु, । चटपटी दे. ॥ १६ ॥ वाटेचें दूरि सारावया । जिता चांडाळ वेढिती तया; । तैसे पशु, धनजया, । कामिक जन. ॥ १७ ॥ विषयाचिलागीं झोंवती, । विहिताविहित नेणती, । अपारु दंड साहती । देहांतीं ते. ॥ १८ ॥ मग तें फळ भोगितां । तोचि स्वभावो मागुता, । यापरी पावलेही व्यथा । नसंडिती गुणु. ॥ १९ ॥ येकु देवो, ना येकु गुरु, । कवणें करावा परिहारु ? । आणि पशुदेही नरु । तो विचारु नेघे. ॥ ३७२० ॥ कर्मफळभोगाअंतीं । मरों लागे, वीरपति, । मग यमदूत अंतीं । होती प्रत्यक्ष. ॥ २१ ॥ अपार भोगी यातना, । पावे संसारदुःखदर्शना, । योनि भ्रमोनि नाना । नरदेहा ये. ॥ २२ ॥ पुढती तो तैसेंचि करी, । तेंचि पावे तयापरी, । यालागीं संसारनगरीं । हा सुनाट पशु. ॥ २३ ॥ अहितें हित माने, । मग तेणेंचि सर्वज्ञपणें । आणिकां मूर्खांकारणें । उपदेशु करी. ॥ २४ ॥ म्हणौनि वाचा तयाची । लोकरंजक जे साची । नाना विधा विधानांची । कर्माची खाणि. ॥ २५ ॥ अवधारीं, गा वीरपति, । वाचा ते कवणे गतिप्रति । असे प्रवर्तली आणि प्रवर्तविती, । तेंचि सांगेन. ॥ २६ ॥

### भोगैश्वर्यगति प्रति

भोगैश्वर्यगतिप्रति । वाचा ते प्रवर्तली आधी, । आणि इतरां जडांतें प्रवर्तविती, । ऐसें जाणावें. ॥ २७ ॥ ऐश्वर्य आणि भोगु । यया दोहींचा संयोगु । पाविजे, पुनरपि वियोगु । बहुकाळ नव्हे. ॥ २८ ॥ अवधारीं, गा वीरपति, । ऐश्वर्यभोगनिष्ठा ते गति, । नित्य तीतेंचि प्रशंसिती । रमणीय हे. ॥ २९ ॥ कीं, इहामुत्रार्थ सकळ । भोग तेंचि ऐश्वर्य केवळ, । तयाची प्राप्ति समूळ । तीप्रति वाणी. ॥ ३७३० ॥ असो, ते कैसें बोलणें, । अभिलाषु उपजे जेणें ? । शब्दुचि कामिकां पारणें । महासुखाचें. ॥ ३१ ॥ ज्योतिष्टोमु यज्ञु करितां । देवलोकु होये आपैता, । मग तेथिंचें सुख सांगता । होये सहस्रवदनु. ॥ ३२ ॥ शताश्वमेध कराल । तरि इंद्रुचि तुम्ही होआल, । पुरत्रयींचें पावाल । ईश्वरसामर्थ्य. ॥ ३३ ॥

तुम्हां अर्थीनु वरुणु, । यमु, वायो, आश्विनु, । महर्षि करिती सन्मानु, । ऐसें होईल. ॥ ३४ ॥ उर्वसी, रंभा, मेनिका । भोगाल स्वर्गनायका, । चौदारत्नें, आइका, । भांडारीं तुम्हां. ॥ ३५ ॥ नियंते तुम्ही सर्वांचे । ईश्वर होआल जाणा साचें, । कोड पुरेल मनाचें । सभोगविषयीं. ॥ ३६ ॥ किती भोगाल, रे, कार्पण्य ? । अत्रवेचि तुम्हीं आत्महन, । संप्राप्त असोनि निधान । दरिद्र भोगा. ॥ ३७ ॥ साधारणचि यज्ञ कराल । तरि सार्वभौम पावाल, । आतां तें कैसें, केवळ ? । म्हणाल असें. ॥ ३८ ॥ अवघी आपुलीचि क्षिति, । भूपाळु दुसरा नाथी, । मी म्हणौनि तुम्हांप्रति । समानु मानें. ॥ ३९ ॥ तुम्हींचि राज्य करावें, । इतरीं सेवाव्रत आचरावें; । पुनरपि वचनें आइकावें । यागाचें फळ. ॥ ३७४० ॥ भय आणि चिंतादिक । स्वप्नीं न देखा यांचें मुख, । शोकु, आमय, दुःख, । तिहींची अभावना. ॥ ४१ ॥ पाहिजे तैसें कल्याण, । इंद्रियबळ आणि तारुण्य, । वय सुवय संपूर्ण, । सुखरूप सर्व. ॥ ४२ ॥ इंद्रासमान सामग्री, । व्ययो तो भोगाचिवारीं; । मिळिते अपार, तयावरि । होये सहस्र गुणा. ॥ ४३ ॥ क्रियाचि तुमची समर्थ, । मागावें नलगे, कन्हणा येथ; । भ्रांत न करा चित्त, । याग करा. ॥ ४४ ॥ दान तेंही यागासमान, । अल्पही फळे असाधारण, । जाणोनि संकल्पु, विधान । जैं करूं जाणिजे. ॥ ४५ ॥ देशीं, काळीं, सुपात्रीं, । संकल्पविधानें वरवयापरी, । फळ अपेक्षूनि अंतरीं । देइजे दान. ॥ ४६ ॥ मंत्रानुष्टानचि कराल । तरि तैसेंचि फळ पावाल; । आंगें देव होआल । नाहीं संशयो. ॥ ४७ ॥ इहामुत्रार्थु भोगणें । तरि मंत्रानुष्टान करणें । कायसंकल्पें विधानें । क्रियेचेन. ॥ ४८ ॥ व्रतींचि धराल आदरु । तरि अर्थु पावाल अपारु, । संपूर्ण कामु समग्रु । होईल तुमचा. ॥ ४९ ॥ जे जे कामना उपजे । तें तेंचि व्रत आचरिजे, । तोचि तो कामु भोगिजे । अक्षयी मग. ॥ ३७५० ॥ कराल तीर्थभ्रमण । तन्ही तें असाधारण, । जो जो कामु परी मन । पुरे तो तो. ॥ ५१ ॥ पाउला पाउला फळ आथी, । उगेचि धरा, पां, प्रवृत्ति; । आपुली आपणा शरीरशक्ति । आणा प्रयोजना. ॥ ५२ ॥ निमिषोन्मेषाचाहीपरि । व्यापारु करा क्रियेवारीं, । संकल्पु फळाचा अंतरीं । धरूनियां. ॥ ५३ ॥ अमोघ

फळ पावाल । जैसी वासना प्रबळ, । कामधेनु हे केवळ । आपुली क्रिया. ॥ ५४ ॥ सुरतरु, कीं हा चिंतामणि । क्रिया तुमची तुम्हालागूनि, । यया नरदेहाची करणी । खाणि रत्नाची. ॥ ५५ ॥ नरदेह हें तुमतें । प्रसवेल अनंता सुखातें, । जाणाल कर्म कुशळ तें तें । तरिचि जाणा ॥ ५६ ॥ नेणा क्रियाविधान । तरि व्यर्थ केले तें आचरण, । तुमचेंचि तुम्हालागून । अरिष्ट हें. ॥ ५७ ॥ जाणोनि करिता, सुफळ, । नेणोनि करिता, दु:खमूळ, । उयालागीं हिताहित सकळ । असे आपुला हातीं. ॥ ५८ ॥ दक्षिणहस्तीं वाम, । वामहस्ती आपुला घर, । आता जो जेथ बैसणार । तेनो तेथ. ॥ ५९ ॥ विष आणि अमृत । आपुलाचि हस्तीं येथ, । दुजया गोष्ट भ्रांत । तेचि ठेविती. ॥ ३७६० ॥ म्हणौनि आता करावें । स्वहित आपुलाले बरवें, । येणें कर्मे पावावें । भोगऐश्वर्य तुम्हीं. ॥ ६१ ॥ देता थोडें, घेता बहू, । फुकाचें का न म्हणा, हू ? । आता हें सागणें, बहू । पाल्यीं मोकळें. ॥ ६२ ॥

यामिमां प्रवदन्ति

ऐसी जे हे वाणी रसाळ, । मृदु, अतिशयें मंजुळ, । ऐश्वर्यभोगप्राप्ति केवळ । सप्रशंसिती. ॥ ६३ ॥

तयापहृतचेतसाम्

तिया वाणीं हरिलीं । जयाचीं चित्तें आकर्षिलीं, । कामाकुळें मनें जालीं । पुरुषाचीं जया, ॥ ६४ ॥ एक म्हणती, "साचार, । वाया गेलें हे शरीर; । पुढील आयुष्य क्षर । ते नित्य वोसरे. ॥ ६५ ॥ कीजेल शरीरें येणें । तें मग पुढें पावणें, । ऐसिये वाचेकारणें । न शोंबे मन. ॥ ६६ ॥ तरि रोकडाचि यत्नु कीजे, । रोकडाचि अर्थु पाविजे, । येणेंचि शरीरें भोगिजे । ऐश्वर्यसुख. ॥ ६७ ॥ ऐश्वर्य पावणेंकारण । यये अर्थी आचरण । तें मनुष्ययत्नावाचून । आन न करावें. ॥ ६८ ॥ व्यवसाय करावे नाना, । अर्जावें तेणें धना, । मग प्रियु वाटे मना । तो भोगु भोगावा." ॥ ६९ ॥ ऐसें येक अनुवादती । भोगाचिया काकुळती; । आन तयातें वारिती, । म्हणती काये ? ॥ ३७७० ॥ "अहो, मुदला हातु लावणें, । तें ठेवूनि अपारें यत्नें । मीळीनरि संपादणें । आपुला कामु. ॥ ७१ ॥ तरि मुदल

तें आतां कवण ? । मनुष्य देह, हे जाणा पूर्ण; । अपार वित्त येणेकरून । जोटे कर्मद्वारा. ॥ ७२ ॥ म्हणौनि पुढें आपणा । नरदेहप्राप्ति चुकेना, । ऐसिया पाहोनि आचरणा । कर्म करावें. ॥ ७३ ॥ जें कर्म पुढें सफळ, । ऐश्वर्या, भोगा मूळ, । विहित, वैदिक, निर्मळ । आचरण जें, ॥ ७४ ॥ तेणें स्वर्गादि फळ भोगिजे, । भोगूनि तें कर्म सारिजे, । मग भोगांतीं उरिजे । तेणेंचि नरदेहें. ॥ ७५ ॥ तेथें करिते जे तेचि पुडती । नरदेहेंचि उरिजे अतीं, । मुदल जतन यया रीतीं । पाहिजे केलें. ॥ ७६ ॥ नातरि अर्थाचिया आशा । कीजे व्यापारु भलेतैसा, । जो जो प्रेन्नु मानसा । गमों लागे. ॥ ७७ ॥ प्रतिकूळें प्राचीनें । तो अर्थु नसधे तयाकारणें, । आणि दुष्टें, अविहितें आचरणें । आंगीं जडतीं. ॥ ७८ ॥ तें तेणें विपरीताचरणें । मनुष्यदेहाप्राति न येणें, । इतुलेनि पुढें यत्नु करणें । तोही बुडाला. ॥ ७९ ॥ यये देहीं ना पुढें । अर्थाची जोटि घटे, । सिद्धमनुष्यदेह रोकडें । तेहीं गवा(मा?)विजे ॥ ३७८० ॥ यापरी लाभेंवांचूनि । अवघिया मुदला हानि; । पुढें केवळ करणी । ते गेली बुडोनियां; ॥ ८१ ॥ म्हणौनि ऐसा जो प्रयत्नु । तयातें न करी, जाणु; । यालागीं विहितें संपूर्णु । कामु संपादावा. ॥ ८२ ॥ विहित कर्म वैदिक . । आचरावें फळोन्मुख; । तेणें परंपरा सुख । सुखेंचि वाढे." ॥ ८३ ॥ येक म्हणती "यागु करणें." । येक ह्मणती, "तप सपादणें;" । येक म्हणती, "दानें । द्यावीं सत्पात्रीं." ॥ ८४ ॥ येक म्हणती, "तीर्थाटण," । येक म्हणती, । "व्रताचरण" । येक म्हणती, "पूजन । करावें ईश्वराचें." ॥ ८५ ॥ "केलेनविण नाहीं प्राप्ति, । फळभोगु कर्मा अंतीं. । देणें तरि घेणें," म्हणती । येक श्रोते. ॥ ८६ ॥ "ईश्वरें काय करावें ? । आपुलें केलें तें भोगावें, । आतां असो; न यावें । दारिद्र कदा; ॥ ८७ ॥ अपार सप्राप्ति लक्ष्मीची; । दशा पावावी इंद्राची; । सार्वकाळ अरिष्टाची । शांति असावी. ॥ ८८ ॥ इष्टकाम मेघु जेणें । वर्षे तेंचि आतां करणें, । यया प्रेत्ना चुकणें । तेंचि आत्मवैर." ॥ ८९ ॥ येक म्हणती, "आइकिलें । तेथचांचि जिवीं बैसलें, । भलें पुराण आइकिलें । जालों कृतकृत्य." ॥ ३७९० ॥ येक बोलती वचन, । "काज काय आतां बोलोन ? । गोसां-

नियाचें वचन । नव्हे अनारिसें. ॥ ९१ ॥ आजिवरि केलीं श्रवणें, । तीं व्यर्थ काळक्षपणें, । गोसावियाचेनि वचनें । कळलें आता. ॥ ९२ ॥ बोलोनि बहुसाल कायी ? । हित जोडानें, संदेहो नाहीं. । परतु सागणहार काहीं । ऐसे नसपडती. ॥ ९३ ॥ म्हणोनि येक करानें, । आचार्यत्व यया द्यानें, । सागतील ते आचरानें । कामिक धर्म. ॥ ९४ ॥ यापरी श्रोते आणि वक्ते । वश जाले कामातें, । वासनामय चित्त तेथें । भ्रमोंचि लागलें. ॥ ९५ ॥ निर्मळ देखणें जैसें । तिमिरदोषें नाशे, । तैंवि श्रवणे तेणें मानसें । पालटतीं जालीं. ॥ ९६ ॥ शब्देंचि मन पालटले, । मग तेणेंचि मार्गें लागलें, । वाचेनें तियें हरिलें । चेतन सकळांचें. ॥ ९७ ॥

भोगैश्वर्यप्रसक्तानाम्

तिया वाचा हरिलीं । जयाचीं चित्तें मोहिलीं, । कामवासने गुतलीं । सुटतीचिना; ॥ ९८ ॥ तया कामिका जनातें । भोगैश्वर्यप्रसक्तातें । पुढे हित केसें तेणें मतें, । तेंचि अवधारीं. ॥ ९९ ॥

समाधौ

प्राकृतगुणसनिरसनें । आत्मा ब्रह्म सत्य जाणणें, । जाणोनि निर्विकल्प असणें । तेंचि समाधि. ॥ ३८०० ॥ कीं आत्मान्वयें पाहता । गुणाते नाहीं पृथक् सत्ता, । किरणेंसीं भिन्न निवडिता । मृगजल जैसें. ॥ १ ॥ मग ओघ, वेग, आभास, । किरणचि तयाची भाप, । अद्वैत ब्रह्म निरश । तैसेचि तें. ॥ २ ॥ सन्मय तें चिन्मय, । चिन्मयचि आनदमय, । आनदमयचि स्फुरणमय । अद्वैत ब्रह्म. ॥ ३ ॥ निर्गुणचि सगुण आभासे, । आभासोनि निर्गुणाचि असे; । विश्व तेणेंसीं भिन्न नसे । अधिष्ठानदृष्टी. ॥ ४ ॥ ऐसें शुद्ध स्वरूप जाणोन । आत्मान्वयें जाणता गुण, । आणि गुणकार्यभान । यया प्रपचाचें, ॥ ५ ॥ ब्रह्मचि केवळ स्फुरे, । अखडता तेणेंचि विचारें, । स्वस्वरूपसाक्षात्कारे । सर्वत्र ब्रह्मबोधु. ॥ ६ ॥ ऐसी समाधि सविकल्प. । पूर्वीं निरोपिली ते निर्विकल्प, । यया दोहींचें स्वरूप । नसे वेगळें. ॥ ७ ॥ व्यतिरेकें गुणनिरसन । करूनि, जाणावें निरजन, । नित्य, निश्चळ, निर्गुण, । पूर्ण आत्मत्वें. ॥ ८ ॥ मग तदन्वयें पाहता । गुणा नाहीं पृथक सत्ता, । सर्वं अवघा अखडता । स्फुरे व्यापारेंसीं. ॥ ९ ॥

व्यतिरेकान्वयें ऐसी । अभेदावस्था सर्वेसीं; । सविकल्प अथवा, परियसीं, । निर्विकल्प हो. ॥ ३८१० ॥ परंतु ब्रह्मात्माभेदस्फुरण । तें समाधीचें लक्षण; । तये समाधीचां ठाईं, जाण, । तयां कामिकांतें ॥ ११ ॥

व्यवसायात्मिका बुद्धिर्न विधीयते.

तन्निष्ठत्वें तदाकार । बुद्धि नव्हे, अर्जुना, स्थिर; । आयास केलेही समग्र । व्यर्थ होती. ॥ १२ ॥ भिल्लीफळरसें फाटलें, । वस्त्र जें काळें जालें, । तें पूर्वरूप आपुलें । सहसा नपवे. ॥ १३ ॥ तैसी जयांची मति, । प्रज्ञा, बुद्धि जितें म्हणती, । जाणीव, जाण, सुभद्रापति, । पांडु-नंदना, ॥ १४ ॥ ते तिया वाचा मोहिली, । भोगैश्वर्यी आसक्त जाली, । आपण आपणां चुकली, । भ्रमे दश दिशा. ॥ १५ ॥ ते वळतां न वळे सर्वथा, । लावितां नलगे परमार्था, । मग स्वरूपीं पावे निश्चळता । हें केंवि घडे ? ॥ १६ ॥ कांजियें दुग्ध नाशलें । तें पुनरपि नव्हे पहिलें, । तैसें चित्त वायां गेलें । कामिकांचें. ॥ १७ ॥ षड्रस अन्न पाचिलें । आणि व(म?)नरसे विलेपलें, । तें केवळ वायांचि गेलें, । ऐसें सांडावें. ॥ १८ ॥ खांदावरिची सिदोरी । ते जैं अनामिकु धरी, । तै वायांचि गेली, अव-धारीं, । त्याज्य होये. ॥ १९ ॥ तेणें काळें ऐसें जालें । तें मन वायांचि गेलें; । केवळ सद्गुरूचेही केलें नचले । जयावरि. ॥ ३८२० ॥ मर्कटा-चिये याती । उपदेश करावे किती ? । मनुष्यासारिखी व्यक्ति । दिसे म्हणौनि. ॥ २१ ॥ भ्रमतियाचिये दृष्टी । भ्रमत दिसे सकळ सृष्टि, । पृथ्वी, पर्वत, किरीटी, । चरचि पाहे. ॥ २२ ॥ तेणें किती आंवरावें ? । देखणें स्थिर धरावें ? । तेंवि समाधिजोगें नव्हे । जाणणें तें. ॥ २३ ॥ त्रिदोषें घेतलें मन । तयावरि कीजे ध्यान, । तें विक्षेपरूपचि म्हणौन । विक्षेपक नव्हे. ॥ २४ ॥ सेणजीवन डहुळिजे, । त्यामाजी मुख पाहिजे, । कामिकें चित्तें भोगिजे । समाधि तैसी. ॥ २५ ॥ हा जन्मु वायां गेला । म्हणिजे पुढीलुही नाशला, । रजतमदोषें विटाळला । पुरुषुचि तो. ॥ २६ ॥ सोशितां भोगैश्वर्यकामु । रजोगुण वाढे निःसीमु, । मग तमोगुणाचा उगमु । तेथूनिचि होये. ॥ २७ ॥ रजतममिश्रगुणें । सत्व हारपलें, ऐसें जाणें, । मग सत्वाभावें तेणें । तेंचि प्रबळ. ॥ २८ ॥ तैं मत्सरादि नाना

गुण । जयांचेनि योगें पतन, । तेचि आगळे वर्धमान । दिवसें दिवसें. ॥ २९॥ जो जो गुण वर्ते प्रकृती । ते ते क्रियेची उत्पत्ति, । मग तया तयाचि गुणांची पुडती । पेंठ पिके. ॥ ३८३० ॥ ऐसा येकें जन्में चुकला । तो अनंत काळ मागां पडला; । यालागीं केवळ नाशला । हेंचि कां न म्हणावें? ॥ ३१ ॥ आतां तयाचां पुराणीं । जाऊनि बैसे कव्हणी; । " तूं कवणु ?" ऐसा वचनी । प्रश्न करी. ॥ ३२ ॥ मग तयाचें तें उत्तर । अपरमार्थुचि म्हणती समग्र. । " अहो, हें ज्ञान थोर । जाणितलें आजि. ॥ ३३ ॥ आम्ही तुम्ही; हा विचारु । बाळकेंही जाणती, निर्धारु; । ययें अर्थीं अचतुरु । तो कवणु आहे? ॥ ३४ ॥ आम्ही ते प्रत्यक्ष आम्हीं; । तुम्ही ते प्रत्यक्ष तुम्हीं; । रूपीं, गुणीं, धर्मीं, नामीं । वेगळाले असों. ॥ ३५ ॥ असो, हें जाणोन काई? । श्रेय कवण याचां ठाईं? । आम्हां आमुचा कांहीं । संदेहो असे? ॥ ३६ ॥ वादी बोले वचन, । "तुम्ही हे देह दृश्यमान, । तै कर्मफलभोगें क्षीण । पडलया हे, ॥ ३७ ॥ येणें देहें यागादिक । जे जें करा कामिक, । तें भोगण्हार आणिक, । कीं हेंचि भोगी?" ॥ ३८ ॥ तेणेंसीं बोलती वचन, । " तै दिव्य देह पावोन आन, । स्वर्गी अथवा येऊन । ययेंचि लोकीं." ॥ ३९ ॥ वादी अनुवादे वचन, । " यया देहातें सांडून । तें देह धरावया कवण । मध्यें तुम्ही? " ॥ ३८४० ॥ तव ते बोलती येणेंसीं । मग ते जाणोन आपणासि । "कवणु प्रयोजनु ऐसी । बोली बोला?" ॥ ४१ ॥ वादी बोले वचन, । " आत्मा ब्रह्म सनातन, । यया विश्वाचें कारण । तुम्हीचि असां. ॥ ४२ ॥ तया तुम्हांपासाव सकळ । पुरत्रय भासे केवळ, । लयोद्भवस्थितिस्थळ । तेंचि सर्वा. ॥ ४३ ॥ तेथें इंद्रपदादि पदें नाना, । स्वप्ना ऐसी मिथ्या कल्पना; । तेंचि तत्व आधीं जाणा । वेदप्रणीत जें." ॥ ४४ ॥ आइकोनि इतुलें बोलणें । आत्मकाम घेइजे त्यांचेनि मनें, । मग ते आचार्याकारणें । पुसों प्रवर्तलें. ॥ ४५ ॥ " हां, जी, ऐसा सुगमु अर्थु । आणि तो वेदप्रणीतु, । आणि सकळा स्वार्थी स्वार्थु । पुरवी ऐसा, ॥ ४६ ॥ तरि हाचि कां नेणावा? । म्हणौनि आत्मा सांगावा. " । केला असतां वरवा । प्रश्न ऐसा, ॥ ४७ ॥ पुराणिकीं लाविले नयन, । विचारूनि पाहती

आत्मज्ञान, । तव गर्भांधा सूर्यदर्शन । तसें जालें. ॥ ४८ ॥ 'मी कवणु ? ऐसें पाहता । देहावेगळा नव्हे सर्वथा, । असो. उत्तर बहुतां । यावया नसे. ॥ ४९ ॥ मग पोथींची पानेंचि चाळी, । मेजी तेयिच्या वर वोळी, । घडी करी, उकली । वेष्टणाची. ॥ ३८५० ॥ जैसा होता फुगारला, । तैसाचि खरखरां उतरला; । मुखचंद्र आच्छादला, । काळिक आली. ॥ ५१ ॥ आंगीं न साहती फुले, । माळांचे भार उतरिले. । श्रुते आपुसया वारले, । ठेला मौनी. ॥ ५२ ॥ उत्तर नाहीं देखोनि । आशंका धरिली जनीं; । तव क्षणा येका मागुतेनि । बुद्धि आठवली. ॥ ५३ ॥ क्षणु येकु राहोनि निवांतु । बोलता जाला दुःखितु. । म्हणे, "हा मांडला वातु । संसारीं यये. ॥ ५४ ॥ हिया आइकता गोष्टी । आणि हा कामु धरिता पोटीं, । पुसावें ऐसी उठी । प्रवृत्ति अनिवार. ॥ ५५ ॥ मग सागतां, आइकतां पुरे । तेणें आत्मसाक्षात्कारें । सर्वनाशु शरीरें । येणेंचि पाविजे. ॥ ५६ ॥ जेहीं केली हे विचारणा । ते जितचि मेले, जाणा; । पळोनि गेले राना, । जाले हरण. ॥ ५७ ॥ तयांचिया वित्ता ऱ्हासु । हों लागला दिवसे दिवस; । उघडे, नागिवे पशु । जाले जन. ॥ ५८ ॥ येणें विचारें आथिले । ते पिशाच भ्रमों लागले, । अंध, मूक, बधिर जाले, । न उमजतीचि. ॥ ५९ ॥ सर्वहानि, सर्वनाशु । पावे येणे पुरपु; । येथें कोठे, हो, दोषु । श्रवणीं पडिला ? ॥ ३८६० ॥ आइकोनि याचें वचन । अनागत भविष्य विघ्न । तुमतें आमुत देखोन । वोसावला मी. ॥ ६१ ॥ साटिलिया सुमनमाळा; । आतां झडकरी उठा, चाला; । नाइकाल यया बोला । तरि पावाल नाशु." ॥ ६२ ॥ ऐसे बोलणें आइकोनि । बोटें घालिती श्रवणीं; । प्रवेशों नेदिती मनीं । शद्व तयाचा. ॥ ६३ ॥ तेणें बांधलें पुस्तक, । टपकरूनि उठिले लोक, । भयें येकापुढें येक । वांवा घेती. ॥ ६४ ॥ अध्यात्म पडतांही श्रवणीं । अहित माने तयालागूनि; । आतां प्रेतनाची करणी । पांगुळली ते. ॥ ६५ ॥ श्रवणेचि मानिती त्रासु । नातरि आइकती, पशु । जैसे कीर्तनाचा रसु । नेणती वेऊ. ॥ ६६ ॥

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवाऽर्जुन ।
निर्द्वंद्वो नित्यसत्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५ ॥

एसा योगु हा, सुभटा, । तुजप्रति, गा वीरश्रेष्ठा, । प्रकाशितां, निष्ठा । द्विविध सांगितली. ॥ ६७ ॥ एक मुमुक्षु व्यवसायी, । एक बुभुक्षु अव्यवसायी; । तयाचीं साधनें तेंही । प्रकट केलीं. ॥ ६८ ॥ एकें मोक्षु पाविजे, । एकें संसार भोगिजे, । उभयपक्षीं देखिजे । तव तेचि क्रिया. ॥ ६९ ॥ एकचि जीवन निर्मळ । तेणें द्राक्षी, कडमोडी दोन्ही वेल, । मुळीं प्रवेशले पाल्हाळ । सारिखे करी. ॥ ३८७० ॥ परिपाकीं द्राक्षवल्ली । द्रवे अमृता ऐसां फळीं, । येरी कटु तोडी फळली । कटमोटी जे. ॥ ७१ ॥ आचारी आणि अनाचारी । एकेंचि सूर्ये चेती; परि । क्रियाभेदु, व्यवधारीं, । तो जैसा तैसा. ॥ ७२ ॥ आपपरावयां सारिखा । दीपप्रकाशु जैसा निका, । सर्पा आणि बाळका । जैसें पय, ॥ ७३ ॥ समचि वर्षे सागरीं, । परि शुक्तिज शुक्ती उदरीं, । गोडही जळ येरीं । क्षार होये. ॥ ७४ ॥ वळणीं, ढाळीं एकि नदी; । चोख, चाग तैसेचि शब्दीं; । तीर्थी, वावरीं, बीदी । एक मेघोदक. ॥ ७५ ॥ तैसा विभक्तिकर्मयोगु । विहित आचरता सागु । सारिखाचि असे चांगु । साधकांतें. ॥ ७६ ॥ परतु बुद्धिभेदें फळ आन । योगेयांतें, ऐसें जाण; । तें तया कर्मा दूषण । ठेवूंचि नये. ॥ ७७ ॥ कामिकां नाथ, मोक्षसिद्धि, । तेथ फळद तयाची बुद्धि; । जन्मु, मरण, आधि, व्याधि । सप्राप्य तयां. ॥ ७८ ॥ व्यवसायिक जन सभ्रमें । मुक्त होत येणेंचि कर्मे; । तयाची बुद्धि निगमें । शुद्ध म्हणौनि. ॥ ७९ ॥ आतां तू ऐसें म्हणसील, । "एके योगीं द्विविध फळ? । कवणें सूचिलें हळाहळ, । अमृत एकटा? ॥ ३८८० ॥ एकाचि वृक्षा केवळें । गोड, कडू दोनि फळें? । पूर्वपश्चिमे निघाले । तयां येकु पथु? ॥ ८१ ॥ ससार आणि मोक्षु । येकेंचि योगें उभय पक्षु; । एयें बुद्धिभेदु प्रत्यक्षु । दाविला तुम्हीं. ॥ ८२ ॥ अमृत सेवितां बुद्धिभेदें । अनारिना जें गुणु दे, । तें अमृत हें नाम विनोदें । ठेविलें तया. ॥ ८३ ॥ पावकु हातीं धरिता । बुद्धिभेदु जाये वृथा; । तो निजगुणें सर्वथा । जाळुचि लागे. ॥ ८४ ॥ जीवन सेवनीं सारिखें, । भोजनीं अन्न अपारिखें, । तरि विरुद्धें फळें एकें । योगें कैसीं ॥ ८५ ॥ तरि बुद्धिभेदाचें हें करणें । असो पां विरुद्धवाणें, । स्वभावसिद्ध फळ येणें । योगें

केसें ?" ॥ ८६ ॥ "तरि अवधारीं, गा वीरपति, । सहज फळ योगीं आथी । तें मोक्षुचि; नसे भ्रांति । कांहीं येथ. ॥ ८७ ॥ सहज कर्म आचरतां । सत्वशुद्धि घडे, पार्था; । रजतमनाशें नाशतां । ससारु देखिजे. ॥ ८८ ॥ संसारुनाशें दुःखभ्रंशु, । सत्वें ज्ञानप्रकाशु, । ज्ञानें आत्मा अविनाशु । तोचि स्फुरे. ॥ ८९ ॥ म्हणौनि योगीं सहजफळ । तें मोक्षु जाणावें केवळ, । आतां तत्साठीं सकळ । घेइजे तें मिळे. ॥ ३८९० ॥ कनकसाटीं मृत्पिंडु । न मिळे काये प्रचंडु ? । राज्यसाटी पवाडु । खोलियेसी? ॥ ९१ ॥ अमृत वेंचितां तक्र । न मिळे काये साचार ? । गजसाटी शूकर । रोडि कैसे? ॥ ९२ ॥ शुक्तिजीं नमिळेती गुंजा, । चिंतामणीसाटीं पुंजा, । सुरतरुसाटीं वनजा । बाबुळा काये ? ॥ ९३ ॥ पार्था, जेणें मोक्षु मिळे, । तेणें संसारु कां न मिळे ? । जन जाले आंधळे, । लाभु नेणती ॥ ९४ ॥ तरि मोक्षसाधनभूता । स्वधर्मा विषयो तत्वता । संसारु हा दुःखदाता । दाविला कवणें? ॥ ९५ ॥ हरूनि अंधाची काठी । तया घालिजे कपाटीं, । ऐशी बुद्धि खोटी । कवणें केली ? ॥ ९६ ॥ अज्ञानमार्गी चुकलें । तया रानभरि जेणें केलें, । तो भला नव्हे, वधिलें । बाळक ज्यापरी. ॥ ९७ ॥ ऐसा मार्गी कवणु तस्करु । पाताऊनि लागला मारूं ? । तो कवणु ? हा विचारु । जरि पुससील, ॥ ९८ ॥

वेदाः

तरि ते च्यान्ही प्रसिद्ध । जाण कां. पार्था, वेद; । सर्वेश्वराचे शब्द । लोकोपकारा. ॥ ९९ ॥ जेणें हें विश्व रचिलें । तेणेंचि वेद केले; । वेदीं स्वधर्म बोलिले । मोक्षहेतु. ॥ ३९०० ॥ परोपकारार्थे, धनंजया, । वेद च्यान्ही परमात्मया । रचणें घडलें, पावावया । विश्व आपणां. ॥ १ ॥ तूं जरि ऐसें म्हणसील, । 'मोक्ष स्तविती वेद सकळ, । जें आणि तत्साधन केवळ । तें स्वधर्मु जें. ॥ २ ॥ तरि कामुकां तेणें पुरवी, । संसारकुवाडां गोंवी, । मोक्षसुख लपवी । भाविकांतें.' ॥ ३ ॥ तरि अवधारीं, गा वीरपति, । त्रिगुणात्मक लोक असती । त्या त्या वासना तयांप्रति । म्हणौनि कैसे ? ४ ॥ राजसा पाहिजति भोग, । नाना अर्थसंयोग, । शरीरप्रिय बहिरंग । पंचभौतिक हे ॥ ५ ॥ हें बहुकाळ सुखें असावें, । नाना भोग भोगावे, । हें पूर्वनिरोपणीं टावें । पडिलें तुज. ॥ ६ ॥ आतां तामस जन प्रमादी, । तयांची समळ बुद्धि; ।

तया नावीं सत्वबुद्धि । कैसे म्हणोनि. ॥ ७॥ प्रमादी, आळसी, निद्राळू, । विषादी, जड, भुकाळू । अर्थकामुही केवळु नाश्रयिती. ॥ ८ ॥ करणें कष्ट करावे, । मग अर्थ सकळ जोडावे, । नटके, न फळे, न करवे । काहींचि आम्हा. ॥ ९ ॥ करणें करावें स्नान ? । कवणें खावें तें अन्न ? । असो, नसो अस्तीर्ण,। शयनचि भलें. ॥ ३९१० ॥ ज्ञानी ना ते कामातुर; । आळसी, प्रमादी, व्यग्र; । उगेचि असता शरीर। सुख इच्छिती. ॥ ११ ॥ रजतमवृत्ति सकटीं । काही मात्र सत्व उठी, । तेणें निंगोष्टी ।करूं लागे. ॥ १२ ॥ म्हणे, 'वेद, शास्त्र जाणावें, । मातें ज्ञान प्राप्त व्हावें, । विद्यासमूह अभ्यासावे । येकलेनि. ॥ १३ ॥ प्रपंचु का ? कैसा जाला ? । ईश्वरें कासयाचा केला ? । प्रळयीं कोठें निमाला ? । कळावें हे. ॥ १४ ॥ तो ईश्वरु स्वय करणु ? । जीव तो किलक्षणु ?। माया अविद्या सगुणु । व्यवहारु जाणावा. ॥ १५ ॥ अविद्या ते कवण शक्ति ?। मायेची कैसी रीति ?। ऐसी शब्दज्ञान स्फूर्ति । प्राप्त व्हावी. ॥ १६ ॥ लक्ष्मीहूनि विद्या श्रेष्ट, । अतेव नमनाचे कष्ट, । शिकावें ज्ञान उत्कृष्ट । वेदशास्त्रमतें.' ॥ १७ ॥ ऐसें सात्विक ज्ञान इच्छिती, । राजसा कामोपभोगु चित्तीं, । तामसा दोन्ही न कळती, । नलगती अळसें. ॥ १८ ॥ ऐसे हे त्रिगुणात्मक जन । स्वधर्मां प्रवर्तती केसेन ? । न इच्छिती मोक्षसाधन ॥ गुणोपसर्गे. ॥ १९ ॥ कैंनि प्रवर्तती हे कर्मीं ? । आपुलाला मोक्षधर्मीं ? । चवती मनेंद्रिय धर्मीं । कामाभिरत. ॥ ३९२० ॥ कामाकुळा चित्तातें। कर्माकर्मीं ज्ञान न वसे, । इतुलेनि राजस जन ते । निकर्में बुडती. ॥ २१ ॥

त्रैगुण्यविषयाः

म्हणोनि तेणें वेदपुरुषें । जयाचें अपेक्षित जसें । ते तेणेंचि स्वधर्मविशेषें। केले सम्प्राप्त. ॥ २२ ॥ एणें एकें उपायें । जन स्वधर्मी निष्ट होवे, । ते वेरें, परि वाया जाये । ऐसें न व्हावें. ॥ २३ ॥ मग काम्यकर्मालागून । जाणता वेदार्थज्ञान, । वैराग्य उपजे असाधारण । काळांतरीं. ॥ २४ ॥ म्हणोनि स्वधर्मद्वारा । तेणें स्वर्गु सुचिला. वीरा, । राजसा, तामसा नरा । सात्विका प्रवर्तविलें. ॥ २५ ॥ जो जो कव्हणी इच्छील । तें तें स्वधर्मेंचि पावेल, । स्वधर्मी श्रद्धा होईल । इतुलेनि कीं. ॥ २६ ॥ नातरि म्हणती

एक, । "स्वर्गु इच्छिती सात्विक, । राजस इहलोकसुख । अपेक्षिती ॥ २७ ॥ अभिचारकर्म तामसांचें, । ऐसें त्रिगुणात्मक जन साचें; । वेदु पुरवी काम यथांचे । स्वधर्मद्वारा. ॥ २८ ॥ म्हणौनि वेदा दूषण । नाथीं ठेवावया कारण; । आपुलां आंगीं तीन्ही गुण, । नाशक ते. ॥ २९ ॥

निस्त्रैगुण्यो भव

म्हणौनि एक करावें, । गुणत्रय तुवां सांडावें, । मग वेदेंचि परमार्थु स्वभावें । दिसों येईल. ॥ २९३० ॥ कामोपभोगवासना । निःशेष सांडीं, अर्जुना, । वडुडा देई रजोगुणा । अभिलाषातें. ॥ ३१ ॥ इंद्रियव्यापार त्यजावे, । स्वार्थ चित्तीं नेघावें, । दंभ, दर्प मारावे । क्रोध, वीरा. ॥ ३२ ॥ कल्पना, कामु, मत्सरु, । भावने, ममते मारूं, । अहंता सांडूनि परु । रीघ स्वरूपीं. ॥ ३३ ॥ काये वहुजल्पें काज? । सांगेन तें गुणत्रय बुझ; । मग सांडावया सहज । उपजों लागे. ॥ ३४ ॥ प्रपंचस्फुरण रजाचें, । विवेकस्फुरण सत्वाचें । केवळ विस्मरण तमाचें । स्वरूप जाणावें ॥ ३५ ॥ आतां तिहींचा त्यागु कारितां । कैसा होसील तूं, पार्था? । तें ज्ञान करी मत्ता । वचनें आइकोनि. ॥ ३६ ॥

निर्द्वंद्वः

आदिकरूनि शीतोष्ण । सुखदुःखाचें जें भान, । ते गुणसाक्षित्वें येऊन । आंगीं न जडे. ॥ ३७ ॥ कर्त्ता, कार्य, करण; । ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान; । साध्य, साधकु, साधन; । येणें आकारें. ॥ ३८ ॥ गुणत्रयकृत-विकारें । यये त्रिपुटीचेनि आकारें, । एकि अहंता अंकुरे । तें लिंगदेह, गा. ॥ ३९ ॥ तेणें स्थूळ व्यवहारतां, । देह दिसे भोगितां, । जडें वस्त्रें चालतां । पूरु रूपें दिसती. ॥ २९४० ॥ तया देहद्वयाचें कारण, । आमया स्वरूपाज्ञान । जालें तमोगुणें, जाण, । प्रकृतिद्वारा. ॥ ४१ ॥ गुणत्रयाचेनि निरासें । देहत्रय नुरे आपैसें, । अवस्थात्रय तयासरिसें । उरेचिना. ॥ ४२ ॥ अवस्थात्रयीं देखिला, । तोही प्रपंचु मिथ्या जाला; । गुणत्रयाभावें उरला । साक्षी आत्मा; ॥ ४३ ॥ तया सुखदुःख नाथीं भान, । जया भासे त्याचें स्फुरण, । आतां सहन ना असहन । आत्म-यासि ॥ ४४ ॥

नित्यसत्त्वस्थः

देहावस्थात्रयसाक्षित्वें । राही प्रकृतीचेनि शुद्धसत्वें, । गुणत्रय मिथ्याभूतत्वें । देखत असता. ॥ ४५ ॥ प्रपंचस्फुरण रजाचें, । आन अज्ञान केवळ तमाचे, । निरसन देखसी दोहींचे । अनुभवदृष्टीं. ॥ ४६ ॥ तो प्रपंचु स्फुरे जेणें, । तें अंत करणादि वृत्तिमय जाणें; । सत्वाचेनि निरसनें । आभासेंचिना ॥ ४७ ॥ वृत्तिविकार बहिरंग, । तें रज निरसलें चांग, । वृत्तिविकार अंतरंग । सत्वहानि तुटले. ॥ ४८ ॥ उभयपक्षीं विस्मरण, । केवळ स्वरूपाचेंही अज्ञान, । तमनिरासें निरसन । जालें यया. ॥ ४९ ॥ तेथें साक्षित्वमात्र उरलें, । तेंही गुणबीज, जाण राहिलें, । सांगेन तेंणें बोलें । साडीं झाडकरूनि. ॥ ३९५० ॥

निर्योगक्षेमः

योगु म्हणोनि म्हणिजे, । तो प्रकृतिसंगु जाणिजे, । आणि तयाचें पाळन जें । तेंचि क्षेम ॥ ५१ ॥ तुझा ठाईं जाण वर्ते । नास्तित्व म्हणोनि प्रवर्ते. । शुद्धसत्व उपपादिजेतें । तेंही प्रकृतीचें. ॥ ५२ ॥ मिथ्या गुणत्रयभान । देहावस्थात्रय, जाण, । तेथें साक्षित्वाचें स्फुरण । कवण सापेक्ष ॥ ५३ ॥ दृश्यत्वें जाणोनि प्रकृतिगुणा, । जाणतासि आपणु त आपणा, । देहावस्थात्रयीं देखणा । मीचि म्हणौनि. ॥ ५४ ॥ तेही तुझी ज्ञानमनता । प्रकृति जाण, पार्था, । महाकारण तत्वता । देह म्हणिजे. ॥ ५५ ॥ तेथें साक्षित्ववृत्ति केवळ । तुरिया जाणती ज्ञानशील. । अमो, प्रकृतिगुणकार्य सकळ । भान नाश्रयानें. ॥ ५६ ॥ मी आत्मा, ऐसें जाणता । जाणिजे ययेपरी, पार्था, । ज्ञानाश्रयो तू तत्वता, । ऐसें जाणावें. ॥ ५७ ॥ स्वरूपस्फुराणा आश्रयो, । साक्षित्वापरी तू अन्वयो, । करूनि आपुलिये व्ययो । मूलप्रकृतीचा. ॥ ५८ ॥ सहजस्थिती निराकारें । वृत्तीचेनि उपसंहारें, । जैसा तैसा स्वस्थु उरें । आपुला ठाईं. ॥ ५९ ॥

आत्मवान्

मग तू निर्मळु, निश्चळु, । नित्य, शुद्ध, निराकुळु, । निःप्रपंचु केवळु । आपणुचि होईं. ॥ ३९६० ॥ तेथें शून्यता, ना भासता, । सच्चिदैकसुखरमता, । स्थिर, पूर्ण निर्विकल्पता । उरे अनायासें. ॥ ६१ ॥

जाणिवेविण जाणणें, ।'त्रिपुटीविण सुख भोगणें, । तें तूं स्वरूप आत्मखुणे । जाणें निरावलंब. ॥ ६१ ॥ तूंवाचूनि काहीं । जेथ दुजें तत्त्व नाहीं, । तें सहज तूं आपुलां ठाईं । जाणें आपण, पां. ॥ ६३ ॥ ययें अर्थी निरोपण । दृष्टांतमुखें करीन; । मन करूनि सावधान । श्रवण करीं. ॥ ६४ ॥

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।
तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥

सर्वतः संप्लुतोदके उदपाने

सर्वत्र जळ संपूर्ण, । साहे सागराचें उपमान, । उदकप्राशनाचें स्थान । भूतां सकळां. ॥ ६५ ॥ जिकडूनि दृष्टि कीजे । तिकडूनि प्रातु न देखिजे, । नेणतीं सागुलचि म्हणिजे, । तैसें संपूर्ण. ॥ ६६ ॥ नितळ, निर्मळ, विशाळ, । उदपान सर्वत्र उतळ, । नेणिजे किती जळ । ऐसें जें कीं; ॥ ६७ ॥ क्षुधितां, तृषितां, श्रांतां । संप्राप्त जालें असतां, । तयां जीवां समस्तां । तयाचां ठाईं ॥ ६८ ॥

यावानर्थः

जितुला जो प्रयोजनु, । जितुलेनि धाये प्राणु, । संतोषु पावे मनु, । तितुलाचि करावा; ॥ ६९ ॥ निजप्रयोजनु जितुला, । तितुला सांगु संपादला, । येरु जळसंग्रहो आथिला । तो असो जैसा तैसाचि. ॥ २९७० ॥ तृषिता ऐसें मानसीं । मी संप्राशीन सागरासि; । मग देखोनि जळस्थानासि । उडीचि घातली. ॥ ७१ ॥ दों चौं अंजुळीं पुरे जालें, । येर जळ असतां संचलें । मन न प्रवर्ते कांहीं केलें । पुनः प्राशना. ॥ ७२ ॥ सागराचाही प्रयोजनु । दों चौं अंजुळीं होये पूर्णु, । तरि हिंडावयाचा कवणु । उपयोगु, गा? ॥ ७३ ॥ कीं आपुली चाड सरे, । मग येरें उदकें पुरे, । भरोनि स्वार्थे अपारें । नाहीं काज. ॥ ७४ ॥ घटु भरतां पुरे जालें, । मग येर जळ जें उरलें, । तें काय स्वार्थबुद्धी घेतलें । जाईल खांदीं? ॥ ७५ ॥ ऐसेनही स्वार्थु केला । तरि दहा, वीस पखाला; । परंतु येरा जळा मुनिर्मेळा । सांडावेंचि कीं. ॥ ७६ ॥ स्नानार्थ गेला नरु । तेणें कवळावा. कासया सागरु? । आणि कवळिला तरि समग्रु । नेला जाये? ॥ ७७ ॥

नाहीं ब्रह्मज्ञान; । सर्वत्र कर्मेचि साधन । बोलिलें असे; ॥ १७ ॥ यज्ञ, दान, तप, व्रत, । क्रियाचि विशेषें विहित; । यया वेदांचें मत । ऐसें आहे.' ॥ १८ ॥ ते अज्ञान, बा रे पांडवा; । जाणते न म्हणावे तुवां; । वेदु म्हणिजे तो ठावा । नसेचि तयांतें. ॥ १९ ॥ येक म्हणती, 'सकाम । अवघां वेदीं असे कर्म; । येर तें अवैदिक, निपम । ब्रह्मज्ञान जें.' ॥ ४०२० ॥ तया मूर्खांचिया वचना । विश्वासों नये गा, अर्जुना; । अंधु तो काय दिनमाना । आंकळील? ॥ २१ ॥ सकलां दिनकरु उदैजला, । तयांमाजी येकाधा निदेला, । तळवरीं आंधारीं पडला । रात्रिमाजी ॥ २२ ॥ तया एकाचे वचन । कवणें मानावें प्रमाण? । गर्भांधा पुसिजे ग्रहण; । तें काय सांगे? ॥ २३ ॥ कव्हणी म्हणेल वादी, । 'ब्रह्मज्ञानचि सकळ वेदीं, । येर कर्मादिक सबंधी । वेदाचें नव्हे. ॥ २४ ॥ म्हणौनि सर्व कर्म सांडावें । आणि ब्रह्मज्ञानचि आइकावें, । येर तें वेदुचि नव्हे । अवघें कृत्रिम.' ॥ २५ ॥ तयां वचनें मूर्खांचीं । नयेति मानूं वेदियांचीं; । अल्पदृष्टि जयाची । पडली वेदीं. ॥ २६ ॥ मशके मेरु उलथावा? । सागरु कैसा तरावा? । देहाचा हृदयस्थु जाणावा । भावो कवणें? ॥ २७ ॥ येक बोलती वचन, । 'कर्म ज्ञानाचें साधन, । नित्यनैमित्तिकआचरण । त्याज्य नव्हे. ॥ २८ ॥ यज्ञ, दान, तप, व्रत । नित्य करावेंचि हें समस्त, । ययावेगळें ज्ञानमत । अप्रमाण तें.' ॥ २९ ॥ तया मूर्खांचिया उक्ति, । नमनाविया तुवां युक्ति, । साधनचि नित्य प्रति- । पादिती अज्ञान जन. ॥ ४०३० ॥ उदरार्थ शस्त्रसामग्री । यया क्षेत्रियाचां घरीं; । म्हणौनि काय, पां, सुरी । पोटीं घालावी? ॥ ३१ ॥ वेदोक्त कर्मजाळ । जऱ्ही साधनरूप सकळ । तथापि पाहिजे केले केवळ । तेचि करावें. ॥ ३२ ॥ अत्यता जडा, सकामा, । अवधारीं, गा वीरोत्तमा, । काम्य कर्मेचि, उत्तमा, । साधन असे. ॥ ३३ ॥ अवैदिकें मतें जातां, । विषयकामु संपादितां, । वरि पडिजे अनर्थीं । ह्मणौनियां. ॥ ३४ ॥ वेदमार्गेंचि कामु भोगावा, । ऐसा उपावो बरवा, । परतु हाचि अनुभवा । कारण नव्हे. ॥ ३५ ॥ निष्कामा कर्म-सामग्री । सत्वशुद्धीतें मात्र करी, । योगापूर्वीं ते बरी । साधकासि. ॥ ३६ ॥ आतां समाधि पावला नरु । तयाचा गुणव्यापारु । निमे; ऐसा प्रकारु ।

नव्हे कर्मे. ॥ ३७ ॥ तरि कर्मसन्यासें तेणें । शमदमादियोगाभ्यसनें । गुणातीत ज्ञानें । होइंजे कीं. ॥ ३८ ॥ निर्विकल्पा, समाहिता । विश्व, ब्रह्म न कळे वार्ता, । तेणें सार्वकाळ अखडता । कैसी भोगावी? ॥ ३९ ॥ म्हणौनि अन्वयज्ञान आश्रयावे, । स्वस्वरूप नित्य भजावें, । हेंचि कार्य करावे, । येर वावो. ॥ ४०४० ॥ ययालागीं जाण, वीरा, । वोळखोनिया अधिकारा, । वेदीं स्वप्रयोजनु खरा । तोचि सपादावा. ॥ ४१ ॥ आतां, तू पुससील विचारु; । 'माझा कवणु । अधिकारु?' । 'तरि तो प्रसगु समग्रु, । अवधारीं पां. ॥ ४२ ॥

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।
मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥

अवधारीं, गा विचक्षणा, । समावि नाथी कामिका जनां; । जे सत्वशुद्धीचिया साधना । जन्मूनि अतरले. ॥ ४३ ॥ तया रज, तम अनिवार, । सत्व आटलें समग्र, । जन्ममरणयेरझार । नित्य तयां. ॥ ४४ ॥ व्यवसायिक योगपथी । रजतमा तयाचिया शाति; । निर्मळा सत्वाची आइती । होंचि लागे. ॥ ४५ ॥ मग पावलेन शुद्धसत्वें, । स्वरूप होती पूर्णत्वें । चाड पुरे साधकत्वें । येथे वेदीं. ॥ ४६ ॥ म्हणौनि तू मुमुक्षु, । सांडीं कामिकांचा पक्षु, । व्यवसायी अति दक्षु । म्हणोति तूतें. ॥ ४७ ॥

कर्मण्येवाधिकारः

विहिता, वैदिकां कर्मी । अधिकारु आपुला स्वधर्मी, । धर्मरूपे सग्रामीं । अवश्य असे. ॥ ४८ ॥ येथे स्वधर्मी वर्तता । केली फळाची चिंता, । ते नाशले मजचि देखता, । कोण जाणे किती. ॥ ४९ ॥

मा फलेषु तेऽधिकारः

म्हणौनि स्वधर्मी आथी, । तो फळीं अधिकारु नाथी । तूतें, गा पुण्यकीर्ति । पांडुपुत्रा. ॥ ४०५० ॥

कदाचन

यालागीं, धर्माचरणीं, । भक्तियोगीं ना ध्यानीं, । केव्हांही फळाशा मनीं । नावलंबावी. ॥ ५१ ॥

कर्म फलहेतुर्मा भूः

मीं कर्मद्वारा स्वर्गातें । पावेन, येणें मतें । कर्म न करीं; करीं ते । सर्व ब्रह्मार्पण, ॥ ५२ ॥ अथवा इहलोकीं सुख व्हावें, । कौरव मारूनि राज्य भोगावें, । यश अप्रमित जोडावें, । यया चाडा ॥ ५३ ॥ न करीं विहितु स्वधर्मु । प्रत्यक्षु हा जो संग्रामु; । अनासक्त मनोधर्मु । सर्वत्र करीं. ॥ ५४ ॥ तृणहीं आश्रयूनि फळ । केलें कर्म तें दुःखमूळ, । सत्वशुद्धीतें केवळ । साधन नव्हे. ॥ ५५ ॥ योगविपर्यीं वाया गेलें । फळोद्देशें जें केलें, । आणि नाना दुःखा व्यालें । संसारद्वारा. ॥ ५६ ॥

ते

इतुलें आइकोनि निश्चयेंसीं । सकळ कर्मचि सांडिसी, । फळीं दोषु ययासि । देखोनियां; ॥ ५७ ॥ तरि, कर्माकरणीं महादोषु, । रजतमवृत्तिविकाशु, । सत्वाचा होईल नाशु । म्हणौनि तूतें. ॥ ५८ ॥

अकर्मणि संगो माऽस्तु.

अकर्म आंगा न यावें, । कर्मा करणें नाशयावें, । विहित सर्वदा आचरावें, । पांडुपुत्रा. ॥ ५९ ॥ न करीं ऐसें बोल झणें, । करीं आदरें असाधारणें । नमुयेंचि कर्म, परि येणें । फळ नाश्रयीं. ॥ १०६० ॥ फळ नाश्रयिता कर्म, बा रे, । तें प्राचीनत्वें नाकुरे; । तैंचि संसार येकसरें । जळाले देखसी. ॥ ६१ ॥ संसारसंग्रहा केवळ । भोगावें, गा, कर्मफळ, । तों न पाहिजे तें सकळ । हेंचि सांडावें. ॥ ६२ ॥ निष्फळकरितां सांगु । आपुला जो कर्मयोगु, । तो रजतमवृत्ति त्यागु । सत्वशुद्धि करी. ॥ ६३ ॥ म्हणौनि कर्म आचरावें । विहित, वैदिक स्वभावें; । निर्मळ सत्व पावावें, । जे समाधिसूचक. ॥ ६४ ॥ संसारदायक कर्मफळ । त्यजावें तें केवळ; । येथ-विषयीं समूळ । सांगों सांख्ययोगीं. ॥ ६५ ॥

योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय ।
सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥

हे धनंजय

धनंजया, अवधारीं, । यया योगाची कुसरी; । मुमुक्षु जनु जयापरी । पावे सिद्धीतें. ॥ ६६ ॥ सांख्यमतीं संन्यासु । सूचिला कर्मनिरासु । आणि

प्रकृतिगुणहरामु । विवेकदृष्टी; ॥ ६७ ॥ ते सांख्यबुद्धि निर्मळ । जयापरी कुशळ, । तैसीचि योगबुद्धि केवळ । विचारितां हे. ॥ ६८ ॥ विहित कर्म न सांडितां । स्वधर्मु आपुला करितां, । आणि सन्यासेसीं समानता । निष्ठा भोगावी. ॥ ६९ ॥ न करितां घडे केलें, । करूनि सर्व न केलें; । म्हणौनि संन्यासा आगळें । योगमत हें. ॥ ४०७० ॥ आतां हें सांगिजेल, । तुझा संदेहो छेदैल, । चित्त करूनि निश्चळ । श्रवण करीं. ॥ ७१ ॥

योगस्थः

योगीं करावी पूर्ण निष्ठा, । मग कर्मारंभु, गा सुभटा. । आतां योगु तो कैसा, प्रेमपुष्टा । अर्जुना, अवधारीं. ॥ ७२ ॥ देहेंद्रियव्यतिरेकें । निरसलेनि शब्दादिपंचकें, । कल्पना करि विवेकें । नाशली असतां, ॥ ७३ ॥ अनात्मभान हारपलें, । संत आत्मस्वरूप उरलें, । अज्ञान, अन्यथाज्ञान निमालें । तेणें स्फुरणेंसीं; ॥ ७४ ॥ ऐसें होय सनातन । ध्येय योगियांलागून, । तदाकार ठेलें मन । तेचि योगनिष्ठा. ॥ ७५ ॥ तेथें जागृति ना स्वप्नावस्था, । सुषुप्ति ना तुरीया तत्वता, । केवळ उन्मनी अवस्था । योगी म्हणती. ॥ ७६ ॥ लयो लक्षविक्षेपु । समाधि स्फूर्तीचा लोपु । सहजभावो निर्विकल्पु । जेथें वर्त्ते. ॥ ७७ ॥ केवळ तम ना प्रकाशु, । रात्रि, संधि ना दिवसु, । अभावा भावाचा ग्रासु । केवळ जेथें. ॥ ७८ ॥ ध्याता, ध्येय आणि ध्यान । यये त्रिपुटीचें अस्तमान, । मग अखंडाकारें लक्षण । असे योगाचें. ॥ ७९ ॥ असद्भाव, विलक्षणता । ज्ञेय जें सांख्यां तत्वता, । तेंचि निर्विकारेंचि तें, पार्था, । योगियांसि. ॥ ४०८० ॥ प्रकटे ध्येय ध्यानीं । तदैक्य तें ध्यान, धनुःपाणि; । तेचि निष्ठा निर्वाणीं । ध्यानयोगु तो. ॥ ८१ ॥ आतां, तये शुद्ध योगीं, वीरा, । राहोनि स्थिति निर्विकारा । कर्म करीं, धनुर्धरा, । ऐसें बोलतां, ॥ ८२ ॥ तूं म्हणशील एक वचन । जें निर्विकारें चित्तेंकरून । इंद्रियविकारकें निर्माण । तया कर्माचें, ॥ ८३ ॥ तरि तये योगीं आसक्त । करूनि विवेकें चित्त । अंतर्मुख निश्चित । आंवरूनि; ॥ ८४ ॥ परस्परां करणीं करणें । वर्तती कर्माकारणें, । तें जाणावीं निश्चळें मनें । दृष्टांतें तुवां. ॥ ८५ ॥ वरि वरि तरंग सागरीं । कल्लोळ, फेन, लहरी, । परंतु निश्चळ तो अंतरीं । असे जैसा, ॥ ८६ ॥ तैसा अंतरींचिया

अकर्मता । बाह्य कर्मी प्रवर्ते, पार्थी. । हे निर्वाणयोगाची कथा । तूतें निरोपिली. ॥ ८७ ॥ एथ जरि तू धनु पाणि । निष्टा करावयालागूनि । शक्तु नवसी गुणीं । चंचळा मनाचा. ॥ ८८ ॥ तरि भक्तियोगु निर्मळु । तेणे ध्यानी हो निश्चळु, । साता ईश्वरीं प्रेमळु । कर्मे करी. ॥ ८९ ॥ ध्यानाकारें निश्चळता । पातले चित्त असता । बाह्यकर्म सर्वथा । न निपजे म्हणसी, ॥ ४०९० ॥ तरि श्रद्धायोगें वर्तता, । सुलभ कर्म आचरता । तो नी सागन तवता, । निष्टा करीं. ॥ ९१ ॥ ईश्वरे रचिलीं भूतें । स्वधर्म जयाचे तयातें, । पावावे एकद्वारा मातें । म्हणोनिया कीं ॥ ९२ ॥ अतरीं वसोनि बुद्धीतें । प्रकाशी प्रकाशें सर्ते, । ते बुद्धि तया मनातें । चेष्टविती जाली. ॥ ९३ ॥ ईश्वरप्रकाशें प्रकाशली । मनबुद्धि करणीं प्रवेशली, । मग ती करणें लागलीं । कर्मे करू. ॥ ९४ ॥ म्हणोनि सकळनियता । सर्वात्मा, सर्वकर्ता, । मातें न वर्ते स्वतन्त्रता । कर्माकर्मी. ॥ ९५ ॥ दार्वी यन्त्रेंसी निराळा । सूत्रधारी असे वेगळा, । परतु तेथिंचिया कर्मकळा । स्वय चेष्टवी. ॥ ९६ ॥ तैसा मी ईश्वरतन्त्रें । कर्मी आपुला विचरें, । स्वतन्त्र नव्हे व्यापारें । मनेंद्रियबुद्धीचिया ॥ ९७ ॥ निश्वीं सचरल्पेपणें । करूनि गुणाचे लेणे, । इच्छामात्रे नारायणे । धर्मु प्रकाशिजे. ॥ ९८ ॥ तरंगसर्गे खेळे । जळचि उठी कल्लोळे, । तैसे विश्व ना, हें प्रवर्त्तलें । स्वरूप शिव. ॥ ९९ ॥ ऐसे आश्रयूनि योगबळ, । ईश्वरेक्यें निष्टय केवळ । कर्म करी निर्मळ, । विहित जें का. ॥ ४१०० ॥ नातरि, ईश्वरु जाण कर्ता, । जो सृजिता सकळा भूता, । तयाची आज्ञा सर्वथा । स्वधर्मु हा. ॥ १ ॥ येणें हिताहित भल्यते । वटो पापपुण्य मातें, । परतु आज्ञा कर्तव्य भक्तातें । यया बुद्धी, ॥ २ ॥ अथवा स्वधर्मु हा परिकरु । एणें आराधीन ईश्वरु, । मीं तया पुरुषाचा किंकरु । यया बुद्धी. ॥ ३ ॥ न करिता स्वधर्मु आपुला । अवज्ञा कर्ता मी जाला, । ईश्वरभक्ती अतरला । ऐसें मानी. ॥ ४ ॥ यया भक्तियोगा पावावया । अधिकारु तूतें, धनजया, । नसेल, तरि यया । आइकें कर्मयोगु ॥ ५ ॥ मातें स्वधर्मु जो आपुला । तोचि श्रेष्ठ पुण्या सकळा, । ईश्वरबुद्धी तया निर्मळा । अनुसरेन मी ॥ ६ ॥ हेचि मोक्षाचें साधन, । हेचि साध्य

मार्तें धन, । एणेंचि ब्रह्म निर्वाण, । तें पावैन मी, ॥ ७ ॥ सत्वशुद्धि घडे येणें, । संसारु निरसे एकें क्षणें, । ययावेगळीं तें दारुणें । कर्तव्यें पापें. ॥ ८ ॥ स्रष्टेन सृष्टी रचितां । स्वधर्मु लाविला भूतां, । एणें संसारु सर्वथा । निस्तरा म्हणौनि. ॥ ९ ॥ तो हा भवार्णवीं तारूं । स्वधर्मु नामें सर्वेश्वरु, । ऐसा मानसीं निर्धारु । धरूनियां, ॥ ४११० ॥ एथिचें जें कां वैगुण्य । तेही मातें परमपुण्य; । तेणेंचि एकें अन्य । कर्तव्य न इच्छीं. ॥ ११ ॥ म्हणौनि वा, रे, सुभटा, । कर्मयोगीं धरीं निष्ठा, । नवचें फळाचिया वाटा, । ते विषयोपार्जना. ॥ १२ ॥ तेणें न तोषे ईश्वरु, । न तुटे हा संसारु, । मोक्षु नव्हे, विचारु । नव्हे मुमुक्षांचा. ॥ १३ ॥

संगं त्यक्त्वा

ऐसा कर्मयोगु । आश्रयूनि ध्यानयोगु, । ठाके तैं निर्वाणयोगु । जो प्रथम सूचिला. ॥ १४ ॥ मीं कर्ता हा अभिमानु । सांडीं, नाशकु, अवलक्षणु; । एणे कर्मसंगें सीणु । आथी म्हणौनियां. ॥ १५ ॥ निर्वाणयोगीं वर्ततां । मीपण उठी जें, पार्था, । तयाची प्रथमावस्था । तोचि प्रकृतिसंगु. ॥ १६ ॥ प्रकृतिसंगाचिया दृढता । दृढावली गुणिकावस्था; । तेथें मीपणाची स्पष्टता । दिसों लागे. ॥ १७ ॥ तेणें गुणसंगें, वा. रे, । कर्ता, कार्य, करण स्फुरे. । मग तयाचेनि साचोकारें । देहद्वयसंगु. ॥ १८ ॥ गुणत्रयाची त्रिपुटी । ते तत्वमय जाण गोष्टी; । अनादि लिंगदेह, किरीटी । बोलिजत असे. ॥ १९ ॥ अंतःकरण, मन, बुद्धि, चित्त, । पांचवी अहंता निश्चित; । ज्ञाता, भोक्ता, कर्ता म्हणीजत । अर्थार्थविषयीं. ॥ ४१२० ॥ आतां पचकु प्राणांचा । आणि वशकु इंद्रियांचा, । ज्ञान भोगणें साधन ययांचा । मेळापकु हा, ॥ २१ ॥ शब्द, स्पर्श, रूप, रस । गंधादि पांच मात्रांश; । ज्ञेय, भोग्य, कार्य साभास । ऐसी त्रिपुटी. ॥ २२ ॥ मी कर्ता, एणें अहंकारें । त्रिपुटी एकत्र स्फुरे; । माजी स्थूळदेह षड्विकारें । सहित आथी. ॥ २३ ॥ कर्मीं कर्तृत्वाचें स्फुरण । तें देहद्वयाचे आवरण, । वरि संचित, प्रारब्ध, क्रियमाण । खरेंचि जालें. ॥ २४ ॥ कर्ता हे बुद्धि, पार्था, । कर्मसंगु, गा, सर्वथा; । तो त्रिविधा कर्मातें प्रसवता । होईल, भसारदायकु. ॥ २५ ॥ कर्तेपणा

प्राग्दशे । मीपण मात्र जें असे, । तो गुणसगु, परियसें, । पुरुषा वधन. ॥ २६ ॥ तया गुणत्रयाची स्पष्टता । तें स्थूलसूक्ष्मदेह, पार्था, । जें म्हणौनि वेथा । तापत्रय भोगिजे. ॥ २७ ॥ अग्नि या लोहसगें । घनघाय साहे आगें, । मुसी-माजीं धान्य रिघे । तें पावे दडघातु. ॥ २८ ॥ तैसा देहद्वयसगती । चिर-काळ नाहीं मुक्ति, । म्हणौनि साडावी सगति । तयाची तुवा. ॥ २९ ॥ देहद्वयसगु साडिजे । ते तें मीपण विसरजे, । स्फूर्ति गिळूनि राहिजे । सहजस्थिती. ॥ ४१३० ॥ मीपणापूर्वी जाण । जें तया मीपणाचें कारण । ते आत्मविषयीं अज्ञान । वृत्तिसूचक. ॥ ३१ ॥ तेंचि मात्र अज्ञान । अविद्या-सगु ऐसें वचन । माझें साच मानून । त्यागु करीं. ॥ ३२ ॥ जेथें निर्दे-ल्या, अर्जुना, । दिसे प्रपचु हा सिवणा, । जीवु, ईश्वरु, नाना । येर विषय. ॥ ३३ ॥ स्वय ज्ञानरूपु असता । "नेणे" ऐसें म्हणता । अज्ञान-सगु सर्वथा । जाला तुज. ॥ ३४ ॥ तेणें अज्ञानसगत्यागे । देहद्वय फिरे अवघें, । मग पाठीं वाट लागे । तया मोक्षाची. ॥ ३५ ॥ अज्ञानाचा प्राग्भावी । ज्ञान असे तदनुभवी, । तो प्रकृतिसगु निया वी । आत्मया-तें. ॥ ३६ ॥ आपणपया जाणिजे । तेंचि ज्ञान प्रकृति म्हणिजे, । जया-पासान उपजे । अज्ञान, अन्यथाज्ञान, ॥ ३७ ॥ जेणें अज्ञान साच केलें, । कर्मकर्तृत्व रचिलें, । देहत्रयीं गोविलें, । आत्मया शुद्धा. ॥ ३८ ॥ म्हणौनि ज्ञानेंसीं अतरगु । राहीं प्रकृतीसीं असगु । आश्रयूनि निर्वाणयोगु । कर्ता न म्हणें ॥ ३९ ॥ केवळ गुणी, गुणकर्मी । असगता सांगितली आम्हीं, । तें जाणोनि, कर्ता मी । ऐसें न वदावें. ॥ ४१४० ॥

सिद्ध्यसिद्ध्यो· समो भूत्वा

एत्र, आश्रयूनि योगातें, साडूनिया पूर्वोक्ता सगातें । कर्म करिसी, तेथे । एक आहे, ॥ ४१ ॥ स्वधर्मी यश आलें, । सकळा कौरवातें जिंकिलें, । राज्य हिरोनि घेतलें । ययापासाव, ॥ ४२ ॥ अथवा जोडिलें अयश, । कौरवीं जिंकिलें आम्हास, । रणीं मुकलों प्राणास । ऐसेंही हो, ॥ ४३ ॥ तन्ही तें सारिखेंचि जाणावें, । विहितीं फळ नाश्रयावें, । स्वकर्म म्हणौनि करावें । निर्वासनबुद्धी. ॥ ४४ ॥ मरों अथवा मारूं, । नाहीं एथिंचा विचारु, । विहितु आपुला आचारु । तो न सडा-वा. ॥ ४५ ॥ आम्हीं अथवा तेंहीं । राज्य केलें, चिंता नाहीं, । परतु स्वधर्मु

आपुलां देहीं । तोचि करावा. ॥ ४६ ॥ आमुचिया वर्णातें । हा प्रसवला हें निरुतें । तरि तेणें वर्ण ययातें । सांडिले जरी, ॥ ४७ ॥ तरि आणिकु केला पिता । कां वर्णसंकरः अधर्मता, । मानु देउनि अहिता । हिता नाशिलें. ॥ ४८ ॥ हें फळे अथवा न फळे; । परि ईश्वराज्ञेसि मी न टळें, । हेचि भक्ति निर्मळें । मानसीं करूं. ॥ ४९ ॥ स्वधर्मसहितें सर्वत्रें । रचिलीं भूतें ईश्वरें. । प्रवर्तवी इच्छामात्रें । तोचि पुरुष. ॥ ४१५० ॥ तेथें सिद्धि अथवा असिद्धि । हो, परी काहाडिता बुद्धि । दंडयु होईन त्रिशुद्धी । ईश्वरातें. ॥ ५१ ॥ सिद्धि, असिद्धि पादार्थिक, । पादार्थिक ते लटिक, । आतां लटिक तें कांहीं एक । वर्तत असे ? ॥ ५२ ॥ म्हणौनि मिथ्या-साठीं । स्वधर्मेसीं करितां तुटि । साचें स्वरूपेसीं भेटि । केंवि होईल ? ॥ ५३ ॥ अहो, सत्कर्मानुष्ठानें । सत्त्वशुद्धी मोक्ष पावणें, । ऐसें अवलंबूनि मनें । प्रवर्तलों असतां, ॥ ५४ ॥ पुढती कामु चिंतावा, । सिद्धी हातु घालावा, । रजतमयोगें करावा । चित्तभ्रंशु, ॥ ५५ ॥ तें उपराठा मार्गु जाला, । पश्चिमे सूर्यो उगवला, । उगमा उजू चालिला । सारितावोघु. ॥ ५६ ॥ आंगिचें गेलें वेड, । लेईन म्हणे जातवेड । तैसा व्यवसायिकु चाड । सिद्धीची करी. ॥ ५७ ॥

- कर्माणि कुरु

ऐसें, अर्जुना, जाणोनि । केवळ स्वधर्मुचि म्हणौनि । कर्म करीं, निर्वाणीं । पावसील. ॥ ५८ ॥ ऐसें हें कर्म करितां । योगाची सिद्धि पूर्वोक्ता, । तोचि प्रकारांतरें मागुता । आइकें योगु. ॥ ५९ ॥

समत्वं योग उच्यते

सिद्धि आणि असिद्धि, । अर्जुना, जे समताबुद्धि, । तोचि जाणावा त्रिशुद्धि । योगु तुवां. ॥ ४१६० ॥ समता जरि आथिली । तरि कर्मयोग-निष्पत्ति जाली, । विषमता मात्र प्रवर्तली । तोचि योगभ्रंशु. ॥ ६१ ॥ समता तरि तो भक्तियोगु, । समता ध्यानयोगु अभंगु, । समता तरिचि सांगु । निर्वाणयोगु घडे. ॥ ६२ ॥ आतां ते समता कैसी ? । आधीं कर्मयोगीं परियसीं, । आइकोनि, धरीं मानसीं । सात्विकें भावें. ॥ ६३ ॥ आपुला जो आथी स्वधर्मु । तो साधितां जऱ्ही दुर्गमु, । आणि अंतीं न पुरे कामु, । निर्फल जाये, ॥ ६४ ॥ तऱ्ही तो मनीं बैसला, । न सुटे

कांहीं केला, । क्लेशमयुही जाला, । सुखाचाची. ॥ ६९ ॥ एकावया पुरुषातें । एकाधा वेधु वर्ते । तो प्राणावरि ये, तयातें । परंतु न सोडवे. ॥ ६६ ॥ ऐसी स्वधर्मी जया चाड । तया असिद्धि तेही गोड; । निर्फळ ना सफळ, वाड । तेंचि करी. ॥ ६७ ॥ स्वधर्मु जाला सुफळु । सकळकामदानशीळु । तऱ्ही जो नव्हे उतावीळु । तेणें अर्थस्वार्थे. ॥ ६८ ॥ परिसें लोह हेम जालें । तें घेऊनि तयातें सांडिलें, । ऐसें तंव मनुज देखिलें । कव्हणीं नसे. ॥ ६९ ॥ दुभतयाची आशा जीवीं । तरी कामधेनु पाउदी यावी । कीं कामु सांडूनि करावी । तेचि जतन. ॥ ४१७० ॥ चिंतामणीचा विकरा । कवणा करवैल पामरा ? । आतां फळ नको, परि घरा- । माजी तो असो. ॥ ७१ ॥ फळाची नाथी चाड, । परि सुरतरू ऐसें झाड । निफळ नान सानें, वाड । परि तेंचि पुरे. ॥ ७२ ॥ आचरतां आपुलें कर्म । सिद्धि आणि असिद्धि ऐसी सम । जाली, म्हणिजे वर्म । साधलें योगाचें. ॥ ७३ ॥ नातरि, आशा धरूनि । कर्म कीजे, धनुःपाणि, । तें कारण होये योगहानी । संसारदायक. ॥ ७४ ॥ स्वधर्मे सगुंची जोडिजे, । तरि अधर्मे काये कीजे ? । कवणें उपायें सु;टिजे । जन्ममरणादिकीं ? ॥ ७५ ॥ विपाचा गुणु करी । तें अमृत नव्हे, गा, वैरी । परि यया लोकां भारी । आवडि तयाची. ॥ ७६ ॥ अमृता ऐसीं वाटिती । विपाची चाड करिती । ते योगियां नावटती । जने संसारियें. ॥ ७७ ॥ स्वधर्मी केवळ आसक्तु । सिद्धि, असिद्धि सम जाणतु, । तो योगी, कर्मी भक्तु । कैसा, तो अवधारीं. ॥ ७८ ॥ करितां ईश्वरआराधन । वरि पडो एकाधें विघ्न । परि भक्तिपासाव मन । न चळे जयाचें; ॥ ७९ ॥ देहांतक होतु कष्ट । क्षणक्षणा उपजो अरिष्ट, । सिद्धि पावतां अरिष्ट । वरि विफळ जाये, ॥ ४१८० ॥ परतु जयाचें वेधलेपण । वेचूंनि पाहे तेथें प्राण, । निर्फळही परी मन । न सोडी जयाचें. ॥ ८१ ॥ "देवा, तुझिया स्मरणासाठीं । जन्म होतु कां लक्षकोटी, । परंतु हृदयाचां संपुटीं । सांठवीन ते, ॥ ८२ ॥ भेद्रु दिसैल तरि दिसो, । अविद्या नाशो ननशो, । अद्वैतवादी हांसो । जनु देखोनि; ॥ ८३ ॥ परि मी कीर्तनीं गाईन, । आनंदें टाळिया वाईन, ।

रंगणीं नृत्य करीन, । आदिदेवा. ॥ ८४ ॥ अंतःपर भेदु ननशो, । जनु हांसैल तो हांसो, । परि सार्वकाळ दिसो । रूप तुझें. " ॥ ८५ ॥ देवेसीं वोलतां मातु । नापेक्षी आनु परमार्थु; । एणें एकें घातु । सर्वस्वा हो. ॥ ८६ ॥ सप्रिय ध्यान करितां । मूर्तीचें श्रीअनंता, । न चळे कल्पांतु माथां । वाजो जन्ही, ॥ ८७ ॥ भूतीं भौतिक नाशो, । जन्ही हें देह ग्रासो । कार्यकारणीं समरसो । निःशेष पैं, ॥ ८८ ॥ तन्ही मीं न सोडीं चरणु, । होईन तेथेंचि लीनु, । मनीं भावो न धरीं आनु । तुज वांचूनियां. ॥ ८९ ॥ पृथ्वी काल्वैल जीवनीं, । ते तूंतेंचि स्मरेन मनीं; । परि आणिकांची धरूनि । कांस, न तरें. ॥ ४१९० ॥ ब्रह्मांड जळैल धडधडा । ते न विहें मीं त्या प्रचंडा । अनळा; मग वेगाडा । तूंतेंचि स्मरेन. ॥ ९१ ॥ आंदोळीतु तया अनळा । आंगावरी अनिळु आला, । तथापि नटळें मी बोला । दासु म्हणवीन. ॥ ९२ ॥ पवनु सामावे गगनीं । परि मी तुझांचि चरणीं, । आनही दुःख यया-हूनि । सुखेंचि पडो; ॥ ९३ ॥ देवा, तुझेनि स्मरणाधारें । वर्तत असतां, अपारें । दुःखे पडलीं, तीं समग्रें । तृणाचियापरी; ॥ ९४ ॥ ऐसा भक्तियोगें वर्ततां । अन्नधारी, गा पार्था, । सिद्धि नाहीं; परि सर्वथा । दुःखचि पावे, ॥ ९५ ॥ तथापि तेणें भक्तिमुखें । तो तें दुःख ऐसें न देखे; । वरि शंकविलाही न शंके; । पुडती कैसा? ॥ ९६ ॥ माझिये भक्ती वर्ततां । मी होयें कांहीं देता, । तंव तें न ये चित्ता । तयाचिया. ॥ ९७ ॥ म्हणे, "जी, देवा, हृदयस्था, । माझया सकळ स्वार्था, । तूतें सांडूनि अर्था । मी कायें अपेक्षूं? ॥ ९८ ॥ जयाचिये आड भक्ति । अष्टमहासिद्धि येती, । जे नको म्हणौनि वोडवती । स्वर्गादिकें; ॥ ९९ ॥ ब्रह्मादिकां जे रंजवी, । इंद्रादिकां मोहो लावी, । तिते सांडूनि अनुभवी । कामु कव्हणी? ॥ ४२०० ॥ ऐसी जोटली ते सांडूं, । इया येकार्थे पद जोडूं, । तें, देवा, माझया दगडु । पडिलाचि कीं! ॥ १ ॥ आतां जीपासूनि सलोकता । ते सांडूनि हेंचि घेतां, । हानि कीं लाभु स्वार्था । पाहिजे जैं. ॥ २ ॥ समीपतामुक्ति घेइजे । तरि तेही भक्तीपासूनि देखिजे । म्हणौनि ते नको, कीजे । जतन इयेचीचि. ॥ ३ ॥ स्वरूपतामुक्ति फुडी । तेही भक्तिपर्थी जोडी, । जे संग्रहितां

उडी । घालिती मुक्तीं. ॥ ४ ॥ आतां निर्वाण सायोज्यता । ते भक्तियोगेंचि लाभे भक्ता; । अतेव कामधेनु तत्वता । भक्ति नव्हे? ॥ ५ ॥ भक्ती स्वयें तूं वश्रु होसी, । अतेव समानु न होसी; । आतां हेंचि असो, जें देसी । तें माधारण. ॥ ६ ॥ देसील तें मी नेघेंचि, । न जोडसी तूं तरि मुखेंचि; । परि आवडि तुझिया रूपाची । ते मी न सोडीं. ॥ ७ ॥ ऐसा भक्तियोगीं वर्ततां । सिद्धि, असिद्धि यां, पार्था, । सारिख्या पाहे मत्ता, । तुच्छा म्हणौनि. ॥ ८ ॥ आतां ध्यानावस्थे वैसला, । माझां सगुणी रूपीं लेधला, । तो सिद्धिअसिद्धी जाला । कैसा समचित्तु ? ॥ ९ ॥ अंतरी असतां एकनिष्ठ । बाहेरि ब्रह्मांड तटतट्ट, । कां सप्तसागर एकवाट्ट । कल्पांतु तो, ॥ ४२१० ॥ समीप कोसळो गिरिवरु । प्रचडाघातु थोरु, । कां पचवदनु व्याघ्रु । करु शब्दु, ॥ ११ ॥ अथवा पातले ब्रह्मादिक । इंद्रचंद्रादि देव अनेक । वरु द्यावया रुद्रादिक । "माग" म्हणती. ॥ १२ ॥ प्रत्यक्षु आइकें, वीरा, । मी उभा ठाकें वाहिरा । "माग" म्हणें एक सरा । संतोषोनि. ॥ १३ ॥ तथापि जो माझा ध्यानी । रंगला, आन न इच्छी मनीं, । तया इष्टानिष्टें दोन्ही । सारिखीच. ॥ १४ ॥ अनिष्टें नमनी भय, । इष्टे न चिंती जें प्रिय, । जयातें आवडे ध्येय । रूप माझें. ॥ १५ ॥ आतां निर्वाणयोगीं जो पुरा । तो कैसा? अवधारीं, वीरा, । जो कीं आत्मत्वें दुसरा । भावों नेणे. ॥ १६ ॥ सगुण आणि निर्गुण । हें मात्र जया स्फुरण, । सारिखेंचि वृत्ति प्रधान । निर्वाणनिष्ठा. ॥ १७ ॥ स्वस्थानीं असतां योगिया । कैंचें ब्रह्म? कैंची माया? । प्रपचु परमार्थु आत्मया । सारिखाचि. ॥ १८ ॥ इष्टानिष्टें जो न चळे, । चळलाचि गुणीं न मिळे, । मिळालाचि तो नातळे । तया भेदा. ॥ १९ ॥ भेदु ना तया अभेदु । केवळ वादु ना अवादु, । सहज, अव्ययो, सिद्धु, । निराकारु तो. ॥ ४२२० ॥ तेथें जीवत्व ना शिवत्व, । साभासता ना शून्यत्व, । सर्वीं सर्व मिथ्यात्व । संपादलें असे. ॥ २१ ॥ निर्वाणयोगीं समता । ते सर्वत्र ब्रह्मरूपता, । प्रकृतिपुरुषां एकरसता । सांख्य बोलती. ॥ २२ ॥ तेथें सच्चिदानंदमय । सर्व ब्रह्म अद्वय, । निर्विकल्प, निरामय । स्फुरों लागे. ॥ २३ ॥ अन्वयें तेंचि पाहतां । प्रपंचेसीं अद्वैत, पार्था, । मग सर्वत्र स्वरूपसमता । देखे योगी. ॥ २४ ॥ स्वर्ण, अळकारें दोन्हीं ।

आटलीं केवळें स्वर्णीं । मग सहजसिद्धवांचूनि । दुसरें नसे. ॥ २५ ॥ व्यतिरेकें सांख्यु म्हणती, । गुणसाम्याची जेथें स्फूर्ति । सुलीन होय, तें निरुति । केवळ समत्व. ॥ २६ ॥ अन्वयें वेदांतु म्हणे । "सर्व ब्रह्म," हें जाणणें; । समत्व नामें येणें । सर्वकाळ. ॥ २७ ॥ योगी म्हणती वचन, । "मन जेथ जालें उन्मन । सच्चिदैकआनदघन । निर्वाणपद." ॥ २८ ॥ एथ आमुचा निश्चयो ऐसा । अद्वैत ब्रह्म, गुडाकेशा, । मतवादु अनारिसा, । परि सारिखेंचि तें. ॥ २९ ॥ कनक आणि कांचन । प्रयोजनीं नव्हे आन; । जैसें जळ आणि जीवन । उदकचि तें. ॥ ४२३० ॥ ऐसें समत्व जें कथिलें । योगपरत्वें वेगळालें । योगु हें नाम ठेविलें । तयातें आम्हीं. ॥ ३१ ॥ जयें योगीं तें न दिसे, । तो योगु नव्हे, जाण ऐसें, । मिथ्याचारु, परियसें, । पांडुपुत्रा. ॥ ३२ ॥ ते फलाचारी निपयिक । योगी न म्हणावे मूर्ख; । एतद्विषयीं आइक । सांगिजेल तें. ॥ ३३ ॥

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।
बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४० ॥

हे धनंजय

माते विचारितां स्वयुक्ति । अवधारीं, गा, सुमति, । व्यवसायिकां आणि येरांप्रति । कैसें तारतम्य. ॥ ३४ ॥

बुद्धियोगात्

व्यवसायात्मिकाबुद्धी । योगु निरोपिला जो आधीं, । कामकल्पनेनिरोधी । विशेषें जो. ॥ ३५ ॥ तेथें कर्मयोगु बहिरंगु । विहितु सूचिला सांगु; । ध्यानयोगु अंतरंगु, । धनंजया. ॥ ३६ ॥ तिजा भक्तियोगु कथिला, । चौथा निर्वाणयोगु सांगितला । आता अवधारीं, वहिला, । योगाचें फळ. ॥ ३७ ॥ कर्मयोगु आचरतां, । फळाचिया निराशता । आणि अकर्तात्मज्ञानता । मोक्षहेतू ॥ ३८ ॥ तो सत्त्वशुद्धीतेंचि करी, । रजतमदोष हरी, । परंतु गुणत्रयातीत न करी । क्षणमात्रें. ॥ ३९ ॥ बीजारोपणीं काये कीजे? । प्रथम पृथ्वी चाळिजे, । मग जळ सुरवाडें लाविजे । बीजादिक. ॥ ४२४० ॥ कृषिकु कृषी चाळूनि । उगवलेंनि दे मारूनि । मग बीज पेरी पाहोनि । वाफ वोल. ॥ ४१ ॥ तैसें कर्मयोगें रजतम । फिटोनि, सत्त्व उरे उत्तम, । मग योगमार्गीं सुगम । मनोजयाचें. ॥ ४२ ॥ तो मनोजयो

ध्यानयोगें । क्षणक्षणा होंचि लागे, । पाठीं लयविक्षेप अवघे । क्षीण होती. ॥ ४३ ॥ ऐसा पात्रभूतु योगी जाला, । परि निर्वाणयोगु तो वेगळा, । जेणेंविण आंधळा । कर्मयोगु तो. ॥ ४४ ॥ जो शुद्धसत्वमात्रें नसुधे । मनोजयेंचि न सिद्धे, । जाणिजे गुरुप्रसादें । निर्मळा बुद्धी. ॥ ४५ ॥ ईश्वरांनुग्रहेंविण । गुरुकृपा नाथी जाण; । यालागीं जाण साधन । भक्तियोगु ययें. ॥ ४६ ॥ म्हणौनि भक्तियोगु सपुरु । करूनि आराधिजे ईश्वरु, । मग तयाची प्रसन्नता जें, गुरु । कृपा करी. ॥ ४७ ॥ भक्तियोगाचें हेंचि फळ, । जें गुरुकृपा होये केवळ; । ऐसें साह्य योगबळ । जालें असतां, ॥ ४८ ॥ रजतमें योगी सूटला, । निर्मळें सत्वें आथिला, । निश्चळ चित्त भेटला । तयावरि गुरु, ॥ ४९ ॥ मग निर्वाणयोगाची खूण । प्रकटों लागे साच जाण, । पाठीं तयापासूनि आन । कर्तव्य नसे. ॥ ४२५० ॥ तेथें सत्वाचेनि आधारें । योगयुक्ती मनें स्थिरें, । सद्गुरूचेनि उत्तरें । बुद्धि प्रकाशे. ॥ ५१ ॥ तेथें दृष्टीविण निवळे । सर्वांगाचे होती डोळे, । प्रपंचभान मावळे । आपेंआप. ॥ ५२ ॥ स्फूर्तीचें उदयमान । अस्तमानीं ऐसें जाण, । आपुलां जें आपण । रूप करी. ॥ ५३ ॥ आठवाचिये प्राग्दशे । विसरा होणेंचि रूप असे, । तंव कांरु जैसें तैसें । अंग बुद्धीचें. ॥ ५४ ॥ वृत्तीचें वावरलेपण । वृत्तीतें नाशक जाण, । तेथें सहज सहजाची खूण । सहज जाणावी. ॥ ५५ ॥ गगनाचिसारिखें असे, । गगन दृष्टी न दिसे, । दिसोनि गगन मुसे । आटी आंगाचिये. ॥ ५६ ॥ जयाचिये, पार्था, खुणे । खुणेतें लागे विसरणें, । सुखाचेंचि रूप होणें । निर्विकार तया. ॥ ५७ ॥ दुजेपणातें दंडावें, । आपणपयां आपण न व्हावें, । मग सहजचि आन नव्हे । आपणाहूनि. ॥ ५८ ॥ तेथें शुद्धि तया सत्वाची, । तिया अभावना भेदाची, । वरि हानि नेणिवेची । असे आपेंआप. ॥ ५९ ॥ तेथें चित्तनिश्चळता पावली, । तिणें वृत्तीची होळी जाली, । निर्विकल्पस्थिति राहिली । सार्वकाळ. ॥ २४६० ॥ तेथें गुरुमुखें ज्ञानकळा । बुद्धि प्रकाशली अवलीळा, । तोचि आत्मसाक्षात्कारु जाला । बुद्धियोगनामें. ॥ ६१ ॥ यया बुद्धियोगा साधन । कर्मयोगु ऐसें जाण, ।

उपासना आणि ध्यान । तयाहीहूनी ॥ ६२ ॥ म्हणौनि बुद्धियोगु निका । जोडीं, न जोडें कामिका, । योगाची पूर्ण भूमिका । म्हणौनि ययाहूनि. ॥ ६३ ॥

कर्म

साधनभूतु कर्मयोगु । विहितु, निजाचार, चागु, । सकामा, नि कामा मार्गु । पानानया पदीं. ॥ ६४ ॥

दूरेण

तो शरीरावाह्य निपजे । पानात्र कर्मेंद्रिया उपजे, । आणि बुद्धियोगु सहजे । बुद्धीतें पर ॥ ६५ ॥ यालागीं दुरासु निर्धारें । हा वाह्य तो यया अतरें; । पुनरपि आइकें, बा, रे, । कर्मयोगु तो ॥ ६६ ॥

अवरम्

हा साधाना प्रकृतीगुणीं । आणि तो प्रकृतिचा कारणीं । स्फुरे गुणाचा निराकरणीं । योगियातें. ॥ ६७ ॥ शरीरजन्यु हा अपर । बुद्धियोगु बुद्धि-परु, । हा ससारी, तेथ ससारु । तो आधीचिना. ॥ ६८ ॥ वेदु या आदि-कर्मातें, । परि कर्म नव्हे वेदातें, । आणि निर्वाणयोगु सर्वातें । सामाऊनि असे. ॥ ६९ ॥ कर्मीं उपासना अग्नीची । आणि दुजी मुख्य सूर्याची । तिजी इंद्रादि देवताची । म्हणोनि अपर ॥ ४२७० ॥ भक्तियोगीं ईश्वराराधन । अतेत्र तो श्रेष्ठ याहून, । देवतातरें जयापासून । सभवतीं जालीं. ॥ ७१ ॥ निर्वाणयोगीं, पार्था, । भज्य, भजकु ना भजता, । परब्रह्मी अखडता । म्हणौनि श्रेष्ठु तो. ॥ ७२ ॥ वर्णआश्रमदेहजन्यु । अतेत्र कर्मयोगु हा सामान्यु, । कर्तया कार्यस्थानीं मान्यु । कल्पितु जो. ॥ ७३ ॥ हा कर्तया, अनधारीं, । स्वभावें, अर्जुना, वद्ध करी, । आइकें तयाची परी । सागिजेल ते. ॥ ७४ ॥ हाचि सिद्धातु जेणें केला । तो नित्य वद्ध जाण जाला, । त्रिविधा कर्मावेगळा । फुटोंचि न शके. ॥ ७५ ॥ कर्तृत्वाभिमानें आश्रयिता । हा वैरी परतळा, पार्था, । भोगवी तापत्रयवेथा । भानिकातें. ॥ ७६ ॥ सेवू पाहेल जो फळ । तयातें तें विपचि केवळ, । जन्मा, मरणातें मूळ । तेंचि होये. ॥ ७७ ॥ ऐसा कर्तया प्रतिबधकु । कर्मयोगु हा नाशकु, । तरि का करी साधकु[२] । ऐसें म्हणसिल, ॥ ७८ ॥ तरि कर्मापासाव शबळ । रजतम जाले प्रवळ, । तें कर्मेंचि छेदे केवळ, ।

सत्व उरे. ॥ ७९ ॥ पात्रीं बैसला मृत्तिकामळु । तो मृत्तिका ठेवूनि सकळु । अग्निसंगें केवळु । काढावाचि कीं. ॥ ४२८० ॥ काटेन काटा काढिजे, । काष्टें काष्ट प्रमथिजे, । कर्में कर्म निरसिजे । तैसें, पांडवा. ॥ ८१ ॥ काम्यकर्म आचरतां । रजो गुणाची आधिक्यता, । अविहितकर्म करितां । तमोगुण होये. ॥ ८२ ॥ तें कर्मजन्य गुणद्वय । संसारदायक, दु:खमय; । नाना भोग, नाना विषय । उपजवूं लागे. ॥ ८३ ॥ तयाचिये, गा, निवृत्ती । सात्विक कर्म आचरती । विहित, वैदिक म्हणती । योगिये जें; ॥ ८४ ॥ तेणें उमटे देहीं सत्व, । योगा तेणें दृढत्व, । म्हणौनि पावले महत्व । तें बुद्धियोगेंचि. ॥ ८५ ॥ विषासारिखी पाटोळी । ते अमृता-समान जाली, । रोगनिवृत्ती जाली । कारण जरी. ॥ ८६ ॥ भिल्लकें आंग उफणें, । तोही एके गुणें । सेविती, अर्जुना, जाणें । मर्दिती आंगीं. ॥ ८७ ॥ रिंगणी ऐसी बोरवटी । नाहीं ययें माजी सृष्टी । परतु तेही गोमटी । एके गुणें; ॥ ८८ ॥ तैसी कर्मनिष्टा हे अनिष्ट । परि सत्वशुद्धी जाली इष्ट, । विणसत्वशुद्धी कष्ट । योगु साधिती. ॥ ८९ ॥

हि यस्मात्

ययाकारणें, अर्जुना, । सांगैन तें आणीं मना. । कर्मयोगु असो उणा; । परतु, येणें ॥ ४२९० ॥

बुद्धौ शरणमन्विच्छ

सत्वशुद्धि पावता होई, । रजतमनाशु जाणई । द्वयातीतु होई । अंतर-निष्ठ. ॥ ९१ ॥ मग निर्विकारें चित्तें । पावे तया बुद्धियोगातें । जयापा-सूनि परतें । येर नसे. ॥ ९२ ॥ निर्वाणबुद्धी योगसिद्धी । सत्कर्म अनुष्टीं पां आधीं; । भक्तिध्यानयोगु कधीं । त्यान्नु नव्हे. ॥ ९३ ॥

कृपणाः फलहेतवः

सांडूनि बुद्धियोगु ऐसा । धरूनि कर्मीं फळआशा । ते दीन, गुडाकेशा । द्विपाद पशु. ॥ ९४ ॥ कर्मचि सिद्धांतु जे म्हणती, । कर्तृत्वाभिमानें करिती, । फळ कांहीं अपेक्षिती स्वधर्माचें, ॥ ९५ ॥ ते दीन, दुर्बल, अभाग्य; । दु:खभोगालागीं योग्य; । कर्म करूनिहीं श्लाघ्य । न पावतीचि. ॥ ९६ ॥ ते स्वसुखदु:काळीं मेले, । संकल्पगिधीं तोडिले, । स्नानादिकीं

बोढिले । करणगुणीं. ॥ ९७ ॥ सुजले, फुगले अभिमानें, । अतिगंधि तयां जाणपणें, । कामभूमिके वृत्तिदिनें । ग्रायां गेले. ॥ ९८ ॥ नाना ते मातले दुःकाळें । वराडी जैसे स्थूळें, । सुजले, फुगले, पिसाळले । काय कारिती? ॥ ९९ ॥ मेलया तोडिति प्रेता, । प्रवर्तति परस्पराघाता, । विष्टा तेही, पार्था, । न विचारितीचि ॥ ४३०० ॥ तैसे निजानंदें सांडिले । विषयां कुथिलां लागले, । सोडूं न शकती, जाले । लुब्ध तेथें. ॥ १ ॥

बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।
तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥ ५० ॥

इह

आतां एथें योगमार्गी । विहितें, विशिष्टे, सांगीं । कर्मउपासनांनिर्वाणयोगीं । पूर्वोक्तिं, अर्जुना. ॥ २ ॥

बुद्धियुक्तः

व्यवसायिकु जो प्रवर्तला, । कर्मसंगु जेणें सांडिला, । सिद्धी असिद्धी जाला । समतादर्शी, ॥ ३ ॥ स्वधर्मी निश्चयो जयातें । अथवा भक्तियोगीं वर्ते, । कां गुरुवाक्यता चित्तें । तये निर्वाणयोगीं; ॥ ४ ॥ ऐसा मुमुक्षु, अर्जुना, । योगी, बुद्धिवंतु, शाहणा, । विरक्तःविशेषें देखणा । योगसंप्रदायी. ॥ ५ ॥

सुकृतदुष्कृत

तो कर्मी वर्ततां कैसा? । अवधारीं, गुडाकेशा, । नाहीं जयातें आशा । कामादिकीं. ॥ ६ ॥ सुकृतें स्वर्गसूचकें । तीर्थे, दानें, व्रतें अनेकें, । तपें यज्ञ, स्वाध्यायादिकें । आचरणें नाना; ॥ ७ ॥ आणि पापें अविहितें, दारुणें । नरकपदाचीं साधनें: । हिंसा, अधर्म, परपीडणें, । नीचसेवा. ॥ ८ ॥

उभे जहाति

यें दोन्ही सांडिती निःशेष, । स्वर्गी संसारा ते उदास, । आतां त्यागलक्षण परियस, । सांगैन तें. ॥ ९ ॥ दुष्कृत म्हणिजे तें कवण? । अविहितकर्माचरण, । जेणें सद्यःपतन. । कर्तयासी. ॥ ४३१० ॥ तें एक विहिताकरण, । अविहितकर्माचरण । हिंसा, निंदा, द्रोहो, जाण । परदारारति, ॥ ११ ॥ स्तेय, असत्य, द्रोहो, । परद्रव्यस्वार्थु, मोहो, । पारुष्य, परस्त्रीसंग्रहो, । अपवादु पराचा, ॥ १२ ॥ विश्वासघातु, मत्सरु, । क्रोधु,

कुतर्कु, अनाचारु, । गुरुतल्पु, कुंड मनु । इयां मित्रांसि, ॥ १३ ॥ माता-गमनें, सुरापानें, । ब्रह्महत्या, गोवधनें, । दाराक्षेत्रवृत्तिहरणें, । यातीं संकरादिकें, ॥ १४ ॥ नाना पातकें प्रसिद्धें । आचरतां नरकप्रदें, । काया, मनसा, अनुवादें । निःशेष सांडिलीं. ॥ १५ ॥ ऐसीं पातकें जे आचरती, । सांडिली तयांची जेंहीं संगति, । वार्ताही जे नायिकती । श्रवणीं तयांचिया. ॥ १६ ॥ आतां विहितें, वैदिकें, इष्टें, । आपुलीं कर्में विशिष्टें, । यज्ञदाना-दिकें उत्कृष्टें, । भजनें देवांचीं, ॥ १७ ॥ तीर्थयात्रा, गुरुसेवा, । अवधारीं, गा पांडवा. । वर्णाश्रमीं स्वधर्मु जीवा । उपपादिला जो. ॥ १८ ॥ सर्व सुदर स्थानीं बोलिजे, । आतां त्यागु याचा कैसा कीजे ? । तो सांगेन; आइकिजे, । पांडुनंदना. ॥ १९ ॥ कर्तृत्व सांडूनि मुळीं । न कीजे इच्छा तेथ फळीं, । कर्मा विहितीं केवळीं । प्रवर्तिजे मग. ॥ ४३२० ॥ तें फळा नयेत सर्व गेलें, । अतेव करूनिचि नाहीं केलें, । सुकृतविहित सांटिलें । ते ययापरी. ॥ २१ ॥ का सुकृत स्वर्गदायक, । दुष्कृत नरकसूचक, । जन अव्यवसायिक । आचरती जें. ॥ २२ ॥ तें व्यवसाइकें येणें । सांटिलें योगियें विचक्षणें, । आपुलेनि विहिताचरणें । कवणें युक्ती ? ॥ २३ ॥ अकर्तात्मज्ञानशीळु । फलापेक्षा जया विटाळु, । मोक्षसिद्धी विनिर्मळु । विहित आचरे. ॥ २४ ॥ अथवा निर्वाणयोगीं वर्ततां । चित्ताचिया मुळी-नता, । बुद्धीचिया समता । योगारूढ तो. ॥ २५ ॥ तो सुकृत आणि दुष्कृत । सारिखेंचि विहिताविहित । विक्षेपक, म्हणौनि समस्त । साडिता होये. ॥ २६ ॥ अविहित जें दुष्कृत । तें सर्वथा त्याज्य समस्त, । उरों नेदावें किंचित । कांहीं, केव्हांहीं. ॥ २७ ॥ सुकृत विहिताचरण । याचें त्यागलक्षण, । ते अनारिसें, अर्जुना, जाण, । व्यवसायिका. ॥ २८ ॥ बाणे जंव योगारूढता । तव ते साधकावस्था, । तेथें योगु चतुर्विध आचरतां । कर्म करावेंचि. ॥ २९ ॥ आतां कर्तृत्वभानरहित । अफळ कर्मविहित । तें करूनिही समस्त । नाहींचि केलें ऐसें. ॥ ४३३० ॥ भक्ति अथवा कर्म-योगु । तिजा हो कां ध्यानयोगु, । परंतु करूनि असे त्यागु । तेथ क्रियेचा. ॥ ३१ ॥ मग त्यागरूपें क्रियेचें । फळ निर्वाणयोगु योगाचें । प्राप्त होये. तेथींचे । त्यागणें कैसें पां ? ॥ ३२ ॥ सहजें बुद्धि मुर्छन, । सहज

पांगुळे मन; । सहजचि इंद्रियगण । धर्मी सांडिले. ॥ ३३ ॥ सहज शरीर न चेष्टे । कर्ता, कार्य, कारण आटे, । यापरी न सांडितां सुटे । शुभाशुभकर्म. ॥ ३४ ॥ या नात्यापरी ऐसें । विहिताचें, पार्था परियसें, । न सांडितां सांडणें असे । तें सांडितां न संडणें. ॥ ३५ ॥

कर्मसु कौशलं योगः

कुशलत्व जाण कर्माचें । तेंचि स्वरूप योगाचें; । लक्षण पुसशील तयाचें, । तरी तेंचि सांगों. ॥ ३६ ॥ कर्मारंभीं कर्तेपण । तेंचि पुरुषातें बंधन; । आणि उपजलें क्रियमाण । तेंचि संचित; ॥ ३७ ॥ मग तें संचित, धनंजया । प्राचीन होये आपुसया, । देहांतीं गोंवी कर्तया, । दाखवी देहांतरें. ॥ ३८ ॥ काया, वाचा, बुद्धी, मनें, । जो जो विकारु इंद्रियगुणें । तो तो प्रतिबंधकु जाणे । कर्तयासीं. ॥ ३९ ॥ आतां कांहींचि न करणें । तरी मोक्षोपावो कर्माकरणें । नाहीं; कर्तयाकारणें । सत्वशुद्धि ते. ॥ ४३४० ॥ कर्मकरणीं रज वाढे । अकरणीं तम गाढे, । उभयपक्षीं नातुडे । सत्वाची सिद्धि. ॥ ४१ ॥ सत्वसिद्धीविण जाण । निर्वाणयोगु, ना ज्ञान, । संसारदृढबंधन । तें छेदेचिना. ॥ ४२ ॥ आतां तये सत्वशुद्धी । साधन पुससील समाधी, । तरी ते कर्मावांचूनि कधीं । साधेचिना; ॥ ४३ ॥ आणि अर्जुना, कर्म केवळ । तें सत्वशुद्धि नेदी सकळ, । एवं साधकां मोहजाळ । पडलें यापरी, ॥ ४४ ॥ तरी एथ विपर्यी कुशळता । ते सांगेन. मत्तः आइकतां । होसील योगवेत्ता । व्यवसायिकु तू. ॥ ४५ ॥ सांग जें कर्माचरण । तेंचि कर्माचें अकरण । ययां विरुद्धा एकपण । योगें सपादे. ॥ ४६ ॥ कर्माकरणें कर्मत्यागु, । ऐसा न घडे हा प्रसंगु; । कर्मयोगीं सांगु । तोचि संपादे. ॥ ४७ ॥ आतां तें चातुर्य कवण । प्रसंगें तुजप्रति सांगेन; । दुष्कृत निःशेष करून । सांडिलें असतां, ॥ ४८ ॥ विहितां कर्माचा आचरणीं । कर्ता नाहीं हें जाणोनि । परस्परा सिद्धि गुणागुणीं । वर्तते देखावें. ॥ ४९ ॥ स्थूळाचा ठायीं कर्तेपण । जडत्वें न वर्ते जाण; । जया त्रिपुटीची खूण । न कळे काळत्रयीं. ॥ ४३५० ॥ प्रवर्तली असतां कर्मी । दक्षें नव्हती परधर्मी । इतुलेनि कर्तृत्व सर्वी कर्मी । नये करणारें. ॥ ५१ ॥ प्राण तेही जड,

पार्था, । नेणति वर्तमानअवस्था, । निजधर्मींही कर्तृरूपता । न वर्ते तयांतें. ॥ ५२ ॥ मन जाणे संकल्पातें । तें आपणा ना आनातें । जाणे, म्हणौनि तयातें । कर्तृत्व नसधे. ॥ ५३ ॥ चित्तें अनुसंधान रठी । तें अन्यधर्मा न प्रकटी, । आपणा ना आना सेवटीं । चित्त जाणे. ॥ ५४ ॥ अहंकारु जडु स्वभावें, । तया अहं कवण? हें नेणवे, । परधर्मु न.प्रकटवे । अतेव अपध. ॥ ५५ ॥ बुद्धि निश्चयातें करी । परि आपणा न वोळखे पुरी । दक्ष नव्हे व्यापारीं । आणिकांचा. ॥ ५६ ॥ अंतःकरणें स्फुरण । परि तें नेणे मीं कवण, । अन्यव्यापारीं क्षीण । एकदेशी जें. ॥ ५७ ॥ अज्ञानीं हारपति सकळें । अज्ञानसाक्षी ययां न कळे, । निर्धारितां पांचही मृगजळें । गेलीं वाहोनि. ॥ ५८ ॥ अप्रकाशत्वें न घडे अज्ञान । कर्मी कर्ता म्हणसी ज्ञान, । तरी स्वतंत्र नव्हे कर्तेपण । कैंचें पराधीना? ॥ ५९ ॥ सकलावस्था, सकळ गुण, । सकळ देह, पांडवा, जाण । असत्पदार्थु; म्हणौन । कर्ता नव्हे. ॥ ४३६० ॥ एतद्विलक्षणु आत्मा । तो अद्वैतु, संतु, वीरोत्तमा । कर्ता नव्हे कर्मा, । निर्विकारु म्हणौनि. ॥ ६१ ॥ यापरी कर्तृत्व लटिक, । कर्म निपजे स्वाभाविक, । जैसें सूर्यकिरणीं उदक । सहज वाहे. ॥ ६२ ॥ कर्तेनविण कर्म निपजे । तेथें फळ कवणें कल्पिजे? । ऐसें स्वाभाविकीं जें । बहिरंग कर्म. ॥ ६३ ॥ अंतर्दृष्टी विचारितां । कर्म, करण, ना कर्ता, । करणीं अकरण तत्वतां । तें हें ऐसें. ॥ ६४ ॥ आतां निर्वाणयोगाची खूण । न कळे अकर्तात्मज्ञान । तरी ध्यानयोगु सगुण । आचरत असतां ॥ ६५ ॥ जें जें विहित निपजे । तेथें कर्तृत्व-बुद्धि नुपजे । बाह्यकर्म सहजें । होये ध्यानस्था. ॥ ६६ ॥ स्वाभाविक श्वासोच्छ्वास । होती निमिष उन्मेष, । न कल्पे फळाचीही आश । अंतर्निष्ठा. ॥ ६७ ॥ मग तें सर्व केलें । जाणों कांहीं न केलें, । आतां भक्तियोगीं आथिले । तयांचें कैसें? ॥ ६८ ॥ ईश्वरतंत्रें वर्ततां । नाहीं मातें स्वतंत्रता । आतां पराधीना कर्तृरूपता । हें काय घडे? ॥ ६९ ॥ अस्वतंत्रत्वें अकर्ता । तो फळातें कैंचि आश्रयिता? । ईश्वरेच्छा वर्ततां । देखे सर्व. ॥ ४३७० ॥ आतां कर्मयोगीं जयातें । निष्ठा अधिकारें वर्ते । तो मिथ्या कर्तृत्व तें । जाणे प्रतिबंधक. ॥ ७१ ॥ वर्ण, आश्रम, देहाचे ।

धर्म नव्हती क्षेत्रज्ञाचे; । अतेव विहित एथिचें । तें देहचि करी. ॥ ७२ ॥ येथ आनाचां कर्मी रिघणें, । कर्माचा भारु वाहाणें, । तें अनुबंधु कर्मे तेणें । नाथिला पडे. ॥ ७३ ॥ यये कर्मी जें फळ । तें भवदायक, दुःखमूळ; । अतेव ब्रह्मार्पण सकळ । करिती योगी. ॥ ७४ ॥ हा आपुला आचारु । विहितु, अत्यान्यु समग्रु । आराधिजे एणें ईश्वरु । मोक्षहेतू. ॥ ७५ ॥ यापरी कर्म करितां, । कर्तृत्वफळ नाश्रयितां, । सकळ करूनि अकर्मता । संपादत असे. ॥ ७६ ॥ कर्मसहितु सन्यासु । येणें चातुर्यें जाणिजसु, । योगु योगां मानिजसु । वरेष्ठा हा. ॥ ७७ ॥ येणेसीं युक्तु तो योगी, । येथ अनारिसा कुयोगी, । कर्मी असोनि कर्मसंगी । नव्हे, तो धीरु. ॥ ७८ ॥

तस्मात्.

तयाकारणें, अर्जुना, । सांडी कर्तृत्वभावना, । न करी फळाची कल्पना, । कर्म करी. ॥ ७९ ॥

योगाय युज्यस्व.

तें तया योगाचिकारणें । सत्वशुद्धि होईल तेणें । मग रजतममलनिरसनें । निरसैल ससारु. ॥ ४३८० ॥ तेणें सत्वोत्कर्षे जाण । ध्यानीं स्थिरावैल मन, । तें पुडती नचळे तेथुन, । पांडुपुत्रा. ॥ ८१ ॥ मग ईश्वराराधनें पार्थी, । पावसील तयाची प्रसन्नता, । तेणें सुप्रसन्नें तत्वता । भेटैल गुरु. ॥ ८२ ॥ मग गुरुप्रज्ञासंस्पर्शें । आपुली बुद्धि प्रकाशे । तैं निर्वाणयोगी आपसें । पावे मन. ॥ ८३ ॥ तो निर्वाणयोगु अनुभवितां । विसरसी ससार-वेथा । पुनरपि मोहो मागुता । न पवसी तू. ॥ ८४ ॥ तू म्हणशील योगमत । हें काये आतां प्रस्तुत ? । कल्पूनि मजप्रति एथ । सग्रामार्थ सागितलें, ॥ ८५ ॥ तरि अनादि चालिलें, । वेदेंचि प्रकट केलें, । मुमुक्षी जनीं आश्रयिलें । मोक्षहेतू. ॥ ८६ ॥

कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।
जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयम् ॥ ५१ ॥

बुद्धियुक्ताः

ते मुमुक्षजन बहुत । व्यवसायात्मिकाबुद्धियुक्त, । इहामुत्रार्थभोगीं विरक्त; वासनाशून्य. ॥ ८७ ॥

कर्मजं फलं त्यक्त्वा.

आपुलें विहित आचरतां । आणि ईश्वराराधनीं पार्थो, । नाना सुकृतीं वर्ततां । मनापासाव. ॥ ८८ ॥ कर्मजन्य जें केवळ । तें निःशेष सांडिती फळ, । आणि कर्तृत्वाभिमानवळ । नाश्रयूनि. ॥ ८९ ॥ स्वधर्मु कार्यु हें जाणोनि । कां ईश्वराराधन म्हणौनि । कर्म करितां, धनुःपाणि, । कैसें जालें ? ॥ ४३९० ॥

मनीषिणः

रज, तम, गेलें फिटोनी, । सत्व स्थिरावलें अंतःकरणीं, । लयविक्षेप लक्षहानी । समाधीं दृढावले. ॥ ९१ ॥ जागृतीं जागों भागले, । स्वप्नें देखों विरसले; । पासाव सुषुप्तीं सूटले । विवेकबळें. ॥ ९२ ॥ तुरिया स्वरूपीं विराली । स्फूर्ति निर्विकल्पीं आटली; । वासना जळोनि जाली । भस्मभूत. ॥ ९३ ॥ असद्भावविलक्षणता । आपणपां उमजोनि सत्ता । सांख्य करिती आत्मचिंता । अर्जुना, जे ॥ ९४ ॥ ते मनाचेनि निर्व्यापारें, । गुणवृत्तिचेनि संहारें । आपणपया साक्षात्कारें । जाणोनिया ॥ ९५ ॥ स्वरूपचिंता करिती । इतुलेनि कर्मत्रया शांति, । अविद्यानिराशें उरती । केवळें स्वरूपें. ॥ ९६ ॥ आतां स्वरूपदृष्टी तयातें । औपाधिक साच न वर्ते । माया, अविद्या, कल्पितें । भेदें सूटले. ॥ ९७ ॥

जन्मबंधविनिर्मुक्ताः

पुढती जन्मु नाथी तयां; । कें मग प्रतिबंधक क्रिया, । नाना योनी, धनंजया, । विमुक्तातें ? ॥ ९८ ॥ अविद्या माया विनाशें । जीवेश्वरभेदु न भसे, । गुणकार्य निमालें भासे । निशेष जैं ॥ ९९ ॥ तैं जन्मबंधु कवणातें ? । कर्माकर्म, विकर्म, न वर्तें, । मग मना बुद्धि परुतें । कल्याणरूप जैं ॥ ४४०० ॥

अनामयं पदम्

षड्भावविकारविहीन, । निरोपद्रव, स्वस्थान, । आधि-व्याधि-हरण । आत्मतत्त्व. ॥ ४४०० ॥ जेथें न लागती रोगादिकें, । जें जाणिजे गुणव्यतिरेकें, । माजि सामावलेनि विवेकें । अनुभवु जयाचा ॥ १ ॥

हि

तया अव्यया, निरंजना, । अवधारीं गा, अर्जुना, । शास्त्राचार्यआत्मखुणा । निर्धारें ते ॥ २ ॥

गच्छंति

पावति अचिरेचि-काळें, । जीवनीं लवण जेवि मिळे, । जें जाणावया आंधळे शास्त्रवादी. ॥ ३ ॥

यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह.

ऐसी एकीं वेदश्रुति । ब्रह्म असे प्रतिपादिति, । तें कैसें? सुभद्रापति, । सांगेन मीं. ॥ ४ ॥ जें अनुवादतां भागली । वाचा वक्तेनसीं सरों आली; । मग मनेसीं सहित मुरडली । न पवोनियां. ॥ ५ ॥ ऐसें अनिर्वाच्य, अनामय, । निर्गुण, ब्रह्म, अद्वय, । नित्य, शुद्ध, बुद्ध, प्रकाशमय । जाणति योगी. ॥ ६ ॥

नित्यं ज्ञानमानंदं ब्रह्म.

सच्चिदानंदैकरस, । पूर्णब्रह्म, निराभास, । एणें विचारें परियस, । पावति योगवेत्ते. ॥ ८ ॥

तत्त्वमसि । एकमेवाद्वितीयं ब्रह्म । प्रज्ञा प्रतिष्ठा प्रज्ञानं ब्रह्म । सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म । सर्वं खल्विदं ब्रह्म । ब्रह्मैवेदं सर्वम् । आत्मैवेदं सर्वम् । एषत आत्मा । यदयमात्मा । प्रज्ञानं ब्रह्म । विज्ञानं ब्रह्म । ब्रह्माहमस्मि । अहं ब्रह्मास्मि । विज्ञानमयोऽमृतमयः । ॐ खं ब्रह्म । सत्यं ब्रह्म ।

इत्यादिकीं वेदश्रुति । जें पद प्रतिपादिति, । तेंचि अनामय, तुजप्रति । कथन केलें. ॥ ९ ॥ फलत्यागें कर्म करितां । क्रमेंचि गा, पांडुसुता, । निर्वाणयोगीं योगवेत्ता । पावे अनायासें. ॥ ४४१० ॥ ऐसी योगबुद्धि कथिली; । मागां सांख्यबुद्धि सूचिली, । निष्ठा यया दोहीं वेगळी । ते आधीचिना. ॥ ११ ॥ वेदें सिद्धांतु मातु अर्जुना, । आइकाना वेदांतें पुनः, । परतु निण सांख्येयोगें स्फुरेना । तयाचा अनुभव. ॥ १२ ॥ तें आइकतां शास्त्रमतें । आयुष्य न पुरे गा, तूतें, । म्हणौनि सांख्येयोगेंचि निरुतें । तत्व बुझाविलें. ॥ १३ ॥ शास्त्रवादचि संपादितां । बहुसाल श्रवण करितां । जाण, नये सर्वज्ञता; । तें अंग वेगळेंचि. ॥ १४ ॥ सत्ववतु,

संस्कारी । एकाधा श्रवण करी, । तरि तो दोंचि उत्तरीं । होये कृतकृत्यु. ॥ १५ ॥ पुढती न इच्छी आइकणें; । सरलें एकुदाचि पुसणें; । मग करावें तेंचि मनें । लागे करूं. ॥ १६ ॥ आणि बुद्धीचा साधारणू । संस्कारभावविहिनू, । श्रवण करी मूर्खु जनू । तो कैसा वा, रे? ॥ १७ ॥ हें शास्त्र आधीं श्रुत, । पैल तें आइकों अश्रुत । तेंही आइके, परि निश्चित । तेणें ही नव्हे. ॥ १८ ॥ ऐसीं सकळें शास्त्रें पाहे, । तंव परस्परां त्यां विरोधु आहे; । तेणें बुद्धि मोहित होये । श्रोतयांची. ॥ १९ ॥ कवण सत्य मानावें? । कवण असत्य तें सांडावें? । काये पां आतां करावें? । ऐसें होये. ॥ ४४२० ॥ एक म्हणती, "कर्म;" । एक म्हणती, "वेदु ब्रह्म;" । एक म्हणती, "सकाम, । स्वर्गुचि तें." ॥ २१ ॥ एक भेदूचि बोलती, । प्रपंचु संतु करिती, । एक तो म्हणती, । "माया अविद्यात्मकु;" ॥ २२ ॥ एक म्हणती, "सर्व ब्रह्म;" । एक म्हणती "अब्रह्म." । आतां श्रोतयां विषम । कैसें न मने? ॥ २३ ॥ मग पुराणें पाहों लागे, । तेथ पक्षपातीं मन रिघे; । तंव आन येके न उमगे । पुराणीं तें. ॥ २४ ॥ एकें असती विष्णुपरें, । एकें शिवपरें, शक्तिपरें, । सूर्यपरें, गणेशपरें; । कथांतरें येकें. ॥ २५ ॥ तीर्थपरें देवतापरें; । पुराणें एकें क्षेत्रपरें, । व्रतपरें, तपपरें, । ऐसीं नाना. ॥ २६ ॥ जें जये पक्षीं प्रवर्ततें । तेथ न स्तवी आणिकातें, । म्हणौनि विमोहित आइके तें । माणुस होये. ॥ २७ ॥ एक म्हणती, "श्रेष्ठ माया;" । देवतात्रय सृजिलें जिया, । सकळ सृष्टि इया । घडे मोडे. ॥ २८ ॥ एक म्हणती, गणेशु, । हाचि जीवगुणाचा ईशु, । उत्पत्ति, स्थिति, विनाशू । हाचि करी. ॥ २९ ॥ एक शिवातें आराधिती । ते तोचि ब्रह्म बोलती, । हरि ब्रह्मा करिती । तयाचे आज्ञाधारक. ॥ ४४३० ॥ एक ते चतुर्भुजरूप, । विष्णूचें मायास्वरूप, । ब्रह्म सच्चिदानंद निष्कंप । तेंचि म्हणति ॥ ३१ ॥ ब्रह्मा महेश्वर दोन्ही । म्हणती तयापासुनी; । ऐसे भंगले पुराणीं । बहुत जन. ॥ ३२ ॥ ऐसा आजन्मु तो जिज्ञासु । आइकावयाचि करी सोसू, । परंतु अंतीं एकेंही विश्वासु । नुपजे तया. ॥ ३३ ॥ पार्था, बहुवस आइकतां । चित्तातें नव्हे एकनिष्टता, । तैं बुद्धिवंतां पार्था, । होये शब्दमात्रें. ॥ ३४ ॥

एकनिष्ठें मनें बुद्धी । विश्वासु ठेउनी शब्दीं. ।| श्रवण करितां नेदी । श्रमो श्रोतया. ॥ ३५ ॥ आतां तू म्हणसील, । "ऐसें कैं मातें घडेल, । श्रवणमात्रें तुटैल । मायाजाळ"? ॥ ३६ ॥

यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।
तदा गंताऽसि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ ५२ ॥

ते बुद्धिः

तरी अवधारीं, गा सुमति, । तुज आत्मयाची ज्ञेप्ति । चिन्मयी मूळप्रकृति । अभिन्न जे कां. ॥ ३७ ॥ आंगीं कर्पुरा जैसा वासू, । कीं गुणीं जळाचा वर्ते रसू, । गोडी वेगळा शर्करांशु । तो काये असे? ॥ ३८ ॥ स्वर्णा वर्णाचें शरीर । रत्नें सींकीळ निरंतर, । अग्नि वेगळी परिकर । नव्हे प्रभा; ॥ ३९ ॥ तैसी जे गा पुण्यकीर्ति, । तुज आत्मयाची स्वरूपज्ञेप्ति । सदानंदमयीचित्प्रकृति । बुद्धि म्हणिजे. ॥ ४४४० ॥ तें जैं सत्व प्रधान स्फुरे । तैं सारासार विचारें । स्वरूपाचेनि निर्धारें, । पांडुपुत्रा, ॥ ४१ ॥ लयाविक्षेपा तळवटीं, । सुखेसीं युक्त उठी, । स्वरूपप्रकाशें लाठी । निर्विकार जे, ॥ ४२ ॥ तेथेंचि तें सत्व अछादे, । आणि तमोगुण सबधें । स्वस्वरूपाचेनि अबोधें । जाये झांकवोनी, ॥ ४३ ॥ तेथें नित्यानित्यवस्तु-वेदन । न उमजे आप कवण, । केवळ मोहमय अज्ञान, । पांडवा, तें. ॥ ४४ ॥ तयें तमीं हारपली । बुद्धि अधिष्ठाना चूकली । मग अज्ञानपूर्वक स्फुरली । वृत्तिरूपें, तें ॥ ४५ ॥ निर्विकल्प प्रथम स्फुरण । जाणावें तें अंतःकरण; । संकल्पात्मक मन । पांडुपुत्रा. ॥ ४६ ॥ निश्चयात्मक बुद्धि वा रे, । अनुसंधानात्मक चित्त स्फुरे, । अहतव्य अहकारे; । एवं वृत्तिपचक हें. ॥ ४७ ॥ अंतःकरणाची चचळता । तो व्यानु वायो, पार्था, । मनें समानु चांचल्यता, । उदानु, बुद्धी. ॥ ४८ ॥ चित्तचांचल्यें प्राणु जाला, ।·अहंकारें अपानु निपजला; । प्राणपचकु बोलिला । तो हा ऐसा. ॥ ४९ ॥ अंतःकरणाची ज्ञानवृत्ति । श्रोत्रेंद्रिय बोलति; । मनें त्वक्, वीरपति, । नयनु बुद्धीची; ॥ ४४५० ॥ रसना जाण चित्ताची, । घ्राणवृत्ति अहतेचि, । या पांचेही ज्ञानवृत्ति स्वभावेंचि । ज्ञानेंद्रियपचक. ॥ ५१ ॥ अतःकरणा कर्मवृत्ति वाचा, । मना कर, हा बोलु साचा, । बुद्धि पादु, गमनाचा । आरंभु

जेणें. ॥ ९२ ॥ चित्तीं शिश्न कर्मकरण, । अहंकारीं पायु जाण, । ऐसें कर्मेंद्रिय लक्षण । तूतें निरोपिलें. ॥ ९३ ॥ अंतःकरणा विषयो शब्दु, । मना स्पर्शु प्रसिद्धु, । बुद्धिरूप चित्ता बोधु । तया रसाचा कीं. ॥ ९४ ॥ अहंकारें गंधु कळे, । ऐसें विषयपंचक बोलिलें; । पंचविसां तत्वाचें कथिलें । लिंगदेह हें. ॥ ९५ ॥ ऐसीं शुद्धसत्वें चेइलीं, । स्फुरण दशे बुद्धि आली, । ते तमपूर्वक प्रवर्तली । तेव्हेळीं ऐसी. ॥ ९६ ॥ जागृति घालुनियां पोटीं । निद्रे माजूनि स्वप्न उठी, । तैसें अज्ञानपूर्वक किरीटी, । बोलिजे अन्यथाज्ञान. ॥ ९७ ॥ त्रिपुटीरूप, त्रिगुणात्मक, । हेंचि लिंगदेह एक, । तत्वसमूहप्रकाशक । यया स्थूळातें. ॥ ९८ ॥ मग तें जाण रजोगुणें । स्पर्शिलें बाह्यार्थी कारणें, । जाणों लागे ज्ञानकरणें । प्रकाशाति तैं. ॥ ५९ ॥ बाह्यार्थाचेनि संस्फुरणें । कर्मी प्रवर्तति कर्मकरणें, । स्थूळशरीर तेणें गुणें । व्यवहारतें दिसे. ॥ ४४६० ॥ अज्ञानें आपणपां नेणसी, । तमोगुणें प्रकाति ऐसी, । अन्यथाज्ञानें म्हणसी । मीं देहो म्हणौनि. ॥ ६१ ॥ एणें गुणद्वयें झांकोळली, । बुद्धि तुझी अच्छादली, । मग गुरुगोत्रवधें जाली । अत्यंत व्याकुळ. ॥ ६२ ॥

मोहकलिलम्

तें आत्मविषयीचें अज्ञान, । आणि तत्कार्य अन्यथाज्ञान, । परम मोहक गहन । ऐसिया ययातें ॥ ६३ ॥

यदा व्यतितरिष्यति.।

जेव्हेळीं तुझी प्रज्ञा । उल्लंघिल गा सुप्राज्ञा, । विविक्तात्मज्ञानसंज्ञा । कळैल जैं, ॥ ६४ ॥ सांख्यें अथवा योगमतें । स्वरूप उमजैल जैं तूतें, । गुरुवाक्यार्थ सिद्धांतें । बोधलेनि, ॥ ६५ ॥

तदा निर्वेदं गंताऽसि. ।

तेघवां कृतकृत्यु होसिल, । ज्ञान, वैराग्य, पावसिल, । दों विषयीं वारसिल, । पुरे म्हणौनि. ॥ ६६ ॥ ते दोनी विषय कवण? । पुसतासि तरि सांगेन, । जेथें गुंपले जिज्ञासुजन । नुगवतीचि. ॥ ६७ ॥

श्रोतव्यस्य श्रुतस्य च ।

वेदें, शास्त्रें, पुराणें, । पुरे म्हणसील श्रवणें; । उपराठा विक्षेपु एणें । ऐसें

होईल. ॥ ६८ ॥ धर्मे, अर्थे, कामें पुरे, । चाड नाहीं मोक्षविचारें; । साध्य साधन प्रकारें । पुढतो पुढती. ॥ ६९ ॥ पूर्वीं जें श्रवण केलें, । तेंही नाठवो ऐसें जालें, । जेव्हेळीं बा रे, देखिलें । तूतें तुवां. ॥ ४४७० ॥. अक्षयी तृप्तीचें लक्षण, । हेंचि तेथें असे खूण, । जें श्रुताश्रोतव्या मन । वरूनि वोसरे. ॥ ७१ ॥ नाना शास्त्रें, वीरपति, । चित्तीं अभ्यस्तें स्फुरति, । तऱ्हीं तें जंव न विसरिजति । तंव विश्रांतिकें. ॥ ७२ ॥ हरि, हरु, ब्रह्मा उपदेशिता । तत्वविषई पार्था । जाला जऱ्हीं तत्वता । तऱ्ही उपदेशु तो ॥७३॥ जंववरी न विसरिजे । तंव विश्रांति न पविजे; । या लागिं श्रुत सहजें । सांडिसील तूं. ॥ ७४ ॥ वेद, शास्त्र, पुराण । जाणावया जें कारण, । तें कळल्या, विसरण । ययांचे आवडे. ॥७५॥ जया स्वरूपाचिया चाडा । साहिजे जीविताचा दवडा, । आणि जें म्हणौनि उदंडा । साधना सोपिजे, ॥ ७६ ॥ तेंही स्वरूपस्फुरण । पुरे ऐसें मानिल मन । जैं तूं आपणयां आपण । जाणोनि वोसरसी. ॥७७ ॥ ऐसा श्रुतें अर्थी निर्वेदु, । पुढती न इच्छिसी शब्दु, । आंगें आंग परमानंदु । जालासि म्हणौनि. ॥ ७८ ॥ पुरे यज्ञें, तपें, दानें, । तीर्थें, स्वाध्यायाभ्यसनें, । श्रवणें, मननें, निदध्यासनें, । तूतें विश्रांता. ॥ ७९ ॥ नित्यानित्यवस्तुज्ञता । पुरे आइकोनि, काज आतां । नाहीं म्हणौनि पार्था, । तूतें मानैल ॥ ४४८० ॥ जरी तूं अज्ञान न सांडिसी, । आपणपयां नेणसी, । तरी आइकिलेंचि इच्छिसी । पुडती आइको. ॥ ८१ ॥ मूढाचें मत कैसें? । श्रवणीं आराणूक नसे, । मीं काळु क्रमीं विशेषें । ऐसें मानी. ॥ ८१ ॥ पुसिलेंचि पुसे पुनः पुनः, । आइकिलेंचि आइके, अर्जुना, । परि अर्थी पावोनि, करींना । करणी तैसी. ॥ ८३ ॥ श्रुतकथेचा धरू भारी, । पुराणिका आक्षेपु करी, । मग योग्यता विस्तारी । आपुली तेथें. ॥ ८४ ॥ सांगे परंपरा रायांची, । आणि तयां ऋषींची, । लीळा, क्रीडा देवांची । ते मुखोद्गतची. ॥ ८५ ॥ नाना अवतार, नाना लीळा, हा हृदयस्थाची सकळा, । आणि पुडतीं पुसे वेळोवेळां । तेंचि आइके. ॥ ८६ ॥ शाब्दीकें ज्ञानें धीटु, । वाग्व्यापारें पुष्टु, । आणि अंतरीं आत्मनिष्टु । सर्वथा नसे. ॥ ८७ ॥ आत्मा अनात्मा वाखाणी, । आइकावाचि म्हणे श्रवणीं, । परि निष्ठा नाहीं मनीं । तो महामूर्खु कीं.

८८ ॥ जो श्रवणीं अर्थू न पाहे, । तात्पर्य ग्राहकु नोहे, । निग्राशून्यु वायां जाये । म्हणौनियां. ॥ ८८ ॥ ऐसें अर्जुना, न करीं, । सांगैन तें धरीं अंतरीं; । ययें विषयीं अवधारीं, । वचन माझें. ॥ ४४९० ॥

श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।
समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३ ॥

ते बुद्धिः।

तुज आत्मया शुद्धाची । जाणीव जे स्वरूपाची, । जैसी प्रभा दीपकाची । दीपकूचि ते. ॥ ९१ ॥ तूं संतु, तरी ते सन्मयी, । तूं चिदात्मा, तरी ते चिन्मयी; । तूं आनंदू, ते आनंदमयी, । झेलि तुझी. ॥ ९२ ॥ तूं पुरुषु, तैं तें प्रकृति; । तूं साक्षी, तैं तें साक्षित्व वृत्ति; । तूं आपणु, तैं तें स्फुर्ति । तुझया स्वरूपाची. ॥ ९३ ॥ तूं जाणु; तैं तें जाणीव; । नेणु तु, तै तें नेणीव; । तूं सारासारज्ञ, स्वमेव । बुद्धि ते तुझी. ॥ ९४ ॥ तूं विषयज्ञु, तें विषयज्ञता; । तूं भोक्ता, तें भोगावस्था; । तूं देही, तैं पार्था, । तुझी ते मति. ॥ ९५ ॥ असो; तूं जें जें होसिल । तें तें जें प्रकाशिल । भोक्ता, भोग्य, भोगणें सकळ । जाणावें जिया, ॥ ९६ ॥ कर्ता, कार्य, आणि कारण, । एथिचें प्रकाशलक्षण, । ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान जाण । बुद्धीचिवाटे. ॥ ९७ ॥ चंद्रा आंगीं जैसी कळा, । तैसी तुझी बुद्धि, गा नृपाळा, । अर्जुना, कां रे अवलीळा? । जाली असतां. ॥ ९८ ॥

श्रुतिविप्रतिपन्ना. ।

जें जें वेद, शास्त्र, पुराण । अभ्यासिलें, कां केलें श्रवण, । तें तें बुद्धीचें प्रसारण । साच जाणावें. ॥ ९९ ॥ कर्मकांडीं विवरतां, । तेथ नाहीं एकरूपता; । शाखाभेदें पाहातां । अनेकी क्रिया. ॥ ४५०० ॥ तें तें क्रियेचा ठायीं जाण, । घालूनि पाहातां अंतःकरण, । तेथेंही मतभेद आन आन । वर्तत असति. ॥ १ ॥ तितुलेंही हृदयस्थ करितां । बुद्धि विस्तारावी, पार्था, । मग निर्विकारनिश्चळता । ते दूरीचि दुरावे. ॥ २ ॥ भक्तियोगु अपरांपरू, । तयाचा करितां विचारू, । न पुरे एकु संसारु । इतुला आर्था. ॥ ३ ॥ नाना देवतांतरें, नाना । विधि उपासना, अर्जुना, । मंत्रमाळा, पुरश्चरणां । संख्या नाहीं. ॥ ४ ॥ तें तें सांगोपांगतया । द्रढत करितां,

धनंजया, । बुद्धि प्रसाराची आत्मयां । शुद्धा सांडुनि. ॥ ४ ॥ पूर्वपक्षें सिद्धांतें । ज्ञान हीं एकविध न वर्ते; । नाना मतांतरें जेथें । भरोनि घोसंडति. ॥ ६ ॥ तें मायाज्ञान, ईश्वरज्ञान, । जीवा अविद्येचें वर्तमान, । उपक्रमोपसंहार लक्षण । यया प्रपंचाचें. ॥ ७ ॥ आणि अगम्य ब्रह्म जाणतां, । नाना युक्तींची पार्था, । प्रसारणा होये तत्वता । श्रोतयांसीं. ॥ ८ ॥ शास्त्रीं करितां प्रवेशु, । तेथें नाना मतविशेषु; । तो आइकतां जाणिजसु । मतीचि फांके. ॥ ९ ॥ मतीचिया नानाकारता, । हानि ते न कळे पार्था, । तेचि अभिमानें योग्यता । मिरविती मूर्ख. ॥ ४९१० ॥ करितां पुराण श्रवण, । नाना इतिहास तेथें जाण, । तत्तदाकारें प्रसारण । बुद्धीचें होये. ॥ ११ ॥ जे जे कथा ते ते युक्ति, । इतुलेनि एकनिष्टता नाथी; । उपराठी मूढ महंती । भोगिती तेणें. ॥ १२ ॥ कवणे कुळीं कवणु जाला? । कवणें काये अर्थु साधिला? । काये पुरुषार्थ केला । कवणे ठाईं? ॥ १३ ॥ ऐशी आइकोनि गतवार्ता, । आनाची ख्याति पार्था, । आपुलिये मति सर्वथा । नाशिलें जनीं. ॥ १४ ॥ जे जे विद्या अभ्यासिजे । ते तो बुद्धिभेदु कीजे; । मग मिथ्याज्ञानें फुंजिजे, । हें मूर्खलक्षण. ॥ १५ ॥ संग्रामवार्ता आइकति, । आइकोनि मनीं धरिति, । मग रम्या करूनि सांगति । आना पुढां. ॥ १६ ॥ ग्राम्यवादविनोद, । वाद्यविशेष नानाविध, । जे जे आइकिजति, बुद्धिभेद । ते ते तितुलेही. ॥ १७ ॥ बहु काये अर्जुना, सांगणें? । आइकतासि माझीं वचनें, । संशयो निरसे जेणें । ऐसीं हीं परी ॥ १८ ॥ आदि करुनि जें जें श्रवण । तुवां केलें आवी जाण, । मना बुद्धि रंजवन । हो स्वाभाविकही. ॥ १९ ॥ तेणें अंगें प्रसारली, । अधिष्टाना बुद्धि चुकली, । नानाकारता पातली । मूळप्रज्ञा. ॥ ४९२० ॥

यदा निश्चला स्थास्यति.

ते जेव्हेळीं एकवाटैल, । सर्वांवरूनि काढैल, । जेथींची तेथें स्थिरावैल । आपुलां अधिष्टानीं. ॥ २१ ॥ प्रभंजनें हालवलें, । जळतें तरंगाकार जालें, । पुडती निवांत ठेलें । जैसें तैसेंची. ॥ २२ ॥ त्रिदोषें हाले चित्त, । जालें नानाकारतया भ्रांत, । मग आरोग्यदशें स्वस्थ । जैसें होये; ॥ २३ ॥ मनोरथें राज्य करितां, । बुद्धि फांकली जे पार्था, । ते सावधानत्वें पाहतां ।

जैसी उरे, ॥ २४ ॥ तेंवि श्रुति-स्मृतिसंकेतें । जें म्यां सांगितलें तूतें, । तेणें सांख्ययोगमतें । आश्रयिलेनी ॥ २५ ॥ अर्थी पासूनि निघेल, । बुद्धि माघारी मुरडेल; । ठाईंची ठाईं होइल । निश्चळ जैं, ॥ २६ ॥

समाधौ ।

ते निश्चळता कवणे स्थानीं । होइल? ऐसें जरि मनीं । पुसों उपजेल, तरी मानी । वचन माझें. ॥ २७ ॥ बुद्धि बहिरंग जयातें, आत्मा अंतरस्थ बुद्धीतें, । बुद्धि साक्षी हें निरुतें । वैदिक मत; ॥ २८ ॥ तया आत्मयाचा ठाईं, । परतोनि बुद्धि रिघे जई; । तें तेथ भेदाचा विलयीं । जे दशा उरे, ॥२९॥ तरंगु उदकाचा जाला, । तो पुडती उदकीं प्रवेशला, । तेथें भेदाचा मोडला । आकारु जैसा, ॥ ४५३० ॥ जीवनीं लवण न्हाये, । तेथें भेदु तो गळोनि जाये; । लहरी जळ पीये, । तैसें जालें. ॥ ३१ ॥ आत्मा बुद्धीचें कारण, । सत्यस्वरूप अधिष्टान, । तेथे बुद्धि होतां लीन । भेदु नुरे. ॥ ३२ ॥ ऐसी जे अभेदावस्था, । ते समाधि जाण, पार्था, । बुद्धीतें वर्तत असतां । ते पुडती कैसी? ॥ ३३ ॥

अचला ।

ल्यँकरूनि न मावळे, । विक्षेपें बुद्धि न चळे, । इंद्रियसंगें न खेळे । नाकळे देहीं. ॥ ३४ ॥ इंद्रियत्व जाये हारपोनी, । आत्मत्व नुरे धनुःपाणी, । अचळ मति समाधानीं । राहेल जैं. ॥ ३५ ॥ निर्वातीं दीपु न चळे, । ठाईंचा ठाईंचि तो जळे, । तैसी बुद्धि न ढळे । अधिष्टानींनि जैं ॥ ३६ ॥

तदा योगमवाप्स्यसि. ।

तैं जाण कां गा अर्जुना, । योगसिद्धिविचक्षणा, । मातें जाली समायना । म्हणौनिया. ॥ ३७ ॥ तैं कर्मयोग फळले, । भक्तियोग सिद्धि पावले, । ध्यानयोग साधले, । जिंकिले गुण. ॥३८॥ निर्वाणयोगु आरंभिला । तो सकळस्या गेला; । सांख्ययोगु पावला । जाग सिद्धीतें. ॥ ३९ ॥ अर्जुना, समाधीं बुद्धि राहे, । ते पुडती चचळ नोहे, । तेंचि योगसिद्धि ऐसें हें । आमुचें मत. ॥ ४५४० ॥ जयाची प्रज्ञा, अर्जुना, । स्वरूपीं स्थिरावली, चळेना, । तो कृतकृत्यु, गा विचक्षणा, । योगी जाला. ॥ ४१ ॥

स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।
स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ ५४ ॥

अर्जुन उवाच ।

इतुला बोलोनि भावार्थु, । श्रीकृष्णु ठेला निवांतु; । काये बोलैल पार्थु । तें आइकों इच्छी. ॥४२॥ असेल मोहें सांडिला । कीं नसैल ममत्वें सुटला, । हें अर्जुना हृदयींचें जाळा । काढिता देवो. ॥४३॥ हा काळुवरी सांगितलें । तें फळा नयेचि, कीं आलें, । मन अर्जुनाचें मोहरलें । कांहीं काये ? ॥४४॥ ऐसें मानसीं चिंतितु, । नव्हे कीं हा समाधिस्थु, । आतां जिज्ञासु, तव्हीं आसक्तु । व्हावा योगी. ॥ ४५ ॥ परि युद्ध नाहीं करणें, । गुरु-गोत्र-वधु न करणें, । ऐसें न बोलावें येणें । मूर्ख वचन. ॥ ४६ ॥ ऐसें श्रीरुक्मिणी-रमणें । विचारिजत असतां मनें, । मग तो अर्जुनु काये म्हणे । इतुल्या वरी ? ॥ ४७ ॥

हे केशव ।

जयजया जी नारायणा, । जळशायी तू श्रीरमणा, । सकळ सुखाचया निधाना, । गोपीनाथा. ॥ ४८ ॥ तू ब्रह्मादिकांतें नियता, । सकळ सृष्टि उत्पाता, । स्थिति ळयाचा कर्ता, । सर्वेश्वरू. ॥ ४९ ॥ तुवां जें सांख्य कथिलें, । योगमत प्रकाशिलें, । तेणें आभाळ वितुळलें । तया मोहाचें. ॥ ४९५० ॥ राहोपासूनि सुटे, । मग शशिबिंब उमटे, । तैसें निर्मळ मानस वाटे । माझेंचि मज. ॥ ५१ ॥ मति माझी पारुखली, । मोहाची उकली गेली, । तुझा शब्दीं पांगुळली । बुद्धि, देवा. ॥ ५२ ॥ आसक्तु जालों मी श्रवणीं । चातकु तुमचा वचनीं, । यया योगाची आस्था मनीं । बहुत वाहें. ॥ ५३ ॥ तथापि कांहीं एक पुसावें । हे घेतलें माझेनि जीवें, । आज्ञा देइजैल देवें । तरि विनविजैल. ॥ ५४ ॥ तंव गोविंदु बोले, अर्जुना, । हेचि आमुचीहि वासना, । जें तुवां आणूनि मना । करावा प्रश्नु. ॥ ५५ ॥ आक्षेपु आणि समाधान, । हेंचि ज्ञानाचें साधन । गुरुशिष्य एकांतीं, आन । तें काये असे ? ॥ ५६ ॥ म्हणौनि पांडवा, । तुवां तो प्रश्नु करावा; । इतुलें आइकोनि, केशवा । अर्जुनु म्हणे. ॥ ५७ ॥

स्थितप्रज्ञस्य ।
जयाची प्रज्ञा निश्चळ, । एकनिष्ठ स्वरूपशील, । बाह्यपदार्थी चंचळ । सर्वथा नसे. ॥ ९८ ॥

समाधिस्थस्य ।
करणगुणसंगें सुटली, । विविक्तबुद्धि निवळली, । समाधीं सामावोनि गेली, । जळीं कर्पूर जैसा. ॥ ५९ ॥ समाधीचा स्थानीं स्वस्थु, । निर्वाणयोगीं बुद्धिवंतु, । जो आपपरावें नेणतु । स्वरूपदृष्टीं. ॥ ४५६० ॥ करणसंग जया सुटलें, । देहींचि विदेहत्व पातलें, । लय, विक्षेप, गळाले । सर्वथा कीं, ॥ ६१ ॥ निर्विकल्प मन जयाचें, । स्थान पावला जो दशेचें, । कृतकृत्यु जाला साचें । योगियां जो. ॥ ६२ ॥

का भाषा ।
तयाची कैसीं लक्षणें ? । जेहीं तया वोळखणें, । बाह्याभ्यंतर चिन्हें । पुसों अपेक्षीं. ॥ ६३ ॥

स्थितधीः ।
विषयोपसर्गें सुटली । जयाची निष्ठा पातली, । बुद्धि स्वरूपीं स्थिरावली । निवडेचि ना. ॥ ६४ ॥

किं प्रभाषेत. ।
ऐसा स्थितप्रज्ञ, स्थिरात्मा, । अवधारीं, गा मेघश्यामा, । सांडूनि गुणा, रुपा, नामा, । काये म्हणवी ? ॥ ६५ ॥ नामें कवणें पाचारिजे ? । आणि तो कैसा वोळखिजे ? । स्थितप्रज्ञ म्हणिजे । जो तुम्हीं, देवा, ॥ ६६ ॥

किमासीत व्रजेत किम् ।
तो देहनिर्वाहो कैसा करी ? । काये घे ? काये आहरी ? । काये सेवी ? विचारी । कैसें तत्व ? ॥ ६७ ॥ जागृतु, कीं तो निद्रितु, । व्यवसायी, कीं स्वस्थु, । विदेही, कीं देहवंतु । कैसा जाणावा ? ॥ ६८ ॥ आहार, व्याहार तयाचे । क्रम साधनावस्थेचे, । पूर्णदशाप्राप्तीचें । लक्षण निरोपावें ॥ ६९ ॥

श्रीभगवानुवाच

प्रजहाति यदा कामान् सर्वान्पार्थ मनोगतान् ।
आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते. ॥ ५५ ॥

श्रीभगवान् उवाच ।

हे पार्थ

इतुलयावारि तो भगवंतु, । साधु, साधु, पार्था म्हणतु; । तुवां जो पुसिला सिद्धांतु । तो अपूर्व कीं. ॥ ४५७० ॥ पाहिजेत होतें जें वक्तव्य, । तेंचि हें तुझें प्रष्टव्य, । तरी अवधारीं, जो संभाव्य । मत्ता वचनें. ॥ ७१ ॥ पुसिला तुवां स्थितप्रज्ञ, । समाधिस्थु, तत्वज्ञ, । तरी तो अवधारीं, प्राज्ञ । मुख्यत्वें कैसा. ॥ ७२ ॥

कामान् ।

तरि रजोगुणाचेनि उपसर्गें, । विषयकरणसंयोगें । अभिलाषु उपजों लागे । तो कामु जाणावा. ॥ ७३ ॥

मनोगतान् ।

तया कामाचें अधिष्ठान । तें जाणावें अर्जुना मन, । बुद्धि, चित्त, अंतःकरण, । म्हणिजे तया तेंचि. ॥ ७४ ॥ आतां तो कवणे वस्तूचा? । कोठूनि उद्भव ययाचा? । मनीं प्रवेशे बुद्धीचा । नाशकु जो. ॥ ७५ ॥ रजोगुणें चेवविलीं, । इंद्रियें बहिर्मुखें जालीं, । निजअर्थीं प्रवर्तलीं । धर्मशीळें. ॥ ७६ ॥ तेथें विषय देहांगें भोगितां, । इच्छा पुरे करणां समस्तां, । मग तेचि आवडी चित्ता । अखंड लागे; ॥ ७७ ॥ तोचि रसु विषयिकु । मनीं पावला सकळैकु, । मनातें होये क्षोभकु । तेव्हेळीं कैसा? ॥ ७८ ॥ अर्थाची चाड लावी, । अभिलाषु महा उपजवी; । मग तोचि कामु जो नाचवी । इंद्रियांतें. ॥ ७९ ॥ ऐसा रजोगुणाचेनि आंगें, । विषय-इंद्रिय सयोगें, । मनापासूनि लागे । कामु उपजों. ॥ ४५८० ॥ मनापासूनि उपजला, । आंतु बाहेरि तया जाला, । बुद्धी अछादूं लागला । पुढती कैसा? ॥ ८१ ॥ एकुचि जाला अनेकु, । मना, बुद्धी, इंद्रियां व्यापकु; । अवघा प्रपंचीं सकळैकु । भरोनि उरला. ॥ ८२ ॥ जे जे जैसे पदार्थ, । ते ते कामचि समस्त, । तयांही वेगळें अप्रमित । रूप जयाचें. ॥ ८३ ॥ अर्थाकारें विस्तारे, । परि तो कामु न सरे, । वसे मना अभ्यंतरें । तो कोण? जाण किती? ॥ ८४ ॥ तरंगदशे आलें जळ, । तें तितुलें मात्रचि चंचळ, । येर तें

निर्मळ। नित जैसें तैसेंचि. ॥ ८५ ॥ तैसे भुक्तभोग स्मरतां । ते कामाची एकि वृत्ती। पुरोंचि लागे पदार्थी। असत्य जे का. ॥ ८६ ॥ श्रुत, दृष्ट, अनुमान, । अनुभूत अर्थ जाण, । ते ते काम असाधारण। अनतरते जाले ॥ ८७ ॥ बुद्धीचा बोधु प्राशितां, । मतीचा थारा मोडितां, । समाधि भक्षुनि भरितां । साधनें चुळु. ॥ ८८ ॥ कामें कल्पना केली, । कामें वासना जाली, । अहता, ममता लागली । कामेंचि कीं. ॥ ८९ ॥ कामु चेष्टकु करणातें, । कामु चाळकु देहातें, । कामें उपजविलीं भूतें । अजगा जगें पैं ॥ ४५९० ॥ कर्मे स्थितिपाळण, । कामु जीवाचें जीवन, । एणें कामें त्रिभुवन । व्यापिलें, आथी. ॥ ९१ ॥ ऐसें काममय, विश्वधीरा, । जे णेसीं नाथी दुसरा, । जेणें लाविला दरारा । योगियातें, ॥ ९२ ॥ ऐसा तो मनीं अनुगतु, । बुद्धीचा करी घातु, । हा जव देहीं समर्थु । तव योगु कैंचा ? ॥ ९३ ॥ जो एकुचि पदार्था कारें । अनेकु होउनि स्फुरे, । मग तेणें वातें न थरे । एकनिष्ठ मन. ॥ ९४ ॥

' सर्वान्।

अर्थकाम जे सकळ, । ते मनातें मोहुनी चचळ । करिति, याळागीं दुःखमूळ । निशेषतया ॥ ९५ ॥

यदा प्रजहाति।

जेन्हेळीं योगी साडी, । विवेकाची पूर्ण प्रौढी, । सत्यस्वरूपाचिया आवडी । पांडुपुत्रा. ॥ ९६ ॥ प्रभजनें हालें अभ्र, । वितळोनि जाये ते समग्र, । मग तें उरे अवर । निर्मळ जैसें, ॥ ९७ ॥ वैराग्यनामकें विचारें । निशेष कामु सहारे, । तें केवळ सहज उरे । तेंचि आत्मतत्त्व ॥ ९८ ॥ तू म्हणशील एथें ऐसें, । जें कामा एकाचेनि न्हासें । माया–आवघातीत कैसें । स्फुरे आत्मतत्त्व ? ॥ ९९ ॥ तरि एथविषयीं, चतुरा, । आइकें मातु, धनुर्धरा, । कामनिरासें येरा । निरासें नलगे. ॥ ४६०० ॥ विषयकामक्षोणें । जेन्हेळीं जालीं करणें, । तेन्हेळीं व्यापारहीनें । ते कैसीं पां ? ॥ १ ॥ सकळें स्वस्थें, निराकुळें, । नि कामता नव्हती चचळें । तै स्थुलशरीर भागलें, । ठाईं बैसे. ॥ २ ॥ अर्थावरूनि निघालीं, । करणें स्वस्थें राहिलीं, । आता मन तया अतराळीं । तें कैसें असे ?

॥ ३ ॥ निःकाम मानस जाळें । तें इंद्रियसगा न मिळे, । स्थूळेंसीं ठाये वेगळें । नातळे तया. ॥ ४ ॥ जया ग्रामा नव जाइजे । तयाची वाट कां, गा, पुसिजे ? । यालागीं मनें असिजे-। ठाईंचे ठाईं.-॥ ५ ॥ निःशेष गेली कामना । तेथ स्वप्नींही न पडे कल्पना, । मग निर्विकल्पता मना । सहज उरे. ॥ ६ ॥ निर्विकल्पा सहजस्थिति, । अवधारीं, गा वीरपति; । मनत्व नुरे प्रतीति । जाणौनि पाहतां. ॥ ७ ॥ निश्चळु जाला पुरे,। प्रभजनु प्रभंजनें मरे, ।. तेथें जैसें तैसें अंबरें । असिजत असे, ॥ ८ ॥ तैसें निर्विकल्प स्थिरावलें, । तें मनत्वें मन हारपलें, । मग सज्ञान मात्र उरलें, । तेचि बुद्धि. ॥ ९ ॥ मनत्व साडूनि गवसणी । बुद्धि उरली जे स्वस्थानीं । ते कामें सूटली म्हणौनि । कैसी स्फुरे ? ॥ ४६१० ॥ जो जो करणें निचारे । तो तो कामनेचा अंकुर,। मी तू-पण कें निर्धार । इदंतेदेसा. ॥ ११ ॥ मग न कल्पी, नाठवी, न स्फुरे; । जाणीव जाणोंही वोसरे; । स्वरूप स्फुरणेंसीं जिरे । जेथिंचें तेथें, ॥ १२ ॥ बुद्धीची सुलीनावस्था । तोचि निर्वाणयोगु, पार्था; । निर्विकल्पीं वृत्तिशून्यता । स्वभावें होये. ॥ १३ ॥ जैं वृत्तिमात्रें न तपे । तैं मनेंसीं बुद्धि हारपे,। निवळे स्वरूप स्वरूपें । तें सहजचि कीं. ॥ १४ ॥ निर्विकार ठाये लहरी । तैं तेचि नुरे सागरीं, । मग निश्चळ जळसामग्री । तेचि उरे. ॥ १५ ॥ निर्विकारा सहजस्थिती । अनात्मभाव हारपती, । निर्मळ, निश्चळ, निजस्थिति । स्वरूप उरे. ॥ १६ ॥ मग तया शुद्धाचिया दृष्टी । माया, अविद्या, हे के गोष्टी ? । सहज शुद्ध तें, किरीटी, । म्हणौनिया.॥१७॥

आत्मन्येवात्मना तुष्टः

*एवं सहज सहजीं असद्भावो; । जाला असता सर्व वावो, । जें शुद्ध उरे ठायें, वो, । तेंचि आत्मा.* ॥ १८ ॥ तेथें नळगतेनि अंगें रूपा । स्वरूप जाणिजे निर्विकल्पा । स्थिति आपण आपणपां । आपुला ठाईं. ॥ १९ ॥ नाडत आंगें आगा, । देखणें सांडूनि मागां । ज्ञाता, ज्ञानमयु अवघा । ज्ञेयत्वें स्फुरे. ॥ ४६२० ॥ वृत्तीचा सत्रु भानें । उठी सर्वांगाचें देखणें, । मुरालेन स्वरूपवेदनें । जागे दिसों. ॥ २१ ॥ भावो अभावो अभावें । परि भावेंचि जया जाणवे, । आपुलेनि आपणा नव्हे । एकत्वें निपयो.

॥ २२ ॥ भावो पाठां परंतिला, । अभावीं अभावो दाटिला, । स्वभावो सांडूनि उरला । स्वभावेंचि. ॥ २३ ॥ स्वभावा आणी उणें, । अभावाचें कीरु देखणें, । तें दावी लपालेपणें । प्रकटावया. ॥ २४ ॥ शून्याची चोप न साहे, । दृष्टीचें देखणें खाये, । जयाचिये वारीं जाये । स्फूर्ति स्फूर्ती. ॥ २५ ॥ लक्षणें घाली मागां, । गुणाचिया योगा, वियोगा, । मग लक्षितु आंगें आंगा । संतुष्ट होये. ॥ २६ ॥ आपुलांचि ठाईं स्थिरावें । नामरूपगुणाभावें; । तो सच्चिदैकरसु नेणवे । जाणिवा जगीं. ॥ २७ ॥ ज्ञाता, ज्ञेय, सवेदन, । हें एकदेशी मात्र स्फुरण, । मग त्रिपुटीचां लोपीं जाण । सहज उठी. ॥ २८ ॥ अनंतकोटिब्रह्मांडें । मायेचां पोटीं पिंडें, । ते माया विराली, न पडे । जेथ दृष्टी. ॥ २९ ॥ अंतादिमध्यविहीन; । निर्विकल्प, निरंजन, । निरोपाधिक, निर्गुण, । केवळ जें; ॥ ४६३० ॥ तेथें वृत्तिविशेषु गळाला; । स्फूर्तीचा तरंगु निमाला; । सहज निर्मळु उरला । अखंडु आत्मा; ॥ ३१ ॥ तेथें दुजेनिविण आइक; । न भोगितां भोगिजे सुख. । सगट भुसे एकानेक । तें आटोंचि लागे. ॥ ३२ ॥ आंगेंचि आंगा अवाडी, । आगिची आंगा प्रतिवाडी, । अवाडी वाडी वाडी । वाडीं न वर्ते. ॥ ३३ ॥ संत सर्वगत, समान, । जया नाथी प्रपंचभान । आपुलांचि ठाईं तें आपण । संतुष्ट आत्मत्वें. ॥ ३४ ॥ सूर्येवीण तेथें दिवसु । विण दृष्टी दिसे प्रकाशु, । विण द्वैतें सतोषु । सार्वकाळ. ॥ ३५ ॥ निर्विकारा सहजस्थिति, । अवधारीं, गा वीरपति, । आपुलांचि ठाईं रति । योगिया जया; ॥ ३६ ॥ जो आपुलेनिचि विशुद्धें, । सच्चिदानंदमयें बोधें, । सतुष्ट पूर्णपदें । सार्वकाळ. ॥ ३७ ॥ नामरूपगुणाभावें । आपणुही आपणु नव्हे, । मग उरे चिन्मात्रु स्वभावें । सदानंदमयु. ॥ ३८ ॥ कामकल्पनेंचेनि संन्यासें, । ऐसेनि अवस्थाविशेषें, । स्वस्वानुभवें संतोषें । योगी जेव्हेळीं, ॥ ३९ ॥

तदा

तेव्हेळीं तो, अर्जुना, । पूर्ण योगी, जाण खुणा; । कृतकृत्यु, विचक्षणा. । पुढती कैसा ? ॥ ४६४० ॥

स्थितप्रज्ञ उच्यते

स्थितप्रज्ञु ऐसें बोलिजे, । समाधि अखंडितु सहजें, । ब्रह्मभूतु, म्हणिजे ।

सांप्रदायिकीं. ॥ ४१ ॥ कामुकल्पना जो नसडीं, । आणि योगीं धरी आवडी, । तो कपटाचारु फुडाफुडी । जाणावा तुवां. ॥ ४२ ॥ असो तें मत मूर्खाचें, । हें अतर्लक्षण स्थितप्रज्ञाचें; । आतां बाह्यचिन्ह तयाचें । तेंचि सांगों, ॥ ४३ ॥

दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।
वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते. ॥ ५६ ॥

दुःखेषु

स्थितप्रज्ञाचें साकार, । प्रारब्धसहित शरीर । दग्धपटन्यायें .सविकार । उरलें असे. ॥ ४४ ॥ जव तें प्राचीन असे, । तंव प्राणेंद्रियसंगु देहीं वसे, । तेणें विषयभोग आपैसे । होंचि लागती. ॥ ४५ ॥ तेथें इंद्रियादि मनातें । प्रतिकूळु विषयभोगु वर्ते, । तेणें परिखेदक उपजे तें । दुःख म्हणिजे. ॥ ४६ ॥ प्रकटलेंचि पुरे अंतराळीं, । सकळा संतोषा करी होळी, । जें कीं बाधक कवळी । मनबुद्धींद्रियां. ॥ ४७ ॥ अध्यात्मिक, अधिभौतिक । आणि तिसरें अधिदैविक । दुःख तापत्रयात्मक । त्यामाजी उठी. ॥ ४८ ॥ अध्यात्मिकतापलक्षण, । अवधारीं, दुःख कवण ? । तरि, जे शरीरापासून । उपजतें होये; ॥ ४९ ॥ वातपित्तकफादिकें । आणि द्वंदें उठती अनेकें, । तेंहीं केलीं रोगादिकें । तेंचि अध्यात्मिक; ॥ ४६५० ॥ अधिभूतदुःख कवण ? । अवधारीं, पार्था, सागैन, । जें भूतसमूहापासून । निपजतें होये. ॥ ५१ ॥ दारापुत्र-धन-नाशें । पशुहानी, कां निर्वंश, । निंदया, दंडें, बहुवसें । आघातें उठी. ॥ ५२ ॥ आतां अधिदैविकु तापु कवणु ? । करिसील ऐसा प्रश्न; । तरि जो उपजे देवांपासूनु । प्राणियांतें. ॥ ५३ ॥ कल्पांचा मांडे अतु, । कां प्रळयाचा प्रवर्तु, । तें सकळां भूतातें घातु । अतकु करी. ॥ ५४ ॥ कां मरण येऊनि वोसरलें, । तें वासनादेह जीवा रचलें, । तद्द्वारा यमलोकीं भोगिलें । जें यातनादिक, ॥ ५५ ॥ कां अतिवृष्टि, अनावृष्टि, । दुर्भिक्ष्य एक उठी, । तेणें संहारों लागे सृष्टि । तेंचें दुःख; ॥ ५६ ॥ अतिशीतें, अतिउष्णें, । अतिवातें, अतिजीवनें, । उपजे जें भूतांकारणें । तें अधिदैविक दुःख. ॥ ५७ ॥ महत्कृतपीडा जाण, । अर्जुना दैविक म्हणोन; । ऐसें तापत्रयादि दुःख गहन । वर्तत असतां ॥ ५८ ॥

अनुद्विग्नमनाः

जयाचां मनीं, अर्जुना, । उद्वेगुमात्रु असेना, । पारि पडलया मरणा । व्याकुळु नव्हे. ॥ ५९ ॥ दुःख आरंभलें दारुण, । कटा वेंचती माझे प्राण; । ययापासाव कवण, । रक्षील मातें ? ॥ ४६६० ॥ ऐसा तापत्रयादि दुःख साहे, । चित्तीं उद्विग्नु पारि जो नोहे, । पुडती कैसा आहे । स्थितप्रज्ञु जो ॥ ६१ ॥

सुखेषु

हाणत दुःखसमूहातें, । प्रीति उपजवी करणातें, । चाड जयाची मनातें । तेंचि सुख. ॥ ६२ ॥ अनुकूळ विषय भोगितां । जें उपजे तें सुख, पार्था, । न सोडवे मना आसक्ता । सार्वकाळ. ॥ ६३ ॥ वातपित्तकफहरण, । जालें रोगादिक दहन, । अमृता ऐसें सेवन । घडलें अनायासेंचि. ॥ ६४ ॥ प्रळयो न पडे दृष्टी, । न करिती ग्रहगोष्टी, । यमु देखोनि उठी, । ऐसें जालें. ॥ ६५ ॥ अर्थलाभ ते अनेक, । क्षेम स्त्रीपशुपुत्रादिक, । वरि पदार्थसिद्धि आणिक । ते होंचि लागे. ॥ ६६ ॥ इहामुत्रार्थफळसिद्धि । राणीव पावला निरवधि, । ऐसां पैं सुखसंबंधीं । योगी कैसा ? ॥ ६७ ॥

विगतस्पृहः

हें ऐसेंचि मातें असावें, । आणिकही प्राप्त व्हावें, । एथ विघ्न न पडावें । ऐसी स्पृहा ॥ ६८ ॥ जयापासाव, अर्जुना, । गेली; ते भोगवासना, । कामु आणि कल्पना, । न वर्ते जयासि; ॥ ६९ ॥ आनही एक अवधारीं, । जो सुखें दुःखें, नांगिकारी, । निःकामु आत्मलें अतरीं । स्थिरात्मा जो; ॥ ४६७० ॥

वीतरागभयक्रोधः

तयाचें शरीर वर्ततां । व्यवहारीं, पांडुसुता, । लोकदृष्टी पाहतां । तीनि गेलीं. ॥ ७१ ॥ तींचि सांगावीं मातें, । जीं न वर्तती समाधिस्थातें, । ऐसें पुससील, तरि निरुतें । वचन अवधारीं. ॥ ७२ ॥ शरीर आदिकरून । जें कांहीं दृश्यभान, । द्वैतमात्रस्फुरण । वस्तूचां ठाईं, ॥ ७३ ॥ तेथें अहतेचिमार्गें, । उठिलिये ममतेचेनि अंगें, । अर्थु देखतांचि लागे ।

प्रीति जे कां ॥ ७४ ॥ मौन पाडीजे विचारा । सोडि तया न सोडी, वीरा, । अभेदमतीचा मातेरा । करूंचि लागे; ॥ ७५ ॥ तें बंधन न तुटे वज्रें, । जाळितां न जळे वैश्वानरें; । द्वितीयाभिनिवेशें खरें । उमटों लागे. ॥ ७६ ॥ प्रीतिलक्षण निरोपिलें, । आतां दुजें भय बोलिलें; । तें सांगिजैल पहिलें । वचन, अवधारीं. ॥ ७७ ॥ मरणाचिये प्राग्भावीं, । देखौनि घातु उपजे जीवीं; । खूण जाणे अनुभवी । या प्रमथकाची. ॥ ७८ ॥ दुःख दर्शनीं जें दिसे, । हिताचेनि उठी नाशें, । येणें संग्रामविशेपें । बहुतां बाधी. ॥ ७९ ॥ प्रतिकूलें अर्थे सहजें, । भोगितां दुःख उपजे, । तयाचां आगमीं देखिजे । तेंचि भय. ॥ ४६८० ॥ अनुकूलु अर्थु पावे, । तेणें सुख, पार्था, अनुभवे. । तेंचि आसक्ती न सोडवे । म्हणिजे प्रीति. ॥ ८१ ॥ आतां प्रिय अर्थ जे असती, । तयांचिये आड प्राप्ती । विघ्नकर कोण्ही होती । शत्रुत्वें जन; ॥ ८२ ॥ तयांतें देखोनि उपजे, । तो क्रोधु, अर्जुना, जाणिजे; । जाळेन जेणें कीजे । भूतहिंसा. ॥ ८३ ॥ विचारु पळोनि जाये राना, । सारिखें होइंजे पंचानना, । बोळसि फिटे, अर्जुना; । चढे तम. ॥ ८४ ॥ ऐसें हें त्रय कथिलें, । राग, भय, क्रोधु, येणें बोलें; । तें अंतरीं ळागल । जया पुरुषांचे, ॥ ८५ ॥ ते सर्वी सर्वदा प्रीतिहीन, । सर्वत्रीं सर्वदा भयक्षीण, । सर्वथा क्रोधाचें अभिधान । ते जे नेणती; ॥ ८६ ॥ अंतरीं भेदबुद्धि उडाली, । बाह्यांतरीं अभेदता उरली, । एव द्वैताभिनिवेशा जाळी । शांति असतां, ॥ ८७ ॥ नाहीं आश्रयो प्रीतीतें, । स्थान न वर्ते भयातें, । कारण कैचें क्रोधातें । द्वैतेंवीण? ॥ ८८ ॥ यापरी यें तिन्ही गेलीं । म्हणिजे भेदबुद्धि उन्मूळली, । ना कीं भेदमति फिटली, । तिचीं हीं चिन्हें. ॥ ८९ ॥ सता असतीं कें प्रेम? । ना असंता नाहींचि रूपनाम, । तेथें आभासे तें वर्म । आपणुचि जैं, ॥ ४६९० ॥ तें भय आणि क्रोधु । ययांचा नळगे बाधु, । ऐसा नित्यु आत्मबोधु । जयाचा कां; ॥ ९१ ॥ अन्वयें अथवा व्यतिरेकें । द्वैतभान जो न देखे, । सत्ता स्फुरे वेदकें, । नित्ययुक्तु. ॥ ९२ ॥ आतां द्वैताचां निरासीं । स्थान नाथीं प्रीति-भयांसि, । क्रोधु तोही एकासि । एकत्वें नुपजे. ॥ ९३ ॥

स्थितधीः

यया चिन्हीं जो देखसी । तो स्थितप्रज्ञु जाण निश्चयेसीं, । स्थिरता जाली बुद्धीसि । योगनिष्पत्ती. ॥ ९४ ॥

मुनिः

तोचि मननशीलु ज्ञानी । सांख्यसिद्धांतेंकरूनि । सुटला प्रकृतिगुणीं । सार्वकाळ. ॥ ९५ ॥

उच्यते

अधिष्ठानतत्व बुझला, । असंतुभावो जयाचा निरसला, । मग योगनिष्पत्ति जाला । सार्वकाळ निष्टु, ॥ ९६ ॥ तोचि ज्ञानी, तोचि योगी, । शुद्ध, बुद्ध जो अंतरंगीं, । स्थितप्रज्ञु हें जगीं । बोलती संत. ॥ ९७ ॥ तोचि तो जीवन्मुक्तु, । तोचि बोलिजे समाधिस्थु, । स्थितप्रज्ञु विख्यातु, । पांडुपुत्रा. ॥ ९८ ॥ पुडती तयाचीं बाह्यचिन्हें । सांगैन मत्ता वचनें, । अवधान देईं, जेणें । वोळखसील. ॥ ९९ ॥

> यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।
> नाभिनंदति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥

यः

जो असोनि देहीं विदेही, । गुणेंसीं संगु जया नाहीं, । परिनिष्ठित बुद्धि ठाईं । जयाची समाधीचां, ॥ ४७०० ॥

सर्वत्र

तो उरलेनि देहें, पार्था, । यये व्यवहारीं वर्ततां, । सर्वमिथ्यात्वें सर्वरूपता । जाणे आत्मयाची. ॥ १ ॥ तेथें पुत्र, दारा, गोत्र, धन, । पश्वादि, संपत्ति, सदन, । मित्र, क्षेत्र, गोत्रजन । आदिकरूनि, ॥ २ ॥ आदिकरूनि स्वशरीर । पंचभौतिक समग्र, । सानस्तंभ साकार । जितुकें कांहीं. ॥ ३ ॥ अवस्थाविशेषें भासे, । जागृती स्वप्नीं दिसे, । अवधारीं, अर्जुना, कैसें । तयाचां ठाईं ? ॥ ४ ॥

अनभिस्नेहः

स्नेहमात्र नसे जया, । अस्तित्व बुद्धि, धनंजया, । निचेर उदासीनु योगिया । स्थितप्रज्ञ. ॥ ५ ॥ स्वजनीं, स्वशरीरीं, स्वार्थी, । ममतायोगें

वीरपति, । स्नेहमात्र जें बोलती । तें नसे जया, ॥ ६ ॥ याहूनि सामान्यीं, विशिष्टीं, । जें स्नेह जया दृष्टी । असावें तें, किरीटी, । नसे तिणेंसीं ॥ ७ ॥

तत्तत्

पुत्रदारादि समस्त । मागां बोलिले जे अर्थ, । ते ते प्राप्त होतां, निश्चित । चिदाकारें ॥ ८ ॥

शुभं प्राप्य

शुभ तेंचि प्राप्त होये, । अनुकूळ भोगाप्रति ये, । अथवा सुखाचें होये । जेणें मन, ॥ ९ ॥ जे जे अर्थ साधिती । ते ते पुढती न नाशती, । इष्ट काम, भोग, संपत्ति । प्राप्त होतां, ॥ ४७१० ॥

नाभिनंदति

नपवे जो कां हर्षातें, । न इच्छी पुनः पुनः तेंचि तें, । जेणें संतोषु मनातें । उपजों लागे. ॥ ११ ॥

अशुभं प्राप्य

आतां पूर्वोक्त अर्थ सकळ । तेचि होती दुःखमूळ, । अशुभा कर्माचें फळ । अशुभ जें कां, ॥ १२ ॥ प्रतिकूळें अर्थसंपर्के । उपजति नाना दुःखें, । विरुद्धें होती अवशिकें, । कां नाशती क्षणेंचि; ॥ १३ ॥ देह रोगादिकीं ग्रस्त, । पादार्थिक जाये समस्त, । जेणें पीडों लागे चित्त । तें प्राप्त जाल्या, ॥ १४ ॥

न द्वेष्टि

तयाचा द्वेषु न करी, । देखोनि आग न चोरी, । जये काळीं जें शरीरीं । भोगा आलें, ॥ १५ ॥ तें हो कां शुभ, अशुभ, । सुखदुःखदातें स्वयंभ, । न उपजती चित्तक्षोभ । क्षोभनितांहीं; ॥ १६ ॥

तस्य

ऐसा जो यये शरीरीं । भोगूनि प्रारब्ध सारी; । अनुकूळ प्रतिकूळ भरी । एकेंचि मापें. ॥ १७ ॥ अनात्मक, मिथ्याभान, । आतां शुभाशुभ तत्समान, । सत्यस्वरूप, निरंजन । तेंचि जाला. ॥ १८ ॥ तया निवित्तात्मज्ञा, ज्ञानदीला, । बाह्यस्वभावशिथिला, । अनयानदेई, नृपाला, । कायें म्हणिजे. ॥ १९ ॥

प्रज्ञा प्रतिष्ठिता

तरि स्थितप्रज्ञ तो, अवधारीं, । जयाची बुद्धि सारासारीं । जाणों प्रवर्तली; असारीं । स्थिरावेचिना. ॥ ४७२० ॥ मग सारभूत निरंजन, । तेथेंचि जाली लीन, । पुढती न स्मरे भान । यया प्रपंचाचें. ॥ २१ ॥ बुद्धि समाधी स्थिरावली, । कल्पना निःशेष मेली, । चरमदशा पातली । तया योगियातें. ॥ २२ ॥ आतां तये दशेचें, वीरा, । पूर्वसाधन, धनुर्धरा, । सांगैन; मत्ता विचारा । येईल तुझया. ॥ २३ ॥

यदा संहरते चायं कूर्मोऽगानीव सर्वशः ।
इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥

अयम्

हा योगी, धनुःपाणि, । प्रवर्तला प्रथम साधनीं, । सत्वशुद्धीलागूनि । काये करी? ॥ २४ ॥ अभिमानु कर्तृत्वाचा । तो संगु जाणोनि कर्माचा, । देहा, इंद्रियां, गुणांचा । निश्चयेसीं. ॥ २५ ॥ मग अकर्तात्मज्ञानें, । कां ईश्वराधीनपणें । सांडिता होऊनि मनें । न इच्छी फळ. ॥ २६ ॥ दृश्य जाणोनि असतत्वें । न इच्छी फळ मिथ्यात्वें, । कां ईश्वरार्पणभक्तित्वें— । करूनि, पांडवा. ॥ २७ ॥ आचरे कर्म विहित, । परस्परा सिद्धि समस्त, । कां ईश्वराधीनु मी, हें मत । आश्रयूनि. ॥ २८ ॥ ऐसा करूनि कर्म, न करी, । न करूनि सर्व करी, । तेणें सत्वशुद्धि अतरीं । पावता होये; ॥ २९ ॥ ते रजतममळ धूपले । लय, विक्षेप तेणें जळाले, । अज्ञान, अन्यथाज्ञान जालें । देशधडी. ॥४७३०॥ उरलें सत्वचि निर्मळ, । तें चित्त निराकुळ, । अंतरीं स्वभावें निश्चळ । होतें जालें. ॥ ३१ ॥ ऐसा जन्मांतरीं संपादिला । तो कर्मयोगु जया फळला, । मग ध्यानारूढ जाला । योगिराज. ॥ ३२ ॥ आणि नाना ईश्वरभजनें । पूर्वींचि केलीं जेणें, । म्हणोनि भगवंतानुग्रहें तेणें । सद्गुरु भेटला. ॥ ३३ ॥ आतां रजतमदोषरहितु । आणि सत्वें केवळें युक्तु, । सद्गुरूचा अनुगृहीतु । तो काय करी? ॥ ३४ ॥ सांडूनि जनसंपर्कासि । जाला विविक्तवासी. । यथोक्त आसन, परियसीं, । सपादिलें. ॥ ३५ ॥ तेथें सिद्धासनें आरूढला, । कर्मेंद्रियां दमु केला, । धारणायुक्ती आंवरिला । स्थूळ देहो. ॥ ३६ ॥ दृष्टि ठेवूनि

नासाग्रीं । मग तो, अर्जुना, काये करी ! । तें मी सांगेन, अवधारीं, । तुजप्रति. ॥ ३७ ॥

सर्वशः इंद्रियाणि

मनसहितें ज्ञानकरणें । जें जाणती बाह्यार्थाकारणें; । आता तें म्हणसील कवणें, । तरि अवधारीं, पां. ॥ ३८ ॥ शद्बमात्राचें जें ज्ञान । तें श्रोत्रेंद्रिय, ऐसें जाण; । एतद्वारा अंतःकरण । बाह्यार्थी संक्रमे. ॥ ३९ ॥ स्पर्शमात्राचें जाणणें । जेणें, तें त्वगिंद्रिय जाणें; । मन निघे द्वारे जेणें । आडळाप्रति. ॥ ४७४० ॥ रूपमात्राचें जें ज्ञान । तें नेत्रेंद्रिय, ऐसें जाण; । जया वाटा प्रयाण । बुद्धि करी. ॥ ४१ ॥ रसविषयीं ज्ञान, अर्जुना, । ते हे जाणावी रसना, । जेणें द्वारें बाह्यसाधनां । चित्त प्रवर्ते. ॥ ४२ ॥ परिमळु कळे जेणें । तयातें घ्राणेंद्रिय म्हणें, । अहकारु मार्गें जेणें । पात्र गर्धी. ॥ ४३ ॥ ऐसें एक अंतःकरण । पचधा वृत्तिभेदें भिन्न, । प्राणपंचकाचें लाहोन, । अर्जुना, बळ. ॥ ४४ ॥ ज्ञानेंद्रियपचकाचेनि । मार्गें बाहेरि निघोनि, । बाह्यविषयीं प्रवेशोनि । राहिलें असतां, ॥ ४५ ॥

इंद्रियार्थेभ्यः

ते कवण बाह्य विषय? । तरि इंद्रियार्थ जे ज्ञेय, । जागरावस्थे भोग्यमय; । कवण कवण ते ? ॥ ४६ ॥ श्रोत्रद्वारा अंतःकरणा । शद्बु विषयो, अर्जुना, । त्वगिंद्रियद्वारा मना । जाणे स्पर्शु. ॥ ४७ ॥ चक्षुद्वारा बुद्धीतें । रूप विषयो जाण वर्ते; । रसने द्वारा चित्तातें । तैसाचि रसु. ॥ ४८ ॥ घ्राणद्वारा अहंकारा । गंधु विषयो, धनुर्धरा; । यया विषयपचकातें थारा । ते पचमहाभूतें. ॥ ४९ ॥ मग भौतिकु प्रपचु केवळु । तो विषयस्थानीं जाण कवळु, । माजी आपुलाही देहो स्थूळु । वर्ततु असे. ॥ ४७५० ॥ एवं ज्ञेयमात्र विषयस्थानीं । तेथें पावला ज्ञानकरणीं, । अंतःकरणचि, धनुःपाणि, । रिघालें असे. ॥ ५१ ॥ अतःकरण जया म्हणिजे । तें वदनमात्र जाणिजे, । वृत्तिचतुष्टय सहजें । तयाचि एकाचें. ॥ ५२ ॥ निर्विकल्प संवेदन, । जीवाचें प्रथम स्फुरण । जाणावें तें अंतःकरण । कल्पनेपूर्वी. ॥ ५३ ॥ तेंचि संकल्पात्मक उठी । तें मन म्हणिजे, किरीटी; । निश्चयात्मक तयापाठीं । तें तेंचि बुद्धि; ॥ ५४ ॥ अनुसंधानाकारें प्रकटे । तें चित्त म्हणणें घटे; । अहंतत्वाकारें उठे । तें तेंचि अहंता. ॥ ५५ ॥ ऐसें एक

अत करण । पाचा वाटा प्रयाण । प्राणाचें बळ लाहोन । करितें जालें. ॥ ९६ ॥ तें आलें विषयग्रामा, । आश्रयूनि भोगकामा, । सिरकलें रूपा, नामा, । गुतलें प्रपचीं. ॥ ९७ ॥ तें इद्रियसहित मन । बाह्यविषयापासून । योगी अतरनिष्ठ होऊन । गुरुवाक्योक्तप्रकारें ॥ ९८ ॥

यदा सहरते च

जेन्हेळीं काढूनि, अवधारीं, । जेथिचें तेथें चित्त धरी, । पुढती येऊ नेदी बाहेरि । अर्थस्थाना. ॥ ९९ ॥ एथ विषयीं दृष्टातु । सागेन, तो आइकें तू; । जाणु होसी सिद्धातु । वोळखोनिया. ॥ ४७६० ॥

कूर्मोऽगानीव

नदीतटाकीं, सरोवरीं । साचलु नसे ते अवसरीं । कूर्मु निघोनि बाहेरि । आहारास्तव, ॥ ६१ ॥ आगामाजूनि अगें । काढिता होये बहिरंगें, । मनोगत भोगी अवघें, । तव सचारु होये. ॥ ६२ ॥ मग जेथूनि अगें जें जैसीं । बाह्य प्रसारिलीं होतीं, तैसीं । पुडती तेथेंचि तें तैसीं । आवरूनिया घे, ॥ ६३ ॥ कीं दीर्घततु काढूनि । पुडती ग्रासी कातणी, । मग जैसी तैसी निदानीं । आपण उरे, ॥ ६४ ॥ अगारदशेचा पावकु । जैसा होये अतर्मुखु, । तैं विभूति ठेवूनि सकळेकु । शातु होये, ॥ ६५ ॥ तैसा अतरस्थु, अवधारीं, । योगी करणातें आवरी, । बाह्य विषयातें दूरि । साडूनिया. ॥ ६६ ॥ आता म्हणशील, गुडाकेशा, । तैं तेथें अनुभउ कैसा ? । तरि सागेन मी, वीरेशा, । धनु पाणि. ॥ ६७ ॥ विषयापासान सुटलीं । इद्रियें माघारीं मुरडलीं, । जेथिचीं तेथें प्रवेशलीं । करणें पा अगें ? ॥ ६८ ॥ शब्दाचें होता श्रवण, । अर्जुना, आइकें वचन, । कवणे स्थानीं ज्ञान । स्फुरे तयाचें ? ॥ ६९ ॥ श्रोत्रींचि ज्ञान म्हणसी । तरि अनुभउ वाचा प्रकाशी, । तो शब्दार्थु तया श्रोत्रासि । ठावाचि नसे, ॥ ४७७० ॥ असोनि श्रोत्रातें नसे, । शब्दानुभउ वाचे असे, । आता तीतेंही, परियसें, । कवणे स्थानीं ? ॥ ७१ ॥ वोष्ठीं अनुभउ नाथी, । शब्दज्ञान नाडळे दतीं, । तालु, मूर्ध्नि आरुती, । परता शब्दु कळे. ॥ ७२ ॥ तरि तेंचि एक अत.करण, । जें स्वस्थानींचि असोन । ज्ञान आणि स्फुरण । शब्दाचें करी. ॥ ७३ ॥ तया अत करणाची वृत्ति, । आकाशीं शब्द वरि धावती । दिसे परि, वीरपति, । ठाईंचि वर्ते.

॥ ७४ ॥ ते शब्दोन्मुखता सांडून, । कारणीं वृत्ति होये लीन, । तेथें बहिरंग वाचा श्रवण । वर्तत असे. ॥ ७५ ॥ त्वक् जाणे स्पर्शातें । दिसे तंव ऐसें निरुतें, । परि अनुभउ तये वाचेतें, । तो त्वचेतें नसे. ॥ ७६ ॥ शीत, उष्ण, मृदु, कठिण, । हें वाचेतें कळे कोठून, । दंतोष्ठादि, ताळु, रसन । ध्वनि धांडोळितां ? ॥ ७७ ॥ शब्दसहित वाचा अपर, । स्पर्शज्ञानस्फूर्तिपर, । जो येथें ज्ञानमात्र निरंतर । निर्विकल्प असे; ॥ ७८ ॥ तया नाम अंतःकरण; । तेंचि मनोरूपें जाण । पवनीं वृत्तिप्रसारण । स्पर्शार्थ करी. ॥ ७९ ॥ सांडूनि स्पर्शोन्मुखता । वृत्ति परते स्वरूपता, । ते अंतःकरणींचि रिघतां । देखिजत असे. ॥ ४७८० ॥ रूपवरि धांविन्नला, । नयनें आकारु देखिला, । तो न देखतिये अनुभवला । कैसा वाचेतें ? ॥ ८१ ॥ दीपाचेनि प्रकाशें । सकळही दृष्टी दिसे, । तेथें द्रष्टा दीपु, ऐसें । कवणें मानावें ? ॥ ८२ ॥ रूपबोधु नयनातें । नसे, तो असे वाचेतें; । ऐसें माने परि तेथें । शोधु घेतां. ॥ ८३ ॥ दंतोष्ठताळुमूर्धि । यांहूनि परती ते ध्वनी, । रूपबोधु तो तीहीपासूनि । अंतरंगु असे. ॥ ८४ ॥ जेथूनि शब्दाचें स्फुरण । निर्विकार जें वदन, । तया अंतःकरणा ज्ञान । असे रूपाचें. ॥ ८५ ॥ रसना जाणे रसातें । परि रसबोधु नाहीं तियेतें; । तो स्फुरे तये वाचेतें, । पांडुपुत्रा. ॥ ८६ ॥ तो वैखरीतें अंतरंगु, । मध्यमेपूर्वी चांगु, । नव्हे पश्यंती बहिरंगु । जो म्हणौनि ते. ॥ ८७ ॥ जेथूनि परेचें स्फुरण, । निर्विकल्प जें सवेदन, । तया अतःकरणा ज्ञान । रसाचें तया. ॥ ८८ ॥ ते रसोन्मुख चिदाकारें । अंतःकरणवृत्तिप्रसारें, । तें ठाईंची ठाईं जिरे । तयेचि अंतःकरणीं. ॥ ८९ ॥ घ्राणु गंधातें जाणे । ऐसें बोलती शाहणे, । परंतु गंधानुभउ सांगणें । तें तयेचि वाचेतें. ॥ ४७९० ॥ तेही वाचा, वीरपति, । बोलोनिही परि रिती; । अनुभउ गंधाचा स्फूर्ति । अंतरंगु सदा. ॥ ९१ ॥ तेंचि अंतःकरण स्वभावें । गंधोन्मुख जैं नव्हे, । तें तें बाह्यवृत्तिमाळवें । उरे जें तें तेंचि. ॥ ९२ ॥ ऐसें अंतःकरण एकलें । एवमेवप्रकारें फांकलें, । ज्ञानेंद्रियद्वारा उलंडलें । विषईं दिसे; ॥ ९३ ॥ परंतु तें जेथिंचें तेथें । जैसें तैसेंचि वर्ते, । अवधारीं, दृष्टांतें । सांगेन मी. ॥ ९४ ॥ पांचही घटातें छिद्रें, । तया

माजिचा दीपु, बा रे, । तो स्वस्थुचि बाह्य प्रसारे । पांचां वाटां. ॥ ९५ ॥ कीं चित्रमंडपींचीं लेपें । प्रकाशती एकेंचि दीपें, । तेंचि ज्ञानकरणें चिद्रूपें । तेणें अंतःकरणें. ॥ ९६ ॥ असो. ते विषयोन्मुखता । अंतःकरण सांडी, पार्था, । तै निरसे जागरावस्था । जे बाह्यप्रपंचज्ञान. ॥ ९७ ॥ अभावीं तये जागृतीचां, । अभावा देहादिप्रपंचाचा । अनुभउ कैसा तेथिंचा? । तोचि अवधारीं. ॥ ९८ ॥ देहादिप्रपंचनिरासें । अभावो साक्षात्कारें दिसे; । स्थानमान तेथें कायिसें । पादार्थिक? ॥ ९९ ॥ तेथें पृथ्वी, आप, महातेज, । वायो ना गगन बुझ; । शशी ना सूर्य सहज, । तें दिवसु ना निशी. ॥ ४८०० ॥ पिंड ना ब्रह्मांड, वीरश्रेष्ठा, । तेथें अभावेंचि दिसे, सुभटा; । तयाही अभावाचा द्रष्टा । होऊनि असतां, ॥ १ ॥ जो कांहीं अर्थु स्फुरे, । तो तो सूक्ष्मु विषयोचि, बा रे, । म्हणौनि तेहं वृत्ति अभ्यंतरें । घेइजे आंवरूनि. ॥ २ ॥ जे जे उपजे कल्पना । ते ते कोठूनि, जाण, अर्जुना; । सूर्यापासूनि किरणां । प्रसारु जैसा. ॥ ३ ॥ तये कल्पनेचें स्फुरण, । कल्पिता अर्थाचें ज्ञान, । तें ठाईंचिहूनि असे जाण । जन्हीं देशु भरितें. ॥ ४ ॥ कल्पनेसंगें कल्पितें । गेलें, हें जैं निरुतें, । तैं करितां स्वस्थानीं तें । सावधान न व्हावें. ॥ ५ ॥ सावधानते शुद्धाकारें । कल्पना सर्व संहारे, । तेथिंचें द्रष्टें मन उरे । तें अनुभून कथीं. ॥ ६ ॥ कल्पनेचि संगें जातें । तरि तत्संगेंचि विनाशतें, । अनुभउ सागों न येतें । अवस्थेचा. ॥ ७ ॥ एवं कल्पनेचिये प्राग्दशे । संवेदनमात्र जें असे, । तेथेंचि उठी समरसें । कल्पना ते. ॥ ८ ॥ तें ज्ञानमात्र अंतःकरण, । संकल्पात्मकवृत्ति तेथून । उठी, तें पुडती मन । तेथेंचि सामावे. ॥ ९ ॥ जेथूनि जातें चित्तगुणें । अभावाचें देखणें, । अभावदृष्टीचेनिकारणें । तेचि घेतां, ॥ ४८१० ॥ पाहणें सर्व अभावे । जेथिंची तेथें वृत्ति मावळे, । तेथें द्रष्टेपणें उद्भवे । एकि अहंता. ॥ ११ ॥ अहंतेपूर्वी जें खरें, । जेथूनि अहंता स्फुरे, । अहंनाशीं जें उरे । संवेदनमात्र; ॥ १२ ॥ ऐसी अहंतव्यात्मक गळे । ते वृत्ति कारणीं मिळे, । तें निस्तरंग सचलें । उरे तत्व. ॥ १३ ॥ तंव विवेकोन्मुखता । उठी, तेही जेथूनि, पार्था, । वेत्ता आश्रयो आंवरिता । होयें तिपतेंही. ॥ १४ ॥ यापरी जें जें वृत्तिस्फुरण । द्वैतोन्मुख उठी जाण, । तयाचें अंतःकरण अधिष्ठान । ज्ञानमात्र जें; ॥ १५ ॥ ते प्रपंचोन्मुख

संविति। जेणें पदार्थाची स्फूर्ति,। ते सामावूनि सहजीस्थिती। असो जातां, ॥ १६ ॥ प्रकटे केवळ अज्ञान,। सुषुप्ति, लयो कां जडपण,। तमोगुणाचें लक्षण। प्रकृतीचिया.॥ १७॥ तेंही जेणें ज्ञानें कळे। त्या ज्ञानाचेनि आत्मा मुळें। सहजस्वभावें निर्मळें,। निश्चळें जाणावा. ॥ १८ ॥ जाणें तरि तें जाणणें। साहे आंगाचें नेणणें,। नेणें म्हणौनि जाणणें। आड करी. ॥ १९ ॥ नेणिवा जो की नेणों,। जाणे जाणिवा जाणों,। तो जाणे ना नेणेसा; तैं नेणों। जाणों यां वेगळा. ॥ ४८२० ॥ ऐसा जाणे ना नेणेसा संचला,। वृत्तिमात्रें सुटला,। केवळु आपणु तै उरला। कवणें अंगें? ॥ २१ ॥ सुटला वृत्तिविशेषें। ठाइंचाचि ठाईं असे,। तैं नामरूपादि आभासें। शोभेचिना. ॥ २२ ॥

तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता

अवधारीं योगी, पांडवा,। ऐसा वृत्तिशून्यु जेधवां,। तो तेणें काळें जाणावा। स्थितप्रज्ञ. ॥ २३ ॥ बाह्यांतर ठेलें ज्ञान। तें स्वरूपीं जालें सुलीन,। चिन्मात्र, शुद्ध, निरंजन। स्वयेंचि तो. ॥ २४ ॥ अर्जुना, साधकाचें लक्षण,। हेंचि तेयिंची जाणावी खूण,। द्वैतीं पावळिये निराकरण। वृत्तीचें कीजे. ॥ २५ ॥ हें सूक्ष्म साधन कथिलें,। आतां स्थूळ साधन जें बोलिलें,। तें पाहिजेल प्रकट केलें। तुजप्रति. ॥ २६ ॥

> विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः।
> रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥

देहिनः

जो कव्हणी देहवंतु। योगाची इच्छा करितु,। प्रवर्तला करणसघातु। प्रवर्तेचिना. ॥ २७ ॥ श्रोतु म्हणे मी आइकैन;। रसना म्हणे रसु चाखैन;। नयनु म्हणे देखैन। रूपादिक. ॥ २८ ॥ त्वचा सुखदुःख पाहे,। ते शीतोष्णादि द्वंद्व लाहे,। घ्राणु परिमळार्थ जाये। वनस्पतींप्रति. ॥ २९ ॥ गमन प्रिय पादांतें,। वचन आवडे वाचेतें,। घेणें देणें करातें। तें सांडवेचिना. ॥ ४८३० ॥ शिश्न सोकावलें रती,। पायु त्या विसर्गाप्रति,। ऐसीं मोकाटें नांनरती। करणें तया. ॥ ३१ ॥ जव जंव क्षुधा आगळी,। तंव तव तृषा ती धाकुटी,। मग दोहींची पूर्ति लागली। सर्वथा करणें; ॥ ३२ ॥ ज्या देहाचिया उठिती,। आयुष्य असतें प्राशिती,। 

मनादि इंद्रियां करिती । विकळ सदा. ॥ ३३ ॥ पुरतां कामु ययांचा, । विकारु आगळा इंद्रियांचा, । निद्रा, जडत्व; आळसाचा । वळसा पुरे. ॥ ३४ ॥ तेणें काम, क्रोधु दुणावे, । मदु, मत्सरु वळावे, । तृष्णा, आसक्ति धांवे । माझा म्हणौनि. ॥ ३५ ॥ अहंता, ममता न मुरडे, । वासना आगळी वाढे, । अर्जुना, जितुलें कांहीं कुडें । तितुलेंही उठी. ॥ ३६ ॥ सुंदर आणि तरुणी । अभर्तृका हांये कामिणी । वरि आनुही पोषकु कन्हणी । धणी न वर्ते, ॥ ३७ ॥ तीतें जो तो दृष्टी । अभिलाषूं लागे, किरीटी, । तैसीं जें जें चिन्हें वोखटीं । तें एकुदांचि मिनती. ॥ ३८ ॥ क्षयाचिये पक्षदशे । रोगसमूह प्रवेशे । अनिवार, बा रे, तैसें । मांडलें असतां ॥ ३९ ॥ तो योगी उठी विचारें, । तंव विषयोचि सर्वत्र स्फुरे, । मन ना राये, व्यापारें । करणें नागवतीं. ॥ ४८४० ॥ मग तो संस्कारें बळवंतु, । सद्गुरूचा अनुगृहीतु, । विषयांपासाव मुक्तु । कैसा होये? ॥ ४१ ॥

निराहारस्य

एकांतवासी, अवधारीं, । आसनाचा जयो करी, । विषयीं फांकलीं आंवरी । सकळें करणें. ॥ ४२ ॥ चंचळ तन्ही तें, अर्जुना. । चित्त आंवरी पुनः पुन्हा; । देहा आसनाची धारणा । सुटों नेदी. ॥ ४३ ॥ एणेंचि उपायें जाण । प्राणधर्म होती क्षीण, । ते म्हणसील कैसे, कवण? । तरि अवधान देई. ॥ ४४ ॥ देहादि करणां चंचळता, । ते प्राणधर्म, गा, सर्वथा; । क्षीण होती ध्यानस्था । तेव्हेळीं कैसे? ॥ ४५ ॥ प्राण होती धर्मक्षीण, । तेणें जठरा नाथी दीपन, । मग पचे तेंचि अन्न । योगी सेवी. ॥ ४६ ॥ जितुला तुटे आहारु । तितुला करचरणव्यापारु । क्षीणु होये, विकारु । स्थूळ देहींचा. ॥ ४७ ॥ क्षुधेनेंचि क्षुधा आवरे, । तयोगें तृषा ओसरे, । थोडेनीचि निद्रा पुरे, । पांडवा, गा. ॥ ४८ ॥ आलस्य जाये विलया, । व्ययो होये रोगत्रया, । कामा ऐसा पापिया । मुख नदवी. ॥ ४९ ॥ रक्त, मांस देहीं आटे, । बळ प्राणांचें तुटे, । क्रोधु अवघा निवटे, । तेणें अंगें. ॥ ४८५० ॥ आहारु उणावे देहीं, । तया लोकांची इच्छा नाहीं, । आणि विशेषें व्यवसायीं । प्रवर्तेचिना. ॥ ५१ ॥ व्यवसायशून्य चित्ता । आइकोनि काये वार्ता? । अपूर्व देखावें हे चित्ता । उपजेचिना. ॥ ५२ ॥ कामाचें बळ तुटे, । स्त्रीची चाड नवटे, । परिग्रहें दुःख वाटे ।

येरें महा. ॥ ९३ ॥ परिग्रहदुःखदर्शनें । वैराग्य उठी, जाणें; । त व्यवहारवृत्तींचीं खाणें । मुळें, पार्था. ॥ ९४ ॥ तैं कां ती वस्त्रीं अचाड; । नळगती परिमळ गोड, । सेजसुख वोसाड । कामहीनातें. ॥ ९५ ॥ जागृत क्षुधा जेथें वर्ते । कामु, निद्रा तेथें न वर्ते, । मन विवेकीं प्रवर्ते । इतुलयावरि. ॥ ५६ ॥ स्त्रीचा स्पर्शु न साहे, । धेरेया, वाइटा न पाहे, । गोडी गोडीची जाये । विरक्तासि, गा. ॥ ९७ ॥ तैं ग्राम्य, लोकरंजक । तितुलें तें वाटे दुःख, । उपहास, विनोद आणिक । खेटन कैंचें ? ॥ ९८ ॥ डंवु तो पडे, अर्जुना, । क्षणीं प्रतिक्षणीं उणा; । मत्सरु, कामु, कल्पना । मरोनियां गेलीं. ॥ ९९ जें जें दुष्टें असती । तें तें घाणा गळती, । मन पावे निश्चळ स्थिति । इतुलयावरि, गा; ॥ ४८६० ॥ मग निश्चळ ठातां मन, । अधिक स्थिरावे आसन, । ते ते प्राणधर्म क्षीण । होंचि लागती. ॥ ६१ ॥ प्राणधर्मु जंव आटे । तंव तंव क्षुधा तुटे, । आहारु तैसाचि निवटे । ध्यानस्थाचा. ॥ ६२ ॥ पुडती आहारें, अर्जुना, । तुटलेनि, तयां दुर्जनां । आंगांचा होये घाणा, । पिडोंचि लागती. ॥ ६३ ॥ एवं अभ्यासयोगयुक्ती । क्षुधेची जाली शांति, । मग अल्पमात्र, वीरपति, । योगी धाये. ॥ ६४ ॥ संपूर्ण आहारु न करी, । सार्वकाळ क्षुधा शरीरीं, । अतेव बोलिजे निराहारी । आतां तयातें. ॥ ६५ ॥

विषया विनिवर्तन्ते

विषय न वर्तती देहीं, । न वसे वसलाही गेहीं, । कां विजनीं एकाधे ठाईं । कपाटीं रिघे. ॥ ६६ ॥ काये करावीं तेथ धनें, । काये करावीं सदनें, । काये करावीं स्वजनें, । जनें अचाड. ॥ ६७ ॥ शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, । पाचही बाह्यार्थ सिद्ध । न वर्तती जया मद- । मत्सरादिकही. ॥ ६८ ॥ चलन, गमन, धावन, । निरोधन, स्पंदन, प्रसारण, । एवं चंचलपण । सर्व ठेलें. ॥ ६९ ॥ विषयशून्याचीं करणें । शिथिल जालीं, जाणें; । तैं ठेविलां ठायीं मनें । उगेंचि असावें. ॥ ४८७० ॥

अस्य

आइकें, अर्जुना, पुडती; । यया निश्चळचित्ताप्रति । पुडती दोनि असती । तें महाविघ्नें. ॥ ७१ ॥

रसवर्जम्

विषयद्वेषलक्षण । तें एक रसाचें वर्जन, । विक्षेपा केवळ कारण, ।

नाशक योगा. ॥ ७२ ॥ केवळ उपवास करीन, । केवळ जळ न स्पर्शेन, । रात्रिदिवसु बैसेन । एकासनीं. ॥ ७३ ॥ केवळ निद्रा न करीं, । केवळ रसना मारीं, । शुष्क पाळा आहारीं । पालाशाचा. ॥ ७४ ॥ मृदु न: घालीं आसन, । धरीन आगीं उष्ण, । वायो, मृत्तिका, जीवन । आदिकरूनि, ॥ ७५ ॥ श्वापदाचांही शब्दु । नाइकें, न करी अनुवादु, । करू पाहे छेदु । रसने, शिश्नाचा. ॥ ७६ ॥ उन्मेषें वायें आण, । मोडूं पाहे करचरण; । विषयद्वेषीं मन । ऐसें प्रवर्तलें. ॥ ७७ ॥ तयाचें देहचि पडैल, । योगाची सिद्धि न घडैल, । तमचि वाढि धरिल । म्हणौनि विघ्न हें. ॥ ७८ ॥

रसोऽपि.

आतां, अर्जुना, तयातें । दुजें विघ्न एक वर्ते; । तें मी सांगैन तूतें । भाविकासि. ॥ ७९ ॥ क्षुधा न करितां संपूर्ण । अन्नाचेंचि लागे ध्यान, । तेणें रात्रिदिवसु मन । अन्नीं गुफे. ॥ ४८८० ॥ त्यागु न करितां स्त्रीचा । लोटु साहिला कामाचा, । तो त्यागें तिचेनि मनाचा । घोंटु भरी. ॥ ८१ ॥ रात्रिदिवसु तेंचि ध्यान, । आठवे कामिनींचें वदन, । एकांतीं ठाय, तैं मन । तेथेंचि चरे. ॥ ८२ ॥ आश्रयूनि एकांता । आइके लोकांचिया वार्ता, । उपहास, खेलन, कथा । मनीं आठवी. ॥ ८३ ॥ नातरि बैसोनि एकांतीं । सुबद्ध कपाट दे, वीरपति, । निंदे, कां मन बाह्यार्थी । घालूनि बैसे. ॥ ८४ ॥ बाह्यविषयसन्यासें । आसक्ति, प्रीति मनीं बैसे; । मग सकळ भोग मानसें । लागे भोगूं. ॥ ८५ ॥ सदनें, स्वजनें आणि धनें, । वस्त्रें, अलंकार, भूषणें, । अखंड असतां वनीं मनें । स्मरता होये. ॥ ८६ ॥ विषयत्यागाचां अंतीं । यें दोनि, अर्जुना, उपजती; । केला योगु भ्रंशिती । पापरूपें. ॥ ८७ ॥ तूं म्हणसील, गुडाकेशा, । महाविघ्नें यें पुरुषा; । ययांचा विनाशु कैसा ? । तरि अवधान देईं. ॥ ८८ ॥

पर दृष्ट्वा.

कव्हणी एकादा गुरु भेटे, । तयाचा अनुग्रहो घटे, । पूर्ण परब्रह्म प्रकटे । आत्मत्वें तया. ॥ ८९ ॥ देहचतुष्टयविलक्षण, । अवस्थां चहूंचें कारण, । अभिमानचतुष्टयाधिष्ठान । आत्मस्वरूप. ॥ ४८९० ॥ प्रकृतिगुणव्यतिरेकें । स्वरूप उमजे ठाइकें, । तेणेंचि व्यापिलीं अनेकें । भूतें चराचरें. ॥ ९१ ॥ तेंचि तत्व निरंतर । माये अविवेकूनि पर; । अज, अव्यय, अक्षर, । निर्विकार जें. ॥ ९२ ॥ तद्दृष्टी प्रपंचु हारपला, । अभावो तोही गेला, । सच्चिदानंदु

प्रकटला । पूर्णबोधु. ॥ ९३ ॥ व्यतिरेकें पाहतां ऐसें । निःप्रपंच ब्रह्म असे; । आतां अन्वयदृष्टी परियसें । सांगिजैल तें. ॥ ९४ ॥ ब्रह्मीं सन्मात्रीं चिन्मयता । जेणें स्फुरे स्वानदरूपता, । ते प्रकृतिअभिन्नता । तेथें वर्ते. ॥ ९५ ॥ गुळेसीं गोडी अभिन्न, । स्वादेसीं एक जीवन, । वर्णु सांडूनि कांचन । वेगळें नव्हे. ॥ ९६ ॥ तैसा पुरुषु सन्मात्रु केवळु, । चित्प्रकृतीसीं अवेगळु, । शुद्ध तोचि शबळु । ऐसा जाला. ॥ ९७ ॥ तिचे गुण तिणेसीं । ते एक म्हणौनि तेणें पुरुषेंसीं; । आतां गुणकार्या गुणासीं । वेगळीक नसे. ॥ ९८ ॥ गुणकार्य जें केवळ। तें हें प्रपंचजातसकळ, ।ययालागीं निर्मूळ । द्वैत बोलणें. ॥ ९९ ॥ बीजाकडूनि पाहतां, । शाखा, मूळिका समस्ता । विपरीताही सर्वथा । न भेदतीचि. ॥ ४९०० ॥ ऐसें अन्वयें उपजलें, । जें सर्व ब्रह्म संपादलें, । मी आणि माझेपण गेलें । तेणें सकळ. ॥ १ ॥ व्यतिरेकें शुद्ध अधिष्ठान, । अन्वयें सर्व तेणेसीं अभिन्न; । ऐसें स्वानुभव ज्ञान । संपादलें असतां, ॥ २ ॥

निवर्तन्ते

तीं दोन्ही विनाशती; । प्रीति, द्वेषु, वीरपति, । न उपजे स्वरूपस्थिति । स्वयंनिष्ठातें. ॥ ३ ॥ काये भोगणें, काये त्यागणें, । काय करणें, न करणें, । जेथ आपुलेनि पूर्णपणें । आपण असिजे. ॥ ४ ॥ सहित इंद्रियांसीं मन । न वर्ते जेथ स्फुरण, । कां मद्रूपता नसे भिन्न । कांहींचि तें. ॥ ५ ॥ तेथें कवणां विषयांचा द्वेषु, । कवणाचा रागु म्हणिजे रसु! । भोगावयाचा अभिलाषु । तो आयींचिना. ॥ ६ ॥ यापरी निराहारता । विषय त्यजिले असतां, । इच्छा, द्वेषु मागुता । तो नुरे तत्वदर्शनें. ॥ ७ ॥ वस्तुसाक्षात्कारेंवीण । विषयत्यागाचें लक्षण, । साधकाप्रति विघ्न । होंचि लागे. ॥ ८ ॥ विषयद्वेष्टा तो विरक्त, । अद्वेष्टा विषयासक्त, । आता तत्वदर्शी अभ्यासवंतु । तो अनासिक्तचि. ॥ ९ ॥ थोडा ना बहू अवधारीं । युक्तचि आहारु करी; । द्वेषु ना प्रीति अंतरीं । विषयांची जया. ॥ ४९१० ॥ युक्तचि करी व्याहार, । शरीरधर्म समग्र, । जव तें मन स्वस्थिर। केवळ होये. ॥ ११ ॥ न करी निरोधु करणांतें, । देहा आणि प्राणातें, । न सोडी कर्मी मुक्तें । युक्तें नियमीं. ॥ १२ ॥ आनु येकु पक्षु कैसा । सांगिजैल जैसा तैसा, । येणें श्लोकार्थें ज्ञानदक्षां । भासतु असे. ॥ १३ ॥

देहिनो निराहारस्य

जयाचा देहीं युक्ताहारु, । कां उपवासपरु जो नरु, । तयाचा इंद्रियविकारु । मोडला असतां ॥ १४ ॥

रसवर्जं विषया विनिवर्तन्ते

कव्हणी विषय न वर्तती । इंद्रियां सामर्थ्य तें नाथी, । भोगाची नाहीं संप्राप्ति । स्थूळशरीरीं. ॥ १५ ॥

रसवर्जम्

एवं विषयक्रीडा नाहीं । परंतु मनीं प्रीति उरे कांहीं, । आवडी सर्वा विषयीं । भोगावयाची. ॥ १६ ॥ अगा! प्रीति वेगळी करून । भोग्य विषय येर आन । ते उपवासपरातें जाण । वर्ततीचिना. ॥ १७ ॥ आतां विषयसंगु तया नाहीं, । विषयक्रीडणभोगु तोही । विकळ इंद्रियांचां ठाईं । उपवासपरु जो. ॥ १८ ॥ मनीं प्रीति उरली तया, । विण विनाशें तीचिया, । मुक्तु नव्हे, हें बरवया- । परी जाणें. ॥ १९ ॥ आतां विषयत्याग निष्फळ । ऐसा आक्षेपु होईल, । तरि हरूं समूळ । वक्ष्यमाणें पदें. ॥ ४९२० ॥

अस्य रसोऽपि

यया उपवासपरा देहीं । विषयप्रीति उरली कांहीं, । विचारितां सर्वथा तेही । क्षणमात्रें ॥ २१ ॥

परं दृष्ट्वा निवर्तते

आत्मतत्त्वा परा । देखोनियां, वीरा! । नाशैल आणि समग्रा । वासना जळती. ॥ २२ ॥ प्रीति सद्गुरु जैं भेटे । तैं परमात्मज्ञानें फिटे, । म्हणौनि निराहारत्व गोमटें । एक म्हणती. ॥ २३ ॥ पुनरपि श्रोतयांप्रति । दासु करितुसे विनति, । श्लोकु वाखाणिला तुम्हांप्रति । यथामति हा. ॥ २४ ॥ साधनपक्षु कळावया । नातरि श्लोका यया- । माजी परमार्थु बरवया- । परी आर्थी. ॥ २५ ॥

देहिनः

देही जो देहाभिमानी । आत्मा सुटला प्रकृतिगुणीं; । जव्हीं मी देहो म्हणौनि । वर्ततु असे, ॥ २६ ॥ तव्हीं तो प्रकृतिअंतरंगु, । गुणसाक्षी, गुणीं असंगु, । इंद्रियां विषयांचा संयोगु । नेणे केव्हांही. ॥ २७ ॥

निराहारस्य

अंतःकरण श्रोत्रद्वारा । शद्बु जाणे बाहिरा, । आत्मा तयांचिया व्यापारा । साक्षीभूतु. ॥ २८ ॥ अंतःकरण व्यानवेगें । श्रोत्रीं शद्बु जाणे आंगें, । वाचेद्वारा लागे । वक्तव्य करूं. ॥ २९ ॥ मना समानें आवेशु, । तें त्वचेद्वारा भोगी स्पर्शु, । मृदु, कठिणु, शीतोष्णांशु । जाणों लागे. ॥ ४९३० ॥ पाणींद्रियें त्यागादान । करितें एकचि मन, । आत्मस्वरूप विलक्षण । येथ अभोक्तें. ॥ ३१ ॥ बुद्धि उदाना चढिवारें । नेत्रस्थानीं संचरे, । तत्द्वारा ते समग्रे । देखे रूपें. ॥ ३२ ॥ पादु करी गमागमन । तेंही बुद्धीचेंचि विंदाण, । आत्मस्वरूप भिन्न । तें बुद्धिसाक्षी. ॥ ३३ ॥ चित्त प्राणबळें उठे, । रसने वाटा बाह्य फुटे, । रसा ऐसें एक भेटे । तयातें भोग्य. ॥ ३४ ॥ रसनातृप्ति कामयोगें, । शिश्न रतिव्यापारीं रिघे, । तें चित्ताचेंचि अवघें । आथी कर्म. ॥ ३५ ॥ आत्मा तेथ निराळा, । चित्ता अंतरस्थु वेगळा, । रसआहारें लिंपला । नाहीं साक्षित्वें. ॥ ३६ ॥ अहंकारु अपानाश्रयें । घ्राणद्वारा गंधु लाहे, । विसर्गु करूं पाहे । पायूचेनि मार्गें. ॥ ३७ ॥ ऐसीं इंद्रियें स्वस्वार्थी । परस्परा सिद्धी वर्तती, । भोक्ता, भोग्य म्हणती । ऐथेंचि भोगणें. ॥ ३८ ॥ ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान, । कर्ता आणि कार्यकरण, । गुणांची त्रिपुटी, गुण । वर्तती गुणीं. ॥ ३९ ॥ त्रिपुटीतें आत्मा साक्षी, । विषयआहारु यांचा न भक्षी, । अतेव निराहारी, ऐसी । उक्ति जाणा. ॥ ४९४० ॥ आतां जागृती स्थूळभोगु, । पांचभौतिकीं देहीं चांगु, । रजोगुणोपसर्गु । विश्व आत्मा. ॥ ४१ ॥ यया प्रकृतीचिया रजोगुणा । आत्मा अंतरस्थु देखणा, । तो अभोक्ता गुणाभिमाना । सर्वदा साक्षी. ॥ ४२ ॥ लिंग, स्वप्न, तैजसु, । हा सत्वगुणाचा प्रकाशु, । आत्मा येथ उदासु, । विलक्षण साक्षी. ॥ ४३ ॥ कारणदेहसुषुप्त्यवस्था, । उभयाभिमानी प्राज्ञ वेत्ता, । आनंदु भोगु भोगिता । आत्मा म्हणवी. ॥ ४४ ॥ तो प्रकृतीचा तमोगुणु, । आत्मा साक्षी विलक्षणु, । येथिंचिया सुखा नेणू । सत्य दृष्टी. ॥ ४५ ॥ महाकारण तुरियावस्था । प्रत्यगात्मा एथ ज्ञाता, । तो आभासु भोगु भोगिता । आत्मा नव्हे. ॥ ४६ ॥ देहचतुष्टया विलक्षणु । अवस्थां चहूंतें जाणू, । परि अभिमानचतुष्टयापासूनु । वेगळाचि. ॥ ४७ ॥

स्थूळ, प्रविविक्तु आनंदाभासु। ययां भोगां जो उदासु, । जेथें रजसत्वतम-ह्रासु। शुद्ध सत्व पावे. ॥ ४८ ॥ मात्रात्रयेसीं अर्धमात्रा । प्रणवप्रपंचु हा खरा, । जया आत्मया निर्विकारा । कहीं नवटे. ॥ ४९ ॥ ऐसा सर्वी सर्वदा असंगु । आत्मा निराहारी चांगु, । गुणीं कार्याचा भोगु । गुणद्वारा उपजे. ॥ ४९९० ॥

विषया विनिवर्तन्ते

तया आत्मयाचां ठाईं । विषयभान न वर्ते कहीं, । प्रकटे त्रिपुटीचां वि-ळयीं । स्वरूप जयाचें, ॥ ९१ ॥

अस्य

तया आत्मया गुणातीता, । प्रकृतीचिया असंगता । गुणांचां ठाईं वर्ततां। कैसें होये ? ॥ ९२ ॥ प्रकृतीचेनि द्रष्टेपणें । आपणपयां भिन्न नेणे, । तंव त्रिपुटीचेनि सन्निधानें । वर्तत असतां, ॥ ९३ ॥

रसवर्जं रसोऽपि

मी भोक्ता येणें आकारें । गुणाचें भोक्तृत्व स्फुरे, । तें अधिष्ठितु अभ्यंतरें । स्वयं जाला. ॥ ९४ ॥ मग प्रतिकूळे अर्थी द्वेषु । करी अनुकूळीं अभिलाषु,। जंव तो ज्ञानलेशु । अज्ञानीं आच्छादला. ॥ ९५ ॥

परं दृष्ट्वा

मग कव्हणें एकें काळें । पूर्वाचरणाचेनि बळें । आत्मज्ञानें निर्मळें । सद्गुरु उपदेशीं. ॥ ९६ ॥ मग परमतत्वाचिया दृष्टी, । अवधारीं, गा किरीटी, । वेगळी जाणोनि त्रिपुटी । तेथें न सिरके. ॥ ९७ ॥ भोक्ता, भोग्य, भोगणें, । गुणांचें मिथ्यात्व जाणे । सत्यात्मरूपाचेनि स्फुरणें । सार्वकाळ. ॥ ॥ ९८ ॥

निवर्तते

न देखे सकळगुणभान । ज्ञाता, ज्ञेय, संवेदन, । साध्य, साधकु, साधन । निश्चयेंसीं. ॥ ९९ ॥ भोक्ता, भोग्य आणि भोगणें । गुणांचें साच नमने, । तो जैसा तैसा पूर्णपणें । स्वस्थु असतां. ॥४९६०॥ प्रतिकूळ अर्थ न द्वेषी, अनुकूळ कांहीं नाभिलाषी, । अन्वयें, व्यतिरेकें जयासि । तत्वचि स्फुरे; ॥ ६१ ॥ आणि भासलेंही पूर्वाध्यासें, । अनभ्यासें कां लीलाविशेषें । अनुकूळ,

प्रतिकूळ ऐसें । विपयजात, ॥ ६२ ॥ तऱ्ही तत्वात्मपरमदृष्टी । साक्षित्वें जाणे त्रिपुटी, । मिथ्याभान तें पोटीं । असताचि सामावे. ॥ ६३ ॥ जाणोनि मृगजळ पाहे । तो द्रष्टा तेथें न वाहे, । नावेक वायां जाये । पाहणेंचि तें. ॥ ६४ ॥ एवं अज्ञानता विपयभान । तें तत्वज्ञा स्वरूपें-करून । असतही नाथी स्फुरण । प्रपंचाचें. ॥ ६५ ॥ अनुभवे घेतां अर्थु । ऐसा दिसे परमार्थु, । तरि पूर्वी साधनपथु । कां सूचिला? ऐसें ॥ ६६ ॥ आक्षेपील कव्हणी एथ, । तरि सागेन मी निश्चित, । श्रोता यावें चित्त । दासु म्हणे. ॥ ६७ ॥ पुढिलां श्लोकीं निरोपण, । पाहता कृष्णवचन, । प्रकटितु असे साधन । गोपीनाथु. ॥ ६८ ॥ पूर्वापर अनुसंधानें । साधनचि बोलिलें कृष्णें, । तें हारद्र कवणें । जाणवें काये जाणावें? ॥ ६९ ॥ यथामति जें मानलें । तें श्लोकार्थें बोलिलें, । असो मागां सागितलें । अभ्यासलक्षण. ॥ ४१७० ॥ योगयुक्ती क्षीणता । आहाराची एका करितां । इंद्रियग्रामा समस्ता । जिंकिलें जाये. ॥ ७१ ॥ तेथें विपयरसवर्जन, । केवळ द्वेषपण, । तें एक करी विघ्न । आणिक दुजें. ॥७२॥ विपयरसाची गोडी । विपयत्यागीं उरे पुडी, । ते सचा आला मोडी । सकळ योगु. ॥ ७३ ॥ तयां दोहींचें निरसन । स्वरूपदृष्टी होये छेदन, । तें सद्गुरूवाचूनि ज्ञान । उपजेना देहीं. ॥ ७४ ॥ म्हणोनि ज्ञान आगळें । तें जैं गुरुमुखें कळे, । तैं योगु अभ्यासु फळे । योगियासि. ॥ ७५ ॥ आतां गुरुकृपेवांचून । आणि स्वरूपज्ञान नेणोन । योगु करिती, लक्षण । तयांचें कैसें? ॥ ७६ ॥

यततोह्यपि कौंतेय पुरुपस्य विपश्चितः।
इंद्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥ ६० ॥

हे कौंतेय

यये अर्थी श्रीरमणु । बोलता जाला नारायणु; । आइकें, कुंतीसुता, म्हणोनु । काये म्हणे? ॥ ७७ ॥

यततोऽपि पुरुपस्य

पूर्ण ईश्वराराधन । पूर्वी सत्कर्मानुष्ठान । नाहीं घडलें साधन । योगाचें जया, ॥ ७८ ॥ आणि तो श्रद्धावंतु निका, । प्रवर्तला सरिसा साधकां । गुरुप्रज्ञा जपासि कां । पूर्ण नसे, ॥ ७९ ॥ ऐसा प्रथमाधिकारी नरु ।

पात्रावया साक्षात्कारु । अभ्यासु करी विचारपरु । तेव्हेळीं कैसा ? ॥ ४९८० ॥ एकांती मांडी आसन । निरोधूनि कर्मकरण, । देहधारणा तेथून । यथोक्त संपादी. ॥ ८१ ॥ निवातीं दीपु जळे । तो रेखिला जैसा न चळे, । देह योगियाचें न डोले । अवक्र तैसें. ॥ ८२ ॥ मग ज्ञानेंद्रियातें आंवरी, । अंतरनिष्ठा मन धरी, । चित्तें समाहितें विचारी । आत्मस्वरूप. ॥ ८३ ॥

**विपश्चितो मनः**

तें तया पुरुषाचें मन । करी अनात्मभावाचें निरसन, । ज्ञानरूप स्थिरावोन । साक्षित्वीं बैसे. ॥ ८४ ॥ अल्प गुरुवाक्य असे । तरि तेंही मांडी अनायासें, । मग निर्विकल्पें मानसें । निष्ठा करी. ॥ ८५ ॥ नातरि नादानुसंधानीं । अथवा मूर्तीचां ध्यानीं । राहे एकाधा अवलंबनीं । ध्यानशीळु; ॥ ८६ ॥ तें तया ध्येयाच्या ठाईं । कांहीं स्थिरावलेंचि जंव नाहीं, । तंवचि, अर्जुना, जाणयीं, । वारं विघ्न पडे. ॥ ८७ ॥ आतां तें विघ्न कवण ? । कैसें ? हे आइकें खूण, । पूर्वाभ्यासेंवांचून । जे कीं प्रकटे. ॥ ८८ ॥

**इंद्रियाणि**

श्रोत्र, त्वक्, चक्षु, रसना, । घ्राण पांचवें, गा विचक्षणा, । यें ज्ञानेंद्रियें, अर्जुना, । बाह्यार्थविषयीं; ॥ ८९ ॥ वाचा, पाणि, पाद, शिश्न, । पांचवें तें पायु, जाण, । बोलिजे कर्मकरण । कार्यविषयीं; ॥ ४९९० ॥ व्यानु, समानु, उदानु, । प्राणु आणि अपानु, । हा पचविधु पवनु, । चेष्टाकरण देहीं. ॥ ९१ ॥ एवं प्राणसहितें इंद्रियें । तया योगियाचीं इयें । राजसें आणि प्रवृत्तिमयें; । पुनरपि कैसीं ? ॥ ९२ ॥ तमोगुणें स्पर्शिलीं । तीं कार्याकार्य विसरलीं, । हित चुकोनि लाभलीं । अहिता उजू. ॥ ९३ ॥ मग रजोगुणसंचारें । आंगीं भरलें वारें; । महाप्रवृतिअर्थाकारें । लागलीं भ्रमों. ॥ ९४ ॥ अर्थोन्मादें माजलीं, । करणीं शुद्धि सांडिली; । वरि प्राणपंचकें बळावलीं । नागवतीचि. ॥ ९५ ॥ पूर्वसंस्कारें थीटें । अनभ्यासता मोकाटें । आहारअयुक्तिपुष्टें । कैसीं ओंगवती ? ॥ ९६ ॥

**प्रमाथीनि**

विष, अमृत, कालवितीं; । निर्मळ हृदय डहुळितीं । योगमुद्रा भ्रंशितीं । प्रमथ

शीलें. ॥ ९७ ॥ पतितु, आणि बळवंतु । विशेषें जाला उन्मत्तु, । वरि ग्रहसंचारें पिशाचवत्तु । खवळता होये. ॥ ९८ ॥ तयातें काये सिकवावें ? । आंगवितांही नागवे; । तैसीं इंद्रियें ये सर्वें । मातलीं असतां, ॥ ९९ ॥ मन जें विवेकयुक्त । हों पाहे समाहित । अंतराकाशीं स्वस्थ । स्वार्थमात्र जें, ॥ १००० ॥

प्रसभं हरन्ति

तयातें घालिती मिठी । बळात्कारें, गा किरीटी; । मग सुटावयाची गोष्टि । कवणें करावी ? ॥ १ ॥ आपुल्या सेवकातें । हिरोनि नेतां, रायातें । आड न रिघवे सामर्थ्यातें, । ते येती वोळवीत. ॥ २ ॥ योगापासाव हरिलें, । देहाचिये पाळी उभें केलें, । दुष्टीं तेंही वेढाळिलें, । मन काय करी ? ॥ ३ ॥ तूं म्हणसील येथ, अर्जुना, । करणें अधीनें तया मना; । आणि मनाचें कां चालेना । स्वामित्व तेथें ? ॥ ४ ॥ मनावरि तें उठिती । स्वामित्व म्हणिजे काय करिती ? । बळात्कारें नेती । हिरोनियां. ॥ ५ ॥ तरि अवधारीं, गा अर्जुना, । प्रारब्धाचें बळ करणां; । संस्कारु वैरी जुना । तया योगाचा. ॥ ६ ॥ पूर्वी जें कर्में केलीं । तें मनादि इंद्रियां घडलीं; । तीं अर्थाकारें फळलीं । भोगावीचि कीं. ॥ ७ ॥ आणि मनें स्वार्थु धरिला, । योगा आरंभु केला, । तें देखोनि उठावला । करणसमूह हा. ॥ ८ ॥ प्रारब्ध जयातें कारण, । फळभोगार्थ आलीं जें, जाण, । तें इंद्रियांची राखोन । पाठि असती. ॥ ९ ॥ कामु, क्रोधु, रजोगुणु, । डंबु, प्रपंचु, अभिमानु, । द्रोहो, मत्सरु दारुणु, । दर्पु पापी, ॥ १०१० ॥ देह निजधर्मसहित, । प्राणवासनादि समस्त, । आशातृष्णाविषयजात । भोगेच्छक जें. ॥ ११ ॥ देव, मनुष्य, राक्षस, । वेद, शास्त्रें, परियस, । आड न रिघती संस्कारास । नको म्हणौनि. ॥ १२ ॥ मंत्र, यंत्रें, उपासना, । तीर्थें, दानें, अर्जुना, । तपें, सुकृतें, नाना । यज्ञादिकें ॥ १३ ॥ मनातें सोडवूं न शकती, । संस्काराचि उजू होती, । यांचें धावें म्हणती । येणें मनें. ॥ १४ ॥ अगा, जयाचें जो लागे । तो तया आपुलें मागे; । तया कवणु आड रिघे । धर्मवंतु ? ॥ १५ ॥ बळ तें नचले तेय, । देणें हें सर्वांचें मत, । याळागीं भोगणें उचित । अर्थजात पैं. ॥ १६ ॥ तें आतां नावडे मनातें, । जें भोगीना भोगु तयातें; । दे म्हणौनि वैरीतें । सांपडलें

तयां;' ॥ १७ ॥ आणि व्यवहारीं नीट नव्हे, । अतेव तया न चोलवे; । आणि बल काये करवे । बहुतांपुढें ? ॥ १८ ॥ ऐसें मन तेंही नेलें, । वोढूनि देहेसीं वांधलें, । नाना लोंढणें लाविलें । यया स्थूळाचें. ॥ १९ ॥ श्रोत्रु गगनीं भ्रमवी, । शब्दु भोगी, भोगवी, । आपुलें वेड लावी । तया सात्विका ॥ ५०२० ॥ आडवी धांवे वाचा, । ते करी छेदु तयाचा, । भरूनि चान्ही खांचा । वक्तव्य मागे. ॥ २१ ॥ नावेक ते जंव वारिली । तंव त्वचा वैरिणी पातली, । वाहाटुळीमाजी घाली । तया मनातें. ॥ २२ ॥ शीताचे हाणे तोमर, । उष्णाचे वाण खडतर, । मृदु, कठिण, सभार । वज्रघात तया. ॥ २३ ॥ वातें, पित्तें निर्बूजवी, । कफद्वंद्व भोगवी, । कुष्ठादि क्षय दाखवी । ऐसें म्हणौनि. ॥ २४ ॥ तेथें करद्वय पातलें, । मन म्हणे साह्यकारी आलें; । तंव तेणेंचि तया हालें । त्यागदानें. ॥ २५ ॥ चक्षु म्हणती, पामरा, । दे कां रूपसाक्षात्कारा; । माजी यया वैश्वानरा । घालीन तूतें. ॥ २६ ॥ पाद घेऊनियां पळती, । वाइटावरि ते टाकिती, । एकाहूनि वळावती । एकें करणें. ॥ २७ ॥ रसना धरूनि कबरीं । बुडवी जलसागरीं, । रोकडा रसु हातावरि । घालीं म्हणे. ॥ २८ ॥ शिश्नें धांव घेतली, । तें मनातें कुथितीं घाली, । रतिरहस्यें जाकळी । सकुमारातें. ॥ २९ ॥ घ्राणु उपटी धरणीसि, । गधु मागे तयासि, । बांधे वनस्पतिमात्रेसीं । विवेकी मन. ॥ ५०३० ॥ पायूचें येक कुडें । मळ सांडवी तोंडें, । जायें कवणीकडे । आतां तेणें ? ॥ ३१ ॥ प्राणें पेटविला जठरु, । म्हणे 'ययाचें भस्म करूं, । तृषेचां मुसुरीं पुरूं । यया मनातें.' ॥ ३२ ॥ अपानु पाडी तळीं, । व्यानु उडवी अंत्राळीं, । उदानु उंची घाली, । नेदी उतरों. ॥ ३३ ॥ समानु आंवरी, पसरी; । ऐसें आपुलालां व्यापारीं । प्राण मनाचे वैरी । लागले श्रमवूं. ॥ ३४ ॥ सगळेंचि निद्रा गिळी, । स्वप्नामाजी ते उगळी, । तें साहोनि मन आंकळी, । जागें होये. ॥ ३५ ॥ तंव जागृतिये करणें । तोडिती अर्थाकारणें, । ऐसें असतां शाहणें । काये करी ? ॥ ३६ ॥ कामु भ्रमवी चाडा, । क्रोधु जाळी धडधडा, । मदें, मत्सरें वेढा । दंबें केला. ॥ ३७ ॥ जयें चेंपिली मान, । दंभें फोडिले नयन, । अज्ञान, विपरीतज्ञान । आंगीं संचरलें. ॥ ३८ ॥

हि,

ऐसें मन करणीं हरिलें, । निश्चयें वाया गेलें, । यया विषया सुटलें तेंही मग. ॥ ३८ ॥ आपणचि साडी योगु, । अपेक्षी विषयभोगु. । प्रज्ञा बुडे, मार्गु । न कळे आत्मयाचा. ॥ ३९ ॥ तो नव्हे स्थितप्रज्ञ । यया- कारणें सावधानु, । स्थितप्रज्ञ म्हणिजे कवणु? । सांगैन मी. ॥ १०४० ॥

तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।
वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥

युक्त

तोचि तो योगी, अवधारीं, । ऐसें जालेंही असता परी, । योगाची साडी न करी । प्रेत्नशीळु ॥ ४१ ॥ अभ्यासाचेनि आटोपें, । विवेकेंचि तेथेंही तपे, । गुरुवाक्यमतु जपे । भूतावारि तया. ॥ ४२ ॥ अधिष्ठान तया नेटें, । द्रष्टेपणेंसींचि उठे, । फुटलाचि परि न फुटे । आपणाहूनि ॥ ४३ ॥ आवात साहे आगीं, । तें देहेंद्रियमननियोगीं, । परतु गुणयोगें सगी । प्रकृतीचा नव्हे. ॥ ४४ ॥ सकोचलेनि आहारें । आणि, अर्जुना, व्याहारें, । धारणावळें, आधारें । गुरुवाक्याचेया ॥ ४५ ॥

तानि सर्वाणि संयम्य

शमदमयोगयुक्ती । तें सकळें इद्रियें, वीरपति, । नियमिता होये अतर- स्थिति, । निष्ठावतु ॥ ४६ ॥ शब्देसीं श्रोत्रु तपे, । तैं अत करणींचा हारपे, । मग लपालेपणें तद्रूपें । बैसे उठूनि. ॥ ४७ ॥ त्रिपुटी आगीं जिरवी, । शिरे व्योमाचा पाल्वीं, । दावणें, नदवणें, नदवी । दिसोनिया. ॥ ४८ ॥ स्पर्शेसीं पारे त्वचा, । तैं मन विवर्तु आगाचा । सांडी, मग तेथींचा । द्रष्टा होये. ॥ ४९ ॥ मग सुटलेनि द्रष्टेपणें । त्रिपुटीचें छ्याव लेणें । लेइला, न लोटे पवनें । ऐसा उठी. ॥ १०५० ॥ रूपेसीं नयनु मोहोरे, । तैं हा बुद्धीमाजूनि शिरे, । जयाचां रूपीं विरे । सकार्ये बुद्धि. ॥ ५१ ॥ त्रिपुटीचा हातु न लोटी, । आणि, तिचेनि अभावें उठी, । तेज तेजें, किरीटी, । लागे जाव्लू. ॥ ५२ ॥ स्वादीं रसु आली रसना । तव रसनें चित्ता हा देखणा, । देखणेपण गाळी घाणा, । चाखे रसु. ॥ ५३ ॥ देखणेपणाची कुटी । जयाचेनि आगे तुटी, । मग सामावीतु त्रिपुटी । उमटों

त्यागे ॥ ५४ ॥ प्राणु गंधर्वेसीं पवाडे । तो अहंतेचा आड वीपडे, । तेथें असोनिही न सांपडे । योगवेत्ता. ॥ ५५ ॥ आपुलेपण जया आपुलें । सिंवेबाहेरि पडिलें । सत्याचिये तैं संचलें । सत्य कैसें ? ॥ ५६ ॥ त्रिपुटीमाथां तुरंबी, । नभसुमनमाळा नभीं, । जैसी तैसी बिंबीं । प्रतिबिंबकळा. ॥ ५७ ॥ वचनेसीं श्रमे वाचा, । कडु वसवी नभाचा । फाळूनि नेघे तैसियाचा । पक्षु कां जे, ॥ ५८ ॥ त्याग, दानें सुसडे । कर केले मनें वेडे, । पवना ऐसें जेणें उडे । महाभूत. ॥ ५९ ॥ पाद धांवती मोकाट, । ते भुललें आली वाट, । न देखवतीचि कष्ट । बुद्धीचे जयां. ॥ ५०६० ॥ शिश्न कामट मातलें, । चित्ताचि पुढें तें मेलें, । सत्यासारिखें एकलें । अप्रमित दळ. ॥ ६१ ॥ पायु विसरलें वादा. । अहकारें केली निंदा, । सत्यसारिखें विनोदा । नव्हे म्हणौनि. ॥ ६२ ॥ आहारु तये क्षुधेचा । तुटे. तैं ग्रासु निद्रेचा । करी आळसा, जडत्वाचा । रोगसहिता. ॥ ६३ ॥ सुषुप्ती जालें दहन, । जडत, आलस्या छेदन, । ध्यानप्रतिकूळा मरण । आलें असतां, ॥ ६४ ॥ शमु तो शशांकु उदैला, । दमु वहिरंगीं बळावला, । स्वयंप्रकाशु जाला । तिये दिनीं. ॥ ६५ ॥

मत्परः आसीत्

जालीं करणें धर्महीनें, । सांडिले विकार तेणें मनें, । बुद्धि गळाली बोधनें । ठाईंचे ठाईं. ॥ ६६ ॥ चित्तें सांडिलें अनुसंधान; । मीमाजी मेलें मी-तूंपण, । स्फुरणमात्र सुलीन । जालें असता, ॥ ६७ ॥ सहज निर्विकारता । स्वस्थ जें उरे आकाशवत, । परि आकाशवत्ता जेथ । पाप बोलिजे. ॥ ६८ ॥ गगनाहूनि जें अव्यक्त, । परि स्वप्रकाशें सदोदित, । सच्चिदैकरस निश्चित । पूर्णब्रह्म ॥ ६९ ॥ तें माझें स्वरूप निर्गुण । राहिजे स्वयें होऊन, । घटाभावें गगन । स्वस्थ जैसें. ॥ ५०७० ॥ सांडूनि पक्ष, अर्जुना, । रंभागर्भु मिळे गगना, । कां घटाचिया अभावना । जैसें जळ जळीं; ॥ ७१ ॥ ऐसें गुणविकारविनाशें । माझें स्वरूप जें असे, । तेंचि जो स्वयं जैसें तैसें । स्वस्थ म्हणौनि, ॥ ७२ ॥ निर्विकारा स्थिति जाणे, । मग तेथिंचिये अनुभवखुणे । आश्रयितु सांता करणें । वशें करी. ॥ ७३ ॥

वशे हि यस्येंद्रियाणि

मग जे जे वृत्ती उठावी । ते तेचि गळे अघवी, । निर्विकारता बरवी ।

पावला मग. ॥ ७४ ॥ सहजस्थिति, निर्विकारा, । कल्पना न उपजे, धीरा, । तैं मनत्व हारपे, येरां । करणां कें गति? ॥ ७५ ॥ चांचल्यधर्म-हीनु । नर्मीं जिराला पवनु, । तो पुडती उठावया तेथूनु । समर्थु नव्हे. ॥ ७६ ॥ भंगला तरंगु तुठी । जैसा जळीं, किरीटी, । तैसा मत्ता न साहे तुटी । योगी पुनः. ॥ ७७ ॥ नातरी मदाधारें । लयो, विक्षेपु मेरे; । गुणांचेनि संहारें । करणें संहारती. ॥ ७८ ॥ जे जे वृत्ति उठी गुणीं । ते साक्षित्वें भिन्न जाणोनि, । साक्षित्ववृत्ति निर्गुणीं । सामावीत असतां, ॥ ७९ ॥ जयाचीं इंद्रियें मेलीं, । नाना स्वरूपीं पांगुळलीं, । पुडती घांवों विसरलीं । सैरावैरा. ॥ ५०८० ॥ ऐसें निर्धारें, धनजया, । अव-धारीं, गा वीरराया, । देखसी वर्तमान जया । योगियाप्रति. ॥ ८१ ॥

तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता

तोचि स्थितप्रज्ञ सहजें, । जयाची प्रज्ञा देखिजे । ब्रह्मभूत, वारें दुजें । विसरला जो. ॥ ८२ ॥ लयो अस्तमाना गेला, । विक्षेपु तो हारपला, । लक्ष्याचा ठावो पुसला । लक्षणेनसीं. ॥ ८३ ॥ समाधीचेंही स्फुरण । स-माधी जालें लीन, । स्वरूपीं सामावलें ज्ञान । अज्ञानेसीं. ॥ ८४ ॥ तयाचीं करणें कुठलीं, । मनाची गति पांगुळली, । बुद्धि ब्रह्मीं सामावली, । तोचि स्थितप्रज्ञ. ॥ ८५ ॥

ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते ।
संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥

पुंसः

आतां जो कव्हणी पुरुषु । करितां योगाभ्यासु । न विसरे पूर्वाध्यासु, । तयाचें कैसें? ॥ ८६ ॥ गुरुवाक्य नाथीं पूर्ण, । वैराग्यबळ क्षीण, । वारें इतुल्या आसन । घालुनि बैसे. ॥ ८७ ॥ इंद्रियांपासूनि सोडवी, । अव-लंबीं मन लावी, । नेटक दिसे बाह्यभावीं । माणुसांतें. ॥ ८८ ॥ निवर, कोठडी, भुयेर । वसवी कपाट कां तळघर; । सुबद्ध लावी द्वार । प्रज्ञामंदु. ॥ ८९ ॥ कर्मेंद्रियातें दमूनि । ज्ञानेंद्रियांतें आवरूनि । मन समाहित ध्यानीं । करूनि ठावे. ॥ ५०९० ॥ तेथें पूर्वसंस्कारबळिकटें । इंद्रियें नांकळती धीटें, । कां रजतमाचेनि बाहावटें । लोटे मन. ॥ ९१ ॥

विषयान् ध्यायतः

मग तें लोपे अनुसंधान, । उठी विषयांचें स्फुरण, । लागला करूं ध्यान । तेंचि तेन्हेळीं. ॥ ९२ ॥ आठवे वळवटाची क्षिप्रा, । वरि घृत आणि शर्करा, । शाल्योदना अति शुभ्रा । आठवूं लागे. ॥ ९३ ॥ कथिका तिक्त, वासागळी, । शाखांचिया प्रभावळी, । वटक, पर्पटक, पडवळीं, । क्षीरपर्के. ॥ ९४ ॥ कटुक, तिक्त, आम्ल रस, । गौल्य, मधुर विशेष । आठवी भक्ष्यांचे बहुवस । अपूपादिक ॥ ९५ ॥ लेह्य, पेय, चोष्य जाण, । खाद्य, भक्ष्य, दध्योदन, । तक्रादि शीतळ जीवन । आठवतें होये. ॥ ९६ ॥ मग रसविषयाचिपाठीं । आठवे चांपेगोरटी, । पोडषवरुषी, सुष्टी । माजु सामावे; ॥ ९७ ॥ सौभाग्यवती, सुशीला । नेसली आर्धा सोनेसळा । ललाटीं मळिवटु शोभला । कुंकुमाचा; ॥ ९८ ॥ दतपंक्तींची झळाळ । वरि सुरंग रंगलें तांबोळ, । चिरीव नयन विशाळ, । रेखा काजळाची; ॥ ९९ ॥ चंद्र लोपले वदनीं । तानवडें, भंवरिया श्रवणीं, । नासापुटीं सुपाणी । मोतीं झळके. ॥ ५१०० ॥ सुरंग रगलें अधरोष्ठ, । हनुवटी पाहतां नागर, । हास्यवदना, सुकुमार, । ध्यानीं प्रकटे. ॥ १ ॥ कबरीभार पृष्टी, । सुमन खोपां वीरगुंठी, । चंदन चर्चिलें कठीं । पातळ जिया; ॥ २ ॥ कुचस्थानीं सुकुमारता, । विश्रांति जेथें मन्मथा, । कचुकी अनुपम्य पाहतां, । पांगुळे मन. ॥ ३ ॥ भुजादंड सरळ, । करतळ पुष्ट सकोमळ, । शब्द होती केवळ । कंकणांचे; ॥ ४ ॥ उदरमुसे योतला, । मदनु रूपा आला, । कटिप्रदेशीं रिघाला । परतेचिना. ॥ ५ ॥ कदलीगर्भाची मृदुता, । जानुद्वयातें सुकुमारता, । चंपकपुष्पाची बरवता । काये तेथें? ॥ ६ ॥ गुल्फद्वय मनोरम, । पोटरिया ध्याती सकाम, । पादद्वय अतिसम, । सारिखेंचि; ॥ ७ ॥ आरक्तें तीं पादतलें, । जेथ शंकलीं रातोत्पलें, । कामातुरें अलिकुळें । रूंजी करिती. ॥ ८ ॥ ऐसें तया योगविदा । स्त्रीध्यान घडे विशुद्धा, । तदंगेंचि विविधा । भोगां आठवी. ॥ ९ ॥ नानावस्त्रें पट्टकूळें, । नाना आभरणें केवळें, । नाना अलंकार स्थूळें । भोगिती जे. ॥ ५११० ॥ सुगंधें सुमनें बहुविधें, । परिमळ द्रव्यें, शुद्धें, । मग मंदिरें तत्संबंधें । लागलीं स्मरों. ॥ ११ ॥ उपरिया आणि धवलारें, । सप्तखणिकें दामोदरें, । क्रीडावनें परिकरें, । तेथें मंचक; ॥ १२ ॥ सेजे विखुरलीं सुमनें, । पुढें सुरसें गायनें, । नृत्यें, विनोद, रंजवनें ।

आनेंही नाना; ॥ १३ ॥ रसनाकामु आधीं उठे, । मग दाराकामु प्रगटे, । तेथें सकळ अवयें एकवटे । विषयजात. ॥ १४ ॥ यापरी तया ध्यानस्था । अविवेकता, अवैराग्यता, । आहाराची असंकोचता, । विषय उठती. ॥ १५ ॥

तेषु संग उपजायते

करितां तयांचें ध्यान । संगु उपजे, ऐसें जाण, । तया संगाचें लक्षण । सांगिजैल. ॥ १६ ॥ विषयीं तये कल्पितीं । अत्यंत उपजे प्रीति; । मन वरपडे आसक्ती । तें सुटोचिना. ॥ १७ ॥ विचारें करी सांडणी, । तंव क्षणा एका मागुतेनि, । तेचि विषय मनीं । लागती दिसों. ॥ १८ ॥ वैराग्य आणी बळात्कारें, । तें निमिषार्धमात्रेंचि विसरे, । तैं निजाचें हैंचि उरे । विषयध्यान. ॥ १९ ॥ सोडितां न सुटे स्वभावें, । नाठवितां तेंचि आठवे, । आपणांसीं वेगळें न करवे. । या नांव संगु. ॥ ९१२० ॥ पयीं मिळाला तक्रांशु । न निवडे पुढती तो लेशु, । अवघाचि पालटी गोडांशु, । करी आपणा ऐसें; ॥ २१ ॥ तैसा आठवूचि, पार्था, पुरे, । विषयांचा मनीं संचरे, । मग मनचि होऊनि पसरे, । नाशी ध्यान. ॥ २२ ॥ तळमळ सुटली मनीं, । नयनातें आलें पाणी, । हा! हा! कर्मा! म्हणौनि । ललाट पिटी. ॥ २३ ॥ लाधितांचि पुरे पातें, । तंव तें आधींचि मनीं होतें, । धरी तैं जीवा मागुतें । नेट्री सुटों. ॥ २४ ॥ खुरडे, मुरडे, माझु मोडी, । उबगोनि ध्यान सांडी, । तंव निदेलाही आवडी । तेथेंचि निदे. ॥ २५ ॥ तेंचि स्वप्नीं, मनोरथीं, । विषयध्यान जागृती, । मन गुंपलें आसक्ती, । उगवेचिना. ॥ २६ ॥

संगात्

ऐसा विषयसंगु, पार्था, । पुरुपातें जाला असतां, । ययापासूनि मागुता । कवणु विकार ? ॥ २७ ॥

कामः संजायते

मग असो म्हणौनि सांडी, । योगाची नवटे गोडी, । विषय अपेक्षी आवडी, । तेव्हेळीं कैसा ? ॥ २८ ॥ गुफेबाहेरि निघाला, । जन म्हणती "देवो आला; । परम योगी देखिला, । पुनीत जालों." ॥ २९ ॥ तंव तो पाहे आमंत्रण, । कोठें मिळेल गोड अन्न ? । कवण करिती पूजन ।

षोडशोपचारीं ? ॥ ९१३० ॥ कवण हिरण्य समर्पिती ? । कवण सर्वस्व देती ? । कन्या एकाधीं समर्पिती । काये पां, हे ? ॥ ३१ ॥ करिती पुनः पुनः नमस्कार, । दिसती जन भक्तिपर, । कोठेंसें आहे घर । यथाचें पां ? ॥ ३२ ॥ साकल्यें स्तुति करिती, । आतां हेचि इच्छा पुरविती. । तंव ते कांहीं न बोलती । भोजनाचें. ॥ ३३ ॥ मग उपायें उत्तर बोले, । "अहो, आम्हीं महानुभावां पूजिलें, । तरि येसणें हें प्राप्त जालें. । ईश्वरपद. ॥ ३४ ॥ महानुभव तृप्त होती । मग जो आशीर्वादु देती, । तो तत्काळ फळे, पुढती । नाशेचिना. ॥ ३५ ॥ हातीं घालितां जीवन । तें होये सागरा समान, । वारि कीजे भिक्षादान । तें मेरूसीं तुके. ॥ ३६ ॥ यति संतुष्टु जाला । तो हरि स्वयें संतोषला, । चराचरसमूहु धाला । भूतांचा तेणें. ॥ ३७ ॥ देव, ऋषि आणि पितर । तृप्त जाले समग्र, । यज्ञदानादि अपर । तीर्थयात्रा. ॥ ३८ ॥ समीप असोनिहीं न कळे, । लोक जाले" म्हणे "आंधळे." । पुढतोंपुढतीं डोले, । डोळे लावी. ॥ ३९ ॥

कामात्

ऐसा अन्नकामें उठिला, । जनां उपदेशूं लागला, । वाडवेळु श्रमला, । नाइकती ते. ॥ ९१४० ॥ मग ते अवघेचि उठती, । निरोप जावया मागती, । मग तया, सुभद्रापति, । कैसें घडे ? ॥ ४१ ॥

क्रोधोऽभिजायते

क्रोधें कांपे थरथरां, । नयन भ्रमवी गरगरां, । शापोन्मुखु उत्तरां । बोलों लागे. ॥ ४२ ॥ "जळो हें तुमचें ज्ञान । आमुतें नघला अन्न, । वाजो एकाधें विघ्न । तुमचां घरीं. ॥ ४३ ॥ मायिक तुमचें स्तवन, । मायिक अभिवंदन, । तुमचां घरीं खान । पडतें कां, देवा ? ॥ ४४ ॥ पडता कां ग्रासु वोसु ? । मरता कां जनु वहुवसु ? । न संभवे एकुहीं ग्रासु । अतीतातें." ॥ ४५ ॥ तंव हांसे जनु वहिर्मुखु. । म्हणे, "तुमचा तंव योगु मायिकु, । ऐसा तमोगुणु नाशकु । तुमचां देहीं." ॥ ४६ ॥ इतुलेनि निमित्यमात्रें । क्रोधु माजला नसंवरे; । मग सिविया, अवाच्यें उत्तरें । लागला जल्पों. ॥ ४७ ॥ त्यांमाजी एकाधा नमस्कारी. । म्हणे, "स्वामी, यावें घरवरि." । तितुलेनि क्रोधु

शरीरीं । तो पळोनि गेला. ॥ ४८ ॥ मग म्हणे, "तुम्ही धन्य। । तुम्हां उदंड धन, धान्य । होईल; ऐसें पुण्य । कवणा घडे हें ?" ॥ ४९ ॥ ऐसा स्तुतिमुखु चाले, । गृह समीप पातलें, । समस्तीं नमस्कार केले, । संतु म्हणौनि. ॥ ५१५० ॥ षोडशोपचारीं पूजिला । सांता संतुष्ट जाला, । तैंचा दिनु राहिला । तेथेंचि तो. ॥ ५१ ॥ रात्रीं केलें पूजन, । मृदु सेज आस्तीर्ण, । तयावरि केलें शयन, । तंव कामु चेतवे. ॥ ५२ ॥ कामातुरा पुरुषातें । सुखही दुःख वर्ते, । अभिलाषी देखे तें तें, । नेदितां रागु करी ॥ ५३ ॥ म्हणे, "कासया पूजा केली ? । कन्या समर्पिता कां आपुली ?" । मग हळूचि आरंभिली । उपायबुद्धि. ॥ ५४ ॥ "अहो ! तुम्ही भाविक, धर्मशीळ, । सांगेन तें आइका समूळ, । कन्यादानीं महाफळ । जरि योगियां दीजे. ॥ ५५ ॥ योगियां देहसंबंधी । नरक नेणती ते कधीं, । सकळ सुखाची समृद्धि । राज्य जोडे. ॥ ५६ ॥ आणि योगियां नाथी मरण, । अष्टमा सिद्धींची वोळगण, । हें आपुलेनि मुखें आपण । काये सांगावें ?" ॥ ५७ ॥ गृहस्थु म्हणे, " देईन. " । तंव येरु म्हणे "वा! आण; । वाग्निश्चया पान । चुन्याचें घाली. ॥ ५८ ॥ तुमतें वेंचु न पडावा, । गंधर्वविवाहो करावा, । मुहूर्तयोगु बरवा । एथवांचि असे " ॥ ५९ ॥ तंव ते उठिली गृहिणी, । " नमनें मातें " म्हणौनि, । क्रोधु उपजला तितुलेनि । काय म्हणे. ॥ ५१६० ॥ " संकल्पिलें देतां दान । जिया तुवां केलें विघ्न, । ते तूं विधवा होई, " म्हणौन । बोलता जाला ॥ ६१ ॥ गृहस्थु म्हणे, " रे तामसा, । तूतें योगु काइसा ? " । इतुलेनि क्रोधाची दशा । पूर्ण बाणली. ॥ ६२ ॥ ऐसा भलयतें अभिलाषी । भलयतयाचि जो पासीं; । नेदितां ये रागासि । अविचारें तो ॥ ६३ ॥ ऐसा कामु कहीं न पुरे, । आंगींचा क्रोधु न सरे, । वाळों लागलीं गात्रें । तामसाचीं. ॥ ६४ ॥ नासापुट फुरफुरी, । नयन भ्रमवी, पसरी, । जें देखे तयावरि । उठूनि धांवे. ॥ ६५ ॥ वोष्ट सुजले चावितां, । उखळलीं मणगटें चोळितां, । दांत झिजले रातां । तामसाचे. ॥ ६६ ॥ नावडे कवणाचा नमस्कार, । । जना कव्हणाचा सेजार, । करी तोही व्यापार । हात नेदी. ॥ ६७ ॥

क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥

क्रोधात्

ऐसा क्रोधी जो, वीरा, । तो काय पावे क्रोधद्वारा? । योगमतीचा मातेरा । जाला म्हणौनि. ॥ ६८ ॥

संमोहो भवति

शाहणेपण हारपलें, । जाणणे पळौनि गेलें, । अज्ञान आंगीं संचरलें, । काये करी? ॥ ६९ ॥ आपणु आपणा भुलला, । हिताहितीं अज्ञु जाला, । कर्तव्याकर्तव्य चुकला, । मत्ययतें करी. ॥ ७० ॥ काय कवणेंसीं बोलावें ? । कवणा कैसें पाहवें ? । हें क्रोधाचेनि प्रभावें । उमजेचिना. ॥ ७१ ॥ देवातेंचि दे गाळिया. । म्हणे, "कां नेदी खावया?"। जेणें संसारीं घातलें, तया । "थू!" ऐसें म्हणे. ॥ ७२ ॥ आपुली जननी दे जनां, । आपुलेया पितया, नाना । शिविया गुरूतें, अर्जुना, । देतो क्रोधी. ॥ ७३ ॥ आपुल्याही प्राणावरि । उठे येकादे अवसरीं, । ऐसेनि अज्ञानें भारी । व्यापला सांता. ॥ ७४ ॥

संमोहात्

मग पासाव तया अज्ञाना । अविवेकवृत्तिलक्षणा । काये पावे, अर्जुना? । तेंचि अवधारीं. ॥ ७५ ॥

स्मृतिविभ्रमः

जन्मूनि होतें अभ्यासिलें । तें शास्त्रज्ञान भ्रंशलें, । आंधळें मार्गु चूकलें । जयापरी. ॥ ७६ ॥ गुरुवाक्य गेलें हृदयींचें, । श्रवणजनित ज्ञान कैंचें? । कांहींचि नाठवे पूर्वीचें । अभ्यासिलें जें. ॥ ७७ ॥

स्मृतिभ्रंशात्

तया स्मृतिभ्रंशापासून । काय होय मागुतेन ? । अर्जुना, करीं श्रवण, । सांगिजैल. ॥ ७८ ॥

बुद्धिभ्रंशः

व्यवसायात्मिके बुद्धी । लोपु होये, गा, त्रिशुद्धि, । अंधकार पडे, समाधि- । लोपु होये. ॥ ७९ ॥

बुद्धिनाशात्

स्वस्वरूपाचें ज्ञान । अनुभवसिद्ध, सुप्रसन्न । लोपलें असता, मागुतेन । कैसें तेणें? ॥ ५१८० ॥

प्रणश्यति

मग तो आपणुचि नाशला, । बहुत काळ वाया गेला, । पुढती गुणु पहिला । नलगेचि तो. ॥ ८१ ॥ जेणें गुणें जें जें करी । तें तें भोगी संसारीं, । तये तये शरीरीं । तोचि गुणु दृढावे. ॥ ८२ ॥ तामसाचा तामसु, । राजसाचा होये राजसु, । मनुष्य अथवा पशु, । श्वापद हो. ॥ ८३ ॥ प्रथम वेगें उसळला । तो जाऊनि नरकीं पडिला, । तें कर्म भोगूनि पावला । अपरा योनी ॥ ८४ ॥ भोगूनि योनी समस्ता । नरदेह होये पावता, । तेथें तोचि गुणु, मागुता । यथापूर्व. ॥ ८५ ॥ तोचि गुणु, तेंचि शरीर, । तेचि भोग अपार, । पुढतोपुढती साचार, । तें तेंचि पावे. ॥ ८६ ॥ ऐसा चुकला तो बुडाला, । पुढती नाहीं पदा आला, । येणें अभिप्रायें नाशला, । हेंचि साचार. ॥ ८७ ॥ वमनें पय लिप्त जालें । तें पात्रेंसीं वाया गेलें, । मळकर्दमीं पडिलें । पान जेसें. ॥ ८८ ॥

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।
आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥

विधेयात्मा

अवधारीं, गा, वीरोत्तमा, । आता कसा विधेयात्मा? । जो पावोनि स्वरूपोपरमा । न परतेचि. ॥ ८९ ॥ प्राकृतगुणनिरसनें । स्वरूप जाणितलें जेणें, । न परतेचि तेथूनि जाणणें, । पांगुळलें मन. ॥ ५१९० ॥ अभ्यासयोगाचिया युक्ती । लयविक्षेपा केली शांति, । सर्वकाळ स्वस्थिति । निर्विकल्प जयाची, ॥ ९१ ॥ निर्विकल्पें निष्ठेतें । पावोनि पावला स्थितीतें, । तो व्यवहारीं कैसा वर्ते? । तेंचि अवधारीं. ॥ ९२ ॥

आत्मवश्यैरिंद्रियैः

निर्विकल्प स्थितीं असतां । मनादि इंद्रिया तदाकारता, । तेचि उन्मनी अवस्था । बोलिजे गुणसाम्य. ॥ ९३ ॥ जेंवि बीजदशेतें आलें । तें झाड बीजीं संचरलें, । मागुतें यथापूर्व देखिलें । देखतीं जनीं. ॥ ९४ ॥

जन्म जाले लक्षकोटि, । मग संसाराचां सेवटीं । ब्रह्मज्ञानाची गोष्टी । आवडे जीवा. ॥ ९५ ॥ नित्य करितां तो अनुवादु । तेथेंचि प्रीति होये वेधु, । मग कव्हणां योगी, साधु । प्रसंगें भेटे. ॥ ९६ ॥ तोचि तत्व उपदेशी, । कारणेसीं भेटी कार्यासीं । करी; तेथ भेदासीं । उरे स्थान. ॥ ९७ ॥ निर्विकल्प समाधान, । तेथें चिन्मात्र स्वस्फुरण, । तेंचि गुणसाम्य जाण । विचारें तूं ॥ ९८ ॥ जन्मासेवटील बीजदशा । अविद्यामया पुरुषा, । चैतन्यकणु. वीरेशा, । जाणावा तो. ॥ ९९ ॥ तया चैतन्याचां पोटीं । अवघा अविद्यावृक्षु, किरीटी, । बीजदशा; हे गोष्टी । घडे कैसी ?॥ ५२०० ॥ सकळा गुणाची साम्यता, । चैतन्याकारें येकरूपता । गुणसाम्य ऐसें, पार्था, । म्हणौनि तें. ॥ १ ॥ सत्व, रज, तम, शुद्धसत्व, । ययां गुणांचें जेथ गूढत्व, । चहू अवस्थांचें येकत्व । उन्मनी ते. ॥ २ ॥ देहचतुष्टय समरसें । तें ज्ञानमात्रत्वें तत्वीं असे; । प्रपंचु व्यक्तु नमसे, । पारें असे कारणाकारें. ॥ ३ ॥ एवं सकार्य सकळ गुण । ययांचें तेथेंचि संक्रमण; । आतां निर्विकल्प सज्ञान, । तें पां कैसें ? ॥ ४ ॥

सत्य ज्ञानमनंतं ब्रह्म । ब्रह्म प्रतिष्ठा । प्रज्ञानं ब्रह्म । विज्ञानं ब्रह्म ।

इत्यादिकें वेदवचनें । बोलती अनुभवलक्षणें: । जे ब्रह्म आणि जाणणें । वेगळें नव्हे. ॥ ५ ॥ सद्रूप-ब्रह्म-परिपूर्ण । तेंचि चैतन्यानंदलक्षण, । कांति आणि स्वर्ण । येक जैसें. ॥ ६ ॥ गूळु आणि तयाची गोडी । वेगळी कवणु निवडी ? । रत्न, रत्नाची फुडी । प्रभा जैसी; ॥ ७ ॥ तैसा प्राकृत गुण समरसु । बीजरूपु, चैतन्यविशेषु, । तो ब्रह्मचि चैतन्यांशु, । हें जें खरें, ॥ ८ ॥ तरि गुणसाम्यदशे । गुणेसीं प्रकृति ब्रह्मचि असे, । यया बोला अनारिसें । न घडे सर्वथा. ॥ ९ ॥ साम्यावस्थेची प्रकृति । ब्रह्मरूप तिची स्थिति; । तेचि स्फुरणाकारें व्यक्ति । पावे जें, गा, ॥ ५२१० ॥ तें अब्रह्म कैसी होईल ? । म्हणौनि स्वस्फुरण सकळ । ब्रह्मचि सत्य, निराकुळ । सर्वथा घडे. ॥ ११ ॥ ब्रह्मरूप ब्रह्मस्फुरण, । तें स्फुरणाचेचि होती गुण. । गुणां ब्रह्मा येकपण । करावेंचि नलगे. ॥ १२ ॥ गुणचि जें प्रपंचाकारें, । तें प्रपंचु ब्रह्म, हेंचि खरें; । कारणीं नाथी दुसरें । म्हणौनियां. ॥ १३ ॥ चान्ही देहे, चान्ही अवस्था, । चतुर्विधु अभिमानी भोक्ता, । ययावेगळा

सर्वथा । नसे प्रपंचु. ॥ १४ ॥ आत्मान्वयें विचारितां, । निर्विकल्प जें ब्रह्म, पार्था, । तेंचि विश्वाकारें; आतां । भेदु मिथ्या. ॥ १५ ॥ ऐसें सत्य सिद्ध साचोकारें । म्हणौनि अवधारीं, वा रे, । निर्विकल्पींही संस्फुरे । लयो, विक्षेपु. ॥ १६ ॥ तो लय, विक्षेपु नमनावा, । ब्रह्मरूपचि मानावा. । पार्था, ऐसिया अनुभवा । जाणे, तो जाणे. ॥ १७ ॥ तोचि तो विधेयात्मा, । आतां उपजलिया गुणधर्मा, । ब्रह्म जाणोनि, स्वधर्मा । सांडूं न म्हणे. ॥ १८ ॥ जे जे वृत्ति उठी । ते ते पाहतां मूळदृष्टी । आत्माचि तो, किरीटी, । स्फुरे तेणें रूपें. ॥ १९ ॥ वृत्ति तेचि करणगण, । सकळ आत्माचि ऐसी खूण; । जयाचां हृदयीं संपूर्ण । बैसली असे. ॥ ५२२० ॥ आत्माकारें मानसें । करणसमूह ब्रह्मचि असे, । जाणितलें निश्चित ऐसें । योगानुवृत्या. ॥ २१ ॥ तूं बोलसीऽ वचन, । सर्व ब्रह्म सनातन, । कार्य आणि कारण । तेंचि सर्व. ॥ २२ ॥ तदाकारें जाणोनि करणें, । भलयतें कर्म कां न करणें? । कवण कार्य? केलें कवणें? । ब्रह्म सर्व. ॥ २३ ॥ तरि अवधारीं, वीरेशा, । हा शब्दु नव्हे अनारिसा; । परंतु निष्ठावंतु हे दशा । आणूं न शके. ॥ २४ ॥ नाहीं स्वरूपविस्मरण, । वरि सर्वत्राभेददर्शन, । तैं अवघें भान निर्गुण । ऐसेंचि स्फुरावें. ॥ २५ ॥ आतां सर्वत्राभेददर्शन । तेंचि क्रियाप्रवृत्तिनिवर्तन, । काय, कैसें, कां, कर्माचरण । करूं? म्हणे. ॥ २६ ॥ भलयता व्यापारु करणें । हें जैं घेतलें मनें, । तैं तो नरु स्वरूपाज्ञानें । घेतला जाणावा. ॥ २७ ॥ मरोनि जाला ऐसा । भासे, परी मरणदशा । सत्य जया पुरुषा, । तो हें न करी. ॥ २८ ॥ तें पाखांडियां मूर्खांचें । मत; नव्हे ययाचें. । आतां व्यवहारणें युक्ताचें । तेंचि कैसें? ॥ २९ ॥ आत्माकारें जाणितलीं, । आत्मनिष्ठेया प्रेरिलीं, । म्हणौनि कैसीं आथिलीं । करणें तीं, पां? ॥ ५२३० ॥

रागद्वेषवियुक्तैः

अनुकूळें प्रीति विषयीं, । द्वेषु प्रतिकूळांचां ठाईं, । यया स्वभावा दोहीं । नलगतीं जीं, ॥ ३१ ॥ अमुकेंचि येक करावें, । अमुकें तें न करावें, । अमुकें येक घ्यावें, । नेघावें येर, ॥ ३२ ॥ अमुकाचि भोगावा अर्थु, । अमुका नावडे पदार्थु, । इत्यादि स्वभावो समस्तु । तो नाथीं जयां, ॥ ३३ ॥ प्रियाप्रिय हे भावना । विसरला मनें कल्पना, । रागद्वेषादि अवगुणां । न

मिळतीं; ऐसीं ॥ ३४ ॥ मनादि इंद्रियें सकळें । निर्मळें, निर्विकारें, निश्चळें, । येहींकरूनि चळे । योगिराजु तो. ॥ ३५ ॥ रागद्वेपादिभावरहितीं, । आणि आत्माकाराकृतीं । इंद्रियगुणीं, वीरपति, । तो काय करी? ॥ ३६ ॥

विपयांश्चरन्

अध्यासें विचरे देहीं, । कां विहिता कर्माचां ठायीं, । आत्मान्वयें अवघेही । विपय भोगी. ॥ ३७ ॥ शब्दाचें अनुसंधान । विहितेंचि करी श्रवण, । परि तदाकारत्वें अधिष्ठान । तेंचि वोळखे. ॥ ३८ ॥ रूपावरि जाये देखणें । परि विहितेंचि घेणें, देणें, । त्रिपुटी तेथींची जाणे । आत्माचि ब्रह्म. ॥ ३९ ॥ आडळा जाणे सर्वांगें, । परंतु विहिताचेनिचि मार्गें; । तथापि स्पर्शादिक अवघें । अनुभवी ब्रह्मत्वें. ॥ ५२४० ॥ पडूस येती प्रतीती । अंतर न पडतां विहितीं, । अवघी त्रिपुटीची पंक्ति । जाणे ब्रह्म आत्मा. ॥ ४१ ॥ परिमल जाणे समग्र, । विहितेंचि भोगी सार, । आत्मान्वयें तें अक्षर- । ब्रह्मचि पाहे. ॥ ४२ ॥ वाचेनें वक्तव्य करी, । विकर्म नव्हे जियापरी, । मग आत्मान्वयें अंतरीं । मानी ब्रह्म. ॥ ४३ ॥ करांचें घेणें, देणें, । करूं ये तेंचि करणें, । तें सर्व अधिष्टानज्ञानें । ब्रह्म वोळखे. ॥ ४४ ॥ पादीं यात्रेतें करी, । तें सर्व विहिताचि वारीं, । कर्म ब्रह्म, हे कुसरी । जाणोनियां. ॥ ४५ ॥ बह्मऐसे व्यापार । देहीं आचरे समग्र; । परंतु रागद्वेपें अंतर । मळेचिना. ॥ ४६ ॥ आली अवस्था भोगितु, । सुखदुःख अनुभवितु, । आत्मा ब्रह्म अद्वैतु । स्फुरे तेणेंसीं. ॥ ४७ ॥ आतां जन्हीं तो बहिर्मुखु, । नेणे अनुभवाचा विवेकु । तरी प्रथमाधिकारी साधकु, । तोचि कैसा? ॥ ४८ ॥ मनादिइंद्रियें स्वाधीनें । आणि रागद्वेपविहीनें, । तिहींकरूनि, जाणें, । करी विपयभोगु. ॥ ४९ ॥ तेणेंचि विपयसेवनें । सत्वशुद्धीचीं साधनें । संपादती, तेणें । पावे ब्रह्मप्राप्ति ॥ ५२५० ॥ मग तो सद्गुरूचा अंकितु, । अनुभवी आणि विरक्तु, । विहितीं आपुला प्रवर्ततु । योगानुवृत्ती. ॥ ५१ ॥ आत्माचि ब्रह्म करणगण, । आणि ते रागद्वेपविहीन, । सकळां विपयांचें सेवन । विहितेंचि संपादी. ॥ ५२ ॥

तु

ऐसें कर्माचें अवलंबन । करूनिही विपयसेवन, । काय पावे तयापासून । निर्धारेसीं! ॥ ५३ ॥

प्रसादमधिगच्छति

आपुली जैसि निर्मळता, । लयविक्षेपरहितता, । समाधीची अखडता । तीतें पावे. ॥ ९४ ॥ कार्याकारणाचें भान, । तयाचें आटे स्फुरण, । परमदशा निर्वाण । पावे स्वरूपें. ॥ ९५ ॥ स्वरूपाचें निर्मळपण, । तयाचें नित्य स्फुरण, । लयविक्षेपदोषदहन, । तोचि प्रसादु. ॥ ९६ ॥ पूर्वान्वयें, अवधारीं, । कामिका नसधे वरवियापरी । चित्त जयाचें गुणव्यापारीं । नित्य भ्रमे. ॥ ९७ ॥

प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।
प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥

प्रसन्नचेतसः पुरुषस्यास्य

अवधारीं, अर्जुना, वचन; । जयाचें चित्त सुप्रसन्न, । रजतमदोषविहीन । निर्मळ स्फुरे. ॥ ५८ ॥ विक्षेपु तो निर्मळु जाला, । कामाचा कुरठा मोडला, । क्रोधु वणवा जळाला । कापुरापरी, ॥ ९९ ॥ विषयवासना तूटली, । लयाची होळी जाली, । चित्तें आठी घातली । चैतन्येसीं; ॥ १२६० ॥ मदमत्सरादि अवगुण । जालें ययाचें दहन; । दमादिका आलें मरण । विवेकेंचि; ॥ ६१ ॥ अवस्था आलिया परतु । मोहिलाचि नव्हे मोहितु, । चित्तस्वभावो शाश्वतु, । निर्मळु जयाचा; ॥ ६२ ॥ व्योमा ऐसी निर्विकल्पता, । निर्विकार निराकारता, । ज्ञानरूपा चित्ता । नित्य जयाचिया; ॥ ६३ ॥ ययापरी निर्मळचित्तु, । योगबळें, ज्ञानबळें स्वस्थु, । लयविक्षेपनिरहितु । ऐसिया ययासीं, ॥ ६४ ॥

आशु

न लगता व्यवधान, । काळाचें अतिदीर्घपण । शीघ्रचि, अर्जुना, जाण । काये होये ? ॥ ६५ ॥

प्रसादे सर्वदुःखानां हानिरुपजायते

गुरुकृपेचेनि लेशें । निर्मळ स्वरूप प्रकाशे; । प्रकाशलें मग बैसे । तेथेंचि मन. ॥ ६६ ॥ मन गुणमय, चचळ, । तें होताचि स्वरूपीं निश्चळ । तत्क्षणेंचि अविद्यामळ । भस्म होती. ॥ ६७ ॥ स्वाविद्येचेनि निरासें । सर्वांनिया शून्य भासे. । मायाविवर्ताचें कैसें । तें नकळे भान. ॥ ६८ ॥

तेथें जीवदशाचि उडाली, । ब्रह्मात्मस्थिति संचली, । संसारस्वप्न छेदिली । स्फूर्ति तयाची. ॥ ६९ ॥ ऐसें असतां वर्तमान, । तया निर्मळचित्तालागून । सकळां दुःखांचें निरसन । तेथेंचि जालें. ॥ ९२७० ॥ ब्रह्मीं बुडाला संसारु, । नामरूपगुणव्यापारु, । जीवदशेचा आकारु । भस्म जाला. ॥ ७१ ॥ कारणीं कार्य अभावलें, । किरणीं मृगजळ हारपलें, । तें पुनरपि कवणें काळें । उमटे सत्य? ॥ ७२ ॥ सकळां दुःखाची हानी, । निर्मळचित्तालागूनि, । आपुलांचि ठाईं निर्गुणीं । शुद्धि होये. ॥ ७३ ॥ सकळा दुःखाचेनि न्हासें । पुढती काये होत असे? । तेंचि येक परियसें, । सांगिजैल. ॥ ७४ ॥

बुद्धिः पर्यवतिष्ठते

तयेचि स्वरूपीं निश्चळे, । पूर्णे, निरामये, निर्मळे, । बुद्धि आपेंआप आकळे, । स्थिर होये. ॥ ७५ ॥ आत्मा ब्रह्म हा प्रकाशु । करी सकळदुःखपरिध्वसु, । तापत्रयदोषु पुरुषु । नपवे तो पुनः. ॥ ७६ ॥ तेंचि आपुलें निर्मळपण । नित्य सेवितां, जाण । लयविक्षेपदहन । होंचि लागे. ॥ ७७ ॥ मग समाधीचां ठाईं । बुद्धि राहे, अन्यथा नाहीं, । म्हणौनि आधीं मनोजयीं । प्रवृत्ति करावी. ॥ ७८ ॥ मनचि होये स्वाधीन । तरि तापत्रयविनाशन; । गुणत्रयाचें निरसन । स्वभावें होये. ॥ ७९ ॥ मनाचि होये निश्चळ । तैं बुद्धि कैसेनि चचळ? । होये अभाव टवाळ । संकल्पांचें. ॥ ९२८० ॥ योगयुक्ती मन धरितां । रोकडी ब्रह्मसायुज्यता; । संसारभयवार्ता । न पडे श्रवणीं. ॥ ८१ ॥ मनचि होये स्वाधीन । निर्मळ, सत्वप्रधान, । तरि उपाय कां सोसावे आन । दशाप्राप्तिचें? ॥ ८२ ॥ मनचि स्वाधीन न करवे, । रजतमवेगु नागवे, । तरि व्यर्थ अभ्यास करावे । येर कासया? ॥ ८३ ॥ मनचि ठाईं नाहीं, । गुरूनें सांगावें तेथ काई?। परमार्थु नव्हे; ते भांडाई । चचळाची. ॥ ८४ ॥ आरी, बोरी, कांटवन, । वायो न सिरे ऐसें वन, । तयामाजी भूतृण । तेंचि कैसें? ॥ ८५ ॥ कुदा, गोगडी, हराळी, । तिकांडी, घोडेकुसळी, । कन्हवेलु, मारवेलु, गोडाळी, । तांबडी अपार, ॥ ८६ ॥ ऐसें गदळलें वन । तेथें करितां बीजारोपण । व्यर्थचि होये, म्हणौन । येक करावें. ॥ ८७ ॥ समूळ खाणोनि छेदावियां । आरी, बोरी, पाळवियां, । मग जाळूनि तृणा तया । नांगरु धरिजे. ॥ ८८ ॥

दुणिजे, तिगुणिजे, फाणिजे, । फोडिजे, लोडिजे, कुळरिजे, । बोले वाके पेरिजे । नाणा उतरलें. ॥ ८९ ॥ मग ते अंकुर सरळ । पाल्हाळ होती प्रबळ, । येकुचि डांमा विरळ । नसे वांज तास. ॥ ९२९० ॥ कणसांचिया घुमरी येती, । मोडणी, मळणी, राशी होती, । काळियां केशां फळप्राप्ति । होये ऐसेन. ॥ ९१ ॥ तैसें आजन्म मोकळें । जयाचें मन खेळे, । कांटवनापरी दाटलें । दुष्टगुणतया. ॥ ९२ ॥ कामु तो समूळु पोसला, । क्रोधु अनिवारु माजला, । दंभु न तुटे कांहीं केला, । वळावला मत्सरु. ॥ ९३ ॥ मदु दाटला अपारु, । न सिरे शब्दुसमीरु, । माजी तृणापरी पसरु, । कल्पनेचा. ॥ ९४ ॥ कामना, कल्पना, तृष्णा, । आशा, ममता, भ्रांति, वेदना, । निंदापारुष्यादिक तृणा । पारुचि नसे. ॥ ९५ ॥ उपदेशाचाही परि परावा । शब्दु न साहे जीवा, । स्वस्तुति आणि सेवा । केलिया संतोषु. ॥ ९६ ॥ उगाचि बैसला स्वस्थानीं । परोत्कर्षु न साहे श्रवणीं, । आइकतां क्रोधु, फणफणी । वेदीचिया परी ॥ ९७ ॥ आपणा नाहीं कारण । परि परावयाचें श्रेष्ठपण । न देखवे, मग भांडण, । कल्हो काढी. ॥ ९८ ॥ आगळें न साहे उणें, । करणें अथवा बोलणें, । असुरा राक्षसाचीं लक्षणें । आंगीं जया. ॥ ९९ ॥ हा कां पुढेंचि गेला, । मागेंचि हा कां राहिला ? । सांगों तेंचि लागला । मोकला परी. ॥ ९३० ॥ हा कां बोले ? न बोले कां ? । नाहीं माझी आतंका, । ऐसा क्रोधु जया मूर्खा । नसंटे देहीं, ॥१॥ आपुलाला घरीं वर्तती । जन आपुलालिया मतीं, । तेंचि आइकोनि चित्तीं । उपजे रोषु. ॥ २ ॥ व्याघ्रावरूनि जातां, । सापानें आइके पार्था, । परंतु क्रोधियावरूनि येतां । महाभय. ॥ ३ ॥ मर्कटेसीं राडोळी । करितां तेसें तेन्हेळीं । तैसेंचि यया खवळी । तो तें देखे. ॥ ४ ॥ ऐसें नाशोनि गेलें चित्त, । ब्रह्मज्ञान काइसें तेथ ? । साधन केलें तें व्यर्थ । पळाधें होय. ॥ ५ ॥ गुरूनें काये करावें ? । इष्टें, मित्रें, स्वभावें, । यालागीं निर्मळ करावें । मनचि आधीं. ॥ ६ ॥ कळलाही योगु विसरावा, । श्रवणींचि भावो ठेवावा, । धर्माधर्मु विचारावा, । करावी क्रिया. ॥ ७ ॥ विहितें कर्मानुष्ठानें । आणि नित्य धर्मश्रवणें, । चित्त सुटे अवगुणें । क्रमेंक्रमेंचि. ॥ ८ ॥ रजतम जालया क्षीण, । मग करावें नित्यानित्य श्रवण, । वैराग्य पावे मन, । आस्था धरी. ॥ ९ ॥ अनिलाचा माने त्यागु, ।

नित्याचा ठाईं आस्थायोगु, । मग क्रमेंचि अभ्यासमार्गु । -अनुष्ठावा. ॥ ५३१० ॥ योगें चित्त निर्मळ, । बुद्धि स्वरूपीं निश्चळ, । काम, राग, निर्मूळ । योगें होती. ॥ ११ ॥ क्षेत्रचित्त वोजावळे, । तेथें गुरुवाक्यबीज पेरिलें, । मग तें जोपावितां पिकलें । निजानंदघन. ॥ १२ ॥ ................ । क्षयो, विक्षेपु नसे सर्वथा, । वारे स्वस्वरूपाची चिंता । तेही सामावली. ॥ १३ ॥

हि

ययाकारणें जाणई । निश्चयें तयाचां ठाईं, । स्वरूपीं सच्चिदानंदमयीं, । पांडुसुता, ॥ १४ ॥

बुद्धिः पर्यवतिष्ठते

जाण जाली बुद्धि स्थिर, । विसरली द्वैत समग्र, । निमाले गुणव्यापार । प्रकृतीचे. ॥ १५ ॥ तो जाणावा स्थितप्रज्ञ, । दशा पावला विचक्षणु, । सकळां भावीं वृत्तिशून्यु । विशेषें जो. ॥ १६ ॥ निर्विकार तत्व, पार्था, । तदाकार जाली असतां । बुद्धि न चळे सर्वथा । जया योगियाची, ॥ १७ ॥ सकळा गुणांचें अधिष्ठान । तें पूर्ण ब्रह्म निर्गुण, । तद्रूप निमालें मन । जया पुरुषाचें, ॥ १८ ॥ एवं अखंडता जे जाली । ते पुढती पालटों चुकली, । लहरी जैसी निश्चळीं । जळीं सामावली, ॥ १९ ॥ तैसें जालें बुद्धीतें । आणि जयाचिया मनातें, । स्थितप्रज्ञ तयातें । म्हणिजे आम्ही. ॥ ५३२० ॥ जयाचें मन चंचळ, । सदा बुद्धि व्याकुळ, । तया स्थितप्रज्ञ ऐसें, वरळ । कव्हणी जल्पती. ॥ २१ ॥

नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।
न चाभावयतः शांतिरशांतस्य कुतः सुखम् ॥ ६६ ॥

अयुक्तस्य

जयातें आइकें, अर्जुना, । कर्मयोगीं निष्ठा असेना, । संस्कारशून्यु, अज्ञाना- । माजींचा श्रेष्ठु, ॥ २२ ॥ अतेव रजतमसंयुक्तु, । सत्वविमुखत्वें भ्रांतु, । नव्हे देवतागुरुभक्तु, । अभक्ती आथिला. ॥ २३ ॥ इंद्रियें अर्थीं सिरफळीं, । तीं तेणेंचि रसें मातलीं, । न परतती कांहीं केलीं, । धांवती अर्थार्थ. ॥ २४ ॥ प्राण पडिले सुनाट, । क्षुधा, तृषा अति दाट, । विवेका घरीं कपाट । तें उघडेचिना. ॥ २५ ॥ काम, क्रोध अधिष्ठाते, । दंप,

विक्षेप जागते, । अज्ञान आधीं पुरतें । अन्यथाज्ञानेंसीं. ॥ २६ ॥ ऐसा साधनोपायशून्यु, । चंचळु जयाचा मनु, । स्थिर नव्हे एकु क्षणु, । लवार्धमात्र. ॥ २७ ॥ संकल्पवातें भ्रमण । मन जयाचें करी, जाण; । नित्य जैसें कां श्वान । पिसाळलें. ॥ २८ ॥ वारि असंयतें करणें । तेंही अर्थार्थ, जाणें, । भ्रमविती अति मनें । मनातें जयाचिया, ॥ २९ ॥ काम, क्रोध पिटिती, । रज-तम-गुण आटिती, । जयाचिया कीं, वीरपति, । मानसातें, ॥ ५२३० ॥ तया सार्वकाळ दुश्चिता, । अनिश्चळा, अतिचित्ता, । पुरुषा अयोगयुक्ता । सर्वथैव ॥ ३१ ॥

बुद्धिर्नास्ति

तयातें निश्चळबुद्धि । न वर्ते, जाण, समाधि; । नित्यानित्यविवेकसिद्धि । ते आधीचिना. ॥ ३२ ॥ वोहटळे न थरे गाडी । वरि निंब्रांतींची उतरडी, । ते काये थारे फुडी, । पांडवा गा? ॥ ३३ ॥ कुळाळचक्रीं मांडिला । जैसा मृत्तिकेचा गोळा, । तो त्याचेनि लागला । भ्रमें भ्रमों. ॥ ३४ ॥ चंचळे जळीं अवलोकितां । नाथी प्रतिबिंबातें स्थिरता, । तैसी मनश्चांचल्यें सर्वथा । न थरे बुद्धि. ॥ ३५ ॥ असो. अयोगयुक्ताप्रति । स्वरूपीं स्थिरबुद्धि नाथी; । एथें नवल कांहीं पुढती । आइकें, बापा. ॥ ३६ ॥

अयुक्तस्य

रजतमवृत्तिवातें । डोळु घेतला ज्याचेनि चित्तें, । करणें विखुरलीं समस्तें, । न एकवाटतचि. ॥ ३७ ॥ एवं मना इंद्रियांचेनि । चांचल्यें जो मतीचेनि । पुरुषु अयोगी म्हणौनि । तयातें कैसें होये? ॥ ३८ ॥

भावना न च -

असंभावना अज्ञान । आत्मविषयीं जें गहन, । तें निरंतर वर्ते जाण । कार्यसहित. ॥ ३९ ॥ न वर्ते स्वरूपीं संभावना, । नेणे आपणु जो आपणा, । तया सर्वत्र ब्रह्मभावना । ते आधीचिना कीं. ॥ ५२४० ॥ अभावरूप जें काळत्रयीं । तें भावरूप देखे, जाणई. । सत्यस्वरूप सर्वही । परि अभावो तयाचा. ॥ ४१ ॥ मृगातें किरण तें नभसे, । भासलेंही परी भावो नसे, । तेथें जळाभासु मिथ्या असे, । तो साचु भाविती. ॥ ४२ ॥ सर्पाचेनि साचपणें । असतां दोर नेणणें, । रौप्यदृष्टी नोळखणें । शुक्ति-

शकल. ॥ ४३ ॥ जयाचेनि असिलेपणें । सकळा दृश्याचें भासणें, । जो न होतां दृश्यें येणें । दृश्य न होइंजे; ॥ ४४ ॥ जये विवर्तु स्वरूपीं, । जें विवर्ती लोपीं, अलोपीं । गुणभान मायारूपी । आणि अविद्यामय, ॥ ४५ ॥ ऐसें सर्वदा सर्वीं साच, । जेणेंविण सर्व असाच, । जें प्रकटे तें निःप्रपंच । सर्व अभावें. ॥ ४६ ॥ तया भावरूपा सत्याची । भावना नाहीं आत्मयाची, । मग असंभावना तेथिंची । तेचि राहिली. ॥ ४७ ॥

अभावयतः

मग असंभावनासंयुक्त, । स्वरूपसद्भावरहितु, । तो अन्यथाज्ञानें जागृतु । देहीं जाला. ॥ ४८ ॥ चित्तचांचल्यें हालवला, । बुद्धीचा डोळा लागला, । असंभावने निजैला, । शिवणा देखे. ॥ ४९ ॥ तेथें मी माझें उठावलें, । कामरागीं तें व्यापिलें, । नानाकार वोडवलें । आड दृष्टी. ॥ ५३९० ॥ तेथें पातले क्रोधादिक, । मदमत्सर आणि शोक, । मग ऐसेनि येणें आणिक । काय जालें? ॥ ९१ ॥

शांतिर्न च

शांति ते न पडे श्रवणीं, । निवृत्ति गेली हारपोनि; । असहिष्णुता पापिणी । संचरली आंगीं. ॥ ९२ ॥ इंद्रियां नाहीं परती, । नाहीं मनातें निश्चळस्थिति, । कैंची बुद्धीतें उपरति । निर्वाणनिष्ठा. ॥ ९३ ॥ अर्थार्थ करणें व्याकुळें, । मन संकल्पीं उतावेळें, । स्वरूपीं बुद्धि न मिळे, । ते वृत्तीसीं उठी. ॥ ५४ ॥

अशांतस्य

ऐसा स्वरूपोपरमविहीनु । बुद्धीचा जो अप्राज्ञु, । चंचळु जयाचा मनु । कामाभिभूतत्वें, ॥ ९५ ॥ जयाचीं करणें सकळें । नित्यव्यापारशीळें, । रात्रिदिवसु डोहोळे । विषयांचे जया, ॥ ५६ ॥ असतां देहधर्म अनिवार, । प्राणधर्म अपार, । अशांति केलें मंदिर । नांदतें जो, ॥ ९७ ॥ तया अज्ञानगुणशवळा, । अन्यथाज्ञानशीळा, । अशांता, अति कुश्चिळा, । काय होये? ॥ ९८ ॥

सुखं कुतः

सुख तें कैंचें तत्वता? । नाना योनी भोगितां । तापत्रयादि वेथा । नित्य वाजे. ॥ ९९ ॥ विषयानंदु तोही नाथी, । स्वरूपानंदु कैंचा पुढती? ।

जन्मोजन्मीं आइती । दुःखाची करी. ॥ ९३६० ॥ पेरिलें बीज तैंचि उगवे, । सर्वथा पालटु नपवे, । इंद्रवारुणीचें अघवें । झाड कडू; ॥ ६१ ॥ तैसें सत्वसुखाचें कारण । आणि कर्म निपजे तेणेंविण, । तें रजतमकृतजाण । दुःखेंचि प्रसवे. ॥ ६२ ॥ पुढती तेणें, नृपाळा, । रजोगुणु, तमोगुणु आगळा । होये मग अवलीळा । कर्म तैसेंचि. ॥ ६३ ॥ यापरी दुःखचि अनुभवी, । सुख न वसे तया गावीं, । नानाजन्मीं देहभावीं । सुटेचिना. । ॥ ६४ ॥ अथवा येणें श्लोकें आनु । अर्थु बोले नारायणु, । आइकता प्रेमळु अर्जुनु । अभिमुखु असतां. ॥ ६५ ॥

अयुक्तस्य

अमिताहारी जो, वीरपति, । न गमे जया एकांतीं, । इंद्रियें योगीं नावरती, । ऐसियातें ॥ ६६ ॥

बुद्धिर्नास्ति

सारासारविषयीं ज्ञान । न विंत्रे गुरुवचन, । अखंड भ्रमे मन । बाह्यप्रपचीं. ॥ ६७ ॥

अयुक्तस्य

आता मन जयाचें अस्थिर, । बुद्धि नेणें सारासार, । लयविक्षेप अपार । होंचि लागती. ॥ ६८ ॥ तया नैकचित्ता, विभ्राता, । ज्ञानयोगीं अयुक्ता, । अतिचचळचित्ता । काये होये ? ॥ ६९ ॥

न च भावना

स्वरूपसाक्षात्कारु नाथी, । अनुभवशून्यु, गा वीरपति, । विविक्तात्मज्ञानयुक्ति । बिंबेचिना. ॥ ९३७०॥

अभावयतः

आतां जया अनुभवु नाथी, । आत्मविषयीं नित्य भ्रांति, । तयातें, गा वीरपति, । कैसें होये ? ॥ ७१ ॥

न च शांतिः

स्वरूपोपरति न वर्ते, । दशा ना स्थिति जयातें, । मग विश्रांति मना, बुद्धीतें । कें ते आहे ? ॥ ७२ ॥

अशांतस्य कुतः सुखम्

आतां स्वरूपशांतीवांचून । अनुभवु ना निष्ठास्फुरण, । तया संत सुख कैंचें जाण । अनात्मशीळा ? ॥ ७३ ॥ दमाभावें शमु नाहीं, । शमाभावें ज्ञान नास्ति, । ज्ञानाभावें स्वरूपप्राप्ति । ते आथीचिना. ॥ ७४ ॥ स्वरूपसाक्षात्कारेंवांचून । दशा नाहीं, ऐसें जाण; । दशेवीण सुख कवण ? । दुःखचि पाविजे. ॥ ७५ ॥

इन्द्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।
तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ॥ ६७ ॥

हि यस्मात्

यालागीं इंद्रियातें दमू । संकोचिजे शरीरधर्मु, । तरि सुगमु जाये शमु । योगसिद्धि होये. ॥ ७६ ॥ ऐसें नमने जयातें । आपुलेनि अहंमतें, । मग योगसाधनीं प्रवर्ते । तेव्हेळीं कैसा ? ॥ ७७ ॥

इन्द्रियाणां चरताम्

रसना वोपिली रसातें, । पिंडपोषणीं प्रीति वर्ते, । क्षुधा पुरे तऱ्ही जयातें । तृप्ति नव्हे. ॥ ७८ ॥ रसिक मिळे भोजन । तें जाजावती जऱ्ही प्राण, । तऱ्ही न सोडवे अन्न । पात्रीं पडिलें; ॥ ७९ ॥ लागे परतों कवळु । तऱ्ही जेविती हळूहळू, । जालाही नमनिती विटाळु, । लोलुप ऐसे ! ॥ ५३८० ॥ तया भोजनाचां अतीं । उठावया नाहीं शक्ति; । चालतां मान हट्टती । ते नयेचि करिता, ॥ ८१ ॥ तेथें शोपादिक पातले, । तव अन्नेंचि पैस रुंधिले, । मग लोळती भूमी शीतळें । जैसे दर्दुर. ॥ ८२ ॥ ऐसा तो शोषु जाये, । तव रोगु प्रकटता होये, । तथापि वासना न धाये, । ते अन्नेंचि स्मरे. ॥ ८३ ॥ हास्यविनोदवार्ता । सांगती, आइकती कथा । लोकरजकाव्यवस्था, । तेव्हेळीं कैसे ? ॥ ८४ ॥ तेथें तान, भूक पळाली; । चिंता नेणों काय जाली; । उद्यमु नलगे, जाली । एकनिष्ठा तेथें. ॥ ८५ ॥ लोपतें काळत्रय जालें, । परि वार्तारंभें तें न कळे; । ऐसे श्रोत्र शब्दा दिधले । वाचेसहित. ॥ ८६ ॥ नानारसें, अळंकार । अनुभवावे हे इच्छा थोर, । स्त्रीकार्मी तत्पर । रात्रिदिवसु. ॥ ८७ ॥ शरीराकडे पाहतां, । तारुण्यचि असो म्हणती, । स्वर्गेंद्रिय भोगाप्रति । ऐसें समर्पिलें. ॥ ८८ ॥ नाना विचित्र विट, नट, । इंद्रजाळ, कोल्हाट, ।

पाहती शरीरें, अर्थे कष्ट । साहोनियां. ॥ ८९ ॥ आइके विचित्र दूरींचें, । तेथें जंव तो नवचे । तंव मना निश्चळत्व कैंचें ? । आलस्य नाथी. ॥ १३९० ॥ पाहवयासाठीं नयन । वोपिले; दोन्ही चरण । रात्रिदिवसु भ्रमण । करितां न शिणती. ॥ ९१ ॥ नाना प्रियपरिमळ, । म्हणे, "धन्य धन्य अलिउळ ! । नाठवे आन सकळ । सुवास घेतां." ॥ ९२ ॥ ऐसीं इंद्रियें भोगीं विचरती, । भोगसाधनीं प्रेत्नु करिती, । मना आराणूक नाथी । तेणें संभ्रमें. ॥ ९३ ॥

यन्मनः

विषयसुखा रातलें । मन जें करणाधीन जालें, । कामोपभोगीं गुंतलें, । परतेचिना. ॥ ९४ ॥ विषयभोगाचिया आवडी । इंद्रियाआधीं घाली उडी, । लागली करणसंगें खोडी । ऐसी जयातें, ॥ ९५ ॥

अनुविधीयते

तें मन लाविती ध्यानीं, । इंद्रियनियमेंवाचूनि. । म्हणती काय म्हणौनि । प्रज्ञामद तें. ॥ ९६ ॥ " इंद्रियें असतु व्यापारीं, । मनचि आंवरिजे जरि । तरि योगाची सिद्धि पुरी । का न घडावी ? ॥ ९७ ॥ इंद्रियें कीरु वहिर्मुखें । विषयीं वर्ततु सुखें, । आम्ही मनेंचि येणें एकें । योगु साधू. " ॥ ९८ ॥ ऐसें म्हणौनि प्रवर्तती, । अथवा इंद्रियें, वीरपति, । आंवरितांही नांवरती । म्हणौनि सोडिलीं. ॥ ९९ ॥ मग एकांतीं वासु करूनि । मन लाविलें अनुसंधानीं; । लवमात्र समाधानीं । बुद्धि स्थरावे. ॥ १४०० ॥

तदस्य प्रज्ञां हरति

तेथें मना अंगें करणवृत्ति । नावेक होतिया स्वस्थी, । पूर्वाभ्यासु तयांप्रति । स्मरता जाला. ॥ १ ॥ तेथें उठी अर्थस्फुरण । तेंचि रजोगुणाचें जाण, । सत्वापासूनि अवतरण । होतें जालें. ॥ २ ॥ रजोगुणाचे उपसर्गें, । पूर्वाभ्यासाचेनि अंगें, । असंयमाचेनियोगें । इंद्रियें तें ॥ ३ ॥ अर्थोन्मुखें धांवती, । बाह्यप्रपंचीं विगुरती, । नियंत्रणीं न कोंडती । जैसीं वोढाळें. ॥ ४ ॥ अंतरस्थ तयां करणांतें । तें मनही तेथें तेथें । जाये; इंद्रियसंगें मागुतें । लागे भ्रमों. ॥ ५ ॥ अंतरंग तया मनातें । विवेककळा जे वर्ते, । जिया प्रज्ञा निरुतें । कळे नित्यानित्य. ॥ ६ ॥ ते

मनाचि संगें उचलली, । इंद्रियसंगा मीनली, । बाह्यप्रपंचीं लागली। अर्थकामें. ॥ ७ ॥

अंभसि वायुर्नावमिव

जैसी नाव नदीमाझारीं, । कीं तारूं जातां सागरीं । परद्वीपाप्रति, अवधारीं। पांडुपुत्रा, ॥ ८ ॥ मार्गसामग्री पुरती । आणि जे वस्तु तेथें नेइजती, । नेतीं मनुष्यें, वीरपती, । बैसलीं असतां, ॥ ९ ॥ कर्णधारबळ आहे, । तारूं चाले सुवायें, । परपारु ठाकत होये, । तंव इतुलयामाजी ॥ ५४१० ॥ वायो उपराठा मुरडे । तो घेइंजे तेणें सिडें, । मग तो अत्यंत झाडें । मोडीसा उठिला. ॥ ११ ॥ तेणें तारूं तें संचलें । पहिलया ठायाप्रति नेलें, । कां अनमार्गीं घातलें । मुरडेचिना. ॥ १२ ॥ जाऊनि लागे कपाटीं, । तेथूनि आणिजे कष्टीं, । कां तया सागरा पोटीं । बुडोनि जाये. ॥ १३ ॥ तैसा उठिला रजोगुणु । करणव्यापारलक्षणु; । तो अंतकु प्रभंजनु । अनिवारु कीं. ॥ १४ ॥ घेतला असतां मनें सिडें । बुद्धी तें तारू मुरडे, । प्रपंचअडचणी पडे । जाऊनियां तें. ॥ १५ ॥ पावतां पदा परतलें, । कीं पूर्वप्रदेशा आलें, । पुढती पवनें हालवलें । बुडोंचि पाही. ॥ १६ ॥ उद्यमु गेला विफळु, । सरला वेंचु सकळु; । तैसा योगु निर्फळु । अजितेंद्रियाचा. ॥ १७ ॥

तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।
इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥

हे महाबाहो

महाबाहो धनंजया, । आइकें वचना माझिया; । रजोगुणें बळ इंद्रियां । व्यापारविषयीं. ॥ १८ ॥ तेथें संस्कारबळ दुसरें, । अनभ्यासाचें तिसरें, । अतेव इंद्रियें अनिवारें । नागवती मना. ॥ १९ ॥ करणचांचल्यें ऐसें जाण । एकनिष्ठ नव्हे हे मन; । मनें अस्मर्थें च्यवन । प्रज्ञेतें होये. ॥ ५४२० ॥ प्रज्ञाचि जेथ च्यवली, । तेथें योगसामग्री वायां गेली, । मोक्षहानि प्रवर्तली । संसारदुःखें. ॥ २१ ॥

तस्मात् कारणात्

तया कारणें, वीरपति, । अवधारीं, गा प्रेममूर्तिः । योगी काय करिती । अभ्यासियें. ॥ २२ ॥ वैराग्य करूनि प्रबळ, । पावोनि गुरुवाक्य

निर्मळ, । बाह्याकारें बळ । तया दमाचें, ॥ २३ ॥ अंतरीं विविक्तात्मज्ञता । सत्संगाची निबिडता, । श्रवणीं, मननीं नित्यता । साधनीं प्रवर्तले. ॥ २४ ॥

यस्येन्द्रियाणि सर्वशः

मग तयां सकळांमाझारी, । अर्जुना, मातु अवधारीं, । जयाचीं बरवयापरी । इंद्रियें सकळें ॥ २५ ॥

इन्द्रियार्थेभ्यः

पुरे म्हणौनि वोसरलीं, । विषयरसा चिळसलीं, । देहसंगा उबगलीं । बोधलेपणें. ॥ २४ ॥ कामें रागें सांडिलीं, । रजोगुणें वोसंडलीं । विवेकवैराग्य पावलीं । म्हणौनियां, ॥ २६ अ ॥ मग तें सांडूनि व्यापारा । अर्थापासूनि समग्रा । परतलीं होत्सातीं, वीरा, । पुनरपि कैसीं ? ॥ २७ ॥

निगृहितानि

कर्मकरणें जें पांचही । तें रिघालीं दमाचा देहीं, । नियमलीं ठाइंचीं ठाईं । व्यापारशून्यें. ॥ २८ ॥ ज्ञानकरणांचा मेळावा । मनीं प्रवेशोनि अथवा । शमीं जिराला, पांडवा, । जया योगियाचा, ॥ २९ ॥ ऐसीं दहाही इंद्रियें । नियमलीं आत्मोपायें, । मन जयाचें नव्रजाये । संकल्पवार्ते, ॥ ५४३० ॥

तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता

तयाची प्रज्ञा निश्चळ, । समाधि जाली केवळ, । करणसमूहनिराकुळ । मन जयाचें, ॥ ३१ ॥ शमदमयोगसंपत्ति । ऐसा जो, सुभद्रापति, । असे, तयातेंचि म्हणती । स्थितप्रज्ञ. ॥ ३२ ॥ हें तयाचें बाह्यसाधन । तुजप्रति कथिलें लक्षण, । आतां अनुभवाची खूण; । अंतरीं कैसें ?॥ ३३ ॥

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥

सर्वभूतानां या निशा

सकळां भूतांतें जाण । जे विषयीं निसीसमान, । कव्हणा, केव्हांही, कांहीं ज्ञान । उमटेचिना. ॥ ३४ ॥ गर्भांधाची निद्रा जैसी । स्वप्नस्फूर्तीचां आसीं, । नेणपण तेंही जयासि । चोजवेचिना. ॥ ३५ ॥ जये वस्तूचें अज्ञान । वर्तत असतांही जाण । न कळे आतां तेथें ज्ञान; । तें काय

सांगावें ? ॥ ३६ ॥ आतां ते वस्तु कवण ? । कैसें तेथिचें अज्ञान ? । पुसतासि म्हणौनि सांघेन । तूतें, आस्थाळुवा. ॥ ३७ ॥ सर्वेही भूतातें कळे, । परि मी कवणु हें न कळे, । झांकले प्रज्ञेचे डोळे । आमवि पयीं. ॥ ३८ ॥ मीं जागृतु, मी निजैलों, । स्वप्नदृष्टी मी चेइलों, । मं आलों, मी गेलों, । पुरुषु म्हणे. ॥ ३९ ॥ परि मी जागृती जाणता, सकळ अर्थ अनुभविता, । तो कैसा ? कवणु ? हे व्यवस्था- । मात्रहं नेणे. ॥ ९४४० ॥ सांडूनि ऐसिये जागृतीतें । देखिलें म्हणे स्वप्नातें, । तें कवण स्वप्नेचें ? । आपण नेणे. ॥ ४१ ॥ स्वप्नाजागराचां विलयीं । सुषुप्ति नेणे कांहीं, । जाणे विस्मरणमात्र तेही । परि जें नेणे. ॥ ४२ ॥ आड करूनि शरीरातें । मी, माझें येणें मतें । विचरे, परंतु आपणातें । आपणु नेणे. ॥ ४३ ॥ व्यवहारविषयीं कुशलु, । जाणे अर्थु दुरीलु, । परि मी जाणता केवळु । कैसा ? हें नेणे. ॥ ४४ ॥ कव्हणे एके प्रसंगें । शास्त्रीं रीघु करूं लागे, । तैं शाब्दिक जाणे अवघें, । जाणतें नेणे. ॥ ४५ ॥ नाना सिद्धांत शास्त्रांचे । कळती अभिप्राय मतांचे, । तथापि जाणतें कवण तेथिचें । ऐसें नेणे ॥ ४६ ॥ एक म्हणती मी जीवात्मा, । मातें साक्षी परमात्मा, । मी कैसा, काये, हें चिदात्मा । तो जाणु मी नेणें. ॥ ४७ ॥ साच मानूनि आप्तवचना । परमाणूहूनि म्हणे मी साना, । तथापि तें वेद्य कवणा, । ऐसें जो नेणे ॥ ४८ ॥ एक म्हणतीं, "मी साक्षी, । सकळां प्रकृतिगुणां लक्षीं, । गुणविचक्षणु प्रत्यक्षीं । गोचरु नव्हें." ॥ ४९ ॥ सांख्यसिद्धांतें येणें । शाब्दिकु "मी देखणा" म्हणे; । परि अपरोक्षज्ञानें नेणे । आपणु कैसा. ॥ ९४५० ॥ वेदांतमतें अनुवादती । 'सर्व ब्रह्म' ऐसी प्रतीति, । तेथें तूंमीपण तेंचि म्हणती । शब्दनिष्ठ; ॥ ५१ ॥ परि आपुलें स्वरूप न कळे, । तंव जें शब्दब्रह्म कथिलें, । तें प्रतीतीवीण गेलें । जाणणें वायां. ॥ ५२ ॥ आपुल्या स्वरूपाचें । अज्ञान तें या सर्वांचें; । ज्ञान म्हणौनि ययाचें । नाम अज्ञान. ॥ ५३ ॥ जवळील दिसे, दूरील । न दिसे दृष्टी दृष्टीचें मूळ, । आत्मविमुख ज्ञान सकळ । तें अज्ञानचि कीं. ॥ ५४ ॥ देखतिये दृष्टीचां मूळीं, । जीवाहूनि बहू जवळि. । नेणे सो मीपण करळी । तें जाणावया. ॥ ५५ ॥ शास्त्रें भांडती परस्परां, । परि जें तरि शास्त्रें, वीरा, । स्फुरतिये प्रज्ञेचिया अंकुरा । अधिष्ठान जें,

॥ ५६ ॥ जाणतया जाणवे ज्ञाना । ऐसें दूरि नव्हे जें, अर्जुना, । आधारु उठितया सवेदना । वेत्तयातें जें, ॥ ५७ ॥ प्रह्नेची खोळ साडिजे, । मग जें सहजचि असिजे, । बुद्धीं जाणपणें न लाहिजे । उपजलेनि. ॥ ५८ ॥ इंद्रियां देहाआतौतें, । मना अभिमानापरुतें, । अपर बुद्धि जयातें । तें पर निरंजन कीं. ॥ ५९ ॥ जें तें काळे अधिष्ठान, । तें नव्हे, वीरा, परिच्छिन्न, । माया, अविद्या गुण । हा विवर्तु जेथें; ॥ ९४६० ॥ तये वस्तूचां ठाईं । कव्हणा किंचित् केव्हांही । अपरोक्ष ज्ञान नाहीं, । पांडुपुत्रा; ॥ ६१ ॥ म्हणौनि बोलिलों जाण, । समस्तां रात्रि हे, म्हणौन । आत्मविषयीं अज्ञान । प्राणियांतें. ॥ ६२ ॥

संयमी

आता जो इंद्रियनियमी । तो कैसा? आइकें, सांगेन मीं. । आरंभु केला असतां शर्मी । अंतर्मुखत्वें. ॥ ६३ ॥ वैसे विविक्तप्रदेशीं । दृढव्रती नियमेसीं; । आसनविधि, परियसीं; । संपादूनियां. ॥ ६४ ॥ बाह्यकरणांतें दमिलें, । मन निरालत्वीं ठेविलें, । देहादि इंद्रियावेगळें । जेथिंचें तेथें; ॥ ६५ ॥ निःशेप सांडूनि कल्पना, । अनुसंधानही जो करीना, । लीन करूनि मीपणा । वासनेसीं, ॥ ६६ ॥ तेथें विचारु अवघा गळे, । स्फूर्तिमात्र मावळे, । परि अज्ञाना भावो नाकळे । योगियाचा. ॥ ६७ ॥ लयो मावळला ज्ञानीं, । ज्ञान समाधीचां स्थानीं, । समाधिस्फुरण निदानीं । लीन जालें. ॥ ६८ ॥ ऐसा मनें, बुद्धींद्रियगुणें । नेणु जाला स्वरूप-स्फुरणें; । परि तो, अर्जुना, जाणें । कैसा असे? ॥ ६९ ॥

तस्यां जागर्ति,

पूर्वीं बोलिलों जेणें मतें । तेणें निजेलीं जेथें भूतें, । जागृतु जाला हा तेथें, । पांडवा गा. ॥ ९४७० ॥ द्रष्टा, दृश्य, दर्शन, । यये त्रिपुटीचें निराकरण, । वरि उरे आत्मदर्शन । तें दर्शन नव्हे. ॥ ७१ ॥ दृष्टीविण तेथें दिसे, । रूपेंविण रूप असे, । भेदेंविण विदुर्पे । जागती जाणों. ॥ ७२ ॥ जाणणें जंव जंव, बा रे, । जाणतेपण आंगीं जिरे, । तंव तंव तें न धरे । नेणणें तेथें. ॥ ७३ ॥ प्रत्यक्षाप्रत्यक्ष, वीरपति, । भावातें भाव न गमती, । भावो तो सामावे पुडती, । तेंचि न सामावणें. ॥ ७४ ॥ तेथें चंद्रु ना पावकु, नक्षत्रें, । हारपलेनि दिवाकरें; । देखणें त्रिपुटीचेनि मारें । प्रका-

शेसीं उठी ॥ ७५ ॥ तेथें प्रकाशु तो अप्रकाशे, । अप्रकाशु प्रकाशकीं प्रकाशे, । प्रकाशुचि प्रकाशु नव्हेसें । प्रकाशे तत्व. ॥ ७६ ॥ ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान माळवे. । मग द्रष्याचेनि अभावें । आत्मस्वरूप जाणवे । जया पुरुषातें, ॥ ७७ ॥ सार्वकाळ, वीरपति, । तेथें विसरु जया नाथी, । निष्ठा केली एकांतीं । तव तो ऐसा; ॥ ७८ ॥ व्यवहारकाळीं, पार्था, । देहीं व्यवहारतही असतां । न चळे स्वरूपनिष्ठता । निर्वाणयोगी ॥ ७९ ॥ तारुवीं बैसे तो तो सचला, । नव्हेचि आला ना गेला, । चेष्टतया वहिरगा स्थूळा । तेसें देखे. ॥ ५४८० ॥ देशांतरीं जर्जरु जाये । तो दुरडासि भ्रमतु आहे, । परि आकाश योग्य काय । तेथें भ्रमावया ? ॥ ८१ ॥ तैसा जो आपुला ठाई । आपणु स्वथु जाणई, । तया स्वरूपनिष्ठा नाहीं । द्वैताचें भान. ॥ ८२ ॥ एकांतीं या लोकांतीं, । परि सारिखी जयाची स्थिति, । एकांतु, लोकांतु जयाप्रति । वर्तेचिना. ॥ ८३ ॥

यस्यां भूतानि जाग्रति

जनदृष्टी योगी कैसा ? । अवधारीं, गा गुडाकेशा, । सांगितली हे दशा । जयाची तयाप्रति. ॥ ८४ ॥ नातरि स्वरूपीं स्वथु । तया बाह्यप्रपंचु कैसा गमतु ? । ते हे अवधारीं मातु । श्रीकृष्णु म्हणे. ॥ ८५ ॥ स्वरूपविपर्यी निजेलीं । भूतें अज्ञानें मोहिलीं, । अन्यथाज्ञानें चेइलीं । काये करिती ? ॥ ८६ ॥ नव्हती तें होती आपण, । नाहीं तें देखती भान, । चित्त करोनि सावधान । तेथें जागती. ॥ ८७ ॥ म्हणे, “मी अमुकिये गोत्रींचा, । उदरीं जन्मलों बापाचा, । रामकृष्णादि नामाचा । देहो, तो मी. ॥ ८८ ॥ अमुकाचि वर्णु, आश्रमु, । अमुका माझा कुळधर्मु, । अमुका देशु, अमुका ग्रामु, । गृह, आळी. ॥ ८९ ॥ माझी स्त्री, माझे पुत्र, । माझें कुळ, माझें गोत्र, । माझें द्रव्य, माझें क्षेत्र, । पदार्थ, पशु. ॥ ५४९० ॥ दिसे तें सर्व साचार । विश्वमान नानाकार, । देहप्रकृतिगुणविकार, । असत कैंचि ? ॥ ९१ ॥ भूतीं मूर्ते निपजती । एसणी साच प्रतीति, । क्षुधा, तृषा, सुषुप्ति, । जागृति, स्वप्न ॥ ९२ ॥ असाच कैसें मानावें ? । साच सुखें दुःखानुभवें, । आतां हेंचि एक साधावें । पुरुषार्थविषयीं. ॥ ९३ ॥

प्रत्यक्षु सूर्यो, चद्रु, । म्हणौनि स्वर्गुही साचारु, । वेदशास्त्रपुराणविचारु । तोही माने." ॥ ९४ ॥ एव साकारमात्र जें भान, । तेथें भूतांचें वर्ते ज्ञान, । ते प्रपचीं जागृतें म्हणौन । बोलिलीं असती. ॥ ९५ ॥

**सा निशा पश्यतो मुनेः**

आता मननशीलु ज्ञानी कैसा? । तरि तयाची हे निशा, । प्रपचज्ञानीं, गुडाकेशा, । असावधानु जो. ॥ ९६ ॥ असतचि जया साकार । हारपलें दृश्य शरीर, । प्रपचभानही येर । गोचर नव्हे. ॥ ९७ ॥ असतचि आपपर । नभसे जया समग्र, । प्रकृतिगुणविकार । वोळखेचिना. ॥ ९८ ॥ पृथ्वी, आप, तेज, वायो, नभ, । अहता, महत्तत्व स्वयभ, । अव्यक्त ना मुल्यबिंब । प्रतिबिंबेसीं. ॥ ९९ ॥ उपसहारु अनुसधानीं । देखता जाला ज्ञानी, । तो प्रपचु कैसा म्हणौनि । नेणे, पार्था. ॥ ९९०० ॥ लय, निक्षेप हारपले, । तेथें प्रपचज्ञान उडालें, । कल्पनानाशें मेलें । प्रपचभान. ॥ १ ॥ जागृता स्वप्न वानी । तत्प्रपचातें कें ठावो? । तैसा अवस्था चहूंचा अभावो । योगियातें. ॥ २ ॥ तेथें अवस्था चहू गोचरु, । तया प्रपचा कें निर्धारु? । अवस्थारहितु जागरु, । सयतेंद्रिया. ॥ ३ ॥ म्हणौनि स्वरूपीं राहिला । तयाचा प्रपचु हारपला, । गुणाचा ठावो पूसला । म्हणौनिया. ॥ ४ ॥ सतदृष्टी कें असत? । अतेव मिथ्याभूत? । नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, । सत्यस्वभाव जें. ॥ ५ ॥ तया स्वरूपानुभवीं, जाण, । नभसें प्रपचाचें भान, । यालागीं निद्रा म्हणोन । म्हणितली हे ॥ ६ ॥ आता तू म्हणसील, सुभटा, । प्रपचज्ञान स्वरूपनिष्ठा । सर्वथा न वर्ते, श्रेष्ठा, । योगियाते. ॥ ७ ॥ तैं उपदेशव्यवहार । कैसे गुरुशिष्यविचार? । पुराणें, वेदु, शास्त्र, । हें काय मिथ्या? ॥ ८ ॥ तरि अवधान देईं, वीरा, । ते निर्विकल्पस्थिति योगेंद्रा, । व्यतिरेकज्ञान धीरा । वर्तत असे. ॥ ९ ॥ मग अन्वयदृष्टी पाहता, । सर्व देखती ब्रह्मरूपता, । ते असप्रज्ञातस्थिति आता । बोलैन मी. ॥ ९९१० ॥ तू म्हणसील साशकितु, । "सर्व ब्रह्म हा सिद्धातु, । तरि व्यतिरेकें समस्तु । प्रपचु का निरसावा?" ॥ ११ ॥ तरि व्यतिरेकज्ञानेंविण । नाहीं शुद्धस्वरूपाचें ज्ञान, । आणि, शुद्धस्वरूप निर्गुण । तें जैं न कळे, ॥ १२ ॥ तैं अन्वयज्ञान न सभवे, । विश्वब्रह्मीं विश्वासु नव्हे, । म्हणौनि सागिजैल, तें, आइकावें, । अर्जुना,

तुवां. ॥ १३ ॥ आधीं जाणावी प्रकृति, । पासाव जिये गुणवृत्ति, । मग तत्कार्य वीरपति, । रचावा प्रपंचु. ॥ १४ ॥ जाणोनि कार्य, कारण, । जीवेश्वरभेददर्शन, । करावें तयाचें निराकरण । तें स्वानुभवेंचि कीं; ॥ १५ ॥ मग कार्यकारणोपसंहारें । प्रपंचभान न स्फुरे, । केवळ स्वरूपमात्र उरे, । ते निर्विकल्पनिष्ठा. ॥ १६ ॥ तेथें प्रपंचु संहारला, । तो स्वरूपींचि लीनु जाला, । पुढती उद्भव देखिला । तेथूनिचि तयाचा. ॥ १७ ॥ मग अधिष्ठानदृष्टी पाहतां, । प्राकृता गुणागुणजनिता । प्रपंचा ब्रह्मरूपता । स्फुरोंचि लागे. ॥ १८ ॥ तेथें निरसणें राहिलें; । जाणोनि जाणणें भागलें, । सर्वी अखंडत्व स्फुरलें । ते स्थिति अवधारीं. ॥ १९ ॥ असंप्रज्ञातस्थिति कैसी, । ते दृष्टांतमुखें परियसीं, । सांगेन, जे योगियांसि । दुर्लभ दशा. ॥ ९९२० ॥

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शांतिमाप्नोति न कामकामी. ॥ ७० ॥

समुद्रम्

आइकें, अर्जुना, वचन; । यया समुद्राचें महिमान, । प्रमित नाहीं जीवन । म्हणोनि कैसा? ॥ २१ ॥

आपूर्यमाणम्

न दिसे जयाचा सेवटु, । सव्यवामभागीं कांठु, । मध्यें जाइंजे तें सगटु । सारिखाचि. ॥ २२ ॥ नितळ, निवळ, निर्मळ, । संपूर्ण, सर्वत्र जळ; । तळु घेतां महीमंडळ । ते आडळेचिना. ॥ २३ ॥

अचलप्रतिष्ठम्

वरिवरी दिसे चंचळु, । परि गर्भी जैसा निश्चळु, । तैसाचि बाह्यांतरीं अचळु । परिपूर्णपणें. ॥ २४ ॥ कल्पांतीं जळ कोंदलें, । तें दाटणी जैसें न डोले, । तेंचि स्वरूप धरिलें । सागरें तेणें. ॥ २५ ॥ ऐसा अडोळे स्वस्थु संचला, । सागरु सर्वत्र राहिला । असतां संपूर्ण भरला, । तयाचा पोटीं ॥ २६ ॥

आपः यद्वत्प्रविशन्ति

जैसीं उदकें प्रवेशती, । प्रविष्टें कैसीं होती? । तें अवधारीं, वीरपति, । दृष्टांतार्थ. ॥ २७ ॥ वर्षाकाळीं वर्षती । जळधर जेव्हेळीं क्षिती, ।

मग तीं उदकें मिनती । नदियांप्रति कैसीं ॥ २८ ॥ एकें पर्वतीं आदळतीं, । एकें पापाणीं वाजती, । एकें भूमिके लोटती, । पांडुपुत्रा. ॥ २९ ॥ एकें हाटचहोटांचीं, । एकें कुश्चिळें भूमीचीं, । प्रवाहरूपें अवघींचि । चालिलीं असतां, ॥ ५९३० ॥ वाहळा संपूर्ण भरतीं; । त्या नदियांप्रति येतीं; । नदिया ह्या मिनती । तयां महानदियां. ॥ ३१ ॥ तेथें पूर्वभेद हारपले, । जळातें प्रायश्चित्त जालें, । तीर्थभावें वंदिलें । तापसादिकीं. ॥ ३२ ॥ तेथें आवर्त, आवात, । कल्लोळींचे संघात, । जळ सांचलें समस्त । महानदीप्रति. ॥ ३३ ॥ पृथ्वीवरिला उदका । घेऊनि नदिया सकळिका । चाळती सागरोन्मुखा । अपाडेसीं. ॥ ३४ ॥ एकी सरसरां वाहती, । एकी निश्चळा जाती, । एकी घोपती, सूंसाती, । येती सागरा. ॥ ३५ ॥ मग तये सागरीं प्रवेशु । करितां विसरती घोषु, । तेणेसीं येकु निर्विशेषु । शब्दु सागराचा. ॥ ३६ ॥ तेथें वोघवेग हारपले, । नदियाचे भेद गेले, । स्वाद स्वादीं रिघाले । समुद्राचां. ॥ ३७ ॥ तीर्थ आणि ग्रामरसा । निवाडु नाहीं, गुडाकेशा; । सागरुचि तेणेसीं जैसा । तो तैसाचि असे. ॥ ३८ ॥ मिनलीं एकुदा सकळिकें । निवडों न शकती उदकें; । गंगा आणि रथ्योदकें । सागरुचि स्वयं. ॥ ३९ ॥ ययांचेनि संगमें भरे, । ना जो वेगळा ययां उतरे, । पूर्णु जैसा तैसा, बा रे, । निश्चळु सागरु. ॥ ५९४० ॥ घटीं आकाशें भरती, । ते वोमयू निही घेइजती, । परि तया गगनाप्रति । भरु, ना वोहटु. ॥ ४१ ॥

तद्वत्

आगळें, ना उणें, ऐसें । सागराचें स्वरूप असे; । भरला असोनि प्रवेशे । मागुतें जळ. ॥ ४२ ॥ तेणें नवचे वोसडोनि, । अथवा निण तेणें वोहटोनि, । जीवनभेदातें ग्रासूनि । असे जैसा तैसा. ॥ ४३ ॥ हा सांगितला दृष्टांतु, । उमजला तूतें समस्तु, । तैसाचि जाण दृष्टांतु, । सांगिजेल तो. ॥ ४४ ॥

सर्वे कामा यं प्रविशन्ति

प्राणपंचकाचेनि आधारें । अंत:करणचतुष्टय, बा रे, । ज्ञानेंद्रियद्वारा स्फुरे । बाह्यविपयीं. ॥ ४५ ॥ तेथें प्रिय भोगा येती, । काम करणाचे

पुरती, । मन, बुद्धि, रंजती । नावेक तेणें. ॥ ४६ ॥ परि जो स्वरूपें निर्मळु, । नित्य, शुद्ध, निराकुळु, । सच्चिदानंदमयु, केवळु । जैसा तैसाचि. ॥ ४७ ॥ कामोपभोगें उल्लासे, । ना विक्षेपु मानी तेणें रसें, । जैसा तैसा स्वस्थु असे । ठाईंचां ठाईं. ॥ ४८ ॥ ना भोगत्यागें मानी स्वास्थ्य, । अथवा कांहीं अस्वास्थ्य, । बोधला जो यथातथ्य । निर्विकार. ॥ ४९ ॥ सन्मयत्वें अपरांपरु । संचला आत्मासागरु, । तेथें प्रकृति चिद्विकारु । तो आनु नव्हे. ॥ ९९५० ॥ सार्द्रतेचां पोटीं । सागरीं स्वादु, किरीटी; । तया सागरेसीं तुटी । कवणें करावी ? ॥ ५१ ॥ मग सच्चिदैकरसता । स्थिर पूर्णत्वें असतां, । गुणलहरिया समस्ता । क्रीडा करिती. ॥ ५२ ॥ मजचिपासूनि त्या स्फुरती, । मदाधारेंचि क्रीडती, । माझाठाईं सामावती, । मीचि उरें. ॥ ५३ ॥ तेथें करणबोधगुणेसीं । मिनले, प्रकृतियोगें पुरुषेसीं, । उगमापासूनि, परियसीं, । सरिता जैसिया. ॥ ५४ ॥ सागरवरी धावती, । मग जळ तेथें समर्पिती, । तितुलियाही त्या होती । आगें सागरु. ॥ ५५ ॥ करणें बोध सकळ । तेथें अर्थु, कामु, भोगु, जळ, । वाहे अनुकूळ, प्रतिकूळ, । पांडुपुत्रा. ॥ ५६ ॥ ते समस्त तये चिदर्णवीं । मिनती सन्मात्रीं शिवीं, । तेथे न उरे पदवी । तया भेदाची. ॥ ५७ ॥ कामकल्पनालहरिया । सन्मात्रीं जाती विलया, । तरंगांपरी त्रिपुटिया । निमोंचि लागती. ॥ ५८ ॥ उपराठा प्रवाहो चाले, । उगमींचि मावारा मिळे, । वोहटी, भरितें चाले । जैसें सागराचें. ॥ ५९ ॥ भोग्य सामावे करणीं, । करणें भोक्त्याचां स्थानीं, । तो जेथिंचा तेथें अधिष्ठानीं । लीनु होये. ॥ ९९६० ॥ कीं भोक्ता, भोग्य, भोगणें । विचरे जेथें लहरीगुणें, । मग आत्मयाचेनि पूर्णपणें । कैसें होये ? ॥ ६१ ॥ लहरीरूपें होय जळ, । आंगें आंगाचिवरि चचळ, । मग तें आंतरलेपणें केवळ । विचरों लागे. ॥ ६२ ॥ तेथें आदिमध्यावसानीं । दुजें उदकावांचूनि । नाहीं, यास्तव मागुतेनि । तेथेंचि मिळे. ॥ ६३ ॥ एवं अन्वयें, व्यतिरेकें । स्वरूपीं आटलीं कामादिकें, । कर्ता, कार्य, कारणादिकें । आदिकरूनि; ॥ ६४ ॥ भोक्ता, भोग्य, भोगणें जाण, । ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान, । निर्विकारीं सामावोन । गेलीं पूर्णत्वें. ॥ ६५ ॥ अधिष्ठानदृष्टी,

चीरा, । प्रपंचु भ्रमत्वें आभासे खरा, । भेदु नाही सागरा । तरंगादिकीं. ॥ ६६ ॥

स शांतिमाप्नोति

ऐसी निर्विकल्प ब्रह्मनिष्ठा । आणि असंप्रज्ञात, गा सुभटा, । तुजप्रति, वीरश्रेष्ठा, । प्रकट केली. ॥ ६७ ॥ येथें सत्यवस्तूचा निर्वाह, । मोडला प्रपंचाकारु, । अजु, अव्ययो, निरंतरु । आत्माचि जेथें. ॥ ६८ ॥ ते हे अखंड, पूर्णस्थिति; । अर्जुना, अवधारीं शांति; । अभ्यासु करितांही नानायुक्ती । हटात्कारें. ॥ ६९ ॥

कामकामी नाप्नोति

परि एथें नपवे कामिकु, । विषयीं व्यग्र जो बहिर्मुखु, । जया सत्वशुद्धि, ना विवेकु, । धारणा, ध्यान. ॥ ५५७० ॥ जो कीं आसक्त चित्ताचा, । अर्थी सिरकलिये वासनेचा, । भागु न पवे एथींचा । रजतमात्मकु. ॥ ७१ ॥ आतां एथें पावे तो कवणु? । ऐसा करिसील जरि प्रश्नु, । तरि निरोपणीं सावधानु । होऊनि आइकें. ॥ ७२ ॥

विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निस्पृहः ।
निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति. ॥ ७१ ॥

यः पुमान्

पूर्वकृतें नानासुकृतें । सत्वशुद्धि जाली जयातें, । जो कल्हणी ईश्वरातें । सप्रियु नरु, ॥ ७३ ॥ रजतमदोपविहीनु, । शांतु, जिज्ञासु, सर्वज्ञु, । नित्यानित्यद्रष्टा, विचक्षणु । पुरुषु, वीरा; ॥ ७४ ॥ शास्त्राचार्योपदेशें । वैराग्य बाणलें जया असे, । तो काये करी; परियसें, । मोक्षहेतु. ॥ ७५ ॥

सर्वान् कामान्

अर्थाभिलाष सकळ, । इहामुत्रभोग केवळ, । जाणोनियां दुःखमूळ । वासनेसीं, ॥ ७६ ॥

विहाय

सत्यात्मवेदनें सांडूनि, । पुढती नाठवी अर्थ मनीं; । निर्विकल्प, धनुःपाणि । ठेला सांता, ॥ ७७ ॥

निस्पृहश्चरति

अपेक्षा न करी आयुष्याची; । अर्थां, भोगा, संतोषाची, । प्रीति नुपजे स्वर्गसुखाची । असत म्हणौनि. ॥ ७८ ॥ शरीरावरि जो उदासीनु, । न पाहिजे जयातें मानु, । न वर्ते पराधीनु, । अधीनु जना. ॥ ७९ ॥ निंदा, स्तुति परावी । न करी; केळी जे परावी । ते समान सारिखी. अथवी । जाणों लागे. ॥ ९९८० ॥ न इच्छी शब्दु स्तुतीचा, । जनीं न विचरे भिडेचा, । इच्छाचारी, बुद्धीचा । सखोलु म्हणौनि. ॥ ८१ ॥ वस्त्रें, अलंकार, भूषणें, । अनुकूलस्पर्श चदनें, । अपेक्षा न करी, मनें । उदासीनु. ॥ ८२ ॥ रसविषयीं अलोलुपु, । रूपापेक्षणीं निःसकलु, । सर्वा अर्थी लोपु । स्पृहेचा जया. ॥ ८३ ॥ ऐसा विचरे जनीं, वनीं, । तो पुनरपि कैसा मागुतेनि? । सांगैन, अर्जुना, श्रवणीं । स्थिरु हो, पा. ॥ ८४ ॥

निर्ममः

माझें देह, गेह, घनिता, । माझी माता, माझा पिता, । माझें गोत्र, माझा चुलता, । देहसंबंधी, ॥ ८५ ॥ माझा सुहृदु, माझा मित्रु, । माझा सगी, माझा शत्रु, । माझा द्वेष्यु, माझा भ्रातृ, । पितामहो. ॥ ८६ ॥ धन, धान्य, पशु, कुळ, । माझें माझें न म्हणे सकळ; । या ममतात्यागाचें मूळ । आइकें पुढती. ॥ ८७ ॥

निरहंकारः

स्वधर्मी, स्वार्थी, स्वदेहीं । अहंताबुद्धि जया नाहीं, । मीपणाचेया विलयीं । सार्वकाळ जो. ॥ ८८ ॥ देहघटत्वें दृश्य जाणे, । तया साकारा मी न म्हणे, । कर्मास्तव जें धरणें । तें मी कैसेनि? ॥ ८९ ॥ कर्मेंद्रियांचा मी साक्षी, । ज्ञानेंद्रियातें भिन्न लक्षीं, । एतद्वारा अपेक्षीं । विषयजात. ॥ ९९९० ॥ प्राणपंचक जड स्वभावें, । तें दृश्य मातें, मी नव्हे; । नाम, रूप जाणें अधवें, । अतेव द्रष्टा. ॥ ९१ ॥ चंचळा जापु मनाचा, । अनुसंधानात्मका चित्ताचा । प्रकाशकु मी मीपणाचा, । मीही मी नव्हें. ॥ ९२ ॥ जये बुद्धीतें मीचि करीं, । विविक्तज्ञाना विचारीं, । अतेव विवेका अंतरीं । आश्रयभूतु. ॥ ९३ ॥ जें जें होये स्फुरण । तया तयाचें मातें ज्ञान, । दृश्यमात्र, अंतःकरण । द्रष्टा मी तयां. ॥ ९४ ॥ निःशेष स्फुरण आटे, ।

तेथें अज्ञान एक प्रकटे, । तेंही मातेंचि ज्ञेय वाटे । ज्ञानें आपुल्या; ॥ ९५ ॥ तया अज्ञानातें जाणतें । तें ज्ञानही प्रकाश्य मातें, । असो. ज्ञातिमात्रापरुतें । माझें स्वरूप. ॥ ९६ ॥ जागृति, स्वप्न, सुषुप्ति, । तुरियेची जाणे प्रतीति, । तो अवस्था चहूंचा अंतीं । निर्विकल्प मी. ॥ ९७ ॥ तया निर्विकल्पा आत्मयातें । ज्ञातिमात्र तेंही न वर्तें, । अतेव मीपण तया मातें । तें घडेचिना. ॥ ९८ ॥ अनात्मरूप, असत । तें मत्ता दृश्य निरस्त, । म्हणौनि मी नव्हे समस्त । विवर्तु जें कीं. ॥ ९९ ॥ नित्यानित्यविचारें येणें, । आत्मानात्मतत्त्ववेदनें, । अभावलेनि मीपणें । निचरे योगी. ॥ ९६०० ॥

स शांतिमधिगच्छति

तो पूर्वोक्त तये शांती, । निर्विकल्प ब्रह्मस्थिती, । का असंप्रज्ञाते दशेप्रति । पावता होये. ॥ १ ॥ म्हणौनि सकळ काम साडावे, । मी, माझें नाश्रयावें, । तरिचि पद पावावें, । पांडुपुत्रा ॥ २ ॥

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।
स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ ७२ ॥

हे पार्थ

स्थितप्रज्ञाचीं चिन्हें, । अर्जुना, पुसिलीं तुवा लक्षणें, । तें मानिलें आमुचेनि मनें, । म्हणोनि, पार्था, ॥ ३ ॥ तुजप्रति विस्तारिलीं, । सिद्धाचीं लक्षणें बोल्लीं, । साधकभूमिकाही कथिली । विस्तारेंसीं. ॥ ४ ॥

एषा ब्राह्मी स्थितिः

ऐसी हे ब्रह्मस्थिति, । जे कीं कथिली तुजप्रति । चरमदशा बोलती । योगियाची; ॥ ५ ॥ कर्माकर्म ठेलें अपर, । साभास आणि साकार, । देह पाठीं जे स्वस्थिर, । आइक पुढती. ॥ ६ ॥ योग वी सिद्धी पातलें, । विविक्तज्ञानीं मन बोधलें, । पुढती प्रपचु विसरलें, । ते निर्विकल्पस्थिति. ॥ ७ ॥ तेयेंचि अन्वयदृष्टीं । प्रपंचु ब्रह्मत्वें पाहे, किरीटी, । ते असंप्रज्ञात गोमटी । दशा जाणावी. ॥ ८ ॥ एव संप्रज्ञातासंप्रज्ञात । ब्रह्मनिष्ठा निभ्रांत, । तुजप्रति प्रस्तुत । जे कथन केली. ॥ ९ ॥

पतो भाव्य

कर्मानुष्ठानता, वीरा, । सत्वशुद्धी, ज्ञानद्वारा, । ईतें पावती योगेश्वरा- । माजिचे श्रेष्ठ. ॥ ९६१० ॥ शमदमसाधनयोगें, । एकांतवासें, गुरुमार्गे, । निवृत्तिज्ञानाचेनि अंगें । जाणति तत्वज्ञ. ॥ ११ ॥ मग जाणोनि निष्ठा करिती, । स्वस्वरूप पूर्ण अनुभविती, । मेदु सर्वत्र विसरती । अखंडावबोधें. ॥ १२ ॥ ऐसी ब्रह्मीं अखंडता, । विचारें या सुलीनता, । समाप्त जाली असता । योगी कैसा? ॥ १३ ॥

न मुह्यति

पुनरपि न ये ससारा, । नलगे अविद्येचा वारा, । तम जैसें त्या दिनकरा, । तैसें या अज्ञान. ॥ १४ ॥ गुणत्रयसूत्र तुटलें, । देहचतुष्टय निमालें, । पुढती स्फुरावें तें करपलें । बीजचि आधीं. ॥ १५ ॥ बधमोक्षाची चिंता । पुनरपि नाहीं त्या, पार्था, । जीवत्व नाशलें असतां । पुढती कैचें? ॥ १६ ॥ संसारयात्रा चुकली, । यमाची शंका गेली, । द्वैताची होळी जाली । एकुदाचि कीं. ॥ १७ ॥ पुनरपि कर्मे न गुपे, । पुनरपि मोहें न चेंपे, । पुनरपि अभ्यासें दुःखरूपें । श्रमेचिना. ॥ १८ ॥ पुढती न विचारी शास्त्रें, । नुच्चारी नामें आणि गोत्रें, । उपवासें, मंत्रें, यंत्रें, । पिटेचिना. ॥ १९ ॥ पुढती तो न करी गुरु, । न पुसे पुढती विचारु, । न श्रमे साधनपरु । जन्मशून्यत्वें. ॥ ९६२० ॥ ईश्वरु कवणु? हे पुढती । न पुसे मायेची स्थिति, । जीवु, अविद्या, हे उक्ति । वदेचिना. ॥ २१ ॥ उपक्रमोपसहारज्ञान । न पुसे प्रपंचाचें, जाण, । न विचारी ब्रह्म, निरजन । सर्वथैव पुनः ॥ २२ ॥ समाधिस्थितिदशेतें । पुढती नपवे, हें निरुतें, । जो स्वयं ब्रह्म योगमतें । योगी जाला. ॥ २३ ॥ आणि जैसा उदयो जाला, । ब्रह्मसूर्यो प्रकटला, । तो अस्तमाना विसरला । पुढती जाणें. ॥ २४ ॥ ऐशी दशा बाणली, । योगनिष्ठा पक्व जाली, । पुढती जन्मकर्मे कुंठलीं । साधकाचीं. ॥ २५ ॥ आतां, जो साधनीं अशक्तु, । विचक्षणु, श्रद्धावंतु, । पावला असतां देहांतु, । भक्ति धरी. ॥ २६ ॥ तयातें कैसें, अर्जुना, । होये? सागैन, तें मना । आणीं, मग वासना । तेचि करीं. ॥ २७ ॥

अंतकालेऽपि

वय तव भावो नुपजेचि, । वय तव गुरु न जोडेचि, । वय तव निष्ठा योगाची । कळेचिना. ॥ २८ ॥ वय तेव्हा ज्ञान चुकलें, । वय तव अज्ञानचि भोगिलें, । वय तव जोडी जोडिले । जन्मादिक. ॥ २९ ॥ वय तव भोगिले कष्ट, । का वय तव सुख उत्कृष्ट, । वय तव मोक्षवाट । आगे-चिना. ॥ ९६३० ॥ कर्में केलीं शुभाशुभें, । फळें साचिलीं विषगर्भें, । नानायोनींचेनि लाभें । एकाधेन. ॥ ३१ ॥ मग देहातु आरमला, । पूर्वसुकृतांशु उभा ठाला, । काये नेणों आराधिला । होता ईश्वरु? ॥ ३२ ॥ नेणों पूर्वीचि योग साधिले, । निमित्यें येकें देह धरिले, । कवं नये तें केलें । कर्म येणें. ॥ ३३ ॥ कीं हा निजगणु देवाचा । च्यवला होता, हा बोलु साचा, । मग अंतकाळीं तयाचा । भावो पालटे ॥ ३४ ॥ निज-भक्ताचा वेळाइतु । ईश्वरु गुरुत्वें जाला व्यक्तु, । तो तेणें काळें त्वरितु । तेथें पावला. ॥ ३५ ॥ पाहोनि तयाचें श्रीमुख, । मरणशीळातें सात्विक । भाव उठिले, आइक, । तेव्हेळीं कैसे? ॥ ३६ ॥ सर्वांगीं रोमांच उठिले, । कंपस्वेदादिक पातले, । कंठीं बाष्प दाटलें, । प्रेमळा मति. ॥ ३७ ॥ म्हणे, “ जयजयाजी अवधूता, । भक्तजनकृपावंता, । यये काळीं सोडविता । तूंचि येकु ॥ ३८ ॥ निजसेवकातें तू तारु, । निजमायाधारी ईश्वरु, । तुझेया स्वरूपाचा पारु । वेद नेणती. ॥ ३९ ॥ अनाथांचा तू नाथु, । संसारदुःखाचा अंतु, । माया, अविद्याविवर्तु । फिटे जेणें. ॥ ९६४० ॥ योगी न विसंबती तूतें, । अंतर न साहे तत्वज्ञांतें, । स्वर्गवासियें देवतें । रक्षीं म्हणती; ॥ ४१ ॥ तया समस्तातें सांडूनि, । प्रगटलासि मज-लागूनि, । तुझिये कृपे, मुक्तिपाणि, । नाहीं पारु. ॥ ४२ ॥ जन्मौनि मी तूतें चूकला, । एसणा अपराधु क्षमा केला, । दर्शनमात्रें नाशिला । माझा संसारु. ॥ ४३ ॥ नवल नाथी, एथें स्वामी, । तूतें तोषवावें काय आम्ही? । दीनदयाळुवाचा मार्मी, । अर्जन नसे. ॥ ४४ ॥ आता पिकलें मोक्षफळ, । तुटलें संसारभय सकळ, । देखिलें श्रीपादयुगुळ, । सानदला मी. ॥ ४५ ॥ ऐसा ईश्वर दृष्टी पाहे, । गुरूतें शरणागतु होये, । वासनामुक्तु साता ठाये । चरणीं तू. ॥ ४६ ॥ मग तो कृपामेघु परियसे । तत्वोपदेश-ज्ञानें वर्षे, । तेव्हेळीं हृदयीं प्रवेशे । ब्रह्मस्थिति, गा. ॥ ४७ ॥

अस्यां स्थित्वा

क्षणेकु राहे तेथें मन, । जाण, सर्वोपाधिनिरशन, । अभेद तत्वानुसंधान, । पांडुपुत्रा. ॥ ४८ ॥ मग तयाची स्थिति असतां, । देह पडे पांडुसुता, । तो न उपजे मागुता । ऐथें ससारीं. ४९ ॥

ब्रह्मनिर्वाणमृच्छति

जळीं तरंगु निमाला । तो पुडती नाहीं उपजला, । तैसा ब्रह्मीं सामावला । योगिराजु तो. ॥ १६५० ॥ घटाभावीं घटांबर । अंबरीं जैसें निरंतर, । तैसें देहत्यागें नश्वर । सर्व नाशलें. ॥ ५१ ॥ तेथें सन्मात्रचि एक उरलें, । भेदभान हारपलें, । मरणचि मोक्षु बोलिलें । तें ऐसियातें. ॥ ५२ ॥ ब्रह्मस्थिति जे हे कथिली । म्यां हे निष्ठा आपुली, । इयेची सिद्धि बोलिली, । ते विवेकेंचि कीं. ॥ ५३ ॥ तो गुरुमुखें विवेकु आइकावा, । आइकोनि मनीं धरावा, । तत्क्षणेंचि निरसावा । ससारु हा. ॥ ५४ ॥ इतुकें द्वारकानायकु । बोलिला श्रीकृष्णु व्यापकु, । मग तो नक्तंचरांतकु । उगाचि ठेला. ॥ १६५५ ॥

ॐ तत्सदिति श्रीमन्महाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैय्यासिक्यां भीष्मपर्वणि श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे दिगंबरानुचरकृतप्राकृतटीकायाः सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ।

---

# गीतार्णव.

## ( अध्याय बारावा. )

श्रीमद्दत्तात्रेयाय नमः । जयजया जी आनंदघना, । जयजया जी परमनिधाना, । जयजया पुराणा । पुरुषोत्तमा. ॥ १ ॥ जयजया आनंदकंदा, । श्रीअवधूता पूर्णबोधा । परब्रह्म, अगाधा, । पार्षदपति. ॥ २ ॥ भक्तजनचिंतामणि, । निजात्मविद्येची तू खाणी, । तुझेनि स्मरणें धूणी । दोषांची होये. ॥ ३ ॥ भवचक्राचा तू नियता, । सायुज्यमोक्षाचा दाता, । त्राहि त्राहि, अवधूता । कृपाळुवा. ॥ ४ ॥ अज्ञानतमीं तू भास्करु, । ज्ञानफळदाता कल्पतरु, । न कळे, न कळे पारु । तुझिया स्वरूपाचा ॥ ५ ॥ दीनदयाळुवा, सुरपति, । ऐसणी कैंची माझी मति ? । तूतें स्तवावया युक्ति । ते स्फुरेचिना, जी. ॥ ६ ॥ मातें पदार्थ अपूर्ण । ते तुझी कल्पना सर्व, । आता उपमाचे भाव । ते सरी न पवती ॥ ७ ॥ अयोग्य देता दृष्टातु । स्तुतीचा नव्हे प्रवर्तु, । परतु दोषारोपणविल्यातु । सिध्दु सपादे. ॥ ८ ॥ स्फटिका ऐसा तू तेजाळा, । कीं तदुलपिष्टाचा गोळा, । सोमा, सोमु नव्हेसि, सिरगोळा । केवळ तू ॥ ९ ॥ ऐसें उपमान देता हीन । तें मूर्खत्व, परि नव्हे स्तवन, । परतु जया नाहीं ज्ञान । तेणें काये करावें ? ॥ १० ॥ आता सर्वज्ञें येक करावें, । प्रेमचि वोळखोनि ध्यावें, । जर्‍ही तें योग्य नव्हे । आपणा स्तुती, ॥ ११ ॥ तर्‍ही ते योग्यचि मानावी, । पूर्णत्वें स्वीकारावी, । का जे प्रीतीहूनि थोर भावों । तसे भक्ताचा. ॥ १२ ॥ तैसें जाणावें सर्वज्ञें । माझें मूर्खत्वाचें बोलणें, । परी काये कीजेल म्या अज्ञानें ? । युक्ति नाहीं ॥ १३ ॥ आता तुजवेगळें कांहीं । प्रिय तें मातें नाहीं । श्रीअवधूता, हृदयीं । तुझेंचि ध्यान ॥ १४ ॥ म्हणोनि माझा अज्ञानवादु । तो मानावा, स्वामी, शब्दु, । प्रकट करावा बोधु । निजस्वरूपाचा ॥ १५ ॥ जेणें मीं तूतें जाणेन, । भगवंता, पार पावेन, । म्हणोनि करीं नमन । पुन पुन ॥ १६ ॥ ऐसा नमूनि श्रीअवधूतु । आरभीजतु असें गीतार्थु, । तो सिद्धी पावो समस्तु । त्याचेनि स्मरणें ॥ १७ ॥ मागां एकादशु अध्यावो । सफळ मुक्तीचा ठावो. । तेथें अर्जुनातें देवो ।

बोधितु असतां ॥ १८ ॥ विश्वरूप प्रकटु केलें । श्रीकृष्णें स्वरूप आ-
पुलें; । तें देखोनि भय वाटलें । अर्जुनासि. ॥ १९ ॥ म्हणौनि तो वैकुं-
ठराणा । आश्वासिता झाला अर्जुना, । मग विश्वरूपआख्याना । सांगत
असतां ॥ २० ॥ म्हणे, "गा अर्जुना, । ऐसा मी न कळें कव्हणा; ।
जन्ही करिजती नाना । तपें, सुकृतें. ॥ २१ ॥ तो अनन्यभक्ती मी कळें,
जाण, । शास्त्रद्वारा माझें ज्ञान, । मग जाणितलया माझी खूण । दृष्टीही
दिसें. ॥ २२ ॥ देखिलियावरि, पार्था, । मग कळें मी स्वरूपें तत्वता. ।
तत्त्वं पदाची शुद्धता । प्रकट होये. ॥ २३ ॥ जाल्या माझें सत्यज्ञान ।
सर्वेचि होये येकपण. । जीवनीं मीने जीवन । जयापरी." ॥ २४ ॥
ऐसें भक्तियोगें तत्व कळे, । आणिकां उपायीं न कळे; । तें भक्तियोगु सा-
धन सूचिलें । नारायणें. ॥ २५ ॥ मत्कर्मकृत, म्हणौनि । भक्ति सांगि-
तली संक्षेपेंकरूनि. । ते अर्जुनें आयिकोनि । केली आशंका. ॥ २६ ॥

अर्जुन उवाच :

एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।
ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥

अर्जुनु म्हणे, "नारायणा, । गोपीपते, श्रीकृष्णा, । तुझी अनन्यउपासना ।
तेंचि साधन ॥ २७ ॥ तूतें जाणावया, देखावया, । स्वरूपीं ऐक्य पावा-
वया; । म्हणौनि भक्त, श्रीकृष्णराया, । श्रेष्ठ सर्वांहूनि; ॥ २८ ॥ परतु येक ते
भजती सगुण, । येणेंचि प्रकारेंकरून । जैसें केलें निरोपण । आतां तुवां.
॥ २९ ॥ विहित करूनि समर्पिती, । कां तुझाचि आज्ञा करिती, ।
कायें वाचनें भजती । सगुणरूप. ॥ ३० ॥ तूचि परमु जाणौनि, ।
तुज वेगळा संगु सांडूनि । सर्वत्र निर्वैर होऊनि । विश्वरूपज्ञानें. ॥ ३१ ॥
ऐसें भजन साकार । तुवां सांगितलें परिकर, । तेणेंचि प्रकारें चतुर, ।
आस्थावंत. ॥ ३२ ॥

ये सततयुक्ता भक्ताः

जे सार्वकाळ नित्ययुक्त, । चित्तयोगें ध्यानस्थ, । बाह्याचरण समस्त ।
ते तुझीचि सेवा. ॥ ३३ ॥ अन्यवृत्तींचा निरासु, । तुझा भजनीं अति
सोसु, । विषयीं जाला विरसु । तेणें जयां; ॥ ३४ ॥

ये चाप्यक्षरमव्यक्तं त्वां पर्युपासते

तुझी करिती उपासना । सगुण भक्त, श्रीकृष्णा, । तुजवेगळें असेचिना । दैवत जयां; ॥ ३५ ॥ आणि अव्यक्त, अक्षर, पूर्ण, । ब्रह्म निराकार, निर्गुण, । तेंचि उपासिती जन । तेही येक. ॥ ३६ ॥ एवं येक, श्रीचक्रपाणि, । भजती सगुण आश्रयूनि, । येक ते केवळ निर्गुणीं । वृत्ति ठेविती. ॥ ३७ ॥

तेषां के योगवित्तमाः

तयांमाजी विचक्षण, । श्रेष्ट योगी ते कवण, । जयांचें अविघ्न साधन । सिद्धी पावे? ॥ ३८ ॥

श्रीभगवानुवाच

मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।
श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥

ऐसें अनुवादला, अर्जुनु, । जाणोनि केला प्रश्नु; । आतां हा लक्ष्मीनारायणु । उत्तर देतुसे. ॥ ३९ ॥

ये

कृष्ण म्हणे, अर्जुना, । जें तुवां पुसिलें, विचक्षणा, । तें आलें आमुचिया मना; । आतां अवधारीं. ॥ ४० ॥ तरि शांत आणि विरक्त, । निर्वैर जे माझे भक्त, । माझेंचि भजन निहित । कर्म जयांतें, ॥ ४१ ॥

श्रद्धया परयोपेताः

परम श्रद्धा माझा ठायीं । जयांतें, अर्जुना, जाणई; । प्रेमें संपूर्ण हृदयीं । ज्यानीं लोधले, ॥ ४२ ॥

मय्यावेश्य मनः

मग ध्यानयोगाचिये स्थिती । मन माझांचि ठायीं आंतरिती, । सांडूनि बाह्यांतर वृत्ति । विषयावलंबन, ॥ ४३ ॥

नित्ययुक्ताः

मग तियाचि स्थिती सार्वकाळ । अंतरनिष्ठ जे निश्चळ; । सांडूनि सर्व चळवळ । इंद्रियांची, ॥ ४४ ॥ अथवा श्रद्धायुक्त होऊनि । प्रवर्तले जे माझा भजनीं, । ते मज येकांतांचुनि । नेणती दुजें. ॥ ४५ ॥ स्मरणें,

कीर्तनें, सेवनें, । अर्चनें, वंदनें, स्तवनें । माझांचि ठायीं मनें । नित्य जयांचीं; ॥ ४६ ॥ जागृति तेचि आचारु, । स्वप्नीं जयां व्यापारु, । जो जो उपजे वृत्त्यंकुरु । तो मातेंचि कवळी; ॥ ४७ ॥ यापरी सार्वकाळ, किरीटी, । मजसीं नाहीं जया तुटी, । ते भक्त, जे गोष्टी । नाइकती मजविण. ॥ ४८ ॥

मामुपासते

मनें नित्य माझें ध्यान, । श्रवणीं आइकती कीर्तन, । क्षणक्षणा नामगर्जन । करूंचि लागले; ॥ ४९ ॥ पूजा, स्तुति, नमस्कार । करिताहीं बाह्याचार, । माझांचि ठायीं स्थिर, । दुर्जे नाशयिती; ॥ ५० ॥ ऐसें अनन्यभक्तिभावें । मातें सेविती प्रेमें बहुवें, । सगुण आराधिती बरवें । येणेंप्रकारें जे, ॥ ५१ ॥

ते युक्ततमाः

ते योगियांमाजी श्रेष्ठ, । नाना श्रेष्ठांमाजी उत्कृष्ट, । माझां मार्गी नीट । लागले असती. ॥ ५२ ॥

मे मताः

लोक म्हणतु कां भलतैसें । परी मातें मानलें हें तंव ऐसें; । वचन नमनीं अनारिसें, । भक्तश्रेष्ठा. ॥ ५३ ॥ आतां सगुणउपासकां श्रेष्ठपण । तरि निर्गुणउपासकां गति कवण ? । ऐसें बोलसील वचन । तरि मातु अवधारीं. ॥ ५४ ॥

ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।
सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥

अक्षरम्

अर्जुना, अविनाश तें अक्षर, । क्षरें प्रकृतिहूनि पर, । निर्विकल्प, निरंतर, । गुणातीत, ॥ ५५ ॥ अवस्थाचतुष्टयीं आभासे, । तो परस्परां सकळ नाशे, । प्रपंचु क्षर असे । म्हणौनिया तो. ॥ ५६ ॥ प्रपंचु देहे अवस्था-गुण, । ऐसें क्षरप्रकृतिभान, । अविनाश, अक्षर अधिष्ठान । तें तयाचेनि निरासें; ॥ ५७ ॥

अनिर्देश्यम्

देशें, काळें अपरिच्छिन्न, । वस्तुलें नामरूपशून्य, । निर्धारिजे ऐसी खूण ।

तें नाहींचि जया, ॥ ५८ ॥ कवणें लक्षणें लक्षावें ? । रूपें कवणें तें भजावें ? । कवण अभिधान मानावें । तया शुद्धा ? ॥ ५९ ॥

अव्यक्तम्

मन, बुद्धि, करणें होती, । परी तया न ये जें व्यक्ती, । शून्य तरि आथी । येकी शून्यता. ॥ ६० ॥ शून्य ना साभास स्वभावें, । कळे ऐसें जें कीरु नव्हे, । तें अव्यक्त अनुभवें । कैसें पुडती ? ॥ ६१ ॥ ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान, । ययाचें आत्मा अधिष्ठान, । तयातें जाणतें कवण । म्हणोनि अव्यक्त ॥ ६२ ॥ असो अक्षर तें अविनाशी, । अनिर्देश्य, अनाम पारियेसीं, । आणि व्यक्ति, वर्णु जयासि । तो असेचिना. ॥ ६३ ॥

सर्वत्रगम्

नाहीं येकदेशीं जया स्थान, । सर्वत्र व्यापक, निर्गुण, । सत्ता जयाचिया सकळ भान । आभासों लागे. ॥ ६४ ॥ कार्यकारण प्रकृतिद्वय । गुणभानमात्रज्ञेय, । नामरूपात्मक ध्येय । तें आभासे जेणें, ॥ ६५ ॥ सर्वव्यापी, अनुश्रुत, । बाह्यांतरीं तद्वत, । पूर्ण परब्रह्म समस्त, । परतु कसें ? ॥ ६६ ॥

अचिन्त्य च

पाहतया चित्ता अधिष्ठान, । आणि विशेषें रूपशून्य, । अतादिमध्यविहीन । म्हणौनिया ॥ ६७ ॥ कैसें, करण, केसणें, । हें सर्वथा नानुमाने, । म्हणौनि अचिंत्य ऐसें जाणे । अगोचर. ॥ ६८ ॥

कूटस्थम्

अनंतें ब्रह्मांडें हा विवर्तु । जये ठायीं होतु, जातु, । परतु तया भानाचा सघातु । न धरूनियां ॥ ६९ ॥ सर्व व्यापूनि जैसें तैसें । ठायींचे ठायींचि नित्य असे, । न चळे, न ढळे आपसें । निर्विकार. ॥ ७० ॥ एव ठायींचे ठायीं असोनि । राहिलें सर्व व्यापोनि, । पूर्ण अधिष्ठान, घनुःपाणि, । गगना ऐसें. ॥ ७१ ॥

अचलम्

जाणता भानचि विलुळे, । शेष अधिष्ठान तें न चळे, । आगें आग कोंदाटलें । म्हणौनिया ॥ ७२ ॥ कल्पांतीं जैसें जीवन । तें गर्भी सदाट म्हणौन । चचळ नव्हे आपण । निश्चळ असे, ॥ ७३ ॥ तेसें भावनेतें नाकळे । आणि अभावाहूनि वेगळें । पूर्णपणें मांडलें । तें अचळ तत्त्व. ॥ ७४ ॥

ध्रुवम्

ऐशी अचल जयाची स्थिति, । तीपासाव, वीरपति, । न ढळे जें की निरुती । म्हणौनि ध्रुव. ॥ ७५ ॥ लयोद्भव पुन पुनः । होती, जाती, अर्जुना, । परतु जें ढळेना । आपुलिये स्थिती. ॥ ७६ ॥ होती, जाती अवस्था । परी पाल्टु नाहीं जया स्वस्था, । जें आपुली निर्विकारता । तीपासाव न ढळे. ॥ ७७ ॥ व्यतिरेकान्वयें बोधु । परी जयाचा स्वभावो सिद्धु, । तयापासाव प्रमादु । घेऊनि न ढळे. ॥ ७८ ॥ कीं अढळ म्हणिजे कैसें? । गुणीं चाळिता न चळे ऐसें; । एव निर्गुण स्वरूप तें ऐसें । गार्शे जाण. ॥ ७९ ॥

ये तु पर्युपासते

ययातें जे सेविती, । सगुण आश्रयो न करिती, । तयाचा अभ्यासु, वीरपति, । तो या कैसा? ॥ ८० ॥

सन्नियम्येंद्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।
ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रता. ॥ ४ ॥

इंद्रियग्रामं सन्नियम्य

इंद्रियसमूहाचें दमन । करिता नावरे तें मन, । आणि चचळ मनेंकरून । विवेकु न स्फुरे. ॥ ८१ ॥ स्वात्मविचारु न स्फुरता । न नासे अज्ञान सर्वथा, । स्वरूपप्रकाशाची कथा । ते तेथें कायशी? ॥८२॥ स्वरूपप्रकाशेंवाचून । नाहीं अपरोक्षब्रह्मज्ञान, । व्यतिरेकान्वयसवेदन । न स्फुरे दशा. ॥ ८३ ॥ म्हणोनि मोक्षाचिये सिद्धी । इंद्रियनियमु तो आधीं । पाहिजे, गा, त्रिशुद्धी । दमादिसाधन. ॥ ८४ ॥ प्रत्याहारु, प्राणनियमु, । जिकावा देहधर्मु, । धारणाचतुष्टय आगमु । सपादिजे. ॥ ८५ ॥ प्राणधारणा, देहधारणा, । मनधारणा, आसनधारणा; । जिंकावें मना, इंद्रियगणा । यथाचेनि बळें. ॥ ८६ ॥ प्रत्याहारें जयो आसनीं, । आसनजयें तेणेंकरूनि । इंद्रियनियमु, धनु पाणि, । होनि लागे. ॥ ८७ ॥ देहादिकरणनियमें । बहिर्मुखतावृत्ति शमे, । मग स्फुरिजे मनोधर्में । अतर्मुख. ॥ ८८ ॥ बाह्यनिग्रहो तो दमु, । अतरनिग्रहो तो शमु, । या दोहींकरिता गुणधर्मु । आटे वृत्तिवेगु. ॥ ८९ ॥ मग अतरीं स्वस्थ मन । जाळें असता वृत्तिक्षीण, । मग तयापासाव ज्ञान । स्फुरे आत्मविषयीं. ॥ ९० ॥ उदक

असतां चंचल । प्रतिबिंब नव्हे निश्चळ, । मुख पाहतां केवळ । दृष्टीही न धरे. ॥ ९१॥ कीं वाठाणीं न लगे दीपु, । तैसा मनादिइंद्रियकंपु, । तो विवेकाचा आटोपु । नेदी उमटों. ॥ ९२ ॥ आतां शमदमादिसाधनीं । जालिये निश्चळतेपासूनि । विवेक उपजे अविद्यानीं; । तेणें कैसे ? ॥ ९३ ॥

सर्वत्र समबुद्धयः

सर्वत्र समानबुद्धि स्फुरे, । विषमभावना ते नुरे, । तो प्रकारु, बा रे, । सांगिजैल. ॥ ९४ ॥ दृश्यमान चराचर । तें सारिखेंचि मिथ्या समग्र, । अरि, मित्र, आप, पर । आदिकरूनि. ॥ ९५ ॥ स्वर्गु, संसारु हे दोन्ही । न भासती विशेषाविशेषगुणीं; । नाना देहव्यतिरेकेंकरूनि । सर्व मिथ्या. ॥ ९६ ॥ स्वदेह आणि परदेह, । दृश्य पांचभौतिककार्य, । सारिखेंचि मायामय । विवर्तु जया; ॥ ९७ ॥ देहव्यतिरेकें, किरीटी, । पाहतां तिया शून्यदृष्टी । भान आटे पोटीं । अभावाचां. ॥ ९८ ॥ मग अभावाची भावना । ते दृश्यत्वें सांडी देखणा; । तेथें स्वस्वरूपसंभावना । तिया देखे. ॥ ९९ ॥ मग स्वरूपदृष्टी सर्व सम; । जयां नाम, रूप, ना गुण, धर्म, । वर्णु, व्यक्ति, कर्माकर्म । सर्व सारिखेचि. ॥ १०० ॥ यापरी शमदमाचेनि वळें । पाहतां देहावेगळें । तयाचिये बुद्धी कळे । सहज समत्व. ॥ १ ॥ देहाचेनि दृश्यपणें । सकळ दृश्यचि जाणणें, । तें अनात्मतत्व मानणें । सारिखें सकळ. ॥ २ ॥ अभावें देहाचेनि वावो । सकळप्रपंचाचा अभावो, । म्हणौनि शून्यदृष्टिभावो । तो येकु समतेचा. ॥ ३ ॥ अभावाचेनि द्रष्टेपणें । आत्मा विवेकें जाणणें, । मग तोचि लक्षितां पूर्णपणें । समता बुद्धी. ॥ ४ ॥ अथवा समतेचें लक्षण । साधनीं अनारिसें जाण, । प्रथमाविकारें बहुतकरून । तेंचि वरवें. ॥ ५ ॥ शमदमें केळी स्थिरता, । तिचा यत्नु तोचि समता; । अभिप्रावो आइकें, पार्था, । बोधिजशील. ॥ ६ ॥ प्रपचीं असतां विषयदर्शन । स्थिर न होती इंद्रियगण, । प्रयत्नें आंवरिलेंही मनें । तें जाये निघोनि. ॥ ७ ॥ हानीस्तव संतापु; शोकु । उठी ममतेद्वारा बाधकु; । तो मना इंद्रियांचा सकळैकु । जयो मोडी. ॥ ८ ॥ लाभें संतोषु उपजे, । तेणें मदु महा माजे; । विक्षेपु मनातें वाजे । सारिखाचि तो. ॥ ९ ॥ अहंते ममतेचें कारण । तें केवळ विषमदर्शन, । मग पदार्थाचें उच्चनीचपण । तेंचि ध्याना ये. ॥ ११० ॥ अर्थाचिया

अत्यासक्ती । दातयावरि उपजे प्रीति, । येर नावडे चित्तीं । नसुधाचि जो. ॥ ११ ॥ स्वार्थी खंडी तो वैरी, । मग अभिमानु, क्रोधु शरीरीं, । शोक, मोह नानापरी । पडती जयांतें. ॥ १२ ॥ म्हणौनि नित्य निष्ठा पाहिजे । तरि समता आधीं लाहिजे, । प्रियाप्रिय नमानिजे । बुद्धीचेनि बळें. ॥ १३ ॥ विचारें सर्व असंत, । विचारें बाधक समस्त, । विचारें प्राचीन निश्चित । भोगीं जाणावें. ॥ १४ ॥ विवेकें सर्व नश्वर । जाणतां वासना न करी घर, । प्रारब्धसंबंधी शरीर । ऐसें जाणोनि, ॥ १५ ॥ हानि, लाभ, जिर्णे, मरण; । आप, पर, अरीमित्रपण; । देहव्यतिरेकेंकरून । बुद्धिद्वारा. ॥ १६ ॥ ममताशून्यत्वें सारिखें । दिसे भान विवेकें, । ते समबुद्धि, आइकें, । हर्षविषादशून्य. ॥ १७ ॥

सर्वभूतहिते रताः

ऐसें नियमूनि प्रकृतीसि । सर्वत्र जे समदर्शी । तयांचिये योगमुद्रेसि । नव्हे भगु. ॥ १८ ॥ तयांचें येक लक्षण । बहिरंग, पार्था, जाण; । सर्वभूतहितीं मन । विरत होये. ॥ १९ ॥ सकळांतें हो सतोषु, । न व्हावा कव्हणा त्रासु, । ऐसा भूतकृपेचा विकासु । होंचि लागे. ॥ १२० ॥ कीं सर्वा भूतांचें हित । आत्मा आत्मज्ञान निश्चित, । तेथेंचि क्रीडे चित्त । तयां योगियाचें. ॥ २१ ॥ जे क्षणीं न करी विचारु । ते क्षणीं पडे अंधकारु, । तो शमदमातें करी मारु; । वृत्ति उपजवी. ॥ २२ ॥ शम, दम जेणें करावे । तेणें विवेकोन्मुखचि सदा असावें, । आत्मज्ञानींचि क्रीडावें, । ऐसें आहे. ॥ २३ ॥ विचारा आधारें मन स्थिर, । विचारेंचि राहे शरीर. । असो. विवेकीं करावें घर । सार्वकाळ. ॥ २४ ॥ एव शमु, दमु, समता । आणि अंतर्मुख ज्ञाननिष्ठता । हें सार्वकाळ न सोडितां । साधन होये. ॥ २५ ॥ सगुणाचा आश्रयो जो न करी, । अभ्यासबळेंचि निराकारीं । भजे भक्त निर्विकारीं । तो प्रकारें येणें. ॥ २६ ॥

तेपि मामेव प्राप्नुवन्ति

'आतां ऐसेही अभ्यासवंत । ते मातेंचि पावती समस्त, । जेव्हेळीं तें साधनमत । सिद्धी पावे. ॥ २७ ॥ सागरीं वर्षती मेघ । तेथें तयां धारांचें अंग । पडताचि सवेग । सागरु होये. ॥ २८ ॥ पुढती नाहीं निवडणें । नामें, रूपें, भेदें, गुणें. । अर्जुना, निर्गुणा मातें पावणें । तें ऐसें आहे. ॥ २९ ॥

सगुणा माझी भेटी । ते पाहों ये भिन्नदृष्टी; । आइकिजे, बोलिजे गोष्टी, । भजिजे भेदें. ॥ ३० ॥ निर्गुणा मातें पावणें । तें मीचि होऊनि असणें, । सर्व न होऊनि होणें । अवचेंचि मग. ॥ ३१ ॥ एव सगुण उपासना करिती । ते श्रेष्ठ योगी, गा वीरपति । आणि ज्ञाननिष्ठ तो सिद्धांतीं । मीचि होयें. ॥ ३२ ॥ ऐसें आइकोनि बोलणें । अर्जुनाचेनि अंतःकरणें । आशका धरिली. तो काये म्हणे, । "अगा गोपिनाथा, ॥ ३३ ॥ निर्गुणउपासना करिती । ते तूंचि होऊनि असती, । अखड न मोडे ब्रह्मस्थिति । व्यतिरेकान्वयें. ॥ ३४ ॥ आतां सगुण उपासक । ते भेदवादी, सेवक; । नेणती स्वरूप व्यापक । ऐसें असता, ॥ ३५ ॥ निर्गुणउपासकांहूनि । सगुणभक्त, श्रीचक्रपाणि, । श्रेष्ठ कैसे तुझ्या वचनीं । आम्हीं जाणावे? ॥ ३६ ॥ श्रेष्ठ राजा कीं सेवकु? । देवो किंवा उपासकु? । तुम्हीं सांगितला निवेकु । तो उपराठा गमे." ॥ ३७ ॥ ऐशिया आक्षेपा परिहार । करिता झाला श्रीचक्रधर । म्हणे, "अर्जुना, स्थिर, स्थिर । आइकें निरोपण. ॥ ३८ ॥ निर्गुणउपासकु जाणे । तया सिद्धदशे मीचि होणें, । परतु साधनभूमिका क्रमणें । ते वेगळीचि कीं. ॥ ३९ ॥ भक्तु भेदें मातें भजे, । तिये भक्तीचें फळ उपजे, । तें मीचि होयें सहजें । माझा भक्तु. ॥ १४० ॥ सिद्धांतीं मीचि होणें । उभयतांसि असे, जाणें, । आता दोघे करिती साधनें । तेथें भेदुचि कीं. ॥ ४१ ॥ सिद्ध लक्षूनिया ज्ञानी । भक्तु लक्षितासि साधनीं, । येणें तुझां अंतःकरणीं । सशयो गमे. ॥ ४२ ॥ आतां तें सांडूनि मत । वचन आइकें निश्चित, । निर्गुणसगुणभजनवंत । वर्तत असता ॥ ४३ ॥ साधनाची सिद्धि होता, । मज अव्ययातें पावता । उणें, आगळें सर्वथा । तें आथीचिना. ॥ ४४ ॥ भूमीचें आणि आकाशींचें । जळ सागरीं मिने साचें, । तें उभयत्व सरितांचें । सागरुचि होये. ॥ ४५ ॥ तैसें भक्तु आणि ज्ञानी । मिनल्या माझां स्थानीं । सारिखेचि, धनु पाणि, । ऐसें जाणावें. ॥ ४६ ॥ तया साधनभूमिका क्रमितां । कैंची, बापा, व्यापकता? । येकदेशित्व आणि, पार्था, । भेदु वर्तेचि ॥ ४७ ॥ परि तयामाजी, जाण, । भक्ति हें साधन सोपान । आणि अतिशीघ्र, जाण, । फळातें दे. ॥ ४८ ॥ ज्ञानाश्रयेंचि जें साधन । तें साधिता अति कठिण, । शीघ्र न टके माझें स्थान । स्वस्वरूप.

॥ ४९ ॥ म्हणोनि भक्त तो शीघ्र पावे, । न ढळे, न परते स्वभावें, । म्हणौनि आगळा जाणावें । माझिये मती. ॥ १५० ॥ आंगेंचि सागर. तरणें । सुजांचेनि बळें, जाणें, ॥ त्याहूनि तारुवीं बैसणें । तया भय नाहीं. ॥ ५१ ॥ डोळसासवें चालतां । मार्गु न भुलिजे, गा, सर्वथा; । जें निजदृष्टीतें तत्वता । दिसों नये. ॥ ५२ ॥ आंगेंचि बळ करणें, । आश्रयो दुजयाचा न करणें, । ऐशा साधनीं परतणें । हें मुद्दलचि असे. ॥ ५३ ॥ सहस्रामाजी येकाधा । परपारु मावेल, गा शुद्धा; । येरां परती अबुद्धां । ऐसें असतां, ॥ ५४ ॥ सदाधारें जो योगु । तोचि मोक्षोपावो चांगु, । तयातें नाहीं मगु । ऐसा निश्चयो. ॥ ५५ ॥ आतां माझेनि वचनाश्रयें । योगु दुर्गमु कैसा आहे, । तो मी सांगैन, राहें, । अर्जुना, स्थिरु. ॥ ५६ ॥

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ॥
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥

अव्यक्तासक्तचेतसाम्.

जया साधकाचें चित्त । केवळ अव्यक्तीं आसक्त; । मिथ्या मानूनि व्यक्त । साधनीं प्रवर्तले, ॥ ५७ ॥ साकार-दृश्य मायामय, । भान वर्ते असत सर्व ज्ञेय; । ब्रह्मादि जें देवतात्रय । ते गुण मायेचे. ॥ ५८ ॥ साकार सर्व समान, । निराकारीं मिथ्याभान, । तेथें देवपण, भक्तपण । हें वृथा बोलणें. ॥ ५९ ॥ निराकारा आत्मयासि, । देवभक्तपणें काइसीं? । कर्में करावीं साधनासीं । हेंही नमने. ॥ १६० ॥ निपजतें गुणकार्य साधन, । आता गुणीं नाकळे निर्गुण, । यालागीं सन्यासावलंबन । तेंचि मुख्य. ॥ ६१ ॥ एव आपुलें व्यक्त शरीर, । आणि देवाचें रूप साकार, । दोन्ही लटिकीं, निरंतर । ऐसें मावी. ॥ ६२ ॥ भक्ति, कर्म ये दोन्ही । अव्यक्तातें साच नमनी, । ऐसा प्रवर्तला साधनीं । आधारेंविण ॥ ६३ ॥ निर्गुणाचेंचि करी ध्यान, । निर्गुणाचेंचि अवलंबन, । निर्गुणीं लावी मन; । आसक्त करी. ॥ ६४ ॥ यापरी नमनूनि व्यक्तीतें । शोधती चित्तें अव्यक्तातें; । बुद्धिबळें प्रेत्नमतें । निराधार. ॥ ६५ ॥

तेषाम्.

तयातें साधनीं वर्ततां । कैसें होय? पार्था, । तें मी सांगेन तत्वता । तुज प्रीती. ॥ ६६ ॥

क्लेशोऽधिकतरः

नित्य करिता साधन । क्लेशचि होती वर्धमान, । परि वृद्धि नपवे खूण । स्वरूप निष्ठेची. ॥ ६७ ॥ स्थिति वाढावी कीं, अर्जुना, । अवलंबिलें असतां साधना, । तेथें क्लेशचि आगळे क्षणक्षणां । वाढों लागती. ॥ ६८ ॥ निरावलंबीं मन न थरे, । बुद्धीतें विवेकु न स्फुरे, । देहेसीं विलक्षणता, बा रे, । होये कैसेनि ? ॥ ६९ ॥ स्वस्थचित्ततेवांचून । स्थिर न बैसे आसन, । तेथें चंचळ इंद्रियगण । ते मोडिती दमातें. ॥ १७० ॥ अतरीं नाहीं बोधु, । वरि कीजे बाह्यनिरोधु । तेणें उपजे अति खेदु, । संतोषु नवटे. ॥ ७१ ॥ अनुभविता तो त्रासु । आंगीं अवतरे आळसु, । मग तया आळसाचा कळसु । ते निद्रा पावे. ॥ ७२ ॥ ते प्रासी अवयवें धारणेतें, । माजी स्वप्न होये बोडवर्तें, । ध्यानीं देखे मलयर्ते, । फुटे बाह्यशब्दु. ॥ ७३ ॥ तेथें सावधानु होये साक्षेपें, । तो नुमजे निद्रेचेनि आटोपें, । तेथें विचारु तोचि स्वप्नरूपें । उमा राहे. ॥ ७४ ॥ ऐशियापरी निद्रा पुरे, । मग तें आपणचि वोसरे, । देखे इंद्रियाबाहिरें । पडलें मन. ॥ ७५ ॥ मग तेंचि कष्ट मानितु, । पुढती बैसे ध्यानस्थु, । तव क्षुधा पुरवी अतु । स्वयं प्रकटली. ॥ ७६ ॥ ध्यानीं अन्नें आठवती, । स्वादीं गुंते चित्तवृत्ति, । मन तयाचिये प्राप्ती । सूची उपाय. ॥ ७७ ॥ तें जाणवे योगियातें, । सो करी तेथें बळातें; । परतु सोडवू न शके चित्तातें । अन्नाप्रस्ताव. ॥ ७८ ॥ एव क्षुधानिवृत्तीवांचून । स्वस्थ नव्हे अंतःकरण, । सांडू पाहती प्राण । शरीरातें. ॥ ७९ ॥ मग सांडूनि तें साधन । योगी मागे अन्न, । तव न साहे कठिण । शरीरातें. ॥ १८० ॥ वातुळ, पित्तळ, श्लेष्मळ, । न साहे रुक्ष, क्षार, अमवाळ, । तेणें रोग होती केवळ, । आसन न राहे. ॥ ८१ ॥ कंद, मूळ, फळ, पाळा, । आहारु न साहे हा स्थूळा, । मग करीचि योगी आगळा । वैराग्यवंतु. ॥ ८२ ॥ तयातें भक्षितां क्लेश होती, । भक्षिलिया शोप सुटती । पा कीं रोग अंकुरती । नानाविघ्न. ॥ ८३ ॥ तें बुडे योगसाधन, । कष्टातें पावे मन, । जाजावती पांचही प्राण, । देह न थरे. ॥ ८४ ॥ आता कष्टीं मेळवी सदन्नें । योगाचिये सिद्धीकारणें, । तव रसना 'पुरे' न म्हणे, । नमनी योगु. ॥ ८५ ॥ रसनेआंगें सोंकलें मन । तें म्हणे 'असा साधन,' ।

पुरि आजिचें रसिकअन्न । साडावें कैसें ? ॥ ८६ ॥ एव तृप्त होये वासना। तव अन्न घेतो, अर्जुना, । तेथें पैसु नाहीं जीवना । कोष्ठामाजी. ॥ ८७ ॥ अपार सूटला शोषु, । उदकातें नाहीं पैसु, । मग दाटूनि घे पुरुषु । शीतळ जळ. ॥ ८८ ॥ तेणें प्राण जाजावती, । शरीरीं उपजे दीप्ति, । वेळी येमाची आइती । वायां जाये. ॥ ८९ ॥ आसनमुद्रा न थरे मन, । उगेंचि पडताही क्लेश गहन, । यापरी तें सदन्न । पाका आलें. ॥ १९० ॥ तेणें स्त्रीकामु खरा केला, । तो तया चित्ता शोभिनला, । दुर्बळा बकावार पडला । ससाणा जैसा. ॥ ९१ ॥ स्त्रीनियोगें क्लेश पावे, । योगु अवघा अस्तवे, । मग स्त्रीयोगें नादावें । अगल्य पडलें. ॥ ९२ ॥ अर्जुना, स्त्रीचिया सगती । काम, क्रोध उपजती, । चिंता, शोक, मोह, भ्राति । ममता, अहता, ॥ ९३ ॥ लोकेषणा, वित्तेषणा, । पुत्रेषणा, भोगेषणा, । आसक्ति, कल्पना, वासना, । नाना होती. ॥ ९४ ॥ विषयो पुरविता यया गुणा । अति क्लेश जाणे, अर्जुना, । विषयो नेदिता पुन• पुनः । द्विगुण होती. ॥ ९५ ॥ आगींचे ज्ञानें झडती । ऐसे हे भास होती, । योगा, ज्ञानातें प्राशिती । सर्वथैव. ॥ ९६ ॥ योगीं गुणांचा क्लेश,। त्यागीं आगळे बहुवस, । न सूटतां उपजती त्रास । मनामाजी. ॥ ९७ ॥ परिग्रहो न सूटता हे सूटती, । तें सुटलेचि बाधक होती, । यापरी कष्टाची प्राप्ति । आगळीचि होये. ॥ ९८ ॥ आतां साडूनि सदन्नें, । कदन्नें, अल्पाहारें देहरक्षणें । नियत होऊनि वर्तणें । सर्वा पक्षीं ॥ ९९ ॥ क्षुधा, तृषा, निद्रा, । जागृति आणि यात्रा, । एव करणव्यापारा समग्रा । नियमु कीजे ॥ २०० ॥ क्षुधेनें क्षुधाचि भक्षावी, । तृषेनें तृषा प्राशावी, । वाचेनें वाचा गिळावी । सर्वकाळ ॥ १ ॥ निद्रा लागावी निद्रेतें, । स्वप्न गेलें स्वप्नपथें, । कामु गुतला, गा, कामातें, । न पडे अर्थावरि. ॥ २ ॥ क्रोधु क्रोधें प्राशिला, । पुरुषु तयापासाव सुटला, । चिंतेतें ससुद्र लागला । न तखे चिंतेचा. ॥ ३ ॥ आगानरी याचे पुरुषा । ते गुण गुपले आळसा, । कीं आपुलेया विशेषांशा । प्राप्त लागले. ॥ ४ ॥ यापुरी गुणातें बधन । मा ऐसें कैसेनि होये साधन ? । नित्य असावें वृत्तीविण । अभ्यासबळें. ॥ ५ ॥ हे होतां क्लेश अपार, । वेग न होती स्थिर, । अगा, जयाचेचि व्यापार । नित्य करावे कीं. ॥ ६ ॥ आचरिता गुणव्यापार । अखडचि ते मरमर, । नपविजे तेणें घर ।

संतोषाचें. ॥ ७ ॥ किती दिवस हें सोसावें, । अभ्यासदुःख भोगावें, । क्षणुंचि सुटलयापरी नव्हे । आपुलें मन. ॥ ८ ॥ आतां यथाचिये नित्य सिद्धी । हटयोगु येकु त्रिशुद्धी । करावा, म्हणती जो अवरोधी; । मनापवनातें. ॥ ९ ॥ तेथें आसनचि येक जिंकावें, । प्राणचि स्वाधीन करावे, । मनोवेग आंवरावे । हाचि व्यापारु. ॥ २१० ॥ प्रत्याहाराची सोसणी, । प्राणायामाची दाटणी, । माजी पडिजे काचणी; । तेथें कैचें सुख ? ॥ ११ ॥ भेदूनि साही मंडळें । मनु पवनु ऊर्ध्व चाले, । मग ब्रह्मरंध्रीं न चळे । स्थिरावे ऐसा. ॥ १२ ॥ हे क्लेश होतां बहुत । जालया केवळ व्यर्थ; । जेथें आत्मा ब्रह्म सर्वगत । हे खूण न कळे. ॥ १३ ॥ व्यतिरेकान्वयज्ञानेंविण । येकदेशी योगु तें बंधन, । यालागीं केलें तें साधन । व्यर्थ होये. ॥ १४ ॥ ऐसा व्यक्ता उबगला, । अव्यक्तीं आसक्तु ठेला, । तो जनु कधीं जाला; । काय करील ? ॥ १५ ॥ मागें पुढें कवणा पाहणें ? । देइंजे कव्हणा प्रीती गान्हाणें ? । गांजिला आपुलेनिचि अज्ञानें ? । तया कवण सोडवी ? ॥ १६ ॥ दुजयाचा नाहीं आधारु, । आणि योगसंग्रामु हा दुष्करु, । जालाही योगु, वीरु । काय करील ? ॥ १७ ॥ अशक्त कष्टोनि परतले, । शक्त ते दुःखाचे जाले । न टळती कांहीं केले । महावीर. ॥ १८ ॥ तंव ते किती सोसावे, । किती दिवस साधावे, । सगळे जन्मचि लोटावे । हातवरी कीं ? ॥ १९ ॥

हि (यस्मात् कारणात्)

ऐसें हें क्लेशकर साधन, । सहसा नव्हे निष्पन्न, । आणि निराधार म्हणौन । ययाकारणें. ॥ २२० ॥

देहवद्भिः

अविद्याकामकर्में व्याप्त, । कर्मबद्ध, देहवंत, । गुणाअधीन समस्त । सातही. ॥ २१ ॥

अव्यक्ता गतिर्दुःखमवाप्यते

अव्यक्त चांग इच्छितीं, । पावतां, गा वीरपति, । दुःखचि तें आदिअंतीं, । मध्यें पाविजे ॥ २२ ॥ उपराठी गंगा चळावी । तैसीं इंद्रियें परतवावीं, । अधिष्ठानीं न्यावीं । आधारेंविणः ॥ २३ ॥ व्यक्तावांचूनि, पांडवा,

तें कवण्या चाडा? ॥ २६० ॥ यालागीं मीचि पाहिजें म्हणौनु । मातें कर्म समर्पूनु । मत्प्राप्ती मदधीनु । भक्तजनु ठेला. ॥ ६१ ॥ आतां केवळें सर्वत्यागें । मातें धरूनि भक्तिमार्गें । मदधीन तें आंगें । काय करिती? ॥ ६२ ॥

अनन्येनैव योगेन

सांडूनि लक्ष, धारणा, । आणि अन्यदेवतउपासना, । हटयोगाची वासना, । पांडुपुत्रा, ॥ ६३ ॥ प्राणायाम, प्रत्याहार, । वळें पावावें ब्रह्मरंध्र । ऐसें न मनीं अंतर । त्या भक्तांचें. ॥ ६४ ॥ लययोग, लक्षयोग, । कर्मयोग, हटयोग, । ज्ञानयोग, राजयोग । आदिकरूनि, ॥ ६५ ॥ केवळ ब्रह्मविचारणा । तेही परी सांडूनि, अर्जुना, । सायोज्य मोक्षाची वासना । न उपजे मनीं. ॥ ६६ ॥ एव परमार्थीं ना स्वार्थीं, । लागीं ना बाह्यपदार्थीं । चित्त जयांचें, वीरपति, । नपवे योगातें. ॥ ६७ ॥ देहावरूनि उठिलें, । अवस्थासमूहातें नातळे, । चित्त कोठेंचि न मिळे । नाठवी कल्पना. ॥ ६८ ॥ लयो, लक्ष आणि विक्षेपु, । गुणसाक्षित्वादिवृत्तिकंपु । सांडूनि संकल्पु, विकल्पु । फळाची इच्छा, ॥ ६९ ॥

मां ध्यायंतः

माझेंचि करिती मूर्तिध्यान । एकांतीं दृढ बैसोन; । तेथूनि सुटेना मन, । न झोंबे अन्यअर्थी. ॥ २७० ॥ भिंतीवरी चित्र लिहिलें । तें भिंतीसीचि जैसें जडलें, । करितां नव्हे वेगळें । भासे सार्वकाळ, ॥ ७१ ॥ तैसें चित्त माझां ठायीं, । माझें रूप लिहिलें जेंहीं; । तें चित्तावेगळें कांहीं । केलें नवचे. ॥ ७२ ॥ आणि चित्त तेणेंसीं । वेगळें । नव्हे आवडीचेनि बळें, । यापरी येकमेकांतें जडलें । निवडेचिना. ॥ ७३ ॥ तेथें न करितांचि आवाहन, । केलया नव्हेचि विसर्जन, । ऐसें माझेंनि रंगें जाण, । रंगलें चित्त. ॥ ७४ ॥ घुतां न फिटे स्वर्णवर्णु । असे आंगींचा आंगीं गुणु, । कर्पूरें उपणितां विलक्षणु । वासु न पडे. ॥ ७५ ॥ तैसें चित्त तें प्रेमवंत, । प्रेम तें मद्रूपेंसी युक्त, । यापरी येकपण तेथ । तें मोडेचिना. ॥ ७६ ॥ यापरी न होतां अन्यसंगीं । चित्त माझां ध्यानयोगीं । ठेवूनि भक्त अंतरंगीं । काये करिती? ॥ ७७ ॥

उपासिते :

सोळाही उपचारींकरून । माझें करिती पूजन, । अंतराकाशीं मन । लावूनियां. ॥ ७८ ॥ कल्पूनि उत्तमें मंदिरें, । सिंहासनें महाभद्रें, । ते परिवारसहाकारें । ध्याती मज. ॥ ७९ ॥ करूनि मानसिक स्नान । संकीर्तनयोगें, जाण, । मातें जागृतीकरण । होती करिते. ॥ २८० ॥ *मग पूजास्थळीं आवाहन । परिवारसहित करून, । कल्पूनि दिव्य* सिंहासन । मातें समर्पिती. ॥ ८१ ॥ अर्घ्य, पाद्य, मुखमार्जन । तें मूळमंत्रेंकरून; । मग पंचामृतस्नान, । पादपूजा. ॥ ८२ ॥ पांचही पूजा भिन्ना । नमस्कारपरियंत, अर्जुना; । मग सुवासें तैलें नाना । सिद्धें करिती. ॥ ८३ ॥ तैलें करूनि मर्दन । कस्तुरीस्नेहस्फेटण. । माथां मर्दूनि चंदन, । योगु करिती. ॥ ८४ ॥ तप्तोदकें स्नानजात, । अंतीं दीप अनंत । वोंवाळिती पदार्थ । उत्तम जे. ॥ ८५ ॥ सार्द्रता फेडूनि अंगाची । वस्त्रें समर्पिती सर्वेचि; । मग अन्यस्थळाप्रति क्रमेंचि । नेते जाले. ॥ ८६ ॥ तेथें अनुपम्य सिंहासन, । वरी मृदु पट्टकूळ आसन । तें समर्पिती मजलागून । भक्त माझे. ॥ ८७ ॥ तेथें आनें वस्त्रें समर्पिती, । यज्ञोपवीतें अर्पिती, । नाना अलंकार लेवविती, । भूषणें नाना. ॥ ८८ ॥ सर्वांगीं गंध श्वेत, । ललाटीं पीत, वरि आरक्त; । परिमळद्रव्यांचे बहुत । योग संपादिले. ॥ ८९ ॥ घोंस, माळा, मुक्त सुमनें, । मुर्दे, कोमळें, केतकी वनें; । अनंतां दीपांची मनें । कल्पिली प्रभा. ॥ २९० ॥ दशांग गुगुळ धूप, । चंदनकाष्ठांचे अमूप । समर्पूनियां दीप । तेही समर्पिले. ॥ ९१ ॥ भक्ष्य, भोज्य अपार, । लेह्य, चोष्य परिकर, । घृतयुक्त मोघार । उपहार समर्पिती. ॥ ९२ ॥ आदिअंतीं अमृतपानें, । मध्यें मध्यें स्वादुलें जीवनें, । नैवेद्य समर्पिती, जाणें, । तयापरी. ॥ ९३ ॥ देऊनि उत्तरापोशन, । अन्यस्थळाप्रति नेऊन । अति उत्तम आसन । तेथें अर्पिती. ॥ ९४ ॥ मुखकरपादप्रक्षाळण, । मग अन्यस्थळाप्रति नेऊन । शुद्ध, निर्मळ आसन । संपादिती तेथें. ॥ ९५ ॥ फळनैवेद्य समर्पूनि, । मुखकरप्रक्षाळण करूनि, । करोद्वर्तन देऊनि । सर्वेचि प्रक्षाळिती. ॥ ९६ ॥ मग अन्य स्थळाप्रति नेणें, । तेथें महासिंहासनीं बैसवणें, । तांबूल मातें समर्पणें । तेंहीं भक्तीं. ॥ ९७ ॥ पूगीफळाचें अंतरसार, । कर्पूरयुक्त

परिकर, । नागवेलीदळसार । सोलुनियां, ॥ ९८ ॥ क्षाराचा योगु करूनि, । विडिया समर्पिती मजलागूनि, । खदिरसार निवडूनि । समर्पिला. ॥ ९९ ॥ कर्पूर, ककोळ, येळा, । लवगा तेजिका, रसाळा; । यापरी आइकें, नृपाळा । तांबूलसमर्पण. ॥ ३०० ॥ तांबूलानंतरें, बा रे, । समर्पिती समावस्त्रें; । किरीट, कुंडलें तेजकरें । मुक्ताफळें, माळा. ॥ १ ॥ मग महाभद्राप्रति आणूनि, । समस्त परिवारु अवलोकूनि, । महानीराजन तेथूनि । समर्पिती मातें. ॥ २ ॥ नाना मगळ बोलतां । आरतिया समर्पिती अनंता, । मग ध्यानार्ती, पार्था, । करिती दास ॥ ३ ॥ मंत्राक्षता मूळमंत्रें, । मग मत्रपुष्पें तयानतरें । समर्पूनि येक्रमरें । करिती नामघोषु ॥ ४ ॥ तेथूनि संगीत, नृत्य करिती, । वाद्यविशेषाचिया पंक्ती । नामघोषें दास गर्जती, । ऐसें वल्पावें. ॥ ५ ॥ ऐसा आनदु करून । तयावरि तीर्थपूजनं. । समस्त येक स्थानीं मिळोन । वेळें पाहिजे ॥ ६ ॥ तीर्थप्रसाद विभागिती, । क्रमेंचि अवघे घेती, । पुढती उपासक येती । माझिया स्थाना. ॥ ७ ॥ दुसरिये पूजेचा काळ । प्राप्तु होये जंव केवळ, । तव तो क्रमिती वेळ । माझिया उपासना. ॥ ८ ॥ कीर्तन, श्रवण, ध्यान, । अंगसेवा, उपचारसमर्पण, । येणेंचि प्रकारें पूजन । त्रिकाळ समर्पिती. ॥ ९ ॥ सायंकाळीं पूजाअंतीं । प्रथम यामु जागती, । कीर्तनसमारंभु करिती । मनोमयाचि ते. ॥ ३१० ॥ द्वितीयु यामु प्रवर्तता । शेजे पहुडविती, पार्था, । आरतिया करूनि अनंता; । मौनी होती. ॥ ११ ॥ मग मनीं असतां ध्यानस्थ । देवस्थ.नींचि समस्त । आलिये सुषुप्ती भोगित । परी देहा न येती. ॥ १२ ॥ मग चतुर्थ यामें चेइले । ते तेथेंचि जागृत झाले, । पूर्ववत करू लागले । माझें पूजन. ॥ १३ ॥ यापरी करितां उपासना । रात्रिदिवसा, अर्जुना, । आरणूक ते मना । नाहीं जयाचिया. ॥ १४ ॥

तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।
भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥

हे पार्थ

आइकें, पार्था, तान, भूक । जे विसरले शरीरसुख, । सर्वदा मज वेगळें आणिक । आठवेचिना. ॥ १५ ॥ आसक्ता लागे व्यापाद । तो न

सुटे तया व्यवहारु, । जन्ही तो जनु चतुरु । शंकू तयातें. ॥ १६ ॥ तैसें जयां भक्तां जालें, । माझेंचि कर्म लागलें, । कल्पित परि मानिलें । साच ऐसें ॥ १७ ॥

मय्यावेशितचेतसां तेषाम्

माझ्याचि ठायीं नित्य मन; । तेथेंचि निद्रा, तेथेंचि जागरण; । रिकाम्या काळाचें क्षपण । तेथेंचि करी. ॥ १८ ॥ गगनावेगळा न खेळे । पवनु जैसा चळे, ढळे, । तैसें मन जयाचें आंवरलें । माझ्याचि ठायीं. ॥ १९ ॥ पाणियावेगळी लहरी । नाना मीनु न निवडे जयापरी, । तसें मत्स्वरूपीं साकारीं । गुंतलें मन ॥ १२० ॥ बराडिया मिळे अन्न । तो नकढी तेथूनि वदन, । तैसें जयाचें अंतःकरण । गुंतळ मज. ॥ २१ ॥ येणें हो पां ससारु । तो म क्ष हूनि मानिती थोरु, । संगुचि अमृताचा सागरु । न सोडिती जे; ॥ २२ ॥ मद्वियोगें ज्ञानसाधन । तें जयां, गा, विघ्न; । मजसीं युक्त देहधारण । तें मोक्षा आगळें. ॥ २३ ॥ जन्ही मी सामर्थ्यहीनु । तरी नोळगती जे आनु, । निर्गुणु नावडे, मी सगुणु । तोचि पाहिजे. ॥ २४ ॥ माझिये व्यक्ती वेधले, । आपुलेनि हार्ये सुटले, । माझ्याचि ठायीं रंगले, । ऐसेयां तयातें ॥ २५ ॥

अहं समुद्धर्ता भवामि

सम्यक् प्रकारें उद्धरिता । होयें, जाण, पांडुसुता. । आतां सर्वज्ञु मी, पार्था, । सर्वेश्वरु तो. ॥ २६ ॥ मीचि होयें उद्धरिता, । सम्यक् प्रकारें हितकर्ता, । तेंहीं आपुली चिंता । सांडिली म्हणौनि ॥ २७ ॥ जे मांडूनि आपुली हितचिंता । मजचि रंगले, पार्था, । दुजा आश्रयो सर्वथा । न धरितीचि जे, ॥ २८ ॥ तयां सांडूनि आपुलें महिमान । कार्डी व्यक्तरूप धरून, । माझे प्रिय म्हणौन । मी कैसा होयें ? ॥ २९ ॥ व्यापकतेहूनि, जाण, । भक्तांपासीं येकदेशीपण । तें मज प्रिय, म्हणौन । सोडू न म्हणें ॥ १३० ॥ सांडूनि आपुली सर्वज्ञता । त्याचाचि भारु वाहें चित्ता, । जन्ही तो जनु भळयता । भलयते म्हणो. ॥ ३१ ॥ नव्हे तरी नको तें व्यापकत्व, । हेंचि माझें पूर्णत्व, । जैसें भक्ताचें दृढत्व, । तैसें माझें. ॥ ३२ ॥ त्यातें नित्य माझी चिंता, । मातें नित्य त्याची पार्था; । आतां त्याचा योगु अभ्यासिता । मीचि झालों कीं. ॥ ३३ ॥ येकावरी घलिजे

भारु । तया तो नेदी आधारु, । तरी सर्वथा नव्हे थोरु, । न पवे पदवी; ॥ ३४ ॥ तैसें थोरपण पाहिजे । तरि येकातें खांदीं घेईजे, । हें जगामाजी, बुझें, । चालत असे. ॥ ३५ ॥ तैसा त्यां भारु घेतला, । ना मनुपुत्र, नृपाळा, । तैसा माझा भक्तु उचलिला । सर्वांगें त्यां. ॥ ३६ ॥ कांटा कोठें रुपैल ? । कोठें खडा खुपैल ? । आंगचि हें आंथुरिजैल । निजभक्तांखालीं. ॥ ३७ ॥ माझा झाला, अवधारीं, । असो मी भलतेसिया तया उद्धरीं, । आतां कासयापासाव तारीं ? । ऐसे म्हणसील, ॥ ३८ ॥

**मृत्युसंसारसागरात्**

तरि मृत्युयुक्त संसारु । न तरवे जो हा सागरु । ययापासाव तारु । होऊनि पारु पाववीं. ॥ ३९ ॥ आतां सागरु हा हेंचि कैसें ? । तरि हेळावतां दिसे, । आणि प्रांतु तो विदुषें । जाणतीचिना. ॥ ३४० ॥ मरणयुक्त उपजणें, । उपजयुक्त मरणें, । दोहीं युक्त असणें । स्थितीचां ठायीं, ॥ ४१ ॥ ऐसा अनित्यपणें न राहे, । कर्मयोगें येतुचि आहे, । अस्थिरु परि जाणों काये । नित्य स्थिरु ? ॥ ४२ ॥ कां उत्पत्ति, स्थिति, लय, तिन्ही । जयामाजी लोटती निदानीं, । संसारु नक्रे गुणीं । कर्मीचा वेगु. ॥ ४३ ॥ ऐसा सागरु हा तरावया । योगी करिती उपायां; । वैराग्ययोगु, नाना क्रिया, । नाना मतें. ॥ ४४ ॥ मग आंगवळे न शकती । ते माजीचि बुडोनि जाती, । तरले ते मानिती । महाकष्ट. ॥ ४५ ॥ तया संसारसागरापासून । मी तारीं ययांलागून. । या व्यक्ता आंगाचें जाण । तारूं करीं; ॥ ४६ ॥ कीं खांदीं घेऊनि नेईजे । तया काये श्रमो देईजे ? । प्रिय ज्याहूनि नाहीं दुजें । ऐसें भेटलेया ॥ ४७ ॥ तूं म्हणसी स्वभक्तां । ऐसा कैं होसी उद्धर्ता ? । तरि अवधारीं, पार्था, । व्यवधानचि नसे. ॥ ४८ ॥

**न चिरात्**

पोटांतूनि पडे बाळ । तैंचि ममत्वाची कळ; । पुसणें, प्रक्षाळणें केवळ । तें तयापाठीं. ॥ ४९ ॥ तैसा भक्तु भक्त होये । तंव आधींचि पाठीशीं मी आहें, । जऱ्ही तो मातें न पाहे । सन्निहितातें. ॥ ३५० ॥ व्यवधानाचेनि नांवें । निमिषही मातें न साहवे, । आतां भक्तें माझा होआवें । हेंचि पाहिजे. ॥ ५१ ॥ भक्त होतांचि तयापासीं । मीं असें, अर्जुना,

परियेसीं. । स्वरूप आपुलें प्रकाशीं । तें तयेचि क्षणीं. ॥ ५२ ॥ भक्तीचें करितां आचरण । तैचि माझिया स्वरूपाचें ज्ञान, । त्रिविधा भेदाचें खंडन । तें निमिषमात्रेंचि. ॥ ५३ ॥ तूं म्हणसील, अर्जुना, । हें सर्वथा साच मानेना; । दुर्गम निर्गुण उपासना । परम जे कीं ॥ ५४ ॥ ते येकायेकीं सिद्ध होये । आणि भेदसाधनउपायें । अभेदें तत्व प्रकट होये । परब्रह्म. ॥ ५५ ॥ हें काळांतरीं घडेल । परि तत्क्षणा सिद्ध नसेल, । ऐसें हृदयीं मानिसील । नेणोनियां; ॥ ५६ ॥ तरि अवधारीं,गा वीरपति, । ते रोकडीचि असे प्रतीति । प्रकट करीन तुजप्रति । देईं अवधान ॥ ५७ ॥

मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।
निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥

मय्येव मन आधत्स्व

यथोक्त प्रकारें पूजन । अंतरीं मनोमय करून । परिवारसहित ध्यान । माझें आश्रयिसी, ॥ ५८ ॥ तें परिवारावरूनि काढून । माझाचि ठायीं ठेवीं मन, । माझिये मूर्तीचें ध्यान । तेंचि अवलंबीं. ॥ ५९ ॥ बाह्यार्थी सोडूनि समस्ता, । फेडूनि मनाची चंचलता, । स्फूर्ति उपजों नेदिता । शरीराची. ॥ ३६० ॥ अंतराकाशीं मनें । सांडूनि मनाचें करणें । विसरु पडों न देणें । ऐसिया स्थिती; ॥ ६१ ॥ दुजें न पाहतां कांहीं । मन लावीं मूर्तिचाचि ठायीं. । सांग अवयव अवघेही । कल्पून असावें. ॥ ६२ ॥ तेथें येक करीं, अर्जुना, । सांडूनि अवेवांची विचारणा, । मन तया जडपणा । पावों नेदावें. ॥ ६३ ॥ आधीं पादचि अवलोकिले, । मग मुखावरि मन गेलें, । जे जे अळंकार आठवले । जाये तिकडे तिकडे मन. ॥ ६४ ॥ पाद सांडूनि कर पाहणें, । कर सांडूनि उदर अवलोकणें, । यापरी चंचळें मनें । न करीं निष्ठा. ॥ ६५ ॥ सकळाही माझ्या अवेवीं । येकुदाचि मन ठेवीं, । तेथें सावधानता बरवी । असों देईं. ॥ ६६ ॥ यापरी मद्रूपीं लावितां मन । जडोनि गेलें, जालें संलग्न, । तेथें कांहीं येकी खूण । उठी अनुभवाची. ॥ ६७ ॥ सावेव मूर्ति ज्ञेय मानें । तेथें प्रकाशिते जाणणें, । तें दृश्याचेनि अवलंबनें । तटस्थ असे. ॥ ६८ ॥ दृश्य वेगळें अवेवेंसीं, । द्रष्टें वेगळें दर्शनेसीं । तें लागलेंचि, परि अवलंबेंसी । वेगळें ज्ञान. ॥ ६९ ॥ देखिजे घटु चक्षु-

द्वारा, । तो देखोनि तया आकारा । चक्षु स्वस्थानीं, धनुर्धरा, । वेगळाचि असे. ॥ ३७० ॥ ठेविता मन माझ्या ठायीं । जाणणें वेगळें होये जयीं, । तैं सत्य ठेविलेंचि नाहीं । मद्रूपीं मन. ॥ ७१ ॥ मनें दरूनि अवलंबिलें । कां जें ज्ञान ज्ञेयेंसीं वेगळें, । तरी माझ्या ठायीं ठेविलें । नाहींचि की मन. ॥ ७२ ॥

**मयि बुद्धिं निवेशय**

आतां मन माझ्या ठायीं ठेवितासी, । तरी प्रवेशवीं तें जाणिवेसीं, । बुद्धी हें नाम तियेसी । आम्हीं ठेविलें. ॥ ७३ ॥ जीवनीं कर्पूरु संचरे । तो जळाकारेंचि जैसा डरे, । तैसा बुद्धीचेनि रूपें क्षरें । माझ्या ठायीं. ॥ ७४ ॥ रत्नाआंगीं प्रकाशु जैसा, । कव्यांसीं युक्तु सोमु कैसा, । कीं दीपु कळिके प्रकाशा । सहित स्फुरे. ॥ ७५ ॥ तैसें तुझें संवेदन । आणि माझें रूप सगुण, । तें तेणेंकरूनि, जाण, । ज्ञानरूप करावें. ॥ ७६ ॥ यया युक्ती, जाणई, । बुद्धी प्रवेशवीं माझ्या ठायीं, । पुडती हांसोनि कृष्णु म्हणे, काई । ऐसें घडैल ? ॥ ७७ ॥ दृश्याचें असतां ज्ञान, । त्यामाजी प्रवेशवितां दर्शन, । तें दृश्यस्फूर्ति आपण । प्रवेशोंचि न शके. ॥ ७८ ॥ ज्ञेय ऐसें जें स्फुरे । तें ज्ञानाचेनि सदा अंतरें; । जाणत जाणत न सचर । यामाजी ज्ञान. ॥ ७९ ॥ ज्ञेया ज्ञाना येकपण, । पुडती ज्ञेयाचें संवेदन । तैं विलक्षतेवाचून । ऐसें न घडे. ॥ ३८० ॥ घडुचि देखणें होईल । तरि हें ऐसें घडैल, । एवं बुद्धि न प्रवेशेल । नाना उपायीं. ॥ ८१ ॥ बुद्धि प्रवेशली नसतां । मनातेंही भिन्नता, । अर्जुना,मन,बुद्धि आता । कैसी समर्पिसी ? ॥ ८२ ॥ ज्ञातें ज्ञेयाचें अधिष्ठान । न प्रवेशे ज्ञान तेथें याचून, । मग ज्ञानाआगें मन । सहज येक वाहे. ॥ ८३ ॥ दृश्य सांडूनि द्रष्टा । पाहतां आपुलिया निष्ठा, । तया दर्शनाचा फांटा । तो पोटींचि सचरे. ॥ ८४ ॥ सूर्या आंगींची दीप्तिकळा । प्रकाशूनि पदार्थी सकळां । मग सरसीचि तया मंडळा । जाऊं लागे. ॥ ८५ ॥ तैसा ज्ञेय सांडूनि तो ज्ञानी । असतां सहज स्वस्थानीं, । बुद्धि अप्रेरनें येऊनि । आंगीं संचरे. ॥ ८६ ॥ म्हणौनि ज्ञातया-वेगळें ज्ञान । कोठेंचि न संक्रमे, जाण, । तरी ययालागीं मी सांगेन । तेंचि करावें. ॥ ८७ ॥ माझी प्रतिमा जें ध्येय । तें आत्मरूपेंचि जाण,

ज्ञेय, । पुढें पाहसील तरि कार्य । होईल वृत्तीचें. ॥ ८८ ॥ द्रष्टाचि मी, हें जाणावें । कां तुवांचि तें होआवें, । परंतु अपणावेगळें नेणावें । तरी हें सोपान. ॥ ८९ ॥ आत्माचि जरी मी, अर्जुना, । तरी वेगळी करिसी ज भावना, । ते माझी सात्र अभावना । ऐसें आहे. ॥ ३९० ॥ असो आतां बहु भाषण. । ध्येयचि होईं तूं आपण, । तेथेंही आहे यकी । खूण । अनुभवाची. ॥ ९१ ॥ अवलंबूनि असतां आत्मभावो । तेथें दृश्य दिसे तें सर्व वागे, । तें ज्ञानाचा जन्मता ठवो । तें तंव ज्ञेय. ॥ ९२ ॥ म्हणोनि दृश्य तें तें सांडावें, । प्रतिमेतेंही नाठवावें, । तुझें माझें स्वभावें । येकपण जरी, ॥ ९३ ॥ ज्ञेय सांडिताचि केवळ । ज्ञान फुटे जैं वेगळ, । तैं अभावो शून्य पोकळ । तेंचि अवलंबीं. ॥ ९४ ॥ तियेचि वृत्ति सुटे मन । तैं निरावलंबीं करी भ्रमण, । अपार प्रमित गगन । ऐसें पहीं. ॥ ९५ ॥ मनतें पूर्वसंस्कारें । देखिला पदार्थु बाह्याकारें । तो अंतरीं अवघा स्फुरे । वासनेद्वारा. ॥ ९६ ॥ तयातें पाहोनि काज नाहीं, । अभावो जाणावा तये ठायीं, । ऐसा होसील; मग घेईं । माझा वचनार्थु. ॥ ९८ ॥

मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय

तेथें अवलंबूनि द्रष्टेपण, । सांडून अभावाचें ज्ञान, । मनबुद्धीतें आणून । स्वरूपीं धरीं ॥ ९८ ॥ घटु सांडितां देखणें । दृष्टीचेनि मार्गें ग्रासणें । मन चंचळ निश्चळपणें । तुवां आवरावें. ॥ ९९ ॥ एवं स्वस्थिती निश्चळ असतां । मन धरीं स्वरूपीं, पार्था; । जैसा निष्कंपु सकंपता । सागरु गिळी. ॥ ४०० ॥ दृश्य अभाव लेपणें । अभावाचें जें जाणणें । तें आपणा जाणोनि प्रवेशवणें । स्वरूपीं तुवां. ॥ १ ॥ स्वस्थु, स्वस्थु, स्वज्ञानीं, । स्वस्थिती असतां तुझ्या स्थानीं । न पाहिजे तो, धनुःपाणि, । कां असात्र गुणु? ॥ २ ॥ अधिष्ठानीं आवराया ज्ञान । लटिकेंचि धरिलें जाणपण । तें कल्पनामात्र म्हणौन । देईं सांडूनियां. ॥ ३ ॥ येकाग्रत्वें, पांडवा, । चंचळ मन जिंकिलें तुवां, । आतां तो काय करावा । भावो येकाग्रतेचा ?॥ ४ ॥ तूं अवलंबूनि मीपण । सामाविलें बुद्धि, मन । आतां मीपणाचें कारण । कांहीं असे? ॥ ५ ॥ आतां येकाग्रता जाणपण । सोडूनि उरे मीपण । तेथें निर्वाणींची खूण । ते येकि आहे. ॥ ६ ॥

केवळ विसरु तें अज्ञान, । केवळ आठवु तें वृत्तिस्फुरण, । या दोहीं वेगळें, जाण, । सहज असतां, ॥ ७ ॥ सहजचि वृत्तींचा विसरु, । सहज अज्ञाना मारु, । ज्ञानरूपु, निर्विकारु । भावो उरैल. ॥ ८ ॥ अभावो म्हणों ते आत्मसत्ता, । भावो म्हणों तैं आकारशून्यता, । ऐसी कव्हणी येकि, पार्था, । प्रकटैल खूण. ॥ ९ ॥

अत ऊर्ध्वम्

मग ययावरि जें होईल । तें आपुसया तूंचि जाणसील; । तथापि बोलावें लगेल । कांहीं येक. ॥ ४१० ॥

मय्येव निवसिष्यसि

मीचि होऊनि अससी, । भेदु तो कांहींचि नेणसी । आत्माचि ब्रह्म पावसी । ऐसिये खुणेतें. ॥ ११ ॥ मन, बुद्धि पुडती नांकुरे, । ते ब्रह्मचि होऊनि ब्रह्मीं जिरे, । निर्विकल्प, बा रे, । ते समाधि पावसी. ॥ १२ ॥ का मन, बुद्धि अंकुरली । ते अधिष्टानेंसीं नव्हे वेगळी, । मग प्रपंचेसीं स्थिति लाधली, । तूतें ब्रह्मरूप. ॥ १३ ॥ बुद्धीवेगळें नाहीं मन, । मनावेगळें कैंचें भान, । म्हणौनि स्वरूपें ज्ञान । अन्वित जाणतां ॥ १४ ॥ प्रपंचु आत्मत्वें ब्रह्म स्फुरे, । आतां काये ययानंतरें ? सार्वकाळ भेदु मरे । ऐसें होईल. ॥ १५ ॥

न संशयः

ये वचनीं कांहीं । संशयो तो सर्वथा नाहीं; । भक्तीचिमाजी आइकईं । ऐसें ज्ञान. ॥ १६ ॥ भक्तियोगें मातें पावणें, । आणि शीघ्र विण साधनें । तरी, अर्जुना, उपायें येणें । उगेंचि वर्तावें. ॥ १७ ॥

> अथ चित्तं समाधातु न शक्नोसि मयि स्थिरम् ।
> अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तु धनंजय ॥ ९ ॥

धनंजय

धनंजया, आइकें वचन ॥ याहूनि आन साधन । माझिये प्राप्तीलागून । सोपान नसे. ॥ १८ ॥

अथ चित्तम्

आतां जरि कां केवळ । चित्त असैल तुझें चंचळ, । यया रजतमाचें बळ । लाहोनियां, ॥ १९ ॥

मयि स्थिरं समाधातुं न शक्नोसि.

तें माझ्या ठायीं, पारियेसीं, । स्थिर ठेवूं न शकसी; । पूर्वीं केलें अभ्यासासीं । नसैल तुवां. ॥ ४२० ॥ बाह्य संकल्पु न तुटे, । का लयीं वृत्ति आटे, । ध्यानीं ध्येय नुमटे । कांहीं केल्या; ॥ २१ ॥ पदार्थु न येती आया, । न चले करावी ते क्रिया, । मन, बुद्धि, धनंजया, । न प्रवेशे मद्रूपीं, ॥ २२ ॥

ततः अभ्यासयोगेन मां आप्तुं इच्छ

तरि केवळ न करीं सांडणी । अभ्यासयोगें, धनुःपाणि, । मज पावावयाची इच्छा मनीं । धरूं प्रवर्ते. ॥ २३ ॥ अभ्यासयोगु तो कैसा? । मातु अवधारीं, गुडाकेशा, । साधनोपावो, वीरेशा, । ऐसें जाणावें. ॥ २४ ॥ सकळ मूर्तीचें अवलोकन । येथें न बैसे स्थिर मन, । तरि देवाचे श्रीचरण । तेचि लक्षावे. ॥ २५ ॥ चित्त नसे जंव एकनिष्ठ । तंव तेंही वरि नभसे स्पष्ट; । श्रीपादयुगुल निकट । भगवंताचें. ॥ २६ ॥ मग तैसेंचि नित्य कारितां । मनातें होये स्थिरता, । पादद्वयाची व्यक्ति चित्ता । प्रत्यक्ष स्फुरे. ॥ २७ ॥ मग क्रमेंचि तयावरि । येकयेक अंग लक्षीं धरीं । मस्तकपर्यंत ययापरि । रूप अवलोकावें. ॥ २८ ॥ ध्यानीं ध्येय स्थिरावलें । तें क्षणक्षण जंव चळे । तंव पाहिजे गोंविलें । तेथेंचि मन. ॥ २९ ॥ पूर्वोक्तप्रकारें. करून । कारितां पूजा, आराधन, । नित्य सेवितां मन । स्थिर बैसे. ॥ ४३० ॥ अर्जुना, नित्य कारितां अभ्यासु । चित्त स्थिरावे, जाणिजसु, । भासे मूर्तीचा आभासु । प्रत्यक्षापरी. ॥ ३१ ॥ मग ध्येयाकारें होऊन । आवरिजे बुद्धि, मन; । पूर्वी सांगितली खूण । तियापरी. ॥ ३२ ॥ आता सकळे प्रतिमेचें ध्यान । आकळूं न शके जरि मन । तरि अवलोकावें श्रीवदन । भगवंताचें. ॥ ३३ ॥ वदनीं अथवा श्रीचरणीं । मन लावावें येकस्थानीं, । तितुलेंचि स्थिरता पावोनि । पावावें तदैक्य. ॥ ३४ ॥ जऱ्ही हें नव्हे सहसा । तरी न-संडावें अभ्यासा, । साधनें सिद्धि, गुडाकेशा, । असे भवसेन. ॥ ३५ ॥ नित्य अभ्यासावें आसन, । नियमावें अन्नपान, । इंद्रियव्यापार क्षीण । करूनियां. ॥ ३६ ॥ कर्मेंद्रियें कर्महीनें । नित्य नियमावीं प्रेत्नें, । आंवरावीं ज्ञानकरणें । अर्थापासूनि. ॥ ३७ ॥ अंतर्मुख मनोवृत्ती । नित्य असावें, सुभद्रापति; । तेथें अवलंबु माझी मूर्ति । आश्रयावी तुवा. ॥ ३८ ॥ अनघेया

साधना मूळ । अंतरीं मन करावें निश्चळ, । ध्यानयोगाचें महाबळ । करूनियां. ॥ ३९ ॥

अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।
मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥

अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि

अंतर्मुखें नये अभ्यासीं । जन्हीं, अर्जुना, शक्त न होसी । तथापि प्रेत्नु ऐसियासि । तो सुगमु असे. ॥ ४४० ॥ दमलीं न वचती कर्मकरणें, । इंद्रियें झोंवती अर्थाकारणें, । अंतर नभसे मनें । नाना प्रेत्नीं, ॥ ४१ ॥ लयो कां जडत्व माजे, । संकल्प उपजती विण काजें, । योगाभ्यासीं चित्त निर्बुजे, । दुःख धरी, ॥ ४२ ॥ न चले कांहीं केलें बळ, । वैसका जाय विफळ, । तरि तें सांडूनि केवळ । येक करीं. ॥ ४३ ॥

मत्कर्मपरमो भव

श्रोत्रीं मत्कथामृतश्रवण, । वाचा करी संकीर्तन, । माझिया नामाचें गर्जन । पदोपदीं. ॥ ४४ ॥ स्तुति, स्तोत्रें, मंत्रजपु । नामस्मरणीं होई निष्कंपु; । सर्वदा माझाचि संकल्पु । वादीं प्रतिवादीं. ॥ ४५ ॥ करीं करावें पूजन । बाह्यप्रतिमेचें अर्चन । सेवा; उपचार; आंगवण । झाडावें माझें. ॥ ४६ ॥ वृक्षारोपण, प्रासादरचना, । तीर्थें माझीं, अर्जुना, । निर्मळें करावीं, भजना । वोपावे कर. ॥ ४७ ॥ शरीर न वचावें भजनीं, । मातें यावें लोटांगणीं, । निर्माल्यधारणावांचूनि । भूषण न मिरवावें. ॥ ४८ ॥ श्रद्धापूर्वक अवलोकन । मूर्तीचें करावें, जाण. । माझें समारंभ निजगण । तेचि अवलोकावे. ॥ ४९ ॥ पादीं यात्रा, प्रदक्षिणा, । नृत्य हा धर्मु चरणां, । अवलंबूनि दूतपणा । करावी दासाझा. ॥ ४५० ॥ रसनें प्रसादु तीर्थरसु । चाखूनि नेदावा, जाणिजसु; । येरें सुरवाडें त्रासु । मानूनियां. ॥ ५१ ॥ शिश्न, पायु, यें दोन्ही । दमावीं विहितावांचूनि; । ऐसीं माझीचि करणी । सकळां इंद्रियांतें. ॥ ५२ ॥ काया, वाचा आणि मनें । माझें कर्म तेंचि करणें, । येर कांहीं न करणें । ऐसा दृढ नियमु. ॥ ५३ ॥ दासीचें जैसें शरीर । पराधीन, अर्जुना, सर्वत्र; । तैसें माझेंचि कर्म समग्र । करीं माझा होऊनि. ॥ ५४ ॥ वेद, शास्त्रें, पुराणें, । तीर्थें, व्रतें, तपें, दानें, । मत्कर्माहूनि साधारणें ।

देखें सकळें. ॥ ९५ ॥ श्रेष्ठही असो दुजें, । परि मजवांचूनि प्रिय न भजें, । सर्वस्वें माझेनि काजें । होई व्रती. ॥ ९६ ॥ मोक्षाहूनि हेचि थोर । दासत्व मानी परिकर, । कर्म न करीं येर । कांहीं, अर्जुना. ॥ ९७ ॥ मत्कर्मव्रती तूं होसी ।' तरि हेंचि वर्म जाण निश्चयेंसीं; । आणिक कांहीं वरिसी । तरी वृथा व्रत. ॥ ५८ ॥ आकाश तुटोनि वरि पडो । मोक्षु न हो, बंधु घडो, । लौकिकु, परमार्थु बुडो, । परि तें न सोडावें. ॥ ९९ ॥ माझ्या कर्मासाठीं । तुवां आपणा धावें, किरीटी, । स्वहिता विहिताची गोष्टी । न करावी पुनरपि. ॥ ४६० ॥ येथें निश्चयो असावा दृढतरु । आणि प्रीतियोगु अपारु । तरि मत्कर्मविधु आचारु । संपादेल. ॥ ६१ ॥ प्रेमें, निश्चयेंवांचून । हे करणी मानें कठिण, । लौकिकु वाजे मन । आपुलेंही नेघे. ॥ ६२ ॥ आतां तो निश्चयोही नसेल, । प्रेम तें कांहींचि केवळ, । मन दों ठायीं वाटेल, । अर्जुना, तुझें, ॥ ६३ ॥ येणेंचि कृतकृत्य होईन, । कीं आन येक करूं साधन, । येकनिष्ठा करितां भजन । शकिती लोक ॥ ६४ ॥ ऐसें न तंव येथ न दिसे । साधन परि कठीण असे । नसतेनि निर्धारें प्रेमाशें । ऐसें मानेल. ॥ ६५ ॥ तन्ही तें न सांडावें, अर्जुना, । उपाया सांगेन आना, । तूतें ठाके, मना । माने लोकांचिया. ॥ ६६ ॥

मदर्थमपि कर्माणि कुर्वन्

जें जें विहित ठाके शरीरीं । तें मजकारणें तन्ही करीं. । मग होईल पुण्यसामग्री । क्रमें क्रमें. ॥ ६७ ॥ जें जें करिसी तीर्थाटण । माझी प्राप्ती इच्छीं तेणेंकरून, । मग सुकृत कारण । होईल प्राप्तीचें. ॥ ६८ ॥ स्नान, संध्या, देवार्चन, । वैश्वदैविक औपासन, । मंत्रजपु, अनुष्ठान, । यज्ञ, याग, ॥ ६९ ॥ नित्य, नैमित्तिक सकळ । कर्म करितां केवळ । अंतीं माझी प्राप्ती फळ । तयाचें चिंतीं ॥ ४७० ॥ जे जे करिसी उपासना । तेथें माझी प्राप्ति मागें, अर्जुना, । झोंबों नेदीं कामना । आणिका अर्था. ॥ ७१ ॥ आपुला स्वधर्मु आचरतां । अनादर स्वभावें नुपजे चित्ता । आणि लौकिकु तो सर्वथा । न पडे वरि. ॥ ७२ ॥ यया वेगळें शुभ सकळ । तें आधीं तुझेंचि मन घेईल । मग तें करीं तात्पर्य केवळ । तें उपजावेंचि नलगे. ॥ ७३ ॥ एवं नित्य, नैमित्तिक, विहित । आणि येर तीर्थ, दान, व्रत ।

करिसी कांहीं सुकृत । आपुलेनि सावकाशें ॥ ७४ ॥ तें मजाचिकारणें करीं । माझी प्राप्ति इच्छीं अंतरीं । एवं मदर्थ तरि ययापरी । करितां कर्म, ॥ ७५ ॥

सिद्धिमवाप्स्यसि

तूतें तेणें पुण्यबळें । सत्वशुद्धि होईल सकाळें । मग रजतम दोषीं घूपलें । उरैल चित्त. ॥ ७६ ॥ तेणें निश्चयो होईल माझ्याठायीं, । उपजैल प्रेम अक्षयी । ध्यानयोगाची जाणई । सिद्धि होईल. ॥ ७७ ॥ मन, बुद्धि माझ्या ठायीं । घालावया दक्षु तई । होसी स्वरूपें, जाणई, । क्रमें जन्मांतरीं. ॥ ७८ ॥ विलंबें परंतु, जाण, । सत्कर्मेंही मोक्षाचें साधन, । जरि तें मत्प्राप्तीलागून । केलें होये ॥ ७९ ॥ येथें आइकें गा, अर्जुना, । असावी मत्प्राप्तीचीचि वासना । आणि विहिताचरणीं मना । नुपजावा त्रासु. ॥ ४८० ॥ आतां मत्प्राप्तीचें सुख नेणतां । न होसी तें तूं इच्छिता, । असो, अगा, तें करावें विहिता । कां येकें स्वार्थें. ॥ ८१ ॥

अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।
सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥

अथ एतदपि कर्तुमशक्तोऽसि

ऐसें असैल मानसीं । मग हेंही जरि करूं न शकसी, । कवणें प्रकारें परियेसीं । पुढती कर्म. ॥ ८२ ॥

मद्योगमाश्रितः

अवधारीं गा, धनुःपाणि, । माझा प्राप्तियोगु आश्रयूनि । विहिता कर्मालागूनि । प्रकृति करणें. ॥ ८३ ॥ एवं आश्रयूनि मत्प्राप्तीतें । न शकसी करूं कर्मातें, । नेणोनि माझिया प्रभावातें । ऐसें जालें. ॥ ८४ ॥ अथवा कर्मयोगें मज पावावें, । कां मत्कर्मकरूनि पावों यावें, । अभ्यासयोगें अवलंबावें । माझें ध्यान. ॥ ८५ ॥ मग ध्यानयोगें, धनुःपाण, । मजसीं ऐक्य साधूनि, । मन, बुद्धि माझ्या स्थानीं । सामावणें. ॥ ८६ ॥ मग मीचि होऊनि असणें । ऐसिया योगाकारणें । काय म्हणिजे, तें सांगणें । लागैल तुजप्रति. ॥ ८७ ॥ भक्तियोगाधारें ज्ञानयोगु, । तो मदाधारेंचि मोक्षमार्गु, । तारवा आधारें जगु । जैसा समुद्र तरे, ॥ ८८ ॥ कां गादीं बैसोनि उगेंचि असणें । आणि चितिलिया ठाया जाणें, । तैसें मदाश्रित

योगें येणें । अहे, बापा. ॥ ८९ ॥ दासत्वमतें हेंचि करणें, । ईश्वरा आधीन होणें । आणि तयावेगळें न भजणें । निश्चयें प्रीती. ॥ ४९० ॥ मग तयाचें हित, विहित । मोक्ष,सुख,ज्ञान, मत, । ईश्वरचि तो समस्त । आपण वाहे. ॥ ९१ ॥ ऐसें असोनि सोपान । साच नमनी तुझें मन । आपुलेंचि कर्म प्रधान । धरूनियां. ॥ ९२ ॥ अहो, शुभकर्में शुभ पाविजे, । अशुभें अशुभचि लाहिजे । येथें तारक, मारक दुजें । नाहीं कर्मावेण. ॥ ९३ ॥ देवें कवणा काय यावें? । कर्मचि ईश्वर कां न म्हणावें? । ऐसें तुझेनि जीवें । घेतलें असतां, ॥ ९४ ॥ मदाश्रयें नठके योगु, । दासत्वमार्गु जो सांगु । आश्रयिसी कर्मयोगु । तऱ्ही येक आहे. ॥ ९५ ॥

यतात्मवान्

विकर्म निषिद्ध सांडूनि, । आणि विहिताकरण फेडूनि । विहित, वैदिक, धनुःपाणि, । जें कीं कर्म ॥ ९६ ॥ येथें नियमूनि अंतःकरण । मन, बुद्धि इंद्रियगण, । स्थूल शरीर आणि प्राण, । वासनादिक. ॥ ९७ ॥ मग नित्य, नैमित्तिक आचरोनी, । तात्पर्यें निष्ठा करूनि । तयावरि धनुःपाणि, । येक करावें. ॥ ९८ ॥

सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु

सकळें कर्में अंगिकारीं । तयांचा फलत्यागु तऱ्ही करीं । सागिजैल आतां कुसरी । तया कर्मयोगाची. ॥ ९९ ॥ कर्तृत्वाभिमानु नाश्रयणें, । फळाचा त्यागु करणें, । सकळ विहित आचरणें, । इतुलयावरि. ॥ ५०० ॥ ऐसें निर्वासन कर्म करितां । सत्त्वशुद्धि होईल काळां बहुतां; । मग तऱ्ही तूं, पार्था, । पावसी ज्ञानद्वारा. ॥ १ ॥ केवळ भक्तियोगु नाहीं, तरि । कर्मयोगु तरी ऐसा करीं; । परंतु ययावेगळी न करीं । तिसरी निष्ठा. ॥ २ ॥ कर्म, भक्ति आणि ज्ञान । हें त्रिविध वस्तुसाधन; । येर वृथा देहदमन । हटयोगादिक. ॥ ३ ॥ तें प्रशस्त नव्हे सर्वथा, । लय, लक्षधारणा वृथा, । आतां अवधारीं, पार्था, । येथिंची विचारणा. ॥ ४ ॥

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।
ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छांतिरनंतरम् ॥ १२ ॥

अभ्यासात्

नेणोनि वेद, शास्त्र, पुराण, । आणि मोक्ष उपायाची खूण, । कवणा

विहित. ॥ १४० ॥ आतां ज्ञानें कळे साधन । तो अमार्गे तेणें जाण, । न भ्रशे म्हणौनि ज्ञान । थोर म्हणितलें. ॥ ४१ ॥ ज्ञानें साधन पडलें ठायीं । आणि करणीची प्रवृत्ति नाहीं, । तें निर्फळ जाणई । जैसें झाड. ॥ ४२ ॥ तेणें इहलोकु ना परलोकु, । मा मोक्षु कैंचा आणिकु, । व्यर्थचि करावा शोकु । कंठासि तेणें. ॥ ४३ ॥ म्हणौनि माझें मूर्तिध्यान । तें इहामुत्रार्थ फलोत्पादन, । कामिक तन्ही, जाण, । त्याहूनि, बा रे; ॥ ४४ ॥ ज्ञान सर्व पक्षीं अफळ । जें कीं साधना विकळ, । ध्यान माझें सुफळ । इहामुत्रार्थकामें. ॥ ४५ ॥ तेंही परंतु ध्यान । नव्हे मोक्षाचें साधन; । संसारु पोषी, परि जाण, । छेदूं न शके. ॥ ४६ ॥ तो योगु, तें ज्ञान, तें ध्यान । संसारदायकचि, जाण, । परंतु मोक्षाचें साधन । नव्हे सर्वथा. ॥ ४७ ॥ अभ्यासु तो पापपोषकु, । ज्ञानाचा उभारा फोंकु । ध्यानयोगु तो विक्षेपकु । मोक्षार्थविषयीं. ॥ ४८ ॥

त्यागात्

आतां फळत्यागें येणें । कर्म करितां काय पावणें; । हें लागैल सांगणें । तूतें, अर्जुना. ॥ ४९ ॥

शांतिः

त्रिविधा कर्माचा ध्वंसु, । सकळा संसाराचा विनाशु. । समाधिस्थितिदशा पुरुषु । क्रमेंचि पावे. ॥ १५० ॥ व्यतिरेकें शुद्ध ब्रह्म, । तेंचि अन्वयें सर्वसम, । सन्मात्र शिव निष्कर्म । देखे स्वरूप, ॥ ५१ ॥ ऐसी ब्रह्मस्थिति केवळ । पाविजे सांडितां कर्तृत्वफळ, । आपुलें विहित सकळ । कर्म आचरतां. ॥ ५२ ॥

अनंतरम्

फळ त्यागिलें जेंहीं । तयां शांति ह्मणसी कई ? । तरी कांहींचि अंतर नाहीं, । मध्यें व्यवधान. ॥ ५३ ॥ फळत्यागें कर्म केलें । तें पुढें न वढे; बीज करपलें, । संसारबंधन तुटलें । तयेचि क्षणीं. ॥ ५४ ॥ ऐसें नाकुरे क्रियमाण, । तंव भोगें सरलें प्राचीन, । हें येकेचि क्षणें, जाण, । होतां दिसे. ॥ ५४ ॥ तेंचि सत्वशुद्धीचें होणें, । तेंचि विज्ञानाचें प्रकाशणें । तें समाधिदशा पावणें । साधनेंविण. ॥ ५५ ॥ फळ त्यागेंसीं नृपाळा, । मोक्षु तो असेचि लागला, । मध्यें खंडण तयाला । अंतर नसे. ॥ ५६ ॥

कां अंतर नाहीं जया बोधा । क्यों, विक्षेपु, भेदु कदा? । अबोधु, ना बोधु सदा । ब्रह्मचि असणें. ॥ ५७ ॥ व्यतिरेकान्वयज्ञानें । सहजस्थिति स्वयेंचि असणें, । कांहींचि नलगे पुढती करणें । ऐसें होये. ॥ ५८ ॥ ज्ञानहीनु अभ्यासु जाण, । आणि अभ्यासहीन शब्दज्ञान, । तिसरें सकाम माझें भजन । ध्यानयोगें; ॥ ५९ ॥ याहूनि फळत्यागु आगळा, । विहिताचरणीं, नृपाळा, । हाही योगु आश्रयिला । वेदांतवेत्तीं. ॥ ९६० ॥ येकु योगु हा कर्माश्रयें, । पूर्वोक्तु योगु तो मदाश्रयें, । या दोहीं योगीं जो राहे । तोचि साधकु. ॥ ६१ ॥ स्मृति, शास्त्र अनुसरले, । कर्माधारें ज्ञानी जाले, । ते जीवन्मुक्त कथिले । स्मार्तपक्षें. ॥ ६२ ॥ येक मदाधारें अभ्यासिती, । ज्ञानयोगें मातें पावती, । मीचि होउनि असती । ते भागवतजन. ॥ ६३ ॥ एवं कर्मभक्ति ये दोन्ही । साधनें सारिखींचि ज्ञानीं, । तिसरें येथें नाणी । पापरूप. ॥ ६४ ॥ ऋषिमार्गे, कां भक्तिमार्गे । तुवां वर्तावें अर्जुना, उगें, । माझिये प्राप्तीजोगें । तिसरें नसे. ॥ ६५ ॥ तूं म्हणशील, वीरपति, । तूतें प्रियु कवणु आथी? । तरी माझा भक्तु योगी तो अति । प्रियु मातें. ॥ ६६ ॥ आतां तया प्रियाचें । आईक लक्षण भक्ताचें, । सांगेन, अपाडाचें । अर्जुना तुजप्रति. ॥ ६७ ॥

अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ॥
निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥

सर्वभूतानाम्

देखोनियां सकळें भूतें । तयांच्या ठायीं कैसा वर्ते? । आपणु देखे तयातें । कवणे दृष्टी? ॥ ६८ ॥

अद्वेष्टा

उंचु, नीचु भावो सकळांचा । परि द्वेषु न करी कवणाचा, । मी पोषकु सर्वांचा । आत्मा जाणोनियां. ॥ ६९ ॥ आपुली वाढावया महंती । पक्षु दुजयाचा दूषिती । सभेमाजि आक्षेपिती, । आरोपिती दूषण. ॥९७०॥ दूषणिची दृष्टी, अर्जुना, । न पाहाती परावयां गुणां, । धर्मवादी ते आपणा । आपण मानिती. ॥ ७१ ॥ ते सान्निध्यही पावले । भक्त परी नरकीं घातले, । परद्वेषें असती विटाळले । पापरूप. ॥ ७२ ॥ अभिमानाचा दोषु अंगीं । तो काम, क्रोधाचा नित्य संगी, । मग आत्म-

महत्वालागीं । दूषी परावया. ॥ ७३ ॥ तो दैत्यु, तो राक्षसु, । नव्हे, अर्जुना, माझा दासु । जया साहे आंगीं स्पर्शु । अभिमानाचा. ॥ ७४ ॥ अभिमानु नाथी जये शरीरीं । तेथें कामु, क्रोधु पडे दूरी, । मग स्वस्तुति, परद्वेषु, न करी । भक्तु माझा. ॥ ७५ ॥ आपणाचि ऐसे समान । ईश्वराचे म्हणे जन, । येथें ज्ञानवैराग्यधन । तया ईशाधीन ॥ ७६ ॥ अज्ञु ज्ञाता करी नाथु, । ज्ञाता अज्ञानु तो समर्थु, । अधनी कुतो धनवंतु । कृपायोगें. ॥ ७७ ॥ एवं सकळ जीव ईश्वराचे । सकळ भाग्य देणें तयाचें । ऐसें जाणोनि नवचे । स्वाहंकारें. ॥ ७८ ॥ न करी दुजयाचा द्वेषु, । भूतां दिधला असतां त्रासु, । जाणे प्राचीनविशेषु, । कां इच्छा ईश्वराची. ॥ ७९ ॥ ऐसा देखोनियां भूतांसी । द्वेषकांतेंही न द्वेषी, । तो पाहोनि माझिया भक्तांसी । तयांसी कैसा ? ॥ १८० ॥

मैत्रः

परममित्रु, प्रियवादी, । दिधलें साहे दुःख, नेदी; । येकेचि भक्तीची गवांदी । ऐसें जाणोनियां. ॥ ८१ ॥ निजगुह्य तयां सांगणें, । आइकणें तयांचें पुसणें, । अपूर्व देणें, मागणें, । मद्भक्तीविषयीं, ॥ ८२ ॥ वरें चिरकाळ आठवणें, । वाईट तें विसरोनि जाणें, । ऐसीं प्रीतीचीं लक्षणें । मित्रत्वा आचरे. ॥ ८३ ॥ आश्रयूनि आग्रहा बळा । अधरस्पंदु आगळा । न करी जो वेळोवेळां । मानवे त्याच्या वचनीं. ॥ ८४ ॥ स्वाहंकारें न बोले । जऱ्ही तें स्वमत आगळें, । तयांचिया हिता आपुलें । वेंची शरीर. ॥ ८५ ॥ ऐसा आपुल्या गुणीं शांतु, । आणि मद्भक्तगुणीं निवतु, । उच्छृंखल नव्हे तो दूतु । पट्टाचा, गा. ॥ ८६ ॥ सर्वत्र द्वेषहीनु, । परी मद्भक्तांचा प्राणु, । आतां जो जनु तया अधीनु । तयासी कैसा ? ॥ ८७ ॥

करुण एव च

अत्यंतचि कृपा करी । तयां मद्भक्ति लागे जयापरी । दंडें विचारें परोपरी । लावी भजन. ॥ ८८ ॥ पुत्र, कलत्र, शिष्यजन । दुजे आश्रितही आन । ते तरावे देवा ह्मणौन । आदरें उपदेशी. ॥ ८९ ॥ अथवा उत्तमांच्या ठायीं । द्वेषु जयातें नाहीं । समाना भक्तांसीं जाणई । याटवी मैत्री. ॥ ५९० ॥ सामान्यावरी करी करुणा, । ईश्वरा, रक्षीं म्हणे या दीना, । होववे आपुलिया आंगवणा । तें हित संपादी. ॥ ९१ ॥

कां ब्रह्मादिस्तंबवरी । भूतांचा द्वेषु न करी, । अद्वेष्टा सर्वांचा ययापरी । माझा दासु. ॥ ९२ ॥ सर्वांचा आत्मा मी जाणे । आपणा तेंचि प्रमाणें, । सकळ सभाग्य देखणें । ईश्वरें म्यां. ॥ ९३ ॥ ऐसें सर्वत्र समदर्शन, । स्वसमानता मैत्री, जाण, । जया भक्ताचें मन । घेउनि बैसलें. ॥ ९४ ॥ ईश्वरीं गति हो सर्वांसीं, । सर्वत्र कृपा वे ऐशी, । स्फूर्ति मतीच्या प्रकाशीं । जयाचिये. ॥ ९५ ॥ विश्व सुखी असावें, । विश्व ईश्वरीं भजावें । ऐसें मानी मनोभावें । माझा भक्तु. ॥ ९६ ॥ आप, परावा, वैरी, मित्रु । ऐसाचि सर्वांसि जो नरु । अद्वेष्टा, आप्तु, कृपाकरु । चराचरीं. ॥ ९७ ॥ असो सकळां प्रकारीं, अर्जुना, । सारखेंचि देखे यया जना, । माझियां भज अधीनां । समस्तांतें. ॥ ९८ ॥ मग पाहिजे तेथें अद्वेष्टा, । पाहिजे तेथें मित्रु मोठा, । पाहिजे तयां प्रेमपुष्टा । कृपा करी. ॥ ९९ ॥ ऐसे निजगुणेंचि सहजगुण । शरीरीं जयालागून, । तो कैसा असे ह्मणौन । सार्वकाळ ? ॥ ६०० ॥

निर्ममः

स्वजनीं ममता असावी, । ते कैसी जया नाहीं ठावी, । मग आपुलीं आणि परावीं । सारिखीं सहज. ॥ १ ॥

निरहंकारः

आणि स्वशरीरीं अहंकारु । करपला तयाचा अंकुरु । इतुलेनि परद्वेषा मारु । तो करावाचि नलगे. ॥ २ ॥ देहाभिमानपुरस्कारें । योग्यता जयाची न स्फुरे, । स्वस्तुति, परनिंदा, वा रे, । तया कैंची ? ॥ ३ ॥ एवं अहंता, ममतारहितु । तो सहज अद्वेष्टा, शांतु, । सकळ सारिखेंचि देखतु । ऐसें असतां, ॥ ४ ॥ मद्भक्ति आवडे शरीरीं । म्हणौनि मद्भक्तांसि पडे मैत्री, । आणि प्रवर्ततया जनांवरी । कृपा उपजे. ॥ ५ ॥ म्हणौनि अहंत्व स्वदेहीं, । आणि स्वजनीं ममत्व, जाणई । तेंचि विकार धरी तयीं । इतुलें होये. ॥ ६ ॥ उत्तमांच्या ठायीं द्वेषु, । स्वजनीं मैत्री प्रीतिरसु, । तयां बाधिती ते, जाणिजसु । वैरी होती. ॥ ७ ॥ परावयावरी नये कृपा । ऐसा दोषु हा, बापा, । अहंता, ममता पापा । कारण होती. ॥ ८ ॥ म्हणौनि अहंता, ममतारहित । यालागीं हे ऐसे भक्त ।

कीं माझ्या ठायीं रत । म्हणौनियां. ॥ ९ ॥ माझिये आसक्तीकरूनि । हारपले आपुल्या गुणीं, । मग दासत्वाच्या चिन्हीं । उमटते झाले. ॥६१०॥ तयां शरीरीं अभिमानु नाहीं, । ममत्व स्वजनांच्या ठायीं, । जे माझ्याचि प्रमडोहीं । बुडोनि गेले. ॥ ११ ॥ श्रेष्ठांच्या ठायीं नसे द्वेषु, । माझिया भक्तांचा विश्वासु, । मैत्रीयोगु बहुवसु । समानांच्या ठायीं. ॥ १२ ॥ प्रवर्तती तयांवरी कृपा । ऐसें घडलें, बापा, । माझेनि भक्तिरसें पुण्यरूपा । सिंपलें म्हणौनि. ॥ १३ ॥ परंतु भक्तांगिचें चिन्ह । हें तंव अचुक जाण, । आतां ययावेगळें आन । जें देहीं निपजे. ॥ १४ ॥

समदुःखसुखः

अनुकूलें अर्थे होये सुख, । प्रतिकूलें तेणें दुःख, । अथवा आमयनिरामयात्मक । देहीं उपजे; ॥ १५ ॥ तें प्राचीनजनित सकळ, । प्राचीना आपणूचि मूळ, । मग आत्मान्वयें केवळ । देखे सारिखेंचि. ॥ १६ ॥ शुभाशुभ पूर्वकृत । तें मजचि पासाव समस्त, । आतां तयाचें फळ उचित । तें भोगावेंचि कीं. ॥ १७ ॥ कीं शुभाचें फळ सुख जाणे । आतां अशुभ तेंही सुखाचि कारणें । पूर्वीं शरीरें, बुद्धी, मनें । केलें करणद्वारा. ॥ १८ ॥ यापरी सुखान्वयें पाहतां । शुभाशुभा सुखीं ऐक्यता, । म्हणौनि दुःख तेंही तत्वतां । सुखमयचि तें ॥ १९ ॥ असो मुख्यत्वें आईक, पार्था, । जया देहीं अहता ना ममता । देहावेगळेपणें पाहतां । जो माझा जाला. ॥६२०॥ आपणु माझा होऊन । देहाचेंही केलें समर्पण । आतां तेथें मी माझें हाणौन । कैसें ह्मणावें ? ॥ २१ ॥ ईश्वरीं पुण्य वाहिलें । तें मग नव्हे आपुलें । वासनेपासाव सोडिलें । इदं न ममत्वें. ॥ २२ ॥ तेथें सुख हो, अथवा दुःख । तें ईश्वरइच्छा सकळैक, । तेथें आपणु नापेक्षी सुख, । ना दुःखें त्रासे. ॥ २३ ॥ ऐसें असतांही वरी । पराचा जे पीडाचि करी । तें कैसें साहावें शरीरीं । ऐसें म्हणसील ? ॥ २४ ॥

क्षमी

तरी दुजे न करितां पीडण । क्षमाचि करी तेथ आपण, । कांहीं बोलतां कठिण । कैसें होये ? ॥ २५ ॥ ममता उमटे शरीरीं, । अहंता होये खरी । इतुलेन देह तें, अवधारीं । घेतलें होये. ॥ २६ ॥ ईश्वरीं समर्पूनि पुटती । जे नर पदार्थ घेती । ते महारौरव भोगिती । नव्हती

भक्त. ॥ २७ ॥ आणि ईश्वरार्पण जें केलें । तें ईश्वराचें, परी नव्हे आपुलें, । आतां समर्थाचें तें पीडिलें । न वचे आणिकां. ॥ २८ ॥ म्हणौनि सुख-दुःखदाता । तो ईश्वरूचि तेथें सर्वथा, । म्हणौनि आगळें बोलतां । होइजे देवद्रोही. ॥ २९ ॥ अगा, जें ईश्वरार्पण करणें । काया, वाचा आणि मनें. । तयाचा विधु जाणे । द्विविधु असे. ॥ ६३० ॥ स्वाहाकारें लागिलें । तें ईश्वरार्पण केलें । आतां तये पदार्थी आपुलें । ममत्व नसावें. ॥ ३१ ॥ म्हणौनि स्वाहाकारावरी । "इदं न मम" जो उच्चारी । तो भक्तु त्यागु करी । तेथुले ममतेचा. ॥ ३२ ॥ म्हणौनि शरीर, मन, प्राण, । जीवु, बुद्धि, इंद्रियगण, । जेणें भक्तें समर्पण । केलें मातें. ॥ ३३ ॥ जो सुभक्त तो मागुता । तेथें न धरी अहंममता, । म्हणौनि क्षमावंतु तत्वता । ऐसा दिसे. ॥ ३४ ॥ परी अपराधु क्षमा करणें । इतुलयाही भोगाकारणें, । उरला नाहीं आणि जेणें । ठेविलें नसे. ॥ ३५ ॥ समर्पला होऊनि मातें । कैसा भजे जाण, निरुतें । सांगेन, अर्जुना तूतें । चित्त देईं. ॥ ३६ ॥

संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ॥
मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥

सततं संतुष्टः

कामकल्पनारहितु, । तृष्णाशोकविगतु, । नित्यसंतुष्टु, अपेक्षावंतु । सर्वदा नव्हे. ॥ ३७ ॥ शरीरनिर्वाहो चिंतावा । तरी तें कवणाचें ? ह्मणे पांडवा, । जेथें स्वतंत्रता नाथी जीवा । माझिया मज. ॥ ३८ ॥ आतां हें असो नविक, । इच्छा करिती आणिक, । ते करूं नेणती मूर्ख । कैसी करावी. ॥ ३९ ॥ पदार्थ इच्छिले अपार । परी प्राचीनांशूचि भोगी शरीर; । तेथें केली तृष्णा ते समग्र । व्यर्थ होय. ॥ ६४० ॥ तरी प्राचीन भोगा यावें । ऐसी वासना धरितां जीवें । कांहीं सार्थक स्वभावें । होये ह्मणसील, ॥ ४१ ॥ तरी जे वेळीं तें भोगा ये । ते वेळीं लोटिताही नव जाये, । येरव्हीं येवो ह्मणतां न ये । जैं नसे भोगु. ॥ ४२ ॥ ह्मणौनि भोगावें तें प्रारब्धचि, । तें नलगे अपेक्षावें कांहींचि, । अचूक, अनिवार जयाची । प्राप्ति असे. ॥ ४३ ॥ आतां तृष्णे कारण नाहीं । ते कां आणावी देहीं ? । जें सुखमात्र अवघेंही । नाशू लागे. ॥ ४४ ॥ म्हणौनि जो माझा भक्तु । सकळ अपेक्षारहितु, । जाणोनीचि संतुष्टु ।

करणां समग्रां । अंतरीं सांडूनि विकारां । स्वस्थ जालें. ॥ ६३ ॥ निद्रा, जागृति,ना स्वप्न, । अन्यथा भासाचें भान । तेथें माझिये अवलंबन । मूर्तीचें असतां, ॥ ६४ ॥ तेथें निर्विकार, निश्चळ । मन ठेविलें जेणें अढळ । तेणेंचि संगें पांगुळ । जाले प्राणादि करणगण. ॥ ६५ ॥

दृढनिश्चयः

संकल्पात्मक मन नियमूनि, । निश्चळता पूर्ण साधुनी, । मग, बुद्धीनें येकस्थानीं । लक्ष ठेविलें. ॥ ६६ ॥ कीं निर्धारू धर्मबुद्धीचा । तो येकनिष्ठ जाला जयाचा । प्रकाशु तपे ज्ञानाचा । तो आवरला मद्रूपीं. ॥ ६७ ॥ कीं मजवेगळें कांहीं । ध्येयावलंबन दुजें नाहीं, । हेंचि ईश्वरू हृदयीं । ऐसा विश्वासु. ॥ ६८ ॥ आणि कुधर्मु तो अधर्मु । ऐसा दृढ जयाचा नियमु । माझा ध्यानयोगु उत्तमु । तेथूनि न चळे. ॥ ६९ ॥ चंचळ चित्त निश्चळ करणें । मनोनियमु तो नामें येणें, । मूर्तिपासाव न चवणें । ऐसा तो दृढनिश्चयो. ॥ ६७० ॥ कीं चंचळवृत्तीचा नियमु । तोचि मनोनिग्रहो उत्तमु, । तेथें येकनिष्ठ ज्ञानधर्मु । तो नियमु बुद्धीचा. ॥ ७१ ॥ एवं, मन, बुद्धी, नियमूनी । प्रवर्तला असतां ध्यानीं । तया ध्यानाची सिद्धी पावोनी । पुढें कैसा ? ॥ ७२ ॥

मय्यर्पितमनोबुद्धिः

नियतबुद्धि, नियतमन, । तें माझ्या ठायीं प्रवेशवून । निष्ठा करी, जाण । भक्तु, माझ्या ठायीं. ॥ ७३ ॥ चंचलवृत्ति ते मनाची, । ज्ञानरूप वृत्ति बुद्धीची, । या दोन्ही, अर्जुना क्रमेंचि । मातें समर्पणें. ॥ ७४ ॥ वृत्ति मातें समर्पणें । म्हणिजे मद्रूप करणें, । माझ्या ठायीं प्रवेशवणें । ऐसा भावो. ॥ ७५ ॥ आतां मना ज्ञानाचें अवलंबन । तेथें न प्रवेशे मन ज्ञान । घटीं दृष्टिसंक्रमण । नाहीं जयांपरी. ॥ ७६ ॥ देखणें प्रकाशु द्रष्ट्याचा । कीं तया घडे दृश्याचा । दृश्यगोचर तयाचा । भावो तो जडु. ॥ ७७ ॥ द्रष्ट्याचा प्रकाशु देखणें । म्हणौनि दृश्येंसी तें मिळों नेणें, । द्रष्ट्यामाजि संक्रमणें । अयत्नेंचि तया. ॥ ७८ ॥ दर्शन दृश्यीं संचरे, । तेथें दृश्य अधिक स्फुरे, । तदंगें वेगळेंचि खरें । पडे दर्शन. ॥ ७९ ॥ द्रष्टा संचरे देखणें । तै दृश्येंसि तुरिजे तेणें, । द्रष्टा नुरे द्रष्टेपणें । ऐसें होये ॥ ६८० ॥ म्हणौनि ज्ञेयीं न मिळे ज्ञान, ।

नित्य राहिला. ॥ ४५ ॥ जेथें जेथें तृष्णा धरी । तेथें तेथें ते मिथ्या, परी । ममता, अहता होये खरी । नाशक दासत्वा. ॥ ४६ ॥ म्हणौनि हानि, लाभु वा जो देहीं । पदार्थ भासतु अवघाही । परंतु आपुलीही नाहीं । चाड जया. ॥ ४७ ॥ मातें हवा मोक्षु, । माझा वाढावा पक्षु, । ऐसें न सोपी दक्षु । शुद्ध संप्रदायें. ॥ ४८ ॥ माझें चुकावें पतन, । मातें हो ब्रह्मज्ञान, । देवासन्निध पावैन । मोठेंसें पद, ॥ ४९ ॥ ऐसीं आपुलीचि जेथ नाहीं । तेथ देहाची चाड ते कायी ? । मा बुडे तृष्णेच्या डोहीं । भक्त माझा. ॥ ६५० ॥ देतांही नेघे आन, । अर्जुना, मज येकावांचून, । तयाच्या देहीं, जाण । कामनाचि नसे. ॥ ५१ ॥ कोळिसा फुकितां वाती लागे । ऐसें घडे काय गा प्रसंगें ? । तेवीं जयाचें मन अवघें । निःकाम असतां, ॥ ५२ ॥ मी काय आशा दाखवूं ? । आतां असो कासया श्रमवूं । कांहीं न मागे नेघे आठवू । न करी अर्थाचा. ॥ ५३ ॥ नपुंसकु, वरी ब्रह्मचारी, । कीं प्राणहीनु निद्रा करी, । कीं धाला इच्छा न करी । कांजियाची. ॥ ५४ ॥ तैसा सहजें कामनाशून्यु, । वरी दासत्वमतें निपुणु, । तो अपेक्षा करणें हा सीणु । कासया वाहेल ? ॥ ५५ ॥ अपेक्षूं तें काये ? मी कवणाचा कवणु आहें ? । देह कैसें कवणाचें होये ? । मज काये हें. ॥ ५६ ॥ ऐसा असोनि पार्था, । ऐशा ज्ञानीं जया योग्यता । नित्य वर्ते तो आतां । काये मा मागैल ? ॥ ५७ ॥ असो नानापरी संतुष्टु, । माझा दासु तो सुरश्रेष्ठु, । आतां माझ्या भजनीं सुष्ठु । कैसा प्रवर्तला. ॥ ५८ ॥

सतत योगी

सार्वकाळ योगयुक्तु, । लया, विक्षेपा वर्ते अतीतु, । तो योगु कैसा ? ऐसें तूं । पुससील जरी, ॥ ५९ ॥

यतात्मा

सार्वकाळ जयाचें मन । सांडूनि आपुले स्वभावगुण । माझिये मूर्तीचें ध्यान । तेथेंचि स्थिरावलें. ॥ ६६० ॥ हारपलेनि लयें, विक्षेपें । येकाग्र जालें न कंपे; । निर्वातीं जळता दीपें । न डोलिजे जेवीं. ॥ ६१ ॥ मकराच्या जेवीं नयनीं । निमिषोन्मेष नसती दोन्ही, । तैसें नित्य सावधान, धनुःपाणि । जयाचें मन. ॥ ६२ ॥ न लगत स्थूळा शरीरा । आणि मन

करणां समग्रां । अंतरीं सांडूनि विकारां । स्वस्थ जालें. ॥ ६३ ॥ निद्रा, जागृति,ना स्वप्न, । अन्यथा भासाचें भान । तेथें माझिये अवलंबन । मूर्तीचें असतां, ॥ ६४ ॥ तेथें निर्विकार, निश्चळ । मन ठेविलें जेणें अढळ । तेणेंचि अगें पांगुळ । जाले प्राणादि करणगण. ॥ ६५ ॥

**दृढनिश्चयः**

सकल्पात्मक मन नियमूनि, । निश्चळता पूर्ण साधुनी, । मग, बुद्धीनें येकस्थानीं । लक्ष ठेविलें. ॥ ६६ ॥ कीं निर्धारू धर्मबुद्धीचा । तो येकनिष्ठ जाला जयाचा । प्रकाशु तपे ज्ञानाचा । तो आवरला मद्रूपीं. ॥ ६७ ॥ कीं मजवेगळें काहीं । ध्येयावलंबन दुजें नाहीं, । हेंचि ईश्वरू हृदयीं । ऐसा विश्वासु. ॥ ६८ ॥ आणि कुधर्मु तो अधर्मु । ऐसा दृढ जयाचा नियमु । माझा ध्यानयोगु उत्तमु । तेथूनि न चळे. ॥ ६९ ॥ चंचळ चित्त निश्चळ करणें । मनोनियमु तो नामें येणें, । मूर्तिपासाव न चवणें । ऐसा तो दृढनिश्चयो. ॥ ६७० ॥ कीं चंचळवृत्तीचा नियमु । तोचि मनोनिग्रहो उत्तमु, । तेथें येकनिष्ठ ज्ञानधर्मु । तो नियमु बुद्धीचा. ॥ ७१ ॥ एव, मन, बुद्धी, नियमूनी । प्रवर्तला असतां ध्यानीं । तया ध्यानाची सिद्धी पावोनी । पुढें कैसा ? ॥ ७२ ॥

**मय्यर्पितमनोबुद्धिः**

नियतबुद्धि, नियतमन, । तें माझ्या ठायीं प्रवेशवून । निष्ठा करी, जाण । भक्तु, माझ्या ठायीं. ॥ ७३ ॥ चचलवृत्ति ते मनाची, । ज्ञानरूप वृत्ति बुद्धीची, । या दोन्ही, अर्जुना क्रमेंचि । मातें समर्पणें. ॥ ७४ ॥ वृत्ति मातें समर्पणें । म्हणिजे मद्रूप करणें, । माझ्या ठायीं प्रवेशवणें । ऐसा भावो. ॥ ७५ ॥ आतां मना ज्ञानाचें अवलंबन । तेथें न प्रवेशे मन ज्ञान । घटीं दृष्टिसक्रमण । नाहीं जयापरी. ॥ ७६ ॥ देखणें प्रकाशु द्रष्ट्याचा । कीं तया घडे दृश्याचा । दृश्यगोचर तयाचा । भावो तो जडु. ॥ ७७ ॥ द्रष्ट्याचा प्रकाशु देखणें । म्हणौनि दृश्येंसी तें मिळों नेणें, । द्रष्ट्यामाजि संक्रमणें । अयत्नेंचि तया. ॥ ७८ ॥ दर्शन दृश्यीं संचरे, । तेथें दृश्य अधिक स्फुरे, । तदगें वेगळेंचि खरें । पटे दर्शन. ॥ ७९ ॥ द्रष्टा सचरे देखणें । तें दृश्येंसि नुरिजे तेणें, । द्रष्टा नुरे द्रष्टेपणें । ऐसें होये ॥ ६८० ॥ म्हणौनि ज्ञेयीं न मिळे ज्ञान, ।

तें अधिष्ठानीं करी सक्रमण, । आतां मूर्तीच्या ठायीं बुद्धि, मन । कैसें सामावे ? ॥ ८१ ॥ म्हणोनि अवलंबिलें ध्येय । माझें स्वरूप व्यक्त ज्ञेय, । तें रूप जाणोनि स्वकीय । आत्मत्वें ध्यावें. ॥ ८२ ॥ मग स्वस्थिति निश्चळ असता । आर्गी सामावे चंचळता । तेंचि मन मिळालें, पार्था, । जाणावें स्वरूपीं. ॥ ८३ ॥ ज्ञेयाचें काढिता ज्ञान, । जाणता आपणा आपण, । ज्ञाना स्वरूपीं सक्रमण । तें जालेंचि कीं. ॥ ८४ ॥ एव ज्ञानरूपा स्वस्थिति । निश्चळ निष्ठा अवृत्ति, । आत्मया उरे आइति । आपुल्या ठायीं. ॥ ८५ ॥ तेंचि मना, बुद्धीचें सक्रमण, । मज आत्मयाच्या ठायीं, जाण, । ऐसीं न सधे साधितां खूण । तेणें दृश्यावलबनें. ॥ ८६ ॥ यापरी मन, बुद्धि यें दोन्ही । आवरिता आत्मस्थानीं । तेथें दृश्य देखणें मागुतेनी । ते अनात्म भावना. ॥ ८७ ॥ म्हणौनि तेथेंही दिसे आभासु । कीजे तयाचा न्हासु, । ज्ञानाचा वृत्तिविशेषु । तो उमटोंचि नेदावा. ॥ ८८ ॥ मनाबुद्धींचें एकपण । तेथें आकारलें द्रष्टेपण, । तें निर्विकल्प मीपण । निरोनि जावें. ॥ ८९ ॥ विरालिया अहभावना । वृत्ति नाकुरे बुद्धी मना, । तेथें निर्विकल्प अर्जुना, । उरे आत्मस्थिति. ॥ ६९० ॥ तेथें सन्मात्रतेचें असणें, । चिन्मात्रता ते भासणें । सुखमयता सपूर्णपणें । तें आर्गेआग. ॥ ९१ ॥ ऐसें सच्चिदानदमय संपूर्ण, । आत्मस्वरूप, सनातन, । तेंचि ब्रह्म, मी निर्गुण, । नित्यमुक्तु. ॥ ९२ ॥ अगा भक्ताचा मी आत्मा । तो प्रकट झालों, वीरोत्तमा, । माजि ग्रासला अनात्मा । प्रपचु हा. ॥ ९३ ॥ यापरी माझी उपासना । ते मी न हो करितां येना, । सकळा भेदाचें, अर्जुना, । लयस्थान मी. ॥ ९४ ॥ मन, बुद्धि यें दोन्ही जाण, । करिता माझ्या ठायीं लीन । आपणा जाणावें आपण । ऐसें आहे. ॥ ९५ ॥ मन, बुद्धि जंव न विरे । मीपणेंसीं सहित वा रे, । तव मज आत्मया न स्फुरे । वोळखी कीं. ॥ ९६ ॥ ऐसा हा ध्यानयोगु । पूर्वीं सांगितलें सांगु, । पुढती सुचिला प्रसगु । तेणेंचि प्रकारें. ॥ ९७ ॥ येथिचे मुख्य वर्म, जाण, । ध्येय तें आत्मत्वें जाणोन । मन बुद्धी आवरून । द्रष्टा धरिजे. ॥ ९८ ॥ मग अवलबू मूर्तीचा । अभिमानु द्रष्टत्वाचा । वृत्तिविशेषु मनाचा । बुद्धीचा ज्ञानभावो. ॥ ९९ ॥ साडूनि देता विकारु । येकदेशिता होये मारु, ।

आत्मा ब्रह्म निराकारु । तेथें मीचि उरें. ॥ ७०० ॥ ऐसें हेंचि माझें भजन, । हेंचि सकळभावसमर्पण, । आणि हेचि कीर निर्वाणखूण । मज जाणावयाची. ॥ १ ॥ यापरी मातें जाणोनी । प्रवर्तला स्वरूपसेवनीं, । आतां उरला देहीं, धनु पाणि, । भक्तु कैसा ? ॥ २ ॥

यः .

जो व्यतिरेकें अर्थु कथिला । तो ध्यानयोगेंचि जो बुझला । जीवेश्वर भेदु ग्रासला । अधिष्ठानीं. ॥ ३ ॥ मग अन्वयें सर्व ऐक्य जाणावें, । तें सहजचि जया अनुभवें । मना, बुद्धीसीं वेगळें नव्हे । सर्वभान. ॥ ४ ॥

मद्भक्तः

मग पूर्वाभ्यासें सावधानु । होउनी आश्रयी अभिमानु । मी दासु, किंकरु दीनु । येणें भावें. ॥ ५ ॥ ऐसा आत्मत्वें जाणे अभेदु, । जाणे आत्मत्वेंचि सर्व भेदु, । व्यतिरेकान्वयें बोधु । तो ऐसा सिद्धु जाला ॥ ६ ॥ कीं मन, बुद्धि माझ्या स्थानीं । येकत्वें जो समर्पुनी । स्वरूपस्थिति स्वस्थानीं । भजता भक्त. ॥ ७ ॥ कीं मद्रूप करूनि बुद्धि, मन । तदन्वयें प्रपचभान । आत्मा ब्रह्म जाणोन । भजे जो भक्त; ॥ ८ ॥ कीं माझें करूनि बुद्धि, मन । आपण ने घे मागुतेन । मग तेंही नित्य माझें भजन । तेंचि करी. ॥ ९ ॥ आतां असो अर्जुना, । जाणे ऐसिया भजना, । तो मदैक्यें माजूना । माझा भक्त. ॥ ७१० ॥ मृत्तिकेचा घटु जैसा, । उदकाचा तरंगु कैसा, । माझा भक्त जो तैसा । मीचि होये. ॥ ११ ॥

स मे प्रियः.

तो मीचि ऐसा मातें प्रियु, । मी कीं तो मातें ध्येयु, । ऐसा अनिरुद्ध भावो अद्वयु । एकु झाला. ॥ १२ ॥ स्त्रार्शे पुत्रु होये, । तो प्रियु कितीं प्राहे, । मातयाहीहूनि आहे । जवळी मातें. ॥ १३ ॥ असो मातें प्रियु तो भक्त ऐसा । जो मजवेगळा, गुडाकेशा, । मनें, बुद्धी, आमन्वें, चीरेशा, । उरेचि ना. ॥ १४ ॥ आता निचरतां यये जनीं । समस्तां कैसा, धनु.पाणि, । तो सांगेन तुजलागूनि । होईं अभिमुखु. ॥ १५ ॥

यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।
हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥

श्लोकः यस्मान्नोद्विजते

अगा, जो विचरतां जनीं । तयातें आला देखोनी । लोकांतें उद्वेगु मनीं । तो उपजेचिना. ॥ १६ ॥ हा आला काय करील ? । काये पां कांहीं मागेल ? । कवणे संदेहीं घालील । महातामसु ? ॥ १७ ॥ कवणा देईल शापु ? । देखतांचि आला कंपु, । असंवरु आंगीं कोपु । ययाच्या कीं. ॥ १८ ॥ कवणे उपायें हा टळे । म्हणौनि करिती फाणे डोळे, । येक ते एकावेगळे । फांकोनि जाती. ॥ १९ ॥ गुंपे तो पडे संदेहीं, । वित्तेंही सुटिका नाहीं, । नानापरीचे, जाणई, । उद्वेग घाली. ॥ ७२० ॥ ऐसा नव्हे जो, अर्जुना, । निरपेक्षु, कांहीं मागेना । आणि पीडकांही जनां । कल्याण इच्छी. ॥ २१ ॥ अपेक्षा न करी कांहीं । मागतया नेदी हें नाहीं, । परहितालागीं, जाणई, । ॥वेंची देह. ॥ २२ ॥ संदेहो फेडी इतरांचा, । उद्वेगु हरी मनुजांचा, । ऐसा मूर्तु आनंदाचा । कल्लोळ जो. ॥ २३ ॥ सर्वदा हास्यवदनु । अपीडकु, वरि सुप्रसन्नु, । जया देखतांचि जनु । विसरे श्रमातें. ॥ २४ ॥ सत्यवादी, शुभवादी, । प्रियवादी, हितवादी; । आंगें साहे परि नेदी । उपद्रो कवणा. ॥ २५ ॥ देखतया आत्मा, पांडवा, । माने हृदयीं घालावा, । जन म्हणे वोंवाळावा । पांचांही प्राणीं. ॥ २६ ॥ एवं देखोनि जया, वीरपति, । लोक न कंपती, न भिती, । चिंता, उद्वेगु न करिती । निंदा, क्षोभु. ॥ २७ ॥

यः

ऐसा जनातें माने प्राणु । जो शांतु, अनपेक्षु, सर्वज्ञु, । आतां जो भक्त सगुणु । मातें पावला. ॥ २८ ॥

लोकान्नोद्विजते च

तो लोकांतें देखोनियां । उद्वेगु नव्हे त्याचिया, । सर्वत्र मातें सर्वात्मया । सर्वदा जाणे. ॥ २९ ॥ तिहीं दिधले ते समस्त । क्लेश मानी ते प्रारब्धजनित, । व्याकुळ न करी चित्त । देखोनि तयां. ॥ ७३० ॥ हे मातें काये ह्मणतील, । मानितील कीं दूषितील, । बरें वाईट बोलतील, । मग काये करूं ? ॥ ३१ ॥ लौकिकु सांडितांचि व्यसन । मातें नाहीं मग स्थान, । कैंचें मिळेल वस्त्र, अन्न । लोकांवेगळें ? ॥ ३२ ॥ लोकभयें,

लोकशका। यये अर्थी अळका। नव्हे जो माझिया सुखा। निनदला भक्तु॥ ३३॥ अर्जुना, मन धरिज लोकाचें। येसणें सामर्थ्य करण कैंचें?। बहुविध मत तयाचें। आहे ह्मणौनि. ॥ ३४॥ येका आवडे कर्म, । येकां प्रिय तें कुकर्म, । येकां आळसियां अकर्म, । उगेंचि असणें. ॥ ३५॥ येका आवडे वादु, । न साहे येकातें शब्दु, । येक म्हणती भेदु, । अभेदु येक. ॥ ३६॥ ऐसें सनासनिक वर्ततां। करण कर्म करी कर्ता, । म्हणौनि लौकिकुचि सर्वथा। साडिता सुख. ॥ ३७॥ वर्तता भक्तिमार्गे येणें। आपणा हित तें करणें, । येथें बोलौनि लोक उणें। काय करितील. ॥ ३८॥ प्रारब्ध तेंचि भोगिजे, । येथें भोगा न येतें दुजें, । आता लोकीं काये कीजे। बालोनियां? ॥ ३९॥ ऐसें जाणौनि जो भक्तु। नि:शकु भजनीं वर्ततु, । लोकवादीं दु खितु। काळत्रयीं नव्हे. ॥ ७४०॥ लोक आले काये करूं?। कैसियापरी परिहरूं?। का लोक मिळावया करूं। कवणु उपावो? ॥ ४१॥ ऐसा लोकांपासाव, बा रे, । निकारविलाही न विकारे, । दृढु झाला अभ्यंतरें। तो करणेपरी? ॥ ४२॥

हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः

पदार्थीचिया संप्राप्ती। जनें केलिया स्तुति, । वासना पोषे, वीरपति, । उपंजे तो हर्ष. ॥ ४३॥ पदार्थाचा नाशु होये, । आगींचें महत्व जाये, । आळूचि येकाधा ये। दिसे साचार. ॥ ४४॥ लोक करिती अमानु। तैं विषादु होये उत्पन्नु। हर्षा बाधी जैसा दहनु। तैसा तो अहर्ष. ॥ ४५॥ दुजयापासाव बलवता। आपुला निनाशु देखता। कपदातें उपजे सर्वथा। तें भय जाणावें. ॥ ४६॥ स्वार्थपरार्थसोसणी। चिंता कीजे मनीं। तो उद्वेगु धनु:पाणि, । जाणावा तुवा. ॥ ४७॥ मी माझीं कैसीं जिति, । वैरियें कासेन नाशति, । पदार्थ कवणे मिळति। उपायें, पा? ॥ ४८॥ ऐसा उद्वेगु सांगितला। जो मनोवेगु उचलला। स्थिर न बैसे कांहीं केला। तें जाळेन विष. ॥ ४९॥ यापरी हर्षामर्ष दोन्ही। भय, उद्वेग, धनुपाणि, । द्वैताभिनिवेशेंकरुनी। हृदयीं उपजती. ॥ ७५०॥ येहीं स्वभावीं जो सुटला। न चळे गुणीं डोळविला, । मेरू जैसा, नृपाळा। येणें पवनें. ॥ ५१॥ लाभ, अलाभ हे दोन्ही। प्रारब्धें सारिखे मानी, । कीं तया ईश्वरानी

करणी । देखोनि संतोषे. ॥ ५२ ॥ देहीं न धरी अहंता, । स्वजनीं, स्वार्थी ममता, । परजनीं इतरता । मातें जाणोनि. ॥ ५३ ॥ तया भय, उद्वेगु कवणे स्थानीं ? । कां कैसा ? धनुःपाणि, । ऐसा निर्विकारु भजनीं । माझ्या प्रवर्ते. ॥ ५४ ॥ ऐसा अलंकृतु लक्षणीं । भक्तु देखसी, धनुःपाणि, । सत्य दुजें मजवांचूनि । न मने जया. ॥ ५५ ॥

स मे प्रियः च

तो मातें प्रियु जाणावा । माझा गुणु, पांडवा, । न करावा कव्हणीं हेवा । तयाचा, पां. ॥ ५६ ॥ अपार भक्त असती । परी अवघांचि प्रिय न होती, । ऐसे निजदास, वीरपति, । वांचूनिया. ॥ ५७ ॥ मजपासाव-ही अर्जुना, । न इच्छी जो कामना, । भजनीं सीणु मानीना । ऐसा भक्तु. ॥ ५८ ॥ अनपेक्षपण तयाचें । ना वर्णवे मातें वाचे, । तथापि संक्षेपें भक्तांचें । बोलैन उदारपण. ॥ ५९ ॥

अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।
सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥

अनपेक्षः

चिंतामणीहूनि आगळें । देखे मार्गी पडिलें । न म्हणे कव्हणी आपुलें । ऐसें जऱ्ही ॥ ७६० ॥ तऱ्ही तयावरी मन । नुचलती जयाचे नयन । माझिये आवडीवाचून । नापेक्षी दुजें. ॥ ६१ ॥ पाहिजे ऐसेंही परी । तयाची इच्छा न करी, । तो केवि हातु पसरी ? । आणिकातें. ॥ ६२ ॥ दिधला अर्थु, नृपाळा, । हातिंचा न म्हणे आपुला, । पाहों न म्हणे पडिला । हातूनि अर्थु. ॥ ६३ ॥ निरपेक्षाचें लक्षण । राजा रंकु तया समान, । न धरी कव्हणाचें मन । वरी काठिणु नव्हे. ॥ ६४ ॥ धर्मु, अर्थु, कामु, मोक्षु, । येथेंही परी निरपेक्षु, । दाता सर्वथा अलक्षु । वळी ऐसा. ॥ ६५ ॥ जनजनका ईशाचे । पदार्थ सकळ तयाचे, । तेथें इच्छा करी तो साचें । म्हणिजे तरकरु. ॥ ६६ ॥ प्रारब्ध देहीं भोगमूळ । तयावरी घाळूनि सकळ । निश्चितु जाला केवळ, । नापेक्षी काहीं. ॥ ६७ ॥ अपेक्षा धरूनि कांहीं कारणें, । कां करिते असतां साडणें, । हें नाहीं, नेघे मनें । खोटें कर्म. ॥ ६८ ॥

शुचिः

वासनाशुद्ध, तरी ऐसा । आतां बाह्यांतरीं कर्म कैसा । अवधारीं गुडाकेशा । शुचु सांगैन. ॥ ६९ ॥ नित्य, नैमित्तिक कर्म करी, । तो स्वर्गु नेघे शरीरीं, । कर्तृत्व आणि अवधारीं । तयाचें फळ. ॥ ७७० ॥ अज्ञान, अन्यथाज्ञान दोन्हीं । न दिसाति जयाच्या मनीं, । शुद्ध सत्वाच्या पवित्रपणीं । नलगे रजतमादिक. ॥ ७१ ॥ नाठवी कव्हणाचें वाख, चांग । पवित्र देखे सकळ जग, । न उठति जीवीं वेग । कामक्रोधांचे. ॥ ७२ ॥ ऐसा अंतरीं जाला निर्मळ, । न धरी प्रकृतीचा मळ, । आतां बाहेरी देहो स्थूळ । तेथें कैसा ? ॥ ७३ ॥ शौच, स्नानसंपन्नु, । कर्मठु, पवित्रु ब्राह्मणु, । विकर्म अकर्म सांडुनु । वर्ते कर्मी. ॥ ७४ ॥ रात्रीं आंधारीं करावें, । कव्हणा देखों नेदावें । ऐसें कुश्चिळ कर्म स्वभावें । न करी जो कीं. ॥ ७५ ॥ अशास्त्रविहित करणें । तें पाप मानूनि जेणें । माझिये भक्तीकारणें । दिधलें सांडुनी. ॥ ७६ ॥ माझिया भक्ता साच जाण । कर्मविहित हेंचि स्नान, । जेणें विभागिले आश्रम, वर्ण । न मोडति ते. ॥ ७७ ॥ बाह्यांतरीं शौचसंपन्नु, । कर्मशीळ ब्राह्मणु, । दृष्टी सूर्यासमानु । पवित्रु दिसे. ॥ ७८ ॥

दक्षः

कर्मशीळु होये परी । म्हणसी ज्ञानीं अनधिकारी । तरी अर्जुना, अवधारीं । परम दक्षु. ॥ ७९ ॥ जाणोनि वेद, वेदार्थु, । शास्त्रें आणि शास्त्रार्थु, । वोळखोनि मी सकळ सिद्धांतु । तेथें अनुसरला. ॥ ७८० ॥ विधि, निषेध सर्व जाणे । माझा भजनविधु ज्ञानें, । दुसरा निपुण मी नेणें । तया ऐसा. ॥ ८१ ॥ कांहीं नेणोनि प्रवर्तला । भक्तिभावें रगाचि रंगला, । ऐसा भक्तु तो नृपाळा, । काये करिसील ?. ॥ ८२ ॥ तयाचें प्रेम क्षर जाण, । केव्हवां सांडिल नेणे स्मरण । अगा अज्ञानाचें दढपण । नकळे तंवचि. ॥ ८३ ॥ तैसा नव्हे विचक्षणु । सकळां पक्षीं जाणु, । जाण, तयामाजि भानु । ऐसा शोभे. ॥ ८४ ॥ परी तितुलिया ज्ञाना मी जिव्हाळा । ऐसें निर्धारें बुझला, । मग अवघेंचि तें, नृपाळा, । सामान्य देखोनि, ॥ ८५ ॥ माझ्या दासत्वीं रिगांवतु, । ज्ञानी असोनि म्हणवी दूतु, । सिद्धांतावरिल सिद्धांतु । तो मी, अर्जुना. ॥ ८६ ॥ अद्या मातें

सेवावें, । हें असोनिही थोर ठावें, । मातें म्हणे न सोडावें । द्वैतबुद्धी. ॥ ८७ ॥ येणे द्वैतेंसीं पार्था, । भोगी भक्त अद्वैतता । ना ना स्वतःसिद्धाची दुर्लभता । ते काये म्हणे ? ॥ ८८ ॥ मग ठेऊनि अद्वैतभजन । पुढें कैचें ? म्हणे हें सगुण, । दासत्व दुर्लभ म्हणौन । तेंचि आश्रयी. ॥ ८९. ॥ यापरी माझा दासु । जाणोनि भजे फळीं उदासु, । निश्चयें प्रीति बहुवसु । दक्षु तो तो. ॥ ७९० ॥

उदासीनः

कव्हणाची चाड न करी, । पदार्थ देखे तृणापरी । मी मरलों तयाअंतरीं । म्हणौनियां. ॥ ९१ ॥ स्वजनीं, परजनीं उदासीनु, । जाणो कवणाचा काये कवणु, । देहावरी अभिमानु । धरीना जो. ॥ ९२ ॥ पुत्रांप्रति पितेपण । कां पित्राप्रति पुत्रपण । हें नेणे जो आपण । आपणा जाणोनि. ॥ ९३ ॥ स्वजना स्वजनु सोइरा । परी तयासी बाहिर बाहिरा । जैसा दिसे इतरा । प्रति इतरु. ॥ ९४ ॥ मुष्टींची याइली आण, । सर्वदां मोकळे कर, जाण, । हातीं पडलेही जतन । नेणे करूं. ॥ ९५ ॥ पवनु विचरे, धनुर्धरा, । तो कवणाचा गा सोइरा ? । सांगें, तयाचा थारा । कोठें असे ? ॥ ९६ ॥ तैसा जो विचरे जनीं । परी उदासीनु त्रिभुवनीं, । देह, गेह कवणे स्थानीं । सांडिलें नेणो. ॥ ९७ ॥ सकळां परीं पाहुणरु । तिये मक्षिके ऐसा जो नरु, । जया नाहीं रहकारु । येके ठायीं. ॥ ९८ ॥

गतव्यथः

कव्हणी मेलें अथवा गेलें । तयाची व्यथा जया नकळे । हारपलें ना सांपडलें । परंतु सारिखेंचि. ॥ ९९ ॥ हृदयीं विष रिघालें । अथवा देह मरणीं पडलें । परंतु व्यथेचें नाम, रूप गेलें । तें कैंचें आणावें ? ॥ ८०० ॥ हानि पदार्थांचिया खोंचे, । काळिज आता ऐसें कैंचें । जाणो जीतचि तयाचें । देह मेलें. ॥ १ ॥

सर्वारंभपरित्यागी

आतां शेवटील, अर्जुना, । खूण जे सांगों येना, । तेही परंतु मना । सांगों उपजे. ॥ २ ॥ भाजिये भक्तीचेगळें । करणें मात्र जितुलें । तें पुरे म्हणोनि साडिलें । भक्तराजें तेणें. ॥ ३ ॥ तीर्थ, दान, तप, व्रत, । याग,

यज्ञ, पैं निश्चित । विहिताविहितही समस्त । सांडूनिया, ॥ ४ ॥ माझेंचि भजन दृढ धरी, । पुढती तयें काये करी । ते सांगेन तूतें परी । तया भक्ताची. ॥ ५ ॥ जो जो करणीचा वृत्यकुरु । तो तो ध्यानयोगातें चोरु । आता न विसंबावा श्रीधरु । तरी ऐसें करणें. ॥ ६ ॥ सांडूनि शरीराचे व्यापार । आणि कर्मेंद्रियाचे समग्र । माझ्या ठायीं ध्यानपर । होऊनि असतां, ॥ ७ ॥ श्रोत्राचें सांडी आइकणें, । त्वचेचें स्पर्शु जाणणें, । गंधाचें घेणें, देणें । न करी घ्राणद्वारा. ॥ ८ ॥ सांडूनि रसनेचा व्यापारु, । देखणया करूनि मारु । मनाच्या मुळीं स्थिरु । होऊनि राहे. ॥ ९ ॥ तेथें कल्पनांनिगु सांडी । जागरु, स्वप्न दोन्ही फेडी; । मग निद्रेतेंही दवडी, । ऐसा निजे. ॥ ८१० ॥ आठवा, विसरातें सांडितु । माझ्या मूर्तिध्यानीं स्वस्थु, । तेथेंही परी तो भक्तु । काये करी ? ॥ ११ ॥ सांडूनि ज्ञेयाची कल्पना । वियोगु न साहावे, अर्जुना, । मग ध्येयाकारें आपणा । आपणचि ध्याये. ॥ १२ ॥ तेथें आपुल्याही अनुसंधानीं । पुरे म्हणौनि सांडी करणी, । ध्यानकर्मही विसर्जुनी । ठायींचि विरे. ॥ १३ ॥ जाणपणाचा अभिमानु । केवळ करी क्षीणु, । तेथें मना बुद्धीचा कनणु । भावो प्रकाशी ? ॥ १४ ॥ मग ज्ञाता ज्ञेय आणि ज्ञान, । द्रष्टा, दृश्य, दर्शन । विरोनि जाये स्फुरण । आपलें आपुल्या ठायीं. ॥ १५ ॥ तेथें आरंभु गुणकर्माचा, । त्यागु होये तयाचा, । उरे निर्विकल्पु आत्मयाचा । सहजस्वभावो ॥ १६ ॥ तेचि निर्विकल्प आत्मस्थिति । स्वरूपें माझी पूर्ण प्राप्ति । तेथें अवस्था आइती । प्राप्त जाली. ॥ १७ ॥ ऐसा सकळारंभत्यागवंतु, । मजसी वेगळीक नेणतु, । निर्विकल्पु समाधिस्थु । ध्यानेंचि जाला. ॥ १८ ॥

यो मद्भक्तः

वापा, गुणाध्यासें चेइला । तो तेणेंचि ध्येयें आथिला, । परतु अभिमानु न सडी कांहीं केल्या । दासत्वाचा. ॥ १९ ॥ एव अद्वैतबोधसपन्नु, । परतु मद्भक्तीचा न सडी अभिमानु, । उरला देहीं आपणु । भजनचि करी. ॥ ८२० ॥

सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः

का गुणकर्मारंभ सांडून । शेप उरलें अधिष्ठान । तें मी आत्मा जाणोन ।

तेथें भक्तिपरं. ॥ २१ ॥ असो, मजवेगळें कांहीं । जयातें करणें नाहीं । न चळे, न ढळे कहीं । मन्निष्ठ जो. ॥ २२ ॥

स मे प्रियः

तो मातें प्रियु, अर्जुना, । दुसरा तैसा असेना । तयाचिया अपूर्वा चिन्हां । किती सांगों. ॥ २३ ॥

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥**

यः न हृष्यति

प्रिय आणि गुणाचें । सोइरें भेटे देहाचें । तऱ्ही हर्षें चित्त जयाचें । उचंबळेना. ॥ २४ ॥ द्रव्यलाभाचिया राशी । होती, अर्जुना, परियेसी । परंतु हर्षु तो नुठी मानसीं । जया भक्तातें. ॥ २५ ॥ न प्रार्थितां सहजें । राज्यावरि नेउनि बैसविजे । तेथें उगाचि बैसे, परी माझें । म्हणौनि न हर्षेजे. ॥ २६ ॥ लोक करिती सन्मानु । परी नुपजे जया अभिमानु, । मी येकु, अति सुजाणु, । ऐसें न मनी. ॥ २७ ॥ पूजा, स्तुति, नमस्कार । करिती जऱ्ही थोर थोर । तऱ्ही जयाचें अंतर । हर्षे न वसे. ॥ २८ ॥ अर्जुना, माझिया भक्ता । मानु, लाभु, तो सर्वथा । विघ्न करू तत्वता । मरणाहुनि. ॥ २९ ॥ मरणें आत्मनाशु न घडे । असंत अनित्य देह उडे, । मोक्षधन कीर सांपडे । तें नाशेना पुढती. ॥ ८३० ॥ मानें अभिमानु अंकुरे । तेणें मजवेगळा हें खरें । हर्ष पावे तैं वा रे, । नव्हे माझा. ॥ ३१ ॥ सर्वस्वें माझा जाला । ऐसें ना तो वेगळाचि उरला । मजपरीस प्रियु जाला । पदार्थु तया. ॥ ३२ ॥ पतिव्रता आणि धनंजया, । करी परपुरुषेसीं रळिया । स्पर्शें तयाचे निजिया । हर्षु मानिला. ॥ ३३ ॥ तिचें तप वृथा गेलें, । पातिव्रत्य पूर्ण भंगलें, । तैसे हर्षें विटाळले । माझे दास. ॥ ३४ ॥ मन, बुद्धि, देह, प्राण । करूनि मातें समर्पण । अन्य अर्थी रंजन । तें व्यभिचाराऐसें. ॥ ३५ ॥ धातू आणि पाषाण । मजवेगळे ते समान । आतां मदैक्यें लोष्ठ, कांचन । सहज सारिखें. ॥ ३६ ॥ यापरी मजवेगळें सांडितां । अथवा मदैक्यें वस्तू घेतां । हर्षु, विषादु चित्ता । तेंचि नागवण. ॥ ३७ ॥ असो मजवेगळें कांहीं । जरी तया

प्रिय नाहीं । तें मार्गें हर्षु हृदयीं । कां असावा ? ॥ ३८ ॥ एवं प्रिय-पदार्थप्राप्तीं । हर्षे तो अभक्त चित्तीं, । येरु भक्त जया नाथीं । तेणें उल्हासु. ॥ ३९ ॥

न द्वेष्टि

मजवेगळा आने हर्षु । नाहीं ऐसा जो उदासु । तया पदार्थी स्फुरतां द्वेषु । खरा होये. ॥ ८४० ॥ न पाहिजे तें आलें, । पाहिजे आपणा तें येकें नेलें, । तयावरी पीडिलें । परोपरी. ॥ ४१ ॥ एकादा करी वैर । तथापि जयाचें अंतर । तद्वेषें साचार । लिंपेचि ना. ॥ ४२ ॥ प्रियचि नसे सर्वत्र । तें अप्रिय कैंचें तदितर ? । पदार्थ देखे साकार । पदार्थांच्या ठायीं. ॥ ४३ ॥ एव प्रियप्राप्तें हर्षु नाहीं, । अप्रियें दोषु तो कहीं, । जो सर्वदा नसे देहीं । परी मातें विनटला. ॥ ४४ ॥

न शोचति

आतां गतामृताचा शोकु । तो केवीं करी निष्कलंकु ? । ममताशून्यु तोचि येकु । शोकशून्यु सदा. ॥ ४५॥

न कांक्षति

अप्राप्ता अर्थाची आकांक्षा । नाहीं जया पूर्णदक्षा । जो मजवेगळें लक्षा । थोर नाणी. ॥४६॥ माझी प्राप्ति तोचि लाभु, । अप्राप्ति जया अलाभु, । परंतु पदार्थाचा स्वयभु । त्याग सारिखाचि. ॥ ४७ ॥ आतां प्रियें हर्षणें, । अप्रिय तें दूषणें, । हानीं शोकु करणें । अप्राप्तीं इच्छा. ॥ ४८ ॥ हे पदार्थ दृष्टी जया नाहीं । माझाचि झाला अवघाही, । आता पदार्थाची काई । तया चाड. ॥४९॥ अगा, सर्वस्वें माझा होणें । तेणें चिंताचि आपुली सांडणें । न संडी तें न घेणें । माझें नाम. ॥ ५० ॥ माझा जाला असतां । उचित नाहीं चिंता, । म्हणौनि भक्त तो, पार्था, । काये करी ? ॥ ५१ ॥

शुभाशुभपरित्यागी

शुभु मोक्षु, अशुभु बंधु, । या दोन्हींचा सांडिला वादु । मग जैसा तैसा सावधु । माझाचि झाला. ॥५२॥ संता असंतें बंधु न घडे, । म्हणौनि मोक्षही कैंचि घडे? । आतां आत्मा मी निवाडें । जैसा तैसा. ॥ ५३ ॥ कीं शुभफळातें देत शुभ । कर्म अशुभा देतें अशुम । स्वर्गा नरकाचे लाभ । होती जेणें. ॥ ५४ ॥ एव काम्यें, निषिद्धें यें दोन्ही । जेणें सांडिलीं,

धनुःपाणि, । मग कर्तृत्वफळ फेडुनी, । विहितचि घेतलें. ॥ ५५ ॥ कीं अशुभ तें अज्ञान, । शुभ तें आत्मज्ञान, । यें दोन्हीं सांडुन । दासु जाला. ॥ ५६ ॥ पाल्हाळ असो, पांडवा, । भक्तें अर्थु हाचि घ्यावा, । जें दुजा आश्रयो जीवा । न साहे भक्तातें. ॥ ५७ ॥ विकर्म करावें विषयासक्ती । तरी तें जयातें नाथीं । जो मातें रंगला तो अर्थीं । रमेचिना. ॥ ५८ ॥ आतां कर्माधारें तरणें । हें मदाश्रितातें न मने, । येकु निश्चयो जेणें । माझाचि धरिला. ॥ ५९ ॥ तो कर्म विकर्म हें द्वय । करूनि सर्वथा होय । मत्कर्म उपासनामय । तेंचि करी. ॥ ८६० ॥ अंतरीं ध्यानयोगु आश्रयी, । लीन होये तयेचि ठायीं, । बाह्यउपासनाविण नाहीं । कर्तव्य जया. ॥ ६१ ॥ नवविध माझें भजन । विहितकर्म समर्पण, । अगा, माझा तो मजवेगळें आन । कां आश्रयी? ॥ ६२ ॥ मजवेगळें करणें । तें सांडिलें जेणें । आता भळयतें हो येणें । ऐसा निर्धारु. ॥ ६३ ॥

भक्तिमान्यः

आतां तूं ऐसें ह्मणसील । कर्मयोगु कठीण असेल, । म्हणोनि भक्तियोगीं केवळ । घातलें मन. ॥ ६४ ॥ तरी तैसा नव्हे माझा दासु । सकळां अर्थीं उदासु, । माझा सेवितां भक्तिरसु । विकर्म न करी. ॥ ६५ ॥ आणि भक्तियोगेंचि येणें । तरणें अथवा न तरणें, । परंतु दुजें न मनणें । आपुलें विहित. ॥ ६६ ॥ मदासक्ति, मत्प्रीती । माझेनि निश्चयें मद्वृती, । दुसरा आधारु चित्तीं । न धरी जो भक्तु. ॥६७॥ ऐसिया भक्तियुक्तु । देखसी जो माझा भक्तु, । आणिका न वीहे, त्यागवंतु । सकळां धर्मीं. ॥ ६८ ॥

स मे प्रियः

तो मातें प्रियु अर्जुना, । अनन्यभक्तु जो जना । तया स्पर्शु त्यागों देना । आणिकाचा मी. ॥ ६९ ॥ माझेनि ध्यानें अवधारीं, । राहिलेंही कर्म जऱ्ही । तथापि पडों नेदीं संसारीं । मी तयातें. ॥ ८७० ॥ येर्फाचि, अर्जुना, जाण । मजसमान नाहीं आन, । कर्म मनुष्यालागून । म्याचि केलें. ॥ ७१ ॥ कर्मीं मीचि भोक्ता, । कर्तया फळदाता, । मी रक्षीं तया सर्वथा । पाहे कोण ? ॥ ७२ ॥ आणि तो कर्मीं अधिकारी । माझा भक्तु नव्हे, अवधारीं । जीवन्मुक्तु म्हणिजे तरी । शोभे तैसा.

॥ ७३ ॥ देहीं असोनि तो विदेही, । कर्म तयातें करी कायी । आतां वर्ते अदेही । कैसा म्हणसील ? ॥ ७४ ॥

समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।
शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥

**शत्रौ च मित्रे च समः**

तरी वैरी आला जो मारावया । आणि सर्वेचि मित्र रक्षावया । देखोनिया दोघां तयां । सारिखेंचि पाहे. ॥७५॥ अरि, मित्र जया समान । तयाचें कैसें मन, । अर्जुना, मद्योगेंकरून । सर्वथैव. ॥ ७६ ॥ देहात्मभावावेगळें । म्हणौनि जिणें, मरणें न कळे, । मग तद्दृष्टी पाहिलें । सकळ भान. ॥ ७७ ॥ आभासे, अर्जुना, परी । मिथ्या मृगजळवत् अवधारीं; । म्हणौनि मित्रु आणि वैरी । हे भाष मोडली. ॥ ७८ ॥

**तथा मानापमानयोः**

आता देहादि मिथ्याभान । जाणे जो मज जाणोन, । तया केलेही मान, अपमान । सारिखेचि. ॥ ७९ ॥

**शीतोष्णसुखदुःखेषु समः**

. शीतोष्ण वाजे आंगीं । सुख, दुःख उठी तत्संयोगीं, । असो, इंद्रियविषयसंगीं । जें जें उपजे. ॥ ८८० ॥ सुख अथवा दुःख । परी सारिखेंचि तें सकळैक, । जो सत्त्वेंगळें आणिक । सत्य म मनीं. ॥ ८१ ॥

**संगविवर्जितः**

असो, गा, स्वप्रकृतीचा संगु, । तिणेसीं वेगळा अंतरंगु, । आत्मत्वें स्थिरु, अभंगु । तो न ढळे बाह्यस्पर्शीं. ॥ ८२ ॥ म्हणौनि देहीं असोनि विदेही, । गुणाचा स्पर्शु जया नाहीं, । प्रकृतिवेगळा, जाणयीं । जाला म्हणौनि. ॥ ८३ ॥ अगा, स्वप्रकृतिव्यतिरेकें । परप्रकृती जो न मखे । म्हणौनि मायाचक्र हें आइकें । यया जो वेगळा. ॥ ८४ ॥ अथवा तो संगवर्जितु । आत्मत्वें दुजें नेणतु, । अधिष्ठानावेगळा विवर्तु । स्वतंत्रु कैंचा ? ॥ ८५ ॥ सर्वातीतु, सर्वमयु, । सन्मात्रु, आत्मा अद्वयु, । स्वयं जो, तया ज्ञेयु । हा पदार्थु कैंचा ? ॥ ८६ ॥ अर्जुना, माझ्या ध्यानीं चित्त मुरे, । कल्पनेसीं मन जिरे, । तें ऐसा होउनि उरे । माझा भक्त. ॥ ८७ ॥ माझें करितां मूर्तिध्यान । ध्येयेसीं होये येकपण । तेथें

धनुःपाणि, । मग कर्तृत्वफळ फेडुनी, । विहितचि घेतलें. ॥ ५५ ॥ कीं अशुभ तें अज्ञान, । शुभ तें आत्मज्ञान, । यें दोन्हीं सांडून । दासु जाला. ॥ ५६ ॥ पाल्हाळ असो, पांडवा, । भक्तें अर्थु हाचि घ्यावा, । जें दुजा आश्रयो जीया । न साहे भक्तातें. ॥ ५७ ॥ विकर्म करावें विषयासक्ती । तरी तें जयातें नार्थी । जो मातें रंगला तो अर्थी । रमेचिना. ॥ ५८ ॥ आतां कर्माधारें तरणें । हें मदाश्रितातें न मने, । येकु निश्चयो जेणें । माझाचि धरिला. ॥ ५९ ॥ तो कर्म विकर्म हें द्वय । करूनि सर्वथा होय । मत्कर्म उपासनामय । तेंचि करी. ॥ ८६० ॥ अंतरीं ध्यानयोगु आश्रयी, । लीन होये तयेचि ठायीं, । बाह्यउपासनाविण नाहीं । कर्तव्य जया. ॥ ६१ ॥ नवविध माझें भजन । विहितकर्म समर्पण, । अगा, माझा तो मजवेगळें आन । कां आश्रयी ? ॥ ६२ ॥ मजवेगळें करणें । तें सांडिलें जेणें । आता भलयतें हो येणें । ऐसा निर्धारु. ॥ ६३ ॥

भक्तिमान्यः

आतां तूं ऐसें ह्मणसील । कर्मयोगु कठीण असैल, । म्हणोनि भक्तियोगीं केवळ । घातलें मन. ॥ ६४ ॥ तरी तैसा नव्हे माझा दासु । सकळा अर्थी उदासु, । माझा सेवितां भक्तिरसु । विकर्म न करी. ॥ ६५ ॥ आणि भक्तियोगेंचि येणें । तरणें अथवा न तरणें, । परंतु दुजें न मनणें । आपुलें विहित. ॥ ६६ ॥ मदासक्ति, मत्प्रीती । माझेनि निश्चयें मद्व्रती, । दुसरा आधारु चित्तीं । न धरी जो भक्तु. ॥६७॥ ऐसिया भक्तियुक्तु । देखसी जो माझा भक्तु, । आणिका न वीहे, त्यागवंतु । सकळ धर्मी. ॥ ६८ ॥

स मे प्रियः

तो मातें प्रियु अर्जुना, । अनन्यभक्तु जो जना । तया स्पर्शु लागों देना । आणिकाचा मी. ॥ ६९ ॥ माझेनि ध्यानें अवधारीं, । राहिलेंही कर्म जन्हीं । तथापि पडों नेदीं संसारीं । मी तयातें. ॥ ८७० ॥ येकचि, अर्जुना, जाण । मजसमान नाहीं आन, । कर्म मनुष्यालागून । म्याचि केलें. ॥ ७१ ॥ कर्मी मीचि भोक्ता, । कर्तया फळदाता, । मी रक्षीं तया सर्वथा । पाहे कोण ? ॥ ७२ ॥ आणि तो कर्मी अधिकारी । माझा भक्तु नव्हे, अवधारीं । जीवन्मुक्तु म्हणिजे तरी । शोभे तैसा.

॥ ७३ ॥ देहीं असोनि तो विदेही, । कर्म तयातें करी कायी । आतां वर्ते अदेही । कैसा म्हणसील ? ॥ ७४ ॥

समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।
शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥

**शत्रौ च मित्रे च समः**

तरी वैरी आला जो मारावया । आणि सर्वेचि मित्रु रक्षावया । देखोनियां दोघा तयां । सारिखेंचि पाहे. ॥७५॥ अरि, मित्र जया समान । तयाचें कैसें मन, । अर्जुना, मद्योगेंकरून । सर्वथैव. ॥ ७६ ॥ देहात्मभावानेगळें । म्हणौनि जिणें, मरणें न कळे, । मग तद्दृष्टी पाहिलें । सकळ भान. ॥ ७७ ॥ आभासे, अर्जुना, परी । मिथ्या मृगजळवत् अनधारी; । म्हणौनि मित्रु आणि वैरी । हे भाप मोडली. ॥ ७८ ॥

**तथा मानापमानयोः**

आता देहादि मिथ्याभान । जाणे जो मज जाणोन, । तया केलेही मान, अपमान । सारिखेचि. ॥ ७९ ॥

**शीतोष्णसुखदुःखेषु समः**

शीतोष्ण वाजे आंगीं । सुख, दुःख उठी तत्संयोगीं, । असो, इंद्रियविषयसगीं । जें जें उपजे. ॥ ८० ॥ सुख अथवा दुःख । परी सारिखेंचि तें सकळैक, । जो सत्तेवेगळें आणिक । सत्य न मनी. ॥ ८१ ॥

**संगविवर्जितः**

असो, गा, स्वप्रकृतीचा संगु, । तिणेसीं वेगळा अंतरंगु, । आत्मत्वें स्थिरु, अभगु । तो न ढळे वाह्यस्पर्शीं. ॥ ८२ ॥ म्हणौनि देहीं असोनि विदेही, । गुणाचा स्पर्शु जया नाहीं, । प्रकृतिवेगळा, जाणयीं । जाला म्हणौनि. ॥ ८३ ॥ अगा, स्वप्रकृतिव्यतिरेकें । परप्रकृती जो न मखे । म्हणौनि मायाचक्र हें आइकें । यया जो वेगळा. ॥ ८४ ॥ अथवा तो संगवर्जितु । आत्मत्वें दुजें नेणतु, । अधिष्ठानावेगळा निवर्तु । स्वतंत्र कैंचा ? ॥ ८५ ॥ सर्वार्थतु, सर्वमयु, । सन्मात्रु, आत्मा अद्वयु, । स्वय जो, तया ज्ञेयु । हा पदार्थु कैंचा ? ॥ ८६ ॥ अर्जुना, माझ्या ध्यानीं चित्त मुरे, । कल्पनेसीं मन जिरे, । तैं ऐसा होउनि उरे । माझा भक्तु. ॥ ८७ ॥ माझें करितां मूर्तिध्यान । ध्येयेसीं होये येकपण । तेथें

मिरे ज्ञेय, ज्ञान । मीपर्णेसीं. ॥ ८८ ॥ तैं ऐसी अवस्था उरे, । म्हणौनि जाण, वा रे, । भक्त विदेही हें खरें । जीवन्मुक्त. ॥ ८९ ॥ आतां ध्यान-योगीं आसक्त । बाह्योपासकुही भक्त । समत्वें प्रकृतिअतीतु । ऐसोंचि मानावें. ॥ ८९० ॥ हानि, लाभु, जरा, मरण । हें जाणे जो ईश्वराधीन, । मग देह तें मदर्पण । करूनि ठाये. ॥ ९१ ॥ आतां वैरी, मित्र, या जाती । कवणाचें काये करिती ? । देखोनि भूतचेष्टा, वीरपति । चळेना जो. ॥ ९२ ॥ माळी पडळया कुसळां । जळस्पर्शें नृपाळा, । चरमावो उपजला । ते न होती जीवधर्मु. ॥ ९३ ॥ दोरें घेतला पीळ । मग चळे तऱ्ही नव्हे व्याळ, । चिखलाचा करीं सुकाळ । ऐसें मृगजळ कैंचें ? ॥ ९४ ॥ तैसे वैरी, मित्र, स्वजन । आभासे मात्र जें भान । बाह्य करी चलन । ऐसें जऱ्ही; ॥ ९५ ॥ तऱ्ही ययांचा जो आत्मा । तो माझा स्वामी परमात्मा; । तयावेगळा अनात्मा । जडु, असंतु. ॥ ९६ ॥ तो आपुलिया दूता । होईलचि जैं राखिता । तैं हा वैरी वृथा । काये करील ? ॥ ९७ ॥ तोचि मारील जैं मातें । मित्र काये करितील तेथें ? । यालागीं आवेश करी ते । वावो ययांचे. ॥ ९८ ॥ मारिता इच्छा न करी । तैं काये कीजे हातीं येरी ? । म्हणे सर्वात्मया श्रीहरि । समर्थु तूं. ॥ ९९ ॥ ऐसियापरींही अर्जुना, । अचल जयाची भावना । तो ज्ञानयोगियांमाजि कवणा । उणा कल्पावा ? ॥ ९०० ॥ ईश्वरु कर्ता हें जाणोन । यंत्रवत देखे भान, । तेथें स्वतां कर्तृत्व सांडून, । असंगु होये. ॥ १ ॥ ऐसेनि असंगत्वें निश्चळु । निजदासु जो सत्वशीलु । तयाच्या देहीं आडळु । होतांही परी, ॥ २ ॥ वैरी, मित्र, सम देखे । मानामान सर्व सारिखे, । माखळाही शीतोष्णादिकें । जाणे सारिखीं. ॥ ३ ॥

तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित्।
अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥

तुल्यनिंदास्तुतिः

येक करिती स्तवन, । वाखाणिती निर्दोष गुण, । तंव तेथेंचि दुजें भान । निंदे प्रवर्तले. ॥ ४ ॥ अवयारीं गा धनुःपाणि, । सन्मुखचि होतां दोन्ही । सारिखींचि जयालागूनि । वचनें भासती. ॥५॥ देहीं असतां प्रीति । आणि आत्मत्वाची मति, । तरी अभिमानुमहंती । काही उपजावी. ॥ ६ ॥

मी ऐसेनिही अभिमानें । स्वतंत्र नाहीं जया उठणें । ईश्वरसत्तास्फुरणें । देखे सर्वांचीं. ॥७॥ सारिखेंचि वाचारंभण, । नाद दृष्टी, शब्द समान । अंतरीं देवाचें प्रवर्तकपण । ऐसें देखे. ॥ ८ ॥ कीं ध्यानयोगीं निमाला । तो देहबुद्धी नाहीं चेइला । स्वरूपें जाणु जाला । बाह्यभान. ॥ ९ ॥ तव स्तुति, निंदा यें दोन्ही । न लगति आपुल्या स्थानीं, । मग तीर्थांच्या साचपणीं । हें भानचि बुडे. ॥ ११० ॥ मग शब्द आणि भान । हें आत्ममय देखे समान, । कीं विरतु सत्येंवाचून । तो कैंचा तेथें? ॥ ११ ॥ म्हणौनि निंदा, स्तुति यें दोन्हीं । जाणोनि सारिखीं मानी, । तो आपणु आपुल्या स्थानीं । कैसा राहे? ॥ १२ ॥

मौनी

वाचेचें साडूनि मौन । अवलंबीना बळें वचन । जेणें ध्यानयोगीं मन । निष्ट केलें. ॥ १३ ॥ अर्जुना, वचन वदावें जैसें । मौनावलंबन तेंही तैसें, । करावें लागे आयासें । म्हणौन अमौन. ॥ १४ ॥ वैखरी धरी मौन । तें तिहीं वाचाचें अमौन । जरी तें अंतरीं मन । मेलें नसे. ॥ १५ ॥ म्हणौनि मौन तें तैसें नव्हे । जें लागे बळें धरावें; । आतां मौन आइकें स्वभावें । कुशळाचें. ॥ १६ ॥ मनें कारितां नित्य मनन । मध्यमे वैखरीतें पडे मौन, । तेथें उरलें अवस्थान । परे, पश्यंतीतें. ॥ १७ ॥ मग ध्यानयोगाचिया सिद्धीं । स्वरूपीं सामावी मन, बुद्धी । मीपण विरे समाधीं, । उरे निर्विकल्पता. ॥ १८ ॥ तिया असता स्थिती । चहू वाचांची प्रवृत्ति नाथी, । मौन लोकांतीं एकांतीं । ऐसें भक्ताचें. ॥ १९ ॥

येन केनचित् संतुष्टः

उरल्या देहीं, पार्था, । निर्वाहो होये कारिता । तैं स्वार्थ, ममता, चिंता । तिन्ही साडी. ॥ १२० ॥ जितुलें जेणें काळें । प्राचीनवशें मिळे । तितुलेंचि संपूर्ण जालें । तेणें संतुष्ट. ॥ २१ ॥ देह राहो कल्पांतीं । कां आताचि हो विभूती । परंतु असत भान चित्तीं । न मनी साचार. ॥२२॥ येकें प्रस्थें जैसा धाये । तैसाचि मुष्टीं दों तृप्तु होये, । मग द्रोण आढक न पाहे । तयावरी. ॥ २३ ॥ कौपीनें सरे चाड । न सरे तरी महागोड, । परतु वस्त्र नापेक्षी वाड, । संतुष्टु जाला. ॥२४॥ जये काळीं जो दे जितुलें । न प्रार्थितां तेणें काळें । तितुलेनीचि तें आगळें । ऐसें मानी. ॥ २५ ॥

हानि, लाभु, दैवगती । जिर्णे, मरणें मानी चित्तीं, । काळीं पदार्थाची प्राप्ती । मानूनि तदनुसार. ॥ २६ ॥ तितुलेंचि मानी अपार, । रक्षी तितुलेंचि शरीर, । इच्छा न करी घर । हृदयीं जयाच्या. ॥ २७ ॥ मिळालें तितुलेंचि खाये, । राहिला तेथेंचि राहे, । सम, विषम हीं न पाहे । भूमिस्थान. ॥ २८ ॥

अनिकेतः

येकस्थानीं न करी वासु, । अर्जुना, दीडुही दिवसु, । पवनु जैसा उदासु । सर्वत्र विचरे. ॥ २९ ॥ न करी आश्रम, आराम, । न लावी वृक्ष मनोरम, । मार्गे हो ख्याति, नाम । ऐसिया बुद्धी. ॥ ९३० ॥ वैर आणि मैत्री । कन्हणासीं जो न करी, । ना मनसंगें चोरी । आंगिचे सद्भाव. ॥ ३१ ॥ आइकें, आश्रम जे करिती । तयां उपजे तेथें प्रीती, । मित्र, वैरी जोडती । न जोडितांही. ॥३२॥ आश्रमधर्मी वर्ततां । द्रव्याची पाहिजे चिंता, । जनाचें मन धरितां । परमार्थु जाये. ॥ ३३ ॥ राजभय, चोरभय, । लोकभय, अरिभय, । ऐसें उपजे, संदेह । पडती नाना. ॥३४॥ आतिथि, देव, पितर, । ययांचें व्हावें किंकर, । आटावें पडे शरीर । नाना कष्टीं. ॥३५॥ वाजे खेदु, संतापु, । समास्तव भौतिकु तापु, । भय, क्रोधु अमुपु । पिके देहीं. ॥ ३६ ॥ म्हणौनि येकस्थानीं वासु । सर्वथा ना करी जो पुरुषु । जेथें तेथेंचि उदासु । करी काळक्षपण. ॥३७॥

स्थिरमतिः

ऐसा शरीरें नव्हे स्थिरु । तो बुद्धिन चळे नरू । स्वस्थानीं दृढतरु । तो न चळे तेथूनि. ॥ ३८ ॥ आकाशीं पवनु विरे । तो जैसा पुढती न विचरे । तैसा मनोधर्मु मरे । स्वस्थानीं जयाच्या. ॥ ३९ ॥ माझ्याचि मूर्तिध्यानीं । राहिला जो बुद्धीतें घेउनी । तो उठवितांही तेथुनी । चंचलु नव्हे. ॥ ९४० ॥ तेथेंचि स्फुरोनि असणें । विरणें तें तेथेंचि विरणें; । परी माझिया स्वरूपा होणें । वेगळें नसे. ॥ ४१ ॥

भक्तिमान्नरः

म्हणसी अभ्यासें राहिला । तरी अवधारीं, गा नृपाळा । प्रीतियोगें गुंतला । तो निवडों नेणे. ॥ ४२ ॥ प्रेमाचेनि पडिभरें । नाठवितांही वा रे, । माझें स्वरूप न विसरे । दिवारात्रीं. ॥ ४३ ॥

मानसिक करी पूजन, । सेवा, उपचार, ध्यान; । मग तदर्थें बुद्धि, मन । घे आवरूनिया. ॥ ४४ ॥ माझूनि स्फुरणाहता । तेथेंचि होये हारपता । तो न हारपतु, पार्था, । मीचि होये. ॥ ४५ ॥ तेथूनि सावधु होये । तव दासत्वेंसीं उभा राहे, । एवं उरला, विराला नव जाये । मजसीं अंतरें. ॥ ४६ ॥ ऐसा जो कीं प्रेमवतु, । निरंतर युक्तु, भक्तु, । नरू माझा दूतु । उत्तमा गुणाचा. ॥ ४७ ॥

मे प्रियः

तो मातें प्रियु अतिमानें, । तृप्तु मी त्याचेनि भजनें, । तयाचें काहीं न करणें । तेंही घें भक्तीसाठीं. ॥ ४८ ॥ अर्जुना, तुझेनि प्रश्नें । इतुलें पडलें सांगणें, । योगवित्तमाचीं लक्षणें । पुसिलीं तुवां. ॥ ४९ ॥ तरी निर्मळ, निराकार, । परब्रह्म, अज, अक्षर । तें निराधारें योगें नर । साधिती हटें ॥ ९५० ॥ तया योगाहूनि वीरेशा, । मदाश्रितु योगु हा ऐसा । सुलभु, वरी माणुसा । शीघ्र फळे. ॥ ५१ ॥ येथिंचा मी अभिमानी, । आता हा श्रेष्ठु माझेनी । म्हणौनि मद्भक्तु ज्ञानी । तो ज्ञानिया आगळा. ॥ ५२ ॥

ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।
श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेतीव मे प्रियाः ॥ २० ॥

इदं धर्म्यामृतम्

मदाश्रिता योगाचें साधन । तें रोगिया अमृतपान, । मरण हरूनि आपण । सुख दृष्ट नव्हे. ॥ ५३ ॥ धर्मरूप, मोक्षरूप । समीश्रयाचें स्वरूप । सागता तुज आपोआप । येईल कळों. ॥ ५४ ॥ मी आत्मा ऐसें जो जाणे । हे धर्मुचि तयाकारणें, । आत्मा तैं स्वस्थिती असणें । पाहिजे तया. ॥५५॥ तरी ध्यानयोगें वर्तता । आपणा होये ध्येयाकारता, । तेथें मन, बुद्धि पार्था, । घेवोनि विरणें. ॥५६॥ इतुलयानरी जैसें असणें । निजात्मस्थिती पूर्णपणें । हा आत्मा तरी हें करणें । धर्मु ययासी. ॥ ५७ ॥ हा ह्मणेल मी जीवात्मा । तरी मद्रुा जो जाणाना चिदात्मा, । अंशी तो मी परमात्मा । याचें मुख्यबिंब. ॥ ५८ ॥ माझ्या ठायीं सामावणें । हाचि धर्मु ययाकारणें, । तरी ध्यानयोग प्रवर्तणें । अवश्य पाहिजे. ॥५९॥ मग ध्येय आत्मत्वें जाणोनी, । मन, बुद्धि माझी घेउनी । मिळावें आपुल्या कारणीं । ऐसा धर्मु. ॥ ९६० ॥ हा ह्मणेल मी, दासु । तरी, अर्जुना,

मी याचा ईशु, । आतां माझेनि उदासु । कैसेनि होईल ? ॥६१॥ करावें भजन, । अंतरीं माझें ध्यान, । न स्मरावें मजवाचून धर्मु. ॥६२॥ येणें स्वधर्में वर्तावें, । मग मातें प्रियु व्हावें, । धरावे । जे, मागां बोलिले. ॥६३॥

" अद्वेष्टा सर्वभूतानां "

हे आदि, अर्जुना, जाणें, । " तुल्यानिंदा "पर्यंत बोलणें । आवडती लक्षणें । सागितलीं भक्तांचीं. ॥ ६४ ॥ तेंहीं लक्षणे असावें, । हा धर्मु तया स्वभावें, । आतां कव्हणी ह्मणती पुत्रु आली. ॥ ६५ ॥ तरी पुत्र पितयाचेंचि ह्मणें । काचा मग न होणें । मजवेगळें न भजणें । हा पु ॥ ६६ ॥ कांहींचि नेणे जो आज्ञु । वर्णाश्रमीं धरी अभिमानु, वेदोक्त धर्म मानू । नित्यु, नैमित्तिकु. ॥ ६७ ॥ परी तेथेंही, अर्जु माझीच करावी उपासना, । कर्मफळ इच्छावें ना, । करावें म ॥ ६८ ॥ मनुष्याचाचि जो होये । तया पितृभजेन धर्मु आहे । धर्म यायां न जाये । तें ऐसियाकारणें. ॥ ६९ ॥ स्त्री पुरुषातें भजे, बा पुत्र भजे ते पितरें, । येथें मीचि भेटें साक्षात्कारें । भक्तीच्या ॥ ९७० ॥ तेंही परी माझें भजन, । आतां ययावेगळें आचरण । तें आणि जाण । मत्प्राप्ती न करी. ॥ ७१ ॥ ह्मणौनि भक्तियोगु सागित हा धर्मरूपु सकळां, । आतां अवधारीं नृपाळा, । पांडुनंदना. ॥ ७ धर्मरूप होये परी । मोक्षरूपु अवधारीं, । सांगिजेल तयापरं जीवीं धरावा. ॥ ७३ ॥ सागितलीं भक्तीचीं लक्षणें । मुक्ताचीं शुद्ध चिन्हें, । भक्तु तो ययाकारणें । जीवन्मुक्त जाण ॥ ७४ ॥ जीवन्मुक्ताची निष्ठा । अंतरीं यय अंस सुमटा ते आइक, प्रेमपुष्टा । अर्जुना, तूं. ॥ ७५ ॥ ध्यानयोगु सांग घं मग ध्येयाकार होणें फुडें, । येरव्हीं मन, बुद्दि न संपडे । म ठायीं. ॥ ७६ ॥ म्हणौनि जें माझें ध्यान । तेंचि होय स्वरूपानुसंधान मग तेंही साडितां स्फुरण ॥ कैसें होय ? ॥ ७७ ॥ देहादि प्रपंचुआम भान त्रिपुटीसीं माळुरे, । तयें अभावो तोहि स्वात्मभावें । मा होय. ॥ ७८ ॥ मग भावाभावविरहित । स्वरूप निर्मळ, शांत

नदभेदमुक्त । शेष उरे. ॥ ७९ ॥ तन्मयाकार असता ।
ल्पता, पार्था, । ब्रह्मस्थिति गा, सर्वथा । नाहीं संदेहो. ॥ ९८० ॥
रसोनिही निर्गुणु । न सांडी दासत्वाचा अभिमानु । तेणें गुण-
आपणु । गुणातीतु जाहला. ॥ ८१ ॥ आत्मत्वें अभेदु भेदु ।
ी जयाचा बोधु । तो सर्वेसीं ब्रह्मसिद्धु । कैसा न मनावा ! ॥ ८२॥
माझें भजन । मोक्षरूप धर्म जाण, । ययाची करावी जतन ।
ड्णौनियां. ॥ ८३ ॥

र्युपासते

श्रयें आणि प्रीतीं । यया मातें ते भजती । कवणे प्रकारें पुढती ।
ह्मणौन. ॥ ८४ ॥

म्

ड्या ठायीं बुद्धि, मन । घालूनि असावें, जाण, । निर्विकल्प आत्मस्वरूण ।
जयापरी. ॥ ८५ ॥ हें न टके तूतें कां जरी । मन आमुलें आवरीं ।
ठायीं निश्चळ करीं । निर्विकार. ॥ ८६ ॥ हेंही न करवे इतुकें ।
त्कर्म पाहिजे केलें, । माझेनि दासत्वबळें । पायसील. ॥ ८७ ॥
न करवे, अर्जुना, जरी । तरी निहितजात जें शरीरीं । तें तन्ही
करीं । प्राप्ति इच्छूनियां. ॥ ८८ ॥ ऐसें मागा सांगितलें । तेणें प्रकारें
ळें । जेंहीं धर्मामृत सेविलें । साधिलें हें. ॥ ८९ ॥

ना:

तितिविण हें न टके, । मन न रजे दुःखें, । म्हणौनि श्रद्धावंत ते
। जयां साधे. ॥ ९९० ॥

मा:

से प्रीतीचें वोतलें, । निश्चयाचे आकारले, । न मनिती मजवेगळें ।
वे जे. ॥ ९१ ॥ मजवेगळें काहीं । पावावें ऐसें जयां नाहीं । आपणां
ळें जेंहीं । न चळतीचि. ॥ ९२ ॥

र प्रीतिनिश्चयसयुक्त । अनन्यभावें माझे भक्त । जयां मजवेगळें
। तें असोचिना. ॥ ९३ ॥

तेऽतीव मे प्रियाः

से अतिशय अवधारीं, । प्रिय मातें ययापरी । जे सांगितलीं
मागां प्रीतियोगाची. ॥ ९४ ॥ उक्त चिन्हीं अलंकृत, । सर्व
शांत, । प्रेमाळु, दृढ विरक्त, । येकनिष्ठ जे. ॥ ९५ ॥ ऐसा श्रे
योग्यु । सांगितला दासत्वमार्गु । यया अंतरंगु, बहिरंगु । पुरुषु
॥ ९६ ॥ तो माझा प्रियु जाणें, । सांगितलीं तयाचीं लक्षणें; ।
तुझेनि प्रश्नें । इतुलें जालें, गा. ॥ ९७ ॥

ॐतत्सदिति श्रीमहाभारते शतसाहस्र्यां संहितायां वैय्यासिक्यां भी॰
श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीदिगंबरा
चरकृता गीतार्णवनाम्नी टीका । तस्यां टीकायां श्रीकृष्णा-
र्जुनसंवादे भक्तियोगो नाम द्वादशोऽध्यायः ।

---